# मराठी शब्दकोश

## चौथा खंड
( त - ते - न )




महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई.

# मराठी शब्दकोश

## चौथा खंड

## (त ते न)


संपादनप्रमुख

प्राचार्य रामदास डांगे

•

संपादनसहयोगी

• पूर्णिमा लिखिते
*एम. ए.*

• अरुण प्रभुणे ( पुणे )
*एम. ए., बी. एड., पीएच. डी.*

• सुप्रिया महाजन
*एम.ए. (संस्कृत)*

• रूपाली अवचरे
*एम.ए., एम. फिल.*

• संदीप तापकीर
*एम.ए.*






महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ , मुंबई

◆ 'मराठी शब्दकोश' (चौथा खंड)

❧

◆ प्रथम आवृत्ती
जुलै २०११

❧

◆ प्रकाशक
सचिव,
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ,
रवीन्द्र नाट्य मंदिर, दुसरा मजला,
पु. ल. देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी आवार,
सयानी रोड, प्रभादेवी, मुंबई – ४०००२५.

❧



❧

◆ अक्षरजुळणी
सौ. चेतना विकास वडके
शब्दमाधुरी, पुणे
भ्रमणभाष : ९८९०९८४९२७

❧

◆ मुद्रक
व्यवस्थापक,
शासकीय फोटोझिंको मुद्रणालय
पुणे – ४११००१

❧

◆ किंमत : रुपये १९१ फक्त

# निवेदन

'मराठी शब्दकोशा'चा त-वर्गातील वर्णांचा समावेश असलेला हा चौथा खंड वाचकांना सादर करताना आनंद होत आहे. कोशप्रकल्पाचे मुळात खंडित झालेले कार्य नव्याने सुरू करून अपेक्षित मुदतीत होत आहे आणि मंडळाचे अध्यक्ष श्री. मधु मंगेश कर्णिक यांनी टाकलेल्या विश्वासाला आम्ही तडा जाऊ दिला नाही याचेही समाधान आहे.

तिसऱ्या खंडाच्या निवेदनात 'चौथ्या खंडाचेही काम पूर्ण झाले आहे' असे म्हटले होते. ते या प्रकाशनाच्या रूपाने पूर्ण होत आहे. प- वर्गातील वर्णांच्या शब्दकोशाचे कामही यावर्षी लवकरच हातावेगळे करायचे आहे. य- वर्गातील वर्णांच्या कोशाचेही काम सुरू केले आहे.

शब्दांच्या अर्थस्पष्टीकरणासाठी आवश्यक तेथे अनेक ग्रंथांतून 'अवतरणे' दिली आहेत. अशा ग्रंथांची निर्देशसूची त्यांच्या संक्षेपांसह या खंडात समाविष्ट केली आहे.

पुरवणी-खंडाचे काम अधिक व्यापक भूमिकेतून करायचे आहे. यावर्षी महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने विद्यापीठांच्या साहाय्याने वऱ्हाडी, अहिराणी इत्यादी बोलींच्या कोशांचे कामही सुरू केले आहे. त्याचाही उपयोग पुरवणी-खंडासाठी करून घ्यावयाचा आहे.

मागील खंडात म्हटल्याप्रमाणे, शब्दकोशाच्या या अवघड कार्यात मंडळाचे अध्यक्ष पद्मश्री श्री. मधु मंगेश कर्णिक आणि सचिव श्री. सुरेश वांदिले यांच्या पाठपुराव्यामुळे आणि तत्परतेमुळे कामाची गती वाढली आहे, हे येथे नोंदलेच पाहिजे.

यावर्षी संपादनमंडळात श्री. संदीप तापकीर, एम.ए. यांची भर पडली आहे. सौ. सुषमा माने यांचे विविध कोशांतील शब्दसंकलनाचे कामही व्यवस्थित सुरू आहे. या कामात सौ. वैशाली मोहिते, एम. ए. ह्या सहकार्य करीत आहेत. गेल्या दोन वर्षांपासून कार्यालयीन कामकाज श्री. विनायक दंडगे उत्तम रीतीने सांभाळत आहेत.

– संपादक



**त** मराठी वर्णमालेतील एकतिसावा वर्ण व सोळावे व्यंजन.

**तइ–ई** क्रिवि. १. तेव्हा; त्या वेळी : 'वचन आपुलें सिद्धी नेई। तुका म्हणे तई मज कळसी।'– तुगा ७३६. २. तेथे; तिकडे. [सं. तदा]

**तइ–यी** अ. खाली; पाठी. (वा.) ० **ढकलनं** – काणाडोळा करणे; दोषांकडे दुर्लक्ष करणे; लपवणे. (अहि.)

**तई** क्रिवि. रवाना; पाठवलेला : 'वझीर आजम व खानदौरा व बंगस वगैरे अमीर तई केले.'– पेद १५.१७.

**तई** स्त्री. १. अन्न शिजविण्यास उपयोगी असे धातूचे किंवा मातीचे भांडे; तवी; तवली. – बदलापूर ६५. २. चपटा दगड. (अहि.) ३. जात्याची तळी. (अहि.) (वा.) ० **उखलनं** – काढून टाकणे; वगळणे.

**तईनी जमीन** नांगरताना तळ्यासारखी ढेकळे निघतात अशी टणक जमीन. (अहि.)

**तऊर** पु. १. तोरा; आढ्यता; दिमाख; ऐट; अभिमान; गर्व. २. तल्लखपणा; लगेच राग येण्याचा स्वभाव; शीघ्रकोपित्व. ३. दिलदारपणा. ४. हिंमत; धिटाई; हिय्या. (फा.)

**तक** पु. तवा. उदा. 'कर्मतक'–रावाको.

**तक** पु. १. नवस. २. कुवत. (झाडी)

**तक** स्त्री. संधी; वेळ; प्रसंग : 'हे तक फार उत्तम आहे यैसी येणार नाही.'– पेद ३६.८१. [हिं.]

**तक(ग)ई** पहा : **तकवाई**

**तकट** न. १. दागिने करण्यासाठी ठोकून पातळ केलेला सोने इ. धातूचा पत्रा; तबक; वर्ख. २. लहान मुलामुलींच्या करगोट्यात पुढे घालावयाचे पिंपळपान; एक दागिना. (राजा.) [फा.]

**तकट, तकटून** वि.,क्रिवि. १. क्रियेतील आवेश, जोर, जलदी, चपळाई, भरगच्चपणा इ.चा निदर्शक असा क्रियापदासोबत योजावयाचा शब्द. पहा : **तडक**. २. आवळून; गच्च; खच्चून; एकदम : 'पाठीवर घाव घेऊन तकट पळालेला इंग्रजी सोजीरही आमच्या बाजीरावापेक्षा... अधिक शूर असे ज्यास भासत नाही...'– नि २०७.

**तकटणे** उक्रि. १. आवळणे; घट्ट, तकटून बांधणे. २. सपाटून खाणे; पोटात खच्चून भरणे; तकटून जेवणे. [सं.टक्]

**तक(ग)ट(ड)बंद–दी** पु. स्त्री. १. कुंपण वगैरे घालून वेढलेली स्थिती; परिवेष्टण; आवरण. २. वेढा; कोंडमारा. ३. (ल.) तगादा, निकड लावणे; बोकांडी बसणे. ४. सामानसुमान इ. घट्ट आवळून बांधणे. ५. (ल.) अटकाव, प्रतिबंध करणे; कोंडणे; कोंडमारा करणे.

**तकटी** स्त्री. पहा : **तकट** न.२ : 'महामोलाचा हा पट तदुपरी पीत तकटी।'– निमाक १.८३.

**तकटे** न. १. दार, खिडकी इ.वरील ताटी, जाळी, चौकट. २. पहा : **तकट** न.

**तकडी** स्त्री. चोवीस चिवट्यांचा (जाड्याभरड्या सुताच्या गुंडाळ्यांचा) समुदाय.

**तकणे** सक्रि. लुबाडणे; (एखादी वस्तू) फुकटात मिळवणे. (व.)

**तकतक–का** क्रिवि. चकचक; झकझक; झकझका; लकलक. (क्रि. करणे). पहा : **टकटक**. [दृश्यानुकरण. तक्‌चे द्वित्व.] (वा.) ० **करणे** – उत्कंठित होऊन वाट पाहणे; अस्थिर होणे. (व.)

**तकतकणे** अक्रि. १. चकाकणे; चमकणे, लखलख, झकझक करणे. २. (मनुष्य इत्यादिकांची शरीरे) चमकदार, तुळतुळीत, सतेज दिसणे.

**तकतकना** अक्रि. पाण्याने तुडुंब भरणे. (झाडी)

**तकतकी** स्त्री. चकाकी; झकाकी; तुळतुळीतपणा; उजळपणा; चमक.

**तक(ख)तराव** पु. यात्रेतून मिरवावयाची रथाप्रमाणे शृंगारलेली नाचेपोरांच्या तमाशाची गाडी; तिच्यावरील तमाशा. (खा.) पहा : **तक्तरावा** [फा. तख्त्+रवान्]

**तकदम** वि. जुने; मागील; गत; झालेले. [फा.तकादुम]

**तकदीर** न. दैव; नशीब; अदृष्ट; भाग्य. [अर. तक्दीर]

**तक(च)नामा** पु. जमिनीच्या सीमेसंबंधी कागदपत्र : 'स्वसंतोषे हा तकनामा लिहून दिला ऐसा जे.'– लोणी शिंदे कागद पृ. २८.

**तकपट्टी** स्त्री. कपाशीच्या गाडीचे वजन, भाव इ.तपशील लिहिलेली चिठ्ठी. (व.)

**तकमकणे** (कु.) पहा : **तगमगणे**

**तकरार–द, तक्रार** स्त्री. १. (कायदा) वादी–प्रतिवादी, फिर्यादी–आरोपी अशा भांडणाऱ्या दोन पक्षांनी स्वपक्षसमर्थनार्थ केलेले भाषण, लिखाण. (क्रि.करणे, घेणे.). २.अडथळा; अडचण; कुरकुर ; हरकत, आक्षेप घेणे. ३. वादविवाद; भांडण; झगडा. ४. फिर्याद; गाऱ्हाणे; ओरड. ५. (चुकीने) दोषारोप; आळ: पहा : **तकराळ**. ६. पुनरुक्ती : 'याप्रमाणें तक्रार करून सांगून पाठवलें.'– मइसा ५.२०६. [फा. तक्‌रार]

**तकरार(द)अर्जी, तक्रारअर्जी** स्त्री. (कायदा) खालच्या कोर्टाच्या विरुद्ध वरिष्ठ कोर्टाकडे केलेला अर्ज; दाद मागणे; अपील.

**तकरारखोर, तक्रारी–ऱ्या** वि. नेहमी तक्रार करणारा; भांडखोर.

**तकराळ** स्त्री. १. वस्तुस्थितीचा विपर्यास करून सांगितलेली हकिकत; बनावटपणा. २. दुसऱ्याला फसवण्यासाठी, गोत्यात आणण्यासाठी रचलेले कुभांड; आळ; तोहमत; दोषारोप; तकरीर. ३. पहा : **तकरार**

**तकरीब** स्त्री. बहाणा.

**तकरीर, तक्रीर** पु. १. (एखाद्यावर आणलेला) खोटा आरोप, आळ. (क्रि. आणणे, येणे.). २. तक्रार, स्वपक्षसमर्थन; कैफियत; करीणा. ३. खोट्या व लांबलचक सबबी. ४. प्रतिज्ञालेख; शपथेवरील जबानी. ५. वादीचा लेख त्यास दाखवून त्यावर त्याची सही घेत असत तो. – भाअ १८३२. ६. हकिकत; माहिती : 'फितूर केला होता त्याच्या तक्रीरा.'– समारो ३.७१. [फा. तक्‌रीर]

**तकलादी** वि. १. लबाडीने अथवा निष्काळजीपणाने, हात राखून, पूर्ण कसब न वापरता, चालढकल करून तयार केलेले (घर, पेटी, दागिना). २. बनावट; नकली; न टिकणारा; हलका. [फा. तक्‌लीदी]

**तक(ख)लीफ(प)** स्त्री. श्रम; तसदी, त्रास. (व.) [फा. तक्‌लीफ्]

**तकलु** स्त्री. डोके; मस्तक; टकले. (गो.)

**तकवा, तक्वा** पु. १. बळ; जोर; ताकद; उत्साह; हुशारी; कोशीस : 'विषयीं न करिता तकवा। पूर्वज हांसती।'– ससं ५२. २. उत्तेजन;

आधार; धीर : 'एक तकवा आपला धरिला आहे.'– पेद २०.२९७. ३. आवाका. (तंजा.) [फा. तक्वियत्]

**तकवाई, तकवी, तकावी** पहा : **तगाई**

**तकवेतूट** वि. अधीर; घाबरी : 'गनीमाची दाटीची खबर ऐकून रयत तकवेतूट होऊन...'– पेद ३.६३. [अर.तकवा + म. तुटणे]

**तक(ख)शी(सी)र, तक्शी(क्सी)र** स्त्री. १. अपराध; गुन्हा; चूक; अन्याय. २. न्यून; कमीपणा : 'तहमूल (सहन) करावयास तक्सीर केली नाही.'– इमं ६७. [फा.तक्सीर]

**तकस** पु. १. (धक्का, तडाखा लागल्याने झालेली) इजा; जखम; व्यथा; त्रास; दुःख. २. (अपमान, उपहास, निंदा यामुळे मनाला होणारी) व्यथा, त्रास. (क्रि. पोहोचणे, पावणे, लागणे, बसणे.) (राजा., कु.) [सं.तक्ष्]

**तकाकणे** अक्रि. (तकतकणेचा अतिशय) प्रकाशणे; अतिशय तुळतुळीत दिसणे; लकाकणे.

**तकाकी** स्त्री. (तकतकीचा अतिशय) तेज; चकाकी; उज्ज्वलता.

तकाल न. तकील; कथील. – लोसाको.

**तकिया, तक्या** पु. १. मुसलमानी फकिरांचे विश्रांतिस्थान; मठ. या ठिकाणी तो राहतो व धर्मज्ञानाचा प्रसार करतो : 'अलिकडे धामधुमीचे सबबेने मोहिबी आपला कदीम तकिया सोडून उपर घाटावर जाऊन नवाच तकिया बनविला आहे.'– ब्रप ३३७. २. पिराला पुरलेली जागा; मशिदीसारखा एक प्रकार. ३. टेकण्यासाठी भिंतीशी उभी ठेवण्याची मोठी उशी. [फा.]

**तकूब, तकुबी** इ. पहा : **तहकुबी** इ.

**तकूबचिठी** स्त्री. काही वेळपर्यंत आराम देणारे औषध.

**तकोन बसणे** टपून बसणे : 'प्यादे तकोन बसतात...'– ऐलेसं ४३३९.

**तक्कट** क्रिवि. चटकन; चुटकीसरसे; ताबडतोब.

**तक्की लावणे** सक्रि. वजनाच्या काट्यावर कपाशीच्या गाड्या लावणे. (व.)

**तक्कू** पु. आंब्याच्या फोडी ठेचून, किसून त्यांना तिखट, मीठ लावून केलेली चटणी; कवठ इ.चा ठेचा.

**तक्के** न. टकुरे; डोके.– लोसाको.

**तक्केफाड** वि. (नेहमी तक्क्याशी बसून राहणारा) आळशी; सुस्त. (व.)

**तक्टो** पु. चटईचा लहान तुकडा.

**तक्तरावा** पु. लग्न इ. समारंभाच्या मिरवणुकीत नाचेपोरे किंवा कलावंतिणी यांच्या ताफ्यासाठी केलेली फळ्यांची लाकडी चौरंगासारखी रचना. मिरवणुकीत हा तक्ता माणसांच्या डोक्यावर किंवा गाडीवर ठेवतात. फिरता तमाशा, नाच. पहा : **तकतराव** [फा. तख्त्+रवान्]

**तक्ता** पु. १.(लाकडाची) फळी; पाट. २. लाकडी ओटा. ३. (ढोर.) सागळ, पेसी, पट्टे वगैरे बेतण्यासाठी केलेली लाकडी फळी. [फा.तख्ता]

**तक्ता** पु. १. बागेतील फुलझाडांचा ताटवा; वाफा. २. लागवडीपैकी एक भाग. [फा. तख्त]

**तक्ता** पु. शाली इ.चा गठ्ठा. [फा.तख्ता]

**तक्ता** पु. १. कागदाचा ताव; अर्धा कागद; (यावरून) रकाने पाडून केलेले निरनिराळ्या कोष्टकांचे यादी, हजेरी इ.सारखे पत्रक; सर्व बाबींच्या तपशिलाचे सामान्य पत्रक; नकाशा; कोष्टक. २. पहा : **तक्ती १** [फा. तख्ता]

**तक्ती** स्त्री. १. कागदाचे विशिष्ट आकाराचे तुकडे करण्यासाठी प्रथम नमुन्याचा केलेला तुकडा. २. अशा तुकड्यांची रास; पुस्तकांच्या पानांचा ढीग; चळत. [फा.]

**तक्दमा** पु. आगाऊ पैसा; विसार : 'तक्दमा वसूल घेतला.'– ऐलेसं ८५१. [फा. तक्दीम]

**तक्रार** पहा: **तकरार**

**तखडणे** अक्रि. चालून दमणे.

**तखती** वि. तक्तासंबंधी; राजाचा; राजासारखा : 'तखती पैराव केला.'– वसागा ४८.

**तखली, तखली व्याध, तखले, तखले दुःख, तखल्या रोग, तखील** हे शब्द कथली, कथील यांपासून वर्णविपर्यासाने बनलेले आहेत. पहा : **कथली, कथील** इ.

**तखान** पु. दरोडा : 'तंव तेथें चोर तखान घालुं आला।'– पंचतंत्र ३.१७.

**तखेक** वि. तर्कानें समजणारे; कल्पनाग्राह्य : 'ऐसें वर्तमान तखेक।'– ख्रिपु २.२९.९८.

**तख्त–क्त, तखत** न. १. सिंहासन. २. पीठ; मठ; गादी; शिखांमध्ये मुख्य गुरुद्वारांना म्हणतात. [फा.]

**तख्त(क्त)नशीन** वि. सिंहासनारूढ; राज्यावर, गादीवर बसलेला. [फा.]

**तख्त(क्त)पोशी** स्त्री. १. लाकडी कळाशीदार तक्तांनी केलेला कडीपाट – जमीन; पटई : 'नंतर तो गलबताच्या तक्तपोशीवर आपल्या पत्नीशी संवाद करू लागला'– कोरकि ६. २. तक्तपोशी केलेली खोली; माडी. [फा. तख्तपोश]

**तख्तवाहन** पु. उंटावर बसण्यासाठी केलेले अंबारीसारखे आसन.

**तग** पु.१. (एखाद्याबरोबर, एखाद्या ठिकाणी, सुखाने, सोयीने) ठरणे; टिकून राहणे; निभाव; टिकाव. २. सहन करणे; दिवस काढणे; टिकाव.(क्रि. काढणे.) [सं.तक]

**तग** पु. मोठा तराजू. (वा.) **तगी लागणे** – १. तोलण्याकरता काट्यात घातले जाणे. २. (एखादे काम, कोर्टातील दावा इ.) अनिश्चितपणे अर्धवट राहणे; लोंबकळत, भिजत पडणे.

**तगट, तगटणी** न. स्त्री.(पिकांची, आंब्याच्या फळांची) पाहणी, मोजदाद, अंदाज.

**तगट** न. १. पहा : **तकट** : 'तया शक्तीचक्राच्या तगटीं।'– भाए ५४८. २. अलंकार.

**तगट, तगटणे, तगटबंदी, तगटून** पहा : **तकट, तकटणे** इ.

**तगटणे** उक्रि. (पिकांची) आणेवारी काढणे, पाहणी करणे. [क. तगवु]

**तगटणे** उक्रि. १. घट्ट बांधणे; आवळणे. पहा : **तकटणे** : 'तगटियेलीया कांचोळी। हारावळी त्या वर्त्या।'– मुरंशु १९६. २. भिडवणे; भिडणे; चिकटून असणे : 'रणी उभा ठाकला। रथे रथ तगटिला।'–कथा ६.१५.३०. [सं. टक्]

**तगटणे** अक्रि. झटणे; धावणे : 'गदादि आयुधीं ऐसा वेढे। अतिबळे तगटे

रणभूमीसी ।'-एभा ५.५२५. [सं.तक्]

**तग(क)टी** वि. भरजरी; चांदीच्या पत्र्याची : 'शोभेति तैसीं तगटी निशाणें ।'- सारुह ७.५३.

**तगटी निशाण** जरिपटका झेंडा.

**तगड** न. चांदीचा, पितळेचा पत्रा. (बे.) पहा : **तकट, तगट**

**तगडा** वि. धिप्पाड; धट्टाकट्टा; बळकट. [सं. त्वक्ष , तक्ष]

**तगणे** अक्रि. १. टिकणे; (सुख व स्थैर्य यांनी युक्त अशा स्थितीत) राहणे. २. सहन करणे; टिकाव धरणे; दम, जीव धरून असणे : 'परि वाटे मज परतुनि येता बळ माजें न तगावे ।'- मोरामायण पंचशती २२१. [सं.तक्]

**तगणे** न. टिकाव; टिकणे : 'तरी विरक्तीवांचूनि केहीं । ज्ञानासि तगणेंचि नाहीं ।'- ज्ञा १५.३६.

**तगतगाट** पु. झकपक; झगझगाट : 'दोन्ही मंडपीं थाटें थाट । पीतांबरें तगतगाट ।'- वेसीस्व ८.२१.

**तगतगी(गि)त** वि. तकतकीत; चकाकणारा; तकाकी असलेला : 'विलेपीला शुंडे तगतगित सिंदूर विलसे ।'- अकक २ गजगौरीव्रत ९.

**तगतमाशा** पु. अरेरावी; चढाईच्या गोष्टी; तापतोबरा.

**तगतराव** पु.१.उंच बुजगावणे; पोळ्याच्या दिवशी वाद्य व नाच यांसह मिरवला जाणारा मनुष्याकृती पुतळा. २. उंच मनुष्य. (अहि.)

**तगदमपट्टी** स्त्री. १. अनुमानधपका; मोघम अजमास; ठोकळ अंदाज. २. हिशोब करण्यापूर्वीच कुळाकडे आगाऊ केलेली वसुलाची मागणी. ३. जबरदस्तीचा म्हणून मानला गेलेला कर. [फा.तकद्दम, तक्दीम, तकदमा + पट्टी]

**तगदमा** पु. १. अधिकाराचा दरारा; दबदबा; हुकमत चालेल असे वजन. (क्रि. होणे). २. पहा : **तगदमपट्टी १**

**तगदमा-मे-म** क्रिवि. १. अनिश्चित, अनिर्णीत, अद्यापि चालू असलेल्या स्थितीत, निकालात न काढलेल्या स्थितीत (कोर्टातील काम इ.); अनामत; मोघम. २. ठोकळ मानाने; सरासरी अंदाजाने; अनुमानधपक्याने. ३. झटपट; ताबडतोब; एका झटक्यात. [फा.तक्दीम]

**तगब(म)ग** स्त्री. १. तळमळ; अस्वस्थता : 'कामभोगाचे तगबगें । डोळ्यां पातया पातें न लगे ।'- मुविराट ३.१३३. २. (ताप इ.ने शरीराची होणारी) काहिली; अशांतता; तडफड; कासाविशी; तळमळ; व्याकुळता.

क्रिवि. तडफडत, तळमळत, कासावीस होत. [क.तग्गुमग्गु; सं. तग]

**तगमगणे** अक्रि. तळमळणे; (जीव) खालीवर होणे; तडफडणे; कासावीस, व्याकूळ होणे.

**तगमा, तग्मा** पु. १. राजाज्ञा; मुद्रिका; शाही सनद, हुकूम : 'आजपावेतो मुसलमानीचा तगमा जतन करून आहोत.'- भाइसमं अह शके १८४०, पृ.१४.२. लौकिक; प्रतिष्ठा; वजन; कीर्ती. [फा.तघ्मा]

**तगर** पु. एडका; मेंढा . [क.]

**तगर** पु. तवंग. (व.)

**तगर** स्त्री. एक फुलझाड. याच्या फुलाला सकाळी थोडासा वास येतो. न. तगरीचे फूल. [सं.]

**तगलट** वि. असमंजस. (व.)

**तगवड** स्त्री. दोन लहान टेकड्यांमधील दरी. (बे.) [क. तग्गु]

**तगवणा** वि. १. टिकाऊ; टिकणारा. (को.) २. एखादे दिवशी वापरण्याचा; ठेवणीचा; राखून ठेवलेला (पीतांबर, वस्त्र, इ.).

**तगवणी, तगवणूक** स्त्री. टिकवणे; पुष्कळ दिवस टिकेल अशा रीतीने वापरणे.

**तगवणे** न. (लग्नकार्यात सणावारी नेसण्याच्या उपयोगी असे) पुष्कळ दिवस टिकणारे वस्त्र. उदा. पीतांबर, पैठणी इ.

**तगव(वि)णे** उक्रि. टिकवणे; जपून वापरणे.

**तगहर** वि.पदभ्रष्ट; कामावरून कमी केलेला : 'आम्ही तगहर ! आम्हा जवल काय म्हणतात?' ...- पुरंदर भाग ३, पृ.६.

**तगाई** स्त्री. शेतकऱ्याला मदतीखातर सरकारकडून, जमीनदाराकडून कर्जाऊ मिळालेला पैसा. [फा. तकावी]

**तगाडा** पु. त्रास; मेहनत; यातायात : 'इतका तगाडा पडला असता झुंज कसे होते?'- मशिरा ४, पृ. १९.

**तगादगीर-दार** पु. शेतकऱ्यांवर सरकारचे हक्क बजावण्यासाठी नेमलेला कामगार; तगादा कामगार.

**तगादणे** अक्रि. कंटाळणे; त्रासणे; विटणे. (को.)

**तगादा** पु. (कर्जफेडीसाठी वगैरे लावलेला) लकडा; निकड; निकडीची मागणी; नेट. [फा. तकाझा]

**तगारी** स्त्री. १. परात; थाळी; ताट : 'आमचे तगारींत जेवावें.'- मदरु १.१०८. २. घमेले. (खा.) पहा : **तगारे** [फा. तघारी]

**तगारे** न. लोखंडी टोपले; घमेले. [फा.तघारी]

**तगाव** पहा : **तग**

**तगि(गे)री** स्त्री. १. (एखाद्याला) कामावरून, नोकरीवरून काढून टाकणे; हकालपट्टी; बडतर्फी; कायमची रजा देणे : 'तगिरी बदली हुजुरून व्हावी.'- इमं ८८. २. बदली. [फा. तघीरी] (वा.) **०चे वस्त्र देणे** - कामावरून दूर करणे; बडतर्फ करणे.

**तगिरीबहाली** पु. (सरकारी नोकरांना) कामावरून काढणे व पुन्हा नेमणे इ. व्यवहार; कमती आणि भरती; बडतर्फी व नेमणूक.

**तगीर** वि. कामावरून, हुद्द्यावरून काढून टाकलेला; बडतर्फ केलेला. (क्रि. करणे, होणे) : 'प्रसंगें शिवराजें किल्ले हायचा सुबा तगीर केला ।'- सप्र १८.२१. [अर. तघ्यीर]

**तगी लावणे** मागे रेटणे; मोडून मागे घालवणे : 'आमचे विल्हेस आलीखान व गावडे वगैरे फौज होती ती मोडून तीन कोसपर्यंत तगी लावले.'-पेद १५.४३.

**तग्ग** न. खाच; खळगा. (बे.) [क.तग्गु]

**तग्रवग्र** वि. क्रोधाने चवताळलेला; संतापाने चडफडणारा व डोळे वटारून पाहणारा; संतप्त; क्रोधाविष्ट. [गु.]

**तज** स्त्री. दालचिनीचे झाड.

न. दालचिनीच्या झाडाची साल; दालचिनी. [सं. त्वच्; हिं.]

**तजक(की)रनवीस, तजकरनीस, तज्करनीस** पु. १. कोणी सरकारी नोकर लाचलुचपत घेतो का याचा बारीक तपास करणारा मराठी

राज्यातील अंमलदार. २. सनदा लिहिणारा कारकून. [अर. तझ्कीर]

**तजकरा, तज्करा** पु. १. (तजकरनिसाने उघडकीस आणलेली) लाचलुचपत, खोटी नोंद; हिशेबात लबाडी; पैशाची, जमाखर्चाची अफरातफर. (क्रि. काढणे). २. लबाडी, खोटेपणा : 'तजकरा करितो हरि हा खरा।'– हरिराजकृत मुद्गलाचार्य विरचित रामार्यांचे भाषांतर ४१.३. ३. लुबाडणे; द्रव्यापहरण. ४. दंड : 'तजकरे घ्यावे, घरे बुडवावीं, नागवावें.'– मराचिसं १९. ५. पैशाच्या अफरातफरीमुळे निघालेले येणे : 'बाळाजी वामन दामले याजकडे पर्गणे अकोले येथील तजकरा निघाला आहे.'–मइसा १४.५.६. सनद. [अर.तझ्किरा]

**तजणे** उक्रि. टाकणे; त्यजणे; सोडणे : 'लाज भय शंका जनीं नाहीं तजियेलीं दोन्ही।'– तुगा २९८. [सं. त्यज्]

**तजवीज** स्त्री. १. शोध; तपास; चौकशी. (क्रि. करणे). २. उपाय; उपाययोजना; व्यवस्था; हिकमत; युक्ती : 'वीज अचंचळ शीतळ जे तजवीज कशी तुज हे नुमजे।'– र १६. ३. तारतम्यबुद्धी; विवेक; विवेचकबुद्धी. ४. निकाल; निर्णय; निर्णायक मत. ५. सिद्धता; सामग्री (कार्याची). [फा. तज्वीझ्]

**तजा** स्त्री. (चर्म.) कातडे; जोड्यावरील सागळ. [सं.त्वचा]

**तजावजा** स्त्री. अफ्रातफर : 'दागिने यांची तजावजा होईल त्याची खबर्दारी बरचेवर करीत जाणें.'– वाडमा १.११५.

क्रिवि. १. इतस्तत: विखुरलेल्या, अस्ताव्यस्त, विस्कळीत स्थितीत; पांगापांग झालेल्या अवस्थेत (माणसे, बेत, वस्तू इ.); परागंदा : 'मिरजेंतील थोर थोर मंडळी कांहीं तजावजा जाली अशा प्रकारच्या अवया ऐकतो.' – ऐलेसं १०.५३३७. २. गर्भगळित, घाबरलेल्या, गडबडलेल्या, भयचकित अशा अवस्थेत : 'पुण्यात लोक बहुत तजावजा जाहले आहेत.'– ऐलेसं १०.५३४१. [फा. तजायुझ]

**तजुर्बा** पु. रीत; धोरण. (ना.) [अर. तज्रिबा]

**तजुर्बेकार** वि. दर्दी; मर्मज्ञ. (ना.) [अर. तज्रिबा]

**तजेला** पु. टवटवी; कांती; तेज; पाणी. [अर. तजल्ली]

**तज्वीज** स्त्री. १. पहा : **तजवीज**. २. काळजी; चिंता : 'राजा गईब जहाला ऐसें जाऊन सांगताच पादशहास आश्चर्य वाटून बहुत तज्विजींत पडला.' – सभासद ४२. [अर.तज्वीझ्]

**तज्ज्ञ** वि. कुशल; जाणकार . [सं.]

**तट** पु. १. (नदीचा, समुद्राचा) काठ, किनारा; तीर; सीमा; मर्यादा. २. टेकडीची कड; उतरण. ३. गाव, किल्ला इ.च्या भोवतालचा कोट; भिंत. ४. एखाद्या जातीत, समाजात पडलेले पक्ष, फळी; विरुद्ध भाव. ५. खेळातील खेळाडूंची बाजू; पक्ष; संघ. ६. एखाद्या कार्यासाठी एकत्र आलेल्या लोकांची जूट; संगनमत; कट. ७. तराजूच्या पारड्यांमधील तफावत, फरक. ८. खोळंबा; तटाई; थांबणूक; अडचण; खोटी. (को.) ९. एके ठिकाणी ठासून उभे राहणे; भिडणे; वेढा; गराडा.(ल.) आडकाठी; अडवणूक; अडथळा. (क्रि.घालणे) : 'म्हणोन तट घालोन क्षणभर मारामार केली.'– भाव ६७. १०. (सोंगट्यांतील) डाव; बाजू. (क्रि. देणे.) (कर.) [सं.] (वा.) ० **करणे** – एकजूट करून हरकत उभी करणे. ० **पाडणे** – अडवून धरणे. ० **होणे** – स्थगित होणे; वांधा येणे. **तटास लावणे** – (एखादी गोष्ट) जातीतील मतभेदाला, तंट्याला कारणीभूत होणे.

**तटकन–कर–दिनी–दिशी** क्रिवि. १. तीक्ष्ण; हलक्या व जलद (उदा. दोरी तुटताना, ठिणगी उडताना) होणाऱ्या आवाजासारखा आवाज होऊन. पहा : **तटतट**. २. घट्ट; आवळून. पहा : **तट्ट** [ध्व.]

**तटका** पु. १. संबंध : 'द्वैताचा तटका तोडिला।'– दास ५.९.२८. २. भीड; मुरवत. ३. तंटा. [ध्व.तट्] (वा.) ० **तुटणे, राहणे** – १. थोडक्यात आणि ताबडतोब (एखाद्या गोष्टीचा) शेवटचा निकाल लागणे; तंटा मिटणे. २. निक्षून, साफ, रोकडे उत्तर देणे; भीड, मुरवत न धरता स्पष्ट सांगणे.३. (एखाद्याचा) एकदम संबंध तोडणे.

**तटका** वि. ताजे (फळ, फूल, भाजी इ.).

**तटकारणे** उक्रि. १. एखाद्याला पुन: पुन्हा बजावून, खडसून सांगणे; सक्त ताकीद देणे. २. टिचकणे; टिचकी मारणे; टचकारणे.[ध्व. तट्]

**तटकी–के** स्त्री. न. दाराला, खिडकीला लावण्याचे तट्ट्याच्या, कांबट्यांच्या जाळीचे, काटक्यांचे झाप; तट्ट्याचे दार. [क. तट्टी]

**तटग(गृ)र** न. पु. बांबूच्या पट्ट्यांची जाळी; ताटी; बोऱ्या. (अहि.)

**तटगार** पु. हातमागावरील फणीचे तट बांधणारा. (बे.)

**तटणी** स्त्री. दारे, खिडक्या इ.ची झडपे हलू नयेत म्हणून त्यांना अडकवण्याची, दाराच्या चौकटीला बसवलेली लाकडी पट्टी; चिमणी.

**तटणे** अक्रि. खेटणे; भिडणे; चिकटून असणे. [क. तट्टु]

**तटतट–टा,तटाटा** क्रिवि. १. परळात लाह्या भाजताना, दोरी अथवा टाके तुटताना, काही जिन्नस तळताना, ठिणग्या उडताना होणाऱ्या तट्तट् अशा आवाजाप्रमाणे आवाज होऊन. (क्रि. तुटणे, फुटणे, उडणे, उकलणे, तोडणे, फोडणे). २. एकदम तोडताना, निराळा केला जात असताना होणाऱ्या आवाजाप्रमाणे आवाज होऊन. [तट् द्वि.]

**तटतटणे** अक्रि. १. तुटण्याच्या, फुटण्याच्या बेतात येईल अशा रीतीने फुगणे, ताणले जाणे; तट् असा आवाज होऊन फुटणे, तुटणे. २. तट् तट् असा आवाज करणे; फुटणे; तुटणे; सटकणे; उडणे.[ध्व. तट्तट्]

**तटतटसाण** स्त्री. टवटवीतपणा; तकतकी. (गो.)

**तटतटीत** वि. टचटचीत, ठासून, खच्चून भरलेले (पोट, पिशवी); फार ताणलेले; ताठलेले; फुटेल अशा रीतीने भरलेले.

**तटबंदी** स्त्री. तटाचा बंदोबस्त. पहा : **तट**

**तटमुद्रा** स्त्री. विचारमग्न, ध्यानस्थ माणसाची मुद्रा.

**तटलक्षणा** स्त्री. लक्षणेचा एक प्रकार; आगंतुक लक्षणा.

**तटली** स्त्री. एक प्रकारची स्त्रियांची चप्पल. (बे.) [क. तट्ले]

**तटसरनौबत** पु.किल्ल्यावरील सैन्याचा प्रमुख. [फा.]

**तटस्थ–स्त** वि. १. नदीच्या काठी असलेला; किनाऱ्यावरील. २. (ल.) दोहोंपैकी कोणत्याही पक्षास न मिळालेला (मनुष्य); तिऱ्हाईत; उदासीन. ३. (ल.) स्तब्ध. ४.(ल.) थक्क; चकित; कुंठित : 'जें देखतां स्वर्गीचे देव। तटस्त होती।' – दास ४.७.१८. ५. खोळंबून राहिलेला; पुढे किंवा मागे न जाणारा. ६. काही हेतूने, अपेक्षेने उभा राहिलेला, थांबलेला. [सं.]

**तटा–टो** पु. १. भात ठेवण्यासाठी उभी करून ठेवलेली डाळी. २. बांबूची

जाड चटई; तट्‌ट्या. (कु.) [सं. तट]

**तटाई** स्त्री. १. स्थगिती; अडचण; खोळंबा : 'आज दोन साले तटाई; दरसाल युद्धप्रसंग...'– पेद २०.१२१. २. भांडण.

**तटाईत** वि. अडखोर; आडमुठा : '...इकडील पदरचे मंडळ बहुत तटाईत कळेल तसा सांभाळ करावा.'– मदरु २.६७.

**तटाक** वि. तटस्थ : 'निवृत्ति तटाक निवांत सम्यक.'– निगा २१.

**तटाक–ग** न. तळे; सरोवर. [सं. तडाग]

**तटाक–ग** पु. नदीचा काठ; किनारा; तट; तीर. [सं. तटक]

**तटाटणे** अक्रि. १. (तटतटणेचा अतिशय) अतिशय फुगणे; ताणले जाणे; तटतटणे. २. मोठ्या आवाजाने, जोराने, फिरून फिरून फुटणे, तुटणे, तडकणे.

**तटा(ट्टा)णी** स्त्री. तट्टाची मादी; लहान घोडी. [तट्टू]

**तटी** क्रिवि.कडे : 'गत गगनातटी' – गरा ९.

**तटू–टु–ट्टू** पु. पांढऱ्या कापडाची एक जात.

**तटोरी** स्त्री. १. दाणे भरलेले, चांगले पोसलेले धान्याचे कणीस. २. वसा; गळा.

**तट्** क्रिवि. १. तट् अशा आवाजाने फुटण्याच्या, तुटण्याच्या बेतात येईपर्यंत (फुगलेले, ताणलेले); रटाटून. (क्रि. फुगणे, ताणणे ). २. अवकाश, पोकळपणा न राहील अशा प्रकारे. [ध्व.तट्]

**तट्ट** न. (विणकाम) हत्यांत बसवलेली बोरूची फणी; सुताचे धागे समभाग प्रमाणावर बसण्यासाठी तयार केलेला बोरूच्या काड्यांचा साचा.

**तट्ट, तटतट** पु. आवळल्यामुळे होणारा त्रास. (गो.) [ध्व. तट्]

**तट्ट** पु. थर; पडदा.

**तट्टा–ट्ट्या** पु. १. बांबूची चटई. बांबूच्या पट्टयांची उभी–आडवी गुंफण करून बनविलेला ताटवा. तो बैलगाडीवर छत म्हणून लावतात. (खा.) २. पहा : **तट्टी**

**तट्टी** स्त्री. १. पडदा; बांबूची रंगीत ताटी; तट्टा; वाळ्याची ताटी. २. (ल.) शौचकूप; शेतखाना.(व.) [क.]

**तट्टू–टू** पु.न. १. घोड्याची एक लहान जात. २. तिरस्कारदर्शक अर्थाने काही शब्दांपुढे जोडतात. उदा. अडेलतट्टू, चुकारतट्टू इ.३.लहान घोडा; शिंगरू.[हिं. टट्टू; क.] (वा.) ० **पाठीस लागणे** – तट्टाच्या पाठीस दुखणे होणे.

**तट्टे** न. एक प्रकारची गाडी.

**तठ** न. स्पर्धा; चढाओढ : 'करूनि महाकालेंसि हटतठे। तैसी तोंडे जाली रागिठे। – राज्ञा ११.३४८.

**तठल** न. पातळ जुते; चप्पल; बारीक वहाण. (गो.) पहा : **तटली**

**तड** स्त्री. १. पहा : **तट** १ : 'द्वेषें होय तडफडा, म्हणती चिंताब्धिची अलभ्य तड फडा।'– मोकृष्ण ३०.२७. २. (एखाद्या कार्याची) अखेर, शेवट, पूर्णता, समाप्ती. (क्रि. घेणे). ३. (सावकाराचा देण्याविषयीचा कुळाला लागलेला) तगादा, निकड, नेट. ४. अडचण; तंगी; ओढगस्तीची स्थिती.[क.तडि] (वा.) ० **पाडणे** – निभाव लावणे; अब्रू राखणे. **तडीचा पोहणारा** – १. काठाकाठाने पोहणारा. २. साहस अथवा हिय्या न करता व्यवहार, धंदा करणारा; धाडस नसलेला. ३. अंगीकृत कार्य शेवटास नेण्याची ज्याच्यात धमक नाही असा (मनुष्य).

**तड–ट** पु. १. पहा : **तट** ४. २. दळ; फौज; तुकडी. [सं.तट] (वा.) **तडास लागणे** – (एखादी गोष्ट) जातीच्या दुफळीला कारण होणे.

**तड** पु. उशीर. (बे.) [क.]

**तडक** स्त्री. एकसारखा, नेटाचा, आवेशाचा, जोराचा प्रयत्न (विशेषत : पळण्यातील); नेट; जोर. (क्रि. मारणे)

क्रिवि. १. जोराने; तडाख्याने; नेटाने; एकदम; झपाट्याने; धडकून : 'गर्जत मेघ गडगडीती। अवचीते तडक पडती।'– उषा १५४.१७४९. २. अप्रतिहतपणे; सुरळीत; काही अडथळा न होता; विनाहरकत. ३. पुरेपूर; पूर्णपणे; पुरतेपणाने; तब्बल. ४. थेट; नीट; कोठेही न थांबता; सरळ मार्गाने. ५. भरपूरपणे; विपुलतेने; रेलचेलीने (एखाद्या क्रियेचा अतिरेक, उद्रेक, जोर दर्शवण्यासाठी हा शब्द योजतात.).

वि.१. चलाख; तरतरीत. २. संतापी. [ध्व.]

**तडक** पु. १. मोठा आवाज. २. विजेचा कडकडाट; वीज : 'तडकें बुजालीं खेचरें।'– मुविराट ६.१६. [ध्व. तड्]

**तडक(स)णी** स्त्री. गोणीला असलेली, बांधलेली दोरी. ह्या गोणीच्या दोन्ही बाजूस दोर असतात.

**तडकणे** अक्रि. १. (काच, लाकूड. इ.) भेगलणे; फुटणे; चीर पडणे; भेगांनी युक्त होणे. २. कडाडून प्रकाशणे; (वीज इ.) लवणे : 'व्योमी तडके सौदामिनी।'– मुआदि ३१.८१. ३. (ल.) मनाला त्रास, दुःख होणे. ४. रागावणे.

**तडकफडक** वि. १. चपळाईचे; तातडीने केलेले; उत्साहपूर्ण (काम, उपाय). २. उत्साही; चलाख; निश्चयी (मनुष्य). ३. खरमरीत; कडक; खरपूस; स्पष्ट (भाषण).

**तडकफाशी** स्त्री. गुरांचा मानमोडीचा रोग. (ना., व.)

**तडकशी** स्त्री. (क.) तगादा; लकडा; टुमणे. (क्रि. करणे, लावणे, मांडणे).

**तडकसार** वि. चपळ; उत्साही; चलाख; जलदीने काम करणारा.

**तडकसावित्री** स्त्री. चलाख आणि तरतरीत अशी लहान मुलगी.

**तडका** पु. १. तडाखा; थंडीचा कडाका. २. (कामातील) चपळाई; उत्साह; चलाखी. ३. पहा : **तडाका** : 'घोर वाद्यांचा तो कडका। गज पीटिती तो तडका।'– वेसीस्व ४.२९. (वा.) ० **तोडणे** – सक्त तगादा, निकड लावणे.

क्रिवि. झटपट; ताबडतोब; तडाक्याने.

**तडका** पु . पदार्थाला वरून दिलेली फोडणी. [हिं.]

**तडकाफडकी** स्त्री. (भांडणाची) झटापट; खटका; खडकाखडकी.(क्रि. उडणे, होणे, झडणे.).

क्रिवि. एकदम; तात्काळ; जलदीने; त्वरेने; झटक्यासरशी.

**तडकाव(वि)णे** सक्रि. १. कचकावून लगावणे; तडका, रपाटा देणे; सडकावणे. २. कडकडणे; कडकडून बोलणे. ३. निर्भर्त्सना करणे; खडसावणे; धमकावणे. [सं.तड्+कर्व]

**तडकावून, तडकून** क्रिवि. त्वरेने; जलदीने; बेदरकारपणे; बेफामपणे; नि:शंकपणाने; उत्साहाने. (क्रि. बोलणे, धावणे, करणे.)

**तडकी** स्त्री. १. तट्ट्याचे झडप. २. गाडीत खत भरण्याच्या उपयोगाची तट्टी. [क. तडिके]

**तडकी** स्त्री. तिरडी. (वा.) **० आवळणे –** (शिवी) मरणे.

**तडकी–कू** वि. संतापी.

**तडकी एरंड** एरंडाची एक लहान जात; हिचे बी उन्हात वाळले असता तड् आवाज होऊन फुटते.

**तडकीव** वि. (क्र.) तडकलेले; भेगा, चिरा पडलेले.

**तडकॉ** पु. माणसाच्या अंगावर उठलेल्या देवींच्या फोडातील लस टोचणे. (गो.)

**तडगी** स्त्री. मातीचा लहानसा घडा.

**तडज** पु. स्त्री. संसाराचा पसारा; प्रपंच; संसार; खटले.

**तडजी** स्त्री. १. तसदी; तगादा. २. ओढाताण. (कु.)

**तडजोड** स्त्री. १. काटकसर; घरजोगावणी. २. (कायदा) भांडणाऱ्या दोन्ही पक्षांनी थोडे नमते घेऊन परस्परांत घडवून आणलेला सलोखा, समेट. (क्रि. करणे, पाडणे.).३. पहा : **तोडजोड** [सं. त्रुट्+योट्]

**तडण–न** स्त्री. काच; जाच; टोचणी : 'देणेदारांचीहि तडन खर्चासाठी कांही कोठे मिळत नाही.'– महेदबा १ पृ. ७६.

**तडणे** अक्रि. १. (उष्णतेने तापलेले दगड, मडके इ.) फुटणे; तडकणे; तडे पडणे; भेगलणे. २. पडून, उडून ठिकऱ्या ठिकऱ्या होणे.

**तडतड** स्त्री. १. फुटण्याची, तडकण्याची क्रिया; तेव्हाचा आवाज; (तळल्या जाणाऱ्या पदार्थांची) चुरचुर; तडतडाट; तिडतिड. २. (रागावून) खेकसणे; धुसफुस; (लहान मुले इ.चा) छांदिष्टपणा. ३. कुतरओढ; गांजणूक. ४. (त्वचा, चामडी) तडतडणे, फुटणे, दुखणे. ५. जिवाला त्रास. [सं.ध्व.तड् द्वित्व]

**तडतड–डा** क्रिवि. १. (एखादा जिन्नस तळताना, फोडणी देताना, भाजताना होणाऱ्या) तडतड अशा आवाजाने; सपाट्याने छडी मारली असता, एकदम बंदूक उडविली असता, एखादा पदार्थ खडखडत असता होणाऱ्या तड्तड् अशा आवाजाने. २. (जोराने, आवेशाने, घिसाडघाईने एखादा जिन्नस) फाडताना, फोडताना, तोडताना, चावताना, लचके तोडले जात असताना, कुरतडताना होणाऱ्या आवाजाप्रमाणे आवाज होऊन : 'क्रव्यादाही तडतड तोडुनिया भक्षिलाचि मत्स्यप हा।'– मोस्त्री ४.६२. ३. चिरडीने; तुसडेपणाने; वसकन् (बोलणे इ.); फडाफड बोलून; कडकडून, तोंड सोडून (रागे भरणे, खरडपट्टी काढणे). ४. चलाखीने; झटदिशी; चपळाईने; उत्साहाने. (क्रि. करणे, बोलणे, हालचाल करणे).[ध्व.] (वा.) **० तोडणे–** (एखाद्याविषयी) कळवळा, कीव येणे; मन द्रवणे.

**तडतडणे** अक्रि. १. फुटणे; तुटणे; भंगणे; तडकणे; तडतड वाजणे (फोडणी इ.); फुरफुरणे : 'तडतडिल्या नक्षत्रमाळा।'– दावि २७८. २. (थंडी इ.मुळे शरीराचे अवयव, चामडी, ओठ) खरखरीत होणे; फुटणे; भेगलणे; (फोड इ.मुळे) कातडी ताणली जाऊन दुखणे. ३. (केस ताणले गेले असता, जोराने विंचरले असता) तड्तड् असा आवाज करून मुळात दुखणे. [ध्व.]

**तडतडव(वि)णे** उक्रि. १. तडतडणे याच्या सकर्मक अर्थी योजतात. २. (एखाद्याच्या पाठीवर चाबूक इ.) ओढणे; कडकावणे.

**तडतडा–ड्या** वि. १. चिडखोर; तुसडा; रागीट; तिरसट स्वभावाचा. २. हुज्जतखोर; तक्रारी; चिकित्साखोर. ३. तडतड वाजणारी, ठिणग्या उडणारी (दारू, काडी इ.).

**तडतडाट** पु. १. फुटताना, दुभंग होताना, मोडताना होणारा तडतड असा मोठा आवाज : 'आंसडोनि बळ उद्धटें। मधें उधडिला तडतडाटें।– मुसभा ७.५५. २. झांजा इ. वाद्यांचा खणखणाट. ३. चडफडाट.

**तडतडी** स्त्री. १. एक वनस्पती; तेड; पांढरे निशोत्तर. २. तडतड वाजणाऱ्या दारूचा एक प्रकार.

**तडतडीत** वि. शुष्क व तडतडणारा; खडखडणारा (कागद, कपडा).

**तड(ढ)तढा–ढू–ढो** पु. सुताडा; झोऱ्या; पोत्याची अंथरी. जाड, पण विशेष पिळदार नसलेल्या सुताचे एक प्रकारचे दणगट जाजम. [क. तडपु]

**तडताथवड** क्रिवि. तत्काळ; ताबडतोब; तत्क्षणी.

**तडप** स्त्री. स्त्रियांचे कमरेभोवती गुंडाळण्याचे वस्त्र : 'पाटाऊं म्यानबंधा तडप आणि धट्या भेद खंबायितांचे।'– सारुह ३.४१.(गो.) [क. तडपु]

**तडफ** स्त्री. चलाखी; उत्साह; चपळता; तरतरीतपणा; कार्यदक्षता.[हिं.]

**तडफ** स्त्री. तर्फ; रंगभूमीच्या दोन्ही बाजूंना उभ्या ठेवलेल्या पडद्यांपैकी एक. (गो.)

**तडफड–डा** स्त्री. पु. १. धडपड; चरफड; हातपाय झाडणे; आदळआपट (क्रि. घालणे, करणे). २. (एखाद्यावर) रागाने कडकडणे; जळफळणे; धुसफुसणे; चडफडणे. ३. झटापट; झोंबी. [ध्व.]

**तडफडाट** पु. (तडफडचा अतिशय) जळफळ; चडफडाट; जोराची आदळ–आपट; संतापाचा अतिरेक.

**तडफदार** वि. उत्साही; कार्यक्षम; चलाख; तरतरीत.

**तडबा** क्रिवि. फळे, भाज्या इ.चा जूनपणा, शुष्कता, कडकपणा इ. दाखविणाऱ्या विशेषणाबरोबर योजतात.

**तडम्** वि. तुडुंब. (बे.)

**तडवा** पु. १. पाल उभारण्याची दांडी. २. जाड सतरंजी : 'जाडीचा तडवा केला.'– लीचपू ७८.

**तडवा** पु. लाथ; लाथेचा तडाखा; प्रहार; आघात : 'तडवा हाणौनि करौ मारू। तरि आपुलेआंचा होओ संहारू।'– दाव १०६. [सं. तड्]

**तड(डा)वा** पु. चांदवा; छत : 'जेणे गगनाचा वोढूनि तडवा। मांजी लाविला प्रभाकर दिवा।'– स्वादि ६.४.४२. [क. तडपु]

**तडवी** पु. बाटून मुसलमान झालेला भिल्ल. (खा.)

**तडशा** पु. गाडीच्या साटीचा पोटखुंटा. (को.) पहा : **तरसा**

**तडस** पु. पावसात डोक्यावर घेण्याच्या कांबळ्याच्या खोळीची घडी उलगडू नये म्हणून तिला लावलेली चोय, काटा. (क्रि. भरणे, घालणे.) स्त्री. पु. १. पोट फार भरल्यामुळे, फुगल्यामुळे (पोटात) टोचल्यासारखी होणारी वेदना; तिडीक; रग. (भरणे, लागणे क्रियापदांसह बहुवचनी प्रयोग). २. कंठशोष; घशाला पडलेली कोरड : 'भीमकीयेसि मुरारिची अवस्था। वरि सिसुपाळ तडसांची वेथा।'– रुस्व ५७४. [सं.त्रस्]

**तडस** पु. १.द्रोण; पात्र; कलश. २.पखाल : 'अवकाळ जलदाचिया धारा।... तडसी कमळ दळांचा।।'– नरुस्व ५६८.

**तडसळी** स्त्री. कढईतून वडे तळून काढण्याची टोकदार काडी, सळई. [सं. तन्-तत+म. सळी]

**तडा** पु. १. भेग; चीर; फट. (क्रि. जाणे).२. लाकूड, मडके इ. तडकल्यामुळे उडणारी चीप, खपला, धलपी. (क्रि. जाणे, उडणे, निघणे). [ध्व.; सं. तड्,तर्द्]

**तडा** पु. आडकाठी, खोळंबा. (तंजा.)

**तडाका-खा** पु. १. (चाबकाचा, काठीचा) रपाटा; फटकारा; रट्टा; ठुसा. २. (पाऊस इ.चा) जोराचा, सडसडून मार; सतत वर्षाव. ३. (तोफा, बंदुका इ.चा) धडाका; धडधडाट; भडिमार; दणाणणे; खणका. ४. (एखाद्या मोठ्या कार्यात होणारी) गडबड; धावाधाव; गलका; धामधूम. ५.(लढाई, वादळ, वाद इ.चा) जोर; आवेग; आवेश; तीक्ष्णता; झपाटा; धडका. ६. अतिरेक; तीव्रता; कडाका. ७. सपाटा; संततपणा; दीर्घोद्योग. उदा. गाण्याचा तडाखा. ८. वेग. तडाका हा शब्द नेहमी जोर, घाई, आवेश, आवाज व ढब इत्यादींनी युक्त अशा गती दाखविता. याच्या समानार्थी 'धडाका' हा शब्द यांतील फरकासाठी पहा : **धडाका** [ध्व.तड्; गु. तडा]

**तडाखेबंद-बाज** वि. जोरदार; भरपूर; चिकार.

**तडाड** पु. मारामारी; मारहाण : 'तडाड मल्ल पाटलाने केला।'-ऐपो ८३.

**तडाडणे** अक्रि. १. तुटणे; फुटणे; दुभंग होणे; तडतड असा मोठा आवाज करून मोडणे; तडतडणे : 'धाकें उदर तडाडी। कुतर्काचे।'- दास ५.९.४६. २. थरकाप होणे : 'पृथ्वी तडाडी देखा।'- गरा ७५. ३. इतर अर्थांसाठी पहा : **तडतडणे**

**तडातड-डा** क्रिवि. १. पहा : **तडतड**. २. कडकडीत (उपास करणे).

**तडातुडी, तडातोड-डा-डी** स्त्री. १. पहा : **ताडातोड-तुडी.** २. तोडफोड :'आशा ममता देहनी बेडी। सुसरी करिताती तडातोडी।'- दास ३.१०.२.

**तडाफडी** क्रिवि. ताबडतोब; तातडीने; तडकाफडकी.

**तडामोड-डा** पहा : **तोडामोडा**

**तडावणे** अक्रि. १. तडकणे; फुटणे; भेग पडणे; भेगलणे; दुभंग होणे; फाटणे. २. (पोटाला) तडस लागणे; तटतटणे : 'भक्षिलें तुमचें अन्न। यालागी तडावला अंगवण।' - मुविराट २.७२. [सं. तड्]

**तडावणे** अक्रि. टिकणे; अखेरीस, शेवटास जाणे; पार पडणे. [सं.तट्]

**तडांग** क्रिवि. ताडताड; तडातड. [ध्व.तड्]

**तडित** स्त्री. वीज; विद्युत; बिजली. [सं.]

**तडितरक्षक** पु. विद्युतनिवारक.

**तडितवाहक** पु. विजेचा धोका टाळण्यासाठी उंच इमारतीवर लावलेली व तारेने जमिनीला जोडलेली सळई.

**तडिद्युद्ध** पु. विजेसारखे अतिवेगवान व चपलतेने चालवलेले युद्ध. जर्मन-ब्लिट्झ क्रीग यास प्रतिशब्द. - सह्याद्रि मार्च १९४२.

**तडिया** पहा : **तड्या**

**तडी** स्त्री. झळ; नुकसान; त्रास.(अहि.)

**तडी(डि)तापडी** पु. गोसावी; तपस्वी; बैरागी; भिकारी.[सं. तापसी]

**तडे** न. ताटस्थ्य : 'जेथिचें लावण्य पांतां। जगाचेया डोलेया तडे पडत।'- वह २३६.

**तड्डक,तडरक** स्त्री. थाप; बात.(गो.)

**तड्डकी** वि. बाता मारणारा; थापाड्या.(गो.)

**तड्या** वि. नदीकाठचा; कोरडा; (ओठ, गाल, जमीन इ.ना) भेगा पाडणारा (वारा) : 'बागाइतांस जमीन... तड्या वाऱ्यापासून (पूर्वेकडील वाऱ्यापासून) व पाण्याच्या पुरापासून नुकसान होण्याचा संभव आहे, अशी नसावी.'- बागेची माहिती ४.

**तड्या** पु. १. उपवास. २. तरुण. ३. लठ्ठ. (व.)

**तढण-न** स्त्री. १. कमतरता; टंचाई. २. ताण. ३. झाडांना पाणी देण्यास झालेला उशीर.(व.) [सं.तन्]

**तढणे, तढणी लागणे** अक्रि. १. ताण बसणे; ताणले जाणे; तडस लागणे. २. उलणे; तडा जाणे : 'तैसी दाडिंबे तढैली निडारे।'- रुस्व ७९८.

**तण, तणस** न. १. गवत; पेंढा (विशेषत: भाताचा) . २. रानगवत; शेतातील पिकात उगवणारे निरुपयोगी गवत; रान. [सं.तृण]

**तणकुटा** पु. बारीक तुकडे केलेला गवताचा पेंढा : 'सत्याचा भोकसा काढिला। मग अकृत्य तणकुटा भरिला।'- ज्ञा ३.२४५.

**तणखाईर** वि. गवत खाणारा : 'आणि मी तणखाईर।'- पंच १.३८.

**तणग्या लावणे** क्रि. नखशिखान्त पांघरूण घेऊन निजणे; ताणून देणे.

**तणघर** न. गवताची झोपडी.

**तणणे** सक्रि. १. ताणणे; घट्ट करणे. २. रेशीम, सूत इ.चा ताणा घालणे; सुताला वर-खाली अशा अढ्या पाडणे. पहा : **ताणणे** [सं. तन्]

**तणणे** अक्रि. भांडणे; झगडणे. पहा : **तंडणे** [ध्व.टण् द्वि.]

**तणतण-णा** पहा : **टणटण-णा**

**तणतणणे** अक्रि. १. रागाने चडफडणे; फडफड बोलणे; तोंड सोडणे. २. (तुटण्याइतके) आवळणे; ताणले, चेपले जाणे. ३. (उतरणीवरून, पायऱ्यांवरून चेंडू वगैरे) उडी घेत जाणे, टुणटुण् उड्या मारीत जाणे.

**तणतणीत** वि. फार ताणलेला; फुटण्याच्या, तुटण्याच्या बेतात येईपर्यंत फुगलेला, ताणलेला. [सं.तन्]

**तणनाशक** न. नको असलेल्या गवताला मारून टाकणारे औषध.

**तणपोशा-षा-सा** वि. केवळ तण, निरुपयोगी गवत पोसण्यास चांगला असा (थोडथोडा, विवक्षित वेळी पडणारा पाऊस).

**तणफण** स्त्री. क्रोधाने होणारी चडफड; जमिनीवर हातपाय आदळण्या-आपटण्याची क्रिया. पहा : **तडफड** [ध्व.तण्]

**तणमोड** स्त्री. १. जमीन लागवडीखाली आणण्याकरता तिच्यावरील गवत, झाडेझुडपे इ. काढून साफ करणे. २. पडीक जमीन तयार होण्यासाठी काही काळ खंडांवाचून लागवडीस देण्याचा प्रकार.

**तणमोडीचे उत्पन्न** पडीत जमिनीचे पहिल्या लागवडीचे उत्पन्न.

**तणलोणी** केवळ गवत खाणाऱ्या, रानात चरणाऱ्या गुरांच्या दुधापासून काढलेले लोणी.

**तणवर** पु. १. जमीन भाजण्यासाठी तिच्यावर पसरलेला काड्याकुड्या, पाने, गवत इ. चा थर. २. वरीलप्रमारे थर पसरण्याची क्रिया. पहा : **दाढ** [सं.तृण+वृ]

**तणवरणे** अक्रि. ताणले जाणे; (पोट, पिशवी इ.) रटाटून भरले जाणे; तटतटणे.

**तणवरणे** उक्रि. जमीन भाजण्यासाठी तिच्यावर गवत इ. पसरणे. (को.) [सं. तृण+आवरण]

**तणवी** वि. गवताची; गवती; केंबळी; छपरी; शाकारलेली.

**तणस** स्त्री. १. खळ्यावर इकडेतिकडे पसरलेले धान्याच्या ताटांचे तुकडे; गवताचा केर. २. भात्याण; साळीचे गवत. ३. नाचणकांड, भूस इ.सारखे हलक्या धान्याचे गवत. (को.)

**तणस(सु)डी** स्त्री. १. गवताची काडी. २. (ल.) अतिक्षुद्र वस्तू.

**तणसरणे** अक्रि. (माणूस, जनावर इ.) शरीराने भरणे; पुष्ट होणे; लठ्ठ बनणे. (को.) [सं. तन्]

**तणसांबर** पु. एक प्राणी. हातभर उंच आणि दीड हात लांब, पाठीचा रंग तांबडा व त्यावर पिवळसर रेघा. पोटाचा भाग सफेद. गळ्यावर तीन पांढरे पट्टे.

**तणाणा** पु. गायनाचे सूर गुणगुणणे. पहा : **तननं**

**तणाणा, तणातण-णा** पहा : **टणाटण**

**तणातणी** स्त्री. प्रत्यक्ष युद्ध न करता डावपेचांनी शत्रूला जेरीस आणणे.

**तणार, तण्हा(ह्र)र-रा-रे** न. गवताची झोपडी : 'तरी लोकांची धवळारें। देखोनिया मनोहरे। असतीं आपुलीं तणारें। मोडावीं केवीं।'- ज्ञा ३.२२३. पहा : **तणघर** [सं.तृण+गृह]

**तणारणे** सक्रि. गवत इ. पसरणे; वेल इ. पसरवणे.(को.) [सं.तन्]

**तणारा** पु. १. भाताच्या पेंढ्यांचा ढीग, गंजी. २. काटवलाची, गवताची गंजी. (रत्ना.)

**तणा(ना)व-वा, तनाई-य, तनची** स्त्री.पु. १. कोळ्याच्या जाळ्याचा तंतू, धागा. २. मंडपाचा दोर. ३. पहा : **तनई** [अर. तनाब्]

**तणाव-वा** पु. १. ताठपणा; आक्रमणशक्ती. २. ताण; ओढ; खेच.

**तणावणे** अक्रि. पाय पसरून निजणे; ताणून देणे.

**तणी** स्त्री. राहुटीच्या तणावाची दोरी : ' दूतासेंया तणीयांवरी श्रीचरण: देऊनि बीजें केलें'- लीचपू ७४.

**तणेली** वि. तण असलेली, जिच्यावर गवत माजले आहे अशी (जमीन).

**ततपप करणे** अडखळत बोलणे; बोलताना अडखळणे.

**ततबीर, तत्बीर** पहा : **तदबीर**

**तति, तंति-ती** स्त्री. १. रांग; ओळ; समुदाय : 'फुलांसवे भृंग-तती तरंगती।'- र ८२. पहा : **तंत** [सं.तति] (वा.) ० **लागणे** – मार्गास लागणे; सुरळीत चालू लागणे : 'तूं लागसी आजिपासून तंती।'- सारुह ७.१०४.

**तत्** सना. तो; ती; ते; (फक्त तत्सम समासात) संधीनुसार च्, द् इ.[सं.]

**तत्कार** पु. ओम तत्सत् या महामंत्रातील दुसरा वर्ण; तत् : 'तो प्रणवो आदिवर्णु बुझा। आणि तत्कारु जो दुजा।'- ज्ञा १७.३४२. [सं. तत् + कार]

**तत्काळ** क्रिवि. ताबडतोब; त्याक्षणीच; लागलीच. [सं.तत्+काल]

**तत्ता** वि. हलकट; नीच; हलका; बेअब्रूचा (मनुष्य).

**तत्ता** क्रिवि. ताबडतोब; क्षणात.

**तत्ताथंबा** पु. फसवेगिरी; भूलथापा देऊन फसविणे; भोंदणे. (क्रि. करून देणे, करणे, मांडणे, लावणे). (मारवाडी)

**तत्तामाल** पु. (एखाद्या पदार्थातील) उत्कृष्ट अंश; सत्त्व; मगज; सार. [हिं. तत्त+माल]

**तत्त्व** न. १. सत्य; वास्तविक स्वरूप; वस्तुस्थिती : 'असे हा कोणाचा कवण मजला तत्त्व न कळे।'- सारुह ७.८२. २. (ल.) प्रत्यक्ष अस्तित्व; उलट अर्थी माया. ३. (वेदान्त.) ब्रह्म; तेचपण; जीवपण; विश्वाला चेतना देणाऱ्या परमात्मरूपाशी एकरूप असलेले जीवात्म्याचे स्वरूप : 'मग तत्त्वता तत्त्व उरलें। ज्ञानियासी।'- ज्ञा २.१३१. ४. पंचमहाभूते; पंचविषय; दशेंद्रिये, मन, अहंकार, महत्तत्त्व, माया, ईश्वर यांना सामान्य संज्ञा. ५. (एखाद्या पदार्थातील) उत्कृष्ट अंश; सत्त्व; सार; मगज; सारांश; तात्पर्य. ६. (रसा.) मूलद्रव्य; धातू. ७. (ल.) पैसा : 'वरचेवर तरतूद पाहिजे तैसी करावयाची होती परंतु एक तत्त्वाचे पेचात आलो.'-ऐलेसं २६६४.

**तत्त्वत:-ता** क्रिवि. खरोखर; वास्तविक; नि:संशय; वस्तुत:.

**तत्त्वनिष्ठ** वि. १. ब्रह्मनिष्ठ . २. तत्त्वाला न सोडणारा; सत्यनिष्ठ. ३. विशिष्ट तत्त्वाप्रमाणे चालणारा; ध्येयवादी.

**तत्त्ववाद** पु. १. ईश्वराच्या अस्तित्वाविषयी वाद; ब्रह्म सत्य की माया सत्य वगैरे संबंधीचा वाद. २. तत्त्वासंबंधीचा वाद. [सं.]

**तत्त्वविद-वेत्ता, तत्त्वज्ञ** वि. १. (तत्त्वज्ञान)आत्मतत्त्व योग्य रीतीने जाणणारा. २.कोणत्याही विषयाचा मूळ गाभा माहीत असणारा; सिद्धान्त जाणणारा. [सं.]

**तत्त्वज्ञान-विद्या** न. स्त्री. १. परमात्मस्वरूपाचे ज्ञान; ब्रह्मज्ञान; यथार्थ ज्ञान; वेदान्त; एक शास्त्र. २. एखाद्या विषयाच्या सामान्य तत्त्वांचा अभ्यास; पदार्थाच्या मागचा तर्काधिष्ठित कार्यकारणभाव शोधणारी ज्ञानशाखा. [सं.]

**तत्पर** वि. (एखाद्या कार्यात) निमग्न; तल्लीन; (एखादे कार्य करण्यास) तयार; उत्सुक. [सं.]

**तत्पुरुष** पु. (व्या.) एका समासाचे नाव; यात दोन पदांपैकी उत्तरपदाला प्राधान्य असून पूर्वपद उत्तरपदाचे वर्णन करते किंवा पूर्वपद आणि उत्तरपद यांतील विभक्तिसंबंधाचा लोप केलेला असतो. उदा. राजवाडा, वस्त्रगाळ इ. याचे द्वितीया तत्पुरुष इ. निरनिराळ्या विभक्तींवरून प्रकार झाले आहेत. उपपद, नञ, कर्मधारय हेही याचे प्रकार आहेत. [सं.]

**तत्रशी** क्रिवि. जवळ; निकट; आसपास; आजूबाजूला; सन्निध. [सं. तत्र](वा.) ० **लागू न देणे**- (आपल्या कामाचा) कोणालाही मागमूस, पत्ता लागू न देणे.

**तत्राणी, तत्तर(रा)णी** स्त्री. (तेल इ. पातळ पदार्थ ठेवण्याचा) मातीचा गेळा. (बे.) [क.]

**तत्रापि-प** अ. तथापि : 'तत्रापि जे प्रिय बहु स्व-वधूचि माजी।'- भावि १७. [सं.]

**तत्सत्** न. १. (वेदान्त.) ते (ब्रह्म) खरे (अविनाशी) आहे. २. (ल.) नाश; आहुती. (ओं तत्सत्ब्रह्मार्पणमस्तु अशा मंत्राने आहुती देतात, त्यावरून) : 'आठ पुत्रांचे पूर्ण तत्सत् होऊन माझा चंद्रगुप्त या पाटलिपुत्राच्या सिंहासनावर...'- चंद्र ४१. [सं.]

**तत्सम** वि. १. त्यासारखा; तसाच. २. (व्या.) एका भाषेतून दुसऱ्या भाषेत जसाच्या तसा आलेला (शब्द, धातू इ.). उदा. पुष्प, वृक्ष (सं.); बत्ता (क.). [सं.]

**तत्क्षण-णी** क्रिवि. पहा : **तत्काळ**

**तथता** बौद्धदर्शनातील एक संज्ञा; अविकारी तत्त्व; पारमार्थिक सत्य.

**तथा** अ. संदेह; संशय; शंका (अकरणरूपी प्रयोग). [सं.]

**तथा** स्त्री. तथ्य : 'मी नि:संग झाले आतां । सोडून या लौकिकता । राहिली इथें काय तथा ।'– होला ८४. [सं. तथ्य]

**तथा** क्रिवि. १. तसे; त्याप्रमाणे; त्या रीतीने; त्या पद्धतीने. हा शब्द यथा या संबंधी पूर्वगामी शब्दाबरोबर योजतात. उदा. यथा राजा तथा प्रजा. २. ठीक; होय; बरे आहे. [सं.]

**तथाकथित** वि. मानीव; म्हटलेले म्हणून प्रसिद्ध; याप्रमाणे सांगितलेले : 'त्यांच्या तथाकथित घोषणेमध्ये जे आरोप केले आहेत.'– के १७.१.१९४१. [सं.]

**तथागत** वि. जन्ममरणाच्या फेऱ्यातून सुटलेला; मोक्ष मिळालेला (मनुष्य).

**तथापि** उअ. तरीही; तरीदेखील. [सं.]

**तथास्तु** उद्गा. तसे होवो, असो; ठीक; होय. [सं.]

**तथ्य** न. १. सत्य; सत्यांश; खरी गोष्ट. २. अर्थ; उपयुक्त, महत्त्वाचा भाग. क्रिवि. खरे पाहता; वास्तविक. [सं.] वि. खरे; सत्य : 'ना भी तथ्य ते बोल आतां ।'– दावि ३०९. [सं.]

**तद्धित** वि. (व्या.) शब्दसाधित; धातुखेरीज इतर शब्दाला प्रत्यय लागून झालेला (शब्द). उदा. कृपावंत, धनाढ्य, राजकीय. [सं.]

**तद्दन** वि. पूर्णपणे; एकदम; अगदी : 'तद्दन नवी वार्ता.'– जकुआ ६.[सं.]

**तद्देशी, तद्देशीय** वि. १. त्या देशाचा, देशातील. २. (ल.) परदेशी.[सं.]

**तद्(त्)बीर** स्त्री. १. योजना; व्यवस्था; उपाय : 'तदनंतर जे तद्बीर होईल ते विनंती केली जाईल.'– मइसा १.१४७; 'मशार्निले येथे आलियावर तर्तूद व तत्बीर पाहून बहुत संतोष जहाला.'– पया ५७. २. विचार : 'कांहीं एक शक्कल नमूद करावी या तत्बिरेत असतील.'– पया ४६३. [फा.]

**तधी** क्रिवि. त्यादिवशी; त्या वेळी; तेव्हा : 'कृप बोले काय मद्रराज तधी ।– मोकर्ण ६.७५. [सं. तदा]

**तन, तनका** न. पु. शरीर; देह. पहा : **तनू** : 'सहज सुंदर नीळ तन ।'– वेसीस्व ९.११.[सं. तनु; फा.तन] (वा.) ० **देणे** –छाती पुढे करून तोंड देणे; पुढे पडणे . ० **लागणे**– एखाद्या विषयाकडे मन पूर्णपणे गुंतणे. **तनमनधन अर्पिणे** – सर्वस्व अर्पण करणे.

**तन(ना)ई–य–व** स्त्री. १. तंबूचा तणाव्याचा दोर, दोरी. २. कपडे सुकवण्यासाठी ताठ बांधलेली परटाची दोरी; निशाणाचा खांब नीट उभा रहावा म्हणून बांधलेला आधाराचा दोर. ३. (ल.) साहाय्यकर्ता; आधार, आश्रय देणारी व्यक्ती. [अर. तनाब] (वा.) **तनया तुटणे** – १. गवई घसा खरवडून गात असल्यास म्हणतात. २.एखाद्याचा आश्रयदाता नाहीसा होणे.

**तनकट** न. लहान कोवळे गवत.

**तन(ण)का** पु. राग; रागाचा झटका; झनाटा.(व.)

**तनकी** स्त्री. शहानिशा; चौकशी : 'ज्या ज्या बातम्या समजल्या होत्या त्यांच्या तनक्या करू लागले.'– ऐकोपुर.

**तनखा, तन्खा** पु. १. सरकारी तिजोरीतून रक्कम देण्याचा हुकूम; वरात; सरकारी वसुलातून तोडून दिलेले उत्पन्न. २. प्राचीन काळात आदिलशाहीने बसविलेली जमाबंदी, पट्टी : 'तनखाही हर्दू तपियाचा दिवाणात देत नाहीस.'– मइसा १५.२७१. ३. औरंगजेबाच्या कारकिर्दीत मक्केला यात्रेकरूंना नेणारी जहाजे सुरतच्या बंदरात असत, त्यांच्या खर्चासाठी तोडून दिलेला वसूल. ४. वसूल; एखाद्या गावचा, परगण्याचा जमाबंदीचा, वसुलाचा तक्ता. ५. स्वामित्व; हक्क. ६.संबंध. (क्रि. तोडणे, तोडून टाकणे). ७. पगार; वेतन. ८. खर्ची : 'तुम्हांकडे सर्दारुल्मुलूक बहादूर यांनी पर्गणे पालीम येथील ऐवजी तन्खा केली त्याबाबत ऐवज येणें.'– मइसा २२.१०१.

**तनगडणे** अक्रि. झोकांड्या खाणे.(व.)

**तनघैल** वि. गवत माजलेली (जागा) : 'एकी तनघैलीया भूमी.'–लीचपू ४७२.

**तनदी(दे)ही** स्त्री. मेहनत; प्रयत्न; खटपट : 'मसलत हांसल होण्याविसी तनदीही करतील.'– ऐको.

**तननं** न. १. आवाज लावण्यासाठी गाणे गुणगुणणे; सूर लावणे. २. (एखादे गाणे) आपल्याशीच गुणगुणणे; ताना मारणे : 'तेव्हा गंधर्वमुखीं जिकडे तिकडेहि तननं तननं ।'– मोवन १२.१६२. [ध्व.]

**तनफन करनं** सतत रागावणे; हिडीसफिडीस करणे. (अहि.)

**तनफुगी** पु. गवतात असणारा एक किडा. हा पोटात गेल्यास जनावर फुगून मरते, असे म्हणतात.

**तनमोर** पु. एक प्रकारचा पक्षी. याचे लहान व मोठा असे भेद आहेत. [सं. तनु+मयूर]

**तनय** पु. पुत्र; मुलगा. [सं.]

**तन(ना)री तनाना** स्त्री. गाणे; गायन; तननं करणे. [ध्व.]

**तनल** न. पेंढा; धान्याचे काड, ताट; तणस. (व., को.) [सं. तृण]

**तनला** वि. १. आभाळात उडत असलेला. २. वादाला पेटलेला. (झाडी)

**तनवी** स्त्री. चेहऱ्यावरील टवटवी; (आजारपण संपल्यावर येणारा) तजेला. (क्रि. पालटणे) [सं. तनु]

**तनस(सु)डी** स्त्री. १. तणसडी. २. सोललेली अंबाडीची काडी; सणकाडी. (माण.) [सं. तृण + म. सट]

**तनसळ** स्त्री. (विणकाम) सूत उकलून त्याचा ताणा करण्यासाठी केलेली चौकट. फासे (धागे) घालण्यासाठी या चौकटीवर खुंट्या बसविलेल्या असतात. [सं.तन्तु+शलाका]

**तनाखा** पु. चंदनासारखे एक लाकूड. ब्रह्मी स्त्रिया हे उगाळून चेहऱ्याला लावतात.

**तनाखोरी** स्त्री. १. (ठेव म्हणून घेतलेल्या पैशांची) अफरातफर; विश्वासघात; लाटालाटी : 'नका करू तनाखोरी । बाहेर पडते हे चोरी ।'– मध्व ५३०. २. नावड; वीट : 'तो यांस तनाखोरीस येऊन...'– जोरा ५४. [फा.]

**तनाम्ल** न. (रसा.) कातडे कमावण्याच्या कामी उपयोगी पडणारे एक अम्ल. हे बाभळीच्या सालीपासून काढतात. [इं.टॅन+सं. अम्ल]

**तनावणे** अक्रि. निजणे; ताणून देणे.

**तनीस्** स्त्री. भाताचे गवत. (झाडी)

**तनु** वि. १. अल्प; थोडे. २. कृश; क्षीण. ३. सूक्ष्म; बारीक. ४. तलम; अतिशय पातळ. ५. नाजूक; कोमल. [सं.]

**तनु-नू** स्त्री. १. देह; शरीर. २. प्रकृती; तब्येत; देहस्वभाव. ३. शरीरप्रकृतीची काळजी; निगा; पथ्य. ४. नाजूक प्रकृती. [सं. तनु] (वा.) ० **राखणे**- जीव जगण्यापुरते, थोडे देणे.

**तनुज** पु. पुत्र; मुलगा. [सं.]

**तनुमानसा** स्त्री. ज्ञानी जीवाच्या सात भूमिकांपैकी मनाला तनुत्व आणणारी तिसरी भूमिका.

**तनुरात** पु. एक प्रकारचा तवा : 'रोट्यांचे बरेच प्रकार तनुरात नावाच्या तव्यावर भाजण्यांत येतात.'- गृशि २.१५. [सं.तनूर]

**तनू** स्त्री. तकवा; ताकद; शक्ती.(व.)

**तन्न** न. भात वाळून शिल्लक राहिलेले पाणी.(गो.)

**तन्नकतारा** पु. सोनेरी ताऱ्यासारखी टिकली : 'हातांत पाहावी तर एकेकच बांगडी पण तीसुद्धां तन्नकताऱ्यांची.' - खेस्व ११२.

**तन्नाफन्ना** वि. नष्ट; विस्कळीत. (झाडी)

**तन्नॉ** वि. १. हिरवा. २. तरणा; तरुण.

**तन्न्या** पु. बैलगाडीचा कठडा आणि साटली यांना जोडणाऱ्या दोऱ्या वा तारांचा पीळ. कठडा गाडीच्या मूळ सांगाड्यावरून उचकून बाजूला जाऊ नये म्हणून हा बांधतात.

**तन्मणी** पु. स्त्रियांचा गळ्यात घालण्याचा हिऱ्या-मोत्यांचा एक दागिना.

**तन्मय** न. स्वरूपैक्य : 'दिसे तन्मयाचें झळकत। एक छत्र।'- ज्ञा ९.२१७.
वि. तद्रूप; तदाकार; तल्लीन; एखाद्या गोष्टीत पूर्ण दंग झालेला. [सं.]

**तन्मात्र-त्रा** न. स्त्री. पृथ्वी, आप, तेज इ. पंचमहाभूतांचे अतिसूक्ष्म रूप. उदा. पृथ्वीचे गंध, जलाचे रस : 'तैसींचि श्रोत्रादि तन्मात्रें।'-ज्ञा १५.९९.
वि. केवळ तेच. [सं.]

**तन्मॉधाकुटॉ** वि. तरणाताठा; नव्या नवतीचा. (गो.)

**तन्यता** स्त्री. (पदार्थ.) ठोकून पातळ पत्रा बनवता येण्याचा, तार काढता येण्याचा गुणधर्म; प्रसरणयोग्यता; प्रसरणक्षमता. [सं.]

**तन्वंगी** स्त्री. सुंदरी; सुकुमार व सुंदर, बांधेसूद व सडपातळ स्त्री. [सं.]

**तन्वल** वि. कच्चे; कोवळे; अपक्व.(गो.)

**तन्सी** पु. भांडी घासण्यासाठी भातेणाचा केलेला चोथा.

**तन्हाई** स्त्री. एकांत; एकलेपण : 'तन्हाईत बोलावयाचे किंवा कसें?'- मइसा ५.२८. [हिं.तनहाई]

**तन्हारणे** अक्रि. ताण बसणे; ताणले जाणे.
उक्रि. (व.) पहा : **ताणणे** [सं.तन्]

**तप** न. १. शरीरशुद्धी, इष्टप्राप्ती इ. हेतूंनी केलेले देहदंडनयुक्त उपोषण इ.सारखे आचरण; ध्यान; मनन; कष्टसाध्य आचरण. २. सदाचरण; पुण्याचरण; पुण्य. ३. विहित, विशिष्ट कर्म; कर्तव्य (ब्राह्मण, क्षत्रिय इ. वर्णांचे). ४. बारा वर्षांची मुदत; कालमान : 'एकांगुष्ठीहीं तपिजे। तपसाहस्त्रीं।'-ज्ञा १७.४१८. ५. ग्रीष्म ऋतू. [सं.] (वा.) ० **करनं** - वाट पाहणे; खूप कष्ट घेणे. (अहि.) **तपी बठनं** - मन गार होणे, तृप्त असणे. **तपी बसणे**- १. धर्माचरणार्थ, पुण्यसंचयार्थ देहदंडयुक्त आचरण करणे. २. अधिकारच्युत, बेकार होऊन घरी बसणे. **(करून करून) तपी बसणे** - एकसारखी पापे करीत राहून त्यानंतर साधुवृत्तीचा आव आणणे; निरुद्योगी होऊन बसणे. **तपे बसणे**- तपश्चर्या करणे.
वि. हे पद समासाच्या उत्तरपदी असल्यास ताप देणारा असा अर्थ होतो. उदा. नेत्रतप = डोळ्याला ताप देणारा; मनस्तप; अंतस्तप. इ.

**तपकणे** पु. अक्रि. थेंबाथेंबांनी गळणे; झिरपणे; टपकणे.[हिं. तपकना]

**तपकिरी** पु. तपकिरीचा रंग.
वि. तपकिरीच्या रंगाचा.

**तपकिऱ्या-ल्या** वि. १. तपकीर ओढणारा. २. तपकीर विकणारा.

**तपकीर-ल, तपखील** स्त्री. हुंगण्यासाठी केलेली तंबाखूची पूड. (क्रि. ओढणे). [सं.क्षारपत्रा]

**तपगणे** अक्रि. ठासून भरले जाणे; कोंबले जाणे; अजीर्णाने ताठरणे. [सं. स्तभ्]

**तपणे** अक्रि. १. (सूर्य इ.काने) प्रकाशणे; तळपणे; चकाकणे : 'जेयाचेनि प्रतापें तपे सुर्यु।'- शिव १५१. २. (ल.) (राज्य इ.) समृद्ध होणे; भरभराटीस येणे; उत्कर्ष पावणे. ३. (ल.) (एखाद्यावर) रागावणे; संतापणे; क्रुद्ध होणे. ४. तपश्चर्या करणे; तप आचरणे : 'एकांगुष्ठीहीं तपिजे। तपसाहस्त्रीं।' - ज्ञा १७.४१५. ५. तापणे; गरम होणे. [सं.तप्]

**तपन** पु. सूर्य : 'ना ना मावळतेनि तपनें। नेइजती लोकांची दर्शनें।'- ज्ञा १५.३६६.
न. १. ज्वलन; प्रकाशन; प्रकाशाचा, उष्णतेचा झगमगाट; उष्णता; प्रखरता; उष्णता बाहेर टाकणे, पडणे. २. (सूर्याचे) ऊन, उष्णता. (क्रि. पडणे, होणे.) [सं.]

**तपवणे** सक्रि. तापवून वाळवणे.

**तपशि(शे)ला** पु. १. स्त्रियांचे एक प्रकारचे हिरव्या रंगाचे व रुंद धारीचे वस्त्र. (गो.) २. एक प्रकारची रेशीमकाठी साडी :'परिधान गोपिनीं करुन उंच तपशेले।'- प्रला २९.

**तपशी(सी)ल** पु. १. एखाद्या प्रसंगातील, हिशेबातील सर्व बारीकसारीक गोष्टी; सविस्तर वर्णन, नोंद. २. (ल.) पाल्हाळयुक्त वर्णन, कथन; चऱ्हाट; चर्पटपंजरी. ३. खोटी सबब; बहाणा; निमित्त; मिष. (क्रि. लावणे) : 'तपशील सहसा न लाविता...रुपये व रसदेची तर्तूद जरूर करणे.'- मइसा १.३३५. [फा. तफ्सील]

**तपशीलवार** क्रिवि. साद्यंत; बारीकसारीक गोष्टीसुद्धा; सर्व तपशिलांसह.

**तपश्चर्या, तपस्या** स्त्री. तप; तपस्या; खडतर व्रताचरण. [सं.]

**तपस्तब्धी** पु. तपांबर व स्थितांबर यांच्यामधील थर.

**तपस्वी** पु. तपश्चर्या करणारा; तपी. [सं.]

**तप(पी)ळ** वि. १. तापट; तामसी; रागीट. २. तल्लख; काम करण्यात चपळ; चलाख.

**तपाड** न. ऊन. (व.)

**तपाडनं** उक्रि. १. तापवणे; चिडवणे. २. क्रुद्ध होणे. (अहि.)

**तपास, तपासणी** पु. स्त्री. १. चौकशी; बारीक शोध; तलास. २. (कायदा) फेरचौकशी; गुन्ह्याबाबत पुरावे गोळा करण्यासाठी पोलीस अंमलदार करतात ते चौकशीचे काम. [अर.तफह्हुस]

**तपासणे** उक्रि. १. शोध, चौकशी करणे; बारकाईने पाहणे. २. परीक्षा

करणे, घेणे; तपासणी करणे. ३. ताडून पाहणे. [फा. तफहहुत]
**तपासनिशी** स्त्री. तपासनिसाचा हुद्दा, काम.
**तपासनीस** पु. १. (एखाद्या भागातील) चोऱ्या, दरोडे इ. गुन्ह्यांची चौकशी करून सरकारात कळवणारा पोलीस इन्स्पेक्टरसारखा (पूर्वीच्या राजवटीतील) अधिकारी. २. तपासणारा अधिकारी.
**तपांबर** न. पृथ्वीभोवती असणाऱ्या वातावरणाच्या पाच थरांपैकी जमिनीला लागून असणारा आठ ते सोळा कि.मी. उंचीचा थर. ढग, वारा, पाऊस, बर्फ इ. या भागात असतात. [सं.]
**तपिया, तपी** पु. तपस्वी : 'भरत तपिया थोर अंगे।'- एभा २.१५४; 'जपी तपी तामस योगी।'- दास ४.१.१३. [सं.तपी]
**तपीठ** न. तांदळाच्या पिठाचे एक मसालेदार पकान्न. [सं.पिष्ठ]
**तपीनणे, तपिन्नणे** सक्रि. पहा : **तपणे** ४ : 'तपें कोण तपीनलीं।'- रास २.२०९.
**तपीळपण** न. तापटपणा; रागीटपणा : 'तपीळपण धरूं नये। भांडवितां भांडों नये।'- दास १४.१.१७.
**तपेली–ले** स्त्री. न. १. पाणी भरण्याचे स्वयंपाकाच्या उपयोगाचे विशिष्ट आकाराचे, तांब्यापितळेचे उभट भांडे . २. तपेली; तांबले. (व.) [सं. तप+आलय; क. तपले] (वा.) ० **बुडणे–** १.(एखाद्याचे) निर्वाहाचे साधन नाहीसे होणे. २. फुकट जाणे; नासणे.
**तपोधन** पु. १. तप हेच ज्याचे धन तो. २. गोसावी; बैरागी; संन्यासी. ३. गुरव; शंकराच्या देवळातील पुजारी. – बदलापूर ४७४. [सं.]
**तपोनिधी** पु. १. तपश्चर्येचा साठा. २. गोसावी, बैरागी इ.ना संबोधण्याचा शब्द; तपोधन. [सं.]
**तपोलोक** पु. सात स्वर्गांपैकी सहावा स्वर्गलोक.
**तपोवन** न. तपश्चर्या करण्याचे वन; तपस्वी लोकांचे रहाण्याचे स्थान. [सं.]
**तप्त** वि. तापलेला; संतप्त झालेला; चेतविलेला; प्रक्षुब्ध. [सं.]
**तप्तमुद्रा** स्त्री. १. मध्वसंप्रदायी वैष्णव दीक्षा घेताना तांब्या–पितळेच्या मुद्रा तापवून आपल्या अंगावर जी चिन्हे उमटवतात त्यांपैकी प्रत्येक. २.ही चिन्हे उमटवण्याची मुद्रा. [सं.]
**तप्तलोह** न. १. तापलेले लोखंड. २. (तापलेल्या लोखंडाचा) एक प्रकारचा नरक : 'तप्तलोह भेटी। तुका म्हणे कल्पकोटी।'- तुगा ३१४१.[सं.]
**तप्तांग** न. पु. उत्तर दिशा; तप्ती म्हणजे तापी नदीकडील भाग किंवा दिशा.
**तप्पा** पु. एका मुख्य गावाच्या आसपास असलेल्या दहा–वीस गावांची वसुलाची वहिवाट करता येईल असा परगण्यापेक्षा लहान प्रादेशिक विभाग; जिल्हा; परगण्याचा भाग. [हिं.]
**तफरका, तरफका** वि. गहाळ, अफरातफर झालेला : 'यांचा माल कांहीं तफरका जाहला असेल तो यांचा यांस देणे'- वाडबाबा २.१४१. [फा.]
**तफावत** स्त्री. १. अंतर (स्थल आणि काल यासंबंधी) : 'गिल्चाचा आमचा दोंकोसाचा तफावत होता.'- मइसा ६.४७०.२. (जमाखर्चातील, लिखाणातील) फरक; विसंगती. ३. (कर्तव्य बजावण्यात) चूक; कसर; दोष; उणेपणा. ४. चूक; बरोबर नसणे. ५. भेद; फरक; विषमता; भिन्नता. ६. स्वामिद्रोह; हरामखोरी; दगलबाजी : 'मग त्यामध्ये एक मुसलमान होता त्याने तफावती केली.'- मइसा १५.६.[फा. तफावुत] (वा.) ० **राखणे** – मर्यादा राखणे.
**तफावत–तजावज** स्त्री. कमीपणा; अंतर; न्यून : 'केव्हाही हर्दहाल मोहिब्बाचे कामामध्ये तफावत–तजावज करणार नाही.'-ब्रप २४०. [फा.]
**तबक** न. १. पानसुपारी, पूजासाहित्य इ. ठेवण्याच्या उपयोगी, चांदी इ. धातूचे नक्षीदार ताट. २. (ल.) जमिनीचा वाटोळा तुकडा. ३. डोंगर, टेकडी यांचा वाटोळा भाग. सभामंडपाचा सायवानांचा भाग सोडून मध्यभागी असलेली जागा अथवा त्या जागेखालचे स्थान; छताचा चांदवा. ५. घेर. ६. पहा : **तबकडी** ३ [अर. तबक्]
**तबक** न. पान; कागद.
**तबक** स्त्री. विहिरीच्या भोवताली बांधलेला गोल अथवा चौकोनी ओटा; बेंड. (को.)
**तबक** प्रत; वर्ग; दर्जा.
**तबक** कुळी; वंशावळ.
**तबकडी** स्त्री. १. लहान तबक. २. समईच्या खाली ठेवण्याची ताटली. ३. विशिष्ट प्रकारच्या दिव्याच्या काचेच्या गोळ्याच्या (ग्लोबच्या) वरच्या बाजूला असणारा गोलाकार पत्रा. याला पांढरा रंग दिलेला असल्यामुळे प्रकाशकिरण फाकायला मदत होते. ४. पालखीतील बसण्याची जागा. ५. जिना चढून गेल्यावर उभे राहण्यासाठी केलेली रुंद पायरी, जागा; तबक. ६. तंतुवाद्यांमध्ये दर्शनी बाजूस भोपळ्यावर बसवलेला तक्ता. ७. पानसुपारीच्या डब्यातील पाळ्याच्या वर मध्यभागी चुन्याची डबी बसवलेला पत्रा. ८. गाणे किंवा ध्वनिचित्र उमटवून पुन:प्रक्षेपित करता येते अशी गोल चकती. ९. घड्याळाच्या तोंडावरील आकडे घातलेला पत्रा. [फा. तबक]
**तबकणे** अक्रि. टपकणे. पहा : **तपकणे** [हिं. तपकना; ध्व.]
**तबकफाड पेच** (मल्लविद्या) कुस्तीतील डावाचा एक प्रकार, पेच.
**तबकलीचा** वि. जोखमीचा; भीतिदायक.
**तबदिली** स्त्री. (कायदा) (मालमत्तेचे) स्थित्यंतर; बदली; हस्तांतरण; देवघेव. [फा. तब्दील]
**तबदील** न. स्त्री. (कायदा) बदलणे; फिरवणे; दुरुस्ती; फेरबदल. वि. फेरबदल केलेले; दुरुस्त केलेले. (क्रि. करणे.) [फा.तब्दील]
**तबर–ल** पु. लढाईत वापरण्याचे कुऱ्हाड, फरशीसारखे हत्यार : 'महादजीराव शिंदे यांचे पायास तबल लागला आणि जखमी वाचून आले.'- निकेचराप १ पृ. ३१५.
**तबरंगु** वि. हत्तीसारखा पुठ्ठा असलेला (घोडा). घोड्याच्या बहात्तर दोषांपैकी एक.- अश्वप १.२०४.
**तबल** न. ढाल; ढोलके; तबला. (गो.) [फा. तब्ला]
**तबलक–ख** स्त्री. १. कागदपत्रांचे पुडके. २. त्याला गुंडाळलेला दोरा, कागद. [फा. तब्लक्]
**तबलक** स्त्री. लहान ढोल; तबला.
**तबलजी** पु. तबला वाजवणारा. [फा.]
**तबलदार** पु. (लष्करातील) लाकूडतोड्या; फरास. [फा.तबर्दार]

**तबला** पु. एक चर्मवाद्य, तालवाद्य. [फा. तब्ला] (वा.)०**वाजणे, होणे**- खरपूस मार बसणे.
**तबली** स्त्री. सतारीच्या भोपळ्याच्या वरील बाजूस बसविलेली लाकडाची फळी, तक्ता. पहा : **तबकडी** ६
**तबलीक** स्त्री. मुसलमान करून घेणे; बाटवणे.
**तबा** वि. १. वाईट. २. नष्ट. [फा. तबाह्]
**तबा** स्त्री. १. बाकी. २.अब्रू : 'काही दिवस तबा राहिला नव्हता.'- पेद २८, पृ. ७५.
**तबाकतोड** वि. बेमुर्वतखोरपणाचे; सडेतोड; तटकातोड (वागणे, आचरण).
**तबाखी जहाज** चिलखती जहाज; पोलादी पत्रे बाहेरून बसवलेले जहाज.
**तबाब** पु. (सुतारी) लाकडी जिन्याच्या दोन्ही बाजूंच्या फळ्यांपैकी एक.
**तबियत, तब्य(ब्ये, ब्बे)त** स्त्री. १. प्रकृती; शरीरप्रकृती; शरीरस्वास्थ्य. २. मनाची प्रवृत्ती; कल; मर्जी; लहर; छंद. [फा. तबीअत्]
**तबियती** वि. लहरी; तऱ्हेवाईक; छांदिष्ट; स्वच्छंदी.
**तबीक** न. वाशांवर शोभेसाठी बसवलेली फळी.
**तबीब** पु. हकीम; वैद्य; बारीकसारीक जखमांवर इलाज करणारा शस्त्र-वैद्य; हा बहुधा मुसलमान असतो : 'तबीब लावून जखमा बांधविल्या'- ऐलेसं ६.२८३२. [फा. तबीब्]
**तबेल** (को.) पहा : **तबला** (वा.) **(एखाद्या गोष्टीचे) ० वाजणे** - एखादी गोष्ट प्रसिद्धीस, उघडकीस येणे (विशेषत: दुष्कर्मांच्या बाबतीत).
**तबेला** पु. १. घोडा अथवा गाडी ठेवण्याचे घर; घोडशाळा. २. (ल.) ठाणबंद घोड्यांची रांग; पागा. [फा. तबीला]
**तब्बल-र** स्त्री. (क.) नेट; जोर; ताण; धाव; दम .
वि. क्रिवि. विवक्षित परिमाणाने मोजले असता कमी न भरता थोडा अधिकच भरणारा (मार्ग, वेळ, ओझे, धान्य इ.); भरपूर; पुरेपूर; अगदी पूर्णपणे. [फा. तवील]
**तब्बल** पु. ताशाबरोबर वाजवण्याचा ढोल.
**तम** पु.न. १. अंधार; काळोख. २. सत्त्वादी गुणांपैकी तिसरा, (ज्यापासून कामक्रोधादी विकार उत्पन्न होतात तो) तमोगुण. ३. (तमोगुणापासून उत्पन्न होणारे) अज्ञान; वेडेपणा; मूर्खपणा; मोह; अविचार : 'तें ज्ञान नोहे जाणावें। डोळस तम।'- ज्ञा १८.५८१. ४. उन्माद; क्रोधाचा आवेश; गर्वाचा ताठा. (क्रि. गाणे, करणे, मांडणे.) ५. मूर्च्छा; बेशुद्धी : 'वासुनि दांत मुखांत दहांत पडे, मति गाढ तमी पचली।' - वासीस्व ११.[सं. ]
**तम** प्र. एखाद्या गुणाची अतिशय उत्कटता, पराकाष्ठा, उत्कृष्टपणा दाखवणारा संस्कृत विशेषणाला जोडण्याचा प्रत्यय. उदा. प्रियतम = सर्वांत प्रिय.
**तम** स्त्री. पर्वा; क्षिती. (गो.) पहा : **तमा**
**तम(मे)क** स्त्री. सोने किंवा रुपे व तांबे मिसळून केलेला धातू.
**तमकूप** पु. एक नरक.
**तमणे, तमतमणे** अक्रि. १. शेखी मिरवणे; फुशारकी मारणे; वल्गना करणे. २. गर्वाने, रागाने बडबडणे; तणतणणे; जळफळणे. ३. रागाने रोखून, टवकारून पाहणे. ४. भिडणे; टक्कर देणे : 'कोण कोण सरदार ते न कळे। प्रलयकाल शत्रूशी तमले।'- होला १८७. [सं. तम]
**तमतम** स्त्री. कुरकुर; पिरपिर : 'सासुचा सासुरवास। करते तमतम।'- वलो ९३. (व.) [ध्व.]
**तमतमपूजा** स्त्री. आपल्यापुरती तजवीज, व्यवस्था.
**तमतमाशा** पु. बडबड; चडफडाट; जळफळाट; शिरा ताणून बोलणे; प्रलाप; अरेरावी. (क्रि. करणे, मांडणे, लावणे.).
**तमनतोग** न. १. याक या प्राण्याचे गोंडेदार शेपूट. २. मोंगल बादशहाचे एक राजचिन्ह.
**तमली** वि. हटवादी; दुराग्रही; मताग्रही; मताभिमानी. (गो.)
**तमशेट** वि. तामसी; रागीट; तापट.
**तमस्वी** वि. १. क्रोधी; तापट; तामसी; रागिट. २. अंधार असलेले. ३. अज्ञानी. [सं.]
**तमंचा** पु. १. पिस्तूल; तबंचा : 'तमंच्याने गोळी मारून ठार करू.'- वज्राघात ११६. २. (कुस्ती)एक पेच. यामध्ये शत्रूला पोटात शिरून आपल्या डाव्या हाताने कमरेवरून त्याचा लंगोट पकडून त्याच्या उजव्या बगलेतून आपला डावा पाय पाठीवर चढवून त्याची डावी जांघ दाबून त्यास चीत करतात. [फा.]
**तमा** स्त्री. फिकीर; काळजी; पर्वा; किंमत; एखाद्या गोष्टीबद्दल वाटणारे महत्त्व. (अकरणरूपी प्रयोग). [फा. तम्अ]
**तमाकू-खू** पहा : **तंबाखू**
**तमाखू** रहिवासाचे ठिकाण; रहिवास.
**तमाचा** पु. थप्पड; चापटी. [हिं.]
**तमाम** वि. पूर्ण; सफळ; पूर्णतेला गेलेला : 'तुमचें दैव ते आहे तमाम। आत्मसुखीं हो अंतर्याम।'- अमृत ३२.
क्रिवि. १. सर्व; सारे; अपवाद न करता; झाडून; एकंदर : '...व तमाम येऊनु नऊगजी आसपास येऊनु उतरिले.'- इमं ७. २. एका मागून एक; सारख्या वेगाने. [फा. तमाम्]
**तमामा** पु. धिंगाणे; धिंगामस्ती; धुडगूस. पहा : **हमामा** : 'जो गोकुळात हरि घालितसे तमामा।'- देकृष्णस्तोत्र १. [ध्व.]
**तमामी** स्त्री. संपूर्णता; सिद्धी; समाप्ती; इतिश्री; अखेर; अखेरी. [फा.]
**तमामी** स्त्री. जरीचे रेशमी कापड :'सरपोस जरी जामेवाराचा तमामी असा ताफ्ता.'- वाडसमा ३.११९.
वि. ज्यात उभे धागे जरीचे व आडवे धागे रेशमाचे-कापसाचे आहेत असे (कापड, वस्त्र). [फा.]
**तमारी** स्त्री. चक्कर.
**तमालपत्र** न. १. तमालवृक्षाचे पान. सुवासामुळे याचा मसाल्यात उपयोग. २. (उप.) तंबाखू. [सं.; फा.]
**तमाश(स)गिरी** स्त्री. १. तमासगिराचा, खेळ करणाऱ्याचा धंदा; तमाशाचा धंदा. २. (क.) गमतीचे दृश्य; मौजेचा खेळ; गंमत.
**तमाश(स)गी(गा)र** वि. १. तमाशा पाहणारा; मजा, गंमत पाहण्यास नेहमी उत्सुक असलेला : 'कठड्याचे बाहेर तमासगीर लोकांस व्यवस्थेशीर उभे राहू द्यावें.'-पहिलवान लोक व कुस्त्यांसंबंधी नियम २४. (बडोदे) २. (ल.) प्रेक्षक; तिऱ्हाईत (गंमत पाहणारा) माणूस;

बघ्या. ३. तमाशा करून उपजीविका करणारा तमाशेवाला (गारुडी, जादूगार, डोंबारी, विदूषक, बहुरूपी इ.). [फा. तमाशागीर]

**तमाशा-सा** पु. १. सोंगे घेणे, बाहुल्या नाचवणे, दोरावर चालणे इ. सारखे विदूषक, बहुरूपी, गारुडी, डोंबारी इ.कांचे करमणुकीचे खेळ. २. गंमत; मजेशीर दृश्य; आनंददायी प्रसंग : 'पाहती सकल लोक तमासा।'- आशिवि ३३. ३. क्रीडायुद्ध; लटकी लढाई; कुस्ती : 'अरे कंचुकी, जेठ्यांचा तमाशा पहावयाची वासना आहे.'- लक्ष्मीनारायण कल्याण नाटक (शके १६०४) (ग्रंथमाला). ४. चमत्कार; आश्चर्यकारक गोष्ट : 'म्हणे अधरा भारा कैसा। चालतो हा न कळे तमासा।'- नव १३.५४. ५. पराक्रम; विशेष कर्तबगारी : 'किल्ला घेतला तमाशानें।'- ऐपो ७३. ६. खेळ; फजिती : 'काय आमच्या दैवाने आमचा तमाशा मांडला आहे.'- रप्र ८९. ७. लाज सोडून स्वैरपणाने केलेली चेष्टा, वर्तन. [फा.]

**तमाशाचा मनुष्य** तऱ्हेवाईक, लहरी, विचित्र मनुष्य.

**तमास(श)बीन** पु. प्रेक्षक; बघे लोक. (क्रि. करणे).

**तमिष्ट** वि. तामसी; रागीट; क्रोधिष्ट. (व.)

**तमी** स्त्री. रात्र. [सं. तमस्]

**तमीज** स्त्री. १. पद्धतशीरपणा; व्यवस्थितपणा; नीटनेटकेपणा. २. विवेक; जाणीव; बुद्धी. ३. अदब. [फा. तमीझ्]

**तमीर** स्त्री. तांबर.

**तमूनी** वि. काळ्या-निळ्या रंगाचे.

**तमोगुण** पहा : **तम** [सं.]

**तय** स्त्री. १. पूड; चूर्ण. २. मसालामिश्रित मांस : 'पुलाव्याचें चौथें साधन तय म्हणजे मसालामिश्रित मांस.'- गृशि २.१३८.

**तय** स्त्री. तृतीया; तीज. (गो.) [सं. त्रय]

**तया(य्या)र** वि. १. परिपूर्ण झालेला, केलेला, बनविलेला; ज्याचा काही एक अंश करायचा राहिला नाही असा (जिन्नस, गोष्ट इ.). २. (कोठे जाण्यास, एखादे कार्य करण्यास) उद्युक्त; सिद्ध; सज्ज; उत्सुक. ३. सशक्त; लठ्ठ; धष्टपुष्ट. (व.) [फा.]

**तयारणे** सक्रि. तयार, सज्ज ठेवणे, करणे :'जामदारखान्यात खजिना द्रव्याच्या पेढ्या भरल्या। दोर सलीते सहीत कतरा त्या उंटाच्या तयारल्या।'- होला १५१. [फा. तय्यार]

**तयारी** स्त्री. १. तयार, सज्ज होण्याचा व्यापार, क्रिया; तजवीज. २. बेगमी; तयार होण्यासाठी लागणारे जिन्नस, सामुग्री, साहित्य. ३. (एखादे कार्य करण्याबद्दलची मनुष्याची) सिद्धता, सज्जता, खुषी. ४. (संगीत) उपस्थिती; (एखाद्या गोष्टीच्या व्यासंगाने येणारे) कौशल्य; कसब. [फा. तय्यारी]

**तयारी** स्त्री. मोठ्या एकखांबी राहुटीचे प्रवेशद्वार.

**तयी-यीं** क्रिवि. त्या वेळी; तेव्हा; तई : 'तयीं प्रभुवरा! तसे सदय कां असे आज हो।'- केमा ८१. [सं.तदा]

**तयूल** राजकुटुंबातील इसमाला दिलेली जहागीर किंवा इनाम- ऐको.

**तर-री** स्त्री. १. होडी; मचवा. (हेट., कु.) २. (मचवा इ.काने उतरून जाता येईल अशी) खाडी. ३. (नाविक) खाडीतील होड्या लावण्याची किनाऱ्यावरील सोईस्कर जागा, ठिकाण. ४. पलीकडील बाजू, तीर : 'अर बाधें तर बांधें।'- वैद्यक ७६. [सं.तृ=तरणे]

**तर** स्त्री. मर्यादा; हद्द.

**तर** विशेषणाला लागणारा तारतम्यवाचक तद्धित प्रत्यय. उदा. गुरू = मोठा; गुरुतर = अधिक मोठा. [सं.]

**तर** वि. ओले; ताजे; रसपूर्ण : 'तर मेव्याचे व खुश्क मेव्याचे खोन.' - मइसा १०.२९६. [फा. तर्]

**तर** उअ. जर या उभयान्वयी अव्ययाचे उत्तरगामी उभयान्वयी अव्यय. याचा अर्थ तसे झाल्यास, असल्यास, त्याअर्थी इ. बऱ्याच वेळा तर ह्या शब्दाचा वाक्यपूरक म्हणून उपयोग करतात. अशा वेळी त्या वाक्यात काही विशेष अर्थ व जोर येतो. उदा. 'हो! आता मी जातो तर!'= 'मी अजिबात जाणार नाही.' कित्येक वेळा तर हा शब्द त्याने जोडलेल्या दोन वाक्यांच्या अर्थाचा विरोध दाखवतो. उदा. 'तुम्ही तर लाख रुपये मागता व मी तर केवळ गरीब पडलो.' याने संदिग्धता व अनिश्चयही दाखवला जातो. उदा. 'मी ते नाटक पाहायला आलो तर येईन,' 'मध्ये तर दिसते आहे.' या वाक्यांमध्येही यदृच्छाघटित, सांकेतिकत्व निर्दिष्ट आहे. पहा : **परंतु** [सं. तर्हि]

**तर** स्त्री.पहा : **तुरई**

**तरई** स्त्री. १. गुऱ्हाळात ढेपाळी ठेवण्याकरता केलेला लोखंडी वाकडा पत्रा. २. कोष्ट्याचे, वस्त्र गुंडाळण्याचे लाकूड. [सं. तरी]

**तरक, तरकट-टी-ट्या, तरकटबाज** पहा : **तर्कट** इ. [सं. तर्क]

**तरकटणे** अक्रि. तिरसटपणाने बोलणे; आवेशाने जळणे, पेटणे : 'जसा दहन तरकटुनि रानीं।'- मोद्रोण १२.११५.

**तरकणे** पहा : **तर्कणे** : 'खुणेने शत्रुवर्म तरकती।'- ऐपो २२३. [सं. तर्क]

**तरकणे** अक्रि. १. तडकणे; फाटणे. पहा : **टरकणे** : 'पाहे पां अत्यंत झाले। दिसे नवां ठायीं तरकेलें।' - एरुस्व १७.१४. २. फुटणे; भेगलणे : 'शीतें ओंठ तरकतीं।'- दास ३.७.२२.

**तरकमान** स्त्री. लगामदोरी.

**तरकश-स, तर्कश** स्त्री. पु. १. बाणांचा भाता :'मुगुट मनोहर कवच धनुर्धर। तरकसीं कांचन बाण।'- मध्व ७०. २. (सामा.) शस्त्र इ.कांचे वेष्टन; टोपण; म्यान; कोश. [फा. तर्कश्]

**तरका** स्त्री. अभिवृद्धी; बढती; उत्कर्ष.

**तरकाकडी** स्त्री. एक प्रकारची उन्हाळी मोठी व लांब काकडी. पहा : **टरकाकडी** [फा.]

**तरकाटा** पु.द्रवपदार्थाचा दाटपणा मोजण्याचे उपकरण.

**तरकारी** स्त्री. भाजी. [हिं.]

**तरकी-क्की** स्त्री. अभिवृद्धी; भरभराट; बढती; उत्कर्ष : 'रावसाहेबांचे दौलतेची रोज व रोज तरकी होते, हे गोष्ट त्यास खूश लागत नाही.'- मइसा १.५२. [फा. तरकी]

**तरकीब** स्त्री. युक्ती; उपाय; योजना; चतुराई : 'येऊनि बैसले सभामंडळीं। भक्ति चतुराई येकवटली। बरी तरकीब राजाची।'- दावि ३६६. [फा. तर्किब्]

**तरकीम** स्त्री. लेखन : 'त्यास साहेबाचे काय सला ते फर्माविली पाहिजे,

म्हणोन तरकीम केले.'– मइसा ३.७३. [फा. तर्कीम्]

**तरकूट** न. तांदूळ, पोहे यात असलेला रव्याचा चरचरीत अंश; भरडा; कण्या; कूट. (राजा.) [फा.तर्+म. कूट]

**तरच** उअ. १. म्हणूनच; तसे आहे म्हणून. (कार्यकारणांचा साक्षात्कार झाल्यानंतर दोन गोष्टींतील परस्पर कार्यकारणभाव मनाला पटतो, त्या अर्थाचे द्योतक उभयान्वयी अव्यय.) २. (अमुक एक अट, गोष्ट) निश्चित, कबूल, नक्की असेल तर; तसेच झाल्यास.

**तरज(जु) मा, तर्जुमा** पु. १. भाषांतर; दुसऱ्या भाषेत अनुवाद. २.(मजकूर इ.कांचा) सारांश; गोषवारा; गोळाबेरीज. ३. सालातील (वर्षातील) उत्पन्न, खर्च व शिल्लक यांची एके ठिकाणी नोंद; राज्याचे एकंदर उत्पन्न किती व खर्च किती, फौज किती व किती खंडण्या यावयाच्या इ.सर्व प्रकारची एका कागदावर दिलेली माहिती; ताळेबंद. हा एकबेरजी तयार करतात. – इनाम ५१. [फा. तर्जमा, तर्जुमा]

**तरजुमान, तर्जुमान** पु. १.भाषांतराच्या कामावर नेमलेला सरकारी अधिकारी. २. दुभाषी-ष्या. [फा.]

**तरट** न. (घोड्याचा) मोठा चाबूक; आसूड : 'जैसा वारू उपलाणी । वश्य करी अश्वसाहणी । मागे तरटांचा कर झणाणी ।'– एभा २०.२१६.

**तरट** न. गोणपाट; पोते. [सं. तरपट्ट; ध्व.]

**तरट** न. एक फळ : 'मग नेपतीं तरटें तोडोनि त्वरित कांतेसह बैसले खात ।'– भवि ५६.९२.

**तरटी –टे** स्त्री. न. १. गोणपाटाचे पोते, थैला. २. ओझ्याच्या गठ्ठ्याला, बैल इ.कांवरून नेण्याच्या बुधल्याला गुंडाळण्याचा तरटाचा मोठा तुकडा; तरटे.

वि. गोणपाटाचे केलेले; तरटाचे.

**तरटी–टे** स्त्री. न. १. नारळाची करटी. २. (तिरस्कारार्थी) डोकसे; टकले; बोडके; टाळके. [क. तरट]

**तरटी** स्त्री. खरबुजाची एक जात; जाम(खा.); हिचा आतील रंग हिरवा असतो.

**तरट्या** वि. टकल्या.

**तरठणे** अक्रि. ताठरणे. [सं.द्रढय्]

**तरड–डा–डे–ढे, तरड(ढ)क** न. पु. १. ओलावून दळलेल्या गव्हाचा कोंडा; तराडा. २. (ल.) चऱ्हाट; पाल्हाळ; लांबलचक व कंटाळवाणे भाषण. (क्रि. लागणे, लावणे, मांडणे). (वा.) **तरडी पेटणे , लावणे** – रागावणे; क्रोधाविष्ट होणे.

**तर(रा)डा** वि. १. शुष्क; रसहीन; जून (भाजी इ.). २. पुष्कळदा हा शब्द वय, शुष्कपणा, जूनपणा, चिवटपणा इ. दर्शक विशेषणाला पुढे अथवा मागे जोडून आधिक्य दाखविण्यात येते.

**तरण–णी** न. स्त्री. १. तरणे; तरंगणे; तरून जाणे : 'कंठी बांधोनि शिळा बाहुबळें जेंवि सागरीं तरण ।'– मोकर्ण २६.२८. २. होडी; तराफा; तरण्याचे साधन; तरणी. [सं.]

**तरण** न. तांदळाच्या कण्या, डाळ इ. पुष्कळ पाण्यात शिजवून व त्यात तिखट, मीठ, मसाला घालून केलेले पातळ खाद्य; कांजी, कढण.

**तरणतलाव** पु. पोहण्यासाठी बांधलेला तलाव.

**तरणा–णी** वि. १. तरुण; जवान. २. मूल व मोठा माणूस यांच्यामधील वयाचा; अप्रौढ; बाप्या; पोऱ्या. [सं. तरुण]

**तरणाताठा** वि. भर यौवनात असलेला; चांगला धट्टाकट्टा; तरुण व सशक्त; तरणाबांड (मनुष्य).

**तरणा पाऊस** (शेतकऱ्यांत रूढ) पुष्य या आठव्या नक्षत्राचा पाऊस. याच्या उलट म्हातारा म्हणजे पुनर्वसु नक्षत्राचा पाऊस.

**तरणाबांड** वि. जोमदार व धट्टाकट्टा (तरुण पुरुष).

**तरणि–णी** पु. सूर्य : 'तियां मजपाशीं चिद्रत्नांचिया खाणी । परी उपेक्षिल्या जात होतिया तरणी । तुजवीण कृष्णा ।'– ज्ञा १०.१६२. [सं.]

**तरणूक** स्त्री. तरून जाणे; अडचणीतून, संकटातून निभावून जाणे.

**तरणे** अक्रि. (पाण्यावर) तरंगणे; पोहणे.

उक्रि. १. नदीपार जाणे; पैलतीर गाठणे : 'कां बांही तरतां वळसा । दाटला जेवीं ।– ज्ञा १३.१८६. २. (ल.) संकट, प्रपंच, इ.तून निभावून जाणे, सुखरूप पार पडणे, मुक्त होणे. ३. मोक्ष मिळणे; संसारसागर पार होणे; ईश्वरप्राप्ती होणे. [सं.तरण]

**तरणोपाय** पु. १. संकटांतून निभावून जाण्याचा उपाय, इलाज; बचाव. २. धडगत; गत्यंतर. ३. सद्गती. [सं.]

**तरतमभाव** पु. (दोन वस्तूंत ठरविलेला, दिसणारा) उच्चनीचभाव; कमीजास्तपणा; श्रेष्ठकनिष्ठता; तारतम्य.

**तरतर–रा, तरारा** क्रिवि. चपळाईने व वेगाने, तुरतुर (विंचू, कोळी, मुंग्या इ. चालणे); दुडदुड-डां (मूल, तट्टू इ. चालणे).

**तरतरणे** अक्रि. १. (जमीन, चुन्याची कळी, हरभरे इ. भिजल्यामुळे) फुगणे; (तळलेले पदार्थ, झाडे, पाने इ.) फुलणे; फुगणे; फुगून टवटवीत होणे; (फोड, गळू इ.) सुजणे; टापसणे; ताठणे : 'सारमेयाच्या शरिरावरती । गोचिड होऊनि तरतरताती ।'– अमृत १७.२. (ल.) (आनंदातिशयाने) प्रफुल्लित होणे; खुलणे. ३. (ल.) (संपत्ती, ऐश्वर्य इ.नी) भरभराटणे.४. (एखाद्या गोष्टीविषयी) आतुर, उत्सुक, उत्कंठित होणे. ५. (विंचू, झुरळ इ.नी) तुरतुर चालणे; धावणे. (माण.)

**तरतरा** पु. पैलू पाडलेला हिरा.

**तरतरी** स्त्री. १. चपळाई; चपळता; त्वरा. २. हुषारी; जोम; उत्साह; मार्मिकता; चुणचुणीतपणा. ३. टवटवीतपणा; तुकतुकी. ४. चपळता; चलाखी; तल्लखपणा. ५. हजरजबाबीपणा; समयसूचकता.

**तरतरीत** वि. १. चलाख; चपळ; हुषार; चुणचुणीत. २. सरळ; धारदार (नाक इ.). ३. रोखलेला; टवकारलेला; उभा केलेला; उभारलेला (जनावरांचा कान इ.). ४. नीट; सरळ; ताठ. ५. (सामा.) उभा या शब्दासह आधिक्य दर्शवण्यासाठी योजतात. जसे:– तरतरीत उभा = ताठ उभा.

**तरता** वि. १. तरणारा; तरंगणारा. २. (ल.) बुडण्याची भीती नसणारा; किफायतशीर, फायदेशीर (धंदा, व्यवहार इ.). ३. चांगल्या ठिकाणी गुंतवलेला; न बुडणारा (पैसा). ४. वसूल देण्यासारखा; न बुडवणारा (ऋणको). ५. सुरक्षित, सुटकेचा, बचावाचा (मार्ग).[सं.तृ] (वा.) **तरत्या पंथास लागणे** – (एखाद्या संकटग्रस्त, आजारी माणसाने जिवावर बेतलेल्या संकटातून, आजारातून) पार पाडण्याची निभावण्याची, बचावण्याची चिन्हे व्यक्त करणे; आजारातून उठणे;

चांगले दिवस येऊ लागणे.

**तरताबुडता** वि. १. भरभराटीला किंवा डबघाईला आलेला (व्यापार इ.). २. फायदेशीर किंवा आतबट्ट्याचा (धंदा, व्यवहार, रोजगार, काम, प्रकार, मसलत इ.). ३. बरावाईट.

**तरती खाडी** नेहमी (होडी इ.नी) ओलांडता येणारी खाडी.

**तरतीब** न. स्त्री. १. व्यवस्था; योजना; युक्ती; तयारी; तजवीज. २. (एखाद्या कामाची) निगा; काळजी; काटकसर. ३. बडदास्त. [फा. तर्तीब्]

**तरतू(दू)द** स्त्री. १.(एखाद्या कार्याविषयीची) साधने इ.ची तयारी, सिद्धता, जुळवाजुळव, तजवीज, बंदोबस्त. (क्रि. करणे). २. (मनुष्यांची, जनावरांची) निगा; बरदास्त; काळजीपूर्वक व्यवस्था; हवे नको पाहणे; सोयींचा विचार करणे : 'बाबांच्या मर्जीप्रमाणे तरतूद ठेवून त्यांची सेवा चाकरी करावी बरें.' – कमं १.४५. [अर.तरद्दुद]

**तरते बंदर** १. ज्यात पाणी भरपूर असल्यामुळे गलबते, होड्या इ. नेहमी तरंगू शकतात असे बंदर. २. ज्यात किनाऱ्यापर्यंत जहाज जाऊ शकेल असे बंदर.

**तरते बुडते** लाभहानी; नफातोटा.

**तरते भांडवल** जमीन, इमारती, यंत्रसामग्री यासारख्या गोष्टीत नव्हे तर वेतन, कच्च्या मालाची खरेदी अशा गोष्टीत गुंतवलेले भांडवल.

**तरदणे** अक्रि. खरचटणे; घासटणे. (बे.)

**तरदरड** कशीतरी सवड; कोशीस : 'प्रसंगानुसार गाडराचें जाणें सुरतेस जाहालें त्यांतही तरदरड करून राजश्री दिवाकरपंत याची रवानगी पुण्यास केली.'– ऐको.

**तरदाम** पु. एक प्रकारचे कापड .

**तरन** पु. १.पक्वान्न. २.पाहुणचार. (झाडी)

**तरप** स्त्री. कानातून केसात अडकवण्याचा स्त्रियांचा अलंकार. (झाडी)

**तरपा** पु. तळपाय. (झाडी)

**तरफ, तर्फ** स्त्री. १. दिशा; बाजू; कड. २. (भांडण, कज्जा इ.तील) पक्ष; बाजू; कड. ३. ताबा; जिम्मा; राखण; निसबत. ४. हुकमत; अंमल; ताबा. ५. देशाचा एक लहान भाग; काही विशिष्ट संख्यांक गावांचा गट; महाल. पहा : **देश** :'मराठेशाहीत साठ गांवें मिळून तरफ'.– गांगा ४२. महालाचा संबंध दाखवायचा असल्यास गावामागे हा शब्द योजतात. उदा. मौजे ओणी, तरफ राजापूर. ६. तरफबंदी पद्धतीखालील जमिनींचा एक वर्ग. [फा. ]

**तरफ** स्त्री. वाद्याची तार. सारंगी, सतार इ. वाद्यांना स्वर भरण्यासाठी मुख्य तारांच्या खालच्या बाजूला लावलेली तार.

**तरफ** स्त्री. १. जड पदार्थ उचलण्यासाठी, हलवण्यासाठी त्याच्या खाली पहार इ.सारखा घातलेला दांडा; उच्चालक; उत्तोलनदंड. २. दार बंद करण्याकरता दाराच्या फळ्यांमागे घातलेला, गाडीच्या चाकाच्या गतीस प्रतिबंध करण्यासाठी घातलेला अडसर; अवरोधक.

**तरफडा** पु. धडपड; तिरपीट; धांदल. (ना.) पहा : **तडफड**

**तरफदार** पु. १. तरफेत असलेल्या गावांचा वसूल करणारा, त्यावर हुकमत चालविणारा अधिकारी. हा मामलतदाराच्या हाताखाली असतो. – वाडमा १.३. २. तरफ मधील जमिनीच्या विशिष्ट विभागाचा मालक. वि. पक्षपाती; कैवारी; दोस्त.

**तरफदारी** स्त्री. पक्षपात; कैवार; एखादी बाजू सावरून धरणे; वकिली.

**तरफबंदी** स्त्री. १. जमीन महसुलाची एक पद्धत. हिच्यानुसार गावातील शेतजमिनीचे मोठमोठे भाग पाडून एक एक भाग गावातील एकेका कुटुंबाला स्वतंत्रपणे लागवड करण्यास दिलेला असतो. २. शेताभोवती बांध, कुंपण घालणे.

**तरफसानी, तर्फसानी** पु. दुसरा पक्ष; प्रतिपक्ष; शत्रू : 'बद-अहदीची दर्याफ्त दोघां शरिकांनीं करून तरफ-सानीकडे नसीयत-पूर्वक सांगून पाठवावें.'– मइसा ७.३. [फा. तरफिसानी]

**तरबणे** सक्रि. थांबवणे. (बे.) [क. तरबु]

**तरबितर** क्रिवि. दाणादाण; इतस्तत:; उद्ध्वस्त : 'बाकी सरंजाम तरबितर करून सूर्योदयी मुकामास आले.'– इसंहोके पृ. ३. [फा.]

**तरबेज-त-द** वि. कुशल; वाकबगार; निष्णात; प्रवीण; निपुण. [फा.तर्बियत]

**तरम** पु. (मोजणी) जमिनींची प्रतबंदी ठरविणारा अधिकारी.

स्त्री. जमिनीची प्रत, दर्जा; जमिनीचा सारा, आकार; सारा आकारणी : 'तरम ठरवणाऱ्या मोजणी कारकुनाची गावकऱ्यांनी सरबराई न केल्यामुळे त्यानें चिडून जाऊन जिराईत जमिनीस बागाइताचा आकार लावून...'– खेया ३६. [फा. तरह्‌म]

**तरम-मा** न. पु. होडी समुद्रात ढकलताना, समुद्रातून किनाऱ्यावर काढताना उपयोगात आणावयाच्या लाकडी तुकड्यांपैकी एक. (राजा., कु.)

**तरमबंदी** स्त्री. मोजणीवरून ठरविलेली जमिनीची वर्गवारी; प्रतवारी.

**तरमुंडी-ड** स्त्री. गर्दीतून बाहेर पडण्यासाठी, गर्दीत घुसण्यासाठी डोके पुढे करून सर्व शरीरासह जोराने केलेला प्रवेश; तुटून पडणे; मुसंडी. (क्रि. देणे) :'भीष्म म्हणे भीम धरा द्याचि तुम्ही सर्व वीर तरमुंडी।'– मोभीष्म ५.४३. [हिं.]

**तरमूळपणे** अ. पूर्ण लक्ष न देता. – शर.

**तरमेवा** पु. फळफळावळ.

**तरल** वि. १. कांतिमान; चकचकीत. २. संवेदनशील.

**तरल** वि. १. हलणारे; कापणारे; कंप पावणारे. २. अस्थिर; चंचल; क्षणिक. ३. पातळ. ४. पोकळ. ५. चपळ; चलाख; सुटसुटीत; हलक्या अंगाचा; तरतरीत. [सं.]

**तरल** पु. माळेच्या मधला मणी; हार.

**तरवटा** पहा : **तरोटा**

**तरवड, तरोड** पु. एक वनस्पती; ह्या जातीत बऱ्याच वनस्पती, झाडेझुडपे यांचा समावेश होतो. फुलांचा उपयोग औषधी कामाकरता व कातडी रंगविण्यासाठी होतो. [सं. तरवट्ट]

**तरवडी** वि. तरवडापासून काढलेल्या रंगाने रंगविलेले कापड.

**तरवणी** न. आजाऱ्याला देण्याचे शिजविलेली डाळ व तांदूळ यांचे पाणी; पेज; कांजी.

**तरवणे** अक्रि. १. अतिशय उत्सुक, उत्कंठित होणे. २. आनंदभरित होणे. [सं. त्वरा]

**तरवा** पु. १. रोप, फुलझाडे, फळझाडे, धान्ये, भाजीपाला इ.चा दुसरीकडे

लावायला काढलेला रोपांचा पुंजका. २. रोप टाकण्यासाठी तयार केलेला वाफा; जमीन, फुलझाडे, फळझाडे, भाजीपाला लावण्याकरता भाजून तयार केलेल्या जमिनीचा तुकडा : 'कवल तोडून तरवा करावयास आ.'– मसाप २.२.१७९. ३. भाताचे रोप तयार करण्याची जागा.– शे ३.१. [सं. तरु; हिं. तरव]

**तरवा** पु. छत. – बदलापूर ३५.

**तर(ल)वार** स्त्री. युद्धोपयोगी एक शस्त्र; समशेर; खड्ग; मोठी कट्यार. हे शस्त्र धातूचे केलेले असून दोन किंवा अडीच फूट लांब असते. याच्या एका अगर दोन्ही बाजूंना धार असते. [सं.तरवा] ० **उपसून येणे** – चालून येणे; युद्धास, भांडणास सिद्ध होणे. ० **गाजवणे, करणे, मारणे**– (युद्धात ) पराक्रम दाखवणे; शूरपणाचे कृत्य करणे. ० **बांधणे** – एखाद्याशी शत्रुत्व, वैर पुकारणे : 'मी तुमचा फर्जंद. तुमचा उपकार मजवर बहुत आहे आणि तुम्ही मजवर तरवार बांधावी ही गोष्ट उत्तम नाही.'– पेद २ पृ. ९५. **तरवारीच्या धारेवर वागवणे, धरणे, चालवणे**– (एखाद्याला) कडक शिस्तीखाली ठेवणे; जरबेत ठेवणे. **तरवारी तरवार होणे**– खणाखणी होणे.

**तर(ल)वारबंद** वि. १. कमरेस तरवार लटकवलेला (मनुष्य). २. (ल.) नेहमी युद्धाला, भांडणाला तयार असलेला.

**तर(ल)वारबहाद (दू–द–द्दू)र** वि. १. युद्धात मर्दुमकी दाखविलेला; शूर; रणगाजी. २. (ल.उप.) तापट; भांडखोर; क्रूरकर्मा. ३.(उप.) पोकळ बढाया मारणारा; बढाईखोर. ४. (ल.) (एखाद्या विशिष्ट कार्यात, धंद्यात) नावाजलेला; प्रवीण.

**तरस** पु. १. लागलेपणा; आसक्ती. २. त्रास; कंटाळा; वीट :'मागां झाडाचा तरसु लागला'– लीचउ ४७०. (को.)

**तरस** पु. भय; भीती : 'हे बातेचा तरस मोहिबासारखे इबादती लोकांस न ये हें अज्याईब आहे.'– मइसा ३.९०. [फा. तर्स; सं. त्रस्]

**तरस** पु.न. एक मांसाहारी वन्य पशू. आकार कोल्ह्यासारखा, रंग करडा. अंगावर पट्टे. पुरलेली प्रेते उकरून खाण्यात हा पटाईत असतो. स्वभावाने भित्रा पण कावेबाज प्राणी. [सं. तरक्ष]

**तरसगांड्या** वि. (अशिष्ट) दिसायला भयंकर पण स्वभावाने भित्रा; भेकड.

**तरसट** पु. तिरस्कार. (व.)

**तरसणे** अक्रि. १. थकून जाणे; शिणणे; त्रस्त होणे; वेंगणे; जेरीस येणे पहा : **त्रासणे**. २. व्याकूळ, उत्कंठित होणे. [सं. तृष्; हिं. तरसना]

**तरसा–शा** पु. तारसा. खटाऱ्याच्या करळ्यांशी समांतर बसवलेल्या चपट्या अडवटांपैकी एक. हे खटाऱ्याला ३,४ किंवा ५ असतात.

**तरसा** पु. राग; त्रास; चिडखोरपणा : 'परंतु जाधवराव तरसे भरून पत्रें न मानितां जाब देऊ लागले.' – शामब भारतवर्ष ५०. [फा. तर्ष]

**तरसाट** पहा : **तिरसट**

**तरसाद** स्त्री. एक प्रकारची तरवार. (गो.) [पोर्तु. तरसादो]

**तरसाळे** न. तसराळे; घमेल्याच्या आकारासारखे पसरट व उथळ असे लहान भांडे; कटोरा.

**तरळ** पु. कच्च्या कैदेतील लोक ठेवण्याचा तुरुंगाचा भाग.– डोंग २.३६.

**तरळ–ळा, तरळमोडशी** स्त्री. अजीर्णाने होणारी हागओक; मोडशी; विषूचिका. पहा : **कुळीक** : 'हिंव ज्वर आणि तरळा। ओकिती वन्हाडिणी सकळा।'– ह २४.११. [सं. तरल]

**तरळ** वि. बद्द; बदबदीत; डबडबीत (मृदंगाचा आवाज).

**तरळ** पहा : **तरल** वि.

**तरळ, तरळकी** पहा : **तराळ, तराळकी**

**तरळणे** अक्रि. १.(दृष्टी, विचार, बुद्धी इ.) भांबावणे, चंचल होणे, भ्रमणे, चळणे, दिपणे : 'प्रमाणदिवेयांचेनि बंबाळें। पाता तरळैले वेदांचे डोळें। – शिव ९. २. चंचलपणाने भासणे; प्रकाशणे; चमकणे : 'कीं अकस्मात दृष्टी तरळली। तैसी ब्रह्मीं मूळमाया।'– स्वादि १३.२.९५. ३. खेळणे : 'जें इंद्रिया आणि बुद्धी। माझारिलिये संधीं। रजोगुणाच्या खांदीं। तरळत असे।'– ज्ञा १३.१०४. [सं.तरल]

**तरळणे** अक्रि. १. तरळ अजीर्ण, मोडशी होणे. २. (ल.) कंटाळा, वीट, किळस येणे; ओकारी येणे.

**तरळमेंढी** स्त्री. जोराचा रेच; अतिसार; हगवण.

**तरळीखोर** पु. गावचा महार कामगार.

**तरंग** पु. १. पाण्याची लाट, लहर; खळबळ; ऊर्मी. २. (ल.) अनियंत्रितपणाने मनात एकामागून एक उद्भवणाऱ्या विचारांपैकी प्रत्येक; क्षणिक विचार; नवी कल्पना, लहर. ३. पहा : **तवंग** १,२. ४. फुगा; बुडबुडा. ५. काष्ठ, घंटा, घुंगरू, जल इ. निरनिराळ्या पदार्थांवर अगर वस्तूंवर आघात करून त्याचे स्वरसप्तक बसवून निरनिराळे राग वाजवणे. [सं.]

**तरंग** न. पु. १. देवळातील देवतेच्या चिन्हाचा खांब; गुढी. (गो., कु.) २. अंगात देव संचारणाऱ्याने हातात घ्यावयाची काठी; धार्मिक समारंभातील एक उपकरण. हे मुसळासारखे असून त्यावर देवांची चित्रे काढलेली असतात. काही सणांत याच्या शेंड्याला बरीच लुगडी नेसवून तो नाचवतात. नाचवल्यावर अवसर येतो. तरंग घेण्याचा मान ठरावीक कुटुंबाकडे असतो :'आम्ही गांवकर लोकांनी नारळ फोडल्याविना देवीपुढं तरंग उभं राहतं तर पहा ?'– सह्याद्री ९२. [सं.]

**तरंगक** पु.(व. शा.) हरितलवकाच्या आवरणात, पीठिकेत असणारे चकत्यांसारखे कण.

**तरंगक** न. इंजिन नसलेले वायुयान. उदा. ग्लायडर.

**तरंगण** स्त्री. ऐसपैस मांडी घालून, अव्यवस्थित बसणे; फत्कल. (राजा.)

**तरंगणे** अक्रि. १. पाण्यात न बुडता केवळ पृष्ठभागावर राहणे; तरणे; पोहणे. २. (ल.) बहकणे; (बोलताना) वहावत जाणे; मुद्दा सोडून भलतेच बोलणे. ३. (एखाद्या व्यक्तीची, गोष्टीची) अपेक्षा धरून खोळंबून राहणे; तिष्ठत बसणे; वाट पाहत थांबणे : 'ज्याप्रमाणे वषट्काराचा घोष चालून इंद्रादि देवता सोमपानांविषयीं तरंगल्या असतां...'– नि ४१६. ७. दमणे; भागणे; थकणे : 'आमचीं घोडीं तरंगलीं आहेत.' – पेद ३०.२१६. [सं.तरंग]

**तरंगपट्टा** पु. (रेडिओ) ध्वनिलहरींचा पल्ला; तरंगपटल.

**तरंगमार्गदर्शक** पु. प्रकाशध्वनी किंवा विद्युत चुंबकीय प्रारणांच्या लहरीला विशिष्ट मार्गाने चालवण्यासाठी वापरले जाणारे साधन.

**तरंगलांबी** स्त्री. कोणत्याही तरंगाच्या लागोपाठ येणाऱ्या दोन उच्चतम वा

न्यूनतम बिंदूंतील अंतर.
**तरंगवणे** सक्रि. १. ताटकळत, खोळंबून ठेवणे. २. (कार्य इ.) लोंबकळत, भिजत ठेवणे. [सं. तृ, तरंग]
**तरंगाकार** वि. १. अत्यंत लहान. २. लाटेसारख्या खालीवर आकाराचा.
**तरंज** स्त्री. पहा : **तरंग** ३, ४
**तरंड** पु. १. वल्हे. २. तरंगण्यासाठी केलेला लाकडांचा ताफा. [सं.]
**तरंडक** पु. होडी. पहा : **तरंड** २ :'ब्रह्मण्य प्रभु दुर्गत दारिद्य-समुद्र-वर-तरंडक हो।'- मोवन ४.१३.
**तरंत** पु. बेडूक : 'जलधींत तरंत अपूर्व तसेचि म्हणोनि परोपरि सर्व तसे।' -आसेतु १२.
**तरा** पु. तलाव.
**तरा** पु. लाह्यांमधील न भाजलेला दाणा.
**तराई** स्त्री. डोंगराच्या पायथ्याशी असलेली दाट झाडीने युक्त सखल जमीन. [हिं.; सं. तरु+राजी]
**तराए** स्त्री. उत्कर्ष; बहर : 'चांदिनेयासि तराए जाली.'- शिव ६२७.
**तराक** स्त्री. (जरतारी धंदा) बादले (चपटे सूत) गुंडाळणारे पोलादी यंत्र; चाती; (इं) स्पिंडल.
पु. चातीवर काम करणारा मनुष्य.
**तराकणे** क्रि. तिरसटपणे वागणे.
**तराजू** स्त्री. पु. १. पदार्थांचे वजन करण्याचे साधन; ताजवा; तुला; काटा; तागडी. २. (तरफ) उच्चालकाचा एक प्रकार. [फा. तराझ़]
**तराटचे** अक्रि. मुसक्या बांधणे. (गो.)
**तराटणे** क्रि. भिणे; घाबरणे. (व.)
**तराठणे** अक्रि. ताठणे; तटाटणे; ताणले जाणे.
**तराठा** पु. १. (बोलण्यातील, वर्तनातील) ताठा, तोरा. २. वल्गना; बढाईयुक्त बडबड. ३. खरडपट्टी; खडसावणी. (क्रि. देणे.) [ध्व.]
**तराणा, तिलाणा** पु. (संगीत) तन, देरे, नारे अशा अक्षरांनी प्रबंध बांधलेली गायनातील एक सताल चीज. ही चीज अर्थहीन असते. जिभेस वळण देण्यासाठी प्रथम प्रथम हिचा उपयोग केला जात असे. पुढे ती गाण्याचाही प्रचार पडला. [फा. तराना]
**तराणी** स्त्री. तंबी; दटावणी; दपटशा. (कर.)
**तराणे** न. पहा : **तरण-णी** २
**तराफा** पु. मोठा ताफा; तरांडा. हा दोन बोटींवर घातलेला ताफा असतो.
**तराय** स्त्री. १. पद्धती; तऱ्हा : 'विवेका तराय जाली।'- उगी ४४. २. तेज; टवटवी : 'राज्य करिता कैवल्यपाळा तराय आली सकळकळा.'- मूप्र २१८. ३.बळ; सामर्थ्य : 'विवेका तराय जाली : प्रबोधा दसा उदैली.'- उगी ४४.
**तरार** वि. ढोंगी; खिसेकापू; लुच्चा; फसवा; तोतया.
**तरारणे** अक्रि. (तरतरणेचा अतिशय) फुगणे; ताठणे; तर्र होणे. [हिं.तरार]
**तरालू** न. गलबताचा एक प्रकार.
**तरावट** स्त्री. १. गुंगी; कैफ; मादक पदार्थाने येणारा अंमल. २. पगडा; अंमल; गुण. ३. तरतरी.(व.) पहा : **तारवट**
**तरावट** स्त्री. रोकड; नगद पैसा.(व.)
**तरावट** स्त्री. थंडाई; शीतलता; थंडपणा. [हिं.]
**तरावणे** अक्रि. बहरणे; वाढणे. (व.)
**तरावणे** न. हलवाई वगैरेंचे बांबूचे डमरूच्या आकाराचे घडवंचीसारखे, साधन (मालाचे ताट ठेवण्यासाठी उपयोगी); खोमचा.
**तरास** पु. (सोनाराचा) तराजू. (गो.) [क. तरासु]
**तरास, तरासणी** पु. स्त्री. (पत्यांच्या खेळात) १. पत्ते, गंजिफा इ.कांची गड्डी करणे; पत्तेकाट. (क्रि. करणे देणे). २. पत्ते, गंजिफा काटण्याची पाळी. [फा. तरांश]
**तरासणे** सक्रि. (पत्त्यांची, गंजिफांची गड्डी) काटणे. [हिं. तरासना]
**तराळ** वि. सावध.
**तरा(र)ळ** पु. १. महार, कोळी इ. हलक्या जातीचा व दर्जाचा गावकामगार. हा बारा बलुत्यांपैकी एक असतो. वेठ नेण्याचे व वाट दाखविण्याचे याचे काम असते; बिगारी. २. गस्तवाला; घरटीकार; फिरता पहारेकरी : 'मारौनि विवेकाचा तराळु।'- शिव ३०४. ३. (बऱ्याच ठिकाणी हे गस्तीचे काम महाराकडेच असते म्हणून) महार; गावकामगार : 'तेणें बोभाटें तराळ येउनि तयांते पुसति।'-पंच ५.१. [क. तलीर; ते.]
**तराळकी** स्त्री. तराळाचे काम; हमाली; वेठबिगारी : 'तराळकीचा वयधा नाहीं पाटिलकीचा तोरा।'- पला ८३.
**तराळी** स्त्री. खळ्यात धान्य झोडपताना दाणे इकडे तिकडे उडू नयेत म्हणून सभोवार घातलेले गवताच्या पेंढ्यांचे वेष्टण, वेढा.
**तरांडा** पु. झाडाची लांब व सरळ फांदी; सरळ सोट.
**तरांडे** न.१. जहाज; मोठे तारू; गलबत : 'गनिमाचे मुलखांतील साहुकारी तरांडीं दर्यांत असलिया कस्त करून घ्यावीं, धरून बंदरांत आणावीं.'- मराआ ३५. २. तोफा; पेटा : 'जयां आत्मनिवेदन तरांडें। आकळलें।'- ज्ञा ७.९८. [सं. तरण्ड]
**तरिका** पु. १. चाल; शिष्टाचार. २. सलोखा; सख्य : 'पंडित प्रधान व नबाब निजाम यांचा तरिका एक्लासीचा कदिमी पासोन चालत आला, हर्बाबे त्यासी जुदागी नाही.'- मइसा १०.१६५. [अर. तरीका]
**तरिया** स्त्री. खळगा.
**तरी, तरिया** स्त्री. नाव; होडी; नौका : 'तुज महामृत्यूचिया सागरीं। आतां हे त्रैलोक्यजीविताची तरी।'- ज्ञा ११.३४८. [सं. तृ]
**तरी** स्त्री. १. पहा : **तर**. २. जलमार्ग. ३. पाणी धरणारी जमीन; भातजमीन. [सं.; फा.]
**तरी** न. रेव; कचकच (अन्न, पोहे इ.तील). (राजा.) [क. तरि]
**तरी** उअ. १. तथापि; तसे असूनही. २. निदान; कमीत कमी. ३. तर : 'अशी तरि कृतज्ञता हरि तुझ्याच ठायीं अगा।'- केका ९९.४. म्हणून; त्यामुळे : 'आम्ही असो नृपसुते तरि कांचनाचे।'- र २५.
**तरीक साविक** जुन्या वहिवाटीप्रमाणे.
**तरीचा मक्ता** पैसे घेऊन तरीतून ने-आण करण्याचा एकाधिकार.
**तरु-रू** न. १. रोप; रोह : 'भाताचें तरु टाकीलें. - मइसा १०.२५९. २. उपटरोपा करण्यासाठी पेरलेला वाफा. पहा : **तरवा** [सं.]
पु. वृक्ष; झाड.

**तरुण** वि. तरणा; जवान; सामान्यपणे १९ ते ३५ वर्षे वयातील पुरुष. [सं.]
**तरुणी** स्त्री. तरुण स्त्री; युवती; सामान्यत १६ ते ३२ वर्षे वयोगटातील स्त्री. [सं.]
**तरोटा** पु. टाकळा. हा बंगाल व हिंदुस्थानच्या उष्ण भागांत दरवर्षी उगवतो. गजकर्ण व नायटे यांवर उपयोगी. याच्या बिया भाजून कॉफीच्या ऐवजी वापरतात.
**तरोळी** स्त्री. १. सखल जागा. २. लहानसे तळे; डबके. (व.)
**तर्क** पु. १. तर्कशास्त्र; न्यायशास्त्र; प्रत्यक्ष, अनुमान इ. प्रमाणांवरून पदार्थाचा निर्णय समजण्याची विद्या. २. अटकळणे; अनुमानाने जाणणे, ताडणे. ३. अनुमान, सिद्धान्त (क्रि. करणे, बांधणे); अनुमिती. ४. लक्षणदर्शनावरून झालेले एखाद्या पदार्थाचे, गोष्टीचे ज्ञान, कल्पना; अनुमान : 'अविद्या नाशी तर्का। तैसें होये।'– अमृ ६.४५. ५. पूर्वलक्षणांवरून भावी गोष्टीचा केलेला अंदाज, अजमास, अटकळ. ६. अक्कल; बुद्धी; मती. ७. कुकल्पना; मूर्खपणाचा विचार, कल्पना, युक्ती. ८. (ल.) खबर; वर्तमान; वृत्त : 'कोठें तरी कृष्ण लपवावा। बाहेर तर्क कळो न द्यावा।' – ह ३.१७२. [सं.]
**तर्ककर्कश** वि. अगदी तर्काला धरून; काटेकोर.
**तर्कट** न. १. (एखाद्यावर खोटा आळ घेण्यासाठी रचलेले) कुभांड; कुलंगडे; लचांड; किटाळ. (क्रि. घेणे, सांगणे.). २. वेडावाकडा तर्क, कल्पना.
**तर्कटपणा** पु. बनावटपणा; कुतर्कवृत्ती.
**तर्कटी** वि. १. कुभांडखोर; कंड्या पिकवणारा; बालंटखोर. २. बुद्धिमान; कल्पक. (गो.)
**तर्कणे** अक्रि. भ्रमिष्टपणाने वागणे [सं.त्रंक्]
**तर्कणे** उक्रि. अटकळ करणे; संशय येणे. [सं.तर्क]
**तर्कदुष्ट** वि. तर्काला न पटणारे : 'तींच मुळांत काल्पनिक आणि तर्कदुष्ट आहेत.'– के २.९.१९३८. [सं.]
**तर्की** वि. १. नैयायिक; तर्कशास्त्रज्ञ. २. मार्मिक; धूर्त; मर्मज्ञ.
**तर्जणे** सक्रि. १. तुच्छ मानणे; धिक्कारणे : 'सहस्त्रबाहू अर्जुन। जो प्रख्यात तो तर्जुन।'– मोरा घनाक्षरी रामायण ९९. २. सोडणे; टाकणे; त्यजणे : 'अजोनि कां न तर्जी प्राणु।'– ख्रिपु २.४७.१४. [सं. तर्ज्]
**तर्जणे** अक्रि. गर्जणे.
**तर्जनी** स्त्री. १. हाताचे अंगठ्याजवळचे बोट. २. तर्जनीत घालण्याची एक प्रकारची अंगठी. (तंजा.)
**तर्जुचे** सक्रि. १. पारखणे; अंदाजणे. २. उमगणे; समजणे. (गो.)
**तर्णक** न. वासरू; वत्स. [सं.]
**तर्पण** न. लाह्यांचे पीठ.
**तर्पण** न. १. तृप्त, संतुष्ट करणे; इच्छा पुरवणे. २. तृप्ती; समाधान; संतोष; संतुष्टता. ३. रेलचेल; परिपूर्ती; अतितृप्ती; धालेपणा. ४. (धर्मशास्त्र) नित्याच्या ब्रह्मयज्ञात अथवा श्राद्ध वगैरे विशिष्ट कर्मात देव, ऋषी व पितर यांना उद्देशून पाणी देण्याचा विधी. ५. (वैद्यक.) डोळे इ.तं (तूप इ. औषधी द्रव्ये) भरपूर घालणे. [सं.]
**तर्पण्या** वि. (ल.) कृपण; कंजूष; कद्रू.
**तर्पिणे** उक्रि. संतोषवणे; तृप्त, खूष करणे, होणे. [सं. तर्पण]
**तर्बड** स्त्री. चपळता. (झाडी)
**तर्मुंड** न. १. पहा : **तरमुंडी–ड.** २. लुडबुड.
वि. डोके खुपसणारा; लुडबुड्या : 'जाला तोंडाळ तर्मुंड। महापाषांडी।'– दास ५.३.७६.
**तऱ्या** पु. होडीवाला; नावाडी.
**तऱ्यापोती** वि. अगदी सहज फाटणारे (पान इ.). (गो.) [ध्व.टर्]
**तर्र** क्रिवि. तट्ट; अतिशय तरारेल अशा रीतीने फुगून तट्ट होईपर्यंत; फुटेपर्यंत; जागा न राहण्याजोगे (भरणे, पोट,फोड इ. फुगणे). [ध्व.]
वि. जोराचा. (व.)
**तर्रबत्तर** वि. विसंगत; भलतेच.
**तर्राठ** वि. तीक्ष्ण. (माळवी)
**तर्राड तोडनं** त्रास देणे.(अहि.)
**तर्लुक, तल्लुक** स्त्री. माडांच्या राखणीची मजुरी, रखवाली. [सं.तल+कुल; हिं. तर्कुल]
**तऱ्हा** पु. १. किल्ले जिंकताना तटाला लावण्याचे शिड्या वगैरे सामान. २. लाकडी किंवा लोखंडी खांब साखळ्यांनी किंवा हुकांनी जोडून सैनिकांसाठी केलेला जाळीवजा किंवा तटवजा आडोसा. (या 'तऱ्हा' शब्दावरून मराठी लष्करी परिभाषेतील तऱ्हांगण किंवा तारांगण हा शब्द निर्माण झाला.– आयर्विन पृ. १४५.)
**तऱ्हा** स्त्री. १. प्रकार; भेद; जात. २. रीत; पद्धत; मार्ग : 'आमची पल्ल्याची तऱ्हे आपण कहाडतील, ती कांहीं दिसोन आली नाहीं.' – मइसा १२.११५. ३. (ल.) परिणाम; शेवट : 'पण त्या दोघांच्या दोन तऱ्हा झाल्या.'– इंप ५८. [अर.तर्ह] (वा.) **तऱ्हा–तऱ्हा करणे**– १. अतिशय मनस्वी चेष्टा, चाळे, ढंग करणे. २. (कर्माची षष्ठी) (एखाद्याला) अनेक प्रकारांनी छळणे, त्रास देणे; (एखाद्याची) कुचेष्टा करणे. ० **देणे** – १. बदल करणे. २. रद्द करणे : 'जुन्या अंमलास तऱ्हा द्यावी तरी म्या स्वतसिद्ध खावंद नाही.' – पेद ३३, पृ. १८७. ३. सर्वस्वावर पाणी सोडणे : 'आपले वतन आपले सांभाली व्हावे म्हणोन सर्वस्वास तऱ्हा दिली आणि इकडे आल्यानंतर लेहून पाठविले.'– शिचसाखं ४, पृ. ८०. **तऱ्हेस जाणे** – विक्षिप्त, चमत्कारिक बनणे; स्वैरपणाने, विलक्षण रीतीने, स्वतःच्या लहरीने वागणे. **तऱ्हेस, तऱ्हे देणे**– (एखाद्यास) बेफामपणे, उच्छृंखलपणे, स्वैरपणे, चमत्कारिक रीतीने वागण्यास प्रवृत्त करणे. **तऱ्हेस, तऱ्ही भरणे, तऱ्हेस पेटणे** - भलत्याच गोष्टीच्या नादी लागणे; हट्टास पेटणे; हट्टाची लहर येणे : 'तऱ्हे भरोंच नये। सुचावे नाना उपाये।' – दास ११.५.
**तऱ्हाण** न. (पाणी, चिखल, मूत्र, रक्त इ. इकडेतिकडे सांडल्याने होणारी) घाण; दुर्गंधी; रेवड; ढाण.
**तऱ्हातऱ्ही** वि. नाना तऱ्हेचा; विविध; निरनिराळ्या प्रकारचा : 'वीस पंचवीस तोफा नीं तऱ्हातऱ्ही येणेंप्रमाणें नबाबानें पाठवावें.'– ऐलेसं ८७५. [तऱ्हा द्वि.]
**तऱ्हावणे** अक्रि. तरंगणे. (को.)
**तऱ्हेचा, तरतऱ्हेचा, तऱ्हेदार** वि. १. अपूर्व; विलक्षण; नव्या, विशेष

प्रकारचा; नवलाईचा : 'हातांत जर्मनसिल्व्हरच्या झाकणाची तऱ्हेदार दौत घेतलेली आहे.'– सुदे ३०. २. सुंदर; सुरेख; देखणा : 'पान्दान चांगले तऱ्हेदार आहे.'– मइसा ३.४८७.

**तऱ्हे देनं** सक्रि. दुर्लक्ष, कानाडोळा करणे. (अहि.)

**तऱ्हेबाज–खोर** वि. १. तऱ्हेवाईक; चमत्कारिक स्वभावाचा (मनुष्य). २. लहरी; स्वच्छंदी; छांदिष्ट : 'तऱ्हेबाज ती अर्धीच खिलाडू नवऱ्याच्या गोष्टी ऐकून ।'– पला ७८.

**तऱ्हेवाईक, तऱ्हेवार** वि. १. विशिष्ट तऱ्हेचा. २. चमत्कारिक; विलक्षण; विचित्र; विक्षिप्त (व्यक्ती, वस्तू). ३. अपूर्व; अप्रतिम; नवीन तऱ्हेचा. ४. (ल.) सुंदर; दिखाऊ. [फा.]

**तल** न. १. तळ; बूड; आतील, खालचा भाग. २. जमीन; भूमी. ३. (समासात) (एखाद्या अवयवाचा, वस्तूचा) पसरट, सपाट भाग; पृष्ठभाग; तळवा. उदा. पदतल, करतल. ४. (भूमिति.) सपाटी; पातळी; पृष्ठभाग. [सं.]

**तलखली** स्त्री. १. ताप आल्याने होणारी आग; तरफड. २. (मनाची) उत्कंठा; उत्साह; अधीरता. ३. मानसिक अस्वस्थता; अशांती; तळमळ; मनस्ताप.

**तलखल्या** वि. पहा : **तल्ल(ल)ख** २,४

**तलखी, तलखाई, तल्खी** स्त्री. १. (पदार्थांचा, तपकिरीचा, मसाल्याच्या द्रव्यांचा) तिखटपणा; जहालपणा; जलाली; तीव्रता; कडकपणा. २. (सूर्य, अग्नी इ.कांच्या) उष्णतेची तीव्रता; जालीमपणा; जलाली; उष्मा; उकाडा. ३. पहा : **तलखली** १. ४. (ल.) तापटपणा; कडकपणा; कचका; तलखपणा : 'तलखी सोडून शांतता धरून वर्तावें.'– ऐलेसं २.४७९. [फा. तल्खी]

**तलग** क्रिवि. तेथपर्यंत; तोपर्यंत : 'बाजतबोलाऊ पाठऊ तेव्हा स्वार होऊन येणे. तलग सितावी न करणे.'– ऐको.

**तलग** पु. प्रेम.
वि. प्रेमळ.– मनको.

**तलग** न. १. पिलू; बालक : 'जैसें शारदियेचे चंद्रकळे । माजीं अमृतकण कोंवळें । ते वेंचिती मनें मवाळें । चकोरतलगें ।'– ज्ञा १.५६. २. कोंबडीचे पिल्लू. हें आरवत नाही.– बदलापूर ४९२. (कु.,गो.)
वि. लहान; अल्लड (स्त्री, पुरुष) : 'तंव त्या तलगा गौळणी नारी ।'– निगा ४२.

**तल(लं)गी** स्त्री. १. अंडी घालण्याच्या वयात न आलेली कोंबडी. (माण.) २. तरुणी.

**तलदर्शिका** स्त्री. (वस्तु.) कोणत्याही ठिकाणाची समुद्रसपाटीपासूनची उंची मोजण्याचे यंत्र.

**तलपत** स्त्री. माफी किंवा नाममात्र साऱ्याची जमीन सोडून जिच्यावर सरकारी सारा पूर्ण किंवा अंशत: बसवलेला असेल अशी जमीन : 'सरकार तलपतचा कापूस सरकारांत दरोबस्त कापूस पाहिजे असें लोकांचें म्हणणें.'– पेद ३९.१४८. [गु.]

**तलपी आप्पा** गावचा तलाठी. (अहि.)

**तलपुष्पपुटकरण** न. (नृत्य.) उजव्या पायाची बोटे जमिनीवर टेकून त्यावर उभे रहावे व उजव्या हाताची बोटे वर एकमेकांना चिकटवून तळहात खोलगट करून हातांचीही बोटे वर करावीत. नंतर त्या हाताच्या तळहातावर दुसऱ्या हातांची बोटे चिकटवून ठेवावीत व दोन्ही हात डाव्या बाजूला ठेवावेत. डावी बाजू किंचित वाकवावी अशी कृती. [सं.]

**तलफ** न. दाराचे झडप, फळी.

**तलफ** स्त्री. गंजिफाच्या खेळातील एक पारिभाषिक शब्द. दुसऱ्याच्या हातातील वजीर इ.पडून आपल्या हातातील एक्का, दुव्वा इ.पाने हुकूम करण्याकरिता त्या रंगाचे पान आपल्याजवळ नसल्यास आपण जे पान पालथे टाकतो, त्याला तलफ म्हणतात; उपडपानी देणी. [अर.तलफ़]

**तल(ल्ल)फ** पहा : **तलब** १,२

**तलफी–बी** वि. अंमली; शौकी; कैफी; व्यसनी.

**तलफ** वि. उद्ध्वस्त; बेचिराख; ओसाड : 'मुऱ्हारी जगदेवराव सुभा येऊन पुणे जाळून लुटून तलफ केलें.– इमं ५६. [अर.तलफ़]

**तलब** स्त्री. १. वाईट व्यसन; खोड; चटक; चट. २. व्यसनी मनुष्याला होणारी व्यसनाच्या पदार्थांच्या सेवनाची तीव्र इच्छा; हुकी. ३. पगार; तनखा; मजुरी; मुशाहिरा; तुंबलेला पगार. ४. सावकाराने, सरकारने कुळाकडे केलेली पैशाची, वसुलाची मागणी; तगादा : 'अविंदाचें राज्य बेदरीं असतां । कागद पाहतां तलब केली ।'– तुगा ४४५६. ५. सरकारी बोलावणे; हजर राहण्याबद्दलचा हुकूम : 'बोलाविलें तैं करोनि तलब ।'– दावि २०२. ६. समन्स बजावणाऱ्या, वसुलाचा तगादा करणाऱ्या शिपायाचा रोजमुरा, मजुरी. ७. (सामा.) बोलावण्याची क्रिया; आमंत्रण; बोलावणे. ८. वरात; मागणी : 'त्यास आपली तलब रुपये एक हजार.'– वाडबाबा १४१. [अर.तलब्]

**तलबदार** वि. १. पहा : **तलफी–बी**. २. पगारदार. ३. पैशाची, वसुलाची मागणी, तगादा करणारा. ४. चौकशी करणारा.

**तलबाना, तल्बाना** पु. १. वसुलाचा तगादा करणाऱ्या सरकारी शिपायाला कुलाने द्यावयाचा भत्ता, रोजमुरा; तगाद्याची दस्तुरी : 'नजराणा व तलबाना वगैरे कुलबाब पाहिजे.'– वाडबाबा १.४९. २. (सामा.) रोजमुरा; पगार; मुशाहिरा : 'सोळा रोज प्रत्यह तल्बाना गाडदी यांस द्यावा लागतो.'– मइसा १.४४४. [फा. तल्बाना]

**तलम** वि. १. बारीक व मृदू (सूत इ.). २. बारीक विणीचे व मृदू सुताचे; फार पातळ (वस्त्र इ.). ३. नाजूक; सुकुमार; पोशाखी (प्रकृती इ.). [ते. तरमु; ता. तेरिम]

**तलमई** स्त्री. (कापड, सूत इ.कांचा) बारीकपणा; तलमपणा.

**तलमुख (संयुक्तहस्त) क्रिया** स्त्री. (नृत्य.) चतुरकहस्त या क्रियेतील हाताच्या बोटाखाली असलेला अंगठा दूर करीत–करीत हंसपक्ष हात करणे. मग ते दोन्ही हात शरीराच्या आड न येता तळहात परस्परांच्या समोर येतील असे ठेवणे ही क्रिया.

**तलमूल्य** न. किमान किंमत.

**तलयारी** पु. पोलीसपाटील. (तंजा.)

**तलवा** न. मागणी. (व.)

**तलवार, तलवारबहादर** पहा : **तरवार** इ.

**तलवी** वि. सवकलेला; लंपट.

**तलसंस्फोटितकरण** न. (नृत्य.) उजवा पाय भराभर उचलून पुढच्या बाजूला खाली आपटणे व टाळ्या वाजविणे.

**तलस्पर्शी मुलाखत** (मा. शा.) मनोविकाराचे मूळ शोधण्यासाठी घेतलेली मनोविश्लेषणात्मक मुलाखत.

**तलहेटी** स्त्री. जवळचा प्रदेश : 'शिखानीं दिल्लीचे तलहेटीत अंतरवेदीत महालोमहाली रखी घेत असतात.'– मर्शियांका पृ. ४९४.

**तलाख** स्त्री. शाप; शिवी : 'जो कोणी लिहिल्याप्रमाणें न ऐके त्याजला शपथ असे, त्याचे आईवर तलाख असे.'– ब्रच १२. [अर. तलक]

**तलाठी, तलाठदार** पु. सरकारी वसूल गोळा करणारा गावकामगार, कुळकर्णी. [गु. तलाटी]

**तलातल** न. १. सप्तपाताळांपैकी चौथे. २. द्वंद्वयुद्धातील एक प्रकार. यात एकमेकांच्या तळहातावर तळहातांनी प्रहार करतात.

**तलाली** स्त्री. चैतन्य; उत्साह; ताजेपणा. (अहि.)

**तलालोरी** वि. तालबद्ध; सुरेल : 'पावा बाहे तलालोरी नादु उमटे अंबरी।'– ज्ञागा ३६१.

**तलाव** पु. देवप्रतिष्ठेजवळ एक रांगोळीने काढलेला चौक. या चौकात वर आपले बाशिंग काढून ठेवतो व विवाहानंतर तीन दिवस वधूवर त्या चौकात निजतात.

**तलाव** पु. मोठे तळे; सरोवर. [फा. तलाव्, तालाब्]

**तलावडी** स्त्री. लहान तलाव; तळी : 'मोठी खाइ दिवसेंदिवस गुदरल्यावरी पडून अल्पस्वल्प तलावडीच झाली.'– शिदि ७४.

**तलावत** वि. घोड्यावर बसणाऱ्याचा पाय भोवऱ्याला लागतो असा भोवरा असलेला (घोडा).– मसाप २.१.५८.

**तलावा, तिलाय** पु. १. टेहळणी; पहारा; गस्त : 'बारीपलीकडे तलाव्यास फौज रवाना केली.'– ऐलेसं ८.३९११. २. फिरणे; फेरफटका. ३. टेहळणी करीत फिरणारी सैन्याची तुकडी : 'तलावा आला तिकडून पेशव्यांचा।'– ऐपो २७६.

क्रिवि. टेहळणी करीत : 'अलाहिदा लस्केर घेउनु तलावा फिरों लागलें.– इमं ९. [तु. तुलावा; फा. तलाया]

**तलाश–स** पु. १. (एखाद्या गोष्टीचा, मनुष्याचा) शोध लावण्यासाठी केलेला प्रयत्न; चौकशी; तपास : 'चांगले मर्द झुंजाचे उपयोगी पडे याप्रमाणें तलाश करून ठेऊन पाठविणें.'– मइसा १.२७९. २. अशा प्रयत्नाने लागलेला शोध, पत्ता; मागमूस; तपास. [फा. तलाश्]

**तलाशी–सी** वि. हरवलेल्या वस्तूंचा शोध करण्याचें ज्याचें काम आहे असा (मनुष्य). [फा. तलाश]

**तली चिठ्ठी** वळीखोरांनी किंवा दावेदारांनी 'तुमचा गाव लुटणार' अशाविषयी वेशीवर किंवा गावदेवाचे गळयात बांधलेली जाहीरनामावजा चिठ्ठी : 'इंग्रजी तालोकेत देखील तली चिठ्ठी बांधल्या होत्या.'– ऐको.

**तलुग** न. संधान; लालूच. – शर.

**तल्कमा** पु. ताज्या दमाच्या तुकड्यांनी एका पाठोपाठ शत्रूवर हल्ला करून त्याला नामोहरम करण्याचा एक प्रकार.

**तल्पकी** वि. व्यभिचारी;मातेशी किंवा मातेसमान स्त्रीशी अनैतिक संबंध ठेवणारा; मात्रागमनी : 'कृतघ्न तल्पकी नारकी। आतित्याई जल्पक। – दास २.२.२६. [सं. तल्पग]

**तल्पठाण** न. शरीराचा गुह्यभाग. [सं. तल्पस्थान]

**तल्क–ख** स्त्री. शपथ; तलाख : 'फत्तेसिंगमांनी यांणीं तल्क लिहून पाठविली। अशी लढाई करा म्हणावें मागें मोहरें नाहीं जाहली।'– अफला ४४.

**तल्ल(ल)ख** वि. १. तिखट; जहाल; कडक; तीक्ष्ण. २. चलाख; आवेशाने काम करणारा; चपळ. ३. (दारूकाम) एकदम जळणारा (तारा) : 'हवयांची दारू अंमळ मंद जळणारी व तारे तलख असावे लागतात.'– अग्निक्रीडा ११. ४. तामसी; रागीट; तापट. ५. करारी; बाणेदार.

**तल्ला** पु. चपलेचा तळवा. (झाडी)

**तल्लाक** पु. १. पहा : **तलाख**. २. घटस्फोट; काडीमोड. ३. शपथ; आणेगा. (क्रि. घालणे, असणे, सुटणे, मोडणे.) [अर. तलक्]

**तल्ली** स्त्री. लहान मुलांच्या पायात घालण्याचा रुपेरी दागिना; तोरडी. (गो .)

**तल्लीन** वि. (एखाद्या गोष्टीत, विषयात) निमग्न; गुंग; दंग; एकरूप.[सं.]

**तल्लु, तोल्ल** पु. माडांचा राखणदार. (गो.)

**तल्हातणे** सक्रि. हाताने चेपणे.

**त(तं)व, तवई** स्त्री. (पित्तादिकामुळे येणारी) तिरमिरी; घेरी; मूर्च्छा; बेशुद्धी; भोवळ; तवा (क्रि. येणे) : 'धनुष्या घालितां कव। झोक गेला आली तव। रावणासी।'– मध्व ३७; 'जनकोजी शिंदे यांस तवई येऊन घोड्याखालीं आलें– भाव ६४. [सं. तमस्]

**तव** पु. ताप.

**तव** पु. स्त्री. १. पापुद्रा; पातळ पदर; थर; तवंग. २. (डोळ्यावर येणारा) सारा; भुरी. [सं. तवस्]

**तव** सना. तुझा : 'कैकेयनृपभ्राते दोघे त्यांतील एक तव पक्ष।'– मोकर्ण ४.११. [सं.]

**त(तं)व** क्रिवि. १. तेव्हा; तो : 'तंव के नारदु भणे।'– शिव १२६. २. तोपर्यंत; जंव याचे अनुयोगी : 'कृतांत शिवला नसे तंव दिसे बरें पावणें।'– केका ४७. ३. तर या अर्थी पादपूरणार्थक अव्यय : 'देह तंव पांचांचें जालें। हें कर्माचे गुणीं गुंथलें।'– ज्ञा १३.११.२. [सं. तावत्, तदा]

**तवई** स्त्री. एक प्रकारचे मातीचे भांडे; मातीचा लहान तवा.

**तवई** स्त्री. संकट; विपत्ती; विपत्काल; नाश : 'सदाशिवपन्तावर मोठा तवईचा वक्त गुजरला.'– पाव १४.

**तवक–का** पु. १. रागाचा आवेश; त्वेष; संतापाचा आवेग : 'रक्षावा प्राग्ज्योतिष ऐसें बोलोनि वृद्ध तवकानें।'– मोभीष्म ५.५७. २. आवेश; जोर; शक्ती; सामर्थ्य : 'आला धांवुनि जांबुवंत तवकें झुंजावया लागला।'– अकक ३ कृष्णकौतुक ५७. [सं.तवस्–तपक]

**तवकणे** अक्रि. कोपाविष्ट, त्वेषयुक्त होणे : 'हो कां जे महाकल्पाचिया अंतीं। तवकलेनि यमें जेउत तेउतीं।'– ज्ञा ११.३४२.

**तवक(कू)ल** स्त्री. न. १. ईश्वराच्या ठिकाणी निष्ठा; ईश्वराचा भरवसा,

आधार : 'आमची तवकल श्रीवरी! कोणेही गोष्टीची फिकीर नाहीं.'- ऐलेसं १.१४२; 'खुदावर तवकूल ठेवून रघुनाथराव यांचे तम्बीचा इरादा केला.'- मइसा ५.८६. २. (सामा.) भरवसा; उमेद; आशा. ३. साहस; कचाट; जोखमीचे कृत्य. [अर.तवक्कुल]

**तवका** पु. १. पहा : **तवक-का** २. २. धैर्य; धीर : ' अधपलीं तवकें । इंद्रियें धरिलीं । - ज्ञा १२.४६. ३. क्रोध; संताप.

**तवकी(खी)र** न. १. बांबू, गहू, तांदूळ, जव इ.पासून काढलेले सत्त्व. २. आरारूटच्या कांद्याच्या बलकापासून काढलेले सत्त्व.[अर. तबाशीर]

**तवट** न. धैर्य; धीर : 'घाये बांधले ने तवटें। आपुला सारथी सावद् केला।'- उषा १४१७.

**तवणा** पु. चरकात घालण्यासाठी केलेली उसाची कांडी; त्यांची रास.

**तवतवणे** अक्रि. (अनेक किचकट कामे अंगावर पडल्याने) कातवणे; चिडणे; जिकिरीस येणे; चरफडणे. [तव द्वि.]

**तवताला** पु. तपासणी; रुजुवात; परीक्षण : 'हिसेब आज तागाईत निवडून तवताला करून पाठवावा.'- पेद २४.१४९. [ताळा, ताल द्वि.]

**तवतुक** स्त्री. त्वरा; लगबग; जलदी. (कर.) (वा.) **० होणे** - (ल.) कामी येणे; मरणे : 'राणोजी शिंदे यांचे तिघे खासे पुत्र श्रीमंतांचे नोकरीत तवतुक जाहले.'- ऐको.

क्रिवि. लगबगीने; जलदीने; त्वरित.

**तवना(णा)स** वि. उधळ्या; उच्छृंखल; कोणाचाही दाब नसलेला. (गो.)

**तवनी-णी** स्त्री. शक्ती देणारे अन्न; पेज; कांजी : 'जो पुरवी ब्रह्मविद्येची तवनी।'- भाए ४.

**तवनी** स्त्री. १. तावनी; दूध तापविण्याचे भांडे. २. (ल.) पीडा : 'ते आजन्म दुःखकाळिची तवनी। छेदक शस्त्र जे।- ज्ञाप्र २७.[सं. तपन]

**तवर** पहा : **तव** पु.स्त्री.

**तवर** पु. अंकुर; कोवळा कोंब; झाडाचा मोहोर. (गो.) [फा. तोवर]

**तवर** पु. १. वीरश्री; आवेश. (क्रि. धरणे, बाळगणे) : 'उमतीचा तवर केली झड घालुन तलवार।'- पला ७९. २. जोम; पाणी; तेज : 'शहर पुण्याच्या भररस्त्यामध्ये भरनवतीचा तवर नवा।'- पला ४.१२. ३. पहा : **तऊर** १,२ [अर. तहव्वुर]

**तवर** क्रिवि.पहा : **तोवर** :'तंवरी रे तंवरी भवगजाचें भान।'- दावि १४९.

**तवरी** वि. १. तापट; रागीट. २. तिरसट; कुर्रेबाज. ३. धाडसी; आवेशाने, वीरश्रीने युक्त.

**तवरे** न. कथील; टीन; निकेल. (गो.)

**तवली,तवला** स्त्री. पु.१. धातूचे, मातीचे पसरट आकाराचे थाळीसारखे भांडे.(खा., व., बे.) पहा : **टवळी-ळे**. २. मडके; तपेली. ३. तवा; कढई. (गो.) [सं. तापक]

**तवली** स्त्री. टवका पाडून नारळाला पाडलेले भोक.

**तवले** न. १. डोके. (गो.) २. लहान तवली.

**तवल्ला** पु. फुटके मडके. (झाडी)

**तवशी, तवशीण** स्त्री. तवशाचा,पावसाळी काकडीचा वेल.[सं. त्रपुषी]

**तवशे-से** न. १. तवशीचे फळ; मोठी व लांबट काकडी. ही आश्विन महिन्यात होते.२. पहा : **तवसोळी**

**तवस(सो)ळी** स्त्री. तवशाचा, काकडीचा कीस, तांदळाचे पीठ व गूळ घालून केलेले पकान्न. पहा : **पातोळा**

**तवसाड-ळ** स्त्री. एक प्रकारचे भात; तांदळाची एक जात. (को., कु.)

**तवंग** पु. १. पाण्यावर येणारा, पसरणारा (तेल इ. काचा) पातळ थर; तरंग; कोशेटा. २. डोळ्यांत येणारा भुरीचा पापुद्रा; सारा . ३. पूल.

**तवंग** पु. उंच माचा : 'तेथ तवंगी कृष्ण बैठला.'- कला १५.

**तवंगट** वि. विविध तवंगांनी युक्त.

**तवा** पु. १. पोळ्या, भाकरी इ. भाजण्याचे धातूचे, मातीचे वर्तुळाकार पसरट असे भांडे. २. काठ व पदर वगळून शेला, शालजोडी इ. वस्त्रांचा मधला भाग; वस्त्राचे भाग. ३. (ल.) एकसारखा सपाट व विस्तीर्ण पातळ खडक; कातळ. ४. वृक्ष, उंचवटे, खाचखळगे इ.नी विरहित असा भूप्रदेश; सपाट जमीन. ५. कोंदणासाठी रत्नाच्या खाली बसवण्याचा सोने, चांदी इ. धातूचा पत्रा; तकट. ६. दौलताबाद येथील किल्ल्यातील काढता घालता येणारा पूल; उभ्या चढणीवर जिन्याच्या तोंडाशी बसवलेले तव्याच्या आकाराचे लोखंडी झाकण. शत्रूला येता येऊ नये म्हणून याच्यावर विस्तव घालीत. ७. नाला, गटार ओलांडण्यासाठी घातलेला पुलासारखा लोखंडी पत्रा. [हिं.]

**तवा** स्त्री. मूर्च्छा; घेरी; तव्हारी.

**तवाई** स्त्री. १. दंड, भुर्दंड. (क्रि. पडणे, भरणे, येणे). २. (व्यापार, व्यवहारातील) नुकसान; तूट; बूड; खोट : 'आम्ही किती दिवस तवाई सोसावी.'- ऐलेसं १२.६२७७. ३. संकट; तवई. [फा.]

**तवाका** पु. गळेबंद. पहा : **तोक** : 'पायांत बेडी व गळ्यांत तवाका घालून कैदेंत ठेविले.' - ममंब ११. [अर. तौक़]

**तवाका** पु. पहा : **तकवा**

**तवाजा-जू** पु. १. बक्षीस; इनाम; नेमणूक : 'त्यांनी दहा लक्षांची जहागीर तवाजा करून समजावीश केली.'- मइसा ५.२९. २. सभ्य, अदबीचे, आदरयुक्त वर्तन. ३. (चुकीने रूढ) (मुले, गुरे इ.कांची) जोपासना; निगा. [अर.तवाझ]

**तवातोबरा** पु. १. (ल.) प्रवासाला आवश्यक सामुग्री, सामान; प्रवासाचे साहित्य. २. निर्वाह; उपजीविका : 'इकडे उत्पन्न झाल्यास तवा-तोबरा, न जाल्यास फाका.'- होकै १०५.

**तवानणे** अक्रि. १. (दुखण्यातून उठल्यानंतर) पूर्ववत निरोगी होणे. २. सशक्त, निरोगी बनणे; सुदृढ होणे. ३. तवाना, हुषार होणे.

**तवाना** वि. १. आजारातून उठल्यावर, अशक्तपणा गेल्यावर निरोगी किंवा सशक्त झालेला. २. सशक्त; सुदृढ.३. ताज्या दमाचा; हुशार.

**तवानी, तवानी तलफ** स्त्री. गंजिफांच्या खेळातील एक पारिभाषिक शब्द. राजकी देणी नसल्यास व पडचोर हुकूम करावयाचा असल्यास प्रथम नातवानी देणी दिल्यानंतर तवानी देणी द्यावयाची असते.[फा.]

**तवाफा** पु. कलावंतिणीचा ताफा : 'बागातच भोजन करून प्रहररात्रपर्यंत तवाफाचा नाच पाहून हवेलीस गेले.'- पुणे अखबार भाग ९, पृ. १०५.

**तवायफ** स्त्री. कलावंतीण; गाणे- बजावणे करून मनोरंजन करण्याचा व्यवसाय असणारी स्त्री. [फा.]

**तवारी** स्त्री. चांभाराचे एक हत्यार.(कु.)

**तवारीखनामा** पु. इतिहासग्रंथ : 'अगर मुसल्मान कोणी असे तरी मोठेमोठे तवारीखनामे जाले असते.'– ऐटि १.१८. [फा.]
**तवी** स्त्री. एका विशिष्ट आकाराचे धातूचे, मातीचे भांडे. पहा : **तवली**
**तवें** क्रिवि. तेव्हा, त्याचवेळी : 'तवें तया कृष्णा मनी मग वाटल विस्मय' – गीताचंद्रिका १.२७.
**तव्हारी** स्त्री. मूर्च्छा : 'थोड्याशा माराने निष्प्राण लोक तव्हारी येऊन पडत व मरत.'– पाणकळा.
**तशरीफ–ब, तश्रीफ** पहा : **तसरीफ**
**तशाडी** स्त्री. नाश; ओसाडपणा. (क्रि. देणे). (हेट.)
**तशिया** पु. नोंदबुक, रजिस्टर. मोगलाईत या शब्दाला 'सरकारी घोड्यांचे नोंदपत्रक' असा विशिष्ट अर्थ असे. हे पत्रक घोड्यांना डाग देऊन झाला आहे की नाही कळण्यासाठी असे.– विल्सन.
**तशिशा** पु. घोड्याच्या पायाच्या सुंभास होणाऱ्या नऊ रोगांपैकी एक रोग.– अश्वप २.२७३.
**तश्रीफाखर्च** पु. स्वारीखर्च. – वाडबाबा १.३५५७.
**तष्ट** न. लचांड; उपाधी; खेकट; शुक्लकाष्ठ. [सं. तक्ष्]
**तष्ट** न. तगादा; घाई; उपद्रव. [सं. त्वष्ट]
**तष्ट, तष्टित** वि. १. तासलेला; छाटलेला. २. (अंकगणित) संक्षेप देऊन लहान केलेला (अपूर्णांक इ.). [सं. तक्ष्]
**तसदिक** स्त्री. चौकशी; तपास. (व.) [अर.]
**तसदी, तसदिया, तस्दी** पु. स्त्री. १. त्रास; श्रम; मेहनत. २. तंगचाई; अडचण; ओढगस्ती : 'तिचे पोटापाण्याची बहुत तसदी होती.'– भाब १९. ३. कडक कैद. – मदरु १. ४. तगादा. [अर. तस्दीअ]
**तसनस, तसनाश–स** पु. स्त्री. नासाडी; धुळधाण; नाश; राखरांगोळी; हानी : 'त्यासी त्याचे तसनस होऊ नये.'– इमं ६. [अर. तह्स्–नह्स्]
(वा.) **तसं नसं करनं** – किरकिर लावणे; त्रास देणे.
**तसबी, तस्बी** स्त्री. १. मण्यांची, मोत्यांची माळ. २. (सामा.) जपमाळ; स्मरणी : 'हातीं तसबी घेऊनि माळ। डोळे आरक्त केले विशाळ।'– भवि ५.९३. [अर.तश्बीह्]
**तसबी(वी)र, तस्बीर** स्त्री. (एखाद्याच्या चेहऱ्याची, शरीरबांध्याची) हुबेहूब प्रतिमा; छबी; चित्र. [अर्. तस्वीर]
**तसमा, तस्मा** पु. (घराचा) खण; भाग. (ना.) पहा : **चश्मा** ४
**तसर–री** स्त्री. ओळ; रांग; गल्ली : 'साऱ्या तसरीला असे उमदें वासरूं नाहीं.'– निवाडे.
**तसर** स्त्री. १. एक क्षुद्र कीटक; पतंग; रेशमाचा किडा. २. पहा : **टसर** [सं. त्रसर; हिं.]
**तस(से)र** न. धान्याच्या ऐवजी शेतकऱ्याने सरकारला देण्याची वसुलाची नक्त रक्कम. ही ऐन गल्ल्याच्या एक चतुर्थांश असे. याला कोकणात 'नक्तखंड' म्हणतात : 'चवथाई गल्याचे तसरे दर खंडीत रुपये पंधराप्रमाणे.'– वाडसमा २.२३१.
**तसरकोंबडा–भोपळा** पु. सरकारी अधिकारी सरकारी कामानिमित्त एखाद्या गावी गेला असता त्याच्या सरबराईसाठी गावकऱ्यांनी द्यावयाचा कोंबडा, भोपळा किंवा भाजी.
**तसरराऊ–व** न. एक प्रकारचे जाडे, रेशमी कापड.
**तसराळे** न. उथळ बशीच्या आकाराचे धातूचे एक प्रकारचे पसरट भांडे. [सं. स्तृ+आलय]
**तसरी** स्त्री. १. वांगी, मिरच्या इ.कांच्या रोपांना पाणी देता यावे, म्हणून त्यांच्या दोन रांगांमध्ये खणलेली लांबट खळी, खाचण; बागेतील पाण्याचा पाट. २. पाण्यातील दोन पाख्यांचे शिंप; द्विदल शिंप. [सं. स्तर]
**तसरीफ–ब, तस्रीफ** स्त्री. १. राजेलोक गवई, तमासगीर इ. ना खूष होऊन देतात ते मानाचे वस्त्र, पोशाख इ. (सामा.) आहेर; नजराणा : 'पावल्याचा जाब दिधला लिहून। तसरीफ देऊन पाठविला।'– तुगा ४४३६. २. गावकामगार, सरकारी नोकर यांना बहुमानाचा पोशाख इ. देण्याचा विधी. ३. बहुमानाच्या पोशाखाऐवजी दिलेले वतन, जमीन. ४. आगमन. [हिं., अर. तशरीफ]
**तसलमात खाते** आवश्यक त्या माहितीच्या अभावी ज्या रकमा नेमक्या खात्यात घालता येत नाहीत, अशा रकमाची तात्पुरती नोंद करण्यासाठी ठेवलेले खाते.
**तसलीम, तस्लीम** स्त्री. वंदन; प्रणाम; नमस्कार; रामराम; सलाम : 'तसलीम करूनिया जाता झाला।'– अमृत ८८; 'अस्सलाम अलैकुम' (तुम्हाला शांती असो) असे म्हणणे; वंदन. [अर.]
**तसल्ली** स्त्री. समाधान; खातरजमा : 'परंतु परवा सर्दार आल्याखेरीज पातशाहांची तसल्ली होत नाही.'– दिमरा १.२५९. [अर.]
**तसवळ** स्त्री. पात. – बदलापूर २८३.
**तसवीर** पहा : **तसबीर**
**तसा, तसला** वि. त्या प्रकारचा; त्यासारखा; त्या जातीचा.
क्रिवि. १. तशा प्रकारे; त्या प्रकाराने; तशा रीतीने; त्याप्रमाणे. २. त्या क्षणी; त्यासरसा; तत्काळ; लागलीच; ताबडतोब. उदा. 'वाघ आला तसा मी घाबरलो.' ३. त्या मार्गाने, दिशेने; तो मार्ग, दिशा धरून. उदा. 'आम्ही असे जातो. तुम्ही तसे जा.' ४. वाक्यपूरक, वाक्यालंकारार्थक शब्द. [सं. तत्सदृश, तत्सम]
**तसू** पु.न. गजाच्या एकविसांश किंवा एकचोविसांश अंशाइतक्या लांबीचे एक परिमाण. साधारणतः अनामिका व मध्यमा यांच्या रुंदीइतकी यांची लांबी असते; द्व्यंगुळ. [फा.]
**तस्कर** पु. चोर; लुटारू. [सं.]
**तस्करणे** सक्रि. चोरणे. – माज्ञा ११.५४८. [सं. तस्कर]
**तस्त** न. हात, तोंड इ. धुताना पाणी सांडण्याचे, थुंकण्याचे रुंद तोंडाचे भांडे; पिकदाणी. [फा. तश्त्]
**तस्पिया** पु. व्यवस्था. (झाडी)
**तस्फिया** पु. १. मैत्री; स्नेह. २. समेट; तह : 'रफेशर केला व तस्फियाचा नक्षा ठरविला.'– वाडकै १००. ३. निकाल; निर्णय. (ना.)[अर.]
**तस्वी** स्त्री. स्वरूपसाधर्म्य. [अर. तश्बीह्]
**तस्मा** पु. १. चामड्याची वादी, पट्टा. २. समईखाली ठेवण्याचा चामड्याचा वर्तुळाकार तुकडा.
**तस्मा** पु. (ना.,व.) पहा : **चश्मा** ४

**तस्मागर्दन** वि. चोहोंबाजूंस मान फिरविणारा (घोडा). हा वाईट समजला जातो.– अश्वप १.१०४.

**तस्मात्** क्रिवि. १. म्हणून; त्यामुळे; त्या कारणास्तव. २. तशात; तितक्यात. (गो.)[सं.तत् या पुंल्लिंगी सर्वनामाच्या पंचमीचे एकवचन]

**तस्ल(स्लि–स्ली)मात, तस्लीम** स्त्री. १. वंदन; राम-राम; सलाम. २. देणगी; बक्षीस; इनाम : 'समस्त लहानथोरी तस्लीमात बज्या आणिली.'– ऐटि १६५; 'हैदरखान यास पश्चहजारीची तस्लीमात जाली.'– मइसा १.१७९. ३. मोघम खर्ची; खर्चाकरिता अनामत दिलेली रक्कम : 'ती जागा तानाजी येवला याचे तस्लीमातीस दिली आहे.'– मइसा १२.१८३. ४. ताळा; कबजा; दिम्मत :'ज्याचे तस्लमातीस जे हत्यार असेल त्याची चौकशी राखीत जावी.'– भोंकु ४०. ५. उपयोग; उपभोग. [अर. तस्लीम् ]

**तह** पु. १. दोन युध्यमान पक्षांतील शत्रुत्व नाहीसे होऊन झालेला सलोखा; समेट; सख्य; ऐक्य. २. संमती; अनुमती; मान्यता; पसंती. ३. सरकारी जुजबी कायदा; नियम. ४. वहिवाट; ठराव : 'देशमुखापासून दिवाणांत वसूल घ्यावया तह आहे.'– इमं १५५. [फा. अर. तहीया]

**तह** पु. गादी, उशी इ. वरील आच्छादन; खोळ इ. ना लावलेले ठिगळ.

**तहकीकात** स्त्री. १. चौकशी; तपास; सत्यान्वेषण; शहानिशा : 'सदर्हू गोष्टींची तहकीकात लाविली.'– मइसा १८.६०. २. हकिकत : 'दिघा –मजकूराची तहकीकात मनास आणतां.' – वाडबाबा. २.१५. ३. खात्री; खचिती; निश्चितपणा. [अर. तह्‌कीक् अव.]

**तहकुबी** स्त्री. तात्पुरती मनाई.

**तहकूब–प** वि. तात्पुरते बंद, रद्द, थांबवलेले :'लढाई तहकूब करितो.'– मराचिशोथा ५०.

**तहकूब–प, तहकूबचिठ्ठी** न. स्त्री. एखाद्या कुटुंबाला सारावसुलीच्या अधिकाऱ्यापासून उपद्रव होऊ नये म्हणून काही काळ वसुलीचा तगादा बंद ठेवण्याचा हुकूम, पत्र.

**तहखर्च** पु. अफाट, व्यर्थ, फुकट खर्च : 'तुम्हांमुळे आमचे स्वारीचा उद्योग राहिला यामुळे आम्ही तहखर्चात आलो.'– पुणे अखबार भाग ३. पृ. ४६.

**तहखाना** पु. १. जमिनीत खोदलेले तळघर : 'कांही गोविंदरायाच्या तहखान्यात लपाले.'– राजेवाडे ६ पृ. ६२९. २. अंधारकोठडी. [हिं.]

**तहगिरी–गीर** पहा : **तगि(गे)री** : 'त्याहारखानाचें वाईचें ठाणें तहगीर जहाले.'– इमं ३६.

**तहद–त** शअ. १. पर्यंत; पावेतो; थेट : 'पुढेंही श्रीअहद रामेश्वर तहद दिल्ली यश देईल – ब्रप २५३. २. तहदच्या जोडीला पर्यंतही द्विरुक्तीने लावतात : 'तहद अजंठेपर्यंत.' – वाडसमा २.१६२. [फा.तह+हद्द]

**तहदल** वि. तयार; सिद्ध. (व.)

**तहनामा** पु. तहाविषयीचे करारपत्र; दोन पक्षांतील तहाच्या ठरावाच्या अटींचा लेख; शांतताकरार.

**तहनाल** न. १. तरवार इ. शस्त्रांचे म्यान. २. म्यानाचे टोक; टोकास बसवलेले चांदी इ. धातूचे टोपण. [अर.]

**तहपट** पु. पहा : **तहनामा**

**तहबंद** पु. वार्षिक खर्चाचे अंदाजपत्रक; ताळेबंद.

**तहबाजारी** स्त्री. एक कर; बाजारातील दुकानाच्या जागेचे भाडे : 'तफरीक व तहबाजारी व सायेर रहदारी व भेट.' – वाडबाबा १.३५.

**तहबार** पु. १. शौर्य. २. (ल.) जोरा; दहशत; जुलूम; दंगा : 'तेथे अंमल सूरल जालियावर दंगा जाला. त्यामुळे सिबंदीच्या तहबाराखाली आलो.'– हिंद खंड १, पृ. १२२.

**तहमु(मू)ल** पु. १. ढिलाई. २.सहिष्णुता; सहन करणे : 'आपण सबुरी करून तहमूल करावयास तक्सीर केली नाही.'– इमं ६७.[अर.तहम्मुल]

**तहरीर** स्त्री. १. कारकुनाच्या खर्चासाठी देशपांडे इ.कांच्या स्वाधीन केलेली गावकीतील रक्कम; हक्क. मराठी राज्यात फडणीस व मुजुमदार यांनाही ही देत असत. २. लिखाण; वर्णन. [अर.]

**तहरीर** स्त्री. तक्रार : 'सदरहू मुकदम्यासंबंधी कागदपत्राचा वाकबगार कारकून मिळण्याविषई बरीच तहरीर केली.'– विक्षिप्त २.१३१.

**तहवी(वे)ल** स्त्री. १. उष्ट्रखाना, पीलखाना इ. अठरा कारखान्यांच्या खर्चाचे सदर. २. अठरा कारखान्यांचा समुदाय. ३. सरकारी कोठी; भांडार : 'जडाव तहवेल पैकी.'– वाडमा १.७७. ४. रोकड; नगदी; भांडवल; पुंजी. [अर.तह्‌वील]

**तहसी(शी)ल** स्त्री. न. १. वसुली; जमाबंदी; सरकारी सारा वसूल करण्याचे काम : 'तहसिलीस प्यादे सर्कारचे देविले जातील.'– सासंइ जुलै ९१. २. रयतेने सरकारला देण्याचा सारा; सरकारदेणे. ३. वसूल झालेल्या साऱ्याची रक्कम. ४. कोणापासून व किती सारा वसूल करावयाचा, किती केला इ. माहितीचे कुलकर्ण्यांजवळ असलेले पत्रक. ५. तालुका. (ना.,व.) [अर. तहसील] (वा.) **० लावणे** – तसदी देणे; हाल करणे.

**तहसीलदार** पु. सारावसुली करणारा अधिकारी; मामलतदार. [अर]

**तहा–हां** क्रिवि. १. तेथे; त्याठिकाणी : 'तहां त्याने दाराशी अहंकाराना झाड हता.'– मसाप २.१.३१. ह्या शब्दाचा उपयोग फक्त सरकारी कागदपत्रांतून व वरिष्ठ अधिकारी कनिष्ठ अधिकाऱ्याच्या हुद्द्यापूर्वी किंवा तेली, वाणी इ. व्यापाऱ्यांच्या नावापूर्वी करतात.उदा. तहाचौगुला; तहातेली इ. २. तेव्हा; मग; नंतर : 'तहा राजा काय बोले.'– मसाप २.१.३१. [हिं.]

**तहादार** वि. १. ज्याची घडी अद्याप मोडलेली नाही असे (नवे लुगडे, मंदील, शालू); परटाकडून धुऊन आलेला (अंगरखा, वस्त्र इ.); नवा कोरा; कोरा करकरीत. २. (चुकीने रूढ) ताजा; शिळा नसलेला. [फा. तह्=घडी; तह्‌दर्झ=नवा]

**तहान** स्त्री. लहान मुलाच्या डोक्यावर थंडाव्यासाठी ठेवण्याचा पानांचा ठेचा किंवा दुधाची घडी. (क्रि. घालणे, काढणे)

**तहान** स्त्री. १. पाणी पिण्याची इच्छा; तृष्णा. २. (ल.) इच्छा; आकांक्षा; आशा.[सं.तृष्णा] (वा.) **तहानभूक हरपणे** – कोणत्याही गोष्टीची जाणीव न राहणे; देहभान विसरणे.

**तहान(ने)णे** अक्रि. तहान लागणे; तृषाक्रांत होणे. [सं.तृष्]

**तहानमोड** स्त्री. १. जनावर, मनुष्य पाणी पीत असताना त्याची तहान भागण्यापूर्वीच त्याला पाणी प्यायला प्रतिबंध करणे. २. वर

सांगितल्याप्रमाणे मोडलेली तहान. ३. थोडेसे पाणी पिऊन तहान तात्पुरती शमविणे. ४. तृष्णा, वासना शमल्यामुळे ती जाणे.

**तहानलाडू–भूकलाडू** भूक तात्पुरती भागवण्यासाठी खाण्याचे फराळाचे पदार्थ, लाडू इ.

**तहा(ह)हयात–द** क्रिवि. आजन्म; आयुष्यभर; मरेपर्यंत. (हा शब्द वतन, इनाम, करार इ.कांच्या दस्तऐवजात योजतात.) [फा.ता – हायात्]

**तह्याशी** स्त्री. धातूचे पसरट तबक; लहान ताट. (खा.)

**तह्यासा, तैसा** पु. काड्यांच्या टोपल्या सुरक्षित रहाव्यात व वर्षभर गरजेनुसार वापरता याव्यात म्हणून त्यांना छताला टांगलेल्या विशिष्ट प्रकारच्या शिंक्यात ठेवतात, ते शिंके. हे लहान बाज किंवा बंगईसारखे असून दोऱ्यांनी विणलेले असते व जमिनीपासून खूप उंच, छताला टांगलेले असते. (खा.)

**तळ** पु. १. (एखाद्या पदार्थाचा) खालचा भाग; बूड. २. जमीन; जमिनीचा पृष्ठभाग. ३. (झाड, छप्पर इ.कांच्या) खालील जागा, जमीन. ४. सैन्य, स्वारी इ.कांची मुक्कामाची जागा; छावणीचा गोठ; शिबिर; व्यापारी, प्रवासी, लमाण, गाड्या, घोडी इ.कांच्या मुक्कामाची जागा, अड्डा. ५. पृष्ठभाग; सपाट भाग. जसे :- हाताचा, पायाचा तळ. ६. वस्तूंच्या राशीने व्यापलेली जागा; वस्तू ज्या ठिकाणी असेल ती जागा. (वस्तू हलवताना, तेथून दुसरीकडे नेताना सापेक्षतेने या शब्दाचा उपयोग करतात). ७. विस्तृत व सपाट भूभाग; मैदान. ८. बूट, जोडा इ. कांचा खालचा (ज्यावर पाय टेकतात तो) भाग; तळवा; जोड्याच्या तळव्यांतील चामड्याचा तुकडा. ९. नाश; रसातळ : 'मानी मेलाचि जरी दुर्जय तरि निजशतात्मजरिपु तळा।'– मोस्त्री २.२२. १०. तांडा. (वणजारी) [सं. तल; फ्रें. जि. तलै] (वा.) ० **घालून बसणे, मारणे**– १. (एखाद्या ठिकाणी) कायम-वस्तीच्या इराद्याने राहणे, उतरणे; आसन, ठाण मांडणे. २. दुसऱ्याचा पैसा गिळंकृत करून, लुबाडून बेदरकारपणे स्वस्थ आणि निर्धास्त राहणे. ० **झाडणे** – (सर्व सामग्री, बेगमी इ.) खाऊन फस्त करणे. ० **थांबणे** – (एखाद्याचे) आसन स्थिरावणे; जन्माची सोय लागणे; थाऱ्याला, ठिकाणी लागणे. ० **न थांबणे** – एखाद्याला कायम भटकंतीच करावी लागणे; एका जागी स्थिर होऊ न शकणे. ० **लागणे, पडणे** – (सामग्री, बेगमी इ.) जवळ जवळ फस्त होणे, संपण्याच्या बेताला येणे. **तळची, तळपायाची आग मस्तकास जाणे** – (कर्त्याची षष्ठी) रागाने नखशिखांत संतप्त होणे; अतिशय राग येणे. **तळचे मडके हाणणे, फोडणे** – मुळावरच घाव घालणे; समूळ नाश करणे. **तळहातचा, तळहातावरचा फोड असणे** – एखादी वस्तू, व्यक्ती अत्यंत प्रिय, जिव्हाळ्याची असणे. **तळहात(ता)चा मळ असणे** – एखादे काम अगदी सहज, अत्यल्प श्रमाने करता येत असणे. **तळहाताच्या (तळहातावरच्या) फोडासारखे वागविणे, बाळगणे, मानणे** – (एखाद्या वस्तूची, व्यक्तीची) अतिशय काळजी घेणे. **तळहाताला केस येणे** – अशक्य गोष्ट शक्य कोटीत येणे. (तळहाताला कधीच केस येत नाहीत त्यावरून.) **तळहातावर शिर घेणे** – जिवाची तमा न बाळगणे; (एखाद्या कार्यासाठी) मरणही पत्करण्यास तयार होणे. **तळाने तळ येणे, तळावर तळी करणे** – पावलावर पाऊल टाकून पाठलाग करीत येणे : 'सवाईजी भितात की शत्रू राजश्रीच्या तळाने तळ येतील.'– पेद १५, पृ. १९. **तळावर बसणे, राहणे** – १. विपन्नावस्थेस, अवदशेस येणे; अकिंचन होणे. २. घरी बसणे; सामाईकीच्या वाटणीतील भागास मुकणे. (चोर, लुटारू यांच्यापैकी घरी बसणाऱ्याला लुटीचा भाग देत नाहीत, त्यावरून). ३. धंद्याच्या ठिकाणी, नेहमीच्या जागी असणे. **तळावर बसविणे** – एखाद्याला सामाईक वाटणीतील भाग न देणे.

न. कुंभाराच्या चाकाच्या मध्याची फळी.

**तळउपर** पु. रस्त्यावरील उंच सखल. [सं.तलउपर]

**तळकट, तळका** न. पु. ताम्हन : 'लोखंडाचे तळकट वेळेवर सापडायचें नाही.'– अस्तंभा ११६.

**तळकट** वि. १. तळलेला. २. तळल्याचा वास येणारा (पदार्थ); तळलेल्या पदार्थाच्या वासासारखा (वास).

**तळकट–टी** न. स्त्री. १. चटईचा, आंथरीचा तुकडा. (राजा.) २. ताडाच्या, माडाच्या झावळीचा उभा चिरलेला अर्धा भाग. (को.) [सं. ताल]

**तळका** पु. १. निजण्याच्या उपयोगाची लहान चटई. पहा : **तळकट** : 'सांडला माझा फाटका तळका, कशी मज ढेकणें खाल्ली गे।'– एकनाथ पदे. २. चपाती; चांदकी; लाटी. ३. चामडी भाजल्याने त्वचेला आलेला फोड, फुगोटी. ४. फुगलेल्या पोळीचा पापुद्रा. ५. जोड्याच्या तळाचा फाटून-फाटून निघालेला तुकडा; पापुद्रा; (सामा.) कापून निराळा केलेला सपाट, चापट तुकडा; काप. (क्रि. उडणे, निघणे, जाणे, काढणे, घेणे). ६. (उभे पीक असलेल्या शेतातील) पीक कापलेला भाग; (शेतातील) पीक नसलेला, मोकळा तुकडा; (सामा.) (पेरणी, नांगरणी, कापणी, निंदणी इ. वाचून राहिलेला) शेतजमिनीचा तुकडा. ७. आंब्याचा अर्धा काप.

**तळकाट** स्त्री. झरलेली, झिजलेली वहाण. (कु.)

**तळकाठी** स्त्री. १. शिडाचे कापड तळाशी लांब ताणण्याकरता वापरलेली काठी. २. नौका.

**तळकुटे** न. पहा : **तळकट** १

**तळके** न. धान्याची रास कोठारात भरल्यानंतर जमिनीवर, कांबळ्यावर, झोऱ्यावर राहिलेले थोडे धान्य. हे काम महाराकडून करवल्यास या उरलेल्या धान्यावर त्याचा हक्क असतो.

**तळकोंकण** न. सह्याद्री आणि समुद्र यांमधील प्रदेश; कोकणपट्टीचा दक्षिण भाग; गोवा व त्याजवळचा प्रदेश.

**तळख** स्त्री. खालची बाजू : 'वाटे उत्तरे तळखेसि पोमाइसांचे उदक.'– स्थापो ८५.

**तळखडा** पु. खांब ज्यावर बसवतात तो दगड; उखळाचा दगड.

**तळखप** पु. (मालाचा) स्थानिक, तळावर, गावातल्या गावात होणारा खप.

**तळखंड** न. १. जात्याची खालची तळी; (सामा.) जात्याच्या दोन तळ्यांपैकी कोणतीही एक याअर्थी खालचे वरचे तळखंड असाही शब्दप्रयोग करतात. २. खालचा भाग; तळ. उदा.भिंतीचे तळखंड.

३. फणसाच्या चारखंडास आतून चारीसारखा अंश (पाती) असतो व वर काटे असतात. यांच्यामध्ये असणारा दळदार भाग. (को.)

**तळखंबा** पु. शूद्रजातीय मृत पुरुषाचे (तो ज्या घरात, जागेत मेला असेल तेथे वावरणारे) पिशाच्च; समंध. याची जागेवर पूजा करावी लागते. (राजा.)

**तळघर** न. १. घराच्या तळमजल्याच्या खाली (जमिनीच्या पोटात) राहण्यासारखी केलेली जागा; भुईघर. २. माडी असलेल्या घराचा तळमजला. (कु.)

**तळघाट** पु. पर्वताचा पायथा, त्यालगतचा प्रदेश;सह्याद्रीखालचा प्रदेश. पहा : **घाटबुडी**

**तळचेपणी** स्त्री. १. कणगा इ.कांचे तळ धान्याने भरून चेपून सारखे करण्याची कृती. २. एखादे मोठे भांडे, कणगा इ.कांचे बूड व्यापेल इतके पदार्थ, धान्य इ.कांचे परिमाण.

**तळजमीन** स्त्री. भातजमीन.– शे ३.४.

**तळझाडा** पु. १. (घर, खोली इ.) पूर्णपणे रिकामे करणे. २. खालपासून वरपर्यंत, कानाकोपऱ्यांतून केलेली, घेतलेली (घर इ.कांची) झडती. ३. (खाद्यपदार्थ, धान्याची बेगमी) खाऊन फस्त करणे; (सामा.) (अशा रीतीने केलेला) चट्टामट्टा, फन्ना, फडशा. ४. (स्वयंपाक, यज्ञ, इमारत इ.करिता) जमीन झाडून, सारवून साफसूफ करण्याची क्रिया. ५. (सैन्य इ.कांचा) मुक्काम उठल्यानंतर ज्या ठिकाणी तळ असेल तेथे काही जिन्नस वगैरे राहिला आहे का ते पाहण्याकरिता केलेला शोध.

**तळटीप** स्त्री. पुस्तकाच्या पानावरील मुख्य मजकुराच्या खाली, तळाशी दिलेली टीप.

**तळण** पु. तळहात.

**तळण** न. १. तळण्याची क्रिया. २. तळण्याचा, तळून केलेला पदार्थ. ३. तळण्याची कढई. [सं. तलन]

**तळणवळण** न. तळलेले व इतर पदार्थ; (सामा.) खाद्यपदार्थ.

**तळणी, तळणाटोप** स्त्री.पु. कढई. (को.) [गु. तळणी]

**तळणे** सक्रि. १. पदार्थ कडकडीत तापलेल्या तेलात, तुपात घालून शिजवणे. २. (ल.) (एखाद्याची निर्दयपणे) छळणूक करणे; गांजणे. ३. (सूर्याचे ऊन इ.काने) चटका बसणे; भाजणे; पोळणे.[सं. तलति; क. तळ]

**तळत** पु. तळात; तळहात. (गो.)

**तळतफळे** न. हात पोहोचण्याइतक्या उंचीवर टांगलेली फळी.( गो.)

**तळतळ** स्त्री. १. (उन्हाच्या प्रखरतेने होणारी अंगाची) काहिली; उबारा; गदका; खितखित. २. (उन्हाच्या प्रखरतेने येणारी) घेरी; भोवळ; मूर्च्छा; चक्कर. (क्रि. येणे.) ३. (पश्चात्ताप, शोक इ.काने होणारी मनाची) तळमळ; अस्वस्थता; अशांती. ४. उपद्रव; चिरडीला आणणारे कृत्य; क्षोभजनक गोष्ट. (क्रि. देणे) [क. तळ]

**तळतळणे** अक्रि. १. (उन्हाच्या त्रासाने) खितखितणे; उबगणे; डगडगणे; (भूक इ.नी जिवाची) घालमेल होणे. २. दु:खाने विव्हळ होणे; तळमळणे. ३. संतापाने चरफडणे; हातपाय आपटणे; शाप देणे. ४. (रोगग्रस्तपणामुळे, दुसऱ्याच्या जाचामुळे) जिवाला, आयुष्याला कंटाळणे, विटणे, उबगणे. [क. तळ]

**तळतळाट** पु. १. (तळतळाचा अतिशय) संतापाचा, तळतळीचा अतिरेक; चडफडाट; जळफळाट. २. जुलूम, छळ इ.काने चिडून गेलेल्या माणसाने दिलेला शाप. (क्रि. घेणे, देणे) ३. पराकाष्ठेचा छळ, जुलूम, दडपशाही इ.नी युक्त अशी स्थिती. [क. तळ]

**तळतळावणे** सक्रि. १. चिडवणे; उपद्रव, त्रास देणे; चिरडीस आणणे. २. गांजणे; छळणे. [क. तळ]

**तळतूट** स्त्री. व्यापारी जिन्नसांची स्थानिक तूट, तुटवडा : ' त्या निशाणीचा माल बाजारात तळतूट असल्यास कमी किंमतीचा माल असला तरी ज्यास्त किंमत देऊन घ्यावा लागतो.'– मुंव्या ५३.

**तळदिवा** पु. रंगमंचावरील जमिनीलगतचा व वरच्या बाजूला प्रकाश टाकणारा दिवा; (इं.) फूटलाइट.

**तळप** पु. स्त्रियांचे एक कर्णभूषण : 'गळ्यांतली टिका किंवा कानांतले तळप असे दोन नग वधूला... देऊन झालेलेच असतात.'– मसाप ४.४.२५५.

**तळप** न. खडक; पाषाण; कातळ. (गो.) [सं.तल]

**तळपट** न. १. (शाप इ.काने झालेला, होणारा) कुलक्षय; नि:संतान; सत्यानाश; निर्वंश. २. (देश, गाव इ.कांची लुटालूट, जाळपोळ, इ.कांनी झालेली) दुर्दशा; नासाडी; बेचिराखी; राखरांगोळी. ३. (व्यापक) (खाद्यपदार्थांचा) फडशा; फन्ना; चट्टामट्टा.

**तळपटॉ** वि. १. पाषाणयुक्त; दगडाळ; खडकाळ; निर्वृक्ष. २. रखरखीत; उन्हाने भाजलेला. (गो.)

**तळपणी** स्त्री. चकाकणे; तकाकणे; तळपणे; चमकणे ; लुकलुकणे : 'सोमकांत कासारजीवनीं। मच्छकच्छपाची तळपणी।'– मुसभा २.५९.

**तळपणे** अक्रि. (उन्हाने) भाजणे; पोळणे; होरपळणे. [सं. टल]

**तळपणे** अक्रि. १. चमकणे; चकाकणे; तकतकणे; झळकणे. २. शोभणे; खुलणे : 'मकरकुंडलें तळपतीं श्रवणीं।'– तुगा १. २. फिरवले, परजले जाणे (तलवार इ. शस्त्र). ३. चलनवलन करणे; हलणे : 'पैं पाणियाचिये भूमिके। पाणी तळपे कौतुकें। ते लहरी म्हणती लौकिकें। एऱ्हवीं तें पाणी।'– ज्ञा १३.६०९. ४. (एखाद्या वस्तूभोवती ती मिळवण्यासाठी) घिरट्या घालणे; भोवंडत, तरंगत राहणे; घोटाळत, घुटमळत राहणे : 'मग हातीं घेऊन असिलता। रुक्मिया तळपे रथाभोंवता।'– ह २४.६८. ५. हपापणे : 'की मज खायासि गृध्र तळपावे।'– मोउद्योग ९.३७. [सं.तप्; क. तळपु]

**तळपदी** पु. दलपती; सेनानायक .

**तळपाय** पु. पावलाचा खालचा भाग; पायाचा तळवा.

**तळपी, तळपीण** पु. स्त्री. पदार्थ तळायला बसलेली व्यक्ती . (राजा.)

**तळपूस** स्त्री. १. पहा : **तळझाडा** ३. २. नायनाट.

**तळप्रहार** पु. चापट; लाथ : 'देवीनें एक जोरानें तळप्रहार मारून त्यास जमिनीवर पाडलें.– व्याज्ञा १ .६०. [सं.]

**तळबूड** स्त्री. १. वृक्ष इ.कांचा बुंधा; तळ; खालचा भाग : 'तंव तंवें होती थोराडें। अकर्माची तळबुडें।'– ज्ञा १५.१६८. २. खळ्यातील, धान्याच्या पेवातील (धान्य इ.ने युक्त) गाळसाळ; गदळ; झाडणी. न. आगापिछा; इत्थंभूत माहिती.

**तळमळ** स्त्री. १. (ज्वर, शारीरिक, मानसिक दुःख इ.ने होणारी) अस्वस्थता; तडफड; तगमग; चडफड; बेचैन अवस्था; हैराणी. २. हुरहुर; चुटपुट; काळजी. ३. पश्चात्ताप; पस्तावा; अनुताप.

**तळमळणे** अक्रि. १. (ताप, दुःख इ.नी) हैराण, अस्वस्थ होणे; तडफडणे; चैन न पडणे; चडफडणे; चुळबुळणे. २. चुटपुटणे; हुरहुरणे; चिंतेने, उत्कंठेने अस्वस्थ होणे; कळकळणे; हळहळणे; झुरणे.

**तळमूस** स्त्री. धुळधाण; नासाडी; उद्ध्वस्त स्थिती; बेचिराखी; कहर.

**तळय–ई** स्त्री. लहान तळे. (गो.)

**तळयाणे** अक्रि. तळव्याची आग होणे; दुःख होणे. (कु.)

**तळरेषा** स्त्री. १. तळव्यावरच्या रेषा. २. (खेळाला सुरुवात करतानाची) प्रारंभरेषा. ३. 'बॅडमिंटन' व 'टेनिस' कोर्टाच्या दोन टोकांच्या सीमारेषा.

**तळव** न. लग्नात वधूवरांना एकत्र बसवण्यासाठी केलेली गादी.

**तळवट** न. जमिनीवर बसण्यासाठी टाकलेले जाजम.

**तळवटणे** सक्रि. दडपणे; दाबणे; तळाला घालणे.

**तळवण** न. तळलेला पदार्थ.

**तळवणी** न. (क्व.) जमिनीवरील (नदी, ओढे, तळी इ.कांचे) पाणी.

**तळवणे** उक्रि. १. पोळणे; भाजणे. २. स्थिर होणे.

**तळवा** पु. १. हाताचा, पायाचा तळ. २. तळहात.[सं. तळपाद; हिं. तलवा]

**तळवाग** स्त्री. लगाम ढिले सोडणे.

**तळवाट** स्त्री. भुयाराची वाट; चोरवाट.

**तळवार** पु. १. पहा : **तराळ**. २. एक हलकी जात. [क.]

**तळवे** न. १. भाताचे भारे रचून ठेवण्याकरता जमिनीवर पेंढा, गवत, दगड इ.कांची केलेली बैठक, पायाची रचना. (को.) २. भात साठवण्याची जमिनीवर ठेवण्याची बांबूंची मजबूत फोकाट्यांची गोठ घातलेली वर्तुळाकार कणंग. यात एक खंडी भात राहू शकते.

**तळवेणे** अक्रि. फार वेळ अनवाणी चालल्याने होणाऱ्या पायांच्या आगीने सर्वांग व्यापून त्रास, वेदना होणे.

**तळवेमार** पु. तापलेल्या तव्यावर अनवाणी उभे करून, कढ्यावरून खाली लोटून, तेलात तळून मारण्याची शिक्षा.

**तळशोधणी** स्त्री. पहा : **तळझाडा** ५

**तळसणे** उक्रि. १. सप्पा, साफ करणे (फांद्या इ. तोडून झाड, पाने–काटे इ. तोडून फांदी, केस इ.काढून शरीर). २. काढून नेणे; तोडणे; छाटणे (फांद्या, पाने, झुडपे, केस इ.). [अर. तलाशी]

**तळसरा–री** स्त्री. खांबाचा तळखडा; उथळा.

**तळसरी** स्त्री. विहीर बांधताना तिच्या तळाशी देतात तो पहिला थर : 'बाभळीच्या लाकडाचा उपयोग विहिरीच्या तळसरीकडे करतात.'– उद्यम जाने १९३६.

**तळसाण** स्त्री. पदार्थ तळताना येणारा वास; तळणाची घाण.

**तळसांड** क्रिवि. जमिनीपासून निराळे; तळापासून उचललेल्या स्थितीत (ओझे इ.असणे); जमीनसांड; भुईसांड.

**तळसुति–धि** स्त्री. कंबरकस : 'फुटेयाचि तळसुति केली.' – लीचपू ५०८.

**तळसुंचे** सक्रि. अर्धेमुर्धे तळणे. (गो.)

**तळसूती** स्त्री. काष्टा. [सं. तलसूत्र]

**तळहात** पु. हाताचा तळवा.

**तळहातणे** सक्रि. (पाय इ. शरीरावयव) हातांनी रगडणे; चेपणे : 'वनीं हिंडताती एकले। तळहातीन करकमळें।'– राविं १४.७३.

**तळा** पु. तळवटीची जमीन.

**तळाची आरी** (चर्म.) जोड्याचा तळ शिवण्याची आरी.

**तळाट(ठ)दार, तळाटी–ठी, तलाटीदार** पु. १. पहा : **तलाठी**. २. गैरहजर असलेल्या किंवा कामावरून तात्पुरते बडतर्फ केलेल्या कामगाराच्या जागी काम करणारा अधिकारी; बदली कामगार.

**तळाटी–ठी** स्त्री. तळाटदाराचा, तलाठ्याचा हुद्दा, काम.

**तळाफाटा** पु. उधळेपणाचा खर्च; उधळपट्टी; अतिव्यय.

**तळायणे** क्रि. पाय चेपणे; काश्याच्या वाटीने तळपाय घासणे.

**तळावडी** स्त्री. लहान तळे.

**तळावणे** अक्रि. (उन्हाने अंग, दृष्टी इ.) होरपळणे; करपणे; पोळणे; रखरखणे; तळपणे; उष्णतेची बाधा होणे.

**तळावर्त** वि. १. चालताना ज्याचा मागचा पाय पुढच्या पायाला लागतो असा घोडा. – अश्वप. १.९७. २. घोड्यावर बसणाऱ्याचा पाय भोवऱ्याला लागतो असा भोवरा असलेला (घोडा).– मसाप. २.१.

**तळावाटी** स्त्री. पहा : **तळाफाटा**

**तळासणे** सक्रि. १. (एखादे काम, क्रिया इ.) मुळापासून, आरंभापासून यथासांग करणे, बजावणे. या क्रियापदाच्या ऊन प्रत्ययात धातुसाधिताला जोडून झाडणे, उपटणे, तासणे, रंधणे, कापणे, पुसणे, घेणे इ.क्रियापदांचा उपयोग करतात. उदा. तळासून झाडणे; तळासून कापणे. २. पहा : **तळसणे**

**तळिंब** पहा : **तळव** : 'रण कोहळें सोहळिया कारणें।... तळिंब झाडणें शस्त्राखें।।– भारा अरण्य ८.१७३.

**तळी** स्त्री. लहान तळे. (गो., राजा.)

**तळी** स्त्री. १. पहा : **तळखंड** १. २. जात्यातील पीठ ज्याच्यावर पडते तो जात्याखालचा सपाट दगड, लाकडाची फळी, काथवट. ३. एका ताम्हणात भंडारा, कुंकू, विडा, नारळ इ. ठेवून तीन अथवा त्यापेक्षा अधिक खंडोबाचे भक्त ते ताम्हण कपाळाला लावतात व खंडोबाचा येळकोट असे म्हणतात तो प्रकार. (क्रि. उचलणे, भरणे) : 'धेंडा नाचविलिया वरी। तळी आणिली बाहेरी। फळीं पुष्पीं अति साजिरी। ज्ञानदीपें सोज्वळ।'– एरुस्व १७.३१. ४. (ब्राह्मणेतरांत रूढ.) नवरात्राच्या दिवसांत नवपरिणीत वराकडील लोक ताटात साडी, चोळी, हळद–कुंकू, फराळाचे पदार्थ इ.ठेवून नवपरिणीत वधूकडे पाठवितात ती. (क्रि. नेणे, पाठविणे). ५. चिखल, घाण पाणी इ. आत जाऊ नये म्हणून विहिरीच्या तोंडाभोवती केलेली वर्तुळाकार फरसबंदी, चुनेगची. ६. फुले, भस्म इ.नी युक्त असलेले गुरवाच्या भिक्षेचे ताम्हन. ७. विहीर बांधून काढताना बांधकाम करण्यासाठी खाली विहिरीत बसवलेली लाकडी चौकट. ८. गणपतीची मूर्ती आणते वेळी नारळ, तांदूळ इ.ची मूर्तिकाराला दिलेली भेट. (वा.) **(एखाद्या कार्याची) ० उचलणे, भरणे –** ते कार्य करण्यासाठी सर्वांनी हातभार लावणे;

एकजुटीने कार्य सिद्धीस नेणे. **(एखाद्याची) ० उचलणे –** सर्वांनी कट करून (एखाद्याला) हाकून लावणे, पदच्युत करणे : 'कशी उचलली तळी मिळाले ते बाराभाई।'– ऐपो ४११. **० भरणे–** १. (कर्त्याची षष्ठी) (एखाद्या दरिद्री मनुष्याला) आवश्यक त्या वस्तू, पैसा पुरवून मदत करणे. २. पहा : **तळी उचलणे. तळीराम गार करणे–** आपणास इष्ट ते साध्य करून स्वस्थ बसणे; उपभोग्य वस्तूचा उपभोग घेऊन स्वतःची इच्छा तृप्त करून स्वस्थ बसणे. **तळीराम गार होणे–** (कर्त्याची षष्ठी) एखाद्याजवळ गुप्त धनाचा साठा, घबाड असल्यामुळे त्याच्या मनाला स्वस्थता असणे.

**तळी** स्त्री. भांगेत साखर इ. पदार्थ घालून केलेले एक खाद्य.

**तळी** स्त्री. दाढी.

**तळी** स्त्री. १. एका गावाने दुसऱ्या गावाची आकसाने, सूडबुद्धीने केलेली लुटालूट, मारहाण, जाळपोळ इ.; दंगा. २. सरकारी नोकरांकडून आपले हक्क, हक्कांच्या बाबी इ. वसूल, शाबीत करून घेण्यासाठी गावकऱ्यांनी केलेला हल्ला. [क. तळिसु]

**तळी** वि. पंधरा. (नंदभाषा)

**तळीआवरू** वि. सतरा. (नंदभाषा)

**तळीउधानू** वि. अठरा. (नंदभाषा)

**तळीखोर** पु. दंगेखोर, बंडखोर : 'शहापूर तालुक्यातील खेडेकरी यांणी तळीखोर ठेवोन घेऊन दङ्गीकर्यातील तळी करवो लागले.'– ऐलेसं ५६१०.

**तळीगार** पु. दोन गावांनी सुडाने केलेल्या परस्परांच्या लुटालुटीत, तळीत भाग घेतलेला मनुष्य.

**तळील** वि. १. खालचा; खालील : 'समर्थाचिये पंक्तिभोजनें। तळिल्या वरिल्या एकचि पक्वान्नें।' – ज्ञा १८४८. २. बुडाचा.

**तळीव** वि. तळलेला; तळून केलेला.

**तळुक** स्त्री. स्त्रियांच्या नाकातील चमकी. (तंजा.)

**तळे** न. १. तलाव; सरोवर. २. चंद्राभोवती कधी कधी दिसणारे मोठे मंडल, खळे. तळे मोठे असते व खळे लहान असते. [सं. तल्ल]

**तळौट(टे)पण** न. १. लहानपण; नीचपण. २. नम्रपणा; विनय : 'तळौटेपणा बाणे। बहुतकरूनी।'– ज्ञा १३.१९४.

**तळौली, तळुले** स्त्री. न. लहान तळे : 'तळौली भरली अमृता'– मूप्र ६११.

**तव्हात** न. डोंगराच्या पायथ्याचा मैदानी प्रदेश. (व.)

**तक्षक** पु. १. पाताळातील नागांपैकी प्रमुख नाग; सर्पाची एक जात. २. (ल.) दुष्ट खुनशी व घातकी मनुष्य. ३. सुतार; सुतारकाम करणारा.

**तक्षीम** स्त्री. १. वतन; गावचा खर्च इ. चा वाटा; विभाग; फाळणी; वाटणी; हिस्सा; भाग. २. विशिष्ट नियमांनी संघटित असलेला समाज, संघ, जात, वर्ग, मंडळ. [फा. तक्सीम]

**तज्ञ** पहा : **तज्ज्ञ**

**तंग** पु. घोड्याचे खोगीर आवळण्याचा चामड्याचा पट्टा; घट्ट आवळलेला पट्टा. [फा. तंग]

**तंग** वि. १. घट्ट; आवळ; आवळ होणारा (अंगरखा, चोळी इ.). २. दृढ : 'बरवा अंगीं राहे भाव। तंग तोचि जाणा देव।'– तुगा ३४५४. ३. घट्ट बांधण्याचा (पट्टा). ४. अडचणीत, पेचात, संकटात सापडलेला (मनुष्य). (वा.) **० करणे–** (एखाद्याला) पेचात धरणे : 'प्रथमतां झुंजीं त्यास तङ्ग केला तेव्हांच त्यास आंच बसली.'– ऐलेसं ८४७. **० होणे–** अस्वस्थ होणे (जीव); ग्लानी येणे; त्रासणे. (गो.)

**तंगचाई–वी, तंगशाई** स्त्री. १. टंचाई; दुर्मिळता; अडचण; तंगी; तुटवडा : 'परंतु खर्चाची बहुत तङ्गचाई जाली.'– इमं १३४. २. विपन्नावस्था; ओढगस्ती. [फा. तंग+चाय]

**तंगड** स्त्री. लाठीचा पायावर केलेला मार. – लाखे.

**तंगड–डी** न. स्त्री. (निंदार्थी) पाय. पहा : **टांगडी.** [सं.त्रक्-ख्-ग्] (वा.) **तंगडी तोडणे, मोडणे–** खोड जिरवणे, मोडणे; मर्मावर बोट ठेवणे. **तंगड्या उपटनं –** राग व्यक्त करणे; असंमतिदर्शक वागणे. (अहि.)**तंगड्या गळ्यात टाकणे, पडणे, येणे –** कारस्थान स्वतःवरच उलटणे. **तंगड्या घासणे–** खूप कष्ट घेणे, श्रम करणे. **तंगड्या घालणे, देणे–** १. दुसऱ्याच्या कामात अडथळा निर्माण करणे. २.परपुरुषाशी सख्य जुळवणे, संभोग करणे. **तंगड्या तोडून, तोडत, ताणत जाणे–**पायाने चालत जाणे; पायपीट करणे.

**तंगड(ट)णे** उक्रि. पायपीट करणे, करायला लावणे. पहा : **तांगडणे**

**तंगणे** अक्रि. १. क्षीण होणे; रोडावणे. २. विपन्नावस्थेला, अवनतीला येणे; दरिद्री होणे. ३. थकणे; दमणे. ४. कष्ट करणे.

**तंगतंगीत** वि. १. फार घट्ट बांधलेला, आवळलेला. २. अंगाबरोबर; आटपशीर; सुटसुटीत; घटमूठ. ३. (सामा.) तंग : 'उरीं दोन्ही गेंद गुलाबी संगीत। वर कंचुकी ल्याली तंगतंगीत।'– पला ४.४४. [फा. तंग]

**तंग(गी)तुरसी** स्त्री. अडचण : 'आपल्या अवकात चालत नाही. बहुत जबुन वक्त तंगतुरासी जाहली आहे.' – शिचसाखं २. पृ. २१९.

**तंगतोड** वि. नग्नदीक्षा घेण्याच्या बेतात असल्यामुळे वस्त्राचे बंद तोडून टाकलेला (गोसावी इ.).

**तंगतोबरा–री** पु. स्त्री. घोड्याला लागणाऱ्या जिन, तंग, तोंबरा इ. जिनसा : 'घोड्याला तंगतोबरी जिनबंद कोरी।'– ऐपो ४२९. [फा.]

**तंगदार** पहा : **तंग** वि. १

**तंगपिलपिले** न. फळ्यांना सांध्याची खोबण पाडण्याचे सुतारी हत्यार. (को.) [इं.टंग+म.पिलपील]

**तंगबार, तंगबाहार** पु. खोगीर वगैरे घालून केलेली (घोड्याची) तयारी; जिनबंदी (क्रि. करणे) : 'दार, गोळी लोकांस वाटून तंगबार करून मुहूर्ते सिद्ध होऊन चालिले.'– भाब १०; 'तंगबाहारी तयारी साऱ्या सैनेस।'– ऐपो ३३४.

वि. १. खोगीर वगैरे चढवून सज्ज केलेला (घोडा). २. कंबर कसून प्रवासाला निघायला सिद्ध झालेला (मनुष्य). [फा.]

**तंगरोखण** स्त्री. सुताराच्या रोखणीचा, रंध्याचा एक प्रकार. फळीला मधोमध पुढे येणारा भाग राखून बाजूचा भाग रंधून काढणारा रंधा.

**तंगावर्त** पु. (घोड्याला) तंगाखाली असलेला वाटोळा भोवरा.– अश्वप १.१०१.

**तंगी** स्त्री. घोड्याची झूल, गाशा, बुरखी इ. बांधण्यासाठी असलेला लहान, तंग पट्टा, बंद.

**तंगी** स्त्री. १. (अंगातील कपडे इ.कांचा) घट्टपणा; अडसपणा. २. (द्रव्याची, जिनसांची) टंचाई; अडचण; ओढ. ३. चणचण; ओढाताण; गरिबी. ४. (व्यापार) तेजी; महागाई.

**तंट** पु. बोभाटा; दुष्कीर्ती.
वि. भांडखोर.

**तंटलमारी** वि. बुडव्या; तंटे करणारा. (तंजा.)

**तंटा** पु. १. वाद; भांडण; कलह; मतभेद; बोलाचाली; बाचाबाची.(क्रि. उचलणे, करणे.) २. जिकिरीचे पण जरुरीचे काम, कामधंदा. ३. (सावकारांचा) तगादा; लकडा; निकड. ४. अप्रिय काम, प्रसंग. [ध्व.;हिं. टण्टा; सं. तण्ड] (वा.) ० **मोडनं** – सौदा पूर्ण करणे. (अहि.) **तंट्याभिल्ल बननं** – कसेही, अविचाराने वागणे; अस्वच्छ राहणे. (अहि.)

**तंटेखोर–बाज** वि. भांडखोर; कलहप्रिय.

**तंटेदार** वि. १. कर्जबाजारी (ऋणी). २. गृहस्थ नसणारा. (तंजा.)

**तंड** पु. पहा : **तंटा** : 'तंड वाचाळी बरवी नव्हे ।'– दावि ३४६.

**तंडणे** अक्रि. भांडणे; कलह करणे; मोठ्याने आरडाओरड करून वाद करणे; शुष्क वादविवाद करून भांडणे; झगडणे : 'वेदांतीयाशीं पाषांडी तर्के। भागवताशीं तण्डे कोक। '– मुरंशु २३६. [सं. तण्ड]

**तंडा** पु. मोठी वीट. (बे.)

**तंडा** पु. १. (मुंग्या, जनावरे इ.कांचा) समुदाय; घोळका–जमाव. २. तांडा; टोळी; तुकडी.

**तंडेल** वि. दांडगा; आडदांड; रानवट; मगरूर; शिरजोर.
पु. मजूर ठरवून देणारा मनुष्य.

**तंडेली** स्त्री. दांडगाई; आडदांडपणा; दंडेली; दंडुकेशाही.

**तंत** पु. स्त्री. १. दोरा; धागा; वाद्यातील तार : 'तंत लागला मुळाचा। अवताराकडे ।'– दास १८.८.६. २. त्राण; जीव; दम. ३. तार, तात लावलेले वाद्य. [सं. तंतु] (वा.) **तंती प्राण उरणे, लावणे**– १. कंठी प्राण येणे; आसन्नमरण असणे. २.(एखादी वस्तू) अतिशय जीर्ण होणे. [सं.तंतु]

**तंत** क्रिवि. १. (एखादे प्रमाण, माप, गुण, संख्या इ.कांशी) बरोबर जुळणारा; बरहुकूम; तुल्य; सारखा; हुबेहूब; तसाच; खोटा; तंतोतत. (क्रि. भरणे, उतरणे) : 'स्वर तंत घन थाट तो दाट बैसला ।'– दावि २५६. २. तुडुंब; काठोकाठ; सांडोसांड. ३. नक्की; पुरेपूर; बरोबर : 'बारा वर्षे वाहिले पाणी नाथाघरीं तंत ।'– मला ३०.

**तंततंत, तंतवितंत** क्रिवि. समस्वर; स्वरैक्याने युक्त अशा रीतीने, तालबद्ध : 'तंततंत वितंत सुस्वर। चतुर्विध वाद्यांचा गजर ।'– ह २.१२३.

**तंतरणे** उक्रि. १. भूलथापा देऊन फसविणे; फूस लावून नेणे; भुरळ पाडणे; फसवून लुबाडणे. २. (अशिष्ट) संभोगणे; उपभोगणे : ' जीभ लावुन नाकाला बोलसी नित तंतरसी भिकारणी ।'– प्रला २४०.
अक्रि. गर्भगळित होणे; घाबरणे; किंकर्तव्यमूढ होणे. (ना.)

**तंतरना** क्रि. संधीची प्रतीक्षा करणे. (झाडी)

**तंतारा–र, तंतारिक** वि. कृश; किडकिडीत; क्षीण; बारीक; रोड.

**तंताळ** वि. खोडकर; उनाड; आडदांड; द्वाड (मूल).

**तंती** पु. विणकर; कोष्टी .

**तंतु** पु. १. सूत; दोरा; धागा; सूत्र. २. (कातड्याची, सालीची, आतड्याची) तात, तार. ३. (फुलातील) केसर; ताणा; अगारी; तार : 'पद्माचा जो तंतु वारणाला। वारायाला पैं म्हणे सिद्ध झाला ।'– वामन नीतिशतक १० (नवनीत पृ. १३४). ४. दोरासारखा किडा. ५.(ल.) धागादोरा; धागासंबंध; लागाबांधा. (क्रि. लागणे.).६. एखाद्या कुटुंबातील एकच शिल्लक उरलेला पुरुष. ७. वंश; संतती; मुलेबाळे; अपत्य. ८. धोरण; सूत्र. [सं.]

**तंतुक** स्त्री. तार; तात : 'शीर कापून आपलें देखा। यंत्र केले करकमळिका। शिरा काढून तंतुका। रावणेश्वर गातसे।।'– गुच ६.७१.

**तंतुकणिका** स्त्री. (वनस्पति.) पेशीद्रवातील अन्नाचे प्राणिदीकरण करून ऊर्जा उत्पन्न करणारा घटक; पेशींचे ऊर्जानिर्मितिकेंद्र; पेशीद्रव्यातील गोल किंवा लंबगोल कण.

**तंतुकार** पु. तंतुवाद्य वाजविणारा.

**तंतुपट** पु. छाती व पोटाच्या मधोमध असणारा स्नायूंचा पडदा; श्वासपटल.

**तंतुमूळ** न. वनस्पतीचे तंतू असणारे मूळ. उदा. कांदा.

**तंतुमेह** पु. (वैद्यक.) १. लघवीतून धातूची तार जाण्याचा विकार. २. वरील प्रकारच्या विकाराचे मूत्र. [सं.]

**तंतुरूप काच** आगीपासून उष्णतेपासून संरक्षण देणारी, प्लास्टिक धाग्यांना मजबुती देणारी, विजेच्या तारांवर विद्युतरोधक, लांब धाग्यासारखी असणारी काच.

**तंतु(त,ती)वाद्य** न. वीणा, तंबोरा इ. तारा, तात लावलेले व तारा छेडून वाजवायचे वाद्य. [सं.]

**तंतुवाय** पु. १. विणकर; कोष्टी. २. कोळी (किडा). [सं.]

**तंतुवेचन** न. आंबाडीसारख्या तंतुमय वनस्पतीचे तंतू काढण्यासाठी पाण्यात भिजत ठेवण्याची क्रिया.

**तंतुशोथ** पु. शरीरातल्या विशिष्ट भागात तंतुमय ऊतीची वाढ होण्याची प्रक्रिया. [सं.]

**तंतू** पु. नर्मदा, यमुना या व इतर काही नद्यांत, तळ्यात व समुद्रात आढळणारा पुष्कळ हात असलेला दोरासारखा एक जलचर प्राणी. हा मनुष्यांना वेटाळून पाण्यात ओढून नेतो असे म्हणतात. याचे दात भाल्यासारखे असून त्यांना तीक्ष्ण धार असते आणि त्यांच्या कडांना खांडे असतात.– मपु ६.१८७५, पृ. २२६. [सं.तंतु]

**तंतोतंत** वि. १. सर्व बाबतीत जुळणारा; बरोबर संख्येचा, मापाचा, प्रमाणाचा; अगदी साम्य असलेला, सारखा, तुल्य. २. काठोकाठ; सांडोसांड; पुरेपूर.

**तंत्र** न. १. पहा : **तंतु** १,२. २. (राजाचा, बड्या गृहस्थाचा) लवाजमा; परिवार; इतमाम. ३. ताबेदारी; अनुवर्तन; चाकरी; पराधीनता; दास्य. ४. (एखाद्याच्या) वागण्याची पद्धत, धोरण, रीत. ५. दोन किंवा अधिक गोष्टी घडवून आणणारे एकच कारण, साधन किंवा एकाहून अधिक प्रश्नांचे एकच उत्तर. उदा. पाने का सडली? घोडा का अडला? विद्या का विसरली ? या तिन्ही प्रश्नांचे उत्तर 'फेर नाही म्हणून' हे आहे. ६. दुसऱ्या माणसाच्या आज्ञेप्रमाणे धोरण (जे त्याच्या आश्रितांना

सांभाळावे लागते ते); आश्रित वृत्ती; अधीनता. ७. धार्मिक विधीतील मंत्रानुसार करण्याचे आचार : 'जाणत्या असाध्य मंत्र तंत्र काळ। येर तो सकळ मूढ लोक।'- तुगा २५१४. ८. अध्यात्मज्ञानाची, साक्षात्काराची एक उपासना-पद्धत; विविध साधनांच्या द्वारे देवता व निसर्गशक्ती यांना स्वाधीन करून घेण्यासंबंधीचे शास्त्र. ९. प्राचीन धार्मिक वाङ्मयातील मंत्रशास्त्रविषयक भाग. १०. ग्रहांची स्थाने व गती ज्यांत सांगितल्या आहेत असा ज्योतिषशास्त्रातील एक भाग. ११. कापड विणण्याचा माग.- टिळे ३.४६. १२. एक विशिष्ट संप्रदाय व त्याचे वाङ्मय. [सं.]

**तंत्रनिकेतन** न. तीन वर्षांचा तांत्रिक अभ्यासक्रम असलेली शिक्षणसंस्था; (इं.) पॉलिटेक्निक.

**तंत्रपाठ** पु. (ग्राम्य, सांकेतिक) संभोग; मैथुन.

**तंत्रविद्या-शास्त्र-ज्ञान** स्त्री. न. १. यांत्रिक कामातील प्रक्रिया, त्यातील निरनिराळ्या वारंवार घडणाऱ्या क्रिया यांचे पद्धतशीर ज्ञान. २. वैज्ञानिक नियम व तत्त्वे यांचा वापर करण्याचे ज्ञान; उपयोजित विज्ञान.

**तंत्री** स्त्री. १. (तंतुवाद्यातील) तार : 'ओंकार तो तिचा वीणा। त्रिमात्रा तिन्ही तंत्री गहना।'- भारा बाल १.१०. २. वीणा; सारंगी. वि. १. तारा असलेले (वाद्य इ.). २. विणून तयार केलेले; कातीव; सुताचे केलेले. ३. तंत्र ज्याच्याजवळ आहे असा. ४. (ल.) कारस्थानी; धूर्त; कावेबाज; पाताळयंत्री; खोल स्वभावाचा. [सं.]

**तंत्वार्बुद** पु. तंतुयुक्त व स्नायूसारखे पेशीजाल असलेले निरुपद्रवी आवाळू. हे सहसा गर्भाशयात होते; (इं.) फायब्रॉईड.

**तंथ** पु. (व.) पहा : **तथ्य**

**तंदारी** स्त्री. १. गमजा. २. तंद्री. (क.)

**तंदुर(रु)स्त** वि. निरोगी; निकोप प्रकृतीचा. [फा.]

**तंदुर(रु)स्ती** स्त्री. आरोग्य; निरोगीपणा. [फा.]

**तंदुरा** क्रि. रांग. (माण.)

**तंदूर, तनूर** पु. १. भट्टी लावण्याकरता तयार केलेली, बांधलेली जागा; भट्टी. २. रोट्या भाजण्यासाठी बांधलेली मातीची मोठी भट्टी. [अर.]

**तंद्रा** स्त्री. १. आळस; मंदता; ग्लानी. २. झोपेची गुंगी; सुस्ती. [सं.]

**तंद्री** स्त्री. १. पहा : **तंद्रा**. २. (एखाद्या विषयाच्या मननात झालेली) एकाग्रता; तल्लीनता.

**तंबणे** अक्रि. रागाने पाहणे; आढ्यतेने वागणे.

**तंबर** वि. उन्मत्त; (गर्व, मद्य इ.नी) धुंद.

**तंबाकू-खू, तमाखु** पु. स्त्री. एक वनस्पतिविशेष. रोप सुमारे तीन फूट. पाने वाळवून त्यांना पाणी लावून त्यांचा उपयोग खाण्यासाठी व ओढण्यासाठी करतात. पान तीक्ष्ण व कफनाशक. गदळणे, अकोल, मिठ्ठास व खुंमासदार असे चार प्रकार. [ऑस्ट्रिक-टोबॅको]

**तंबी** स्त्री. धाकदपटशा; दटावणी; दहशत; धमकी. [अर्. तम्बीह]

**तंबुमासा** पु. सापाच्या तोंडाच्या आकाराची लांब मासोळी.

**तंबीट** न. राळ्याचे तांदूळ व गूळ असे उखळात कुटून त्यांत खोबरे, वेलदोडे वगैरे घालून करतात ते लाडू. याचा नागाला नैवेद्य दाखवतात.

**तंबुरची-जी** पु. तंबूर वाजविणारा.

**तंबुऱ्या** पु. दुधीभोपळ्याची एक जात. [अर.तंबूर]

**तंबू** पु. कापडाचे तात्पुरते एका खांबाचे घर. याच्या मोठ्या प्रकारास 'डेरा' म्हणतात. [फा.](वा.) ० **ताणून निजणे** - संसार इं.ची काळजी सोडून निजणे, झोपणे.

**तंबूर** पु. १. एक चर्मवाद्य; ढोल. २. (ल.) ढोलाचा आवाज; ढोल पिटणे; इशारा; नगारा वाजणे : 'असें कळलें कीं मोंगलाला तंबूर झाला। मानकऱ्याला केले पुकार।'- ऐपो ४३६. [अर.]

**तंबोरा** पु. चार तारा असलेले एक तंतुवाद्य. ह्याचा खालचा भाग कडू भोपळ्याचा केलेला असतो व त्याला लाकडाची निमगोल दांडी बसवलेली असते. ह्या दांडीच्या टोकाजवळील चार खुंट्यांना तारा गुंडाळलेल्या असतात. चारांपैकी पहिली पंचमात. दुसऱ्या दोन षड्जात व शेवटची खर्जात लावतात. हे वाद्य मूळ तुर्की आहे. [अर्. तंबूर]

**तंबो(बु)री** स्त्री. तंबोऱ्यासारखे पण त्यापेक्षा लहान आकाराचे तंतुवाद्य. तंबोरीचा स्वर बराच चढा असतो. हिची बनावट व तारांची मिळवण तंबोऱ्यासारखीच असते.

**ता** संस्कृतातील एक प्रत्यय. हा नामाला, विशेषणाला लावून भाववाचक नामे बनवितात. उदा. मधुरता = गोडी.

**ताइ** स्त्री. उष्णता : 'पर ते ताइ नुतरे अग्निमुखी : माहा प्रळयाचा'- ज्ञाप्र ५८४.

**ताइताळे** न. स्त्रियांचा, अनेक ताईत एकत्र ओवून केलेला, गळ्यात घालण्याचा एक दागिना; ताइताची माळ.

**ताइती** स्त्री. लहान ताईत. (राजा.)

**ताइफा** पु. जमाव; जात. [अर.]

**ताई** स्त्री. धिरडे करण्याचा मातीचा तवा.

**ताई** स्त्री. १. वडील बहीण. २. एक प्रतिष्ठित नाव; बहिणीला किंवा कोणत्याही स्त्रीला बहुमानाने संबोधण्याचा शब्द. हा काही प्रांतांत पुल्लिंगी व नपुंसकलिंगी अनेकवचनीही वापरलेला आढळतो.(आदरार्थी रूप). [क. ताय-यी; हिं.]

**ताईत** पु. १. सोन्याचा, चांदीचा अर्धचंद्रकार, नळकांड्याच्या आकाराचा मुलांच्या गळ्यात, दंडाला, मनगटाला बांधण्याचा एक बारीक दागिना. याने मुलांना दृष्ट लागत नाही असा समज आहे. कधी कधी त्यात मंत्र लिहिलेला कागद, अंगारा असतो. २. मुसलमानांच्या थडग्यावरील शवपेटीच्या आकाराचा फुगीर भाग. [अर.तअवीझ;हिं.]

**ताईत** पु. (दगडी बांधकाम) मोटेच्या थारोळ्याचा कण्याखालचा दगड.

**ताईतपेटी** स्त्री. स्त्रियांच्या गळ्यातील सोन्याचा दागिना.(अहि.)

**ताईबाय** स्त्री. १. बहीण. २. भावजय. (गो.)

**ताई भरणे** अक्रि. तावणे; तापणे; संतापणे : 'राजश्री बहुतसे ताई भरून मोठ्या कुर्न्याने बोलले.'- पेद ४०.६५.

**ताऊज-त** स्त्री. मोठा बांबू; नावेचा, होडीचा बांबू.

**ताऊस** पु. १. मोर. २. एक प्रकारचे तंतुवाद्य. सतारीला जसा भोपळा असतो तसा याला लाकडी मोर बसवलेला असतो व त्याच्यावरील भाग कातड्याने मढवलेला असतो. याला चार तारा असून त्या सा, प, सा, म या स्वरात मिळवलेल्या असतात. सतारीसारखेच वीस पडदे

असतात. हे वाद्य गजाने वाजवतात. [फा.]

**ताक** न. १. दही घुसळून लोणी काढून घेतल्यावर राहिलेला द्रवपदार्थ. २. सत्त्वहीन; नीरस पेय; पदार्थ : 'झाला घालाया घृत-वर्ण नभाचा परासु कवि ताकीं ।'- मोस्त्री ४.३९. [सं. तक्र] (वा.) **(धर्माचे) ० पिणे–** एखादी वस्तू घरी मिळणारी असूनही दुसऱ्यापासून तिची इच्छा, अपेक्षा ठेवणे : 'कोण वर्तुणक कसी रोज स्वदृष्टीनें पहातां। समजुन पुरतेपणें ताक कां धर्माचें पितां ।'- होला १०८. **ताकाचा थेंबही नसणे –** (ताक ही अतिशय सामान्य वस्तू असतानाही परिस्थितीमुळे तेवढेही नसणे, यावरून) घरात काहीही वस्तू नसणे. **ताका मिठाक गांठ–** हलाखीची परिस्थिती.(गो.) **ताकाला जाऊन भांडे, गाडगे लपवणे –** दुसऱ्याजवळ काहीही मागायचे झाले तर ते उघडउघड, सरळ न मागता आढेवेढे घेऊन मागणे; दुसऱ्याची याचना करण्याचे पत्करून याचनेकरता तोंड वेंगाडण्यास कचरणे. **ताकास तूर लागू न देणे –** (एखाद्या गोष्टीचा दुसऱ्याला) बिलकुल थांग लागू न देणे; टाळाटाळी करून स्वत:च्या मनातील विचार दुसऱ्याला समजू न देणे. **ता म्हणता ताकभात समजणे –** स्थलकालादी छोट्याशाही संकेतावरून कोणतीही पूर्ण गोष्ट तर्काने चटकन जाणणे.

**ताक** स्त्री. (गो.) पहा : **ताकद**

**ताक** न. टोक. (गो.)

**ताककण्या** स्त्री. अव. गरिबाचे अन्न; जाडेभरडे जेवण; मीठभाकर.

**ताकघाटा** पु. ताक व ज्वारीचा भरडा; ताककण्या : 'ज्या भक्षिती केवळ ताकघाटा ।'- सारुह ३.१६.

**ताकट–ड** स्त्री. न. ताकाचा अंश शिल्लक असलेले लोणी किंवा लोण्याचा अंश शिल्लक असलेले ताक.
वि. पहा : **ताकपिरा** १ : 'शाहाणपणे वेद मुका। गोपिकां त्या ताकटी ।'- तुगा ३२८१.

**ताकडातुकडा** पु. (दोरी, वस्त्र, कागद इ.कांचा) लहान-मोठा तुकडा.

**ताकडी** पहा : **तागडी** : 'हृदय ताकडीं जोखा तुम्ही ।'- दावि १५९.

**ताकत–द** स्त्री. १. शक्ती; बळ; जोर. २. सामर्थ्य; योग्यता, क्षमता. [अर.; हिं.]

**ताकतई–तय–तव–तेय–तेव–त्येय–तोय–तोव** स्त्री. फोडणीचे ताक; कढी; मठ्ठा.

**ताकतीक, ताकीत** (गो.) पहा : **ताकीद**

**ताकतीक,ताकीस** स्त्री. घाई; लगबग. (गो.) [पोर्तु. ताकीद]

**ताकपाणी** न. १. (व्यापक) दही घुसळणे, ताक करणे, लोणी काढणे इ. कामे करणे २. ताक; दही इ. ३. पहा : **ताककण्या.** ४. (ल.) अल्पाहार; थोडे जेवणखाण.

**ताकपातसे** न. ताकात शिजवलेली भाजी.

**ताकपिठ्या** वि. ताक व पीठ इतक्या लहान बिदागीवर पुराण सांगणारा, कथा करणारा (हरिदास); (सामा.) अल्पविद्य; बाताड्या; तुटपुंजे ज्ञान असणारा.

**ताकपिरा–पीर** वि. १. ताक पिऊन राहणारा (गरीब). २. (ल.) घामट; घाणेरडा; ओंगळ : 'गौळीयांची ताकपीरें । कोण काय पोरे चांगली ।'- तुगा ३६८४.

**ताकमेढ–ढी** स्त्री. ताक घुसळण्याचा खांब.

**ताकवणी** न. फार पाणी घातलेले, अतिशय पातळ, पाणचट ताक.

**ताका** पु. (कृषि.) पिकावर पडणारा एक रोग. याने धान्य काळे पडते.

**ताकावणे** अक्रि. (पीक, धान्य इ.ना) ताका रोग होणे.

**ताकीद–त** स्त्री. १. खरमरीत, सक्तीचा हुकूम; बजावून सांगणे; सूचना; इशारत. २. जरब; सक्ती : 'तों गिलच्यांची ताकीद भारी.'- भाब २६. ३. (कायदा) सरकारी आज्ञा; मनाई हुकूम. [अर.]

**ताकीदचिठी–पत्र** स्त्री. न. (कायदा) सरकारने आपल्या अधिकाऱ्याला, वरिष्ठ अधिकाऱ्याने कनिष्ठ अधिकाऱ्याला पाठविलेले ताकिदीचे पत्र.

**ताकीददार** पु. १. सरकार इ.नी ताकीद देण्यासाठी पाठविलेला मनुष्य, शिपाई. २. बाजारबुणगे इ.पासून शेत, गाव इ.चे रक्षण करण्यासाठी नेमलेला मनुष्य; रखवालदार.

**ताकोला** वि. अप्रौढ; अद्याप पूर्णपणे न वाढलेला; अपक्व; विशिष्ट अवस्थेला न पोचलेला; अपूर्ण. हा शब्द बाप्या, घोडा, बरा इ.शब्दांपूर्वी गुणवाचक म्हणून येतो. [अर्. ताक्+म. ओला]

**ताक्या** वि. ताक विकणारा; ताकविक्या.

**ताखडा** वि. चलाख; हुशार; लहानसहान, किरकोळ कामे करण्यात निपुण; कुशल; ताकडा : 'ल्याली असे जे मुदराखडीला । झाली असे तांतहि तांखडीला ।'- सारुह ६.३५. [अर.ताक्.फा. ताख्त]

**ताग** पु. १. (कृषि.) अंबाडीसारखे एक झाड; सण. याची लागवड भारतातील सर्वत्र होते. याचे पीक वाखासाठी व हिरवळ खतासाठी करतात. याच्या वाखाची पोती, सुतळी, दोरखंड इ. करतात. ज्यूटतागापासून कापड (गोणपाट) तयार करतात. २. वरील झाडाचा तंतू; वाख.

**तागकू** पु. (ल.) काथ्याकूट; शुष्क वाद. - राको.

**तागडथोम** वि. ज्यांत मृदंग वाजवून त्या तालावर पात्रे नाचत असे पौराणिक नाटक.- मरं ३०. [ध्व.]

**तागड भेटणे** काहीच न मिळणे. (व.)

**तागडा** पु. (उप.) दुकानदार. (गो.)

**तागडी** स्त्री. तराजू; ताजवा; तोलण्याचे दोन पारडी असलेले साधन.

**तागलवाट** स्त्री. आपल्याला कंटाळा आला असेल त्या वस्तूचे, जनावराचे विक्री इ. प्रकाराने दूरीकरण; विल्हेवाट.

**तागा** पु. १. नाव, होडी ढकलण्याचा बांबू; डांग : 'तेथ तागा लागेल काई। बोलाचा या ।'- ज्ञा ६.३१५. २. (ल.) थांग.

**तागा** पु. विल्हा; व्यवस्थित मांडणी.(वा.) **ताग्यास ठेवणे –** (सामानसुमान) लावणे; योग्य ठिकाणी ठेवणे; व्यवस्थित मांडणे.

**तागा–का** पु. १. मागावरील सबंध, न फाडलेले कापड; (कापडाचे) ठाण. २. दोरा; धागा. ३. (ल.) थांग; संबंध; मागमूस : 'तरी मनुष्यदेहाचा तागा। घेऊनि रुसती ते जगा।'- ज्ञा १६.४०६. [फा. ताका]

**तागाईत** न. कागद चिवट करण्यासाठी त्याला खळ लावण्याचे उपकरण : 'सुऱ्या कातऱ्या जागाइंत । खळीं घोंटाळें तागाईत ।'- दास १९.१.१५.

**तागाईत** वि. तरण्याजोगा; टिकाऊ.– मनको.
**तागाई(य)त** शअ. १. पर्यंत; पावेतो; विवक्षित काळापर्यंत. २. पासून : 'मिरजेहून निघाल्या तागायत.'– ऐलेसं ८.३८५३. [फा.]
**तागाचा बेवड** शेतातील तागाचे पीक नांगरून जमिनीत गाडणे; शेताला तागाचे हिरवे खत घालणे.
**तागादणे** अक्रि. (धंदा, काम, संसार इ.ना) कंटाळणे; विटणे; त्रस्त होणे.
**तागी** स्त्री. तागाची एक बारीक जात.– कृषि ३७३.
वि. तागाचे विणलेले (वस्त्र).
**तागुर** पु. अंकुर; ताणा.
**तागेर** वि. पहा : **तगीर** :'तुम्हासी तागेर करून दुसरे गुा करतील त्या गुा जीवे मारूं.'– एसंसा १.१४. [अर. तगीर]
**ताज** स्त्री. १.(पत्त्यांचा खेळ) एक डाव; पत्ते; पत्त्यांचा जोड. २. गंजिफातील एक रंग. [फा.; हिं. तास]
**ताज** पु. १. मुगुट; टोप. २. पुढारी; प्रमुख मनुष्य; नेता. [फा.]
**ताज** पु. स्त्री. १. (नाविक) उथळ पाण्यातून होडी ढकलण्याचा लांब वेळू, बांबू; चिव्याची काठी. हा साधारणपणे दहा हात लांब असून याच्यावर खाडीची खोली मोजली जाते : 'स्त्रीने ताज मारीत ती होडी थोडक्यात पडावाला भिडविली.'– कोरकि ३९५. (सामा.) लांब बांबू. याचा फुले, फळे काढण्यासाठी आकडीसारखा उपयोग होतो. २. मोठ्या जातीचा बांबू; माणगा. (को.) [गो.]
**ताजक** न. (ज्यो.) कुंडलीवरून एखाद्याचे वर्षफल, मासफल इ.सांगणे; भविष्य. २. फलज्योतिषातील गणिताची शाखा. [हिं.; सं. जातक]
**ताजकी** स्त्री. भलेपणा; मोठेपणा.
**ताजगी** स्त्री. १. तेजी; भरभराट; ऐश्वर्य : 'सिवाजीराजे यांची ताजगी आतां कानानें ऐकवत नाही; ताजगी म्हणजे मोठा पराक्रम म्हणोन दिल्गीर जाहले.'– मदरू १.७७. २. प्रसन्नता; उत्साह; उमेद. ३. सौख्य. [फा.]
**ताजम** पु. पहा : **ताजीम**
**ताजवा** पु. सोने, रुपे इ. तोलण्याचा लहान तराजू, काटा.
**ताजवा** पु. (मल्लखांब) बगली करून बोंडावर जाऊन बेंबी बोंडावर ठेवून समतोल राहणे.
**ताजवा** पु. (गणित) १. गुणाकाराचे चिन्ह. '×' अशी खूण. २. अशा चिन्हाने गुणणे; गुणाकार. (क्रि. करणे, मिळणे, मिळवणे, चुकणे).
**ताजवा फरारा** (मल्लखांब) ताजवा करून धरलेला तोल.– व्यायाम ३.१९.
**ताजा** पु. घोड्याच्या तोंडात घालावयाची चामड्याची म्होरकी; अश्वमुख–कवच.'– राव्यको ५.२०. [अर. ताझी]
**ताजा** पु. १. मोहरमात मुसलमान लोक हसनहुसेनाविषयी गातात ते शोकगीत. २. ताबूत; डोला; ताजिया. [अर. तअझिया]
**ताजा** पु. १. प्रफुल्ल; टवटवीत. २. शिळा नसलेला; नवा; नवीन. ३. (ल.) गुटगुटीत; गुबगुबीत; लठ्ठ; धष्टपुष्ट; सतेज (मनुष्य, जनावर इ.). [फा. ताझा] (वा.) **ताजं–जा व्हनं** – लठ्ठ होणे; खाणे; **ताज्या घोड्याची गोमाशी** – जोपर्यंत फुकटचे लुबाडणे. (अहि.) एखाद्याजवळ संपत्ती आहे तोपर्यंत त्याची खुशामत, हांजी हांजी करणारा; तोंडपुंजा मनुष्य; पंक्तिपठाण.
**ताजा कलम** पत्र लिहून झाल्यानंतर विस्मरण वगैरेमुळे राहिलेला किंवा नवीन सुचलेला असा शेवटी लिहितात तो मजकूर. [फा.]
**ताजातवाना–न** वि. प्रफुल्ल; टवटवीत, चपळ; चलाख; अगदी तयार (मनुष्य, जनावर, वृक्ष इ.).
**ताजा रोजगार** भरपूर, भक्कम पगाराची, प्राप्तीची नोकरी, जागा.
**ताजी** वि. अरबी (घोडा). [अर. ताझी]
**ताजी** वि. श्रेष्ठ; मोठा. – लोसाको.
**ताजीम** स्त्री. (एखाद्याच्या सन्मानार्थ) उभे राहणे; उत्थापन; सलामी. (क्रि. देणे, घेणे) . [अर. तअझीम]
**ताजूब** स्त्री. पु.न. आश्चर्य; चमत्कार; नवल.
वि. चमत्कारिक; नवलपूर्ण; आश्चर्यकारक. [फा. तअज्जुब]
**ताज्या, ताजकरी** वि. ताजाने, बांबूने गलबत ढकलणारा.
**ताट** न. १. जेवणासाठी उपयोगी उथळ व पसरट धातुमय पात्र; तबक. २. फासा, नाके इ.विरहित अशी पुतळी; पुतळीचे ताट असेही म्हणण्याचा प्रघात आहे.[क. तट्टे] (वा.) **ताटाला बसणे**– जेवायला बसणे. **ताटावरचे पाटावर, पाटावरचे ताटावर**– श्रीमंतीचा डौल; श्रीमंतांच्या बायका काम न करता आळसात व चैनीत वेळ घालवतात त्यावरून. **ताटावरून ओढणे, उठवणे** – १. (एखाद्याला) जेवता जेवता उठवणे; (एखादा) जेवत असताना त्याचा अपमान करून त्याला उठवणे. २. निर्वाहाचे साधन काढून घेणे. **ताटाखालचे मांजर** – पूर्णपणे आज्ञांकित मनुष्य; मिंधा.
**ताट** न. पहा : **ताठ** पु. ३
**ताट, ताटक** न. गोणपाट; ताटुक.
**ताट** स्त्री. (क.) शेर, सावर इ. सारख्या जिवंत झाडांचे कुंपण.
**ताट** न. खरबुजाची एक जात; हे आतून तांबूस असून आकाराने चपटे असते.– कृषि ५७२.
**ताट** न. १. (जोंधळा, बाजरी इ.चे) उभे, हिरवे जिवंत रोप. २. जोंधळा, बाजरी, बोरू इ.चे कांड, काठी.३. भातशेतातील तण.
**ताटकळणे** अक्रि. १. (बराच वेळ हालचाल न केल्याने शरीर, शरीरावयव इ.) ताठणे; ताठरणे; जड होणे. २. (फार वाचल्याने, झोपेमुळे, तिष्ठत बसल्याने डोळे) ताठरणे; जड होणे. ३. (एखाद्याची वाट पाहत) तिष्ठत बसणे. [सं. तक्]
**ताटकळा–ळ–ळी** पु. स्त्री. १. ताटकळल्यामुळे शरीर, शरीरावयव, डोळे इ.स येणारा ताठपणा; जाड्य; ओढ; ताठरपणा. (क्रि. बसणे, येणे, भरणे). २. हातपाय तापणे; आंगमोडे, अळेपिळे देणे. (क्रि. देणे, येणे.)[सं. तक्] (वा.) **ताटकळ्या देत बसणे** – (एखाद्यासाठी) तिष्ठत बसणे.
**ताटका** स्त्री. १. रावणाच्या बहिणीचे नाव; त्राटिका. २. (ल.) जहांबाज, कजाग बायको. ३. (ल.) धिप्पाड, कुरूप स्त्री. [सं.]
**ताटकाढा–ढ्या** वि. उष्टे काढणारा : 'मी दासु किंकरू तुझें । देविकाताटकाढा हें ब्रीदु माझें ।'– शिव ७६.
**ताटपाट** पु. अव. ताटे, पाट इ. मांडून केलेली जेवणाची तयारी : 'ताट–

पाटाची वेळ असून तशी तजवीज लागूं न शकल्यास मेजाची तयारी ठेवावी.'- (बडोदे) स्वारीनियम ७६.

**ताटफळे** न. ताटे ठेवण्याची फळी. (गो.)

**ताटभाने** एका ताटात जेवणे.

**ताटली** स्त्री. लहान ताट.

**ताटवा** पु.फुलझाडांचा वाफा; तक्ता. पहा : **ताटी** ५ [सं. तट]

**ताटवा** पु. तट्ट्या; बांबूची चटई. (व.)

**ताट व्हनं** रागावणे; रागावून, धावून जाऊन बोलणे. (अहि.)

**ताटशिंगार–ऱ्या** वि. (उ.) पंक्तिपठाण; आयते खाणारा; खायला आधी व कामाला कधीमधी याप्रमाणे वागणारा.

**ताटस्थवायु** पु. मूर्च्छारोगाचा एक प्रकार.

**ताटस्थ्य** न. १. प्रतीक्षा; वाट पाहात ताटकळणे. २. (भांडणाऱ्या दोन्ही पक्षांबद्दल) उदासीनवृत्ती; तटस्थपणा; तिऱ्हाईतपणा. ३. (एखादे कार्य इ.ची) थांबणूक; तात्पुरते बंद करणे. [सं.]

**ताटंक** न.स्त्रियांचे कर्णभूषण; तानवडे.

**ताटातूट** स्त्री.दोन जवळच्या नात्यातील व्यक्तींचा केलेला किंवा झालेला वियोग; परस्परांपासून अनिच्छेने वेगळे होणे.

**ताटाळे** न. ताटे ठेवण्याचे लोखंडी पट्ट्यांचे घर. (कर.)

**ताटी** स्त्री. १. कामट्यांच्या चौकटीला गवत, पाने इ. बांधून (दार, खिडकी, कुंपण, भिंत इ.ना लावण्यासाठी) केलेले आच्छादन; आवरण; झडप; वाळ्याचा पडदा. २. मखराची शोभिवंत चौकट. पहा : **मखर.** ३. तिरडी. ४. खाली काठ्या बांधून तिरडीप्रमाणे केलेले (पळसाची पाने वगैरेंचे) लांबट ओझे. ५. (फुलझाडांचा) ताटवा; वाफा; मंडप : 'लावण्यवेलीची ताटी लागली । कीं श्रृंघाराची वांठीवं पाहलैली ।'- शिव ५९७. ६. कुंपण; वई (शेर, सावर इ. शब्दांना जोडून उपयोग) : 'जयातें अभ्यासाची घरटी । यमनियमांची ताटी । जे मनातें सदा मुठी । धरूनि आहाती ।'- ज्ञा २.३११. ७. पेरूच्या झाडांची ओळ; रांग. ८. पहा : **ताठ.** [क. तट्टी; सं. तट] (वा.) ० **कापणे–** १. पोबारा करणे; गुपचूप पळ काढणे; पसार होणे. २. अव्हेर करणे; अंतर देणे.

**ताटी–ठी** स्त्री. १. मूर्च्छा : 'विषयव्यालें मिठी । दिधलियां नुठी ताटी ।'- ज्ञा १२.२. २. समाधी.

**ताटी** पु. पहा : **चाटी;** कापडाचा किरकोळ व्यापार करणारा : 'ताट्याच्या पालामंदी । रुपयाचा जरीखण । फाडला एकलीनं ।'-लोसाको.

**ताटुक** न. झापा; लहानसे फाटक.(ना.)

**ताटू(टु)क** न. जीर्ण गोणपाट : 'ऐक भुसाऱ्याच्या पोऱ्या । जाऊन ताग तू पेरावा । गोणी ताटुक वळावा ।'- ऐपो ५३.

**ताटूक, ताट्या** न. पु. लहान रेडा; रेडकू (अव. ताटे). - बदलापूर २१.

**ताटूक** न. १. जोंधळा वगैरेंचे लहान ताट. २. लहान काठी; काटूक.

**ताटो(टू)ळ** पु.न. १. केळीच्या पानातील मधला दांडा; देठ. २. पहा : **ताटूक** न.१

**ताट्या** वि. १. पहा : **ताटशिंगार–ऱ्या.** २. एखाद्या मोठ्या गृहस्थाच्या पंक्तीला बसण्याचा मान असणारा : 'पैं बृहस्पती मुख्य आपण । ऐसे स्वस्तीश्रियेचे ब्राह्मण । ताटियेचे सुरगण । बहुवस जेथें ।'- ज्ञा ९.३२५.

**ताठ** पु. १. ताठरपणा; न वाकणे किंवा न वळणे; लवचीकपणाचा अभाव. २. पहा : **ताटकळा** १. ३. (ताजवा इ.चे) वजनातील विचलन, अशुद्धता; तंतोतंतपणाचा अभाव. ४. गर्व; दिमाख; ताठा.

वि. १. न वाकणारा; न लवणारा; कडक; न नमणारा; ताठर.२. न बदलणारा; आपले धोरण न सोडणारा; निश्चयी; करारी. ३. घट्ट; अंगाला चांगले बसणारे; सैल, लहान न होणारे (वस्त्र). ४. ताणलेला; ताणून लांब केलेला (दोर इ.). ५. तारवट; ताठरलेला; ओढलेला (डोळा इ.). ६. धष्टपुष्ट; धट्टाकट्टा; मजबूत बांध्याचा. ७. पुरेपूर; भरपूर; तब्बल; पुरता. ८. भरदार; ठसठशीत; घसघशीत (रोप, पीक, धान्य). ९. गर्विष्ठ. [सं. धृष्ट]

**ताठ** स्त्री. इरल्यासाठी तयार केलेली माणग्याची जाळी. (कु.)

**ताठणे** अक्रि. १. (अंग, नळ, अवयव) भरून येणे; फुगणे; जड होणे. २. (दोर इ.) ताणून लांब, सरळ केला जाणे. ३. (पोट इ.) फुगणे; फुगून ताठ, घट्ट होणे. ४. गर्वाने फुगणे; मदांध होणे. ५. मूर्च्छा येणे.

**ताठम** वि. ताठर; धष्टपुष्ट; तगडा; सुदृढ : 'ताठम टायबाल्टाला वार लागून पडला.'- रोज्यू ११३.

**ताठमारी** स्त्री. आट्यापाट्यांचा एक प्रकार. - व्याज्ञा ३.५७.

**ताठर** वि. १. हेकट; तिरसट. २. वाळलेला; कडक; कोरडा; शुष्क; टणक (कागद, पान इ.). ४. पहा : **ताठ** वि. २ ते ८.५. (व्यापक) अगडबंब; अवाढव्य; भरभक्कम; अवजड; बोजड.

**ताठरणे** अक्रि. पहा : **ताठणे १, ताटकळणे** १,२

**ताठवडा** पु. १. गुर्मी; मगरुरी. २. दिमाख; ताठपणा : 'उर उघडा घडोघडीं करुन कुच, दाखवितां तुज ताठवडा ।'- प्रला १६२.

**ताठा** पु. १. (दोर, दोरी इ.चा) ताण; तणावा; ताठपणा. २. पहा : **ताठ.** ३. पहा : **ताठवडा.** ४. थंडीचा कडाका.

**ताठा** पु. लाकडाच्या उभ्या काठ्या सरळ व एका रेषेत राहण्याकरता किंवा वई, कुंपण इ. ताठ राहण्याकरता बांधलेली आडवी काठी.

**ताठ्या** वि. कापड विकणारा. (व.)

**ताड** पु. नारळ, पोफळी या जातीतील एक उंच वृक्ष; तालवृक्ष. हा मूळ आफ्रिकेतील असून उष्ण व दमट प्रदेशात होतो. [सं. ताल]

**ताड** स्त्री. १. नागलीचा, नाचणीचा पेंढा, गवत. २. कोणत्याही हलक्या धान्याचा पेंढा, भुसा, फोलकट. [सं.]

**ताडक** न. ताडाची फांदी; झावळी.

**ताडकन–कर–दिनी–दिशी** क्रिवि. १. ताड असा आवाज होईल अशा रीतीने (चाबूक, चपराक, लाथ इ. मारणे). २. (ताड् असा आवाज करत) एकदम; चटकन; एकाएकी. पहा : **खाडकन** [ध्व.]

**ताडगूळ** पु. ताडीपासून बनवलेला गूळ.

**ताडगोळा** पु. ताडाच्या फळांतील मगज, गीर.

**ताडचे** सक्रि. वल्हविणे. (गो.)

**ताडणे** सक्रि. (चाबूक, छडी, काठी इ.नी) मारणे; चोप देणे; प्रहार करणे; शिक्षा देणे. [सं. ताडन]

**ताडणे** सक्रि. १. (अनुमान, तर्क, कल्पना इ.नी एखादी गोष्ट) जाणणे;

समजणे; अटकळ करणे. २. तुलना करणे; पडताळून, अजमावून पाहणे; खरे-खोटे ठरवणे (परिमाण, हिशेब, भाषण इ.). [हिं. ताडना]

**ताडताड** क्रिवि. १. जोराने आणि वेगाने, उंच. (क्रि. उडणे) २. आवेशाने; रागारागाने; तावातावाने (क्रि. बोलणे, मारणे). [ध्व. ताड् द्वि.]

**ताडतोडीचा झगा** उभ्या सोनेरी काड्या असलेला झगा : 'दसऱ्याच्या दिवशी ताडतोडीचा झगा भाऊस श्रीमंतांनी दिला'.- ऐलेसं ५०११.

**ताडन** न. मार; चोप; शिक्षा. [सं.]

**ताडपट्टी** पहा : **ताडपत्री** ४ : 'त्यावर ताडपट्ट्यांचे आच्छादन केलेलें असतें.'- ऐरापु प्र. ११.५७३.

**ताडपत्र** न. १. ताडाचे पान. पूर्वी यांचा उपयोग लिहिण्यासाठी करीत : 'तींच ताडपत्रें आणि त्याच अक्षरपंक्ति तसें महाराजांचे झालें आहें. - कमं २.५०. २. ताडपत्राचे स्त्रियांचे एक कर्णभूषण : 'ताडाची ताडपत्रें, गळा ल्यायली गळसरी।'- वसा ५५. [सं.]

**ताडपत्री** स्त्री. १. कोणत्याही गडद रंगाची एक व पांढऱ्या रंगाची एक अशा चौकटी असणारे एक प्रकारचे रेशमी लुगडे (साडी). तंजावर भागात हा प्रकार अधिक आढळतो. २. या प्रकारच्या वस्त्राचा शेला. लांबीला कमी व रुंदीला अधिक असा हा शेला स्त्रियांना व पुरुषांनाही वापरता येतो. ३. या जातीची पासोडी इ. वस्त्रे. ४. रोगण लावलेले एक प्रकारचे जाड व जलाभेद्य कापड; ताडपट्टी.

**ताडबाजी** स्त्री. अनुमानधपका; तर्क; कल्पनेने जाणणे.

**ताडभर, तीन ताड (उंच)** वि. अतिशय उंच.

**ताडमाड** पु. ताडाप्रमाणे उंच व सरळ वाढणारी नारळीच्या झाडाची जात. वि. १. (ताडाच्या झाडाप्रमाणे) फार उंच; फाजील उंच. २. फार खोल (विहीर, खड्डा, तळे इ.). (वा.) ० **उडणे** – आवेशाने, आनंदभराने उंच उड्या मारणे; बेहोष होणे.

**ताडमे** न. घोडे; तट्टू. (व.)

**ताडव** न. पहा : **ताड** स्त्री. १

**ताडा** पु. ताळा. १. (एखादा पदार्थ दुसऱ्याशी) ताडून, तुलना करून पारखणे; बरा-वाईट ठरविणे. (क्रि. पाहणे). २. ताडा; पडताळा; मेळ; प्रचीती. (क्रि. मिळणे, पडणे). ३. जोडीचा, तोडीचा, तोलाचा, बरोबरीचा मनुष्य, पदार्थ, जोड, प्रतिस्पर्धी. [फा.]

**ताडा** पु. पानमळा. (व.) - के १९.१.१९४०.

**ताडा** पु. तलवारीचे पाते; पान : 'कट्यार लोखंडी हरजिनसी ताड्यास मुलामा सोनेरी.'- वाडसमा १.७३.

**ताडा** पु. लढा; भांडण. (वा.) ० **खाणे** – उद्धटपणे ओरडून बोलणे : 'तेव्हा आम्ही रूकार करणार नाही. ऐसे म्हणोन ताडा खाऊन गेला.'- ऐको.

**ताडा, ताडी** पु. स्त्री. पिकावरील कीड : 'त्यावरी ताडी पडोन केवळ नाबूद केले.'- पेद २७.

**ताडा** पु. शेतातला गोठा : 'ती गाय सोडावयास गेलो की ती ताड्यात भिजत होती.'- ऐसंसाखं १ पृ. १७७.

**ताडाचा बुंधा** (ल.) धिप्पाड, धष्टपुष्ट, अगडबंब मनुष्य.

**ताडातुडी** क्रिवि. एकाएकी; अकस्मात्; तडकाफडकी; एकदम. [ध्व.]

**ताडातोड-डी** स्त्री. १. पहा : **ताटातूट.** २. (क.ल.) तगाद्यामुळे बरीचशी कामे मांथी मारली गेल्याने होणारी ओढाताण, कुतरओढ.

**ताडातोडा** पु.१. टाणाटोणा; छाछू; मंत्रतंत्र, जादूटोणा; तोडगा : 'विद्या सिकविली पंचाक्षरी। ताडेतोडे नानापरी।'- दास ५.२.५. २. गाण्याचे, कवितेचे एखाददुसरे कडवे. ३. मुख्य पिकात पेरलेले दुसरे, दुय्यम पीक; इरड. पहा : **इरवड**

**ताडाफाटा** पु. (उधळपट्टीने उडविलेला पदार्थांचा) फडशा; फन्ना.

**ताडामोडा** पु. १. (भांडीकुंडी, दागदागिने, किडुकमिडुक इ.ची केलेली) मोडतोड; विक्री : 'कांहीं केला ताडामोडा। विकिला घरींचा पाडारेडा।'- दास ३.४.१३. २. तातडी; घाई; धावाधाव : 'ताडामोडा करून नानांचे भेटीसाठी आलो ते आम्ही अभाग्या ! भेटी न झाली.'- नादीपा पृ. ८२.

**ताडासन** न. एक हात वर उंच करून उभें राहणें.- व्याज्ञा ४.४९६.

**ताडी** स्त्री. ताडाच्या पोयीपासून निघणारा मद्योपयोगी द्रव, रस; ताडापासून काढलेली दारू.

**ताडी** स्त्री. काडी; तारेचा लांब तुकडा; विशेषतः छत्रीची तार. [सं. तार]

**ताड्या** पु. ताडी काढणारा.

**ताढा** पु. १. ताठा; ताठपणा. (व.) २. ताण.
वि. तगडा; धिप्पाड; तरणाताठा.

**ताण** पु. १. (दोर, वस्त्र इ.कांना ओढ बसल्यामुळे त्याच्या ठिकाणी येणारा) ताठपणा; ओढ. (क्रि. देणे, बसणे, भरणे). २. (ल.) मोठा राग; संतापाचा झटका; फणकारा. (क्रि. येणे). ३. अविरत श्रम; सतत उद्योग; परिश्रम; (अतिश्रमाने येणारा) ताटकळा; शीण; थकवा; ग्लानी; ओढ. ४. अतिशय सक्त तगादा; निकड; नेट लावणे; अडचणीत आणणे. ५. तसदी; निकड; तंगी; तारंबळ; चिमटा; तंगचाई. (क्रि. भरणे, लागणे, बसणे). ६. अडचण होण्याजोगी उणीव, तुटवडा. (क्रि. पडणे). ७. (पाऊस) उघडणे, राहणे; खुलणे; उघाडी; उघडीक. (क्रि. देणे).
न. १. (एखाद्या कार्याला) अनुकूल परिस्थिती; ऐन वेळ; संधी. २. खिडकी, दार इ.च्या झडपाला अडकवण्याचा पितळी, लोखंडी आकडा. ३. भार; ओझे.[सं. तन] (वा.) **(एखाद्यावर)** ० **तोडणे** – एखाद्यावर तणतणणे; ताशेरा झाडणे. ० **देणे** – १. लांबणीवर टाकणे; खोळंबा, विलंब करणे. २. लंघन, उपास करणे.

**ताण** पहा : **तणावा** : 'त्या खांबास लावलेला ताण सार्वजनिक रस्त्यावर येत असल्याने अडथळा होत होता.'- के १२.९.१९३९.

**ताण** न. समुद्राला येणारी भरती; खाडीत, नदीत पाणी वर चढणे. (क्रि. येणे). [सं. तन]

**ताण** पु. (कुस्ती) एक डाव. प्रतिपक्षाचा एखादा अवयव पकडून तो खूप ताणणें.- के २९.११.१९३८.

**ताण-न** स्त्री. सरशी; चढाई; वरचढपणा. (क्रि. होणे, करणे).
वि. चढ; सरस. [सं. तन]

**ताण** वि. गबर; श्रीमान. (गो.)

**ताणणी** स्त्री. (तंबू, छत, चांदवा, ताणा इ.कांस) ताणून ताठ करण्याची, तणावा देण्याची क्रिया.

**ताणणे** सक्रि. १. ओढणे; लांब करणे; ताण देणे. २. (एखाद्याला) आशा

लावून लोंबकळत, तरंगत ठेवणे. ३. (मनुष्य, जनावर इ.कांना) प्रमाणाबाहेर राबवणे; तांगडणे; ताबडणे. ४. रागावणे; खरडपट्टी काढणे; खडसावणे. [सं. तन्] (वा.) **ताणून, हातपाय ताणून निजणे –** आरामशीर, मनमोकळेपणाने, निश्चिंतपणे झोपणे.

अक्रि. गमणे; चालढकल, अळमटळम, आज-उद्या करणे; गुटमळणे.

**ताणपट्टी** स्त्री. १. (बांधकाम) कैचीपैकी ज्या भागावर ताण पडतो तो (कैचीचा) लाकडी भाग. २. (शिंपी) शिवलेल्या कपड्याला मजबुती, ताठपणा आणण्यासाठी लावलेली कापडाची पट्टी.

**ताणशेवचे** अक्रि. रागारागाने बोलणे; तणतणणे. (गो.)

**ताणक्षमता** स्त्री. ताण सहन करण्याची क्षमता. एखादी वस्तू ताणली असता ज्या प्रतिबलाला तुटते, ते बल.

**ताणा** पु. १. (विणकाम) (मागावर ताणून लांब केलेले) उभे सूत; धागा. २. वेल; वेली. (राजा., को.) ३. वेलाच्या प्रत्येक पेराला फुटणाऱ्या कोवळ्या तंतूंपैकी प्रत्येक. यांनी वेल खांब, वृक्ष वगैरेंना वेटाळून धरून राहतो. पागोरा; वेलाची फूट. ४. (दुधाळपणा, भलेपणा इ. सद्गुणांना कारणीभूत घोडा, बैल इ. जनावराचे) बिजवट; अवलाद; मातृपरंपरा; जात. ५. कोळ्याच्या (कीटक) जाळ्याचा लांब तंतू. [सं. तन्] (वा.) ० **काढणे –** सूत मागावर घालण्यासाठी तयार करणे; उभे दोरे लावून घेणे.

**ताणाताण** स्त्री. १. पुन्हा पुन्हा, जोराने, धसफस करून ओढणे; ओढाओढ; ओढाताण. २. (ल.) मनाची अस्वस्थता; ओढ; व्यग्रता.

**ताणापणा** पु. (क्रोधाचा) जळफळाट; चडफडाट; फणफणणे; तडफडणे.

**ताणा(ना)पाजणी** स्त्री. १. ताण्याला ताठपणा आणण्यासाठी खळ लावण्याची क्रिया. २. (ल.) जिकिरीचे, दगदगीचे, त्रासाचे काम. त्रास, दगदग, जाच, कुतरओढ, ओढाताण या अर्थी जिवाची ताणापाजणी असा शब्दप्रयोग केला जातो.

**ताणारी** स्त्री. (विणकाम) मागावर घातलेला ताणा ताणण्याचे साधन.

**ताणी** स्त्री. (ताणा याचे अल्पत्वदर्शक रूप) उभ्या सुताचा, ताण्याचा काही भाग, तुकडा.

**ताणी** स्त्री. १. सुताचा झेला; गुंडी. (गो.) २. गर्दी; दाटी.

**तात** पु. १. बाप; पिता; वडील. २. वडीलधाऱ्या माणसासाठी आदरयुक्त संबोधन. [सं.]

**तात** स्त्री. १. तंतू; तार; धागा; बारीक दोरा; तातू. २. मेंढी, बकरी इ. जनावरांच्या आतड्यांची केलेली बारीक दोरी. ही कापूस पिंजण्याच्या कमानीला बांधतात. [सं. तंतु]

**तातकथय्या, ताथय्या** पु. १. नाचताना होणाऱ्या आवाजाचा वाचक शब्द. २. (ल.) मुले खेळताना करतात ती झिंबड; धिंगामस्ती; धुमाकूळ; थयथयाट; (मुलांचे) नाचणे, खिदळणे इ. नाचरंग. [ध्व.]

**तातड-डी** स्त्री. १. निकडीची वेळ; लवकर होण्याची जरुरी. (क्रि. लावणे, करणे). २. घाई; जलदी; लगबग; घायकूत. (क्रि. असणे, होणे, लागणे ). ३. निकडीचा हुकूम; देखत हुकूम : 'सुटेल तातडी। पाटील बुवाची। मग पडेल माडी।'– भज ४४.

**तातडणे** अक्रि. घाईत असणे; निकड लागणे; तातडी, त्वरा असणे.

**तातडसार** वि. १. कामात गुंतलेला; घाईत असलेला. २. लगबग्या; घायकुत्या; अधीरा.

**तातडी** क्रिवि. घाईने; त्वरेने; लगबगीने : 'यापरि बोलोनिया तांतडी। हंस सोडिला तये वेळीं।'– कथा १.८.३३.

**तातणे** अक्रि. तप्त होणे; तापणे : 'विरहानलें तातली।'– शिव १९६. सक्रि. त्रास देणे; त्रस्त करणे. [सं. तम्-तात]

**तातरा** पु. गलथा इ.च्या खालची पट्टी.

**तातल** वि. तापलेले : 'एके तातले साडपन्हरे। तैसी कपिलपणे अपारे।'– ज्ञा ११.१३२.

**तात(ता)वणे** अक्रि. १. पहा : **तवतवणे.** २. (काही कार्यात गढलेले असताना कोणी काही विचारल्यास) रागाने ओरडणे; चिरडीस जाणे; कातावणे. [सं.तम्]

**तातवेळ** स्त्री. तीव्रता; तीक्ष्णता :'तरी वैराग्याच्या तातवेळा। कां शिणावें।'– विपू १.२८.

**ताता** वि. ताजे. (झाडी)

**ताता** पु. १. तट; भिंत. २. साखळी; जाळे : 'स्वारसरंजाम यांचा ताता बांधून कुंभारवेशीचे नदीपर्यंत स्वारांचा थट उभा केला.'– होकै पृ.१२६.

**ताता** स्त्री. झोप. (गो. बालभाषा).

**ताती** स्त्री. इजा; ताप; बाधा : 'लाठा आइकिजे... म्हणौनि न ये ताती करूं।'– उषा १०७१.

**तातीतोडा** पु. किडूकमिडूक : 'आपला आहे तातीतोडा तो आपल्यापाशीं असूं द्या.'– प्रतिआत्म ७५.

**ता(तां)तू** पु. १. धागा; दोरा; तंतू; तार; सूत : 'जैसा फुलाचे नि सांगातें। तांतु तुरंबिजे श्रीमंतें।'– ज्ञा १८.८२२. २. पिंजलेल्या कापसाचा तार. ३. (बायकी) मुळासकट उपटलेली व सोळापेक्षा कमी कांडी नसलेली हरळी गवताची काडी. लग्नानंतर पाच वर्षे मुली ह्याची नवरात्रात अष्टमीच्या दिवशी पूजा करतात व देवीला अर्पण करतात. ४. (बायकी) एक हात लांबीचा रेशमी दोरा. नवपरिणीत वधूने त्याची महालक्ष्मी व्रत म्हणून पाच वर्षे पूजा करायची असते. आपल्या लग्नाच्या वर्षाइतक्या गाठी त्या दोऱ्याला द्यायच्या असतात. (वा.) **तातू करणे –** आहेर करणे. [सं.तंतु]

**ताता(ते)ड** पु. एक प्रकारची तांबडी मुंगी; चाचड. (गो.)

**तातोबा, तात्या** पु.वडीलधाऱ्या माणसासाठी आदराचे संबोधन.

**तातोबाची मढी** (उप.) दुबळा व रोड मनुष्य. (ना.)

**तात्कालिक** वि. १. त्या वेळचा, काळचा. २. निकडीचा; त्या वेळी आवश्यक असलेला. [सं.]

**तात्पर्य** न. १. (भाषण, गोष्ट, लेख, वृत्तांत इ.तील) सारांश; मथितार्थ; भावार्थ; मतलब; अभिप्राय. २. हेतू; धोरण; उद्देश; कारण. ३. तत्परपणा. [सं.]

**तात्पुरता** क्रिवि. मुद्दाम; जाणूनबुजून; समजून-उमजून. [सं. तत्पूर्वक]

**तात्पुरता** वि. १. त्या वेळेपुरता; हंगामी; चालचलाऊ; ती वेळ निभावण्यापुरता. २. मुद्दाम; तेवढ्याच कामाकरता. (ना.) ३. लगबगीने. (ना.) [सं.तत्+म.पुरता]

**तात्यापंतोजी** पु. १. मराठी शाळामास्तर; गावठी शिक्षक. २. (निंदाव्यंजक) जुन्या वळणाचा शिक्षक.

**तात्रा** पु. त्रागा; राग; संताप : 'बालाजीपंत नाखूष होऊन तात्र्यानं पत्र लिहून पाठविले होते.' – पुणे अखबार भाग १, पृ. १६५.

**ताथवड, ताथा, ताथोड–ट** वि. १. ताजा; शिळा, वाळका नसलेला : 'काथी ताथी साथी चरूसह चाकवत चुका,' – अमृत ३४. २. नवा; नवीन; अगदी अलीकडचा; सांप्रतचा. (को., ना., व .)[फा. ताझ]

**ताथॉमाथॉ** पु. बडेजाव; बरदास्त; पाहुणचार; आतिथ्य. (गो.)

**तादा** पु. तडजोड करून ठरविलेली रकम : 'बाळशास्त्री याणी तादा ठरऊन ऐवज देण्यास सिद्ध झाले.' – शेंदुर्णीसंबंधीचे महत्त्वाचे कागदपत्र–भाग १, पृ. ६१.

**तादात्म्य** न. १. एकरूपता. २. आत्मा व भावना यांमधील अद्वैत.[सं.]

**तादाद** स्त्री. येणे; बाकी : 'वसूल काय पोंचून बाकी राहिली, किंवा सालीम ऐवज रहात आला याची तादाद समजावी.' – मइसा ५.१०६.

**तादृश** वि. १. त्याच्यासारखा; त्या प्रकारचा; तसा. २. साधारण; जेमतेम; यथातथा; विशेषसा; तितकासा; तितपत; म्हणण्याजोगा नव्हे (चांगला, उपयोगी, सुरेख इ.). अकरणरूपी प्रयोग : 'त्या वेळेस मराठी भाषा तादृश परिपक्वतेस आली नव्हती.' – नि ३१०. ३. अल्पही; यत्किंचितही. [सं.]

**ताधड** स्त्री. घाई; धांदल.(ना.)

**ताधराव(वि)णे** सक्रि. (एखाद्याला काही कार्याविषयी) गर्दी, घाई करणे; घाईने घाबरे करणे; तगादा लावून गोंधळून टाकणे.

**तान** स्त्री. १. (संगीत) सूर; स्वर. २. (संगीत) आलाप; लकेर; स्वरांचा केवळ आरोह करणे. ३. (संगीत) स्वरांनी रागाचा विस्तार करणे. याचे शुद्धतान व कूटतान असे दोन मुख्य प्रकार आहेत. ४. एका दमात, नेटात केलेली क्रिया; सारखा वर्षाव; झोड; झिंबड. (क्रि. घेणे, झाडणे). [सं.]

**तान** वि. १. घट्ट; भरदार विणीचे; मजबूत (कापड, वस्त्र इ.). २. महाग; भारी किंमतीचे. (नंदभाषा)

**तानकर्म** न. १. (संगीत) गायनापूर्वी सूर मिळवण्याकरता, कंठ साफ करण्याकरता आलाप, तान घेणे इ. क्रिया; सारेगम करणे; आवाजी लावणे; सूर जमविणे. २. एखादा सूर, आलाप स्वतःशीच गुणगुणणे.

**तानगाभी, तानपी** वि. वासरू दूधपिते असताना गाभण होणारी; लवकर लवकर गाभण होणारी; दरवर्षी विणारी (गाय, म्हैस इ.).

**तानणे** सक्रि. पळविणे; दमवणे. (माण.)

**तानपणे** अक्रि. लहान मुलांना उन्हाळ्यामुळे विकार होणे.

**तानपुरा** पु. तंबोरा.

**तानबाजी** स्त्री. १. आलापचारी. पहा : **तानकर्म**. २. मोठ्याने आणि लोचटपणाने ओरडणे; गर्जणे; गागणे.

**तानमान** न. १. (एखाद्या कार्याला) योग्य, अनुकूल परिस्थिती; स्थळ आणि काळ यांची अनुकूलता; संधी; ताळतंत्र; रागरंग. २. यथायोग्य जुळणी आणि प्रमाणबद्धता; मेळ; जम. ३. गाणेबजावणे : 'राग रंग तानमान। करी तो रजोगुण।' – दास २.५.२४.

**तान मारणं, तानी धरनं** आपले मत धरून बसणे; दुसऱ्याचे न ऐकणे. (अहि.)

**तानवट** न. (विणकाम) कुकडे (चातीवरील सूत) गुंडाळण्यासाठी व चिवट (सुताची गुंडाळी) तयार करण्यासाठी केलेली खुंट्यांची, मेखांची चौकोनी रचना. [सं.ताण+म. वट]

**तानव(वी)ड, तानवडे, तानोडे** न. स्त्रियांचे एक कर्णभूषण; ताटंक : 'तानवडें मणिमंडित कर्णीं।' – अकक २ गोसावीनंदनकृत ध्यान ३.

**ताना** पु. पुष्कळशा सुतांचा पिंडाळा; गुंडी.(व.)

**ताना** पु. ताठा : 'गर्वमदें किति धरसिल ताना।' – आपद २५. [सं.तन्]

**तानाशा** पु. १. प्राचीन काळी होऊन गेलेला एक सम्राट; तानाशाह. २.(ल.) चैनी व विलासी मनुष्य; रंगेल गडी.

**तानीमासी** स्त्री. तान्हे मूल. (चंद्रपुरी)

**तानीया** पु. (जरतारधंदा) तार ओढणारा मनुष्य.

**तान्नावणे** सक्रि. ताणणे; ताणून बांधणे; मारणे.

**तान्हवट** वि. १. पहा : **तानगाभी**. २. (एखाद्या समुदायापैकी) उत्कृष्ट; मुख्य; उत्तम. ३. तान्हा.

**तान्हा** वि. १. आईच्या अंगावर पीत असलेला; दूधपिता; स्तनपान करणारे बाळ . २. जिचे वासरू अंगावर पिते आहे अशी, नुकतीच व्यालेली गाय, म्हैस इ. ३. एक वर्षाच्या आतील वयाचा (बैल). (ठाकरी)

**तान्हापोळा** पु. पोळ्याच्या दुसऱ्या दिवशी करावयाचा मुलांचा मातीच्या बैलांचा पोळा.

**तान्हुला** वि. पहा : **तान्हा** : 'येकटें महीं मम तान्हुलें।' – नव १२.९०.

**तान्हे पारठे** आईच्या अंगावर पिणारे मूल व त्याच्याहून मोठी असलेली मुले समुच्चयाने; (सामा.) चिलीपिली; लहान मुले.

**ताप** पु. १. ज्वर; शरीराचा दाहदर्शक विकार. २. (सूर्याची, अग्नीची) उष्णता; तिच्यामुळे झालेली पदार्थांची उष्ण अवस्था; ऊनपणा. ३. (ल.) क्रोध; लोभ इ. मनोविकारांचा क्षोभ; तीव्रता; उद्दीपित अवस्था. ४. संसारामुळे होणारी दगदग; यातायात. ५. तळमळ; मनाची अस्वस्थता; संताप. ६. (सामा.) दुःख; कष्ट; त्रास . ७. (सावकार, राजा, लुटारू, उंदीर, ढेकूण इ.नी केलेला) उपद्रव; छळ; जाच; छळणूक .
स्त्री. १. (पावसाळ्यातील, पावसाळ्याच्या नंतरचे) सूर्याचे प्रखर ऊन. २. शेक; विस्तव; शेकोटी. (व.,ना.) ३. उन्हाळा : 'निरंतरामंद मरंद वाहे। तापांतही यास्तव रिक्त नोहे।' – र ८.[सं. तप्](वा.) ० **येणे** – (तंबाखूचा धंदा) तंबाखूची पाने कापून त्यांच्या जुड्या बांधून, दडपून ठेवल्यावर ती तिसऱ्या–चौथ्या दिवशी गरम होणे.

**तापक** पु. पाणी, हवा तापवण्याचे साधन.

**तापकरी** वि. तापाने आजारी असलेला.

**तापट–ड** वि. १. क्षुल्लक कारणाने संतापणारा; तामसी; रागीट. २. चलाख; चपळ; तडफदार. ३. पाणीदार; रगदार; तल्लख (घोडा इ.).

**तापटणे** क्रि. तडतड करणे; फार त्रास घेणे :'तुमच्याशिवाय काम होणार नाही म्हणून तापटत आलोय तुमच्याकडं नाना.' – मक ६०.

**तापटणे** न. १. नांगर हाकणाऱ्या शेतकऱ्याचा आखूड चाबूक, आसूड. (लांब चाबकाला चाव्हऱ्या आसूड म्हणतात.) २. (काही प्रांतांत)

चाव्हऱ्या आसुडाचा दांडा.

**तापटी-ती** स्त्री. पहा : २ **ताफा**

**तापडाई** स्त्री. १. स्वभावाचा तामसीपणा; रागीटपणा; तापटपणा. २. पाणीदारपणा; तलखपणा; चपळता.

**तापणे** न. पाण्याने भरलेले भांडे : 'ते तापणे यासि जातीए' – लीचउ ५१३.

**तापणे** अक्रि. १. (सूर्य, अग्नी, ज्वर इ.मुळे) पर्वत, शरीर इ. तप्त होणे. २. (ल.) (कामक्रोधादी विकारांनी) क्षुब्ध, संतप्त, उद्दीपित होणे; संतापणे; रागावणे. ३. (ल.) (दुःख, शोक वगैरेमुळे) तळमळणे; व्याकूळ, घाबरे होणे; पोळणे : 'अनुदिनी अनुतापे तापलो रामराया ।'– रामदास करुणाष्टक १ (नवनीत पृ. १७०). ४. (विषयवासना, तृष्णा) चेतणे; उद्दीपित, प्रक्षुब्ध होणे; विकोपास जाणे. ५. शेकणे. (व.)[सं.तप्] (वा.) **गळा तापणे** – काही वेळ गायन केल्याने कंठातून बराच मोठा स्वर निघू लागणे. **तापल्या तव्यावर (पोळी) भाजून घेणे** – एखाद्या कार्यात दुसरे कार्य सहजासहजी होण्यासारखे असल्यास अवश्य करून घेणे.

**तापतोबरा** पु. आग पाखडणे; रागाचे अवडंबर; चडफडाट; बडबड; तोंडसुख; अपशब्दांचा भडिमार. (क्रि. करणे, लावणे, मांडणे).

**तापत्रय** न. आधिदैविक, आधिभौतिक व आध्यात्मिक अशी तीन प्रकारची दुःखे.

**तापनळी** स्त्री. ताप, शरीराचे उष्णतामान मोजण्याची, पारा असलेली, अंशांकित, काचेची नळी; ज्वरमापी; तापमापक; (इं.) थर्मामीटर.

**तापनियंत्रक** पु. एखाद्या यंत्रणेतील अगोदरच निश्चित केलेल्या तापमान-नियंत्रणासाठी उपयुक्त स्वयंचलित साधन.

**तापपीडन** न. काच, प्लास्टिक किंवा धातू यांची बारीक पूड दाबाखाली आक्रसवून, वितळण्याच्या तापमानापेक्षा थोड्या कमी तापमानावर ठरावीक काळापर्यंत तापवून एकसंध करण्याची प्रक्रिया.

**तापमान** न. हवेतील उष्णतेचे मोजमाप.

**तापमानपट्टा** पु. १. विषुववृत्ताकडून उत्तर व दक्षिण ध्रुवांकडे जाताना उष्णता कमी होणारे प्रदेश. २. उष्णतेचे कटिबंध.

**तापयोक-ग** पु. सागूचे, साबुदाण्याचे झाड. (गो.) [पो. तापिओका]

**तापस-सी** वि. तपश्चर्या करणारा; तपस्वी; योगी; ऋषी; साधू. [सं.]

**तापस्पर्श** पु. मनस्ताप : 'कैलास वैकुंठपर्यंत तापस्पर्श एकु आति.'– अली ३४.

**तापाटी** स्त्री. सावली नसलेला भाग; ताप; उन्हाची प्रखरता. (को.)

**ताफदान रोटी** एक प्रकारची भाकरी, हिच्या पृष्ठभागावर आत तूप जिरावे म्हणून टोचे मारतात.– गृशि २.१७.

**ताफा** पु. १. (कलावंतीण व तिचे साजिंदे व वाद्ये यांचा सूर, सनई, संबळ इ.सहित वाजंत्र्यांचा एकत्र) साज; समुदाय; फड; चक्री; मेळ; संच; टोळी . २. घोळका . ३. चिमण्यांची झुंड.४. जहाजांचा समूह. [अर. ताइफा] (वा.) ० **बसणे** – (एखाद्याचे) घर बसणे; कुटुंबनाश होणे; (कर्ता पुरुष मेल्यामुळे) घरदार, कुटुंब मोडकळीस येणे.

**ताफा** पु. नदीतून पलीकडे जाण्यासाठी फळ्या, बाज इ.ना भोपळे, घागरी, पिंपे इ. बांधून किंवा तीन-चार तरांडी एकत्र बांधून करतात ते तरण्याचे साधन; तक्त्यांची नाव. पहा : **तराफा, तरी, तरांडे** [अर.ताइफा]

**ताफ्ता** पु. एक प्रकारचे रेशमी वस्त्र, कापड. [फा.]

**ताब** स्त्री. बळ; सामर्थ्य; हिंमत; अवसान : 'खानांनी ताब लढाईची न आणितां माघारे हटून गढीचा आश्रा धरून आहे.'– दिमरा १.२८८. [फा.]

**ताबक** पु. घोड्याच्या पायाच्या सुंभाचा रोग.– अश्वप २.२७३. [फा.]

**ताबडणे** पहा : **तांगडणे** ६, **तावडणे**

**ताबडतोब-प** क्रिवि. १. त्याचक्षणी; लागलीच; तेव्हाच (जाणे, पाठवणे). २. जलदीने; त्वरेने; कोठेही न थांबता; विसावा न घेता. स्त्री. त्वरा; घाई; जलदी; शीघ्रता : 'ताबडतोब होऊन मालाचें ठिकाण लागलें तर उत्तम.'– पेद २५.१०६. [हिं. ताबड्तोड]

**ताबल** न. ताबुलफळे या एका बैठ्या खेळांतील तांबड्या रंगाने रंगवलेली लांबट लहान पट्टी.

**ताबा** पु. आग : 'लढाईचा ताबा न सोसता होळकराकडील मोड जाला.'– राज ७.

**ताबा** पु. १. भपका; अवडंबर. २. गोंगाट.– राको. [अर.]

**ताबा** पु. समुदाय.

**ताबा-बी** पु. कबजा; अंमल; नियंत्रण. [अर. ताबिअ=परतंत्र]

**ताबाकुपटी** स्त्री. हद्द घालण्याचा खर्च.

**ता(त)बारा** पु. महंमदानंतरच्या व अलीपूर्वीच्या खलीपांची निंदा करणारी पत्रे : 'सार्वजनिक जागेत ताबारा वाचल्यामुळे ७५ शियांस अटक झाली. – प्रभात ४.४.१९३९. [अर.]

**ताबारेषा** स्त्री. युद्धात संधी झाला की कोणता प्रदेश कोणाच्या ताब्यात आहे हे दाखवणारी रेषा.

**ताबीत-न, ताब्यात** क्रिवि. १. स्वाधीन . २. अंकित : 'तुम्हांस त्यांचे ताबीन करून पाठविलें आहे कीं ते ज्याप्रमाणे सांगतील त्याप्रमाणें करणें.'– मइसा ६.६०३. [अर. तबिईन, ताबिअ]

**ताबुलफळे** न. अव.एका बैठ्या खेळाची सामुग्री, साहित्य. हा लाकडी खेळ सावंतवाडी येथे तयार करतात. [पो. ताब्ल; गो. ताबुला]

**ताबूत-द** पु. १. शव ठेवण्याची पेटी; शव; प्रेत : 'शहाजाद्याचा ताबूद व त्याची मुलें माणसें येथें पाठऊन देणें.'– दिमरा १.२५१. २. मुसलमान लोक मोहरमात मिरवतात ती हुसेनच्या थडग्याची प्रतिमा; डोला; ताजिया. ३. ताबूत नेण्याच्या परवानगीसाठी मुसलमानांवर बसवलेला मराठ्यांच्या रियासतीतील एक कर.

**ताबे** वि. अधीन; ताब्यात : 'याजवर जशी मर्जी. ताबे मर्जीच्या. विशेष काय लिहावे.'– मइसा ५.९१. [अर. ताबिअ]

**ताबेगहाण** पु. १. ऋणकोचा काही ऐवज, मालमत्ता इ.गहाण म्हणून आपल्या ताब्यात ठेवून कर्ज देण्याचा प्रकार; अंमलगहाण. २. असल्या कर्जापोटी गहाण ठेवलेला ऐवज, शेत इ.

**ताबेदार** वि. ताब्यात असलेला; हुकमतीत वागणारा; अधीन; बंदा; नोकर. [अर.ताबिअक+दार]

**ताबेदारी** स्त्री. १. दास्य; परतंत्रता; परस्वाधीनता. २. नोकरी.

**ताभारणे** अक्रि. रागाने भडकणे; बहकणे; लाल होणे; तांबारणे. [सं. ताम्र]

**तामगिरी** वि. तांबेमिश्रित : 'गैरसाळ तामगिरी । कोणी नवी मुद्रा करी ।- दास १०.८.१४. [सं.ताम्र]

**तामचिनी** तांब्याच्या पात्रावर केलेले काचकाम. (तंजा.)

**तामण** पु. एक वृक्षविशेष; याला उन्हाळ्यात गुलाबी रंगाची सुंदर फुले येतात. याचे लाकूड इमारतीसाठी वापरतात.

**तामन करणे** ताटात अन्न वाढणे.

**तामवाण** न. (कु.) पहा : **ताम्हण**

**तामस-सी, तामसीक** वि. १. निद्रा, आळस, अनवधानता इ. ज्याच्या ठिकाणी फार आहे असा. मंदबुद्धी; सुस्त; जड (मनुष्य).२. तापट; कडक; संतापी; चिडखोर; धाडसी; साहसी; बेफिकीर. ३. दुष्ट; लबाड; कपटी. ४. भयंकर; पाशवी; क्रूर; अति नीच (कृत्य, आचरण इ.). ५. उष्ण; दाहक; उत्तेजक; उद्दीपक; मोहजनक; स्तंभक (औषध, मात्रा, खाद्यपदार्थ इ.). ६. मूर्ख; अज्ञानी. ७. अंधाराने भरलेला; अंधकारमय. [सं.]

**तामसाळ, तामशी** स्त्री. १. तांबड्या रंगाचे एक भात. (कु.) २. गरव्या जमिनीतील भात. - बदलापूर २८३.

**तामि(मी)ल-ली** स्त्री. (हुकूम, आज्ञा इ.कांची) अंमलबजावणी; संपादणी . [अर. तामील]

**तामोटी** स्त्री. ताम्हण. (कु.) [सं. ताम्र+वटी]

**ताम्र** न. १. तांबे; एक धातू. २. (वैद्यक.) ताम्रभस्म.

पु. (सांकेतिक) मुसलमान; यवन; म्लेंच्छ : 'ताम्र पराभवातें पाववावे.'- भाव ८४.

वि. तांब्यासारखा; तांबड्या रंगाचा. [सं.]

**ताम्रचूड** पु. कोंबडा.

**ताम्रचूड (हस्त)** पु. (नृत्य.) अंगठा व मधले बोट यांची टोके जवळ आणून, तर्जनी वाकवून ठेवून, बाकीची बोटे खोलगट केलेल्या तळहाताला चिकटवणे.

**ताम्रपट-ट्टी** न. पु. स्त्री. १. राजांनी वगैरे ब्राह्मणादिकांना भूमी इ.चे दान, इनाम दिल्याबद्दलचा तांब्याच्या पत्र्यावर कोरलेला लेख; सनद. २. शाश्वती; खात्री; हमी; निरंतरता. ३. कायमचा अधिकार. [सं. ताम्रपट्ट]

**ताम्रपत्र** न. १. तांब्याचा पत्रा. २. पहा : **ताम्रपट** [सं.]

**ताम्रभस्म** न. १. (वैद्यक.) ताम्र या धातूपासून, तांब्यापासून केलेले रसायन, मात्रा; ताम्रप्राणिद. २. (सांकेतिक, विनोदी) पुरणपोळी.

**ताम्रभूमी** स्त्री. लोखंडाचा पत्रा.

**ताम्रमुख** न. तांबड्या तोंडाचे वानर; माकड.

वि. लालतोंड्या; मोंगल; युरोपिअन.

**ताम्हण-न** न. १. संध्या, देवपूजा इ. करताना पाणी सांडायला घेण्याचे वर्तुळाकार व उथळ भांडे. २. विक्रीकरता आणलेल्या तांब्याच्या नवीन भांड्यांचा समुदाय.

**ताय** पु. कागदाचा जाड पुठ्ठा. (गो.)

**तायकि(खि)ळॉ** पु. टाकळ्याचे झाड. (गो.)

**तायगुंड** वि. हुषार; कुशल; चतुर. [क.ताईगंडा]

**तायत्या** पु. ताईतांची माळ; स्त्रियांचा गळ्यात घालण्याचा दागिना.

**तार** स्त्री. १. धातू, रेशीम इ. पदार्थांचा तंतू; तात; धागा; दोरा. २. (भिजलेली कणीक, काकवी, मध इ.सारख्या) अर्धवट द्रव किंवा चिकट पदार्थाचा तंतूसारखा अवयव. ३. (मादक पदार्थाच्या सेवनाने येणारा) अंमल; कैफ; उन्माद; नशा. ४. (संपत्ती वगैरेमुळे येणारा) ताठा; धुंदी; मद. ५. (पित्ताधिक्य, जागरण इ.मुळे) डोळ्यांना येणारा जडपणा; मंदपणा; अंधारी. (क्रि. चढणे, येणे, लागणे). ६. (ल.) चित्ताची एकाग्रता; निदिध्यास; तल्लीनता. (क्रि. लागणे) ७. मनाचा कल, प्रवृत्ती; मर्जी. ८. (अशिष्ट) (अनेकवचनी प्रयोग) गुह्यभागावरील रोम. (क्रि. उपटणे). ९. (ल.) (संभाषण, वाद इ.चे) अनुसंधान; संबंध; संगती; ओघ; धोरण. (क्रि. लावणे, लागणे, धरणे, सोडणे, सुटणे). १०. एखाद्या क्रियेचा संतत क्रम, ओघ; परंपरा; अनुबंध. जसे : - कामाची - गाण्याची इ.तार. ११. तारायंत्राने पाठवलेली बातमी, संदेश. १२. कापूस पिंजण्याच्या धनुकलीचा तार, दोर. (खा.)

पु. १. केस: 'ज्याचे तार पांढरे तो (घोडा) युद्धांत उत्तम.'- अश्वप १.२६. २. ताव; आवेश. [फा. तार] (वा.) ० **बांधणे** - अखंड पुरवठा होण्यासाठी टप्प्याची व्यवस्था करणे : 'पेंढारी व आबाजी रणसोड व शरीफभाई रवाना झाले. शिलेदारांची तार बांधवून दिली.' - होकै, पृ. ८८. **तारा तोडणे** - रागाने, उर्मटपणाने दुसऱ्याचा अपमान होईल असे, भलतेसलते शिरा ताणून बोलणे. **तारेवरचा नाच** - अवघड व जोखमीचे काम. **तारेस उभा करणे** - मर्जीस उतरणे; मनास येणे.

**तार** पु. १. पाण्यावर तरण्यासाठी घेतलेला आधार; तर : 'ऐसा परस्परें आहे जी विचार । भोपळ्याचा तार दगडासी ।'- तुगा ११०४. २. (नदी, खाडी इ.चा) उतार. (गो.) [सं.तृ]

**तार** पु. केळीचा लोंगर, घड. (तंजा.) [क. तारु]

**तार** पु. १.(संगीत) षड्जापासून निषादापर्यंत (खर्जात) स्वर गाऊन पुन्हा उंच षड्जापर्यंत घेतात तो आलाप, सूर. २. (सामा.) उंच स्वर.[सं.] (वा.) ० **छेडणे** - भावनेला हात घालणे.

वि. १. उंच, खणखणीत (स्वर, आवाज). २. लखलखीत; चकचकीत; स्वच्छ; टपोर : 'कैसें उन्मेखचांदिणें तार । आणि भावार्थु पडे गार ।'- ज्ञा ६.१३४.

**तार-रा** स्त्री. धातूचे नाणे : 'कांही तार कवडां होता तयाची पूजा द्रव्यें आणिली.' - उच २०३.

**तारक** पु. (ल.) भोपळा (ह्याच्या साहाय्याने ताफे, तरी तरंगतात म्हणून); सांगड : 'गोपीकुच हेचि तारक घेऊन । मीनकेतन पोंहतसे ।'- ह १७.५३.

वि. रक्षण करणारा; संकटातून पार पाडणारा; तारणारा. [सं.]

**तारकटणे** अक्रि. पहा : **तारवटणे**

**तारकशी** स्त्री. १.तार काढणे; तारकसाचा धंदा. २. (ल.) तारेप्रमाणे ओढून काढणे; छळ; जुलूम; गांजणूक; जाच. (क्रि.धरणे, लावणे, मांडणे, करणे). [फा.]

**तारकशी-सी-स** वि. १. सोने, रुपे इ. धातूच्या तारांनी, कलाबतूने

विणलेले : '(दिल्ली) शहरांत तारकशी कामें व अनेक प्रकारचे नकशी केलेले पदार्थ फार चांगले मिळतात.'– तीप्र ६८. २. ज्याच्या भोवती तारेचे, सुतळीचे जाळे घट्ट विणलेले आहे असे (भांडे इ.). ३. तारांचा केलेला.

पु. सोने, रुपे इ. धातूची तार काढणारा. [फा. तार्कश्]

**तारकस झीक** (जरतार धंदा) बिन चापडलेली, नुसती रेशमावर गुंडाळलेली तार.

**तारका** स्त्री. १.तारा; चांदणी; नक्षत्र. २. डोळ्यांतील बाहुली. ३. खोडकर, द्वाड मुलगी. (पुराणातील एका राक्षसिणीच्या नावावरून). [सं.]

**तारका–खा** स्त्री. अव. (अशिष्ट) गुह्यभागावरील केस. पहा : **तार** स्त्री. ८. (वा.) ० **समजणे, मानणे, मोजणे, लेखणे, जाणणे** – (एखाद्याला) अतिशय नीच, हलके, क्षुद्र, कस्पटासमान लेखणे.

**तारका(खा)बारका–खा, तारकापारका–खा** वि. १. आश्चर्यचकित; भांबावलेला; गोंधळून गेलेला; कावराबावरा. २. धूर्त; चाणाक्ष.

**तारकासमूह** पु. आकाशातल्या ताऱ्यांचे पृथ्वीवरून काल्पनिक आकाराच्या स्वरूपात दिसणारे समूह.

**तारकिट** पु. तिरकटी तारू.

**तारकीट** स्त्री. तिरपीट; धांदल; त्रेधा; तारांबळ.

**तारखकीपारखी, तारकपारख** स्त्री. हुशारी; सावधपणा : 'तारकी पारखीनें रहावें तें न करितां मुक्काम करीत खंडण्या घेत चालिले.'– भाब १०२.

वि. १. धूर्त; चाणाक्ष; हुशार; कुशाग्रबुद्धी. २. सावध; जागरूक; दक्ष. क्रिवि. सावधपणाने; जागरुकतेने; जपून. (क्रि. वागणे, चालणे, असणे).

**तारकेवारी, तारकीवारकी** स्त्री. दुसऱ्याला दाबून, दटावून आपला वरचढपणा मिरवणे; चढेलपणाची, उद्दामपणाची वर्तणूक.

**तारखेची जोडी** अमुक दिवसात पत्र पोचवून जबाब आणावा अशा कराराने पाठविलेली जासूदांची जोडी : 'डाकेबराबर पत्रे साहासात पाठविलीच व मुजरद तारखेच्या जोड्या च्यार पत्रे पाठविली.'– पेद ३५.

**तारघडी** स्त्री. शिमग्यात खेळण्याचा टिपऱ्यांचा एक खेळ.

**तारघर** न. तारेने संदेश पाठविण्याचे सरकारी कार्यालय.

**तारचिट** स्त्री. सोडचिठ्ठी.

**तारटका** पु. १.लग्नाच्या वेळी घरासमोर उभारलेल्या मंडपाचे भाडे.२. लग्नावर लावलेले मूल्य.

**तारण** न. १. रक्षण; सांभाळ करणे; संकटातून मुक्तता, सुटका. २. कर्ज घेताना ऋणकोने सावकाराजवळ, हमी घेणाऱ्यांजवळ विश्वासाकरता ठेवण्याची पैशांची ठेव, मूल्यवान वस्तू इ. २. स्वतःबरोबर दुसऱ्याला एखाद्या व्यवहारात, धंद्यात, मामलतीत गुंतवायचे असल्यास तोटा इ.च्या हमीबद्दल, विश्वासादाखल त्याच्याजवळ ठेवण्याची रक्कम; हडप. ३. तारणावर कर्जाऊ काढलेल्या रकमेपेक्षा, तारणाच्या किंमतीचा अधिकपणा. ही अधिक रक्कम कर्जफेडीची हमी म्हणून मानण्यात येते. ४. अठराव्या संवत्सराचे नाव. [सं.]

**तारणरोखा** पु. सरकारी रोखा.

**तारणे** सक्रि. रक्षण करणे; सांभाळणे; (संकट, भय, अडचण. इ.तून) निभावणे; बाचवणे; सोडवणे; सुटका, बचाव करणे; पार पाडणे.

**तारणे** न. विळ्याच्या मुठीला शेंबी, वसवी करण्याला उपयोगी असा लोखंडी जाड खिळा.– बदलापूर १००.

**तारत(द)खाना** पु. पायखाना; संडास. [अर. तहारत्+फा. खाना]

**तारतम्य** न. १. (दोन वस्तू, व्यक्ती इ.तील) श्रेष्ठ–कनिष्ठभाव; न्यूनाधिक्य; बरेवाईटपणा; उच्चनीचपणा. २. (दोन वस्तू, व्यक्ती वगैरेतील गुण, उत्कृष्टता, दर्जा इ.संबंधी) अंतर; तफावत; विषमता; असमानता; भेद. ३. गुणभेद जाणून उपचार इ.त बुद्धीचे कौशल्य; विवेक; विवेचनशक्ती; सारासार विचार; धोरण. (क्रि. पाहणे, राखणे). ४. (एखाद्याला) सामान्य मनुष्यापेक्षा अधिक समजून, असाधारण दर्जा ओळखून केलेला आदरसत्कार, शिष्टाचार, आगतस्वागत. [सं.]

**ता(ति)रतळ्या** स्त्री. अव. बराच वेळ ताटकळत, तिष्ठत बसण्याची क्रिया; कंटाळा येईपर्यंत वाट पाहात बसणे. (क्रि. देणे, देत बसणे) : 'बराच वेळ तारतळ्या दिल्यावर महंमदभाईची बहीण...आली.'– माटे अस्पृष्टांच्या डायरीतील पाने.

**तारति(ती)म** न. (पाहुण्याचा) यथायोग्य सत्कार; आतिथ्य; पहा : **तारतम्य** ४ : 'तारतिम वरि तोंडाच पुरतें। अंतरा हें येतें अंतरीचें।'– तुगा ६५९. २. अक्कल; हुषारी. (कु.) पहा : **तारतम्य** ३ [सं.]

**तारदान–नी** न. स्त्री. (वाद्य) तंबोरा; सतार इ. तंतुवाद्याला लावलेल्या तारा जिच्यावरून ओवलेल्या असतात ती हस्तिदंताची सच्छिद्र पट्टी, वाकडा खिळा; घोडी. [फा.]

**तारनळा** पु. दारूकामातील एक विशिष्ट प्रकारचा नळा. यात पुष्कळ तारे दिसतात : 'तूं तारनळ्यासारखा उडी मारशील.' – तोबं ६९.

**तारपटी** स्त्री. तरवारीचे पाते.

**तार(रि)पे** न. एक वाद्यविशेष; नागसूर; पुंगी : 'पावें तारपीं मोहरीं। सींगें डांगा पेंडारी।' – दाव २८९.

**तारफणी** स्त्री. तरवारीच्या म्यानावरील शिवणीवर लावलेली पट्टी.– प्रश ६७.

**तारफेणी** स्त्री. रवा–सपीटाची तार काढून तिचे चौंगे (वेटोळी) तुपात तळून केलेले एक पकान्न. – गृशि १.४०६.

**तार–बतार** वि. उद्ध्वस्त; तरबितर; पांगापांग, दाणादाण झालेला : 'फौजेवर हंगामा करून फौज तार–बतार करावी.'– मइसा ७.२१४. [फा. तार द्वि.]

**तारली–ळ** स्त्री. खाऱ्या पाण्यातील एक प्रकारचा पांढरा मासा. हा वेंगुर्ल्याकडे सापडतो. याचे खत नारळाला घालतात.– कृषि ७५६.

**तारवट** वि. (परदेशातून) जहाजांतून, आगबोटीने आणलेला; विदेशी; परदेशी (माल, जिन्नस इ.).

**तारवटणे** अक्रि. १. (मादक पदार्थांच्या सेवनाने) धुंद, बेहोष, उन्मत्त होणे; तारकटणे. (ल.) (संपत्ती, अधिकार इ.मुळे) मदोन्मत्त होणे; माजणे : 'या ठिकाणीं आपला तोल आपण सांभाळला तरी कोणा तरी तारवटलेल्या व्यक्तीच्या मनाचा तोल बिघडून...'– सासं २.१४८. २. (मादक पदार्थांच्या सेवनाने, जागरणाने, रागाने, पित्ताने, उन्हाने) डोळे, चेहरा इ. जड व सुस्त होणे; तर्र होणे; ताठरणे; विस्फारणे;

वटारले जाणे . [सं. तर्ब्]

**तारवटी** वि. १. पहा : **तारवट.** २. तारवावर काम करणारा. (गो.)

**तारवटी** वि. १. मिरच्यांची एक जात; लवंगी. २. (ल.) जाज्वल्य; जलाल.

**तारवडा** वि. चुणचुणीत; तीक्ष्ण; हुशार.

**तारवात बेडा** १. (तारू =जहाज, बेडा=सुपारी) जहाजाच्या मानाने जशी सुपारी, तसा अतिशय मोठ्या, प्रचंड व्यवहारात, कार्यात, धंद्यात एखाद्याचा असलेला अतिशय लहान भाग. २. इतर (मोठ्या) पदार्थांशी ताडून पाहता प्रमाणाबाहेर लहान असणारी, वाटणारी वस्तू.

**तारविद्या** स्त्री. तारेने संदेश पाठवण्याचे व घेण्याचे ज्ञान.

**तारषड्ज** पु. (संगीत) मध्यसप्तकातील षड्ज स्वराच्या ध्वनीच्या दुपटीच्या प्रमाणाचा स्वर.

**तारस** न. घराचे विशिष्ट पद्धतीने तयार केलेले छप्पर. (अहि.)

**तारसप्तक** न. (संगीत) तारनादयुक्त सात स्वरांचा समुदाय; तृतीयसप्तक.

**तारसा** पहा : **तरसा–शा**

**तारसा** वि. तारवटलेल्या डोळ्यांचा; ज्याच्या डोळ्यांपुढे तारा येतात असा (मनुष्य) : 'तारसें घुलें काणें कैरें। – दास ३.६.४२.

**तारंगण** न. १. (लहान मुलाचे) ओरडणे; हातपाय आपटणे. २. पहा : **तारांगण**

**तारंतार** क्रिवि. बरोबर; तंतोतंत; पूर्णपणे; सर्वांशी; एकूण एक; तारोतार.

**तारं(रां)बळ** स्त्री. १. त्रेधा; धांदल; तिरपीट; गोंधळ; गडबड; व्यग्रता. (लग्न, मुंज इ.वेळी ताराबळ आवश्यक असते. ते साधण्यासाठी, मुहूर्त चुकू नये म्हणून फार धांदल, घाई करावी लागते त्यावरून). २. अडचण; टंचाईची स्थिती; ओढगस्ती; खाण्यापिण्याची ददात, आबाळ. [सं. ताराबल]

**तारा** स्त्री. पु. १. नक्षत्र; तारका; चांदणी; आकाशातील तेजोगोल; मुख्यत: हायड्रोजन आणि हेलियम या मूलद्रव्यांपासून बनलेली व स्वत:च्याच गुरुत्वाकर्षणाच्या प्रभावाखाली असलेली स्वयंप्रकाशी वायुमय अवकाशस्थ वस्तू. २. डोळ्यांतील बाहुली. ३. (ज्यो.) जन्मनक्षत्रापासून कोणत्याही चंद्रनक्षत्रापर्यंत मोजून, आलेल्या संख्येला नऊ या संख्येने भागून येणारी संख्या.

पु. १. उल्का. (क्रि. तुटणे). २. (दारूकाम) गंधकात बाभळीच्या डिंकाचे पाणी अथवा अंड्याचा बलक घालून त्याच्या गोळ्या करून त्या बाण, नळ इ.त घातल्या असता नक्षत्राकार उडणाऱ्या असंख्य अग्निगोलांपैकी एक. ३. (नृत्य.) बुबुळाने केलेला अभिनय. [सं.] (वा.) **तारे तुटणे, तोडणे** – (गाण्यात) चमकणे; प्रावीण्य दाखवणे. (उप.) गर्दभगायन करणे.

वि. १. फरडा; हुशार; वस्ताद; तरबेज; पटाईत. २. देखणा; सुंदर.

**तारा** पु. १. (भरतीचे पाणी ओसरल्यानंतर खाडीतून, वाकणातून होणारा) पायउतार, उतारा, तार : 'भवनदीचा आला तारा। या उतारा प्रसादें।– तुगा २२२८. (को.) २. ओहोटीच्या वेळी पाण्यावर दिसणारा खाडीतील जमिनीचा भाग. (कु.) ३. (हवेत, पाण्यात) तरंगणे; तरणे. जसे : – जहाजाचा – महागिरीचा – वावडीचा – घारीचा तारा.

**तारा** वि. काणा; तिरळा; तेरसा.

**ताराकृती (प्राणी)** पु. एक पृष्ठवंशहीन प्राणी. हा वाटोळा असून याला किरणांसारखे सभोवती बारीक अवयव असतात. याला किरणरूपी प्राणी असेही म्हणतात.– प्राणिमो १२.

**ताराटचे** सक्रि. आवळून, घट्ट बांधणे; मुसक्या बांधणे. (गो.)

**ताराबळ** न. विवक्षित नक्षत्र-ग्रहांची वगैरे अनुकूलता; मंगलवेळ.

**तारामंडळ** न. १. नक्षत्रांनी युक्त असे गगनमंडळ; तारांगण. २. (सोनार.) स्त्रियांचा गळ्यात घालण्याचा एक दागिना. दोन्ही फाशांत दोन दोन असे चार मणी लावलेली ठुशांची पेटी घेऊन तिच्याखाली एक मणी ओवून त्या तऱ्हेने दोन्ही बाजूंना सव्वीस सव्वीस पेट्या घालतात. मधे घागऱ्यांचे थर लावलेले मंगळसूत्र घालून हे सर्व एकत्र पटवून हा दागिना तयार करतात.

**तारामैत्री** स्त्री. १.कुंडलीतील ग्रहांमधील मित्रभाव. २. नुसत्या नजरानजरीने जमलेले सख्य, प्रेम : 'तिजशीं माझें तारामैत्री मिळाल्याप्रमाणें सख्य जमलें आहे.'– कमं २.६५.

**तारायंत्र** न. विजेच्या सहाय्याने धातूच्या तारेतून संदेश पोहाचवणारे यंत्र.

**तारासमूह** पु. आकाशात ढगाच्या किंवा धुक्याच्या ठिपक्यांप्रमाणे दिसणाऱ्या अंधुक तेजस्वी पदार्थांचा समुदाय, तेजोमेघ. – ब्रूसकृत ज्योतिषशास्त्राची मूलतत्त्वे १७९.

**तारांगण** न. १. नभोमंडळ; नक्षत्रमंडळ. २. वेधशाळा. ३. खेळ, मजा इ. पाहण्यासाठी केलेले उच्चासन, माळा, माचोळा. ४. घराच्या वरच्या मजल्याच्या खिडकीपुढे (हवा खाण्यासाठी, मजा पाहण्यासाठी) केलेला लहान सज्जा. ५. (ल.) (सैन्य इ.ची) दाणादाण; पांगापांग; विस्कळीतपणा; वाताहत : 'फौज मोडून तारांगण केलें.'– शारो २८. ६. (कामे, धंदा इ.तील) गोंधळ; अव्यवस्था. ७. (सावकाराच्या तगाद्यामुळे कुळाची, अनाथ मुलाची) तारंबळ; त्रेधा; घाबरगुंडी; मन:क्षोभ. ८. कौले घालण्यापूर्वी घरावर तयार केलेले लाकडी काम. (गो.) ९. विद्यार्थ्यांना व जिज्ञासूंना आकाशाची माहिती देण्यासाठी आकाशाची प्रतिमा व ग्रहांचे भ्रमण दाखवणारे अर्धगोलाकार प्रेक्षागृह; (इं.) प्लॅनिटेरिअम.

**तारांतरमापी** स्त्री. सूर्याचा व्यास मोजण्यासाठी आणि ताऱ्यांमधील कोन मोजण्यासाठी पूर्वी वापरण्यात येणारे दुर्बिणीसारखे उपकरण.

**तारी** स्त्री. एक तंतुवाद्य : 'निसादाचिए श्रुतिवरी तारी.'– नरुस्व १८०. (वा.) ० **वाजाडनं** – हेका चालवणे; आपलेच म्हणणे खरे मानणे.

**तारी** स्त्री. पु. आवाज.(अहि.)

**तारीख** स्त्री. १. यवनी, इंग्रजी पद्धतीने महिन्यात येणाऱ्या एकूण दिवसांपैकी प्रत्येक; मिती; तिथी. २. इतिहास; तवारिख. [फा.](वा.) ०**पडणे** कोर्टात दिलेल्या तारखेला तो खटला पुन्हा केव्हा चालवला जाईल त्याची तारीख देणे.

**तारीप–फ** स्त्री. प्रशंसा; स्तुती; वाहवा; (एखादा पदार्थ, व्यक्ती वगैरेंच्या) उत्कृष्टपणाचे वर्णन; शिफारस . [अर. तअरीफ्]

**तारीफ** न. आयात व निर्गत मालाच्या जकातीसाठी दरांचे कोष्टक.

**तारुफळे** न. कोयता, फळे वगैरे लोंबकळत ठेवण्याची अरुंद फळी.

**तारू–च्या** पु. नावाडी : 'नामाचिया सहस्रवरी। तारू जाहलों।'– ज्ञा १२.१०.
वि. तारक; रक्षक; तारून नेणारा : 'आम्हां-तुम्हांस भववारिधिमाजि तारूं।'– र ४९.
न. नौका; तिनापासून पाचापर्यंत शिडे असलेले गलबत, जहाज. (सामा.) तरण्याचे साधन.[सं. तृ] (वा.) **तारू कुव्यासकट गिळप** – (डोलकाठीसह तारू गिळणे) सर्वच्या सर्व गिळणे; सर्वस्व स्वाहा करणे.(गो.)

**तारे** न. १. पहा : **तारा** पु.३.२.(उप.विरू.) वेडगळ, अर्धवट मनुष्य, मुलगा. ३. वेड; वेडेपण; पिसे; म्हातारपणामुळे बुद्धीला लागलेला चळ. (वा.) ० **तोडणे** – मनोरे बांधणे; कल्पना करत राहणे.

**तारे** वि. निर्बळ; चालता चालता पडणारा. (तंजा.)

**तारे** न. वादळाचा, सोसाट्याचा वारा; जवळवारा. हा गलबताला वाईट असतो.

**तारेवारे** न. १. गलबताला अनुकूल किंवा प्रतिकूल असा वारा. (राजा.) २. लहरीपणा; चाळेखोरपणा; नखरा; मिजासखोरी. ३. मोठे अवसान; आवेश; उन्माद.

**तारोतार** क्रिवि. १. पहा : **तारंतार** : 'वाई देशांतील गांव निम्मे निम्मे तारोतार व इसाफती व इनाम तारोतार निम्मे वांटून दिलें असे.'– मइसा ३.६५. २. लागोपाठ; एकसारखे.

**तारोळा** पु. १. अडथळा; खोळंबा; प्रतिबंध; खोळंब्याने, अडथळ्याने उत्पन्न झालेली अडचणीची स्थिती; (जेवण, स्नान, स्वयंपाक वगैरेत) गोंधळ; त्रास; घोटाळा. उदा. पावसाचा, धान्याचा तारोळा. २. दुर्दशा; कष्टमय स्थिती; विपन्नावस्था.

**तार्तराम्ल** पु.न. (रसा.) एक अम्ल; हे चिंचेपासूनही काढतात. [इं. टार्टर+सं.अम्ल]

**ताऱ्या** वि. १. दारूबाज; अंमली, मादक पदार्थांचे व्यसन असणारा. २. कंटाळा येईपर्यंत एकाच गोष्टीची घोकणी, जपमाळ घेऊन बसलेला.

**ताऱ्या** पु. एकतारी हे तंतुवाद्य. (खा.)

**तार्सुले** न. (गरम) पाणी. (गो.)

**ताल** पु. १. (सांडलेले दूध, रक्त, तेल वगैरेंचे) थारोळे. २. तळे. [हिं.]

**ताल** पु. १. वाईट काळ. २. रुबाब; ऐट; मोठेपणा.

**ताल** पु. (घर, इमारत इ.चा) मजला : 'अस्मानीं मंडप दिला तिन्हीं तालांवरी हो।'– तुगा २११. २. लोक; प्रदेश : 'तुम्हांस रहावयास तीनहि तालीं कोठेंहि नाहीं.'– पटच.

**ताल** पु. ताडाचे झाड. [सं.] (वा.) ० **तोडणे** – बढाई मारणे; मोठ्या मोठ्या थापा ठोकणे. (क्रि. पटणे, पडणे.)

**ताल** पु. पत; सौदा; व्यवहार .(क्रि. पटणे, पडणे.) : 'आपण व कारभारी यांनी सावकाराच्या घरास जावे परंतु ताल न पटे.'– पेद ५.६०.

**ताल** पु. शिल्पशास्त्रांतील लांबीचें एक माप. बारा अंगुळें म्हणजे एक ताल. – भग्नमूर्ति ११३.

**ताल** पु. १. (संगीत) गीत, वाद्य व नृत्य ह्यांच्या क्रियेच्या गतीचे कालदर्शक नियमित प्रमाण; ठेका. (क्रि. धरणे). २. हातावर, दंडावर हात मारण्याची क्रिया; टाळी वाजवण्याची क्रिया. ३. पहा : **सम.** ४. (नृत्य.) हाताचा अंगठा व मधले बोट यांतील जास्तीत जास्त अंतर. ५. कासे या धातूचे एक वाद्य; टाळ. हे काठीने वाजवतात.[सं.]

**ताल** पु. प्रयत्न; खटपट : 'महाराजांपुढे तोंड वेंगाडून पैसे मिळण्याचा ताल करण्यापेक्षा, जर त्यांनी भिक्षांदेहि केली तर अधिक उत्तम.' – विक्षिप्त ३.१८२.

**ताल** स्त्री. १. (पाणी अडवण्याकरता, वळवण्याकरता रस्त्यावर, शेतात घातलेला) बांध, बंधारा. २. नदी वगैरेच्या काठाच्या बाजूने बांधलेला धक्का. ३. वाफ्याची कडा, बाजू.– चित्रकृषि २.६. [सं. तल]

**ताल** पु. (नाविक) गलबताच्या नाळीच्या व वऱ्याच्या खांद्याला खालून ठोकलेल्या बारीक लाकडांपैकी प्रत्येक . (को. ) [सं. तल]

**ताल** पु. ज्यात भरतीच्या वेळी पाणी चढते असा नदीकिनाऱ्यालगतचा जमिनीचा भाग. [सं.तल]

**ताल** पु. (चर्म.) खुरा आणि तळ यांच्यामधील जोड्याचा भाग.

**ताल** पु. १. चष्माचे भिंग. २. तलवारीची मूठ.

**ताल, तालक** पु.न. हरताळ.

**ताल–ळ, तालक** न. टाळे; कुलूप.[सं.] (वा.) **ताळ पडणे** – दोघांत बेबनाव, मतभेद होणे :'...दोघांमध्ये ताळ पडोन गेलें। ये भीमकीचें परि कार्य जालें।'– सारुह ८.३५.

**तालकेत** स्त्री. कागदपत्र इ.ची नक्कल, प्रत.

**तालगी** स्त्री. तान्ह्या मुलाचे अंथरुण; चौघडी. (व .)

**तालतंबोरा, तालतुंबा** पु. व्यवस्था; कारभार. (झाडी)

**तालताल** क्रिवि. १. उंचउंच; उद्दामपणाने. ( उडणे, बोलणे, जाणे इ.सह प्रयोग केल्यास लंब्या लंब्या बाता झोकणे; बढाईखोरपणाने बोलणे असा अर्थ.) २. बेतालपणे; बेबंदपणाने; विसंगत; असंबद्ध.

**तालतोड्या** वि. १. बढाईखोर; मोठाल्या बाता झोकणारा. २. अरेराव; धटिंगण : 'तालतोड्यांची पेंढारशाहींत चलती होती.'– राको.

**तालथाक** पु. गायन व नृत्य यांतील ताल व विरामाच्या जागा : 'गात्या नाचत्याचे ताल थाक। स्वयें देख अनुकरे।'– एभा २२.६०८.

**तालदार** पु. साथीदार. (व.)

**तालपत्र, तालपात** न. तालवृक्ष; तालवृक्षाची पाने. पाने वाळल्यावर लिहिण्याच्या किंवा छत्रीच्या उपयोगी.

**तालबाज** वि. गुणवान; गुणी.

**ताल(ली)मखाना** पु. एक औषधी वनस्पतीचे बी.

**तालमी** वि. कुस्तीत, तालमीत सराईत, पटाईत असणारा.

**तालव(वा)र** पु.न. अव. (एखाद्या श्रीमंताप्रमाणे) आदरपूर्वक वागवणे; बरदास्त ठेवणे; मानमरातब, तैनात राखणे.
वि. पहा : **तालेवार** [अर. तालिअ+फा.वर्]

**तालवृंतहस्त** पु. (नृत्य.) पहा : **उद्वृत्तसंयुक्तहस्त**

**तालव्य** वि. तालुस्थानी उत्पन्न होणारा (वर्ण, उच्चार इ.). [सं.]

**ताला** पु. पहा : **ताल, तालक**

**ताला** पु. वरचष्मा; कब्जा; सरशी (क्रि. पडणे) : '...शत्रूचे ताले न पडेल अैसेच घडून येईल.'– ऐप, पृ. १४८.

**तालादर्श** पु. ताल व लय दाखवणारे एक पाश्चात्त्य तालमापक यंत्र.
**तालामाला** पहा : **तालमान** १,२; **ताळमेळ**
**तालाम्ल** पु.न. (रसा.) एक अम्ल; (इं.) आर्सेनिक ॲसिड : 'तीव्र नत्राम्लाबरोबर आर्सेनिक तापविलें असतां त्याचें लौकर प्राणिदीकरण होऊन तालाम्ल बनते.'– ज्ञाको (आ) २९७.
**तालालोरी** क्रिवि. तालबद्धपणे : 'पावा वाजे तालालोरी.'– ज्ञागा ५०२.
**तालांक** पु. करवत.
**तालांक** पु. सर्व सुचिन्हांनी युक्त मनुष्य.
**तालिका** स्त्री. १. ग्रंथालयातील पुस्तकांची यादी. २. गटसदस्यांची यादी.
**तालिकापेटी** स्त्री. सूचिकार्डे लावलेल्या खोक्यांची बंदिस्त जागा.
**तालि(ले)वार–वंत** वि. श्रीमंत; भाग्यशाली; संपन्न; दैववान; ऐश्वर्यवान.
**तालीकचा** पु. आज्ञापत्र : 'लष्टीस अब्दाल्याचा तालीकचा आला.'– मइसा ६.४४५. [फा.]
**तालीम** स्त्री. १. (मल्लयुद्ध, कसरत, गायन, वादन. इ.चे गुरूंपासून घेण्याचे) शिक्षण. २. (घोड्याला निरनिराळ्या चाली) शिकवणे. ३. (पोपट, मैना इ.ना बोलण्याबाबत दिलेली) शिकवण; शिकवणूक. ४. (नाट्य.) पात्राने नाटकातील आपले भाषण पाठ करून बोलून दाखविण्याची क्रिया. अभ्यास; पुनरुक्तिपूर्वक ग्रहण.(क्रि.खाणे). ५. व्यायामशाळा; तालीमखाना. ६. व्यायाम; मेहनत. [अर. तअलीम्]
**तालीमखाना** पु. मल्लयुद्ध, दांडपट्टा इ.चे शिक्षण देण्यासाठी बांधलेली जागा; व्यायामशाळा; आखाडा.
**तालीमबाज** वि. तालीम करणारा; आखाड्यात जाऊन व्यायाम करणारा; मल्ल; पेहेलवान. [फा.]
**तालीसपत्र** न. एक औषधी पदार्थ.
**तालु** न. तोंडात वरच्या भागी असणारा अवयव. याच्या व जिभेच्या संयोगाने तालव्य वर्ण उत्पन्न होतात.
स्त्री. १. मनुष्याच्या डोक्याचा पुढील भाग. पहा : **टाळू**. २. हजामत करताना टाळूवर ठेवतात तो केसांचा झुपका; चांदकी. [सं.] (वा.) ० **भरणे** – लहान मुलाच्या डोक्यावर तेल जिरवणे.
**तालु** स्त्रियांना होणारा एक स्तनरोग. (क्रि. लागणे)
**तालु(लू)क, तालोका–खा** पु. संबंध : 'या अहद–नाम्यासी या शब्दाचा तालूक काय आहे.'– मइसा ७.९२. [अर.तअल्लुक्]
**तालु(लू)कदार** पु. तालुक्याचा मुलकी अधिकारी; मामलेदार. [फा. तअल्लुक्दार]
**तालुका–खा** पु. १. राज्यकारभाराच्या दृष्टीने केलेल्या देशाच्या, जिल्ह्याच्या विभागांपैकी एक. २. जमीनदारीपेक्षा लहान असलेला मालकी हक्काखालील प्रदेश. [अर. तअल्लुक्]
**ताले** पु. अव. दैव; प्रारब्धयोग; नशीब : 'रावसाहेबांचे ताले बुलंद म्हणोनच ते बाजी सर केली.'– मइसा १.५२. हा शब्द दैव, प्रारब्ध, नशीब किंवा अशा अर्थाच्या कोणत्याही शब्दासाठी उपयोगात आणतात. उदा. दैवाचे ताले. [अर. तालिअ]
**ताल्ल** वि. कोरा करकरीत; नुकताच विकत घेतलेला.
**ताव** पु. १. सोने इ. धातूला अग्नीत तापवून लाल करण्याची क्रिया; अग्निसंस्कार. २. वरील क्रिया करून धातू थंड होऊ दिल्यावर येणारा रंग; तेज. ३. ताप; ज्वर. (खा.,व.) ४. आच. [सं. ताप] (वा.) ० **देणे, मारणे** – १. एखादी वस्तू पळवणे; लुबाडणे; लांबवणे; (कारकुनी कसबाने) गिळंकृत करणे. २. एखाद्याची चांगलीच खरडपट्टी काढणे; हजेरी घेणे; दपटशा देणे. ३. 'बरे आहे, पाहून घेईन' अशा अर्थाचे बोलून मिशांवर हात फिरवणे. ० **देणे, मारणे** – १. व्यापारधंदा इ.त नफा मिळविणे; घबाड सापडणे. २. व्यापार वगैरेत ठोकर बसणे, बूड येणे.
**ताव** पु. १. राग; संताप.(क्रि. खाणे). २. दुःख. ३. पीळ. [फा. ताब्] (वा.) ० **देणे, मारणे** - यथेच्छ खाणे.
**ताव** पु. कागदाचा सबंध बंद, तुकडा; अख्खे पान. [हिं.]
**ताव** स्त्री. (पावसाळ्यात पडणारे) सूर्याचे मंद ऊन. (को.) [सं. ताप]
**तावखोबावखुल्यो** स्त्री. थट्टामस्करी; कुचेष्टा; टिवल्याबावल्या.(गो.)
**तावज** स्त्री. होडी ढकलण्याचा लहान बांबू.(गो.) पहा : **ताज** १
**तावजाळे** न. (गो., कु.) पहा : **ताइताळे**
**तावटणे** सक्रि. (एखादी वस्तू) पळवणे, लांबवणे, लाटणे.
**तावड** स्त्री. न. दूध तापविण्याचे रुंद तोंडाचे भांडे. (व.) [सं.तप्]
**तावड–डी** स्त्री. १. नर्मदेच्या काठी ज्या ठिकाणी नर्मदा ओलांडतात, तेथे टेकडीवर असलेली धर्मशाळा, चौकी. २.(ल.) अधीनता; पकड; कबजा. ३. (ल.) कचाटा; तडाखा; सपाटा.
**तावडणे** उक्रि. १. (एखाद्याला त्रासदायक अशा प्रकारे) खोळंबून धरणे; डांबणे. २. (एखाद्याला जबरदस्तीने) कष्टाच्या कामांत गुंतवणे; राबवणे; कामाला जुंपणे; वेठीस धरणे. ३. (घोडा इ. जनावरे) दामटणे; धसमुसळेपणाने वापरणे; भरधाव पळवणे. ४. (उन्हात, वाऱ्यात, थंडीत, चिखलात, पावसात) कष्ट करायला लावणे, दामटणे.
**तावडा** पु. मचवा; गलबताचा एक प्रकार : 'तीन तावडे लोक येक खेपेस त्याणी नेले.– पेद ३४.१५२.
**तावडीतासन** स्त्री. (बुरुडकाम) विणकामाची आडवी कांब.
**तावण** स्त्री. १. एका दमात मजल चालून, धावून जाण्याचा प्रसंग; तसा प्रयत्न. २. ताण; ओढ. (क्रि. पडणे, देणे.).
**ताव(वा)ण** स्त्री. दंड; गुन्ह्याबद्दल नुकसानभरपाई; भुर्दंड. (क्रि. बसणे, भरणे). स्वतःच्या किंवा दुसऱ्याच्या चुकीने होणारे नुकसान; लाच खाल्ल्याच्या खोट्याच संशयावरून एखाद्यापासून अन्यायाने वसूल केलेला दंड; सरकारने बसवलेला कर, केलेला दंड. [फा. तावान्]
**तावणे** सक्रि. १. (सोने इ.धातू) लाल होईपर्यंत तापवणे. २. (दूध, तूप, पाणी इ.) तापवणे; गरम करणे. ३. (एखाद्याला रागाने, आवेशाने) ताव देणे , खणकारणे; दपटणे; खरडपट्टी काढणे. ४. (ल.) अजमावणे; तपासणे : 'अनुरागाचा निरू ताउनी। पाणी ढाळू।'– ज्ञा ७.९९.
अक्रि. (ऊन, सूर्य हे) तापणे, तळपत असणे : 'तो तावूनि प्रतापतरणी। दत्तमित्र पाडिला रणीं।'– मुआदि ३३.२३. २. (अकर्तृक) उकडणे; गदगदणे; गदमदणे; उष्मा होणे. ३. (ल.) (राग वगैरेंनी) संतप्त, क्रोधाविष्ट होणे; संतापाने लाल होणे. [सं. ताप; फा. ताव] (वा.) **तावून सुलाखून निघणे** – कसोटीतून पार पडणे, कसोटीला उतरणे.

**तावणे** उक्रि. ताणणे : 'क्रोधें स्फुरती ओंठ। भृकुटी ताऊनि तेजिष्ठ।'- मुआदि ३१.१७१.
**तावतक** पु. अनुमान; तर्क. (व.)
**तावदान** न. (खिडकी, दार, कपाट इ.ला बसवायचे) काचेचे भिंग, तक्ता. २. काचेची भिंगे बसवलेले दार, खिडकी इ. [फा. ताब्दान्]
**तावदारकी** स्त्री. जरब; धमकावणी; अंमल गाजवणे; ताव देणे. (गो.,बे.)
**तावदारणे** अक्रि. रागावणे; कावणे; तावणे; तणतणणे.
**तावन(म)दस्त** पु. (गंजिफांचा खेळ) गंजिफा वाटताना चूक झाली असता वाटणाऱ्याकडून चुकीबद्दल घेतात ती पाने. [फा. तावान्दस्त]
**तावनी** स्त्री. दूध तापविण्याचे मडके; दुतली; दुधाणी. [सं. तपन]
**तावी** स्त्री. लहान तवा.
**तावीज** पु.न. १. कबरेवरील उंचवटा; विटांचे बांधकाम : 'त्यांच्या चौथऱ्यावरील तावीजें दक्षिणोत्तर असतात.'- के १०.३.१९३९. २. ताईत; सोने, चांदी इ.च्या पत्र्याचा एक अलंकार. मंत्राचा कागद गंडा इ. त्यात घालून गळ्यात, दंडात बांधतात : 'त्याचे हातची मणगटी व पागोट्यांतील तावीज परवारी यासी द्यावयाची आज्ञा नाहीं म्हणून ठेविली असे.'- पेद १७.१२२. [अर.तअवीझ]
**तावुळा** वि. आवेशयुक्त.
**ताव्या** पु. एक पतंगाचा प्रकार. - व्याज्ञा १.१६१.
**ताश** पु. जर; सोन्या-रुप्याची तार : 'दोन प्रहरा निजामुद्दौला ताशाचा पोशाक करून मुबारकबादीस आले.'- मइसा १.१००. [फा.]
**ताशा-सा** पु. (वाद्य) लहान नगाऱ्याच्या आकाराचे चर्मवाद्य. हे दोन हातात दोन बारीक वेताच्या छड्या घेऊन स्वतंत्रपणे किंवा सनईची साथ करताना वाजवतात. [अर.तास]
**ताशीर** स्त्री. गंमत.(व.)
**ताशील** स्त्री. (राजा.) पहा : **तपशील**
**ताशीव** वि. तासून तयार केलेला (दगड, लाकूड इ.पदार्थ).
**ताशेकरी, तासजी** पु. तास वाजवणारा.
**ताशे(शि,से)रा** पु. १. ताशावरची झोड, कडका. २. (ल.) बंदुकांची एक फैर; भडिमार; धडाधडी. ३. (ल.) रागाने काढलेली खरडपट्टी; दणकारा; खणकावणे; अपशब्दांचा वर्षाव. ४. भांडणाचा कचका, कडाका. ४. लाकूड इ. वाकसाने तासल्याने निघालेल्या ढलप्या; छाट; छाटछूट. (क्रि. पाडणे, पडणे).
**ताशेरा** पु. ऐनवेळ; मोका; योग्य संधी. (व.)
**तास** पु. १. अडीच घटिकांचा, साठ मिनिटांचा काळ. २. (वाद्य) घड्याळ; एक वाद्य; अर्धे तसू जाडीचा भाकरीएवढा काशाचा गोल तुकडा. याच्यावर लाकडाच्या मोगरीने आघात करून ध्वनी उत्पन्न करतात. देवाची आरती करताना किंवा अडीच घटकांचा कालावधी दाखवण्यासाठी हा वाजवतात. [अर.]
**तास** पु. गावातून जाणाऱ्या नदीच्या प्रवाहाच्या बाजूला बांधलेला घाट.
**तास** पु. निळ्या रंगाचा एक पक्षी; चास.
**तास** न. १. नांगराने किंवा पाभरीने जमिनीला पडणारी रेषा; कोरणी; घळ; खोबणी. २. उभ्या पिकाच्या दोन उभ्या ओळींतील अरुंद जागा; पाट. (व.) ३. नदी, ओढ्याचे पात्र; उन्हाळ्यात नदीच्या प्रवाहाचे जे अनेक बारीक भाग, ओहोळ होतात त्यांपैकी एक. ४. नांगराने जमीन नांगरण्याची क्रिया; नांगरणी. ५. तिसरी नांगरणी. (कु.)[सं. सीता] (वा.) **ताशी-सी लागणे-** (पीक इ.) चांगल्या रीतीने वाढीस लागणे. **तासावर येणे** - (जमीन इ.) वहितीस, पेरण्यास योग्य होणे.
**तास** पु. १. (सुतार.) हत्याराने (लाकूड) तासणे; छाटणे; रंधणे. २. (लाकूड, खडक इ.चा) छाटलेला, तोडलेला, तासून काढलेला टवका; कपरी; तुकडा. ३. खाच; खांड; खाप. ४. (सोनार.) एक प्रकारची नक्षी. बांगडीवर घासून करतात तो चौकोनी, सपाट भाग. (क्रि. मारणे). [सं. तक्ष्]
**तास** पु. १. पेरणीच्या वेळी शेतात सर्वत्र चिखल करण्याचे, एका बांबूच्या टोकाला फळी लावून केलेले शेतीचे एक हत्यार. निवळॉ. (क्रि. घालणे) - बदलापूर २८७. २. वरील हत्याराने शेतातील चिखल सारखा करून शेत समतल करण्याची क्रिया.
**तास** स्त्री. वल्हवण्याची लांब काठी. पहा : **ताज**
**तास** पु.(तुरी वगैरे पिकावर) अळ्यांच्या रूपाने पडणारा रोग.- शे ६.२७२.
**तासक-की** न. स्त्री. पितळी लहान झाकणी; वेळणी.
**तासची-जी** पु. तासाचे ठोके वाजविणारा.- वाडसमा २.३.
**तासडपट्टी** स्त्री. १. तासण्याची क्रिया. २. (ल.) खरडपट्टी; रागाने केलेली खरमरीत टीका; कानउघाडणी. ३. हजामत; बोडंती.
**तासणी** स्त्री. १. पहा : **तासडपट्टी.** २. लाकूड तासण्याचे सुतांराचे हत्यार; वाकस.
**तासणे** उक्रि. १. (लाकूड इ.) वाकसाने तासून नीटनेटके करणे; रंधणे. २. जखमी करणे : 'शरनिकरें पार्षतासि तो तासी।'- मो ३६.३३. ३. खरडून हजामत करणे; भादरणे. ४. (पत्र, हिशेब, यादी, अर्ज इ.) खरडून टाकणे; भरकटणे; फटकारणे; झपाटणे. ५. (एखाद्याची रागाने) निर्भर्त्सना करणे; खरडपट्टी काढणे; हजेरी घेणे; कानउघाडणी करणे. ६. (अंकगणित) भाजकाने भागून उरेल तो भाज्यांक राखणे. ७. (ल.) अपरोक्ष निंदा, कुचेष्टा करणे. ८. हातावर तुरी देणे. [सं. तक्ष्] (वा.) **तासून निजणे, बसणे** - निश्चिंतपणे, आरामशीर, निर्वेधपणे स्वस्थ निजणे, बसणे.
**तासतूस** स्त्री. १. लाकूड इ.चे तासणे, छिलणे वगैरे काम. २. (ल.) रिकामटेकडेपणीचा उद्योग; केवळ वेळ घालविण्याच्या उपयोगाचे बिनमेहनतीचे व बिनफायद्याचे काम.
**तासपेरणी** स्त्री. सरी पाडून धान्य पेरणे.
**तासा** न. पैलू; तास. (गो.)
**तासिका** स्त्री. साठ मिनिटांपेक्षा कमी वेळाचा, प्रत्येक विषयासाठी दिलेला कालावधी (शाळा, महाविद्यालयातील).
**तासीपानी लागणे** कामाला लागणे. (व.)
**तासोपंत** पु. (उप. सांके.) वपन केलेली विधवा स्त्री; बोडकी.
**तास्तपिंजन** एक मुलींचा खेळ.- मखेपु ३१२. पहा : **दस्ता, पिंजर** इ.
**ताळ** पु. १. हालचाल; फडफड (कान इ.ची); फडफडावणे : 'पाठीं

निवृत्ति कर्णताळें । आहाळी ते पूजा विधुळे ।'– ज्ञा १७.७. २. (व्यापक) (पदार्थ, वस्तू, शरीरावयव इ.चा) एकजीवपणा, एकजिनसीपणा; मिलाफ; संयोग; एकत्र टिकाव धरण्याची शक्ती; मर्यादा. [सं. ताल] (वा.) ० **देणे** – (एखाद्याची) री ओढणे; त्याला अनुसरणे, मदत करणे.

**ताळ** पु. लोक; जग : 'निराश्रीत सर्वस्वें आसरा नाहीं तिन्हीं ताळीं ।'– ऐपो ४०८. [सं. तल्]

**ताळकुट** न. लहान फांदी. (गो.)

**ताळचे** अक्रि. १. पछाडणे. २. टाळणे. (गो.)

**ताळणे** सक्रि. जोपासना करणे.

**ताळतंत्र–त** पु.न. (भाषण, वर्तन, इ.तील) मेळ; एकवाक्यता; सुसंगती.

**ताळप** न.पु. तण; शेतातील पिकांना घातक लहान झाडे. (व.)

**ताळमे(वे)ळ** पु. १. (हिशेब, हकिगत, वर्तन इ.तील) मेळ; जुळणी; सुसंगती. २. पहा : **ताळतंत्र**. ३. पहा : **तानमान** १

**ताळवार** स्त्री. पडवी; वळचण. (तंजा.) [त. ताळवारम्]

**ताळा** पु. १. पहा : **ताळमेळ** १, **ताळतंत्र**. (क्रि. घेणे, पडणे, पाहणे, मिळणे) : 'कदापी नाहीं वचनास ताळा ।'– सारुह ३.१३. २. (केलेल्या भाकिताशी नंतर घडून आलेल्या गोष्टीचा, अनुभवाचा) मेळ; जुळतेपणा; प्रत्यय; पडताळा; प्रचीती; प्रतीती. (क्रि. येणे, मिळणे.) : '... ताळा पडतां राहावें । समाधान ।– दास १९.५.१७. ३. एखाद्या गोष्टीचा खरेपणा दुसऱ्या प्रमाणाने ताडून, अजमावून पाहण्याची क्रिया; (अंकगणित) उत्तर बरोबर की चूक आहे ते पाहण्याची वेगळी रीत. ४. सत्यत्वबुद्धी. – मनको. [सं. ताल] (वा.) ० **घालणे** – मेळ बसवणे; एकवाक्यता करणे. **ताळ्यास, ताळ्यावर येणे** – नीट मार्गाला लागणे; स्वैरपणा सोडून सुमार्गाने चालणे; शुद्धीवर येणे.

**ताळा** पु. टाळा; कुलूप. (माळवी) [हिं. ताला]

**ताळागोळा** पहा : **ताळा** १–४

**ताळावाळा** पु. ताळमेळ. – शर. [ताळा द्वि.]

**ताळी–ली** स्त्री. १. पुतळी; प्रतिमा. (विशेषत: सौंदत्तीची ताळी.) : 'तिने त्या देवीची ताळी देव्हाऱ्यांत ठेविली.'– शिं आत्म ११. २. दक्षिण भारतीयांची प्राचीन परंपरागत विवाहमाला. हीत वनस्पती, शुभचिन्हे प्रतिके इ. ची पदके असतात. उदा. कमळकळी, गोपुर, बदाम इ.

**ताळेबंद** पु. (ताळा पडणारा बंद) १. खतावणी, रोजखर्डा इ.वरून गेला महिना, वर्ष इ. काही मुदतीच्या जमाखर्चाचा केलेला हिशेबाचा खर्डा, लिहिलेला झाडा. २. शिल्लक आणि खर्ची पडलेल्या रकमा, जमेकडील रकमा इ.वरून निघणारी शिल्लक यांचा मेळ दाखवणारे खजिन्यातील पत्रक. ३. प्रांताच्या तपशीलवार हिशेबावरून थोडक्यात काढलेला सरकारी गोशवारा.

**ताळेबंद(दी)जमा** स्त्री. जमाबंदीचा सरकारी ठरावाने ठरलेल्या वसुलाचा व मागाहून आढळलेल्या बाबींचा समावेश करणारे सदर.

**ताळेबंदबाकी** स्त्री. वर्षाच्या शेवटी महसूलाच्या हिशेबात राहिलेली शिल्लक. – इनाम ५०–५१.

**ताळॉ** पु. गळा; आवाज. (गो.)

**ताळॉ–ळी** पु. स्त्री. डहाळी; फांदी. (गो.)

**तांगड** स्त्री. (जनावराच्या पाठीवर ठेवावयाचे) तेल, तूप वगैरेंच्या रिकाम्या बुधल्यांचे ओझे.

**तांगडकाम** न. कापडाचे तुकडे जोडून सुंदर आकृती बनवण्याची कला; असे तुकडे जोडून बनवलेले वस्त्र.

**तांगडणे** उक्रि. १. (मूल, पशू वगैरेंना) पायाला दोरी बांधून जखडणे. २. (मनुष्य, पशू इ.ना) खांबाशी आवळून बांधणे; मुसक्या बांधणे. ३. (ल.) एखाद्याला एखाद्या ठिकाणी काही कामावर गुंतवून, परतंत्र करून, खिळून, आवळून टाकणे, डांबणे. ४. (एखाद्याला त्रास, उशीर होईल अशा रीतीने) अडकवणे; खोळंबा करणे; खोळंबून धरणे; ताटकळत, टांगून ठेवणे. ५. (एखाद्याला अनेकांनी अनेक दिशांना) ओढणे, ताणणे, खेचणे; (एखाद्याची) ताणाताण, खेचाखेच, कुतरओढ करणे, होणे. ६. (जनावर, वाहन, पदार्थ इ.) बेदरकारपणे, धसमुसळेपणाने वापरणे; अतिशय काम करून घेणे; दामटणे. ७. सांधासांध करून, ठिगळ देऊन नीट दुरुस्त करणे (जुन्या वस्तू). ८. एखाद्याने आरंभलेले काम त्याच्या हातून सिद्धीला जाईनासे झाल्यावर दुसऱ्याने कसेबसे साधून घेणे. (राजा.)

**तांगडतिंगड** वि. वाकडेतिकडे. (व.)

**तांडव** न. १. (नृत्य.) शंकर आणि त्याचे गण यांचे अभिनयपूर्वक नृत्य; वीररसप्रधान, मर्दानी नृत्य. २. (एखाद्या क्षुल्लक गोष्टीबद्दल) मोहरीचा मेरू, रजाचा गज, राईचा पर्वत करणे; अतिशयोक्ती करणे. ३. थयथयाट, आक्रस्ताळेपणा, आदळआपट करणे. ४. एखाद्या बीजरूप सूत्राचा, गोष्टीचा तिखटमीठ लावून केलेला विस्तार; पाल्हाळ; अर्थवाद.

**तांडवचे** सक्रि. वल्हविण्यास लावणे. (गो.)

**तांडा** न. १. सोळा पयांचे एक चलन. २. आणेली. (गो.)

**तांडा** पु. १. एकापाठीमागे एक असलेल्या, चाललेल्या एका जातीच्या प्राण्यांची (बैल, उंट इ.ची) रांग, ओळ, समुदाय. २. (विरू.) माणसे, व्यापारी, लमाण इ.ची टोळी, तुकडी, समुदाय, जमाव. ३. (पाने इ.चा) मळा. (व.)

**तांडी** स्त्री. १. कापडाच्या दुकानात विक्रीकरता मांडून ठेवलेली कापडाच्या ठाणांची रांग; ओळ; रास. २. पहा : **तांडा**. ३. गर्दी; ताणी. (गो.)

**तांडे, तांडोन** न. पानमळा. (व.) पहा : **तांडा** ३

**तांडेल** पु. १. गलबतावरील मुख्य नाखवा. याच्या हाती सुकाणू असते. २. आरमारावरील खलाशांचा अधिकारी. ३. (वंजारी, लमाण इ.च्या तांड्यातील) मुख्य मनुष्य; पुढारी.

**तांत्रिक** वि. १. तंत्रशास्त्रातील विधिनियमांप्रमाणे वागणारा; शक्तिदेवतेचा उपासक. २. उपासनामार्गाचे पूजाविधी, मंत्र इ. जाणणारा व त्यानुसार वागणारा. ३. (जारणमारण, धार्मिक–विधी, मंत्र वगैरेंचे) तंत्रासंबंधी; तंत्रविषयक; तंत्रोक्त. ४. विषयाचे पूर्ण ज्ञान असलेला; (ल.)(स्वत:च्या धंद्याचे, कलेचे) वरवर, तुटपुंजे ज्ञान असलेला. ५. जी अंगे वगळता येत नाहीत तीच ठेवून, बाकीची गौण अंगे सोडून केलेला (धार्मिक विधी, कृत्य इ.). ६. (सामा.) संक्षिप्त रूपाने आचरलेला. ७. तात्पुरते; संक्षिप्त; त्रोटक. [सं.]

**तांदळी** स्त्री. नाचणीची एक हळवी जात; हिचा दाणा पांढरा असतो.

**तांदळी पोत** (सोनार.) तांदळासारखे बारीक, अणकुचीदार सोन्याचे मणी ओवून त्यांचे दोनपासून पाचपर्यंत सर असे पटवायचे की सर्व सरांना सामान्य असा जाळीचा मणी सर्व मण्यांच्या मधोमध राहील. अशा रीतीने तयार केलेला स्त्रियांचा दागिना.

**तांदळे** न. तांदळाचे धुवण. (गो.)

**तांदुराधतुरा** पु. घोड्याचा एक रोग; यात घोड्याचे दोन्ही पाय सुजून मोठे घट्ट – नारळाप्रमाणे होतात.– अश्वप २.२६०.

**तांदुळजा** पु. एक पालेभाजी; चवळई.

**तांदुळमांडा** पु. तांदळाचे पीठ, दूध व साखर यांची आंबोळी.(बे.)

**तांदुळी हलवा** खांडव्याच्या वड्यांप्रमाणे पक्वान्न; तांदळापासून केलेले एक खाद्य. – गृशि १.४१८.

**तांदू(दु)ळ** पु. अव. १. धान्यविशेष. भात कांडून, साफ करून काढलेले दाणे. २. हरीक, राळा, वरी, बरटी, साव, कांग इ.चे भाताच्या तांदळाप्रमाणे तूस काढून साफ केलेले दाणे. ३. उपासाच्या दिवशी फराळासाठी, (साळीचे) तांदूळ तुपावर भाजून नंतर शिजवून करतात तो भात; सोजी; धान्यफराळ. ४. तांदळाच्या आकाराचे सोन्याचे मणी. हे ओवून तांदळी पोत करतात.

**तांब** स्त्री. १. लोखंडाचा गंज; तांबेरा. २. सूर्योदय व सूर्यास्त या वेळी आकाशाला येणारा लालपणा, आरक्तता. ३. गहू, शाळू इ.वर पडणारा एक प्रकारचा तांबडा रोग. ४. कणकेत येणारा गव्हाच्या टरफलांचा तांबडा अंश. ५. तांदळाचा कोंडा. (माण.) ६. गुरांच्या अंगावर पडणारी तांबड्या रंगाची बारीक गोचीड; कोळवू. (गो.) ७. (ल.) (बरेच दिवस व्यासंग, आवृत्ती न झाल्याने विद्या, कला इ.ना येणारे) मालिन्य; मंदपणा; मलिनता. ८. एक पक्षी. (गो.)[सं. ताम्र] (वा.) ० **खाणे** – धुसफुसणे. ० **झडणे** – खरडपट्टी निघणे. ० **झाडणे** – १. ताशेरे झाडणे; तणतणणे; जोराने खडसणे. २. खूप बोलणे; वटवट करणे. **तांबड्या माडाचे सोडण** – थापेबाजी करणे. (गो.)

**तांबकी** स्त्री. टिमकी : 'डौंडीची ढवंस ढोला। वीरघंटा तांबकिया।'– शिव १०२६.

**तांबट, तांबटकर** पु. तांब्याची भांडी घडवण्याचा धंदा करणारी एक जात; त्या जातीतील व्यक्ती.

**तांब(बे)ट** स्त्री. न. छपरे इ. शाकारण्याच्या उपयोगी जाडे, तांबडे गवत; कोळंब. (को., कु.)

**तांबट** न. पहा : **तांब** ४

**तांबट** वि. १. तांबडा; तांबडसर; लाल. २. भगवी वस्त्रे धारण करणारा : 'जैसे प्रवृत्तिपांथावरि तांबट। तपोनिधि।'– ऋ १८.

**तांबटी** स्त्री. कोकणातील एक काटेरी, डोंगरी झाड.

**तांबटॉ** पु. (सोनार.) सोनारकीचे एक हत्यार.

**तांबडतोंड्या** वि. (उप.) इंग्रज (मनुष्य); साहेब; गोरा : 'ह्या तांबडतोंड्यास आतां चावूं कां खाऊं, असें त्याला झालें.'– हिं १३९.

**तांबडसांज, तांबसांज** स्त्री. सूर्यास्तानंतर आभाळ तांबडे होते ती वेळ.

**तांबडा** वि. लाल रंगाचा; रक्तवर्णीय. [सं.ताम्र] (वा.) **तांबडे फुटणे** – पहाट होणे, उजाडणे.

पु. स्त्रियांना होणारा एक रोग.

**तांबडा अबलक–ख** वि. पांढऱ्या अंगावर तांबडे ठिपके असलेला (घोडा). – मसाप २.१.५५.

**तांबडा आंबा** रातंबा.

**तांबडा कंदील** (छायाचित्रण.) अंधाऱ्या खोलीत ज्याच्या साहाय्याने फोटोग्राफरला काचा धुता येतात तो कंदील.

**तांबडा कुमाइत** वि. तांबड्या रंगात तेल्या रंगाची झाक असणारा (घोडा). – मसाप २.१५५.

**तांबडा कोळी** अंजिरावर पडणारा एक रोग.

**तांबडा ढेकूण** कपाशीच्या बोंडातील बी खाणारा एक किडा.

**तांबडालाल** वि. लालभडक; गडद तांबडा; अतिशय लाल.

**तांबडी** स्त्री. १. जोंधळ्याची एक जात. २. एक प्रकारचे गवत. ३. जमिनीची एक जात. ४. विड्याच्या पानांची उशिरा तयार होणारी एक जात. ५. केळीची एक जात. या जातीचे केळे तांबडे असून गोड असते, गरम भाकरीवर ते वितळते.

**तांबडी फाजगी–गुंजे** (विणकाम) एक प्रकारचे लुगडे; यात उभार एक काडी काळी व एक काडी तांबडी तसेच आडवण असून किनार कोणतीही असते.

**तांबडी मिरानी** (विणकाम) लुगड्याची एक जात. या लुगड्याच्या पोतात दोन घरे (काड्या) काळा व दोन घरे तांबडा असे उभार असून आडवण काळे असते व किनार कसल्याही तऱ्हेची असते.

**तांबडी सुरळी** (विणकाम) लुगड्याची एक जात. या पोतातील एक घर काळे व एक तांबडे असे उभार असून आडवण काळे असते.

**तांबड्या बोर** वि. घोड्याचा एक विशिष्ट रंग; तेल्या कुमाइत.

**तांबणे** अक्रि. (लोखंड वगैरेवर) गंज येणे; तांबरा चढणे.

**तांबतौली** पहा : **तामली**

**तांबनेल** वि. तांब, गंज चढलेला; गंजलेली (लोखंडी वस्तू).

**तांबर** स्त्री. लाव्हा पक्ष्याची मादी : 'थटकारून किलबिलाट करतां तांबर भोवती तोलावे।'– सला ७१.

**तांब(बा, बे)रा** पु. पहा : **तांब** १,३

**तांबल** स्त्री. ज्यावर गवतसुद्धा होत नाही असा तांबड्या जमिनीचा प्रदेश.

**तांबली–ले** स्त्री.न. पहा : **तामली** [सं. ताम्रालय]

**तांबवटी, तांबोटी** स्त्री. तांब्याची वाटी : 'तांबवटीयेसी तुळसी होतीया.'– लीचपू १०५.

**तांबवशी** स्त्री. खाडीत, वाकणात आढळणारा तांबड्या रंगाचा एका जातीचा लहान मासा.

**तांबशीर** क्रिवि. पहाटे; झुंजमुंजूच्या वेळी; अरुणोदयी.

**तांबसमुशी** स्त्री. समुद्रातील मुशी नावाच्या माशातील एक जात.

**तांबसर, तांबा, तांबल** वि. तांबूस; लालसर.

**तांबार** स्त्री. नाचणी पिकणारी तांबडी जमीन.– चित्रकृषि २.६.

**तांबा(ब)रणे** अक्रि. १. (डोळे, आकाश, चेहरा इ.) आरक्त, तांबडा होणे; तांबुसणे. २. (पीक इ.) तांब हा रोग होणे. ३. (लोखंड) गंजणे; तांबऱ्याने युक्त होणे. ४. पहा : **तांबारणे** [सं. ताम्र]

**तांबावत, तांबण** (गो.) पहा : **ताम्हण-न २**
**तांबी** स्त्री. संततिनियमनासाठी स्त्रीच्या गर्भाशयात ठेवण्याचे इंग्रजी 'टी' अक्षराच्या आकाराचे उपकरण.
**तांबी** स्त्री. (डोळे वगैरेंची) लाली; तांबूसपणा : 'तांबे कांडवेळीचे रसातु ढाळ सात दिजे तांबी जाये'– वैद्यक ७९.
**तांबीट** न. डोंगरी गवताची एक जात; शाकारणीचे गवत.– चित्रकृषि.
**तां(तं)बीट** न. गूळ घातलेले राळ्याचे पीठ. [क. तंबु+इट्टु]
**तांबील** स्त्री. मेहनत; सक्ती; श्रम :'थंडी वाऱ्यांत कामाची अगदीं सक्त तांबील पडते.' – शालाप, ऑगस्ट १९३९.
**तांबीळ** स्त्री. जिकडे तिकडे तांबडे (राज्यद्रोह, रक्तपात) दिसण्याचा रोग : 'पण सरकारला संशय फार. त्याला तांबीळ झाल्यामुळे जिकडे तिकडे तांबडें दिसतें.'– सुदे २७०.
**तांबुळ** न. ऐरणीदान.
**तांबूट** स्त्री. १. तांबटी. २. या झाडासारखेच, पण काटे नसलेले, महाबळेश्वराच्या आसपास होणारे एक झाड.
**तांबूल–ळ** पु. १. विड्याच्या पानाला चुना लावून, कात, सुपारी, वेलदोडा इ. घालून केलेली पट्टी; विडा. २. आपण चावून स्त्री, मूल इ.ना देतात तो विडा.
**तांबूल श्रावणी** गावदेवीच्या पुजाऱ्याला, नवीन लग्न झालेल्या मुलाने दिलेला उपहार, भेटवस्तू.
**तांबूस** वि. काहीसा तांबडा; तांबडसर; लालसर.
**तांबूस** स्त्री. तांबट. (गो.,को.)
**तांबे** न. १. तांबूस रंगाचा एक धातू; हा जमिनीत, लोहांश असलेल्या खनिजपाण्यात आणि अशोधित धातूंत सापडतो. याचा पत्रा व तार करता येते. यापासून हिरव्या रंगाचे क्षार बनवतात. ते विषारी असतात. २. (जरतारधंदा)तांब्याचे रिकामे रीळ. [सं. ताम्र]
**तांबेजणे** अक्रि. (लोखंड इ.) गंजाने युक्त होणे; तांबणे. (राजा.)
**तांबेरा** पु. तृणधान्यांच्या कांडीवर पडणारा एक बुरशीजन्य रोग.
**तांबेरी** वि. १. तांब्याचे (पान, पत्रा इ.). २. तांब्याच्या पानाने, पत्र्याने मढवलेला (दागिना, तसबीर इ.).
**तांबेसांज** पु. अरुणोदय; तांबडे; पहाटे सूर्योदयापूर्वी पूर्वेकडे दिसणारा तांबडा प्रकाश : 'त्याजवर गडबड आम्ही उदैक गुरुवारीं प्रात:काळीं तांबेसांज फुटतेसमयीं करतों.'– पेद २५.१७८.
**तांबोटी** स्त्री. १. विटेच्या आकाराचा (अखंड भांडे करण्याच्या उपयोगी) तांब्याचा रुंद तुकडा. २. न्हाव्याची पाणी ठेवण्याची, तांब्याची वाटी. ३. तेल्याचे घाण्यातील तेल काढण्याचे साधन, भांडे.
**तांबोळ** स्त्री. लोखंड, तांबे व चांदीच्या तारा एकत्र पिरगळून लहान मुलांच्या पायांत घालतात ती काडवळी, वाळा. (तंजा.)
**तांबोळा** पु. भात पिकणारी तांबडी जमीन. [सं. ताम्र]
**तांबोळी** पु.विड्याची पाने, पट्ट्या इ. विकण्याचा धंदा करणारी एक मुसलमान किंवा मराठे जात; त्या जातीतील व्यक्ती. [सं. तांबूलिक]
**तांबोळी** स्त्री. एक खाण्याच्या उपयोगी, निमुळता व गोड कंदविशेष.
**तांब्या** पु. पिण्याचे पाणी भरून ठेवण्याचे विशिष्ट आकाराचे तांबे, पितळ, स्टील इ. धातूचे भांडे.[क. तंबिगे] (वा.) ० **पालथा, उपडा पडणे, घालणे–** (बायकी) स्त्री रजस्वला होणे. ० **तांबोटी करणे –** लुटून घेणे; तोडफोड करणे : 'दिवस उगवल्यावर या शहरची माणसे बाहेर निघतील यांची तांब्या तांबोटी करून तुमचे मागोमाग येऊ.'– होकै पृ. १६४.
**तांभाणी** वि. तांबडे :'तांभाणी जोन्हळेयाचा तुकु : रसु धापे गंधकु'– रकौ ८९.
**तांभारी** वि. तांबड्या मातीचे (शेत).
**तिकटणे** न. १. शेतामध्ये तीन बांध एकत्र येतात ते ठिकाण. २. तीन रस्ते एकत्र मिळतात ते ठिकाण. ३. तीन काठ्या वगैरे एकत्र बांधून केलेली रचना.
**तिकटी** स्त्री. १. पहा : **तिकटणे** २, ३. २. त्रिकोण. ३. तिरडी.
**तिकटे** न. १. लाकडी त्रिकोण; तिकटी. (स्मशानात अग्नी नेण्यासाठी, विहिरीतून पदार्थ वर काढण्यासाठी वगैरे केलेला तीन कामट्या, लाकडे यांचा). २. (पळस, बेल, निर्गुडी इ.चे) त्रिदळ. ३. तीन पानांची पत्रावळ. ४. तिफण; तीन नळकांड्यांची पाभर. ५. लाकडाची तिवई; तीन काठ्यांची घडवंची.
**तिकटे** वि. अस्थिर; टिकाऊ नसलेले. (गो.)
**तिकडना** क्रि. वेदना होणे. (झाडी)
**तिकडे** क्रिवि. १. त्या बाजूला, दिशेला; त्या जागेकडे. २. त्या ठिकाणी; तेथे. ३. (बायकी) बायको पूर्वी नवऱ्याचे नाव घेत नसे, म्हणून नवऱ्याचा निर्देश करताना हा शब्द विभक्तीसह वापरला जात असे : 'अशा गडबडीच्या वेळी तिकडची भेटसुद्धा व्हावयाची नाहीं...'– सुसु ११.
**तिक धरनं** ताठर वागणे; खूणगाठ बांधून वागणे; सत्याची चाड बाळगणे. (अहि.)
**तिक(ख,खु)ळा–ळी–ळे** वि. तीन मुलगे अथवा मुलींच्या पाठीवर झालेला (मुलगा, मुलगी किंवा सामान्यत : मूल).
**तिकाकरी** स्त्री. तिफण; गहू पेरण्याचे साधन.(व.)
**तिकाडी** स्त्री. मासे पकडण्याचे तीनदारी जाळे.
**तिकाडी** स्त्री. एक हलक्या जातीचें गवत.– चित्रकृषि २.६.
**तिकांडे–ड्या** न. मृगशीर्ष नक्षत्रपुंजातील तीन तारे; शिवाचा बाण. पहा : **लुब्धक** [सं. त्रिकांड]
**तिकीट** न. स्त्री. १. प्रवेशमूल्य भरण्याची पावती; मूल्यपत्रिका; परवाना; पास (नाटक, रेल्वे इ.चा); विकत घेतलेले प्रवेशपत्र. २. (स्वातंत्र्यपूर्व काळात) अंदमानच्या तुरुंगात काही काळ घालवल्यावर मिळणारा बाहेर राहण्याचा परवाना. [इं.]
**तिकीटबारी** स्त्री. नाटक-सिनेमा वा तिकीट लावून जे इतर कार्यक्रम केले जातात त्यांची तिकिटे विकायची जागा.
**तिकोनी रस्सीखेच** स्काऊटच्या मुलांचा एक खेळ.– व्याज्ञा १.३१०.
**तिक्कल** स्त्री. गंजिफांच्या खेळात अनुक्रमाने लागलेली, एकाकडे आलेली तीन पाने.
**तिक्का–ऱ्या** पु. तीन चिन्हे असलेले गंजिफांचे पान; तिव्वा.

**तिक्का** पु. मांसाचा तुकडा, लचका. (तंजा.)

**तिक्त** पु. १. तीव्रपणा; तिखटपणा. २. (आयुर्वेद) कडूपणा. ३. पित्त. वि. १. तिखट; तीव्र; झोंबणारे. २. कडू. [सं. ]

**तिक्तफळ** न. निवळी.

**तिक्तय-व** स्त्री. फोडणीचे ताक; ताकाची कढी; ताकतव.

**तिख** वि. १. तीव्र; तीक्ष्ण; अणीदार : 'शरें अति तिखें संहारिलें क्षत्रियां।'- माधवरामायण, बाल ५१. २. तिखट : 'कां मिरयांमाजि तिख।'- माज्ञा १७.६८.
न. तीक्ष्णपणा : 'उकलतेनि उन्मेखें। प्रज्ञाकुशलतेंचि तिखें।- ज्ञा १५.१८५. [सं. तीक्ष्ण]

**तिखट** न. १. मिरच्या कुटून केलेली भुकटी. २. मिरच्यांची चटणी. ३. इतर मसाला घालून केलेले मिरकूट. ४. मसाला. (कु.)
वि. १. तीव्र; जलाल; तोंड भाजण्यासारखा (मसाला, मिरी). २. (ल.) कडक; भयंकर; प्रखर (उष्णता - सूर्याची अथवा अग्नीची). ३. तीक्ष्ण; अणकुचीदार (धार, टोक, हत्यार). ४. चलाख; कुशाग्र; शीघ्रग्राही (मनुष्य अथवा त्याची ग्रहणशक्ती; कान, नाक इ. इंद्रिये). ५. कडक; वेधक; छद्मी (भाषण इ.). ६. मधुरता; गोडपणा. ७. उग्र (स्वभाव, माणूस). [सं. तीक्ष्ण] (वा.) ० **जाळ, आग** - अतिशय तिखट. ० **मीठ लावून सांगणे, तोलणे** - फुगवून अथवा बनवून आपल्या पदरचे, कल्पनेने काही आत घालून सांगणे (गोष्ट इ.); खुलवून सांगणे.

**तिखट फकी** जिभेला झोंबणारी चुन्याची, चुनकळीची पूड.

**तिखटमिखट** वि. चमचमीत; झणझणीत.

**तिखटावणे, तिखावणे** अक्रि. तिखट खाण्याने जीभ भाजणे.

**तिखतिख उजो** वि. फार तिखट. (गो.)

**तिखमिखले** न. हिरवी मिरची भाजून, दह्यात कुसकरून त्यात मीठ घालून वरून फोडणी देऊन केलेले तोंडीलावणे.

**तिखमिठा भात** तिखट, मीठ वगैरे घालून परत शिजवलेला शिळा भात; फोडणीचा भात; खतखता भात.

**तिख(खा)रणे** सक्रि. धार लावणे; पाजळणे; तीक्ष्ण करणे : 'तिखारितों कीं तूं स्वभावें परंतप।'- यथादी २.२९.

**तिखऱ्या** वि. धनुर्धारी.

**तिखले** वि. पहा : **तिख** २ : 'हमामा घाली बारे। आंगी भरलें वारें। चाखती तिखले चोरें।'- भज ३३.

**तिखसार** न. तिखटपणा. (गो.)

**तिखसे** वि. तिखट. (गो.)

**तिखाडी** स्त्री. एक प्रकारचे गवत. यापासून रोशेल तेल निघते. [सं. तीक्ष्ण]

**तिखाडीची काडी** (उप.) तापट व चिडखोर मनुष्य. (ना.)

**तिखार, तिखे** न. १. पोलाद : 'तिख्याचे अतितिखट बाण।'- एभा ३२.५७. २. (ल.) धाडस; निर्भीडपणा. ३. ताठा (गर्व, उद्धटपणा, उन्माद इ.मुळे आलेला). [सं. तीक्ष्ण] (वा.) **(मनी,अंगी तीन, नवमण) ० जळणे** - १. अभिमानाचा ताठा असणे. २. रागाने जळफळणे; हाडवैर धरणे.
वि. तिखट; उष्ण; झोंबणारे.

**तिखी** स्त्री. १. दालचिनी : 'मिरी तिखी तेथोनि।... या देसी।'- ख्रिपु २.२०. ११४. (को., गो.) २. सरसू; मोहरी. (व.)

**तिगड** पु. भांडण. (कर.)

**तिगडू** पु.(सांकेतिक) चोरीचा माल. - गुजा ४२-४३.

**तिगुणणे** अक्रि. १. तीन वेळा नांगरणे. २. तीन वेळा गुणणे.

**तिगुळकाय** स्त्री. बारकाई. (गो.)

**तिघई** वि. तीन गस्ते, खण असलेले, एकापुढे एक तीन वठारे, खोल्या असणारे (घर).

**तिघावणी-नी** स्त्री. काम, क्रोध, लोभ या तिहींचा समुदाय.

**तिघे** वि. तीन; तीन जण. (वा.) **तिघांच्या तीन वाटा करणे** - फाटाफूट, ऐक्यभंग करणे.

**तिजचे** सक्रि. १. नारळाची परीक्षा करणे. २. टिकाव, तग धरणे. (गो.)

**तिजणूक** स्त्री. गावाची दिवाणात म्हणजे सरकारात भरण्याची पट्टी.

**तिजणे** क्रि. पैसे चुकते करणे (खंड, सारा इ.चे).

**तिजा** वि. तिसरा.
पु. मुसलमान लोकांत डोले किंवा ताबूत थंडे झाल्यावर तिसऱ्या दिवशी करतात ती मेजवानी किंवा उत्सव. [सं. तृतीय]

**तिजाई** स्त्री. १. तिसरा भाग, हिस्सा, अंश. २. मालकाला उत्पन्नाचा तिसरा हिस्सा देण्याच्या कराराने करतात ती शेताची लागवड.

**तिजाईत** वि. तीन वेळा व्यालेली (गाय, म्हैस इ.). (को.)

**तिजारा-रे** वि. दर तिसऱ्या दिवशी येणारा ताप, हीव.

**तिजूल** पु. (माती, सिमेंट इ.ची) वीट. [पोर्तु.]

**तिजोर** पु. १. तिप्पट बळ; तीन शक्तींचा संयोग. २. (बुद्धिबळांचा खेळ) एका पगावर तीन मोहऱ्यांचा असलेला जोर. ३. (एखादे काम करण्यासाठी) तिहेरी साधन.
वि. (बुद्धिबळ) तीन जोर असलेले (मोहरे, प्यादे).

**तिजोर** स्त्री. आढे ठेवायला वासे जोडून केलेली कातरीच्या आकाराची चौकट.

**तिजोरी** स्त्री. १. खजिना, दागदागिने व मौल्यवान वस्तू ठेवण्याची खोली; भक्कम पेटी. २. उत्पन्न; संपत्ती. [इं. ट्रेझरी]

**तिटकण-कन-कारा** न. पु. १. तुच्छता; अनादर; द्वेष; तिरस्कार. २. वीट; कंटाळा; नावड.

**तिटकारणे** अक्रि. १. निर्भर्त्सनापूर्वक वागवणे; तिरस्कार करणे. २. अवज्ञापूर्वक नाकारणे, अमान्य करणे; लाथाडणे.

**तिटकारी** वि. १. ज्याला लवकर तिटकारा येतो असा; लवकर वीट, कंटाळा मानणारा; कंटाळखोर. २. (ल.) चोखंदळ; खंतखोर.

**तिटके** न. सरपटत चालणारा एक पक्षी.

**तिटव** न. प्रेताच्या पुढे ज्यात विस्तव घेऊन चालतात ते तिकटण्यावरील मडके.

**तिटा-ठा** पु. १. तिढा; गाठ; गुंतावा; पीळ. (बे.) २. तिवाठ; तीन रस्ते मिळण्याची जागा. (गो.) ३. अड्डा.

**तिटाळी** स्त्री. टोक; शेंडा; माथा (झाड, टेकडी, उंच घर इ.चा); टिटाळी.(को.)

**तिट्टी** स्त्री. चटणी; तिखटाचे तोंडी लावणे. (कर., नंदभाषा)
**तिट्टी** वि. तिहेरी. (गो.)
**तिठणे** सक्रि. १. (दोरी) गुंडाळून, दुमडून वेटोळी इ. वळणे; आढी देणे; तिडणे. २. (वळ, गळू इत्यादींवर) फुली मारणे.
**तिठणे** अक्रि. फाकणे; तिडणे; फेंगाडले जाणे (लहान मूल किंवा अशक्त मनुष्य यांचे पाय).
**तिठा** वि. आखूड; तोकडा; थिटा; कमी.
**तिठा** पु. १. दोऱ्याची दाट शिवण. (गो.) २. फाटा.
**तिडकणे** अक्रि. १. दुखणे; खुपणे (शरीर, अवयव इ.); तडतडणे; तिडीक निघणे : 'विषयसुख तिडकाये।'– भाए १७५. २. (एखाद्या गोष्टीचा) तिटकारा आला असतानाही दुःख भोगत राहणे. ३. रागाने बोलणे. ४. तडकणे.
**तिडका** वि. त्या मापाचा, परिमाणाचा.
**तिडका** वि. १. ज्यापासून ठिणग्या उडतात तो; तडतडणारा. २. तीड आलेला; वाकलेला; लवलेला; वक्र (पलंग, बाज इ.). ३. चिडका; चिडखोर; दुसऱ्याला तिडण्याचा स्वभाव असणारा.
**तिडकावचे, तिडकुंचे** क्रि. १. भीती दाखवणे. २. रागाने बोलणे. (गो.)
**तिडकी** स्त्री. ठिणगी : 'माझेआ क्रोधाग्निचिआं तिडकिआं। उसळती गगणां परौतिआ।'– शिव ९१३.
**तिडण–न** स्त्री. अडचण; पेच; संकट : 'घाटाखालीं येतपर्यंत लोकांची येक मास तिडणच बसली...'– पेद २०.१४०.
**तिडणी** स्त्री. पेच.
**तिडणूक** स्त्री. एखाद्याला उगाच चिडवणे; चेष्टा करणे.
**तिडणे** सक्रि. १. अडचणीत घालणे; घट्ट दाबणे; चिरडणे; छळणे; त्रास देणे; गांजणे. २. चिरडीवर येऊन सतत शिवीगाळ करणे. (को.,राजा.)
**तिडणे** अक्रि. बाक येणे; वाकडेतिकडे होणे; सरकणे (पलंग इ.चा पाय, अवयव); हात, पाय वगैरे ताठणे; तिडकणे; फाकणे (पुष्कळ वेळ घोड्यावर बसल्याने); गांजून जाणे (आजारीपणा, कर्ज इ.मुळे).
**तिडतिड** स्त्री. १. फडफडाट; पिरपिर. २. चिरड; तुसडेपणा; चिडखोरपणाची स्थिती; त्रास. ३.अतिशय राग आल्याने मनाची झालेली अवस्था.
**तिडतिडणे** उक्रि. १. तडकणे; उलणे; चिडणे; पिरपिर करणे. २. चिडवणे; निष्कारण एखाद्याला उपद्रव देणे.
**तिडतिडा** वि. १. वाकलेला; स्थानभ्रष्ट; बाक आलेला. २. खडखडणारा; तडतडणारा. ३. तुसडा; चिडका.
**तिडव** न. घोड्याचे औषध. (तंजा.)
**तिडा–ढा, तिढण** पु. स्त्री. १. गुंतागुंत; अढी; मुरड; वेटोळे (दोरी इ.चे). २. (ल.) भेद; गैरसमज; अंतर. ३. (ल.) खोच; चूक. ४. अटकाव; अडथळा.
**तिडा** पु. एक कपाशीचा रोग.
**तिडा–ढा** पहा : **तिडतिडा** १
**तिडातिड** स्त्री. चिरडीवर येऊन शिवीगाळ करणे. (राजा.)
**तिडावचे** क्रि. राग आणणे. (गो.)
**तिडा(डो)ळी** स्त्री. तीन डोळ्यांचा नारळ.
**तिडिपिडणे** अक्रि. (ज्योतीवर पाणी पडल्याने) तिडतिड असा आवाज होणे : 'जीवने तिडिपिडि विजिला प्राणु फेडी'– ज्ञा १३.७१९.
**तिडि(डी)क, तिडक–की** स्त्री. १. वेदना; यातना; व्यथा. २. (ल.) काळजी; कळकळ; उत्सुकता. ३. प्रसूतिवेदना. ४. राग. (गो.) ५. तडस. (वा.) **एका तिडिकीने करणे** – एकदम, एका दमाने करणे. **तिडका देत बसणे** – (व्यथेने) विव्हळणे. **तिडका देऊन करणे** – आटोकाट प्रयत्न करून पार पाडणे. **तिडका देणे** – सर्व शक्ती एकवटून जोराचा प्रयत्न करणे.
**तिडितुम** वि. गच्च भरलेले.
**तिडे** न. ढुंगण; नितंब. (कु.)
**तिड्डा** पु. पतंगास लावलेली उभी कांबटी.– व्याज्ञा १.१६१.
**तिढा** पु. १. दोरी वगैरेला पडलेला पीळ. २. पेच.
**तित(तु)का** वि. १. तेवढा; तितका. २. पुष्कळ; सर्व : 'मराठा तितुका मेळवावा।'– समर्थसंजीवनी ५२. [सं. तावत्+क]
**तितपत** वि. १. तेथपर्यंत; त्या प्रमाणापर्यंत; त्या पायरीपर्यंत. २. तादृश; तितकेच; तेवढ्यापुरते.
**तितरबितर** क्रिवि. अस्ताव्यस्त.
**तितरी पंजर** तरवारीचा एक प्रकार.– प्रश १७.
**तितले** वि. तितके. (गो.)
**तितंबा करणे** उगीचच ढोंग करणे; कां कूं करणे.
**तिताल** पु. १. पहा : **त्रिताल**. २. उच्छृंखल, मनास येईल तसे वागणारे मूल.
वि. १. अशा प्रकारच्या तालाचे. २. नकली. (व.)
**तितिक्षा** स्त्री. सहिष्णुता; सहनशीलता; शांती; क्षमा. [सं.]
**तितुणे** न. मागे जाणे; परतणे.
**तितुर** पु. कापडाला, कपड्याला पडलेले छिद्र.
**तित्तिर, तितर–रू** पु. एक कबऱ्या रंगाचा पक्षी : 'मोर खबुतरें तितर सांबरें मूर्च्छागत पडती।'– ऐपो ३११.
**तित्तिरांग** न. पोलादाचा एक प्रकार.– प्रश २२. [सं.]
**तिथि–थी** स्त्री. दिवस; चांद्रमासाचा तिसावा भाग (दिवस). सूर्य-चंद्र यांच्यामध्ये १२ अंश अंतर पडण्यासाठी लागणारा काळ; तारीख. [सं.]
**तिथिगंडांत** पु. प्रतिपदा, पंचमी, षष्ठी, दशमी, एकादशी आणि पौर्णिमा किंवा अमावस्या या तिथींचा संधी असेल त्या वेळी जोडतिथीच्या शेवटची एक व आरंभीची एक अशा दोन घटकांचा काळ. [सं.]
**तिथिनिश्चय** पु. वरवधू निश्चित झाल्यावर ज्योतिषाकडून विवाहदिन ठरवण्याचा विधी. [सं.]
**तिथिवृद्धी** स्त्री. तिथीचा प्रारंभ सूर्योदयापूर्वी किंवा सूर्योदयाबरोबर होऊन अंत दुसऱ्या दिवशीच्या सूर्योदयानंतर होतो असा दिवस. एकच तिथी दोन दिवस असणे. [सं.]
**तिथिक्षय** पु. एक तिथी गळणे. पहा : **क्षयतिथी** [सं.]
**तिदाणे** न. स्त्रियांच्या गळ्यातील एक दागिना. (राजा.)
**तिनखारा** पु. मोठा राग; घुस्सा. (व.)

**तिन(नि, न्ही)सांज-जा** स्त्री. संध्याकाळ व रात्र यांच्या मधली वेळ; कातरवेळ. [सं. त्रि + संध्या] (वा.) **फुटक्या तिन्हीसांजा** - ऐन संध्याकाळी.
**तिनी(न्हि)ताळ** पु. (स्वर्ग, मृत्यू, पाताळ हे) तीन लोक.
**तिनी(न्ही)त्रिकाल** अ. तिन्ही वेळा (सकाळी, दुपारी, संध्याकाळी).
**तिपटी** स्त्री. १. चावडी; बैठक. २. तिप्पट संख्या अथवा परिमाण.
**तिपड** पु. वाकडेतिकडे थर; तिरपे दोरे : 'दगडांत तेढ व तिपड नसावा.'- मॅरट १०१.
**तिपडे** न. (नाट्य.) स्त्रीपात्र करणाऱ्या नटासाठी तयार केलेली तीन पदरी वेणी.
**तिपानी** स्त्री. एक लहान वेल. श्वास, व्रण, विष यांची नाशक.- वगु ४.१. [सं. त्रिपर्णी]
**तिपार** स्त्री. तिसरा प्रहर : 'वेळ तिपारचा सिनेमा संपून संध्याकाळी प्रेक्षक परत फिरण्याची होती.'- वाशो जाने. १९४२.
**तिपांडी** स्त्री. प्रत्येक वीस पांडांच्या बिघ्यामागे तीन पांड भातजमिनीची रयतेला दिलेली सूट.
**तिपेडणे** सक्रि. तीन पेड देणे, वळणे.
**तिपेडी-ढी** वि. तीन पेडांनी केलेली (दोरी, वेणी इ.).
**तिफण-न** न. स्त्री. तीन नळ्या, फण असलेली पाभर; पेरण्याचे साधन.
**तिफण** स्त्री. चार एकर जमीन. (व.)
**तिफसली** वि. तीन पिके ज्या जमिनीत निघतात ती जमीन.
**तिफाटा** पु. जेथे रस्ता, नदी किंवा झाडाच्या खोडाच्या तीन बाजू फुटतात ती जागा.
**तिफाशी-सी** वि. १. तीन फाशांनी खेळण्याचा (सोंगट्यांचा एक खेळ). २. तीन सरकगाठी घातलेली (दोरी इ.).
**तिबक** स्त्री. खेळात विटी उडाली असता खाली पडण्यापूर्वी वरच्यावर दांडूने तीनदा मारणे : 'हबक दुबक तिबक पोरा त्रिगुण खेळ मांडू। खेळू विटी दांडू।'- भज ११३.
**तिबंदी** स्त्री. दोन वरखाचा (पानां)चा एक बंद याप्रमाणे तीन बंदांची केलेली कागदाची घडी.
**तिबावचे** सक्रि. बंदुकीचा नेम बरोबर लागतो की नाही हे बार उडवून पाहणे. (गो.)
**तिबॉ** पु. (गंधाचा) मोठा टिळा. (गो.)
**तिमजला-ली** वि. १. तीन मजल्यांची (इमारत). २. तीन, तिहेरी काठांचा (शेला, धोतर इ.). ३. तीन तळ (डेक) असलेले (जहाज).
**तिमण** न. तेल या शब्दापुढे अतिशयार्थ दाखविणारा शब्द.
**तिम(मा)णा** न. प्रथम रजोदर्शन, गर्भाधान, प्रसूती वगैरे समयीं माहेरचे सासरी व सासरचे माहेरीं भोजनसाहित्य, आहेर इ. पाठवितात तें सामान.- मसाप २.४.३६५. (चि.)
**तिमयाचा बैल** नंदीबैल : 'तिमयाचे बैल करीं शिकवलें।'- तुगा २८२३.
**तिमाजी नाईक** अत्यंत चिक्कू माणूस. (ह. ना. आपटे यांच्या 'मधली स्थिती' कादंबरीतील पात्र.)
**तिमाणे** न. १. शेतातील बुजगावणे. २. (तिरस्कारार्थी) खोपटी; झोपडी. (राजा.) [क. तिम्मण्णा]
**तिमाय** स्त्री. सासू; मामी. (गो.)
**तिमाव** पु.मामा; सासरा. (गो.)
**तिमाशी** स्त्री. १. खोड. २. खरडपट्टी. (व.)
**तिमास्का** पु. माठ; भाजीची एक जात.- कृषि ६३७.
**तिमिर** न. पु. १. अंधार; काळोख. २. डोळ्यातील दोषामुळे येणारे अंधत्व. [सं.]
**तिमिरेजणे** अक्रि. १. काळोखाने व्याप्त होणे. २. दृष्टीचे तेज मंद होणे; अंधत्व येणे : 'एऱ्हवीं संकल्पाचिये सांजवेळें। नावेक तिमिरेजती बुद्धीचे डोळे।'- ज्ञा ९.७२.
**तिमोद** पु. आंब्याचा एक प्रकार. (गो.) [पोर्तु.]
**तिम्हण** न. डाळीच्या पिठाची थोड्या तेलावर केलेली वडी; डाळीच्या पिठाचे धिरडे. (व.)
**तिर** उद्गा. शेळ्या, मेंढ्या यांना हाकण्याचा शब्द. [ध्व.]
**तिरक(व)ट, तिरका-पा-वा-सा-ळा** वि. काणा, चकणा (डोळा, माणूस). [सं. तिर्यक्]
**तिरकटी-त-ती, तिरकाठी** वि. तीन शिडांचे (जहाज).
**तिरकमठा** पु. बाण आणि धनुष्य यांची जोडी.
**तिरकमशेट** पु. जवळ भांडवल नसताना आपण मोठे आहोत असा बहाणा करणारा लहान शेट, व्यापारी.
**तिरकस** वि. वाकडा; तिरवा; तिरपा.
क्रिवि. वाकडे; तिरपे होईल असे (कापणे, जाणे, पाहणे).[सं. तिर्यक्]
**तिरकस उंची** शंकूचा शिरोबिंदू व त्याच्या पायाच्या परिघातील कोणताही बिंदू यांना सांधणारी, जोडणारी रेषा.
**तिरका** पहा : **तिरपा**
**तिरकानी रेघ, ओळ** कागदाच्या पाडलेल्या चार मोडींपैकी तीन मोडींमध्ये काढलेली रेघ.
**तिरकी** स्त्री. एक पै; एकतृतीयांश पैसा. (को.) [सं. त्रिक]
**तिरकी-के** स्त्री. न. एकाला तिनाने गुणत असताना उपयोगात येत असलेली संज्ञा. [सं. त्रिक]
**तिरकुट** न. झोपडे; छपरी : 'या माडाची माडी तो बागेतल्या तिरकुटांत विकावयास देत नसे.'- स्वैसं.
**तिरकूट** न. मसाल्याचे पदार्थ एकत्र कुटून केलेले मिश्रण, चटणी, पूड.
**तिरकूट** न. तीन कुटुंबांची सोयरीक.
**तिरखई** स्त्री. सागरगोट्यांतील एक डाव. एका वेळीं तीन खडे उचलून घेऊन वर फेकलेला खडा झेलणें.'- मखेपु ३३३.
**तिरखा** स्त्री. अव. (अशिष्ट) गुह्यभागावरील केस.
**तिरग(गू)ळ** पु. पानाचा धंदा करणारी एक ब्राह्मण जात व त्या जातीतील व्यक्ती.
**तिरगी(घी)मिरगी-घी** स्त्री. १. अरेरावी; तोरा; ताठा. २. अरेतुरे करणे.
**तिरगुणी, त्रिगुणी** स्त्री. लहान मुलीची साडी. (व.)
**तिरगो तिणाण्णा करीत हिंडणे** बिनकामाचे, वणवण हिंडणे. (कर.)
**तिरजे** न. लहान झरोका.

**तिरटीम** स्त्री. १. छळ; गांजणूक. २. वेडावणे; विडंबन.
**तिरड-विरड, तिरढो विरढी-ढ** क्रिवि. वेडेवाकडे; कुठल्या कुठे : 'नादाची अत्यंत प्रौढी। पृथ्वी गेली तिरढो विरढी।'- भारा बाल २०.५१.
**तिरडाफाक** स्त्री. १. दाणादाण; पांगापांग; पळापळ (सैन्याची, जमावाची). २. कार्यनाश; बिघाड; धुळधाण; गोंधळ; विचका (कार्य, योजना इ.चा). (क्रि. पडणे, येणे, होणे). ३. कष्टप्रद स्थिती; दमणूक; कुतरओढ; ताप; त्रास.
**तिरडी** पु. भारा; मोळी.
**तिरडी-ढी** स्त्री. प्रेत वाहून नेण्याची ताटी. (वा.) ० **उचलणे** - एखाद्या विरुद्ध कट करून त्याला काढणे. ० **करणे** - तिरस्कारपूर्वक त्याग करणे. ० **काढणे** - एखाद्याचे मरण इच्छिणे; मरणाची तजवीज करणे.
**तिरडे** न. १. गोवऱ्या भरून ठेवायची टोपली. २. टोपलीभर गोवऱ्या इ.वस्तू.
**तिरडे** न. जिच्यात भोक पाडून लहानशी काठी बसवतात अशी फळी; इंग्रजी टीच्या आकाराचे एक आऊत. (भात-लावणी करताना शेतकरी दाट चिखलात यावर विसावतो.)
**तिरडोळी** स्त्री. १. नारळाचे डोळे. २. (निषेधार्थी) भिकारी.
**तिरतिरा-ऱ्या** वि. १. चंचळ; अस्थिर. २. चुळबुळ्या; अस्वस्थ; अशांत.
**तिरध(धे)ल** स्त्री. १. शेतातील किंवा मळ्यातील उत्पन्नाचा खंडकऱ्याने मालकाला देण्याचा तिसरा हिस्सा. २. अशा अटीवर घेतलेला मक्ता, खंड. पहा : **अर्धेल** [सं. त्रिधा]
**तिरध(धे) ली** पु. तिरधेलीने जमीन करणारा; खंडकरी.
**तिरपगडा-डे** पु.न. फाशांच्या खेळातले एक दान; दोन फाशांनी टाकलेला एक डाव. यात एका फाशावर एक व एकावर दोन दाणे असतात.
**तिरपण-न ठिगळो-ळी** वि. १. त्रेपन्न (निरनिराळ्या) प्रकारची ठिगळे असलेल्या कपड्याप्रमाणे एकच रंग सांगता येणार नाही असा. (कु.) २. (ल.) पाताळयंत्री; चावट, उपद्व्यापी (पोर).
**तिरपणे, तिरपावणे** अक्रि. वाकडे होणे; लचकणे; ताठणे (अवयव); अवघडणे; ताठरणे; (मान) लचकणे.
**तिरपणे** अक्रि. तिरीप पडणे; दिपून जाणे.
**तिरपतकाना-न्हा** वि. तिरळे पाहणारा.
**तिरपतकानी-न्ही** स्त्री. (गोट्यांचा खेळ) गोटी तिसऱ्यांदा मारणे.
**तिरपस** वि. आडवा (लवंडलेला). (चंद्रपुरी)
**तिरपा** वि. १. वाकडा; सरळ नाही असा. २. (ल.) वाईट. [सं. तिर्यक्] (वा.) ० **पाय पडणे** - वर्तणूक बिघडणे; वाईट मार्गाला लागणे. **तिरपी नजर करणे** - अहित चिंतणे.
**तिरपागडा, तिरंबाकडा** वि. १. वाकडातिकडा उभा राहिलेला, पडलेला. २. ओझरता; कलता. ३. विपरीत; उलटा.
**तिरपी** स्त्री. लहानशी खिडकी; झरोका.
**तिरपीट** स्त्री. १. शीण; थकवा. २. त्रेधा; गडबड; धांदल; तारंबळ.
**तिरपुल्या** वि. तीन कमानीचा (दरवाजा).
**तिरफटणे** अक्रि. इकडेतिकडे व्यर्थ भटकणे, हिंडणे, फिरणे. (वा.) **तिरफटून लावणे**- परतून लावणे.
**तिरफळ** न. एक झाड व त्याचे फळ. पहा : **तिसळ, चिरफाळ**
**तिरफळी** स्त्री. स्क्रू ड्रायव्हर.
**तिरमणे** न. बळ; शक्ती; ताकद.
**तिरमल्ली-ल्ले-ल्या** पु. नंदीबैल घेऊन भिक्षा मागणारी कर्नाटकातील एक जात किंवा त्यांच्यातील एक व्यक्ती. [क. तिरगणे]
**तिरमिरणे** अक्रि. तिरमिरी येणे.
**तिरमिरी, तिरमी** स्त्री. १. घेरी; भोवळ; मूर्च्छा. (क्रि. येणे) २. उन्हाची झळ. (क्रि. लागणे, पडणे.). [क.]
**तिरवड** स्त्री. प्रेत नेण्याची ताटी; तिरडी. (गो.)
**तिरवड** पु.(सोनारकाम) ठोकण्याचा लहान, लाकडी हातोडा.
**तिरवणे** सक्रि. जिरवणे; मिटवणे.
**तिरवे** न. धिटाई.
**तिरशिंगराव** पु. १. तिरसट, चिडखोर माणूस. २. फुशारक्या मारून पराक्रमाचा आव आणणारा माणूस.
**तिरशिं(सं)गी** स्त्री. नित्य सकाळी, दुपारी व संध्याकाळी या तिन्ही वेळा फुले येणारे एक झाड. [सं. त्रिसंधि]
**तिरसट** वि. चिडखोर; तुसडा.
**तिरसी** वि. तिरवा; काणा. (गो.)
**तिरसुई** पु. होडीसाठीची वल्ही ज्या खाचेवर ठेवतात ती खाच. (अहि.)
**तिरसुवाद** वि. तिरसट. (गो.)
**तिरस्कार** पु. तिटकारा; अनादर; धिक्कार; हेटाळणी; अवमान. [सं.]
**तिरस्कारणे** सक्रि. हेटाळणे; अनादर करणे; धिक्कारणे; तुच्छ मानणे.
**तिरस्कृत** वि. झिडकारून दिलेला; निंदित; त्याज्य; अमान्य; धिक्कारलेला.
**तिरस्थळी** स्त्री. १. काशी, प्रयाग, गया या तीन क्षेत्रांची यात्रा. २. (ल.) इकडून तिकडे होणारे निरर्थक हेलपाटे; त्रासदायक व व्यर्थ प्रवास. ३.वरचेवर लागणाऱ्या पदार्थांची व स्थळांची पांगापांग व गैरसोईची स्थिती; कामाची दाणादाण. ४. मनाची अस्थिरता; चंचलपणा. [सं. त्रिस्थली]
**तिरळणे** अक्रि. फुटणे; तडकणे; पिचणे.
**तिरळातांदळा** पु. (विटीदांडूचा खेळ) दोन्ही बाजूंनी खेळणारा भिडू.
**तिरळी** स्त्री. दालचिनी. (गो.)
**तिराई(य)त** स्त्री. लवाद; पंचायत : 'मनोली तालुका हुजूर द्यावा सदरहू प्र।। तिराइतीने व।। रा. जोशीराव याकडे द्यावा.'- ऐको पुर.
**तिराघाटी** स्त्री. वि. तरवारीची एक जात; स्थानावरून पडलेले नाव.
**तिरायत** पु. (गो.) पहा : **तिऱ्हाईत**
**तिरावचे** सक्रि. खात्री करणे. (गो.)
**तिरांटी** स्त्री. १. कागदाचा बंद. (गो.) २. वस्त्राचा अरुंद फडका.
**तिरिंग** पु. गुरांच्या वैरणीसाठी उपयोगात येणारी एक वनस्पती.
**तिरी, तिरूक, तिर्क** स्त्री. (सोंगट्यांचा खेळ) तिसऱ्या घरी सोंगटी बसण्याजोगा पडणारा फाशाचा डाव; तीन. [सं. त्रि]
**तिरीक** वि. (विणकाम) तीन तारांचा (धाग्यांचा) समुदाय. [सं. त्रिक]

**तिरीप-वी-म** स्त्री. १. सकाळ, संध्याकाळचे कोवळे ऊन. (क्रि. घेणे, घेत बसणे) २. कवडसा; खिडकी, दरवाजा यांतून येणारे किरण; ढगांतून येणारे सूर्यकिरण; छटा.

**तिरीम** न. दृष्टिमांद्य; बुद्धिमांद्य.
पु. सौम्य प्रकाश.

**तिरुका-वा** पु. एक पैसा; पाव आणा : 'तिरुका अथवा धान्य झडकरी। मी घालते तुझे पदरीं।' - भवि २२.१०३.

**तिरूड** स्त्री. शोध; छडा; तलास; चौकशी.

**तिरोभाव** पु. १. एखादा राग आळवत असताना त्यात दुसऱ्या रागाची छाया सामान्य स्वरसमुदायाने उत्पन्न करणे व त्यामुळे मूळ राग झाकून टाकणे. २. अंतर्धान. ३. मृत्यू : 'स्वरूपदामोदरांचे तिरोभावानंतर रघुनाथदास पुरी सोडून गेले.'- गौरांग ५९६. [सं.]

**तिरोळी** पु. १. गवताचा प्रकार. २. झेंडूची एकेरी फुलांची जात. (बे., को.)

**तिर्तीर** वि. थोडेसे. (झाडी)

**तिर्पट** वि. संशयी; धूर्त. (झाडी)

**तिर्पिटीन** न. देवदाराचा चीक. [पोर्तु.,इं.टर्पेंटाइन]

**तिर्पुचे** अक्रि. चालताना पाऊल तिरपे होऊन दुखणे. (गो.)

**तिर्पूटी** स्त्री. तेंदूची काठी. (झाडी)

**तिर्यक** वि. आडवा; तिरपा; वाकडा. [सं.]

**तिर्यक गुणाकार** अपूर्णांक रूपात असलेले समीकरण सोडवण्यासाठी उजवीकडचा छेद गुणिले डावीकडचा अंश बरोबर उजवीकडचा अंश गुणिले डावीकडचा छेद असे जे सरळरूप दिले जाते ती कृती.

**तिर्यकबाहू** (नृत्य.) नृत्यात खालून वर व वरून खाली हात नेताना हातांची मधली स्थिती.

**तिर्यक योनी** १. पशूपासून अथवा पशूप्रमाणे जन्मलेला जीव. २. राक्षस; पिशाच्च; देव इ. [सं.]

**तिऱ्हा** स्त्री. पहा : **तिवई** २

**तिऱ्हाइती** स्त्री. मध्यस्थी; पंचाईत.

**तिऱ्हाईत** पु. १. मध्यस्थ; पंच. २. पंचांचा किंवा मध्यस्थांचा समुदाय. ३. परका माणूस; त्रयस्थ.
वि. कोणत्याही पक्षात नसणारा तटस्थ (माणूस).
[मल्याळी - तिरायुत; सं. त्रयस्थ]

**तिऱ्हा(वा)ळ** स्त्री. तीन पंचांचा तागा.

**तिलक** पु. १. कपाळावर लावलेला चंदनाचा, गंधाचा टिळा, वाटोळा बिंदू. २. (ल.) उत्तम; श्रेष्ठ. उदा. रघुकुलतिलक.

**तिलककामोद** पु. (संगीत) एक राग. गानसमय रात्रीचा दुसरा प्रहर.

**तिलद्वादशी** स्त्री. माघ वद्य द्वादशी.

**तिलमीवह, तिलमेवा** पु. तिळगूळ.

**तिलवली** पु. लिंगायत लोकांतील एक पंथ किंवा त्यातील एक व्यक्ती. पहा : **चिलवंत**

**तिलवाडा** पु. एक ताल; ह्यांत सोळा मात्रा व चार विभाग असतात.

**तिलारी** पु. लिंगायत पंथात प्रवेश केलेला हिंदू. (ठाणे).

**तिलांज(जु)ली, तिलोदक** पु. स्त्री. न. १. मरणदिवसानंतर दहाव्या दिवशी तीळ घातलेल्या पाण्याने मृताला उद्देशून 'अश्मा' नावाच्या दगडावर केलेले तर्पण. (क्रि. देणे, करणे.) २. (ल.) सोडणे; टाकणे; त्याग करणे; नाव सोडून देणे. (क्रि. देणे). [सं.] (वा.) ० **घेणे, घेऊन उभा राहणे** – एखाद्याच्या मरणाची वाट पाहणे. **(एखाद्याच्या नावावर किंवा त्याच्या नावची) ० देणे, सोडणे, सोडून देणे** - (एखाद्या वस्तूची) आशा, हक्क, संबंध सोडणे.

**तिलोरी, तिळोरा, तिरोळा, तिरळा** पु. कुणब्याची एक पोटजात.

**तिल्ला** वि. खेळणारा तिसरा; खेळात पाळीने तिसरा.

**तिल्लेरी** स्त्री. इंग्रजी 'आर्टिलरी'चा अपभ्रंश.

**तिल्लोरी** वि. जातगंगेने पांक्त ठरविलेला सालकडू, अक्करमाशा.

**तिवई** स्त्री. १. तीन पायांची घडवंची; तिपाई. २. तिवटे; भाताची रोपे उपटताना शेतात बसण्यासाठी घेतात ती तिपाई. [सं.त्रिपदी]

**तिवट** न. पागोटे (विशेषत : व्यापारी लोकांचे).

**तिवटणा** पु. तीन वाटा मिळतात ती जागा; नाका; तिठा. [सं. त्रिवर्त्म]

**तिवटी** स्त्री. अवयवांची वक्रता. (गो., को.)

**तिवटे** न. पहा : **तिवई** २

**तिवठा** १. पहा : **तिवटणा, तिटा-ठा**. २. पहा : **तिवडा** १,२

**तिवडा** पु. १. मळणी करण्यासाठी खळ्याच्या मध्यभागी पुरलेला खांब. २. शेतात धान्य वारवण्यासाठी उपयोगात आणण्याची तिपाई. ४. एक ताल. ५. केसांत खोवायचा एक दागिना.

**तिवण** स्त्री. न. १. त्रिदळ. २. तिहेरी घडी, पदर (कापड, कागद इ.ची).

**तिवणा-ने** वि. तीन पानांचा : 'त्रिविध अहंकारू जो एकु। तो तिवणा अधोमुखु। डिरु फुटे।'- ज्ञा १५.९५.

**तिवणे** अक्रि. तुंबणे; तुडुंब भरणे : 'मग तो तेणे प्रेमरसे। तिंवलेनि निजमानसे। - हरिवरदा खं. ५,पृ. ८४७.

**तिवतिवीत** वि. सतेज, टवटवीत. (गो.)

**तिवनी** स्त्री. (पळसाचे) त्रिदळ; तिवण.

**तिव(वी)र** न. उष्ण कटिबंधातील सागरी किनाऱ्यावर दलदलीत वाढणारी झुडपे. खाडी भागात यांची जंगले असतात.

**तिवरा** पु. अभिमान : 'स्वरूपाच्या दर्पे बहुत। चढला त्यासी तिवरा।'- निमा १.८३.

**तिवस** न. एक झाड; याचे लाकूड इमारतीच्या उपयोगी असते.

**तिवंधा** पु. तिरस्थळी; मनाची ओढाताण; व्यग्रता; मनाचा निश्चय न होणे : 'येथून जावे तिकडे रोख पडतो तो तिवंधा आहे.'- पेद १.११. [सं. त्रिधा]

**तिवंधा** पु. १. अनेक गावांच्या सीमा ज्या ठिकाणी मिळतात ती जागा. २. तिवटणा. [सं. त्रिबंध]

**तिवा-व्वा -व्ही** पु. गुरांना होणारा पायाचा एक रोग. [सं. तीव्र]

**तिवा-व्वा** पु. पत्त्यांतील तीन ठिपक्यांचे पान. [सं. त्रि]

**तिवाठा** पु. १. पहा : **तिवठा, तिठा**. २.(ल.) फाटाफूट : 'केला तुवां देखत भर्तृघात। क्षणें तिवाटा रचिल्या तिघांत।'- वामन, भरतभाव ७. [सं. त्रिवर्त्म]

**तिवा(व)मासा** देवमासा. [सं. तिमिमत्स्य]

**तिवारा** पु. तीन दारे असलेला दिवाणखाना. (माळवी) [सं. त्रिद्वारिका; हिं. तिबारा]

**तिवारी** स्त्री. (व.) पहा : **तिवडा २**

**तिवाशा–शी–सा–सी** स्त्री. १. तक्या; लोड; गिर्दी; उशी : 'तिवाशी उशी रम्य पीतांबराची।'– किंसुदाम ४१; 'तिवासिया लोड टाकूनि बैससी।'– तुगा. २. गादी; चित्रासन; गालिचा : 'लोड तिवासे विस्तारले।'– मुआदि ४६.५.[फा. तिवासी=कशिदा काढलेली लहान बैठक]

**तिवोत्तरा** शंभराला तीन प्रमाणे घेण्याचे कळांतर (व्याज).(तंजा.)

**तिव्हन** न. तीळ कापून वाळवतेवेळी त्यात होणारी कीड. (अहि.)

**तिव्हा** पु. १. जनावरांना होणारा एक आजार. २. पाऊस न पडता सकाळी दवाने ओली झालेली जमीन.

**तिव्हाळ** पु. पहा : **तिवटणा, तिवठा १**

**तिशा** पु. प्रथमच गरोदर असलेल्या स्त्रीला तिच्या पाचव्या ते नवव्या महिन्याच्या दरम्यान करण्यात येणाऱ्या समारंभांत देण्यात येणारे हिरव्या रंगाचे वस्त्र; डोहाळतुलीची ओटी.

**तिशी** स्त्री. १. तीस वर्षांचे वय; तत्कालीन अवस्था. २. तीस सजातीय पदार्थांचा समुदाय.

वि. तीस दिवसांचा (महिना).

क्रिवि. दिवसाच्या तिसाव्या घटकेला. [सं. त्रिंशत्]

**तिष्ठणे** अक्रि. वाट पाहणे; मार्गप्रतीक्षा करणे; खोळंबणे. [सं. स्था]

**तिसकूट** स्त्री. (मित्रामित्रांतील) गैरसमज; तिढा; तेढ. (राजा., कु.)

**तिसकूट** स्त्री. मूर्च्छा; घेरी. (क्रि. येणे). (राजा., कु.)

**तिसकूट** स्त्री. कोवळे देठ, शेंडा (लहान झाडाचा); डिकरी.

**तिसकूड** वि. तुसडा; तिरसट; चिडखोर. (राजा.)

**तिसड** स्त्री. १. तीन वेळा किंवा तिसऱ्यांदा सडणे; तिसडीने सडणे. २. (ल.) बारीक चौकशी; छडा.

**तिसमारका, तिस्मारखां–खान** पु. १. शूरत्वाचा आव आणणारा, डरपोक मनुष्य. २. (या नावाचा पूर्वी एक योद्धा होऊन गेला, त्यावरून विपरीत लक्षणेने) अरेराव, करडा, रागीट मनुष्य : 'शाळेचे सरमास्तर स्वभावानें मोठे गर्विष्ठ व तिस्मारखान होते.'– नि ६५८.

**तिस(सा)रणी** स्त्री. तिसऱ्यांदा करणे.

क्रिवि. तिसऱ्यांदा.

**तिसरा** वि. क्रमाने दुसऱ्याच्या पुढचा; तृतीय.[सं. तिस्](वा.) ० **पाय** – १. एखादे काम करण्याविषयी दांडगा उत्साह, हौस; पूर्ण तयारी. २. फार उतावीळपणा. **ह्याचे तिसरेच एक** – १. ह्या मनुष्याचा विचार, कल्पना, मत किंवा मार्ग पहिल्या दोहोंशी जुळत नाही. २. विचित्र, विलक्षण मत.

**तिसराव–वा** पु. तिसरा हिस्सा, भाग.

**तिसरी** स्त्री. एका जातीचा शंख, शिंपला; यात एक प्राणी असतो. (सामा.) मुळा. (गो.,कु.)

**तिसरे** न. सुकण्याच्या बाबतीत तिसऱ्या क्रमांकाची नारळाची पेंड.

**तिसळ** पु. स्त्री. एक मोठे काटेरी झाड. याच्या फळाने जिभेला मिरमिर लागते, त्यांचा मसाल्यात उपयोग करतात. याच्या वासाने माशांची घाण जाते. पहा : **तिरफळ**

**तिसारणे** सक्रि. तिसऱ्यांदा करणे.

अक्रि. (कोंबडा) तिसऱ्यांदा आरवणे.

**तिसी** स्त्री. जवस; अळशी (झाड व धान्य). [सं. अतसी]

**तिस्कनड** स्त्री. भानगड. (गो.)

**तिस्ती** स्त्री. १. तिपदरी सूत. २. चिंधी. (गो.) [सं.त्रिसुती]

**तिस्मारगिरी** स्त्री. जुलूम : 'कैद्यांना नेतेवेळीं पोलीसानें आपली तिस्मारगिरी दाखविली.'– विक्षिप्त १.२७.

**तिस्सा** न. वखराच्या खोडाला तीन खुंट्या असलेले आऊत. [सं.त्रि]

**तिस्सा** वि. नऊ (साल). [अर.तिस]

**तिही** स्त्री. तीळ. (अहि.)

**तिहीर, तिहेरा–री** वि. १. तीन पदरी (वस्त्र, दोरी). २. तिप्पट; तिघड (परिमाण, जिन्नस). [हिं. तिहरा]

**तिळई** स्त्री. तिळाची एक जात.

**तिळकाटा** न. तिळाचे काड; पाचोळा. [सं. तिलकाष्ठ]

**तिळकूट** न. मोहऱ्या, मेथ्या, तीळ इ.कुटून केलेली पूड; एक तोंडीलावणे.

**तिळकोंद** स्त्री. तिळाचे सारण, पुरण. पहा : **कोंद**

**तिळगूळ** पु. (मकरसंक्रांतीच्या दिवशी वाटतात ते) गूळमिश्रित तीळ; शर्करामिश्रित तीळ; हलवा. पहा : **तिळवण**

**तिळतुल्य–प्राय–भर–राई–मात्र** क्रिवि. किंचितसे: 'तिळतुल्य नाहीं मनिं डगल्या।'– मध्व २२०.

**तिळपुष्प** न. १. तिळाचे फूल. २. (ल.) डोळ्यात पडलेला डाग, फूल.

**तिळवण–णी** स्त्री. (बायकी) लग्न झाल्यानंतर पहिल्या मकरसंक्रांतीला हलवा, तिळाचे लाडू, आहेर वगैरे नवरा-नवरीकडील माणसे परस्परांच्या घरी पाठवतात तो प्रकार. संक्रांतीच्या सणातील एक विधी; तिळगूळ.

**तिळसंक्रात** स्त्री. १. मकरसंक्रांत. २. मकरसंक्रांतीला पाटील-कुळकर्ण्यांचा तिळगूळ घ्यावयाचा हक्क.

**तिळागुणी** न.स्त्री. सलोखा; ऐक्य; ऐकमत्य; प्रेमभाव. (क्रि. येणे, होणे).

**तिळाचे कोळ** तीळ झाडून घेतल्यावर त्याच्या राहिलेल्या काड्या. (माण.)

**तिळातांदळा** वि. (शिवामूठ इ. स्त्रियांच्या धार्मिक विधीत तीळ व तांदूळ एकत्र करतात त्यावरून ल.) मनमिळाऊ : 'तुका म्हणे कान्हो तिळ्यां-तांदळ्या। जिंके तो करी आपुला खेळ्या।'– तुगा २५४.

**तिळे** न. एकदम झालेली तीन मुले.

**तिळे(ळ्ये)ल** न. तिळाचे तेल. (को.)

**तिंटॉ** पु. १. बाजार. २. बाजारात दुकान मांडल्याबद्दलचा कर. ३. टिटवी पक्षी. (गो.)

**तिंटॉपोय** स्त्री. १. लांब पायांचा व मानेचा एक पक्षी; बगळा. २. (ल. उप.) अतिउंच स्त्री. (गो.)

**तिंतूर** पु. १. भांडे, वस्त्र इ.ला पडलेले बारीक भोक. २. एक कीटक, किडा.– मपु ६.२२.

**तिंतेर** पु. दौत. (गो.)
**तिंदुक** स्त्री. टेंभुरणी (झाड व फळ) : 'कदळी तिंत्रिणी तिंदुक, मालती।'- माधव, रामायण - अरण्यकांड १८.
**तिंब** वि. चिंब; पूर्णपणे भिजलेला. (क्रि. होणे, करणे). [सं. तिम्]
**तिंबणे, तिमणे** न. १. एखाद्या स्त्रीला प्रसूतीनंतर दहाव्या दिवशी तिच्या माहेरून तांदूळ, तूप इ.नी भरून आलेले ताट. पहा : **तिम(मा)णा.** २. न्हाणवलीच्या चौथ्या व बाळंतिणीच्या दहाव्या दिवशी तिची ओटी भरून वडे, घारगे करतात तो समारंभ.
**तिंबणे** अक्रि. १. पूर्णपणे ओले होणे; भिजणे. २. मळल्यामुळे उत्तम भिजणे(कणीक). ३. भिजल्यामुळे आंबणे (तांदूळ). ४. योग्य आहाराअभावी रोडावणे; कृश होणे. (मावळी)
सक्रि. १. पूर्णपणे ओले करणे; भिजवणे; चिंब करणे. २. कणीक भिजवून चिकट व मऊ होईल अशी चांगली मळणे. ३. (ल.) सडवून तुडवणे; चोपणे. ४. आंबवणे. ५. दही, दूध, वडे मिसळून बोडण तयार करणे. [सं. तिम्]
**तिंबसणे** अक्रि. पहा: **तिंबणे**
**ती** सना. स्त्री. १. तृतीयपुरुषी स्त्रीलिंगी सर्वनाम. स्त्रीलिंगी शब्दाने निर्देशिली जाणारी व्यक्ती किंवा वस्तू. २. (तिरस्कारार्थी) पुरुष. ३. (सांकेतिक) स्वत:ची बायको.
**तीगराळे** न. तीन वाती लावलेला दिवा : 'तीगराळे विगटनी। घातली खणोखणी।'- कालिकापुराण ३८.३१. [सं.त्रि+कर+आलय]
**तीचनाट** स्त्री. खेळात गोटी असेल त्याच जागी ठेवण्यासाठी हा शब्द वापरतात. (कु.)
**तीज** स्त्री. १. शुक्ल किंवा कृष्ण पक्षाची तिसरी तिथी; तृतीया. २. (बायकी) चैत्र शुद्ध व वद्य आणि वैशाख शुद्ध तृतीयेचे हळदीकुंकू. ३. अक्षयतृतीया; वैशाख शुद्ध तृतीया. [सं.त्रि; गु.]
**तीझ** वि. तीक्ष्ण. [अर.]
**तीट** पु. स्त्री. १. दृष्ट किंवा पिशाच्चबाधा होऊ नये म्हणून लहान मुलांच्या कपाळाला लावलेला काजळाचा टिळा; अंगारा. २. तांदूळ व धान्य जाळून तयार केलेला लहान मुलांच्या कपाळी गंधाप्रमाणे रोज स्नानानंतर लावण्याचा गंधासारखा पदार्थ. ३. त्याची टिकली. [सं. तिलक]
**तीट-ड** स्त्री. पु. बाक; वळण; पीळ.
**तीड** स्त्री. फट; भेग; चीर. [ध्व. तड्]
**तीड** स्त्री. १.पहा : **तीट-ड.** २. गुंतागुंत; गाठी (दोरीतील); अढी; तिढा. ३. (ल.) गैरसमज; मतभेद; बेकी. [सं. तिर्यक्]
**तीड** स्त्री. १. (ल.) आडकाठी; प्रतिबंध; खो; तिढा; अडथळा आणणारी गोष्ट; अडचण. (क्रि. येणे, पडणे.) २. हिशेबात प्रमाद किंवा चूक. ३. कुरापत. (क्रि. काढणे). (गो.) [क.तड]
**तीथ** स्त्री. १. पहा : **तिथि-थी.** २. श्राद्धदिन. [सं.तिथि](वा.) ० **धरणे, नेमणे, ठरविणे** - लग्न इ. कार्याचा मुहूर्त, दिवस ठरवणे.
**तीन** वि. ३ ही संख्या. [सं. त्रि] (वा.) ० **अडकून सीताराम** - घोटाळ्यात पाडणे. ० **ताड उडणे**- अतिशय आश्चर्य वाटणे. ० **तेरा नव बारा** - पोकळ, गैरलागू, भलभलत्या सबबी सांगणे. (क्रि. लावणे, मांडणे, सांगणे, बोलणे). ० **तेरा होणे, वाजणे** - बोजवारा उडणे; पांगापांग, दाणादाण होणे; उद्ध्वस्त होणे. ० **तेरा गोष्टी** - १. अरेरावीचे, दांडगाईचे भाषण. २. असंबद्ध, विसंगत भाषण. ३. व्यर्थ बहाणे; केवळ सबबी. (क्रि. सांगणे) ० **फातार मांडणे, मांडप** - स्वतंत्र संसार मांडणे; स्वतंत्र चूल करणे.
**तीन चांदांची सरदारकी** तारांकित असा सन्मान,मानमरातब.
**तीन ठिकाणी वाकडा** वि. १. मान, कंबर व पाय या ठिकाणी वाकडेपणा असणारा. २. (ल.) अतिशय कुरूप; कुबडा. ३. (ल.) चिडखोर; तिरसिंगराव; माणूसघाण्या.
**तीप** स्त्री. ढेप. [अर.]
**तीफुला** पु. तीन पुडांचे पात्र. [सं. त्रि+फुल्ल]
**तीब** स्त्री. तीर मारण्यासाठी ठेवलेली वस्तू; लक्ष्य.
**तीर** पु. न. (समुद्र, नदी वगैरेंचा) काठ; किनारा; नदीकाठचा प्रदेश.[सं.]
**तीर** पु. १. बाण . २. भेग; चीर; जमिनीला पडणारे भगदाड. ३. खांब वगैरेंना दिलेला तिरकस धीर, टेक. ४. तरफ; उटाळी; जड वस्तू उचलण्यासाठी त्याला लाकूड वगैरेचा दिला जाणारा नेटावा, टेकू. ५. (नाविक) डोलकाठीच्या किंवा इतर आधारासाठी जोड देणारे लाकूड; टेकावा. ६. घराच्या पाख्याला आढ्यापासून लगीपर्यंत असलेले जाड लाकूड, वासा. ७. मोटेच्या खालचा व वरचा वडप या परस्परांना समांतर असणाऱ्या जाड लाकडांना जोडणारे, उभे असणारे जाड लाकडांचे भाग. दोन तीर व दोन वडप मिळून पूर्ण चौकट बनते. (खा.) ८. चामड्याचा भाता ज्या चौकटीत असतो त्या चौकटीच्या दोन उभ्या दांड्या. ९. चामड्याच्या भात्याचे तीन कप्पे असतात. हे तयार करण्यासाठी दोन्ही बाजूंनी लाकडाच्या ज्या पट्ट्या लावून त्यांना चामडे ठोकतात त्या पट्ट्या. [फा. तीर]
**तीरगर** पु. बाण करणारा (कारागीर). [फा.]
**तीरदान** न. भाता; तरकश. [फा.]
**तीर्थ** न. १. पवित्र स्थळ; कोणतीही यात्रेची जागा; पवित्र मानलेल्या नद्यांच्या किनाऱ्यावरील पुण्यक्षेत्र. २. पवित्र नदी. ३. पवित्र नदीचे पाणी; ब्राह्मण किंवा संन्यासी यांचे चरणोदक; देवमूर्तीला स्नान घातलेले पाणी; पवित्र जल. ४. (गौरवार्थी) गुरू; धार्मिक अध्यापक; वडील; पूज्य व्यक्ती. ५. पवित्र प्रदेश, स्थळ. देवतीर्थ, ऋषितीर्थ, पितृतीर्थ असे याचे तीन प्रकार आहेत.[सं.] (वा.) ० **करणे, करून बसणे** - १. गंगादी तीर्थस्थानी जाऊन स्नानादी यात्राविधी करणे. २. तीर्थाला भेट देणे; तीर्थयात्रा इ. धर्मकार्यात मग्न राहणे.
**तीर्थकाक** पु. (ल.) तीर्थस्थानीही लुटण्यासाठी, डल्ला मारण्यासाठी सर्वदा टपून बसलेला माणूस; उचल्या.
**तीर्थकार** पु. पवित्र व्यक्ती; तीर्थ घेण्याचा आणि मूर्तीसमोरील नैवेद्य भक्षण करण्याचा विशेषाधिकार असलेली व्यक्ती; जैनांचा गुरू.
**तीर्थकुंडी-गंडी-भिंडी-पात्री-वटी-लोटी, तीर्थोटी** स्त्री. तीर्थ ठेवण्याचे, चंबूसारखे, बारीक गळा असलेले भांडे.
**तीर्थपंथ** पु. गोसावी लोकांतील तीर्थ हे पद नावाच्या शेवटी धारण करणारा एक पंथ, भेद.

**तीर्थपाद** पु. मोक्षदाता गुरू; गायत्रीचा उपदेश करणारा गुरू; गुरूपदेश देणारा पिता.

**तीर्थरूप** वि. १. (प्रत्यक्ष तीर्थच या अर्थी पत्र लिहिताना आरंभी लिहितात) पिता. २. मातापिता (उभयता). ३. मातापित्यांच्या ठिकाणी असणाऱ्याला लावण्याची संज्ञा, लिहिण्याचा मायना.

**तीर्था** स्त्री. काठाजवळची जाड सुताची विणीतील कोर.

**तीर्वं** सारा; पट्टी.

**तीवर** पु. बाण : 'ते बहुतां तीवरांचे दादुले.'– उह ८५०.

**तीव्र** वि. १. जलाल; झोंबणारा; तिखट. २. (ल.) जालीम; उग्र; भयंकर; प्रखर (आग, स्वभाव). ३. तीक्ष्ण; कुशाग्र (शस्त्राची धार, बुद्धी). ४. मर्मवेधक; खोचदार (भाषण).

**तीव्रमध्यम** पु. (संगीत) पाच विकृत स्वरांपैकी तिसरा स्वर.

**तीव्र मनोगंड** (मानस.) एखाद्या व्यक्तीला झपाटून टाकणारी गोष्ट. अशी घटना व्यक्तींच्या इच्छाशक्तीच्या बाहेरची असते आणि अशा प्रकारची विसंगती समजली तरी उमजत नाही.

**तीव्र स्वर** शुद्ध स्वरापेक्षा ध्वनीने उंच असलेला स्वर.

**तीव्रा** स्त्री. १. (संगीत) पहिल्या श्रुतीचे नाव. २. (ताल) सात मात्रा व तीन विभागांचा एक ताल.

**तीस** स्त्री. तहान. – लोसाको.

**तीस** वि. ३० ही संख्या.

**तीसरी** वि. स्त्री. तीक्ष्ण : 'तीसरीए धारेवरी चाले ऐसा कवणु असे?'– लीचउ ३५३.

**तीळ** पु. १. गळिताच्या धान्यांपैकी एक. यात काळे व पांढरे असे दोन प्रकार आहेत. तिळाचे तेल निघते व त्याची पेंड गुरे खातात. २. शरीराच्या कातडीवरील नैसर्गिक काळा डाग. ३. डोळ्यांतील काळा ठिपका : 'तिळा करितां पुतळी । दिसों लागे ।'– दास ८.३.४. क्रिवि. तिळभर; यत्किंचित् : 'तरी तीळ सनदांचा उजूर न धरितां ।'– वाडसमा १.१५३.[सं. तिल] (वा.) ० **खाऊन व्रत मोडणे**– (एक तीळ खाल्ल्यानेही उपवास मोडतो यावरून) थोडक्या लाभाकरता वाईट गोष्ट करणे. ० **घालून कूळ उच्चारप** – उगीचच उठाठेव करणे. ० **तुटणे** – सोयर, सुतक (तिलांजलीचा) संबंध सुटणे; नाते तुटणे. ० **दान देणे** – १.(मृत मनुष्याला तिलांजली देतात यावरून) तिलांजली देणे; संबंध सोडणे; त्याग करणे. ३. एखाद्या पर्व-दिवशी तीर्थाच्या ठिकाणी करतात ते स्नान, तिलदान इ. **तिळपापड होणे** – अतिशय संताप होणे. **तिळी असणे**– (एखाद्याच्या) कह्यात, अर्ध्या वचनात असणे; अनुकूल होणे. **तिळी थेंब पडणे** – (कपाळावरच्या तिळावर घामाचा थेंब पडणे) संतप्त होणे; अतिशय रागावणे. **(तोंडात) तीळ न भिजणे**– एखादी गोष्ट तोंडात, मनात न राहणे.

**तीळतीळ** वि. १. थोडे थोडे; जरा जरा; किंचित्; अल्प. २. हळूहळू. **जीव तुटणे** – सारखी काळजी, हुरहूर लागणे; अतिशय चिंता वाटणे;. सतत टोचणी लागणे.

**तीक्ष्ण** वि. १. पहा : **तीव्र**. २. तत्पर; उत्साही; हुषार. [सं.]

**तीक्ष्णक** पु. धार लावण्याचे यंत्र.

**तुई** स्त्री. कलाबतू किंवा जर यांची कापडाला लावण्याची पट्टी, फीत, काठ; जर; कलाबतू. [हिं.]

**तुक, तुकवा** न. १. महत्त्व; वजन; योग्यता : 'तैसा मी जेतुला आघवा । तेंचि तुक तयां चिया सद्भावा ।'– ज्ञा ९.२६१. २.तोल; जोख; वजन : 'द्यावें संभाळूनी समतुक भावें । आपणहि खावें त्यांचे तुके ।'– तुगा ३१. ३. तुलना; बरोबरी : 'विप्रवर सुते क्षत्रिय उतरेल तुझ्या न हा ययाति तुकीं ।'– मोआदि १०.७०.[क.तूक] (वा.) **तुका आणणे** – पूर्ण मान्य करून घेणे : 'श्री गणेश माहात्म्यार्थ निका । धरोनि हे संजीवनी टीका । मी बोलिलो संक्षेप हे तुका । आणिजे तुका संतजनी ।।'– गणेशपुराण, संजीवनी टीका, पृ. ८५.

**तुकडा** पु. १. खाद्य वस्तूचा हिस्सा, भाग. २. भाकरी इ. सुका खाद्यपदार्थ. (वा.) ० **मोडणे**– चरितार्थ काटकसरीने चालवणे.

**तुकडी** स्त्री. शाळेत वर्गांचे, तसेच समूहाचे सोयीसाठी किंवा दर्जानुसार केलेले भाग.

**तुकडीकरण** न. (अर्थ.) वारसाहक्कामुळे, पिढ्यान् पिढ्या मुलांमध्ये जमीन विभागली जाऊन तिचे शेती करायला कठीण होईल असे लहान तुकडे होणे.

**तुकडेबंदी कायदा** विशिष्ट मर्यादेखाली तुकडे पाडून जमीन विकण्याला बंदी करणारा कायदा.

**तुकतुकी** स्त्री. (प्रकृती निरोगी असल्यामुळे शरीरावर असलेले) तेज; टवटवी; लाली; तजेला; हुशारी; डौलदारपणा.

**तुकतुकीत** वि. टवटवीत; तजेलदार.

**तुकना** स्त्री. तागडी, पदार्थाचे वजन करण्याचे साधन. (खा.)

**तुकमठ** वि. वजनात हलके: 'मेरुपासाव घनवटें । जीं हिंसीं जालीं तुकमठें ।'– ऋ ३०.

**तुकमा, तुक्मा** पु. १. गुंडीचे काजे; बिरडे. २. गुंडी; बटन. ३. डोळ्याची कानी; डोळ्याचा दीर्घवर्तुळाकार दिसणारा भाग. ४. फासा. [फा. तुक्मा]

**तुकमे** न. मुळ्याचे बीज. – मुंव्या ११०.

**तुक(का)विणे** उक्रि. १. मान, मस्तक, माथा इ. डोलवणे; हलवणे. २. (ल.) संमती दाखवणे.

**तुकंबरी, तुकं(कुं) बराई, तुकमरिआ** न. तुळशीचे, सब्जाचे बी.

**तुकाई** स्त्री. तोलणे; वजन, माप करण्याची क्रिया.

**तुक्कल** स्त्री. १. एक विशिष्ट आकाराचा पतंग; कनकावळ्यासारखी एक कागदाची वावडी. २. सर्पाच्या फणीच्या आकाराचा पतंग. (व.)[हिं.]

**तुक्का–का** पु. १. पात्याऐवजी तोंडाशी गोळा असलेला बोथट बाण. २. (ल.) गुप्त निंदा; कावेबाजीचा फटका किंवा टोमणा; व्यंग्यार्थ; व्याजोक्ती. (क्रि. टाकणे, मारणे, ठेवणे). ३. आळ; आरोप. (वा.) **तुका मारणे** – १. नेम मारणे. २. महत्कृत्य करणे.

**तुखम** न. १. बीज; बी. २. अंडे. ३. शुक्र; वीर्य. [फा. तुख्म]

**तुगुटी** वि. लेकुरवाळी.

**तुच्छ** वि. १. क्षुद्र; क्षुल्लक; हलका; अल्प. २. हलकट; मान्यता नसलेला; नीच. ३. तिरस्करणीय; निरुपयोगी.

न. कोंडा; तूस. [सं.]

**तुझा** सना. तू या सर्वनामाची षष्ठी विभक्ती. [सं. तव] (वा.) **तुझे माझे करणे**- एकेरीवर येणे; भांडणे.

**तुट** वि. बळकट; दणकट : 'राहूनि तारुण्याचा घाटी : मार्ग लुसिजति इंद्रियें तुटी :' - ऋव ३४४.

**तुटक** वि. १. मोडलेला; अडथळा आलेला; तहकूब ठेवलेला; एकसारखा नसलेला (रस्ता, ओळ, कामधंदा). २. विसंगत; असंबद्ध (भाषण, ग्रंथरचना). ३. विस्कळीत; वेगवेगळा; फाटाफूट झालेला; एकत्र होण्याच्या पूर्वीचा (कारभार, धंदा). ४. कडक; रागीट; तुसडा; परकेपणा उत्पन्न करणारा ( व्यवहार, वागणूक, भाषा). ५. भांडण्याचा, बेबनाव करण्याचा स्वभाव असलेला (माणूस). ६. भग्न; खंडित; अलग; अर्धवट (भांडण, कोटिक्रम, वृत्तांत इ.). ७. अंगावरून तोडलेले, पारडे (मूल). (वा.) ० **होणे** – गरीब होणे; नुकसानीत येणे.

**तुटका** वि. १. पहा : **तुटक** १-३. २. तुटलेला.

**तुटणे** अक्रि. १. मोडणे; छकले, तुकडे पडणे. २. घटणे; कमी होणे; उतरणे; न्यून होणे; कमती येणे. ३. मोडणे; तुकडे तुकडे होणे; विस्कळीत होणे; फुटणे. (एकत्र जमलेला समुदाय, संघ, मंडळ, सामाईक धंदा). ४. (मैत्री, संबंध) सुटणे, नाहीसे होणे. ५. (एकत्र मित्रभावाने असणारे लोक) परस्परांपासून निराळे होणे. ६. तुटून पडणे; एखाद्यावर चवताळणे; अंगावर जाणे; ताशेरे झाडणे. ७. अतिक्रमण, उल्लंघन होणे (जमिनीचे वा अंतराचे); ओलांडणे; आक्रमणे; (वाट, अंतर) चालून जाणे. ८. दिवाळे वाजणे. ९. अशक्त, क्षीण होणे; (शरीर, प्रकृती इ.) खालावणे. १०. (मन, मर्जी इ.) मोडणे; अनासक्त, विमुख होणे. ११. संपणे; मिटणे; तोड होणे, निघणे. १२. (पगार, सैन्य, कोणतीही ठरीव रक्कम) कमी होणे; छाटली जाणे. १३. (मूल) अंगावरून सुटणे; स्तनपान करण्याचे बंद करणे. [सं. त्रुट्] (वा.) **तुटून पडणे** – १. निश्चयाने आणि जोराने (कामाला) लागणे. २. (एखाद्याच्या) अंगावर चालून, चवताळून जाणे; शिव्या देत सुटणे; अतिशय रागावून बोलणे.

**तुटतुटणे** अक्रि. तुडतुडणे; तडतडणे; उलणे; फुटणे; तडकणे; पिचणे (भाजत अथवा तळत असलेले पदार्थ). [ध्व. तुट्]

**तुटपटा-ट्टा** पु. घोड्याच्या तोंडावरील दोन-तीन जागी तुटलेला पांढरा पट्टा.- अश्वप १.९५.

**तुटपुंजा** वि. १. थोडक्या भांडवलावर धंदा, सावकारी इ. करणारा (मनुष्य). २. अपूर्ण; अपुरा; अल्प (पदार्थ, काम).

**तुटरा, तुटीर** वि. १. सहज, लवकर तुटणारा (दोर इ.). २. लवकर चिडणारा; भांडणारा; चिरडखोर.

**तुटवडा** पु. एखादी वस्तू अत्यंत कमी असण्याची स्थिती.

**तुट(ड)साळ,तुडस** वि. पहा : **तुटरा** २

**तुटातुटी-तूट** स्त्री. मोडणे; पांगापांग (मैत्री, सैन्य, व्यापारी मंडळी इ.ची). (सामा.) ताटातूट; फुटाफूट; वियोग.

**तुटार** वि. मोडलेला; संपलेला; तोटा आलेला; खलास झालेला.

**तुटार-रा-ड-डा, तुटवडा-ळा, तुटोडा-ळा** पु. पहा : **तूट** १

**तुटारा** पु. होडी. ( तंजा.)

**तुटारी** स्त्री. (म्हातारपणामुळे अथवा फार दिवसांच्या आजारामुळे आलेला) अतिशय अशक्तपणा; दुबळेपणा.

**तुटावणे** अक्रि. १. रागाने, दांडगाईने अंगावर चालून येणे; तुटून पडणे. २. उत्सुकतेने (खाण्यावर, कामावर) धाड घालणे अधीरतेने (काम, खाणे) सुरू करणे. ३. (काही पाहण्याकरता, झोंबाझोंबी करण्याकरता) गर्दीने घुसणे; एकदम पुढे जाणे. ४. मुसळधार (पाऊस)पडणे; आभाळ गळणे, कोसळणे.

**तुटी** स्त्री. पहा : **तूट**

**तुटीचा अर्थसंकल्प** ज्याच्यात उत्पन्नापेक्षा खर्च जास्त दाखवला आहे असे अंदाजपत्रक.

**तुडगुडे** न. लहान मुलांचे खेळणे; खुळखुळा.

**तुडताळ-ळा-ळी** स्त्री. १. कुंटीण : 'तैं तुडताळाचिंआंजीणी। तियां पारुखैलिआं।'- शिव ६३६. २. मध्यस्थी : 'जैसीया ब्रह्मविद्येचिया दूतिका : तुडताळी करिती' – मूप्र ६७२.

**तुडतुडणे** अक्रि. १. पहा : **तुटतुटणे** १. २. तिडतिडेपणाने बोलणे; चिडणे; एखाद्यावर तोंड टाकणे; तडतड बोलणे.

**तुडतुडीत** वि. १. कुडकुड, तुडतुड असा आवाज करणारा. २. दडस; चांगला न शिजलेला (भात). ३. कठीण; चामट. ४. खुटखुटीत, चपळ (म्हातारे माणूस, लहान मूल).

**तुडतुड्या** वि. चिरडखोर; तिरसट; तुसडा.

**तुडपुड** स्त्री. बोलाचाली.

**तुडपुडी** वि. रस्सा आटवलेली (भाजी). (झाडी)

**तुडवणी, तुडवणूक** स्त्री. १. मळणी; पायाखाली चिरडण्याची क्रिया. २. दुर्दशा; नाश : 'रणतुंबळ घुमतें घायाळ, तुडवणी झाली परगण्याची।'- ऐपो १८५. ३. पायमल्ली : 'आपणच हैगै केली तरी आम्ही तुडवणीस पडलो.'- पेद २.२६.

**तुडव(वि)णे** उक्रि. पायाखाली चुरडणे; मळणे; चेंदा करणे. [क. तुळि]

**तुडवातुडव** स्त्री. १. जोराची तुडवणी; रौंदळ; चुथडा. २. (ल.) जोराची धक्काधक्की; बुक्काबुक्की.

**तुडुकतुडुक** क्रिवि. दुडदुड; तुरतुर (लहान मुलांचे धावणे इ.). [ध्व.]

**तुडुंब,तुडूम** न. घोड्यावरचा नगारा; डंका. [ध्व.; ते. तुडुं; क. तुडुबु]

**तुडुंब, तुडूम, तुडुबंब** क्रिवि. परिपूर्ण; भरपूर; काठोकाठ. (क्रि. भरणे, फुगणे.) [क. तुंबु]

**तुडुंबणे** अक्रि. भरपूर भरणे : 'तयावनीं एक तटाक तोयें। तुडुंबले तामरसानपायें।'- र ८.

**तुणणावळ** स्त्री. न. तुणण्याची, रफू करण्याची मजुरी.

**तुणणे** सक्रि. रफू करणे; फाटलेल्या वस्त्रात सुते भरून ते पूर्ववत धड करणे; तुरपणे; विणणे. [सं.तुन्न]

**तुणतुण-णा** क्रिवि. तंतुवाद्याच्या आवाजासारखा आवाज होऊन. [ध्व.]

**तुणतुणी** स्त्री. गुह्येंद्रिय. [तुण् द्वि.]

**तुणतुणे-ने** न. गोंधळी लोकांचे एकतारी वाद्य. हे काडीने वाजवतात.

[सं. तूणा] (वा.) ० **वाजवणे, लावणे** – (ल.) ऐकणाऱ्यांना कंटाळा आला तरी पुन्हा पुन्हा आपलीच हकिगत सांगत सुटणे; आपलीच गोष्ट पुन्हा पुन्हा काढणे; स्वत:चे मत वारंवार मांडणे.

**तुणतुण्या** वि. १. (गोंधळी इ.च्या मागे) तुणतुणे वाजवणारा. २. (ल.) दुसऱ्याची री ओढणारा.

**तुणवाई, तुणाई** पहा : **तुणणावळ**

**तुणीव** वि. रफू केलेले; तुणलेले; विणलेले.

**तुतनायक** पु. शक्ती; बळ; धमक. (गो.)

**तुत(ति)या** पु. लोखंडी हातोडा. (गो.)

**तुता** पु. शेतीचे एक अवजार; असुडाची, वखराच्या पासाला लागलेली मातीची डिखळे फोडण्याची लोखंडी शेंब असलेली काठी : 'नाडे तुते करी'– लीचउ १६१.

**तुताती** स्त्री. असुडाची, कोरड्याची वादी.

**तुतारजी** पु. तुतारी वाजविणारा.

**तुतारी–र** स्त्री. तोंडाने वाजवण्याचे एक पितळी वाद्य; लहान कर्णा; शिंग.

**तुतारी** स्त्री. बैलांना हाणण्याची काठी; पराणी; टोचणी.

**तुताळ** वि. ताल नसलेले; बेताल : 'मी तुताळु सुताळु बरळे भलतेचि'– पंचो १५.९.

**तुतिया** पु. मोरचूद. [सं. तुत्थक; हिं.]

**तुतिया** स्त्री. दोषारोप; आळ. [फा.;हिं.]

**तुती, तूत** स्त्री. एक झाड व त्याचे फळ. याची पाने रेशमाच्या किड्याला खायला घालतात.

**तुती** पु. पोपट.

**तुतीच** क्रिवि. तूर्तास; सध्या तरी : 'तुतीच शामलाचे आरमार व सरंजामी गलबते बंदरातून बाहेर गेली आहेत.'– पेद ३५.

**तुतेकार** पु. तुता चालवणारा; नांगऱ्या ; अडाणी मनुष्य : 'तुतेकार ते आम्हीचि कीं'– ग्रोप्रच १७९.

**तु(तो)दा** पु. ढीग.

**तुनुमुनु, तुनुमुनु** करून क्रिवि. रडतखडत; कसेतरी; आळसत; मंदाईने; अनेक युक्त्याप्रयुक्त्या करून (काम चालणे, उपजीविका करणे).

**तुन्न–न्ना** पु. तोरण्याचे झाड किंवा त्याचे फळ. [सं.]

**तुपकडी–ड्या** स्त्री. पु. एक लहानसे झुडूप. याला लांडगा, चिपड, कुतरी असेही म्हणतात. याच्या फळांचा रांधा करून धनगर लोक कांबळ्याला खळीप्रमाणे लावतात.

**तुपट, तुपक(ग)ट** वि. १. तुपाची चव, वास येणारा (पदार्थ). २. तुपाचा वास लागलेले; ज्यात अतिशय तूप झाले आहे असे (अन्न). ३. तुपाचा, तुपासंबंधी (वास, घाण). ४. उंची व स्निग्ध; भारी (तांदूळ).

**तुपटा(सा,ष्टा)ण** स्त्री. खवट, वाईट तुपाची घाण.

**तुपतसर, तुपशिस्त** न. स्त्री. सरकारी कामासाठी गावकऱ्यांकडून बळजोरीने घेतलेले तूप.

**तुफर** पु. वि. फितूर; बेदिल; शत्रू : 'जागजागा तुफर होते त्यांचे पारपत्य करावें या उद्देशें मोहिम.'– मइसा ११, पृ. ५६. [फा. फतूर]

**तुफान** न. १. वादळ; वावटळ (दर ताशी ८० मैल वेगाची); जौळ; वायूची क्षुब्धता. उष्ण कटिबंधात होणारे अतिबलशाली चक्रीवादळ. याचा व्यास ३०० किमीहून जास्त व वाऱ्याचा वेग ताशी १०० किमीपेक्षा जास्त असतो. २. घोडा, बैल इ.पशू मस्त होऊन करतात त्या चेष्टा. ३. नाश; उध्वस्तता; दाणादाण; कुफराण : 'त्याने अदावतीनें दर्म्यान तुफान रचून पत्रें तयार केलीं.'– मइसा ७.९९.४. बालंट.
वि. १. तारुण्याने मुसमुसलेला. २. खवळलेला; क्षुब्ध; अनावर. [फा. तूफान]

**तुफानखोर, तुफानी** वि. १. कुभांडी; बालंट घेणारा. २. क्षुब्ध; दंगेखोर.

**तुफांग** स्त्री. बंदूक. (तंजा.)

**तुब** न. चाकाचा तुंब; मांदळा.

**तुबक** न. स्त्री. बंदूक; तोड्याची बंदूक. [तु.तुपक]

**तुबकातुबकी** स्त्री. दोन पक्षांनी परस्परांवर केलेला गोळीबार : 'त्याचे आमचे तुबकातुबकी जालियावर अमृतसिंग कुबर लाहोरवाले व रूपशा चौधरी पचोडीस आले.'– ऐको पुर.

**तुबकी** पु. बंदूकवाला; बंदूकदार : 'सदरहू खून इतबारखान सांगातें तुबकी गेला होता त्यानें केला हे लाजिम जाले.'– मइसा १८.४.

**तुमचा** सना. तुम्ही या द्वितीयपुरुषाची षष्ठी.

**तुमडं** न. बुधला; बैलगाडीच्या चाकाच्या आसाभोवती फिरणारा केंद्रभाग.

**तुमडीची चाल** पोवाड्यांच्या चालीचा प्रकार.– गापो १०६.

**तुमदार** पु. संग्राहक : 'खोजा इलमास पैकेकरी व फौजेचा तुमदार आहे.' – मर्शियांका पृ. ४०९.

**तुमल** पु. घोड्याचा एक त्वचारोग, घोड्याच्या अंगावर उठणारा फोड. – अश्वप २.२३३.

**तुमान** न. जुने इराणी नाणे.

**तुमान** स्त्री. शिपायांचे किंवा स्वारांचे पथक किंवा जमात.

**तुमान** स्त्री. लांब व पोकळ विजार; चोळणा. [फा. तुंबान]

**तुमार** पु. लेखी कागदांचे भेंडोळे; हिशेबपत्र; लेखी कागद इ.; जमाखर्च : 'अखेर सालीं तुमार झाला त्यावरी आमचे दस्तकत नाहीं.'– पेद १०३३. [अर. तूमार]

**तुमार** पु. ताडी विकणारा : 'तुमार व कोळी मच्छीकार.'– वाडबाबा १.३.

**तुमारजमा** स्त्री. शेतसाऱ्याची एकंदर जमेची सरकारी यादीप्रमाणे रक्कम.

**तुमारा, तुरमा** पु. कोंब; अंकुर; धुमारा.

**तुमुल** वि. तुंबळ; घनघोर; भयंकर (युद्ध, भांडण). [सं.]

**तुम्ही** सना. तू या सर्वनामाचे आदरार्थी बहुवचन आणि सामान्यत: अनेकवचन. [सं. युष्मत्]

**तुयाशील** वि. तुई लावलेले पंचवीस हात लांबीचे (पातळ).– कलावंत खाते (बडोदे) १३६.

**तुर–रे** न. तुतारीसारखे एक वाद्य : 'लागलीं अनुहतांचीं तुरें जयजयकारें गर्जती ।'– एभा २०.१८०. [सं. तूर्य]

**तुरई** स्त्री. दोडका (भाजी). (व.) [हिं.]

**तुरई–ड** स्त्री. १. दोन्हीकडे टोके असलेला खिळा; सुरसा. २. (वस्त्रो.) हातमागावरील विणलेले कापड गुंडाळण्याचे लाकूड, रूळ. [सं. तुरी]

**तुरकटी–ठी** पहा : **तुरई २**

**तुरका(खा)ठा-डी, तुराठी, तुऱ्हाटी** स्त्री. तुरीचे पीक काढून घेतल्यावर राहिलेली तुरीच्या झाडाची काडी.(राजा.)

**तुरकी, तुरकण चाल** घोड्याची एक प्रकारची चाल; चवडचाल; घाईने पण जवळजवळ पाय टाकत चालणे; धौरितक. [फा.; तुर्की]

**तु(तो)रकेज** न. (सुतारी) खिळे उपटण्याचे हत्यार; अंबूर; (सोनारी) बागीसारखे एक हत्यार.

**तुरगणे** सक्रि. वर चढणे : 'गजरथ तुरगौनु'– गरा १३९.

**तुरट** न. मायफळ. (कु.)

**तुरट** वि. तुरटीसारखी चव असणारा (पदार्थ). [सं. तुवर]

**तुरटसाखरू** पु. एक प्रकारचा औषधी डिंक.

**तुरटी** स्त्री. १. एक प्रकारचे क्षारद्रव्य; पोटॅशिअम व ॲल्युमिनिअमच्या सल्फेट क्षारांनी बनलेला पदार्थ; फटकडी. हिचा उपयोग रंग व औषधांमध्ये करतात. घाण पाण्यात तुरटी फिरवल्यास गाळ खाली बसतो. २. वाळलेल्या कोवळ्या आंब्याची करंबुटी.

**तुरडा** पु. हरळीसारखे गवत. – मसाप ३.३. (वाई)

**तुरण** पहा : **तुन्न–ना**

**तुर(रु)तुर–रु** क्रिवि. १. जवळजवळ पावले टाकत, लवकर लवकर (चालणे). २. वरवर; नाचत बागडत (चालणे, जाणे). ३. चुरुचुरु बोलणे. [ध्व.;सं.तुर]

**तुरतुर–री, तुरतुरंफुरफुरं** न. स्त्री. थोडा वेळ केलेला, दाखवलेला भपका; टुरटुर ; औटघटकेची चैन. (क्रि. करणे, लावणे, मांडणे).

**तुरप** स्त्री. बारीक शिवण. [हिं. तुरपना]

**तुरपणी** स्त्री. मुरड; दुमड; शिवण्याचा एक प्रकार.

**तुरपणे** सक्रि. वस्त्रांचा शेवट आत दुमडून शिवणे. [हिं. तुरपना]

**तुरप(ब,बू)त** स्त्री. थडगे व त्यावर बांधलेला चबुतरा, इमारत : 'गोपाळपुरावर साहेबांची तुरबूत चोरांनी खोदली होती.' – पेद ३९.२२९. [अर. तुर्बत]

**तुरबंबाळ** पु. अनेक वाद्यांचा एकत्र घोष किंवा ध्वनी : 'ऐसा अद्भुत तूरबंबाळु। ऐकोनि ब्रह्मा व्याकुळु।'– ज्ञा १.१३६.

**तुरबुरणे** अक्रि. कुरकुरणे; तक्रार करणे. [ध्व.]

**तुरबुरणे** अक्रि. टवटवीत दिसणे; नव्या, दाट पानांनी आच्छादित होणे; झाडांना नवी पालवी फुटू लागणे.

**तुरमण** न. कोवळा काजू. (गो.)

**तुरमणा** पु. पुष्कळच, भरपूर पाने असलेली डहाळी.

**तुरमणे** न. गोंड; कचोळे; गोंडळ (फूल, फळ इ.चे).

**तुरमी, तुरंबी** स्त्री. १. तुळस, आंबा इ.ची मंजरी. २. ओंबी; कणीस; लोंगर; वरचा भाग (राळा, वरी, सावा इ.चा). ३. कोमल अंकुर, शेंडा; डिकशी.

**तुरये–रे** पु. अव. वेलीचे ताणे, तंतू.

**तुररी** स्त्री. तुतारी : 'खिनखिनितीं तुररिआं खरसिंगेसी।'– शिव ५२४. [सं. तूर्य]

**तुरवठे** न. डोंगरावरील खडकाळ, पण उत्तम व्यवस्थेने लागवडीला आणलेली जमीन; डोंगरपठारावरील शेत.

**तुरवे, तुरिये** न. तांदळाची एक जात.

**तुरसंदाज** पु. बरकंदाज; बंदूकवाला शिपाई : 'बंदुकी तुरसंदाज, कानडे, तोरसाळी व जांगडे, बंदुकी व तिरंदाज याची संचणी करून हशम मेळविले.'– बावडा दप्तर १.९६.

**तुरळ, तुरळतुरळ, तुरळ(क)त** क्रिवि.१. अंतराअंतरावर; कोठेकोठे (उगवलेले रोप, पीक, पडणारा पाऊस, दिसणारी वस्तू इ.) २. विरळ, पातळ (विणणे, विणलेली वस्तू). ३. सलग नसणारी; खंडित; विच्छिन्न (झोप, अभ्यास). ४. दुर्मिळ; क्वचित आढळणारे. [सं. तरल]

**तुरळणे** सक्रि. १.विखुरणे; विरळ करणे (दाट उगवणारी रोपे, अतिशय दाटीने ठेवलेले पदार्थ). २. विरळ विणणे; लांबलांब धागे घालणे.

**तुरंज** पु. १. नारिंग. २. महाळुंग; चकोत्रा; तोरज; होरींग. ३. एक औषध; महाळुंगाची साल.

**तुरंजबीन** पु. हा एक प्रकारचा चीक असून तो तुरंजाच्या झाडाच्या बुंध्याला चोंचे मारल्याने निघतो. हा साधारण सारक आहे. याला शिरखैस्त असेंहि म्हणतात. – बालरोगचिकित्सा पृ. ३२. [फा.]

**तुरंबणी** स्त्री. वास; गंध : 'हे खपुष्पाची तुरंबणी।'– ज्ञा १६.३९.

**तुरंबणे** अक्रि.(गहू, ज्वारी वगैरेंना) कणसे येणे.

**तुरंबणे** अक्रि. १. एके ठिकाणी राहणे, साचणे; तुंबणे. २. तिष्ठणे; खोळंबणे; थांबणे. ३. दुःख करणे.

सक्रि. वाट पाहायला लावणे; खोळंबून धरणे; तिष्ठत बसवणे; थांबवणे.

**तुरंबणे** उक्रि. १. मस्तकावर ठेवणे; धारण करणे. २. घालणे; खोवणे; बांधणे; तुऱ्याप्रमाणे खोवणे : 'हीं अपकीर्तीची फुलें। कां मस्तकीं तुरंबिसी।'– मुसभा १३.६२. ३. हुंगणे; वास घेणे : 'सांगा परिमळें काय तुरंबावें।'– ज्ञा ९.११.

**तुरा** पु. १. पागोटे, टोपी वगैरेंना लावण्यासाठी मोती, फुले इ.चे केलेले भूषण, अलंकार; चूड. २. राजगिरा, मका, ऊस यांना येणारा गुच्छ; झुबका; गोंडा. ३. पक्ष्याच्या डोक्यावरील शेंडी. ४. एक प्रकारची लावणी. या प्रकारात प्रकृतीवर पुरुषाचे वर्चस्व वर्णिलेले असते व नायक नायिकेच्या आर्जवात असतो. या लावणीवाल्यांच्या डफावर तुरा लावलेला असतो. ५. नथीतील विशिष्ट ठिकाणचा मोत्यांचा समूह, गुच्छ. [अर. तुर्रा] (वा.) ० **लावणे** – मोठा पराक्रम करणे; कीर्ती, प्रतिष्ठा मिळविणे. ० **लावून फिरणे** – दोष अंगी लागला असता त्याचे निराकरण होवो अगर न होवो, प्रतिष्ठितपणे मिरवणे.

**तुराबलज्या** पु. एक अलंकार : 'दर जोतांत कंठी, सरपेंच, जिगा भुजबंद, दस्तबंद, तुराबलज्या याप्रमाणे हिऱ्याचा जोड एक.'– मइसा ७ खलप १.२१.

**तुरांबा, तुरा आंबा** पु. मोहोराच्या खाली धरलेला बारीक आंबा.

**तुरी–रु** १. पहा : **तुरई** २, २. धोटा. [सं.]

**तुरी** स्त्री. १. तगरीचे झुपक्याचे फूल. २. एक कडधान्य. [क. तोगरी]

**तुरीययंत्र** न. दिवस किती वर आला हे पाहण्यासाठी केलेले वर्तुळ–चतुर्थांशरूप एक लाकडी यंत्र.

**तुरीयावस्था** स्त्री. (जागृती, सुषुप्ती व स्वप्न यापलीकडची) समाधी ही

चौथी अवस्था. [सं.]

**तुरु(रू)कहोड, तुरूकहांडी** स्त्री. १. पैज.२. बखेडा; तंटा; इरा; वाद. ३. पणाचा ऐवज : 'तुम्ही आपले आयुष्यानें धुंद जाला परंतु आम्ही मुलेंबायकांनी तुरुकहोडीस पडावें इतकें मात्र उरलें.'– भाब ५१.

**तुरु(रू)त** क्रिवि. लवकर; झटकन; ताबडतोब : 'तुरुतदान महापुण्य म्हणावे कैसा दाता धर्म करी।'– सला ७५. [सं. त्वरित]

**तुरुप–क** पु. घोडेस्वार. [इं. ट्रुप]

**तुरुंग** पु. कारागृह; कैदखाना. [पो.; डच = त्रोंक; फा.]

**तुर्काण** वि. तुर्कांचा ताबा : 'रामाचें वतन जालें तुर्काण।'– भात्रै १०.३.११५.

**तुर्की लाखोरी** वि. घोड्याचा एक रंग. सर्व शरीर काळ्या व लाल रंगाचे असून चारी पाय पांढरे व कपाळावर पांढरा मुखपट्टा असलेला (घोडा).– अश्वप १.३०.

**तुर्तातुर्त–र्ती** क्रिवि. ताबडतोब; तडकाफडकी; एकदम.

**तुलई** स्त्री. गादी.

**तुलक** पु.न. कापूस. [सं. तूल]

**तुलकाठी** स्त्री. लांबी मोजण्याची काठी.

**तुलग–गा** पु. १. वाद्याचा ध्वनी. २. प्रतिध्वनी : 'तयाचि तुलगासवें। वीरवृत्तिचेनि थावें।'– ज्ञा १.१२७. [सं. तूर्य]

**तुलतुल** क्रिवि. लखलख : 'दोन्ही गाल मखमूल। करी नवती तुलतुल।'– पला ४.४२

**तुलना** स्त्री. १. बरोबरी; सारखेपणा; बरोबरीचा किंवा एकसारखा मनुष्य अथवा पदार्थ; तोड. २. साम्य ठरविण्यासाठी एके ठिकाणी तोलणे; एकमेकांशी बरोबर आहे की नाही हे ताडून पाहाणे; अजमास करणे. [सं.]

**तुलंग** पु. घोड्याची एक चाल.– अश्वप १.१९३.

**तुला** स्त्री. १. तराजू; तागडी. २. मेष वगैरे बारा राशींपैकी सातवी रास. ३. वजन करणे; वजन करून किती हे ठरवणे. ४. पहा : **तुलना**. ५. धार्मिक विधिपूर्वक आपल्या शरीराच्या भारंभार सोने, रुपे, साखर, धान्य इ.ब्राह्मणाला दान देण्याचे कार्य; अशा रीतीने ठरविलेले भारंभार सोने वगैरे. [सं.]

**तुला** स्त्री. लगामाचा एक प्रकार.– अश्वप १.१९५.

**तुलाकोश, तुलापरीक्षा** पु. स्त्री. तुला करण्याचे दिव्य.

**तुलाधार** पु. तराजूची दांडी.

क्रिवि. बरोबर; यथायोग्य; तंतोतत; जराही इकडेतिकडे होणार नाही अशा टापटिपीने. (क्रि. ठरवणे, बोलणे, वागणे). [सं.]

**तुलासंपात** पु. सूर्याचे तूळ राशीत जाणे. (दि. २२ सप्टेंबर या दिवशी सूर्य विषुववृत्तावर येऊन दिवस व रात्र यांचे मान सारखे होते तो काळ).

**तुलीप** पु. पलंग. [सं.]

**तुले** न. तुला; तागडी. (खा.)

**तुल्य** वि. सारखा; समान; बरोबर; बरहुकूम. [सं.]

**तुशा खडक** फुसफुशीत दगड असलेला खडक.

**तुशी** वि. पिवळसर तांबड्या रंगाचे (वस्त्र); तुसी.

**तुष, तुषात** पु. धान्याचा कोंडा : 'जैसें रंक कां आळुकैलें तुषांते सेवी।'– ज्ञा ५.११०. [सं.]

**तुषकंडणन्याय** पु. (कोंडा कांडणे निष्फळ असते त्यावरून) कोणत्याही गोष्टीचा काथ्याकूट करणे निष्फळ आहे हे दाखवायचे असले म्हणजे या न्यायाचा उपयोग करतात.

**तुषाग्नी, तुषानल** पु. अपराध्याला तुषाच्या राशीत बसवून त्या ढिगाला, राशीला आग लावून जाळण्याची शिक्षा.

**तुषार** पु. १. वाऱ्याने उडणारे पाण्याचे बारीक बारीक थेंब; बुरबुर; छिटा. २. दव; दहिवर; थंडीचा, हिवाचा कडाका. ३. (ल.) प्रेमबिंदू. कोणत्याही द्रवाचे थेंब उडवण्याची प्रक्रिया. त्या द्रवावर हवेचा दाब देऊन त्याचे लहान थेंबांमध्ये अवस्थांतर करून व अतिशय बारीक छिद्रांतून त्यांचा प्रवाह बाहेर सोडला जातो. [सं.]

**तुषारलेपन** न. फवाऱ्याचा उपयोग करून रंग देणे; फवारी रंग. [सं.]

**तुषारसिंचन** न. फवाऱ्याने फळझाडांना, भाजीपाल्याच्या पिकांना पाणी देण्याची पद्धत.

**तुष्ट** वि. तृप्त; इच्छापूर्ती झालेला; आनंदित. [सं.]

**तुष्टणे** अक्रि. तृप्त, आनंदित होणे : 'हा तुष्टल्या तत्क्षणीं। तक्षक पडे हुताशीं।'– मुआदि ११.११०. [सं.तुष्]

**तुष्यतुदुर्जनन्याय** पु. आपले मत योग्य असले तरी प्रसंगी दुष्ट लोकांशी वाद घालण्यापेक्षा त्यांच्या मताप्रमाणे होऊ द्यावे, उपेक्षा करावी अशा सभ्य लोकांच्या वर्तनावरून हा न्याय सांगितला जातो. [सं.]

**तुसड** न. तुच्छतेने बोलणे. (व.)

**तुसडा** वि. तिरसट; उद्धटपणाने वागणारा; माणसांचा तिटकारा करणारा.

**तुसडेपणा** पु. त्रासिकपणा.

**तुसळ** स्त्री. (तांदळाचा) कोंडा; भूस; तूस.

वि. कोंडा असलेले तांदूळ. [सं. तुष]

**तुसार, तुसारधान्य** न. रब्बीच्या पूर्वी होणारे खरीपाचे भात, वरी, बाजरी वगैरे धान्य; पीक. [सं. तुष]

**तुसारपट्टी** स्त्री. तुसाराच्या पिकावरील पट्टी; दसरा झाल्यावर कुळाकडून वसूल करतात ती पट्टी.

**तुसी** वि. एक तुसासारखा पिंगट, पिवळसर तांबडा रंग : 'शालेचा... रंग काळा अयर तुसी नसावा.'– पेद ३२.१२९. [सं.तुष]

**तुस्त** स्त्री. स्तुती. (गो.)

**तुळई** स्त्री. १. घरांचे वेगवेगळे खण करण्यासाठी दोन खांबांवर आडवे बसवलेले चौरस लाकूड; तुळवट. २. तूळ; एक प्रकारचा तराजू. ह्याला एकच पारडे असून लांब दांडी असते. तिच्यावर वजनाचे विभाग पाडलेले असतात. त्या दांडीवर वजने अडकवून वजन करतात. [क. तळि]

**तुळणे** उक्रि. १. वजन करणे; मोजणे; वजन बरोबर भरणे. २. बरोबर मानणे; उपमा देणे; बरोबरी होणे, करणे : 'त्यासीं तुळे हो संग्रामीं। ऐसा नाहीं ब्रह्मांडधामीं।'– मुआदि ६.४. ३. (शस्त्र) परजणे : 'खर्ग तुळी वेळोवेळां'– उह १४२. [सं. तुळ्]

**तुळतुळ** स्त्री. काळजी; चिंता. (व.)

**तुळतुळ, तुळतुळीत** क्रिवि. उत्सुकतेने; स्थिर चित्ताने; लक्ष लावून; डोळे लुकलुक करीत असताना.

**तुळतुळीत** वि. चकचकीत; तुकतुकीत; तजेलदार.

**तु(तो)ळबंदी** स्त्री. वाकी; वाळा. [फा.]

**तुळव** पु. बैलगाडीच्या कण्याच्या प्रत्येक बुट्ट्यावर असलेली तीन लाकडे.

**तुळवट** न.पु. १. पहा : **तुळई** १. २. (ल.) उंच व जाडजूड स्त्री, पुरुष. ३. (ल.) जिकिरीचे, त्रासाचे काम. [क. तळि]

**तुळस** स्त्री. हिंदू लोकांत पूज्य मानलेले एक झाड. याचे काळी व पांढरी असे भेद आहेत. हे फक्त भारतात आढळते. [सं. तुलसी] (वा.) ० **उचलणे** - शपथ घेणे. ० **उपटून भांग लावणे** – वाईट मनुष्य पदरी ठेवण्याकरिता चांगल्या माणसाला काढून टाकणे. **तुळशीच्या मुळात कांदा लावावा लागणे** – चांगला हेतू सिद्धीला नेण्यासाठी वाईट साधनांचा उपयोग करण्याविषयीची सबब सांगणे. **तुळशीत भांग उगवणे** – चांगल्यांच्या समुदायात चुकून एखादा वाईट माणूसही येणे. **तुळशीत भांग व भांगेत तुळस** – चांगल्या व वाईट गोष्टी एकाच ठिकाणी पिकतात. **तुळशीपत्र कानात घालून बसणे** – ऐकले न ऐकलेसे करून स्वस्थ बसणे. **तुळशीपत्र ठेवणे** – हक्क सोडणे. **(हलवायाच्या घरावर) तुळशीपत्र ठेवणे** – परभारे दुसऱ्याची वस्तू तिसऱ्याला देणे.

**तुळसधुळस** स्त्री. तिळगूळ; तिळसंक्रांत.(व.)

**तुळसवात** स्त्री. (बायकी) कापसाच्या सुताची चार बोटांच्या रुंदीवर सूत गुंडाळून केलेली बारा सुतांची एक वात. या वाती तुळशीच्या लग्नापासून दररोज दोन वाती याप्रमाणे वर्षभर लावतात.

**तुळं(ळां)बा** पहा : **तोळंबा**

**तुळापुरख** पु. पुरुषाच्या भारंभार केलेले सोन्यानाण्याचे दान : 'उदार्य तुळापुरखी बैसले.'- मूप्र ११३.

**तुळि(लि)का, तुळी** स्त्री. १. गादी : 'तेथ ध्येय ध्यान बहु सुख। तेचि शेषतुलिका निर्दोख।'- ज्ञा १३.३९२. २. पलंग; बिछाना.[सं.तूल]

**तुळिग** पु. गर्जना; प्रतिध्वनी.

**तुळी** स्त्री. (को.) पहा : **तुळई** [क. तोळि]

**तुंग** पु. १. जमाव; टोळी; समूह; समुदाय. २. (नदीचा) बांध; बंधारा. ३. ज्यातून नळ नेतात तो हौद; टाकी. ४. विशिष्ट प्रकारचे (काचेचे, मातीचे अथवा धातूचे) भांडे. यात तीर्थ, गुलाबपाणी इ. ठेवतात. ५. पखवाजाची गवसणी.

**तुंग** वि. १. उंच . २. श्रेष्ठ; मोठा : 'तुज न म्हणों लघु अथवा तुंगा।'- अमृत नवनीत ४०.

**तुंद** वि. १. दुलदुलीत; परिपूर्ण भरलेला; लठ्ठ; चांगला पोसलेला; गुबगुबीत. २. संतुष्ट, तृप्त झालेला. ३. (संपत्ती, शक्ती, अफू इ. नी) धुंद; मदोन्मत्त : 'हे आमचे यादव तुंद मोठे।'- सारुह ७.४८. क्रिवि. खच्चून; भरपूर. (क्रि. भरणे). [सं.; फा.]

**तुंदपणा** पु. शिरजोरपणा; हट्ट; दुराग्रह : 'हाहि एक प्रकार तुंदपणाचा आहे.'- पेद ६.१४७.

**तुंदिल** वि. ढेरपोट्या; पोट सुटलेला. [सं.]

**तुंब** न. १. बैलाने चालणाऱ्या रहाटगाडग्याला असलेले दात्याचे चाक. २. आरे ज्यात बसवतात तो चाकाचा तुंबा; मांदळा : 'ते रथूं साजिले। कनकतुंब।'- शिव ५०९. ३. पाण्यावर घातलेला बंधारा : 'कीं प्रलयसमुद्राचा तुंब फुटला।'- शिव १०१६. ४. तुंबारा. (राजा.) ५. रहाटगाडग्याच्या कनेकडावर रवे बसवण्याची वाटोळी लाती. पु. काठोकाठ भरलेले पाणी : 'तुंब वाहातां गादतें उदक'- रुस्व ८२७. [सं.]

**तुंबकता** पु. (संगीत) गाताना तुंब्यासारखे तोंड फुगवण्याची क्रिया.

**तुंबजोड-डी** पु. स्त्री. दोन तुंबे; रहाटगाडग्याची उभी-आडवी चाकांची जोडी.

**तुंबडी** स्त्री. १. शरीरातील दूषित रक्त किंवा वायू काढण्याचे नळीसारखे यंत्र; रक्तशोषक यंत्र. २. गोसावी, बैरागी इ.चे लाकडी किंवा भोपळ्याचे भिक्षापात्र. ३. भोपळा लावलेले तंतुवाद्य. (वा.) ० **भरणे** – १. पुष्कळ जेवणे; आपल्या पदरात पाहिजे तितके पाडून घेणे. २. अयोग्यप्रकारे पुष्कळ पैसा खाणे. ० **लावणे** – १. पिच्छा, पाठ पुरवणे. २. वित्त, शक्ती इ.चे शोषण करणे.

**तुंबडी** स्त्री. तंगी; टंचाई. - शर.

**तुंबड्या** पु. दुध्या भोपळा. [सं. तुंबी]

**तुंबणे** अक्रि. १. जमणे; एके ठिकाणी साचणे; गोळा होणे. २. (पुढे जाण्यास अडथळा झाल्यामुळे पाण्याचा प्रवाह, सैन्य, धंदा, विचार इ.) निरुद्ध होऊन जमून राहणे; अडकणे. [क. तुंबु]

**तुंबसर-ड-ळ** पु. गांधीलमाशीची मोठी व विषारी जात.(राजा.)

**तुंबळ** वि. पहा : **तुमुल** (वा.) ० **होणे** – भरून जाणे; डळमळणे; हालणे; कापणे.

**तुंबळणे** अक्रि. पहा : **तुंबणे** : 'आधीं कवीचा वाग्विलास। तरी मग श्रवणीं तुंबळे रस।'- दास १.८.१५.

**तुंबा** पु. १. लांबोडा पांढरा भोपळा; दुध्या, कुंड्या भोपळा. २. या भोपळ्याचे केलेले पात्र; पेला. ३. गलबताचा नांगर टाकला की खुणेकरिता बांधलेला भोपळा. - आंघइ ३७.९.

**तुंबा** पु. १. शस्त्राचा, हत्याराचा दांडा ज्यांत बसवतात ती जागा. २. कुदळ, खोरे, कुऱ्हाड इ.चा मागला भाग; माथा. ३. चाकाचा मध्य. यातून आसाची टोके बाहेर निघतात. [क. तुंबु]

**तुंबा** पु. एक लहान झाड. याची पाने औषधी असून फुले शंकराला वाहतात. [क. तुंबे]

**तुंबा** पु. तुमान; विजार; चोळणा. [फा. तुंबान]

**तुंबा, तुंबारा-डा** पु. १. पहा : **तुंब** ३. २. अडवल्यामुळे साचलेले पाणी. ३. (ल.) तुंबलेले, साचलेले काम. ४. तुंबून रहाण्याची अवस्था; एकत्र साठणे; पाणी तुंबणे. ५. पाणी तुंबावे म्हणून मोरीत, छिद्रात घालावयाचा बोळा. ६. अवष्टंभ; अवरोध; साकळ (रक्ताचे) : 'रक्ताचा भलत्याच ठिकाणी तुंबारा होऊन त्यामुळेंच ते मृत्यु पावतात.'- ब्रावि ६५. ७. प्रतिबंध नाहीसा झाल्यामुळे, तोंड

पडल्यामुळे रक्त, पाणी इ.चा वेगाने चालणारा मोठा प्रवाह (क्रि. लागणे, धरणे, फुटणे, सुटणे, सोडणे.)

**तुंबिका** स्त्री. भोपळा : 'पडे ज्यापरी अंबिका तातगेहीं। गमे तुंबिका मृत्यु-संसार-डोहीं।'- मुरायुद्ध २४३. [सं. तुंबी]

**तुंबिनी** स्त्री. कडू (पांढऱ्या) भोपळीचा वेल : 'जैसीं तुंबिनीचीं ओलीं फळे। भूमीस आपटितां होतीं शकलें।'- ह १९.१९४.

**तू** सना. द्वितीयपुरुषी सर्वनाम.[सं. त्वम्] (वा.) ) ० **मी करणे, तू मी वर येणे** - हमरातुमरीवर येणे.

**तूक** पु. बालक : 'दृष्टीस तूं दीससि तूकसेरे.'- अकक २ मंगीशकृत राधाविलास ४६. [सं. तोक]

**तूक, तुकल** स्त्री. एक प्रकारचा कागदी पतंग.

**तूक** न. १. तोलणे; वजन करणे. २. निष्काचा सोळावा हिस्सा किंवा दोन अपूर्णांक एकद्वितीयांश माप. ३. वजन; वजन करून ठरवलेले परिमाण. ४. महत्त्व; किंमत. ५. श्लोक इ.चा चौथा चरण; ध्रुपद अथवा पालुपद. ६. मुलाहिजा; भीड. ७. पहा : **अवयव** ५ [क.] (वा.) **तुकी तुकणे** – बरोबर तोलणे; तुलना करणे.

**तूट** स्त्री. १. तोटा; कमतरता; न्यूनता; तुटवडा. २. खंड; खळ; विराम; व्यवधान. ३. वियोग; विच्छेद; भेद. ४. फूट; भिन्नभाव; बिघाड; वैर. (क्रि.खाणे) [सं. त्रुट्]

**तूटओल** न. पावसाने ओढ दिल्याने जमिनीला राहिलेली थोडी ओल.

**तूटपाणी** पु. नुकत्याच उगवून वर आलेल्या लहान पिकाला जीव जगण्याइतकेच दिलेले पाणी.

**तूटमिती** न. मुदलातून वसूल झालेली रक्कम वजा करून बाकी राहिलेल्या रकमेवर आकारलेले व्याज; असे व्याज आकारण्याची पद्धत; कटमिती.

**तूटलेखा** पु. तुटीचे खाते.

**तूण, तूणीर** पु. बाण ठेवण्याचा भाता : 'खर्णी शस्त्र अस्त्रें धनुर्बाण तूणी।'- मुरामायुद्ध १००; 'आश्चर्या अति पावली बघुनियां तूणीर पाठीवरी।'- आनंदतनय, शबर्याख्यान ९. [सं. तूण्]

**तूदतोप** पु. जुगारातील एक पारिभाषिक शब्द; एकदम सर्व पैसे जुगारात लावणे. (क्रि. करणे).

**तून** स्त्री. स्त्रियांचे नेसण्याचे वस्त्र.

**तून लावणे** सक्रि. मिरचीची लागण झाल्यानंतर मधली-मधली काही रोपे मेल्यास त्या-त्या ठिकाणी नवीन रोप लावणे.

**तूप** न. १. लोणी कढवल्यावर त्याचा होणारा पदार्थ. २. (ल.) त्याच्या सारखा नारळाचा रस, मांस इ.पासून निघणारा स्निग्ध पदार्थ. [सं. तुप्]

**तूपकेळे** न. १. पेंढरे मावाचे फळ : 'सुरुचिर रचितैसी लागलीं तूपकेळें।' - र ५३. २. पेरू. ( तंजा.)

**तूपखिचडी** स्त्री. १. सोंगट्या, नाट इ. खेळामध्ये दुसऱ्याची सोंगटी वगैरे मारली असता एकदा खेळण्याची पाळी झाली असूनही आणखी एकदा खेळण्याची संधी. (क्रि. खाणे, खेळणे). २. (बायकी) मुली चकायला लागल्यावर जी मुलगी प्रथम उतरते तिला शेवटी राहिलेल्या दोन मुलींबरोबर पुन्हा चकायला जावे लागते, तो प्रकार.

**तूर** स्त्री. १. एक द्विदल धान्य. २. त्याचे काड.[सं. तुवर] (वा.) **हातावर तुरी देणे, देऊन पळणे** - दुसऱ्याला फसवून पळणे.

**तूर्ण** क्रिवि. ताबडतोब; शीघ्र : 'स्त्रीवध निंद्य परंतु ब्रह्मोक्तें तूर्ण ताटका मारी।'- मोपरंतुरामायण बाल ९. [सं.]

**तूर्त** क्रिवि. १. लवकर; सत्वर; ताबडतोब; तत्काळ : 'तूर्त तार्किक तनें मनें। तल्लीन होतीं।'- दास १४.४.१६. २. तात्पुरता; गरजेपुरता; कायमचा होईपर्यंत; काम भागवण्याइतपत. [सं.त्वरित]

**तूर्त किंमत** पुढे काही काळ गेल्यानंतर जी रक्कम द्यावी लागणार तिचे तितक्या काळाचे व्याज कापून उरणारी रक्कम.

**तूर्तातूर्त ताकीद** कोर्ट कायमचा निर्णय देईपर्यंत एखादी गोष्ट तात्पुरती करू नये असा मनाई हुकूम.

**तूल** स्त्री. लांबवणूक; उशीर : 'थोडकियांत बंदोबस्त असतां तूल करून सिसारा वाढवावा हें सलाह नाही.'- मइसा ५.१९८.

**तूषदान** न. काडतुसे ठेवण्याची पेटी किंवा पट्टा.

**तूस** न. पहा : **तुष**

**तूळ** स्त्री. १. पहा : **तुला** १.२. पहा : **तुळई** २. ३.रुपयाला दिलेली एक संज्ञा. [सं.तुला]

**तूळ** न. जमिनीची लांबी मोजण्याचे परिमाण. [सं.तुल]

**तूळ** पु. कापूस : 'जळो तूळ इच्छा अशी ज्यासि नाहीं।'-वामन, नामसुधा १.४२.

**तूळभंजन** न. सत्यानाश; कुलक्षय.(गो.)

**तृण** न. गवत किंवा कसलेही गवताच्या जातीचे तण. [सं.](वा.) ० **ओवाळणे** – तृणाने दृष्ट काढणे. **तृणाची गरज, तृणाइतकी चाड** – मुळीच इच्छा नसणे. **तृणाची शेज करणे** – मूल व्हावे म्हणून, बाईने मूल झाल्यावर नऊ दिवस गवतावर झोपण्याचा नवस करणे. **दाती तृण धरणे** – अभिमान सोडून शरण जाणे.

**तृणकुट-टा** पु. गवताचा पेंढा, चुरा : 'मग असत्य तृणकुटा भरिला।'- ज्ञा ३.२५०.

**तृणग्राही-मणी** पु. तैलस्फटिक; एक रत्न. राळ ज्यापासून निघते त्या वृक्षाचा अश्मीभूत पदार्थ. हा जाळल्यास, चोळल्यास सुगंध येतो.

**तृणचर-जीवी** वि. वनस्पतीवर, गवतावर उपजीविका करणारा.

**तृणजलूका** स्त्री. सुरवंटाच्या जातीचा एक प्राणी; उंट. चालताना हा आपले शरीर कमानदार करतो आणि मागची जागा सोडण्यापूर्वी पुढच्या भागाने नवीन जागेचे आक्रमण करतो.

**तृणतुल्य-प्राय-वत** वि. कवडीमोलाचा; कस्पटासमान.

**तृणधान्य** न. १. गवताप्रमाणे उगवणारे धान्य; नाचणी, वरी, राजगिरा यासारखे कोणतेही धान्य. २. कोणतेही बेसुमार वाढणारे धान्य.

**तृणविद्या** स्त्री. गवताची वाढ, त्याचे प्रकार, गुणधर्म, त्यावर पडणारे रोग इ. गोष्टींचा शास्त्रीय पद्धतीने अभ्यास करणारी ज्ञानशाखा.

**तृणवेटी** स्त्री. गवताची दोरी.

**तृणशत्रू** पु. अनाडी न्हावी; न्हावगंड.

**तृणाचा शेक** (गवताचा जाळ, ऊब गवत जळेपर्यंत असते यावरून ल.) क्षणिक टिकणारी गोष्ट.

**तृतीयक क्षेत्र** (अर्थ.) दळणवळण, व्यापार, वाहतूक आणि विविध

सेवा समाविष्ट असलेले राष्ट्रीय उत्पादनाचे क्षेत्र.

**तृतीयपंथ** पु. (ल.) तिसरा मार्ग, मत, कल्पना, समजूत, अनुमान इ.

**तृतीयपंथी** वि. दुसऱ्याचे विचार खरे न मानता आपले तेच खरे समजणारा.

**तृतीयप्रकृती, तृतीयलिंगी– पंथी** वि. हिजडा.

**तृतीयप्रकृती** वि. तटस्थ : 'जातीय निर्णय निषेधाच्या बाबतींत कॉंग्रेसला तृतीय प्रकृति करून ठेवावयाचें.'– के १८.७.१९४१. [सं.]

**तृतीयसवन** न. १. (सोमयागामध्ये) शेवटच्या दिवशी सोमवल्ली कुटून तीन वेळा (सकाळी, दुपारी व संध्याकाळी असा) रस काढतात. यातील तिसऱ्या वेळी मंत्र म्हणणाऱ्यांचा सूर चढा असतो, त्यावरून) अतिशय उच्च स्वर, आवाज. २. तिप्पट.

**तृतीया** स्त्री. १. शुक्ल व कृष्ण पक्षाची तिसरी तिथी. २. (व्या.) एक विभक्ती (तिसरी). [सं.]

**तृतीयातत्पुरुष** पु. (व्या.) एक समास. दोन शब्दांमधील तृतीयेचा लोप होतो, असा समास. उदा. कृपावलोकन.

**तृप्त** वि. संतुष्ट; समाधानी, आनंदित. [सं.]

**तृप्ती** स्त्री. समाधान; संतोष; प्रसन्नता. [सं.]

**तृषा–ष्णा** स्त्री. १. तहान. २. (ल.) महत्त्वाकांक्षा; लालसा. [सं.]

**तृषित** वि. तान्हेला; तहान लागलेला. [सं.]

**ते** सना. १. तृतीयपुरुषी नपुंसकलिंगी सर्वनामाचे एकवचन. २. तो चे अनेकवचन. ३.स्त्रीने बोलताना पतीच्या नावाऐवजी वापरण्याचे सर्वनाम.

**ते** स्त्री. सना. अव. त्या : 'गुणिये आधिष्टीले हृषीकेशें। ते वांचौनिया।– ऋ १९.

**तेउता** वि. तसा; तितका; तेवढा : 'श्रोतयाचें चित्त बावरे। तेउतेंचि तो व्यापारें।'– विपू ७.८६.

क्रिवि. तिकडे; तेथे : 'मग जेउती वास पाहिजे। तेउती शांतीचि देखिजे।'– ज्ञा ४.१९१.

**तेख** पु. त्वेष; रागाचा झटका; एकाएकी आलेला राग. [सं.तीक्ष्ण]

**तेखी** वि. रागीट; तापट; तामसी. [सं.तीक्ष्ण]

**तेगा–घा** पु. १. वाकडी व रुंद पात्याची तरवार : 'चाळीस हजार पठाण नित्य तेघे चमकती।'– ऐपो १०७. २. अभिमान.

वि. देशात प्रसिद्ध. [अर.तेग]

**तेगार** पु. १. शेत, घर, गुरे इ.जिंदगी; मालमत्ता. २. वेठण; सरंजाम; सामान (बैलांचे). ३. दिमाख; उद्दामपणा. ४. नखरा; थेर; चैन.

**तेगुरी** पु. एक प्रकारचा वेळू. (बे.)

**तेज** न. १. पंचमहाभूतांपैकी तिसरे भूत; सत् आणि ज्ञानाचे प्रतीक. २. प्रकाश; कांती; लकाकी; पाणी; झकझकी. ३. उष्णता; कडक सूर्यकिरण : 'तोय तेज धूमु। ययां वायूसीं संगमु।'– ज्ञा १८.३०८. ४. वैभव; शोभा; उत्कर्ष. ५. गुण; उपयुक्तता; सत्त्व; प्रताप; परिणाम (औषध इ.चा); जोम; उत्साह. ६. वीर्य; पराक्रम : 'तव तेजातें परा न सोसील।'– मोअश्व ३.१५. ७. तिखटपणा; तीक्ष्णता; झणझणीतपणा. ८. पराक्रम; सामर्थ्य. [सं. तेजस्] (वा.) ० **चढणे** – एखाद्याचा दरारा बसणे; वरचढपणा दिसणे. ० **होणे** – तयार, सिद्ध, सज्ज होणे.

वि. तीक्ष्ण; तिखट; चलाख.

**तेजगी** स्त्री. टंचाई; महागाई : 'प्रस्तुत तूपाची तेजगी आहे.'– ऐलेपाम्युप्र (पृ. २२१).

**तेजस, तेजस्कर** वि. तेजस्वी; चकचकीत; सतेज.

**तेज:पुंज** वि. तेजाचा गोलच जणू असा; सूर्य, रत्न, विद्वान, मानमान्यतेचा पुरुष यांना ही संज्ञा लावतात.

**तेजाब** पु. अम्ल; जस्ती पत्र्याला डाग द्यायला वापरण्यात येणारे द्रव्य. [फा. तेझाब्](वा.) ० **काढणे** – (सोनारी.) १. सोने गाळणे. २. हिणकस सोन्यात दुप्पट चांदी घालून ॲल्युमिनिअमच्या भांड्यात नायट्रिक ॲसिडच्या साहाय्याने आच देऊन शुद्ध सोने काढणे.

**तेजारो** न. अफूची कोवळी बोंडे चेचून पाण्यात भिजत घालून त्यांचा अर्क उतरविलेले पाणी. या पाण्याने कैफ येतो.–कृषि ५००. [सं.तेजस्]

**तेजावरण** न. सूर्याचा पृष्ठभाग.(तापमान सुमारे ६०००° सेल्सिअस).

**तेजाळ** वि. १. उज्ज्वल; सतेज; चकचकीत; तेजस्वी. २. उमदा; भव्य; छानदार; शोभिवंत.

**तेजिका** स्त्री. दालचिनी : 'कर्पूर कंकोळ येळा। लवंगा तेजिका रसाळा।'– गीता १२.३००. [सं.त्वक्]

**तेजिठ** वि.न. तेजसंपन्न : 'तेथ देश नगरे तेजिठें'– रुस्व २११.

**तेजी** स्त्री. भरभराट; चढ; उत्कर्षकाळ (व्यापार, किंमत इ.चा). [सं.तेज] (वा.) **तेजीमंदी खाणे,लावणे** – विमास्वरूपी खरेदी किंवा विक्री करून फायदा रोख घेणे.

**तेजी, तेजिका** पु. घोडा.

वि. अरबी (घोडा) : 'सुत तेजी तुरगीचे, नळसम सुंदर कदापि न म्हणावे ।'– र २. [फा. ताझी]

**तेजीवाला** पु. प्रथम वायदा विकत घेऊन किंमती वाढल्यानंतर विकून टाकून मधील फायदा खाणारा; यास बैल (इं. बुल) म्हणतात.– उद्यम सप्टें १९४१.

**तेजोभंग** पु. १. अपमान; अवमान; अपमानपूर्वक, तिरस्काराने वागवणे; होणारा अपमान अथवा फजिती. २. तेजाचा, पराक्रमाचा नाश : 'सरकारी शाळांतून मिळत असलेले शिक्षण भावी पिढीचा तेजोभंग व निरुत्साह करण्याकरितां मुद्दाम वेड्यावांकड्या रीतीने दिलें जात आहे.'– टि ३.१३३.

**तेजोमय, तेजस्वी** वि. १. शोभायमान; कांतिमान; उजळ; सतेज; उज्ज्वल. २. (ल.) प्रभावी; प्रतापी; प्रतिष्ठित; प्रसिद्ध; बाणेदार. [सं.]

**तेजोमेघ** पु. १. अगदी दूरची आकाशगंगा. २. अस्पष्ट असा धूर व वायू यांचा चमकणारा ढग. ३. अवकाशात दिसणारा प्रकाशित मेघ; अग्रिका;ज्योति:पुंज; नक्षत्रमेघ; नीहारिका; (इं.) नेब्यूल.

**तेजोवलय** न. वस्तूभोवती गोलाकार फाकणारे किरण.

**तेटर** वि. हेकेखोर. (व.,घाटी)

**तेड** पु. काठ : 'तो खाडी तेडी गियो.'– भिल्ली ११. (भि.)

**तेड** न. १. तडतडी; एक जातीचा वेळू. २. एक औषध; निशोत्तर; याच्या वेली असतात. पांढरे व काळें असे याचे दोन प्रकार फुलांवरून मानतात. ही वनस्पती रेचक असून काळी अधिक तीव्र असते.– वगु ४.१३.

**तेडतिपड** पु. तिरकेपणा : 'आणि कोपरे गुण्यांत असून बाजूंत तेडतिपड नसावा.'– मॅरट ३७.

**तेडते** वि. तसे; तेवढे; तितके.

**तेडामकोडा** वि. फंदी; चंगीभंगी : 'तेडेमकोडे समलेवाले भले लोक झाले गर्द चुरा।'– पला ४.१३.

**तेढ** स्त्री. वाकडेपणा : 'कवलें सारखीं व चांगलीं भाजलेलीं असावीं... त्यांत तेढ व तडे नसावेत.'– मॅरट १२.

**तेढवळ, तेढोळ** पु. तितका काळ, वेळ.
क्रिवि. तितका वेळ; तितक्या लांब वेळेपर्यंत.

**तेढा–ढी–डी–डो** वि. १. वाकडा; वक्र : 'आहे ऐकतों रांड कुणी मिळविली तेडी।'– राला ५२. २. वाकडा (स्वभाव) : 'परी तो खळ दुर्जन तेडा।' – दावि ३०८. ३. आडवा. ४. दशांशात केलेला (गुणाकार, भागाकार). ५. सरळ संबंध नसणारा. [हिं.टेढा]

**तेढा(डा)बाका** वि. १. वाकडातिकडा; पिरगळलेला. २. (ल.) तिरसट; तुसडा; चिरडखोर; हेकेखोर.

**तेढे** न. संशयास्पद; कूट : 'मोरेश्वर तरी मला ओळखील कीं नाहीं हें सुद्धां जरा तेढेंच आहे.'– भावबं.

**तेताल** पु. तरवारीच्या म्यानाच्या तोंडावरील धातूचे मढवण; कबजा. – प्रश ६८.

**तेती** स्त्री. तितक्या : 'माझिया विभूती सात येकी। तेती आइक कवतिकी।'– ज्ञा १०.२५४.

**तेतुला** वि. तितका; तेवढा : 'ऐसें चेष्टाजात तेतुलें। आपणची जो।' – ज्ञा ४.१११.

**तेधवा** क्रिवि. तेव्हा : 'परमानंदें राया दुर्योधन भूप तेधवां डोले।'– मोकर्ण ७.२७. [सं.तदा]

**तेनक** पु. (संगीत) प्रबंधाच्या सहा अंगांपैकी मंगलार्थदर्शक एक शब्द.

**तेनहार** पु. सण. [अर.त्यौहार]

**तेनीटोप** वि. पदरामध्ये दोन्ही बाजूंना कणसाकृती रेशमी पदर असलेले (लुगडे). (गो.) [क.तेने]

**तेपरू** वि. तेरा. (कर., नंदभाषा)

**तेफ** स्त्री. ढेप. (गो.)

**तेम** पु. १. हट्ट. २. मस्ती. (गो.) [पो.तीमा]

**तेमकुली** स्त्री. लहान टेकडी. (गो.)

**तेम(मे)ली** वि. वादात हटला, हरला तरी आपलेच खरे मानणारा.

**तेमर** पु. बाणाचा एक प्रकार.– प्रश २०. [सं.]

**तेमूक** न. १.शिखर. २.मस्तक. (गो.)

**तेर** स्त्री. शेताची तिसरी नांगरणी. [सं.त्रि]

**तेर** पु. मोठा रथ. (गो.) [क.]

**तेरका** स्त्री. अव. गुह्येंद्रियावरील केस; तारका.

**तेरडा** पु. एक फुलझाड. याच्या फुलाचे रंग बदलत असतात. [सं. तेरणा]

**तेरतेर** पु. बडेजाव; थाट. (गो.)

**तेरम** पु. अभिमान; ताठा. (कु.)

**तेरवा** क्रिवि. आजपासून मागच्या किंवा पुढच्या तिसऱ्या दिवशी. [सं. तृतीयवासरे]

**तेरवी** स्त्री. मृताचा तेरावा, शुद्ध श्राद्धाचा दिवस. (व.)

**तेरशी–स** स्त्री. त्रयोदशी. [सं. त्रयोदशी]

**तेरसा** वि. तिरवा (डोळा); तिरसा.

**तेरा** वि. १३ ही संख्या. [हिं. तेरह]

**तेराकी** स्त्री. पत्त्यांनी खेळण्याचा जुगाराचा एक प्रकार.

**तेराबारा** पु. अव. (ल.) वाद; भांडण; तंटा; उभयतांच्या व्यवहारात असलेली लडथड.

**तेरावा–वे** पु.न. मृताच्या तेराव्या दिवशी करावयाची क्रिया.

**तेरावे पान** हुकूम नसलेले, पण हमखास हात मिळवून देणारे पत्त्यांच्या डावातील पान.

**तेरी–रे** स्त्री. लागवड न करता आपोआप रुजणारे अळू. याला पिवळे फूल येते, याचे पान व कांदा लहान असतो; रानअळू.

**तेरीख** स्त्री. तारीख : 'तेरीख व पत्रें यांचे सांगण्याखेरीज लेंहू नये.' – मराचिसं १८.

**तेरीज** स्त्री. न. एकत्र बेरीज करण्यासाठी क्रमाने मांडलेल्या रकमा; अनेक रकमा जुळवून एका सदराखाली गोळाबेरीज करणे; अशा रकमा मांडलेला कागद, पत्रक, ताळेबंद; बोटखत. [हिं. तीरज]

**तेरीमेरी** स्त्री. हमरीतुमरी; अरेतुरेवर आलेले भांडण. [हिं.] (वा.)
**० वर, ० ला येणे** – एकेरीवर येणे.

**तेऱ्यामेऱ्याची कहाणी** इकडची-तिकडची गोष्ट.

**तेल** न. तीळ, खोबरे, भुईमूग, चंदन इ. पासून निघणारा एक स्निग्ध व द्रवरूप, पेटण्याजोगा पदार्थ; पदार्थातील स्निग्धांश. [सं. तैल] (वा.)
**० काढणे** – १. पिळून, शोषून घेऊन एखाद्या पदार्थाचा रस, सत्त्व काढणे. २. खरपूस चोप देणे; कुटणे. **० घालणे** – (एखाद्या कामात त्या) कामाची खराबी होईल अशी काहीतरी वस्तू अथवा भीड मध्ये घालणे. **० घेणे, जिरविणे** – (स्त्रीविषयी हा वाक्प्रचार योजतात.) स्वतःला देवाकडे लावणे; गरतपणा सोडून भावीण, कसबीण होणे. **० चढविणे, उतरविणे** – (बायकी) उष्ट्या हळदीच्या वेळी वधूपक्षाकडून वरपक्षाकडे आलेले तेल परटिणीकडून किंवा एखाद्या स्त्रीकडून वराच्या पावलाला, अंगाला, डोक्याला आंब्याच्या पानाने तीन वेळा लावणे. याच्या उलट क्रमाने हीच कृती करणे म्हणजे उतरवणे. **० लागणे**– (अंगाला तेल लागलेला कोणत्याही कामाला उपयोगी पडत नाही यावरून) महाग, दुर्मीळ, अप्राप्य होणे, असणे. **(पाठीला) ० लावून ठेवणे** – मार खाण्याची तयारी करून ठेवणे.

**तेल इंजिन** तेलापासून मिळणाऱ्या ऊर्जेवर चालणारे यंत्र.

**तेलकट–टी, तेलगट** वि. १. ओशट; स्निग्ध; तेलाने युक्त, लिप्त. २. ज्यात तेल आहे असा (तीळ, खोबरे इ. पदार्थ).

**तेलक(ग)टणे** अक्रि. तेलाने भरणे, माखणे, भिजणे.

**तेलकटाण, तेलष्टा(सा)ण** स्त्री. तेलकट घाण, वास.

**तेलकटी** स्त्री. १. तेलाचा चिकट मळ, वळकट्या. २. ओशटपणा.

**तेलकरीण** स्त्री. बाळंतिणीला तेल लावण्यासाठी ठेवलेली मोलकरीण.

**तेलकूप** पु. जिच्यात खनिज तेल असते अशी विहीर.

**तेलखाया** पु. झुरळ. (झाडी)

**तेलखिस्का** पु. खेड्यातील मानकऱ्याच्या सुवासिनीला लग्नाचे आमंत्रण देण्यासाठी देतात ते हळदकुंकू, तेल.

**तेलगंड** पु. तेल्याला तिरस्काराने संबोधण्याचा शब्द.

**तेलगिरणी** स्त्री. गळिताची धान्ये, नारळ इ. पासून यांत्रिक पद्धतीने तेल तयार करणारी गिरणी.

**तेलगोटी-रवा** स्त्री. पु. कढत तेलातून गोटी, रवा इ.काढण्याचा दिव्याचा एक प्रकार. तेलातून वस्तू काढताना जर हात भाजला नाही तर व्यक्ती निर्दोष आहे असे समजतात.

**तेलघाणा** पु. १. तेल काढण्याचे प्राणिशक्तीवर (रेडा,बैल इ.) चालणारे यंत्र. २. शूद्रादी जातीत गणेशपूजनापासून लग्न लागेपर्यंत ब्राह्मणाने करण्याचे धार्मिक कृत्य.

**तेलघोसाळे-दोडका** न. घोसाळीचे फळ.

**तेलची, तेलवरी, तेलीरी** स्त्री. १. तेलात, तुपात तळलेली गोड पुरी; तेलावर लाटलेली व भाजलेली पुरणाची पोळी. २. कणकेत तेलमिठाचे मोहन घालून त्याची तळलेली पुरी. - गृशि १.३९५.

**तेलचोपड्या-डी** वि. समोर स्तुती करणारा, गोड बोलणारा. (अहि.)

**तेलछाप** वि. (चर्म.) गाय, म्हैस यांची चरबी लावून कमावलेले (कातडे).

**तेलतई, तेलती** स्त्री. चुलीवर ठेवले जाणारे मातीचे भांडे. (अहि.)

**तेलतवा** पु. तळण्याचा तवा; हा पितळीप्रमाणे असतो.

**तेलतावन** स्त्री. कढई.(ना.)

**तेलतूप घालणे** (बायकी) लग्न झाल्यावर पहिली पाच वर्षे संक्रांतीच्या दिवशी तेल, तूप, तिळगूळ, हळदकुंकू, विडा इ. जिन्नस घेऊन पाच घरी नवऱ्यामुलीने नेऊन देण्याची रीत, पद्धत.

**तेलतूपनिरांजन** एकाहून अधिक गोष्टींकरता हाव धरल्याने अखेर काहीच न मिळणे.

**तेलदिवाळी, तेलधार** स्त्री. दिवाळीसाठी पाटलाने तेली लोकांवर बसवलेली तेलाची पट्टी, वर्गणी.

**तेलन** न. तेलनचिल्डी म्हणून ओळखला जाणारा विवाहविधी. (अहि.) (वा.) ० **पडणे** - पूजा होणे. ज्या वस्तूवर तेलन पाडतात त्यांची पूजा झाली असे समजतात.- संशोधन, ऐलेच २७८.

**तेलनिमज्जन वस्तुभिंग** जिवाणूंचा अभ्यास करताना ते हजार पट मोठे करून दाखवण्यासाठी 'सिडार' तेलाचा थेंब काचेवर टाकून वापरले जाणारे भिंग.

**तेलपक** वि.तेलात तळलेले, शिजवलेले. [सं. तैल+ पच्]

**तेलपारखी** पहा : **तेलाडे**

**तेलपाषाण** न. काळा, तुळतुळीत दगड.

**तेलफळ-साडी** न. स्त्री. (बायकी) लग्नापूर्वी वराकडून वधूला दिले जाणारे तेल, साडी, खोबऱ्याच्या वाट्या, नारळ, हळदकुंकू, फराळाचे, करंज्या-लाडू इ. सामान.

**तेलबाभुई** स्त्री. बाभळीची एक जात. (अहि.)

**तेलबोळ** पु. बाळंतिणीसाठी लागणाऱ्या आवश्यक वस्तू.

**तेलमीठ** न. किरकोळ वस्तू, पदार्थ.

**तेलमुंगी** स्त्री. वाळलेल्या अनघड लाकडाला लागणारी एका जातीची मुंगी. ही काळसर व लहान असून कडकडून चावते .

**तेलयाव** पु. मोठा नळा; ढापा; आढ्यावरचे कौल. [पोर्तु.]

**तेलयेवप** नवरानवरीकडील तेलहळद एकमेकांकडे येणे.

**तेलरतीब** पु. प्रत्येक चालू असलेल्या तेलघाण्याच्या मालकाने द्यावयाचा रोजच्या तेलाचा रतीब; कर.

**तेलरंग** पु. तेलात चोळून तयार केलेला रंग.

**तेलरांधा** पु. देवतेचा स्थापनाविधी व त्यानंतर देवतेला करायचा भात, पोळ्या, तेलच्या इ. पदार्थांचा नैवेद्य : 'गोट्यांना तेला शेंदूर लावून त्याच दिवशीं रात्रीं तेलरांधा करतात.- मसाप ४.४.२५८.

**तेलवण** न. १. पहा : **तेलफळ.** २. (आगरी) विवाहसमारंभात सुपात दिवे लावून नवरा-नवरीला ओवाळण्याचा विधी. ३. विवाहसमारंभात विड्याच्या पानाला भोक पाडून ते मुलीच्या डोक्यावर धरून त्यातून मुलीवर तेल पाडण्याचा विधी. (वा.) ० **काढणे, घालणे** - चांगला मार देणे; कुटणे.

**तेलवात** स्त्री. दिव्यात तेल घालणे, वाती करणे, दिवे पुसणे इ. दिवे लावण्यापूर्वीची तयारी. (वा.) ० **घालणे** - (बायकी) दर शनिवारी मारुतीला तेल व वात तेथे असलेल्या दिव्यात नेऊन घालणे व दिवा लावणे.

**तेलशिपा** पु. (नाविक) मोठमोठ्या माशांपासून काढलेले एक साधारण तेल. नावेच्या बाहेरच्या अंगाला लावायला याचा उपयोग करतात.

**तेलशुभ्रात** स्त्री. एखाद्या प्रसिद्ध देवळात नंदादीप लावण्यासाठी आसपासच्या खेड्यापाड्यांवर सरकारी पट्टी बसवून जमवलेले तेल. [म.तेल+सं.शुभ+रात्र]

**तेलंगभट** पु. १.तेलंगी ब्राह्मण. २. (तेलंगी भिक्षेकरी ब्राह्मण काही मिळाल्याशिवाय घरातून जात नाहीत. यावरून ल.) भोजनसमारंभात आगंतुकी करणारा, चिकट, लोचट माणूस.

**तेलंगी** स्त्री. कुत्र्याची टोपी. (बे.) [क. तेलगी]

**तेलाडा** वि. जमिनीत तेलाचे झरे पाहणारा मनुष्य; तेलपारखी : 'उत्तम वाकबगार पानाडे विहिरीस पाणी कोठें लागेल हे सांगण्यात पटाईत असतात तसेच इकडे तेलाडे हि असतात.'- सासं २.१३२.

**तेलिया** पु. एक काळा, तेलासारखा तुळतुळीत रंग. [हिं.]

**तेलिया कुमाईत** घोड्याचा एक रंग. यात केस लाल कमी व काळे जास्त असावे, पाय गुडघ्यापर्यंत काळे असावे व कपाळावर पांढरा ठिपका असावा.

**तेलिया पंचकल्याण** वि. चारी पाय पांढरे असणारा तेलिया कुमाईत (घोडा). - अश्वप १.२९.

**तेली** पु. तीळ इ.चे तेल काढून त्याच्यावर उपजीविका करणारी एक जात.

**तेलीखूट** पु. गावच्या तेल्यावर प्रत्येक घाण्याबाबत बसविलेला कर.

**तेलीचे झाड, लाकूड** पहा : **माकडीचे झाड**

**तेलीण बोदला** मुलांचा एक खेळ. - मखेपु १२३.

**तेली तांबोळी** तेली, तांबोळी ह्या व इतर जातीच्या लोकांसाठी व्यापक संज्ञा; अडाणी, बहुसंख्यांक लोक; अशिष्ट लोक.

**तेले** न. पु. बिब्याचे तेल लावून काळे केलेले सूप. (अहि.)
**तेलोता** पु. मातीची कढई. (झाडी)
**तेलोता फेर्नी** मृत्यूनंतर केला जाणारा विधी. (झाडी)
**तेल्या** पु. १. खरबुजावरील एक रोग; याने वेलावर बारीक कीड उत्पन्न होते व वेल वाळतो. २. जोंधळ्यावर पडणारा चिकोटा रोग.[हिं.]
**तेव** पु. गूळ, साखर, मेण वगैरेंना सुटणारा द्रव, पाझर; चिकी; घाम.(गो.) [सं. तेम]
**तेवट** वि. अंगी फार तेव असणारा; वितळणारा; पाझरणारा (साखर, गूळ वगैरे पदार्थ).
**तेवडी** स्त्री. एक प्रकारचे झाड. यातून दुधासारखा चीक निघतो; दुधाणी.
**तेवढा, तेवढाला** वि. तितका; तितका मोठा. [सं. तावत्]
**तेवणे** अक्रि. (दिवा) जळणे, लागणे, जळत राहणे, ठेवणे. [सं. तेजन]
**तेवणे** अक्रि. (गूळ, साखर इ.) पाझरणे; पाघळणे. (राजा.)[सं. तिम्]
**तेवती** स्त्री. एक झाड; याच्या पानाच्या विड्या करतात. [सं. त्रिपर्णी]
**तेवसू** वि. नऊ. (नंदभाषा)
**तेवी** क्रिवि. तसा; त्या जातीचा, प्रकारचा : 'तेविं मी म्हणौनि प्रपंचीं।'– ज्ञा ९.१५०. [सं.तथा]
**तेवीस** वि. २३ ही संख्या. [सं. त्रयोविंशति]
**तेव्हन** न. (चर्म.) चामडे मुरवण्यासाठी जमिनीत पुरलेला पाण्याचा रांजण.
**तेव्हा** क्रिवि. १. त्या वेळी. २. त्या अर्थी. [सं.तदा]
**तेषा** एक प्रकारचे शस्त्र.
**तेसणा–ना** वि. तेवढा; तितका; तसा : 'अवधारा आवडे तेसणा धुंधुरु।'– ज्ञा ९.९.
**तेह(हे)तीस** वि. ३३ ही संख्या. [सं. त्रयस्त्रिंशत]
**तेहेवार** पु. सण; सुटीचा दिवस : 'तेहेवार उत्सव व वार्षिक सनाबद्दल...'– कारकुनांच्या कर्तव्यासंबंधी नियम (बडोदे) ५. [हिं. त्यौहार]
**तैगा** न. सूचिपर्णी वृक्षांचे वन.
**तैजस** वि. (वेदान्त.) स्वप्नावस्थाभिमानी आत्मा. [सं.]
**तैतिल** न. ज्योतिषशास्त्रातील बवादी करणांपैकी चौथे करण. [सं.]
**तैनात** स्त्री. १. लष्करी अधिकार; लष्करावरील हुकमत. २. पगार; रोजमुरा; नेमणूक. ३. ताबा; हवाला; दिम्मत; काळजी; बडदास्त; व्यवस्था. ४. (व्यवहार, वस्तू, माणसे यांवर) हुकमत; दाब; अधिकार. ५. सेवा; चाकरी; नोकरी. ६. नेमणूक; सरंजाम.
वि. स्वाधीन. [अर. तइनात]
**तैनातजाबता** पु. अनेक तैनाती लोकांच्या तैनातीच्या ठरावाची अनेक कलमे ज्यात लिहिली आहेत असा कागद; तैनातीच्या नेमणुका ज्यांत नमूद आहेत ती वही, कीर्द.
**तैनाती** वि. १. वेतनी; पगारी; तैनात असलेला. २. (एखाद्याच्या) अधिकारात, हुकमात ठेवलेला; स्वाधीन केलेला; दुसऱ्याच्या ताब्यात दिलेली (सैन्याची तुकडी); सोपवलेला; हवाली केलेला; (एखाद्याच्या निर्वाहासाठी) ताब्यात दिलेला (प्रदेश). ३. दुय्यम मदतनीस (वसुलीसाठी नेमलेला).
**तैनाती फौज** भारतीय संस्थानिकांना संरक्षणासाठी बाळगावी लागणारी इंग्रजी फौज. या फौजेचा पगार संस्थानिकांना द्यावा लागे, पण ताबा इंग्रजांकडे असे.
**तैनाल** न. म्यानाचे शेवटचे टोक. पहा : **तहनाल**
**तैलचित्र** न. तेलाच्या रंगांनी काढलेले चित्र. [सं.]
**तैलबुद्धी** स्त्री. कुशाग्र, तरतरीत बुद्धी. काही एक विषयाचा थोडासा अंशही कळला की त्या संपूर्ण विषयाला व्यापणारी बुद्धी. (तेलाचा बिंदू पाण्यावर पडल्यास तो पसरतो यावरून).
वि. अशा प्रकारची बुद्धी असलेला. [सं.]
**तैलयंत्र** न. तेल वापरून त्यापासून शक्ती उत्पन्न करणारे यंत्र. [सं.]
**तैलवायु** पु. कर्ब आणि प्राण यांच्या मिश्रणाने उत्पन्न होणारा वायू.[सं.]
**तैवज** स्त्री. १.पानसुपारी. २.आदरातिथ्य; सत्कार. [अर. तवाझु]
**तो** पु. सना. तृतीयपुरुषी पुल्लिंगी सर्वनामांचे एकवचन.
**तोक–ख–ग** स्त्री. पु. गळ्यात बांधायची दोरी, साखळी, बेडी.
**तोक** स्त्री. सूचना; इशारा.
**तोक** न. बालक; अपत्य : 'स्वतोक पितरा रुचे।'– केका ८५. [सं.]
**तोकटे जाणे** क्रि. नुकसान होणे. (कु.)
**तोकडा, तोटका** वि. १. आखूड; कमी; कमी लांबीचा; अपुरा. २. थोडा; अल्प. [सं. स्तोक]
**तोज** न. चोज; आश्चर्य; नवल.
**तोट** न. तगादा : 'त्याजवरी बाकी आहे. त्याचे वसुलाचे तोट आम्ही लाविले आहे.'– पेद ४०, पृ. ३.
**तोटक** न. एक वृत्त. याच्या चरणात बारा अक्षरे व स स स स असे चार गण असतात. [सं.त्रोटक;हिं.]
**तोटका–गा** पहा : **तोडगा**
**तोटका** पु. (अंगावर उठणाऱ्या) देवी.(को.,कु.)
**तोटके(गे)करी** पु. देवी काढणारा; देवी याव्या म्हणून शरीरावर तोडगा करणारा.
वि. १. देवी टोचलेला (मनुष्य). २. पैशाचिक बाधा होऊ नये म्हणून मंत्रतंत्र, जपजाप्य इ. करणारा.
**तोट(ठा)रा** पु. १. (बकुळीची फळे, डाळे इ. रुक्ष पदार्थ खाल्ल्याने) घशाला कोरड पडून गिळायला होणारा प्रतिबंध. (क्रि. बसणे, लागणे). २. (भात इ.ची) लोंबी अगदी पूर्ण दशेला येणे, कणसाची पक्व दशा. (क्रि. येणे)
**तोटा** पु. पहा : **तूट** १. (क्रि. बसणे, लागणे, होणे). [सं. त्रुट्]
**तोटा** पु. १. ज्वारीचे ताट. (खा.) २. काडतूस. ३. (शोभेच्या दारूचा) बाण; मोठा फटाका.
**तोटा** पु. जमाव : 'दुसरे या छावणीचे पलटणात तोटा एका कंपनीत... चवऱ्याहत्तर जवानांचा '– ऐको.
**तोटी** स्त्री. १. कारंजे, मोरी, झारी इ.ना पाण्याची धार बारीक पडावी म्हणून लावलेली बारीक छिद्राची नळी, नळ; धार पडावी व ती पाहिजे तेव्हा सुरू व बंद करता यावी म्हणून टाकीला किंवा भांड्याला लावलेली चावी असलेली नळी. २. चिळकांडी; धार. ३. झारी. (गो.) ४. (मुद्रण.) रूळ ओतण्याचा साचा, मूस. [क.तोट्टु]
**तोटी** स्त्री. मारवाडी, बोहरी स्त्रियांच्या कानांतील एक दागिना.

**तोट्टी** स्त्री. १. टाकी; कुंडी. २. पोहरा; बादली. [क.,त.]

**तोड** स्त्री. १. काम इच्छेप्रमाणे होण्यासाठी काढलेली युक्ती; तडजोड; समेट. (क्रि. पाडणे, तोडीवर येणे.). २. उपाय; क्लृप्ती; कल्पना; तजवीज; युक्ती; शक्कल; गूढ सोडवण्यासाठी काढलेला मार्ग; उलगडा. (क्रि. पाडणे). ३. सर्वोत्कृष्ट, सरस कल्पना, शोध; अपूर्व कृत्य. ४.वरचढपणा; मात; नियंत्रण. ५. अभावणीच्या अर्धेलीचा खोताच्या वहीमध्ये मांडलेला हिशेब. प्रथम पिकाची अर्धेल अंदाजाने धरून वहीत मांडण्यात येई. त्यानंतर खोत व कूळ यांच्या परस्परसंमतीने प्रत्यक्ष वसूल किती घ्यावा हे ठरवण्यात येई, याप्रमाणे ठरलेला करार व ठरवलेला वसूल. ६. एका बाजूने घडवलेला, साफ केलेला दगड; एकांगी चौरस दगड; इमारतीला लागणाऱ्या दगडाचा एक प्रकार : 'चबुतरे अगर ओटे तोडीच्या दगडाचे बांधतात.'– भू १. ७. (मल्लविद्या) आपल्यावर केलेल्या डावाचा प्रतिकार, त्याविरुद्ध करावयाची क्रिया, युक्ती. ८. लाकूड इ. तोडण्याकरता त्यात कुऱ्हाड वगैरेंनी केला जाणारा छेद, घाव. ९. लाकडाचा, दोरीचा वगैरे तोडलेला तुकडा; तोडणी. १०. बांबूचे नळकांडे. – बदलापूर १३३. ११. एक बदललेली चाल (लावणीच्या कडव्यांतून रूढ); पद म्हणण्याची वेगळी धाटणी. [सं. तुड्] (वा.) **तोडीस तोड देणे** – डावावर डाव करणे. **तोडून घेणे** – खंडाने, मक्त्याने, इजारा करून (शेत इ.) स्वतंत्रपणे वहिवाटीला घेणे.

**तोड** स्त्री. १. (व्यापक) (समान) डौल; आकार; प्रकार; मान; माप. २. साचा; मूस. ३. जोड, बरोबरी करणारी व्यक्ती, वस्तू इ. [क.तोडु]

**तोड** स्त्री. कोंदण केलेली हिऱ्याची कुडी. (तंजा.) [क.,त.]

**तोड** स्त्री. (सोंगट्यांचा खेळ) पहिल्यांदा शत्रूची सोंगटी विशिष्ट प्रकारे मारून आपल्या सोंगट्या घरात जावयास मार्ग करतात ती कृती.(ना.) तोडी. (कर.)

**तोड** पु. १. अनावर इच्छा. २. लगट. (ना.)

**तोडक** न. तोडण्याची क्रिया; तटका तोडणे; एकदम संबंध तोडून टाकणे; तंटा : 'पहिलेंचि तोडक कां गा नाहीं केले।'– तुगा ४४४२.
वि. भांडखोर; तुटसाळ; ज्याचे कोणाशी पटत नाही असा.

**तोडगरसुळी** स्त्री. विवाहसमयी नवऱ्या मुलीने घालण्याची एक माळ.

**तोडगा** पु. १. भूतबाधा, पिशाच्च, रोग इ.नाहीसे करण्यासाठी करतात तो जादूटोणा; मंत्रतंत्र; छाछू; कुवेडे इ. (क्रि. करणे, बांधणे). २. बागुलबोवा; बुजगावणे. ३. कृत्रिम देवी आणण्यासाठी टोचणे; देवी काढणे. ४. ज्योतिषांनी सांगितलेले भविष्य घडून येणे, त्याचा पडताळा येणे; औषधाचा अनुभव, प्रत्यय येणे. [हिं.]

**तोडजोड** स्त्री. १. यंत्राचे भाग सुटे करून पुन्हा जोडण्याची क्रिया. २. तडजोड; समेट; न्याय, निवाडा तोडणे; सलोखा घडवणे; घटवटना. (क्रि. पाडणे). ३. (एखादा व्यवहार सुरळीत चालवण्यासाठी योजलेला) उपाय; शक्कल; हिकमत; युक्तीप्रयुक्ती. ४. सावकाराचा तगादा; वादीची मागणी, हक्क इ.चा दोघांच्या संमतीने देवाणघेवाण करून निकाल लावणे. ५. (सामा.) (कामे इ. करण्याचा) उरक; झपाटा; शिताफी; आवरशक्ती; आवर; आटोप आणि हातोटी.

**तोडणावळ** स्त्री. (लाकडे इ.) तोडण्याची, फोडण्याची मजुरी, खर्च.

**तोडणी** स्त्री. १. तोडण्याची, छाटण्याची, कापण्याची, तुकडे करण्याची क्रिया. २. तगादा; आग्रह; लकडा; खनपटीस बसणे.

**तोडणे** उक्रि. १. शस्त्राने, कापण्याच्या साधनाने, अंगबलाने (एखाद्या वस्तूवर) घाव घातल्यासारखे करून, ओढल्यासारखे करून, धसकावून, खांडून, खापलून, चिरून, तासून तुकडे करणे; छाटणे; जोराने विभक्त, वेगळा करणे; कापणे. २. मुलाला अंगावर पाजण्याचे बंद करणे. ३. (एखादी वस्तू देण्याचे) बंद करणे. ४. (फौज, खर्च, कारखाना, पगार इ.) कापणे; छाटणे; कमी करणे. ५. मोडणे; बरखास्त करणे; बंद करणे (भागीदारीचा धंदा, व्यवहार, मैत्री अथवा इतर संबंध, एके ठिकाणी जमलेली मंडळी, समिती). ६. (कलह, भेद, दंगा, गडबड इ.) मिटवणे; शांत करणे; संपवणे. ७. लचका तोडणे; कुरतडणे व फाडणे; दातांनी व नखांनी धरून ओढणे. ८. (ढेकूण, माशा, डास वगैरेंनी) चावणे व सतावून, पिसाळून सोडणे; (तगादेदार, भिकारी, काम करून घेणारे इ.नी) सतावणे. [सं.तुड्]

**तोडभोकर** स्त्री. घटस्फोट. (झाडी)

**तोडमोड** स्त्री. लिहिणे, बोलणे इ.ची रीत. [मोड द्वि.]

**तोडमोड** स्त्री. १. पहा : **ताडामोडा.** २. पहा : **तोडजोड.** ३. धान्याच्या रूपाने शेतसारा ठरवण्याची क्रिया. ४. (सामा.) (एखाद्या कामातील) खुब्या, मखव्या, मर्मस्थाने; (एखाद्या धंद्यातील) आडमार्ग, मुरड, आडाखे; (यंत्रातील) गुंतागुंत; हातोटी; गुरुकिल्ली. ५. मोडकीतोडकी भांडीकुंडी, दागदागिने, हत्यारे, किडुकमिडुक इ.

**तोडर, तोरड** पु. १. पायातील एक दागिना; तोरडी; तोडा : 'अंदु तोडराचा झणत्कार।'– वेसीस्व ३.७२. २. हातातील एक अलंकार : 'तोडर करीं सदा गर्जत।'– देवीदास, भामावर्णन.[क.] (वा.) **तोडरी घालणे** – जिंकणे; वठणीवर आणणे; पाडाव करणे : 'जिणोनि घालितां तोडरीं। मग संसारी अरि नाही।'– एभा ९.१०५. **तोडरी बांधणे**– एखाद्यावर हुकूम, अधिकार, सत्ता गाजवणे; गुलाम करणे; स्वाधीन करून घेणे; कबजात ठेवणे. [क.]

**तोडरमल्ल** वि. पु. शत्रूंना जिंकणारा वीरपुरुष : 'तू तळपतीयां देवां तोडरमल्लु'– मूप्र २६०३.

**तोडशी** स्त्री. कासाराचे एक हत्यार.– बदलापूर ९६.

**तोडस** पु. लाकडी खिळा; खुंटी. (गो.)

**तोडा** पु. १. (लाकूड इ.) तोडण्याची क्रिया; (फळे, फुले इ.) खुडण्याची, तोडण्याची, गोळा करण्याची क्रिया. (क्रि. करणे, काढणे, घेणे, उतरणे.) २. (लाकूड वगैरेचा) तोडलेला भाग, तुकडा; ठोकळा; ओंडका. ३. मिरच्या, कापूस इ. काढण्याचा, तोडण्याचा हंगाम. (वा.) ० **काढणे** – आवणाच्या मुरगळलेल्या काड्या बेणणीबरोबर उपटणे. – बदलापूर २९४. ० **टाकणे** – (गवंडीकाम) विहिरीच्या बांधकामात, घराच्या भिंतीत ती बांधत असताना कोनाडा इ.साठी रिकामी जागा सोडणे.

**तोडा** पु. १. सोन्याची, चांदीची हजार नाणी भरलेली पिशवी : 'श्रावणमासि खर्चतो कोट्यावधि तोडा।'- राला २.१०१.२. बंदुकीतील दारू पेटवण्याचा काकडा; जामगी : 'पहाऱ्यास शिपाई उभे पेटवूनी तोडा।'- राला १०१. ३. दोराचा, सुतळीचा हात-दोन होत लांब तुकडा. ४. कठीण व जाड जरतार. ५. (दारूकाम) फुलबाजा, बाण इ. बांधण्याच्या उपयोगाचा चिखलात भिजवलेला सुताचा दोरा, वाख.

**तोडा** पु. १. पहा : **तोडर.** २. शिंदेशाही घडणीचा पण क्वचित पोकळ बनावटीचा स्त्रियांच्या हातातील दागिना. ३. दरवाज्याच्या मुख्य चौकटीच्या वरच्या चौकटीची तोड्यासारखी नक्षी. ४. (पगडबंद) साखळीच्या कड्यांच्याप्रमाणे केलेले पागोट्यातील बांधणीचे काम. ५. लुगड्याच्या काठातील कड्यांच्या, साखळीच्या आकाराची रचना. (वा.) ० **उठवणे**- (चांदीच्या हत्यारांचा धंदा) नग तयार झाल्यावर त्यावर झिलई करणे; तकाकी देणे.

**तोडा** पु. (वाद्य) सतार वगैरे वाद्यांच्या गतीला शोभणारा स्वरसमूह; तबल्याचा एक विशिष्ट बोल.

**तोडातोड-डी** स्त्री. २. सरसकट, जोराने खापलण्याची, तोडण्याची, छाटण्याची, कापण्याची क्रिया; छाटाछाट; कापाकाप. २. (ल.) (एकमेकांतील व जोराची) सतावून सोडण्याची, छळण्याची, त्रास देण्याची क्रिया. ३. पहा : **ताडातोड.** ४. वियोगाची स्थिती.

**तोडामोडा** पु. १. पहा : **ताडामोडा.** २. (एखादी इमारत, जिन्नस, धंदा इ.) मोडकळीला येणे, आणणे; मोडतोड, नाश करणे; मोडकळीला येऊ देणे; विस्कळीत होऊ देणे. ३. विस्कळीत, पांगापांग झालेली, उध्वस्त, नासधूस झालेली अवस्था. (क्रि. करणे, होणे.) ४. पहा : **तोडणे** ४,५

**तोडिजणे** अक्रि. तोडता येणे; तोडणे : 'मग मनोरथुवेलीचीं फळें। हातें तोडिजेंती।'- शिव ७२.

**तोडी** स्त्री. (संगीत) एक राग. गानसमय दिवसाचा दुसरा प्रहर. [सं.त्रोटकी]

**तोडी** स्त्री. १. तोड्गा : 'डागदार बघती नाडी दवा देत तोडी चालवी जरी बाधा नाहीं जडली।'- ऐपो ४३७. २. पानाचा, फळाचा देठ. (गो.)

**तोडी** स्त्री. हरणवेल; जीवंती; जीवनी; जीवा; मधुश्रवा; एक वनस्पती.- मसाप ४५.४.

**तोडी** स्त्री. १. ढलपा; लाकडाचा मोठा तुकडा. २. मोठ्या पोटाची व लहान तोंडाची बांबूची करंडी. - बदलापूर १३३.

**तोडी** स्त्री. वि. तोटकी : 'हे तोडी आंगी वानरेसांसी देईजे'- लीचपू ४००.

**तोडीची पाटली** पाटलीचा एक प्रकार. हिला फासा नसून केवळ तोंडे मिळवलेली असतात.

**तोडीव** वि. तोडलेले, छाटलेले (लाकूड इ.).

**तोड्याची साखळी** (बैलगाडीचा धंदा) बैलाच्या गळ्यात घालण्याची पितळेची साखळी.

**तोणकावचे** सक्रि. दांड्याने मारणे. (गो.)

**तोणकॉ, तोंडकॉ** पु. दांडा. (गो.) [क. टोळो]

**तोणी** स्त्री. आखूड काठी.

**तोणी-णो** स्त्री. मोठी व बारीक ऊ. (गो.)

**तोतया** पु. फसवणूक; लबाडी; सोदेगिरी; बनावट लेख, हकिगत; विशेषत: गादीवर हक्क मिळावा म्हणून केलेली बतावणी.
वि. केवळ काहीशा सादृश्यावरून दुसऱ्याचे नाव सांगून, बतावणी करून हक्क सांगणारा; ठक; भोंदू; लबाड; खोटा वारस. [क.तोताय]

**तोतयेगिरी** स्त्री. (कायदा) आपण दुसरेच कोणी इसम आहोत असे भासवून केलेली फसवेगिरी. - घका १८३.

**तो(तों)तरा-ळा** वि. अडखळत, एक एक अक्षर दोन तीन वेळा उच्चारत बोलणारा; चोचरा. [हिं.तोतला]

**तोता** पु. पोपट; राघू. [हिं.]

**तोतो** स्त्री. (बालभाषा) अभ्यंगस्नान; तेल लावून मग न्हाणे. [ध्व.]

**तोदा** न. (तिरंदाजाचे) नेम मारण्याचे स्थान; लक्ष्य; संधानबिंदू; निशाण.

**तोदा** पु. १. तगादा : 'देण्याचे तोदे भारी जाहाले'- पेद ५.६४. २. तंटा; भांडण; गोंधळ; गडबड : 'नाहक तोदा करून घर घेतले चौघे लाऊन फिसादी करून गेला.'- पेद २०.

**तोदा** पु. १. तडजोड. २. खंडणीचा, दंडाचा ढीग.

**तोपची** पु. तोफखान्यावरील अधिकारी; गोलंदाज. [तु.]

**तोपण** अक्रि. आत रिघण्याची, घुसळण्याची क्रिया. (गो.)

**तोपर्यंत-पावेतो** क्रिवि. त्या वेळेपर्यंत.

**तोपियॉं** पु. सरडा. (गो.)

**तोपुलो** पु. लहान पातेली. (कु.)

**तोपूल** न. लहान टोप. (गो.)

**तोफ** स्त्री. १. आत दारू भरून बार काढण्याचे, गोळे फेकण्याचे यंत्र. (क्रि. मारणे, उजळणे, उडवणे). [तु.तोप] (वा.) ० **लटकी करणे** - तोफ बंद पाडणे : 'दर्याबुरूज खाडी किनाऱ्याच्या त्याच्या तोफा लटक्या केल्या.'- पेद ३५, पृ. ४१. **तोफा होणे** - सुरू, चालू होणे : 'मुख्य गोष्ट मोहिबाची स्वारी रेडीवर तोफ जाहाली...' - इसाभा ८, पृ. १०२. **तोफेच्या तोंडी देणे** - एखाद्याला संकटकाळी दुष्कृत्याचे परिणाम भोगायला पुढे करणे; तोंडी देणे.

**तोफखाना** पु. १. तोफांचा समुदाय. २. तोफा, दारूगोळा इ.युद्धसामग्री ठेवण्याचे ठिकाण.

**तोफजी** स्त्री. गोलंदाजी : 'बर्कंदाजी व तोफजी फिरंगी याची निस्सीम म्हणावी तैसी'- ब्रप ७७.

**तोफा** पु. संकट : 'त्याचे लष्करात वैरणीचा व पाण्याचा तोफा बहुत.' - ऐलेसं ४७४१.

**तोफा, तोहफा** वि. १. नामी; उत्कृष्ट; तलम; दुर्मीळ; मूल्यवान; चांगले. २. तऱ्हेवाईक. [अर. तुह्फ़ा]

**तोफा, तोफेजात** नजराणा : 'याचप्रमाणे तोफेजात बराय नजर नबाब वजीरखान मौसूफने स्वाधीन केले.' - पेदमव ११८.

**तोफांड, तोफान** न. पु. उलटी बोंबाबोंब; अन्याय न होता ही मांडलेले अकांड तांडव. (अहि.)

**तोबण-त** पहा: **तोहमत** :'अशा निंद्य रीतीने शरण जाऊन राजा

आपल्यावर तोबत आली होती तीपासून सुटला.'- इंग्लंडची बखर १२६.

**तोबरा** पु. १. हरभरे, चंदी इ. आत भरून घोड्याच्या तोंडाला लावायची कातड्याची, पडमाची पिशवी. २. टपालवाल्याची पत्रे वाहून नेण्याची पिशवी. ३. आत अतिरिक्त पदार्थ भरल्यामुळे किंवा रागामुळे फुगलेले तोंड. ४. (बैलगाडी) चाबूक, कुण्या, जुपण्या इ. ठेवण्यासाठी गाडीला बांधलेली एक पडमाची पिशवी. [फा. तोब्रा] (वा.) ० **बसनं** - घशात खूप अन्न झाल्याने बोलता, खाता न येणे. (अहि.)

**तोबरा** पु. गंधाचा कपाळी लावलेला उभा पट्टा.

**तोबा** पु. वस्त्राला पीळ घालून मारण्यासाठी केलेला जाड कोरडा. (गर्दी पांगवण्यासाठी हा लोकांना मारतात.)

वि. अतिशय (गर्दी.)

**तोबा** पु. एक मुलांचा खेळ. - मखेपु १३२.

**तोबा** उद्गा. (मुसलमानांत रूढ) पश्चात्तापाचा, दुःखाकुलतेचा 'अरेरे!' या अर्थी उद्गार. [फा.; अर.]

**तोमर** पु.न. घुसळण्याच्या रवीच्या आकाराचे एक लोखंडी आयुध. [सं.]

**तोय** स्त्री. पहा : **तु(तो)ई**

**तोर, तोवर** न. कच्चा आंबा; कैरी. (कु., हेट., राजा.) [सं.तुवर; क.तोरे]

**तोर** पु. आंब्याचा मोहोर;कैरी; कच्चा व लहान आंबा. [सं.तुवर,तोरे]

**तोर-रा** पु. पहा : **तोडा १**

**तोर** स्त्री.मर्जी; मर्जीची तऱ्हा; ऐट.

**तोरड** पु. अंबाडीचा कोरडा, असूड.- बदलापूर ९३.

**तोरण** न. १. (घराच्या) मुख्य दरवाजाच्या चौकटीची वरची आडवी पट्टी; गणेशपट्टी. २. मंगलप्रसंगी घर, मांडव वगैरेंच्या प्रवेशद्वाराजवळ आंब्याची पाने, डहाळ्या, फुले इ. दोरीत ओवून बांधतात ते मंगलचिन्ह. ३. होळीवर, देवादिकांवर बांधतात ती नारळ, खोबऱ्याच्या वाट्या इ.ची माळ. ४. तराजूचा काटा ज्यात इकडून तिकडे हलतो ते दुबेळके. [सं.] (वा.) ० **बांधणे** - १. उघडपणे आव्हान देणे. २. रणखांब पुरल्यामुळे आव्हानपूर्वक जोरा सुरू करणे. ३. छावणी व झेंडा उभा करणे :'राजश्री मुधोजी नाईक निंबाळकर यांणी जबरदस्तीने जमाव करून तोरणे बांधून धामधूम मांडली.'- मराठे कुळांचा इतिहास, जाधव. पृ. ५७.

**तोरण** स्त्री. एक काटेरी फळझाड. हे करवंदाच्या झाडाप्रमाणे असून डोंगराळ प्रदेशात होते.

न. वरील झाडाचे फळ. हे आंबट, उष्ण व गुरू असून रक्तपित्तनाशक आहे.- वगु ४.१५.

**तोरणटका, तोरणभेट** पु. स्त्री. लग्नमंडपावरील कर, पट्टी.

**तोरणवेस** स्त्री. लग्नकार्यात घराच्या मुख्य दरवाज्यावर केळीचे खुंट लावून केलेली कमान.

**तोरणा** पु. हळवार, हलक्या जमीनींतील भात. - बदलापूर २८३.

**तोरणे** न. रहाटगाडग्याच्या कनेकडाचे पुढले टोक ज्यावर ठेवलेले असते व ज्याच्या खालून बैल फिरत असतो ते लाकूड. याच्या जवळच कनेकडात तुंब घातलेले असते. (को.)

**तोर(रा)प** न. नेहमीप्रमाणे आवणी न करता भाताचे पीक घेता यावे म्हणून भाजून तयार केलेली जमीन; असल्या जमिनीत उभे असलेले पीक. (कु.)

**तोरमली-ल्ली** स्त्री. अपक्व व कनिष्ठ जातीच्या हिऱ्याची एक जात. श्रीलंकेत याला तुरमली म्हणतात.

**तोरमी** स्त्री. एक वाद्यविशेष : 'पावे तोरमी मोहरीं ।'- दाव ७०. [सं.तूर्य]

**तोरवणी** न. धान्य पेरल्यानंतर शिंपण्याचे पाणी. (कु.) [फा. तुरंज]

**तोरंजन** न. ईडलिंबू; महाळुंग.

**तोरा** पु. १. अन्न वाढतात किंवा अन्न वाढून नेतात ते ताट, तबक. २. नजर करण्याच्या वस्तू नेण्याचे ताट, तबक.

**तोरा** पु. मोठा मनुष्य; मोहरा : 'आलमगीराचे दोघे पुत्र हाताखाले तोरा घालून अंतरवेदात गेला.'- पेद २.७२. [सं.तुल्]

**तोरा** पु. (संपत्ती, सौंदर्य इ.च्या) अभिमानाचा आविर्भाव; दिमाख; ऐट; डौल; गर्व. [क.तोर;हिं.]

**तोरांज** न. पपनस; तुरंज. (गो.)

**तोरे** न. १. वनस्पती वगैरे पाण्यात कुजल्यामुळे त्या पाण्यात स्नान करणाऱ्यांच्या किंवा ते पिणाऱ्यांच्या अंगाला कंडू, खाज उत्पन्न करण्याचा गुणधर्म. त्याने अंगाला सुटणारी खाज येणारी सूज. २. गरोदर स्त्रीला येणारी सूज. (गो.) ३. पांढरा रंग. (गो.)

**तोल** न. वजन करण्याचे परिमाण, माप, वजन. उदा. शेर इ. [सं. तुल्] (वा.) ० **मिळविणे** - (जरतार धंदा) वजन पडताळून पाहणे. ० **लावून चालणे**- ठुमकत, नखऱ्याने, छाती पुढे काढून चालणे.

**तोल** पु. १. वजन करणे; वजन करण्याची क्रिया. २. वजन करून पदार्थांचे समजलेले मान, परिमाण. ३. कल; झोक. ४. काही जिन्नस तोलताना गिऱ्हाइकाला हवा असेल तेवढ्या वजनाचा जिन्नस देऊन जनरीतीप्रमाणे आणखी थोडासा वर देतात तो जिन्नस. ठरावीक वजनावर घ्यावयाचा वर्ताळा. ५. (सामा.) तुलना; बरोबरी; तुलनेला, जोडीला जुळणे; समानता. ६. (ल.) महत्त्व; मोठेपणा; वजनदारी; भारदस्तपणा. [सं.तुल्] (वा.) ० **देणे** - (दुसऱ्याचा अपराध, अपकार) सहन करणे, पोटात घालणे; गम खाणे; गई, क्षमा करणे; आपला हेका सोडणे; (दुसऱ्याच्या मताला, मान देऊन) मान्यता, संमती देणे. ० **सांभाळणे** - समता, साम्य, समतोल राखणे; झोक जाऊ न देणे. **तोलास तोल देणे** - तोडीस तोड देणे.

**तोलणे** उक्रि. १. वजन करणे; जोखणे. २. मनाने, बुद्धीने (एखाद्या पदार्थाची, व्यक्तीची) किंमत, महत्त्व, लायकी, वजन इ. ठरवणे; अंदाज करणे. ३. (एखादे कार्य एखाद्याला) झेपणे; तडीस नेण्याचे सामर्थ्य असणे; आटोक्यात असणे; चांगल्या रीतीने करता येणे; पेलणे. ४. तुलना करणे.

अक्रि. झुकणे; कलणे; झोक खाणे; वाकणे. [सं.तुल्]

**तोलदार** वि. १. (संपत्तीचा खर्च इ.बाबतीत) टक्कर द्यायला, स्पर्धा, बरोबरी करायला तयार असणारा; तशी हिंमत असलेला. २. भारी; प्रचंड :'भागानगरकर मोगल फौज तोलदार सामान पुरा आहे.'- वाडशाछ १.२. ३. वजनदार; मातब्बर; भारदस्त; अब्रूदार; प्रतिष्ठित.

**तोलबंद-दी** पु. स्त्री. दंडात घालायचा स्त्रियांचा एक दागिना.

**तोलमपट्टी, तोलातोळी** हांजी हांजी; खुशामत. (अहि.)

**तोलाचा** वि. १. बरोबरीचा; सारख्या दर्जाचा, किंमतीचा, हिंमतीचा, जोडीला अनुरूप. २. बहुमोल; भारी.

**तोलासन** न. (योग.) दोन्ही पायांचे चवडे जमिनीवर टेकून बसावे. हात जमिनीवर टेकवून आसन उचलावे. यास डोलासनही म्हणतात.[सं.]

**तोलीव** वि. १. वजन केलेले; तोललेले; जोखीव. २. मोजके; परिमित; माफक; योग्य प्रमाणात असलेले.

**तोल्द** न. होडीवर तयार केलेले वर्तुळाकार छप्पर.(गो.)

**तोळी** स्त्री. १. कोवळी सुपारी. (गो.)२. (गो.) पहा : **तळी**

**तोवर** क्रिवि. त्या वेळेपर्यंत; तोपर्यंत.

**तोवर-री** पु. स्त्री. कोवळा कोंब, देठ; अंकुर; तुरा. (क्रि. फुटणे, येणे) : 'सोमवल्लीचे तोवर। तेंचि सोमपान मधुर।'- कथा ३.८.१३९.[फा.]

**तो(तों)वरी** स्त्री. खाऱ्या पाण्यातील माशाची एक जात.(को.)

**तोश** पु. ससाच्या अंगावरील लव, लोकर. [फा.; सं.]

**तोश(ष)क** स्त्री. गादी. (व.) [फा.तूशक्]

**तोश(शे)खाना** पु.१.कोठार; जामदारखाना. २. वस्त्रागार; सरकारी खजिना. [फा.]

**तोशा** पु. प्रवासातील शिदोरी.

**तोशीस** स्त्री. १. (राजा, सावकार, चोर इ.नी. केलेला) उपद्रव, छळ; जुलूम; छळणे; त्रास देणे; जिकीर. (क्रि. लागणे, देणे, लावणे). २. झीज; घस : 'जवाहीर इंगरजाकडे गाहाण आहे तें फरोक्त करणार परंतु सरकारचें तोशीस लागेल.'- समारो १.१४९. [अर. तश्वीश्]

**तोष** पु. आनंद; समाधान; मनाचे सुख, प्रसन्नता. [सं.]

**तोषक** न. एखादे औषधासारखे दिसणारे परंतु औषधी गुणधर्म नसणारे द्रव किंवा गोळी. जेव्हा रोग्याचा आजार औषधाविना बरा होण्याची शक्यता असते तेव्हा रोग्याला तोषक उपचार केल्यास त्याची मानसिकता बदलून आजार बरा होऊ शकतो.

**तोषणे** उक्रि. संतुष्ट, आनंदित, प्रसन्न, समाधानी होणे,करणे.[सं. तोषण]

**तोषदान** न. सेवानिवृत्त होताना, केलेल्या कामाची जाण म्हणून देण्यात येणारे पैसे, उपदान.

**तोष्ट-स्ट,तोस्तान** न. तगादा; लकडा; निकडीची मागणी :'आम्हांस समस्तांस कर्जपट्टीचे तोष्ट लाविले आहे.'- वाडबाबा २.३५१.

**तोस करणे** बळ करणे : 'यैसे समयी २०० स्वार तरी पाठविलिया तोस करून मधुराचे ठाणे घालीन.'- ऐको १२३.

**तोस(स्त)दान, तोस्तान** न. १. काडतुसे, बंदुकीची दारू इ. सामग्री ठेवण्याची कंबरेला बांधण्याजोगी चामड्याची पिशवी. २. दप्तर ठेवण्याची कापडी पिशवी. ३. शेतकऱ्याजवळची सामानसुमान ठेवण्याची पिशवी.

वि. अगडबंब; गलेलठ्ठ.[फा. तोशा+दान](वा.) **तोसदान वाढणे** - १. (एखाद्याचा) बडेजाव, ऐश्वर्य वाढणे. २. (एखाद्याची देवपूजा, जप इ.) प्रस्थ वाढणे. ३. (एखाद्याचे शरीर) लठ्ठ, ढब्बू होणे.

**तोहबंद** १. आतला कपडा. २. नेसण्याचे धोतर.

**तोहमत** स्त्री. १. खोटा आरोप; आळ; बालंट; किटाळ. २. (व्यापक) (व्यापार इ.त आलेला) तोटा; ठोकर; नुकसान; दुर्दैवाचा घाला; अनर्थकारक, दुःखदायक, हानिकारक गोष्ट, प्रसंग. [अर.तुहमत]

**तोहमती** वि. संशयी; बालंटखोर. [अर.]

**तोळ** पु. १. टोळ. २. चिंचोळा व लांब पन्हळ. (गो.)

**तोळंबा** पु. १. जाड, अवजड दिसणारा खांब. २. खांबाखालील उथळे, उखळी, तळखडा : 'पद्मरागाचे तोळंबे।...'- मुसभा २.२७. ३. (दिसण्यात विशेष) जाड व भरदार असा हात, पाय, झाडाचे खोड इ. ४. धष्टपुष्ट, गरगरीत, भरदार व गोंडस शरीर. ५. गवंड्याचा ओळंबा, लंबक.

**तोळा** पु. (सोने इ. मौल्यवान वस्तूंचे) वजन करण्याचे, वजनाचे एक परिमाण. हा १० ग्रॅमचा असतो. [सं.तोलक]

**तोळामासा** वि. (प्रकृती, स्वभाव इ.चा) चंचलपणा, नाजूकपणा दर्शवणारा शब्दसमूह, विशेषण. (वा.) ० **पाहणे** - कृपण, हाताचा जड असणे.

**तोळेवरी** क्रिवि. एखादे काम करण्याच्या नावाने शून्य याअर्थी. उदा. गोष्टी करायला सांगा, देणेघेणे मात्र तोळेवरीच!

**तोंगल-ले** न. १. भाताचे लोंगर. २. बुगड्या, बाळ्या इ. कर्णभूषणांना लावलेला मोत्यांचा घोस, झुपका; मोत्यांचे भोकर; कानांतील अलंकार; लोलक : 'कानी तोंगलें बरवीं शोभतीं।'- वसा ३५.[क.]

**तोंगल** पु. श्रीमंत मनुष्य.

**तोंड** न. १. ज्याने खाता व बोलता येते तो शरीराचा अवयव. २. चेहरा; हनुवटीपासून डोक्यापर्यंत मस्तकाचा दर्शनी भाग. ३. (सामा.) (एखाद्या वस्तूचा) दर्शनी, पुढचा, टोकाचा भाग; समोरील अंग. ४. (फोड, गळू इ.चा) छिद्र पडण्याजोगा, छिद्रासारखा भाग; व्रणाचे मुख. ५. (कुपी, तपेली, लोटी वगैरेंचे) पदार्थ आत घालण्याचे द्वार, मुख. ६. (एखाद्या विषयात, शास्त्रात, गावात, देशात, घरात) शिरकाव होण्याचा मार्ग; प्रवेशद्वार. ७. (ल.) गुरुकिल्ली. उदा. व्याकरण हे भाषेचे तोंड होय. ८. (वारा इ.ची) दिशा, बाजू. ९. धैर्य; दम; उमेद; एखादे कार्य करण्याविषयीची न्यायत: योग्यता. १०. एखाद्या वस्तूचा स्वीकार किंवा विनियोगाचा, उपयोगाचा आरंभ तिच्या ज्या भागाकडून करतात तो भाग. ११. (युद्ध, वादविवाद इ. गोष्टींची) प्रारंभदशा; सुरुवात. १२. (सोनारी धंदा) हातोड्याचा सगळ्यात खालच्या बाजूला अडिश्रीच्या बुडासारखा असणारा भाग. याने ठोकलेला जिन्नस सारखा करून घेतात. १३. (सोनारी धंदा) कांबीला गोल आकार देताना तिची टोके जेथे जुळतात तो भाग. १४. (बुद्धिबळ) डाव सुरू करण्याचा प्रकार; मोहरा. १५. सुरईचे पाणी ओतण्याचे व भरण्याचे तोंड. हे पक्ष्याच्या चोचीप्रमाणे लांब व विविध आकाराचे आढळते. [सं.तुंड] (वा.) ० **आटोपणे, सांभाळणे, आवरणे** - जपून बोलणे; बोलण्याला आळा घालणे; अमर्याद भाषण, अभक्ष्यभक्षण यांपासून निवृत्त होणे. ० **आणणे** - (आटापाट्यांचा खेळ) शेवटची पाटी खेळून जाऊन पुन्हा एक एक खेळत येणे; पाणी, लोण आणणे. ० **आहे की तोबरा** - खादाड

किंवा बडबड्या माणसाला उद्देशून वापरण्याचा 'किती खातोस' 'किती बोलतोस' या अर्थाचा वाक्यप्रचार. ० **आंबट करणे** – (एखाद्याने) चेहऱ्यावर असमाधानाचे, निराशेचे भाव आणणे. ० **उतरणे** – (निराशा, आजार इ.ने) चेहरा म्लान होणे, सुकणे, फिका पडणे, निस्तेज होणे. ० **उष्टे करणे** – १.(अन्नाचा) एखाद-दुसरा घास खाणे. २.ज्या गोष्टीविषयी आपल्याला मुळीच माहीत नाही त्याविषयी बोलणे. ० **करणे** – बडबड, वटपट करणे; उद्धटपणे, निर्लज्जपणे बोलणे. ० **काटणे**– उदयाला येणे; अस्तित्वात येणे. ० **काळे करणे** – (उप.) एखादा ठपका, तोहमत अंगावर आल्यामुळे निघून, पळून जाणे; हातावर तुरी देणे; दृष्टीस न पडणे. ० **कोरडे पडणे, तोंडचे पाणी पळणे, उडणे** –१. भीतीमुळे चेहरा फिका पडणे; बावरणे; घाबरणे. २. भीतीने घसा सुकणे. ० **गोड करणे** – १. (एखाद्याला) लाच देणे, खूष करणे. २. मेजवानी देणे. ० **गोरेमोरे होणे** – (कोणी रागावले असता, वाईट वाटून) निराशेची, लाजलेपणाची जाणीव चेहऱ्यावर उमटणे. ० **घालणे** – (दोघे बोलत असताना तिसऱ्याने) संबंध नसताना मध्येच बोलणे. ० **घेऊन येणे** – एखाद्याने सोपवलेले काम न करता तसेच परत येणे. ० **घेणे** – बोंबलत सुटणे; ताशेरे झाडणे. ० **चिघट करनं** – वारंवार उपदेश करणे.( झाडी) ० **चुकविणे** – हातून एखादा अपराध घडला असता कोणी रागवेल म्हणून काम टाळण्यासाठी चुकारपणे दृष्टीस न पडणे. ० **टाकणे** – रागातिशयाने अपशब्दांचा वर्षाव करणे; निर्भर्त्सना करणे; खरडपट्टी काढणे; अद्वातद्वा बोलणे. ० **ठेचणे** – तोंडावर मार देऊन गप्प करणे; कह्यात घेणे; गुप्तता राखणे. ० **तोडणे** – एखादी वस्तू मिळवण्यासाठी एखाद्याच्या पाठी लागणे; तोंड वेंगाडणे.(ना.) ० **दाबणे** – लाच देऊन तोंड बंद करणे; एखाद्याला वश, गप्प करणे. ० **दाबून बुक्क्यांचा मार** – एखाद्याला तक्रारीचा ब्रही काढू न देता प्रचंड छळ, कोंडमारा करणे. ० **दिसणे** – एखाद्याची केलेली निर्भर्त्सना दुसरी बाजू न कळता लोकांच्या नजरेला येणे व आपणच वाईट ठरणे. ० **देणे** – १. पहा : **तोंड घेणे** २. २. सैन्याच्या अग्रभागी राहून शत्रूवर हल्ला करणे. ३. (एखाद्याचा) प्रतिपक्षी, शत्रू होऊन राहणे; लढायला सिद्ध होणे. ४. (आट्यापाट्यांचा खेळ) शेवटची पाटी खेळून परत येणाऱ्या गड्याकडे पाटी धरणाराने तोंड फिरविणे. ५. एखाद्या गोष्टीला न भिता त्यातून धैर्याने पार पडण्याची तयारी ठेवणे. ० **धरणे** – १. अन्नसेवन करण्याची तोंडाची शक्ती आजार वगैरे कारणांमुळे नाहीशी होणे. २. एखाद्याची बोलण्याची शक्ती नाहीशी करणे. ३. एखाद्याला आपल्या तावडीत, कबजात आणणे. ४. बोलणे बंद करणे. ० **धुणे** – एखाद्या वस्तूच्या लाभासाठी वाट पाहणे. ० **धुवून येणे** – (उप.) एखाद्याची विनंती कधीही मान्य होणार नाही असे म्हणून फेटाळून लावताना योजण्याचा तिरस्कारदर्शक वाक्यप्रचार. ० **निपटणे** – (आजार, उपवास इ. कारणांनी) गाल खोल जाणे; चेहरा सुकणे. ० **पडणे** – १. सुरुवात होणे. २. (गळू वगैरेला) छिद्र पडणे, फुटणे, वाहू लागणे. ० **पसरणे, वेंगाडणे, विचकणे**– १. खिन्नपणाची, केविलवाणी मुद्रा करणे. २. हीनदीनपणाने याचना करणे. ० **पाघळणे**– गुप्त गोष्ट बाहेर फोडणे. ० **पाडणे** – (वादाला, कामाला) सुरुवात करणे. ० **पाहणे** – १. (एखाद्याच्या) आश्रयाची, मदतीची अपेक्षा करून असणे. २. (एखाद्याने) स्वतःच्या शक्तीचा, कर्तृत्वाचा अजमास करणे. ३. बोलणाऱ्याचे आपण नुसते ऐकणे, सांगेल तसे न करता स्वस्थ बसणे. ० **पाहात बसणे** – काय व कसे करावे या विवंचनेत पडणे. ० **पिटणे** – बडबड करणे : 'तैशी न करी बडबड ।... वृथा तोंड पिटीना ।'– एभा १०.२३१. ० **फिरणे** – १. आजाराने, पदार्थाच्या अधिक सेवनाने तोंडाची रुची नाहीशी होणे. २. तोंडातून शिव्यांचा वर्षाव होऊ लागणे. ० **फिरविणे**– १. (वितळत असलेला किंवा तापविला जात असलेला धातू इ.ने) रंगामध्ये फरक दाखवणे; रंग पालटणे. २. दुर्लक्ष, अवमान करणे. ३. गतीची दिशा बदलणे; दुसऱ्या दिशेला, माघारे वळणे. ० **फुटणे**– १. फजिती उडणे; पत नाहीशी होणे; नाचक्की होणे; अभिमानाला मोठा धक्का लागण्याजोगा अपमान, शिक्षा होणे.२. सुरुवात होणे (युद्ध, भांडण इ.ला). ० **बंद करणे, बांधणे** – १. जपून बोलणे. २. (एखाद्याला) लाच देऊन गप्प बसवणे, वश करून घेणे. ० **बंदावर राखणे** – खाण्याला किंवा बोलण्याला आळा घालणे. ० **बाहेर काढणे** – १. राजरोसपणे समाजात हिंडणे. २. फिरण्यासाठी, कामासाठी बाहेर पडणे. ० **बिघडणे** – तोंड बेचव होणे; तोंडाला अरुची उत्पन्न होणे. ० **भर, भरून बोलणे**– भीड, संकोच, भीती न धरता मनमोकळेपणाने भरपूर, अघळपघळ बोलणे. ० **मागणे**– (आट्यापाट्यांचा खेळ) लोण घेऊन परत जाताना पाटीवरील गड्याला आपणाकडे तोंड फिरवायला सांगणे. ० **माजणे** – १. मिष्टान्न खाण्याची चटक लागल्याने साध्या पदार्थाबद्दल अरुची वाटणे. २. शिव्या देण्याची, फटकळपणे बोलण्याची खोड लागणे. ० **मारनं** – १. शब्द देणे. २. आपले म्हणणे सांगणे. ० **मिचकणे** – दात, ओठ खाणे. ० **येणे**– १. तोंडाच्या आतल्या बाजूने त्वचेला फोड येऊन ती हुळहुळी होणे व लाळ गळणे. २. लहान मूल बोलू लागणे. (कर.) ० **रंगविणे**– १. विडा खाऊन ओठ तांबडेलाल करून घेणे. २. एखाद्याचे थोबाड थोबाडात मारून रंगवणे. ० **लागणे**– (लढाई, वादविवाद, अंगीकृत कार्य इ.ना) सुरुवात होणे. ० **वर करून बोलणे** – निर्लज्जपणे, आपला दर्जा, पायरी सोडून बोलणे.० **वाईट करणे, होणे**– निराशेची मुद्रा धारण करणे. ० **वाकडे करणे** – १. वेडावून दाखवणे. २. नापसंती दर्शवणे. ० **वाजविणे**– एकसारखे बोलणे; निरर्थक बडबड, बकबक, वटवट करणे; भांडणे. ० **वासणे**– १. निराशेने, दुःखाने तोंड उघडणे व ते बराच वेळ तसेच राहणे. २. याचनेसाठी तोंड उघडणे, वेंगाडणे. ० **वासून पडणे** – शक्तीच्या क्षीणतेमुळे, उत्साह, तेज वगैरे नष्ट झाल्यामुळे, गतप्राण झाल्यामुळे आ पसरून पडणे. ० **वासून बोलणे** – अविचाराने बोलणे : 'ऐसें स्वसख्यांपासीं कां गे वदलीस तोंड वासून ।'– मोउद्योग १३.२०५.० **शिवले जाणे**– एक शब्दही न बोलणे. ० **शेणासारखे पडणे**– (लाजिरवाणे कृत्य केल्याने) तोंड उतरणे,

निस्तेज होणे, काळवंडणे. ० **सांभाळणे–** जपून बोलणे; जीभ आवरणे; मर्यादित बोलणे. ० **सुटणे, सोडणे, सुरू होणे; तोंडाचा तोफखाना, पट्टा सुटणे, सोडणे–** अद्वातद्वा बोलणे; शिव्यांचा भडिमार करणे; जीभ मोकळी सोडणे. ० **सोडणे–** अधाशासारखे खाणे. **तोंडचा गोड आणि हातचा जड –** बोलण्यात गोड, पण प्रत्यक्ष पैशाची इ.मदत करण्यात मागे. **तोंडचा घास काढणे, हिरावणे –** अगदी आटोक्यात आलेली, जवळजवळ मिळालेली गोष्ट हिसकावली जाणे. **तोंडचा घास देणे –** एखाद्याला अतिशय प्रेमाने वागवणे; आपली गरज मागे सारून दुसऱ्याची गरज प्रथम भागवणे. **तोंडनी भांडी करनं –** निष्फळ बोलणे; निरर्थक बडबड करणे. **तोंडाचा हुक्का होणे –** तोंड सुकून जाणे. (व.) **तोंडाची वाफ दवडणे–** १. मूर्खाला उपदेश करणे. २. विश्वास न बसण्याजोगे, मूर्खपणाने बोलणे; वल्गना करणे; बाता मारणे. **तोंडाचे बोळके होणे –** म्हातारपणामुळे सर्व दात पडणे. **तोंडाचे भदे करणे –** शिवीगाळ करणे. **तोंडाचे माडे करणे –** थाप्पा मारणे. **तोंडात जडणे–** थोबाडीत, गालात बसणे. **तोंडात तीळ न भिजणे; तीळभर न राहणे–** अगदी क्षुद्र अशी गुप्त गोष्टही पोटात न ठरणे, न सांगता न राहवणे. **तोंडात तोंड घालणे–** १. प्रेम, मैत्री इ. भावांनी वागणे; मोठ्या प्रेमाचा आव आणणे. २. परस्परांचे चुंबन घेणे. **तोंडात बोट घालणे –** आश्चर्यचकित, थक्क, विस्मित होणे. **तोंडात, भडकावणे, देणे –** थोबाडीत, चपराक, गालात मारणे. **तोंडात माती घालणे–** खायला अन्न नसणे; अतिशय हाल, कष्ट सोसावे लागणे. **तोंडात माती पडणे, जाणे–** १. एखाद्याची उपासमार होणे. २. मरणे. **तोंडात मारणे, मारून घेणे–** १. पराभूत होणे; हार जाणे. २. फजिती झाल्यानंतर शहाणपणा शिकणे; नुकसान सोसून धडा शिकणे. **तोंडात शेण, साखर घालणे–** फजिती करणे; नावे ठेवणे : 'सावित्रीबाईंच्या तोंडात लोक जेव्हां फारच साखर घालीत, तेव्हा तिने दोन-तीन जुनेरी एकत्र शिवून जानकीबाईंना द्यावी.'– रंगराव. **तोंडात साखर असणे–** एखाद्याचे तोंड म्हणजे वाणी, बोलणे गोड असणे. (गो.) **तोंडात साखर पडणे –** आनंदाचा प्रसंग, दिवस येणे. **तोंडातून ब्र काढणे–** अधिक-उणे अक्षर काढणे, उच्चारणे. नकारात्मक उपयोग. **तोंडाने पाप भरणे, तोंडे पाप घेणे–** लोकांची पापे, त्यांचे दोष बोलून दाखवणे; वाईट बोलण्याची हौस यथेच्छ पुरवून घेणे; लोकांची पापे उच्चारून जिव्हा विटाळणे : 'कैसीं वो मानुसें। सपाइनि परवंसें। तोंडे पाप घेती कांइसें। वायां वीण।'– शिव २१६. **तोंडापुरता मांडा–** (भूक भागेल एवढीच पोळी) जेमतेम गरज भागेल एवढाच जरूर त्या वस्तूचा पुरवठा. **तोंडाम्हा मुतनं –** गरजेला, संकटात मदतीस न येणे. (अहि.) **तोंडार पडप –** १. वैधव्य प्राप्त होणे. २. लाजेने तोंड लपवण्याजोगी स्थिती येणे. **तोंडार मारप–** एखाद्याच्या पदरात चूक बांधणे; वरमण्यासारखे उत्तर देणे. (गो.) **तोंडार ल्हायो उडप–** (तोंडात लाह्या फुटणे) फार जलद, अस्खलित बोलणे. **तोंडाला काळोखी आणणे, फासणे, लावणे–** बेअब्रू, नापत करणे. **तोंडाला टाकी दिलेली असणे –** देवीच्या खोल वणांनी तोंड भरलेले असणे. **तोंडाला पाणी सुटणे –** एखादी वस्तू पाहून तिच्यासंबंधी मोह उत्पन्न होणे; हाव सुटणे. **तोंडाला पाने पुसणे–** फसवणे; चकवणे; छकवणे; भोळसावणे; भोंदणे. **तोंडाला फाटा फुटणे –** मूळ मुद्दा सोडून भलतेच, हवे तसे, अमर्याद बोलत सुटणे. **तोंडावर तुकडा टाकणे–** एखाद्याने गप्प बसावे, प्रतिकूल बोलू नये म्हणून त्याला काहीतरी देणे. **तोंडावर, तोंडाला तोंड देणे–** १. विरोध करणे; विरुद्ध बोलणे. २. उद्धटपणाने, अविनयाने, दांडगेपणाने प्रत्युत्तर देणे. **तोंडावर, तोंडाला तोंड पडणे–** दोघांची गाठ पडून बोलाचाल, वाद होणे. **तोंडावर थुंकणे–** एखाद्याची छी : थू, निर्भर्त्सना, धिक्कार करणे. **तोंडावर नक्षत्र पडणे–** (एखाद्याने) तोंडाळपणा करणे; शिवराळ असणे; नेहमी अपशब्दांनी तोंड भरलेले असणे. **तोंडावर मारणे–** पराभूत करणे. **तोंडावर सांगणे, बोलणे–** एखाद्याच्या समक्ष निर्भीडपणे खरे सांगणे. **तोंडावर, तोंडावरून हात फिरवणे–** गोड बोलून, फूस लावून, भूलथाप देऊन फसवणे; भोंदणे. **तोंडाशी तोंड देणे–** हलक्या दर्जाच्या व्यक्तीने वरिष्ठांशी आपला दर्जा विसरून, बरोबरीच्या नात्याने, अविनयाने बोलणे, वागणे. **तोंडास काळोखी, काजळी लागणे, लावणे–** बेअब्रू, नाचक्की, दुष्कीर्ती होणे; नावाला कलंक, बट्टा लागणे. **तोंडास कुत्रे बांधलेले असणे–** ताळतंत्र सोडून, अद्वातद्वा, अपशब्द बोलणे; शिव्या देणे. **तोंडास खीळ घालणे–** निग्रहपूर्वक, हट्टाने मौन धरणे. **तोंडास तोंड न दिसणे–** तोंड न ओळखता येण्याइतका अंधार असणे. **तोंडास येईल ते बोलणे, तोंडाला फाटा फुटणे–** वाट्टेल तसे बोलणे. **तोंडास-ला, तोंडी लागणे–** उलट उत्तरे देणे; हुज्जत घालणे; वादविवादाला तयार होणे. **तोंडास हळद लागणे–** एखाद्याला दोष देणे; नापसंती दर्शवणे. **तोंडासारखे बोलणे–** एखाद्याची स्तुती, खुशामत करण्यासाठी त्याच्या म्हणण्याची री ओढणे; आपल्या फायद्यासाठी दुसऱ्याचे मन न दुखावेल असे बोलणे. **तोंडी आणणे, देणे–** रोग्याला लाळ गळण्याचे, तोंड येण्याचे औषध देऊन तोंड आणणे. **तोंडी काढणे–** १. ओकारी, वांती होणे. २. (एखाद्याला त्याने) केलेले उपकार बोलून दाखवून टोमणा मारणे. **तोंडी खीळ पडणे–** तोंड बंद होणे; गप्प बसायला भाग पडणे. **तोंडी घास येणे–** एखाद्याला घासभर अन्न मिळणे; चरितार्थाचे साधन मिळणे; पोटापाण्याची व्यवस्था होणे. **तोंडी तीळ न भिजणे–** १. (तापाने, संतापून ओरडण्याने, रडण्याने) तोंड कोरडे पडणे. २. एखादी गुप्त गोष्ट मनात न ठेवणे, बोलून टाकणे. **तोंडी देणे –** एखाद्याला एखाद्या माणसाच्या, कठीण कार्याच्या झपाट्यात, तडाख्यात, तावडीत हाल, दुःख सोसायला लोटणे, पुढे करणे. **तोंडी बसणे –** श्लोक, शब्द इ. स्पष्ट, अचूक म्हणता येण्याइतका पाठ होणे. **तोंडी येऊन बुडणे, नासणे–** एखादी वस्तू, पीक, काम इ. अगदी पूर्णावस्थेला येऊन नाहीसे होणे. **तोंडी येणे–** १. (पारा इ. औषधाने) तोंड येणे. २. पूर्णावस्थेत, ऐन

भरात येणे. **तोंडी रक्त लागणे**– १. वाघ इ. हिंस्र प्राण्यांच्या तोंडाला माणसाच्या रक्ताची चटक लागून ते माणसावर टपून बसणे. २. लाच खाण्याची चटक लागणे. **तोंडी लागणे**– १. खाद्याची चव प्रथमच कळून त्याची चटक, गोडी लागणे; आवड उत्पन्न होणे. २.(युद्ध, भांडण इ. मध्ये) आणीबाणीच्या ठिकाणी आघाडीला असणे. ३. पहा : **तोंडाला तोंड देणे**. ४. पहा : **तोंडास लागणे**. **तोंडी लावणे**– १. जेवताना भाजी, चटणी इ. चमचमीत पदार्थाने रुचिपालट करणे. २.विसारादाखल पैसे देणे. **तोंडे वाकडी करणे**– वेडावणे; वेडावून दाखवणे. **लहान तोंडी मोठा घास घेणे**– १. आपल्या आवाक्याबाहेरचे काम हाती घेणे. २. वडीलधाऱ्या माणसांसमोर न शोभेल असे, मर्यादा सोडून, बेअदबीने बोलणे; मोठ्या माणसाला शहाणपण शिकवणे.

**तोंडओळख** स्त्री. परस्परांचा विशेष परिचय नसताना, चेहरा पाहूनच हा अमुक आहे असे समजण्याजोगी ओळख; नाव इ. काहीच माहीत नसून एखाद्याचा केवळ तोंडावळाच ओळखीचा असणे.

**तोंडकडी** स्त्री. १. आतील तुळयांची तोंडे बाहेर भिंतीतील ज्या तुळईवर ठेवतात, ती सलग तुळई. २. कौलारू छपराचे वासे ज्या सलग तुळईवर टेकतात ती छपराच्या शेवटी, टोकाला असलेली तुळई. ३. गुरांचे दावे जिला बांधतात ती कडी. ४. (सोनारी धंदा) दागिन्याची शेवटची कडी, नाके; ज्यात फासा अडकवतात ती (सरी इ. दागिन्याची) टोकाची कडी; (जव्याच्या) मण्याच्या तोंडाशी ठेवलेली कडी. ५. जमाखर्चाच्या वहीतील जमा आणि खर्च या दोन्ही बाजूंचा मेळ. (क्रि. मिळणे, जुळणे, येणे, उतरणे, चुकणे, बंद होणे).

**तोंडकाडप** स्त्री. उपदंश झालेल्या रोग्याला एक प्रकारचे औषध देऊन त्याच्या तोंडातून लाळ वाहवतात तो प्रकार. (गो.)

**तोंडखोडी** वि. तोंडाळ; टाकून बोलणारा : 'परम अधम रुक्मी हा महा तोंडखोडी।'– सारुह ३.७८.

**तोंडघशी** क्रिवि. १. जमिनीवर पडून तोंड घासले जाईल, फुटेल अशा रीतीने. (क्रि. पाडणे, पडणे, देणे). २. आधार गेल्याने गोत्यात, पेचात, अडचणीत, फशी. (पडणे).

**तोंडचा** वि. १. विरुद्ध, उलट दिशेचा; समोरून येणारा (वारा, ऊन, भरती इ.).२. ज्याची कर्तबगारी केवळ तोंडातच, बोलण्यातच आहे, कामात नाही असा. ३. तोंडाने सांगितलेला, तोंडी केलेला (हिशेब, व्यवहार, पुरावा इ.).

**तोंडचाट्या** वि. खुशामत्या; थुंकी झेलणारा; तोंडासारखे बोलणारा.

**तोंडचाळा** पु. १. तोंड वेडेवाकडे करून वेडावण्याची क्रिया. २. वात वगैरेंच्या लहरीने होणारी तोंडाची हालचाल.

**तोंड(डा)ची गोष्ट** सहजसाध्य, अतिशय सोपी गोष्ट, काम.

**तोंडचुकाऊ–वू–व्या–रू** वि. कामाच्या भीतीने तोंड लपवणारा.

**तोंडचे तोंडी** क्रिवि. प्रत्यक्षाप्रत्यक्ष; तोंडाने; बोलाचालीने.

**तोंडचे पायचे** गुरांच्या तोंडाला व पायाला होणारा रोग.

**तोंडझाडणी** स्त्री. तिरस्कारपूर्ण उद्गारांनी झिडकारणे; खरडपट्टी.

**तोंडदेखणा–ला–ली–ले** वि. आपल्या अंतःकरणात तसा भाव नसून दुसऱ्याचे मन राखण्यासाठी त्याला आवडेल असा केलेला व्यवहार, भाषण इ.; तोंडासारखा, तोंडपुजेपणाचा.

**तोंडपट्टा** पु. तोंडाचा तोफखाना; अपशब्दांचा भडीमार; संतापाने, जोरजोराने बेबंदपणे बोलणे.

**तोंडपट्टी** स्त्री. (शिवणकाम) तोंडाला शिवलेली पट्टी.

**तोंडपाटीलकी** स्त्री. १. आपण काही न करता बसल्या जागेवरून लुडबुडेपणाने दुसऱ्यांना हुकूमवजा गोष्टी, कामे सांगणे. (पाटलाला बसल्या जागेवरून अनेक कामे हुकूम देऊन करून घ्यावी लागतात, त्यावरून.) २. लुडबुडेपणाची वटवट; तोंडाळपणा.

**तोंडपाठ** वि. पुस्तकाच्या साहाय्यावाचून केवळ तोंडाने म्हणता येण्यासारखा; मुखोद्गत.

**तोंडपालट** पु. स्त्री. १. (अरुची घालवण्यासाठी केलेला) अन्नातील बदल. २. असा बदल करून अरुची घालवण्याची क्रिया.

**तोंडपिटी** स्त्री. १. (वडील, गुरू इ.ची) आज्ञा न मानता तिच्या औचित्य वगैरेसंबंधी केलेली वाटाघाट; वडिलांशी, गुरूंशी उद्धटपणाने वाद घालणे; उलट उत्तर देणे; प्रश्न इ. विचारून अडवणूक करणे : 'गुरूंसी करिती तोंडपिटी।'– विपू १.५७. २. ('ढ' माणसाला शिकवण्यासाठी, विसराळू माणसाला वारंवार बजावण्यासाठी, जनावराला हाकण्यासाठी करावी लागणारी) व्यर्थ बडबड, वटवट.

**तोंडप्रचि(ची)ती** स्त्री. खुशामत करण्यासाठी एखाद्याच्या मोठेपणाला, भाषणाला, अस्तित्वाला मान देणे.

**तोंडप्रचीत** क्रिवि. १. तोंडासारखे (वर्तन इ.). २. माणूस पाहून, तारतम्याने (वागणे).

**तोंडफटाला–ल्या, तोंडफट्याल** वि. मूर्खपणाने बडबडणारा; फटकळ; बाता मारणारा; वटवट्या.

**तोंडबळ** न. वाक्पटुत्व; बोलण्याची कला.

**तोंडबंद, तोंडबांधणी** पु. स्त्री. गाडीच्या चाकाच्या तुंब्यावरील बाहेरील बाजूचे लोखंडी कडे, पट्टी.

**तोंडबाग–वळा, तोंडवळण** स्त्री. चेहरेपट्टी; मुखवटा.

**तोंडबांधणी** स्त्री. १. पहा : **तोंडबंद**. २. (ढोरांचा धंदा) कातड्याच्या मोटेच्या सोंडेच्या टोकासाठी बाजूला शिवलेला गोट.

**तोंडभर** वि. तोंडाला येईल तेवढा; भरपूर.

**तोंडमार** स्त्री. १. रोग्यावर लादलेला खाद्यपेयांचा निर्बंध; पथ्य. २. एखाद्याला बोलायला तोंड उघडू न देणे. ३. एखाद्याच्या आशाआकांक्षा फोल ठरवणे; आशाभंग; मनोभंग.

**तोंडमारा** पु. १. शेतीच्या कामाच्या वेळी पिकात काम करताना गुरांच्या तोंडाला जाळी, मुसके बांधणे. २. पहा : **तोंडमार**

**तोंडमिळवणी** स्त्री. १. जमा आणि खर्च यांचा मेळ घालणे. २. मेळ. ३. ऋणको व धनको यांच्यातील हिशेबाची बेबाकी, शून्य.

**तोंडमिळवणी खाते** कच्चे खाते. (याचे देणे–येणे वर्षअखेर करून खुद्द खात्यात जिरवतात.)

**तोंडलाग** पु. शिंगे असलेल्या जनावरांच्या तोंडाला होणारा रोग; यात लाळ गळत राहते.

**तोंडवीख** न. विषारी, वाईट भाषण, बोलणे.
**तोंडशिनळ–शिंदळ** वि. अचकटविचकट, बीभत्स बोलणारा; केवळ तोंडाने शिनळकी करणारा.
**तोंडशेवळे** न. मुंडावळ.– बदलापूर २७७.
**तोंडसर** क्रिवि. तुडुंब; भरपूर; तोंडापर्यंत.
**तोंडसरता** वि. अस्खलित, तोंडपाठ न म्हणता येण्यासारखा.
क्रिवि. घसरत घसरत; अडखळत; चुका करत; आठवून आठवून.
**तोंडसुख** न. १. एखाद्याने केलेल्या अपकाराचा शरीराने प्रतिकार करण्याचे सामर्थ्य नसल्यामुळे केवळ तोंडाने यथेच्छ शिव्यांचा, अपशब्दांचा भडिमार करून त्यात सुख मानणे. २. जीभ मोकाट सोडून वाट्टेल ते बोलण्याचे घेतलेले सुख; खरडपट्टी. (क्रि. घेणे).
**तोंडसुटका** स्त्री. १. जिभेचा सैलपणा; बोलण्यात लाज न बाळगणे. २. भाषणस्वातंत्र्य. ३. तोंडाळपणा. ४. पथ्य, अरुची इ.तून झालेली तोंडाची सुटका; खाण्यापिण्याचे स्वातंत्र्य.
**तोंडहिशेबी** वि. अनेक रकमांचा मनातल्या मनात चटकन हिशेब करून सांगणारा बुद्धिमान मनुष्य.
**तोंडागळा** वि. बोलण्यात कुशल, हुशार : 'की शेषाहूनि तोंडागळें। बोलकें आथी।'– ज्ञा ९.३७०.
**तोंडाचा जड** वि. रेंगत, अस्पष्ट, फार थोडे बोलणारा.
**तोंडातोंडी** क्रिवि. १. समोरासमोर. २. बोलण्यात; बोलाचालीत.
**तोंडापुरता, तोंडावर गोड** वि. वरवर गोड पण खोटे बोलणारा; दुतोंड्या.
**तोंडाळ** वि. १. दुसऱ्यावर तोंड टाकणारा; शिवराळ; भांडखोर. २. बडबड्या; वाचाळ.
**तोंडाळणे** उक्रि. बकबक करून गुप्त गोष्टी फोडणे; जीभ पाघळणे.
**तोंडी** स्त्री. १. विण्याचा डेरा व दांडी यांच्या सांध्याची जागा. २. सांधा जोडणारी लाकडी पट्टी. ३. मृदंग, ढोलके इ.वाद्यांचे तोंड. ४. विहिरीची पाळ. (ना.)
**तोंडी** स्त्री. लहान घागर; कळशी. (तंजा.) [त.]
**तोंडी** वि. १. मौखिक; तोंडाने सांगितलेले, म्हटलेले. २. समक्ष ( दिलेली साक्ष इ.).
**तोंडीलावणे** न. रुची निर्माण करणारा जेवणातला पदार्थ; भाकरी पोळी याबरोबर लावून खायचा पदार्थ.
**तौतूक** क्रिवि. नुकताच; आत्ताच; थोड्याच वेळापूर्वी.
**तौर** पु. तोरा; डौल; दिमाख; गर्व.
**तौर्यत्रिक** न. नृत्य, गीत व वादन या तिहींचा समुदाय : 'तौर्यत्रिकांसहित आणुनि पत्तनातें।'– वीरेश्वरकृत रुक्मिणी–स्वयंवर २७. [सं.]
**तॉप** उद्गा. (जुगार) मान्य; कबूल. (गो.)
**तॉपण** न. मूठ असलेला दाभण; सामता. (गो.)
**तॉल्द** न. होडीवरचे आच्छादन; टप. (गो.) [पो. तोल्द]
**त्यक्त** वि. टाकलेला; सोडलेला; त्याग केलेला. [सं.]
**त्यज(जि)णे** पहा : **त्यागणे** : 'तैं कांहीं न त्यजे अधिकें। गोवींचि पडे।'– ज्ञा १८.१३१. [सं.त्यज्]

**त्या** सना. १. तो, ते या सर्वनामांचे सामान्यरूप. २. ती या सर्वनामाचे अनेकवचन.
**त्याग** पु. १. सोडणे; टाकून देणे; वर्जणे. २. (वेदान्त.) कर्मफळ सोडून देणे : 'यया कर्मफलत्यागातें। त्यागु म्हणती पैं जाणते।'– ज्ञा १८.१२५. ३. दान; अहेर; बिदागी; संभावना : 'पदोपदीं नाना त्याग।'– एरुस्व १५.१२८. ४. गोंधळी, भराडी, डौरकरू इ.ना त्यांच्या कामाबद्दल देण्याची बिदागी, मजुरी. [सं.]
**त्यागणे** सक्रि. १. सोडणे; टाकून देणे; वर्जणे. २. उत्सर्ग करणे (मल, विष्ठा इ.). [सं.त्यज्]
**त्यागी–जी** वि. १. संसार व सांसारिक बंधने ज्याने टाकली आहेत असा (मनुष्य); विरक्त; वैराग्ययुक्त. २. दान देणारा; दानशूर. [सं.]
**त्याज्य** वि. टाकण्यास, सोडण्यास, वर्ज्य करण्यास योग्य, इष्ट, आवश्यक. [सं.]
**त्याज्य स्वर** (संगीत) विवादी स्वर. [सं.]
**त्यापासून** क्रिवि. तेव्हापासून : 'त्यापासुनिं देहानें वाचेनें प्रेमयुक्त चित्तानें। विप्रासि रौक्मिणेया मी पूजितसे सदैव चित्ताने।'– मोअनु ७.१०५.
**त्यास** क्रिवि. त्याकारणामुळे; त्यास्तव; म्हणून; त्यामुळे; तशांत.– पया २४७.
**त्येगार** पु. दिमाख; डौल; ऐट; रुबाब. (ग्रा.)
**त्रय** न. तीन वस्तू, एक विचारांच्या तीन व्यक्ती इ.चा समुदाय; त्रिकूट; त्रिवर्ग. [सं.]
**त्रयस्थ** वि. तिऱ्हाईत; दोघांपैकी कोणत्याही पक्षाला न मिळालेला; तटस्थ; परका. [सं.]
**त्रयी** स्त्री. १.(व्यापक) तिघांचा समुदाय. २. बाप, आजा, पणजा असे अनुक्रमाने येणारे तीन पूर्वज. ३. आई, आजी व पणजी या तिन्ही समुच्चयाने. ४. ऋक्, यजुस् व साम हे तीन वेद. ५. राजनीतीतील एक प्रकार; धर्मविद्या. [सं.] (वा.) **(एखाद्याची) त्रयी उद्धरणे**– एखाद्याला आईबापावरून शिव्या देणे; पितर उद्धरणे. **त्रयीमध्ये उगवलेला**– १. तिन्ही वेदांत पारंगत असणारा. २. (उप.) चोरी, चहाडी व शिनळकी या तीन गोष्टींत कुशल असलेला.
**त्रयोदश** वि. १. तेरा. २. तेरावा. [सं.]
**त्रयोदशी** स्त्री.चांद्रमासाच्या, मराठी महिन्याच्या शुक्ल व कृष्ण पक्षातील तेरावी तिथी. [सं.]
**त्रसणे** अक्रि. संत्रस्त होणे; त्रासणे; कंटाळणे : 'एकाधा एकु त्रसला जाए'– लीचउ २२. [सं. त्रस्]
**त्रसरेणु** पु. उन्हाच्या कवडशात दिसणारा अतिसूक्ष्म रज:कण. तीन द्व्यणुके मिळून हा तयार होतो.हे वजनाचे सूक्ष्म परिमाण मानले आहे. [सं.]
**त्रस्त** वि. १. त्रासलेला; गांजलेला; उद्विग्न; जिकिरीला आलेला. २. भ्यालेला; घाबरलेला. [सं.]
**त्रस्तदृष्टी** स्त्री. (नृत्य.) वरच्या पापण्या वर व खालच्या खाली ठेवून बुबुळे सारखी फिरवण्याचा अभिनय. [सं.]

**त्र(त्रा)हाटणे, त्राहटणे** उक्रि. १. मारणे; नायनाट करणे : 'अहंकारातें त्रहाटी।'- ज्ञाप्र १३८. २. (वाद्ये) मोठ्याने वाजणे, वाजवणे. ३. सैन्य इ. सिद्ध करणे. - मनको. ४. आपटणे; थापटणे : 'आवेशे भुजा त्राहाटिती।'- ज्ञा १.१३३. ५. चढवणे; पसरणे : 'रामपूजेची सामग्री। छेत्रें त्राहाटलीं तयावरी।'- वेसीस्व ८.११९. [सं.तड्]

**त्रागा** पु. दुसऱ्याचे नुकसान व्हावे म्हणून किंवा दुसऱ्यावर ठपका यावा म्हणून संतापाच्या भरात स्वत:लाच दुखापत करून घेणे किंवा स्वत:ची हानी करून घेण्यास तयार होणे; डोक्यात राख घालणे. (क्रि. करणे). [गु. त्रागुं]

**त्राटक** न. डोळे ताठ उघडून एकाच पदार्थाकडे, डोळ्यांना पाणी येईपर्यंत नासाग्राकडे, इष्ट ध्येयाकडे दृष्टी लावण्याची योगशास्त्रातील क्रिया.- संयोग ३५५. [सं.]

**त्राटिका** स्त्री. १. एक राक्षसी. २. (ल.) कजाग स्त्री. [सं.]

**त्राण** न. १. रक्षण; सांभाळ. २. रक्षण करण्याचे साधन; आधार : '...आयुष्याचें त्राण। नीच नवें हें। - ज्ञा १७.१३१. ३. नरकापासून तारण; मुक्ती; मोक्ष. ४. अतिशय जोराचा, नेटाचा, सर्व शक्ती एकवटून केलेला प्रयत्न : 'एक शर सोडोनियां त्राणें कर्णनंदन उडविला।'- जै १८.७९. ५. संतापाने, त्वेषाने केलेली आदळआपट, आरडाओरड इ.; हातपाय झाडणे व चडफडणे. ६. (जीर्ण वस्त्र, वस्तू, दुबळा मनुष्य, जनावर इ.त)शिल्लक राहिलेला दम, जीव, जोर, धडधाकटपणा, सत्त्व, ताकद, सार. [सं.त्रा]

**त्राण** पु. बत्ता; खलातील घोट्या : 'गारा फोडुनु घालीजे त्राणें।'- वैद्यक ४. [सं.]

**त्राता** वि. रक्षक; सांभाळणारा; संकटातून तारणारा; वाली. [सं.त्रा]

**त्राय** स्त्री. न. १. रक्षण. २. बळ; जोर; सत्ता; सामर्थ्य : 'इहीं विवेकाची त्राय फेडिली।'- ज्ञा ३.२५२. ३. आधार; आश्रय. ४. (ल.)किंमत; कथा : 'पै करणिया आणि जया । मेळु नाहीं धनंजया । तो पाहुनी पिसेया । कैची त्राय ।' - ज्ञा १८.६६७. ५. व्यवहार : 'अज्ञानाघरिं त्राये। वाउगी याची।'- अमृ ३.१२. [सं. त्रा]

**त्रास** पु. १. (सूर्य, अग्नी, उग्र औषध, ज्वर, क्रोध, दुष्ट लोक इ. पासून होणारा) उपद्रव; पीडा; दु:ख. २. कंटाळा; वीट; किळस; अप्रीती; जिकीर. ३. भय; भीती : 'युद्धीं सदा हि ज्या नरसिंहाचा पार्थमृग धरि त्रास।'- मोकर्ण २.८.[सं. त्रस्] (वा.) **त्रास त्रास करणे** - जुलमाविरुद्ध बोभाटा, ओरड करणे.

**त्रासणे** उक्रि. १. कंटाळणे; त्रस्त होणे; जिकिरीस येणे; जर्जर, बेजार होणे. २. त्रस्त करणे; त्रास देणे. ३. भिणे; घाबरणे : 'सौमित्रि त्रासे शापास। '- मोरा घनाक्षर रामायण १२३. [सं.त्रस्]

**त्रासिक** वि. १. त्रास देणारा; छळणारा; जुलूम करणारा; गांजणारा. २. चिडखोर; चरफडणारा. ३. एकलकोंडा; एकांतप्रिय; समाजाला उबगलेला. [सं.त्रस्]

**त्रासित** वि. पहा : **त्रस्त २** [सं.]

**त्राहाटक** वि. पूरक, कुंभक, रेचक व केवळ कुंभक या प्राणायामाच्या चार प्रकारांतील चौथा प्रकार . [सं.त्रस्]

**त्राहि** उद्गा. रक्षण कर ! वाचव ! अशा अर्थाचे संस्कृत क्रियापद.[सं.त्रा] (वा.) **त्राहि भगवन् करून सोडणे** - एखाद्याला अतिशय सतावून त्रासवून सोडणे; जर्जर करणे. **त्राहि त्रासणे**- अतिशय कंटाळणे; त्रस्त, बेजार, जर्जर होणे.

**त्रि** वि. तीन.समासात उपयोग. जसे : - त्रिपद, त्रिभुवन इ. [सं.]

**त्रिक** न. १. पहा : **त्रय**. २. (अंकगणित) एकापेक्षा अधिक अशा कोणत्याही संख्येला तीन या आकड्याने गुणताना योजण्याची संज्ञा. ३. पाठीच्या कण्याचा खालचा भाग; माकडहाड. ४. तीन रस्ते, तीन नद्या एकत्र मिळतात असे ठिकाण. [सं.त्रि]

**त्रिक** न. (विणकाम) रहाटाच्या तीन फेऱ्या होतील इतके सूत.

**त्रिकटु** पु.न. सुंठ, मिरे व पिंपळी या तीन औषधींचा समुदाय. [सं.]

**त्रिकप्रसव, त्रिप्रसव** वि. एकामागून एक असे तीन मुलगे होऊन नंतर जन्मलेले (अपत्य). हे अशुभ मानतात. [सं.]

**त्रिकरण** न. कर्मेंद्रिये, ज्ञानेंद्रिये व अंत:करण अशा तीन प्रकारच्या इंद्रियांचा, करणांचा समुदाय. [सं.]

**त्रिकर्ण** वि. दोन कान असूनही एका कानाला एक देठ फुटलेला असतो असा (घोडा); घोड्याचा हा दोष अशुभ मानिला आहे.- मसाप २.१.५७. [सं.]

**त्रिकर्म-र्मे** न. अव.१.ब्राह्मणांच्या षट्कर्मांपैकी क्षत्रियादिकांना विहित असलेली अध्ययन, दान व याजन ही तीन कर्मे. २.नित्य, नैमित्तिक व काम्य अशी तीन प्रकारची कर्मे. [सं.]

**त्रिकर्मी** वि. ब्राह्मणांच्या षट्कर्मांपैकी अध्ययन, दान, याजन ही तीनच कर्मे करण्याचा अधिकार असलेला (क्षत्रिय, वैश्य इ.).

**त्रिकस्थान** न. (फ.ज्यो.) कुंडलीतील ३,६,८,१२ ही स्थाने. [सं.]

**त्रिकाल-ळ** पु. अव. १. भूत, वर्तमान व भविष्य हे तीन काळ. २. सकाळ, दुपार व संध्याकाळ ह्या दिवसातील तीन वेळा. [सं.]

**त्रिकालज्ञान** न. भूत, वर्तमान व भविष्य या तीन काळांचे (यौगिक बलाने होणारे) ज्ञान. [सं.]

**त्रिकालाबाधित** वि. अखंड; नित्य.

**त्रिकाली-ळी** क्रिवि. उशिरा; मध्यान्ह होऊन गेल्यावर बऱ्याच वेळाने; विशेषत: जेवणाच्या वेळी हा शब्द वापरतात.

**त्रिकांड** वि. १. तीन पेरे असलेला (ऊस, बांबू इ.). २. तीन भाग, प्रकरण असलेला (ग्रंथ, कोश). ३. कर्म, उपासना व ज्ञान ही कांडे, प्रकरणे असलेला (वेद) : 'तुझा अनुहताचा डमरू। ...त्रिकांडी थोरू गर्जत।'- एभा १९.२. [सं.]

**त्रिकांड्या बभरू** (ल.) पराक्रमी योद्धा. भीमाच्या या नातवाजवळ युद्धसामग्री म्हणजे फक्त तीन बाण असत. त्यावरून हा अर्थ.

**त्रिकुटशिखर** न. योगाभ्यासमार्गातील एक चक्र : 'त्रिकुट शिखरी येऊनि जाणें।'- अंबाबाई रामदासी. [सं.]

**त्रिकुटी** स्त्री. १. त्रिकूट : 'हे गुणेंद्रिय धोकटी। देह धातूंची त्रिकुटी।'– ज्ञा १३.१०६८. २. चोरी, चहाडी व शिनळकी या तीन अवगुणांचा समुदाय : 'त्रिदोषीं सांडिले शरीर। त्रिकुटीं फिटलिया नगर।'– ज्ञा १६.४३९.

**त्रिकूट** न. १. पहा : **त्रय**. २. तीन शिखरे असलेला पर्वत. ३. इडा, पिंगला, सुषुम्ना या तीन नाड्यांचा समुदाय. ४. पहा : **त्रिकुटी** २. ५. पहा: **त्रिकटु** [सं.]

**त्रिकूट** वि. ज्याच्या ललाटावर ओळीने तीन भोवरे आहेत असा (घोडा). हा उत्तम समजला जातो.– अश्वप १.२५.

**त्रिकोण** पु.न. १. तीन सरळ रेषांनी मर्यादित अशी एक समतल आकृती; तीन बाजू असलेली सरळ रेषाकृती.– महमा ७. २. (सामा.) तीन कोन असलेली वस्तू. [सं.]

पु. (फ. ज्यो.) कुंडलीतील प्रथम, पंचम व नवम स्थान. ग्रहाच्या स्थानापासून पाचवे व नववे स्थान.

**त्रिकोणमिती** स्त्री. (गणित) गणितशास्त्रातील एक विभाग. त्रिकोणाच्या दिलेल्या विवक्षित अवयवांवरून राहिलेल्या अवयवांचा निर्णय करणे हे या विभागाचे कार्य आहे. याचा उपयोग मुख्यत: ज्योतिषशास्त्र, मोजणीशास्त्र व नौकाशास्त्र यांत होतो. [सं.]

**त्रिकोणासन** न. कूर्मासन घालून बसल्यानंतर पाय पसरत पसरत ढुंगणापासून सुमारे एक हात लांब अंतर पडेल असे दोन्ही पायांचे पंजे दूर करावे म्हणजे हे आसन होते. या आसनानें कमरेचे बंद मजबूत होतात.– संयोग ३३१. [सं.]

**त्रिकोणीकरण** न. क्षेत्रफळ काढताना बहुभुजाकृतीचे त्रिकोणात विभाजन करण्याची क्रिया.

**त्रिकोणी काच, भिंग** (पदार्थ.) घनत्रिकोणाकार भिंग; याचा प्रकाशाचे पृथक्करण करण्याकडे उपयोग करतात, लोलक.

**त्रिखंड** न. स्वर्ग, मृत्यू व पाताळ या तीन लोकांचा समुदाय.

वि. तीन तुकडे पाडलेला : 'कृष्णें बाण सोडिला पाहीं।...सर्वेचि पाडिला भोई। तीं ठायीं त्रिखंड।'– एरुस्व १२.११५. [सं.]

**त्रिगण** पु. १. मनुष्याने आयुष्यात साधावयाचे धर्म, अर्थ व काम हे तीन पुरुषार्थ. २. मनुष्यांचे देव, मनुष्य व राक्षस हे तीन प्रकार, वर्ग. [सं.]

**त्रिगत** पु. (नाट्य.) विदूषक, सूत्रधार व पारिपार्श्वक यांच्या संवादाचा नाटकातील भाग. – भरतमुनिप्रणीत नाट्यशास्त्र, भानुकृत भाषांतर अध्याय ५. पृ. २३. [सं.]

**त्रिगतिक** वि. स्थलचर, जलचर व व्योमचर अशा तीन प्रकारचे (प्राणी).– मुलांचा व्यवहारकोश. [सं.]

**त्रिगुण** पु.न. १. (वस्तू, प्राणी इ.च्या ठिकाणी असलेले) सत्त्व, रज व तम हे तीन गुण. २. माधुर्य, ओज, प्रसाद हे वाङ्मयातील तीन गुण. वि. तिप्पट. [सं.]

**त्रिजात** न. दालचिनी, तमालपत्र, वेलदोडे हे मसाल्याचे तीन पदार्थ.

**त्रिज्या, त्रिभज्या** स्त्री. (भूमिति.) वर्तुळाच्या मध्यापासून परिघातील कोणत्याही बिंदूपर्यंत काढलेली सरळ रेषा. [सं.]

**त्रितात्त्विक** वि. (रसायन.) ज्याच्या घटनेत तीन जातींची तत्त्वे आहेत असा (पदार्थ). [सं.]

**त्रिताल, त्रिपुट** पु. (वाद्य.) एक ताल, ठेका. यात सोळा मात्रा व चार विभाग आहेत. [सं.]

**त्रिदल–ळ** वि. १. तीन दले, पाने असलेले; तिपानी. २. देठावर तीन पाने असलेले (बिल्वपत्र इ.). [सं.]

**त्रिदश** पु. देव, सुर : 'मोहिलींसहवधू त्रिदशांची। आमची न नवलें सुदृशांची।'– वामन वेणुसुधा १.५. [सं.]

**त्रिदंडी** पु. १.ज्याचा त्याग करून पुन्हा गृहस्थाश्रम स्वीकारता येतो असा संन्यास घेतलेला संन्यासी. २. (ल.) काया, वाचा व मन या तिघांवर ज्याने ताबा मिळवलेला आहे असा तपस्वी पुरुष. ३. तीन दंड धारण करणारा. ४. (ल.) पोकळ आव; ढोंग; सोंग. [सं.]

**त्रिदोष** पु. अव. १. कफ, वात आणि पित्त हे शरीरात असणारे तीन दोष, धातू. २. यांचा एकाच वेळी झालेला क्षोभ; सन्निपात. ३. हिंसा. [सं.]

**त्रिधा** वि. तीन प्रकारचा : 'एवं कर्म कर्ता ज्ञान। या तिहींचे त्रिधा चिन्ह।'– ज्ञा १८.६८९.

क्रिवि. तीन प्रकारांनी, मार्गांनी. [सं.]

**त्रिधातुक** न. कफ, वात व पित्त या तीन धातूंनी बनलेले शरीर : 'ऐसा जो भक्तु होये। तयाचे त्रिधातुक हें जैं जाये।'– ज्ञा ११.६९९.

**त्रिप** स्त्री. एक प्रकारची चाल; दुडकी चाल.– प्रामको.

**त्रिपताकहस्त** पु. (नृत्य.) हाताची सर्व बोटे सरळ पसरून किंचित आखडून व करंगळीजवळचे बोट वाकवून करतात तो अभिनय. [सं.]

**त्रिपताका** स्त्री. पाच बोटांचे तीन भाग (दोन दोन बोटांचे दोन, अंगुष्ठाचा एक असे) करून निशाणाचे तीन फरारे करणे. [सं.]

**त्रिपद** न. तीन पदांचा, शब्दांचा समूह; तत्, त्वम्, असि या तीन पदांचा समूह : 'जंववरी त्रिपद शोध न घडे।'– परमा २.१३.

वि. १. तीन पाय असलेला. २. तीन चरण असलेला (श्लोक, कविता). ३. (अंकगणित) उणे, अधिक चिन्हांनी संयुक्त अशी तीन पदांनी युक्त (संख्या इ.). [सं.]

**त्रिपदा** स्त्री. तीन पदांचा गायत्री छंद : 'त्रिपदा, त्रिकाळीं अर्घ्य देतां। त्रैविद्या तत्त्वतां त्या नांव।'– एभा ११.१३३७. [सं.]

**त्रिपर्ण** पु. पळसाचे झाड. याला एका देठावर तीन पाने असतात.

वि. तीन पाने, दळे असलेला. [सं.]

**त्रिपाद** पु. वि. एका राशीत ज्याच्या तीन चतुर्थांश अंशाचा समावेश झाला आहे असे कृत्तिका, पुनर्वसु इ. नक्षत्र. [सं.] (वा.)

० **लागणे**– त्रिपाद नक्षत्र लागले असता मरण येणे.

**त्रिपुटी** स्त्री. १. (वेदान्त.) एक जर नसेल तर बाकीच्या दोहोंची सिद्धी होणार नाही अशा तऱ्हेने एकमेकांशी संबद्ध असलेल्या तीन गोष्टींचा समुच्चय; कर्ता, कर्म, क्रिया अशा संबंधाने परस्परांशी संबद्ध असलेल्या तिघांचा समुदाय. उदा . जीव, जगत्, जगदीश्वर; ज्ञेय, ज्ञाता व ज्ञान : 'भ्रमाची त्रिपुटी वाढवी सदा।'– एभा २.४५९. २. कर्मसृष्टी.

३. विकारसृष्टी. ४. दिव्यसृष्टी. [सं.त्रिपुट]

**त्रिपुर** पु. १. कार्तिकी पौर्णिमेला देवापुढे दीपमाळेवर किंवा इतरत्र कापूर वगैरेचा लावतात तो मोठा दिवा. २. शिवरात्रीला स्त्रिया शंकरापुढे लावतात त्या वाती, दिवे. ३. देवळासमोर उभारलेला दीपस्तंभ.[सं.]

**त्रिपुरारी, त्रिपुरी पौर्णिमा** स्त्री. कार्तिकी पौर्णिमा. या दिवशी देवळात त्रिपुर लावून दीपोत्सव करतात. [सं.]

**त्रिपुरुष** पु. अव. बाप, आजा, पणजा अशा तीन पूर्वजांपैकी एक. [सं.]

**त्रिपुंड्र** पु. न. शैव आपल्या कपाळावर भस्माचे आडवे तीन पट्टे ओढून करतात ते चिन्ह; रामानुजपंथी वैष्णव आपल्या कपाळावर गोपीचंदनाचे तीन उभे पट्टे लावून करतात तो तिलक, चिन्ह.
वि. वरीलप्रमाणे कोणत्याही प्रकारचे त्रिपुंड्र धारण करणारा. [सं.]

**त्रिबुधी** स्त्री. दुर्बुद्धी. – प्रामको.

**त्रिफळा** स्त्री. पु. हिरडा, बेहडा व आवळकाठी यांचे समभाग चूर्ण. [सं.त्रिफला]

**त्रिफाट** स्त्री. पांगापांग; भागणी; विस्कळीतपणा :'परंतु जमावाची त्रिफाट जाहाली यास्तवच विचारांतर प्राप्त जाहाले आहे.'– पेद ३३.२१. [सं.त्रि+म.फाटणे]

**त्रिभंग** पु. (शरीर इ.) तीन ठिकाणी वाकणे, वाकवणे : 'या हेतु रासरंगिं। ठाण मांडुनि त्रिभंगिं।'– रास १.२७. [सं.]

**त्रिभाग** पु. चुना, वाळू व ताग हे तिन्ही मिसळून केलेला लगदा; रद्दा; चिखल : 'त्रिभागामधें खडा असे। त्रिभागासारिखाचि भासे।'– दास ८.५.४६. [सं.]

**त्रिभांतर** पु. ग्रहांचा सूर्यांतरकोन सूर्याच्या पूर्वेला किंवा पश्चिमेला ९० अंशाचा झाला म्हणजे त्याला त्या दिशेचें त्रिभांतर म्हणतात.– सूर्य २४. [सं.]

**त्रिभुवन** न. स्वर्ग, मृत्यू व पाताळ हे तीन लोक. [सं.]

**त्रिभुवनकीर्तिरस** पु. एक आयुर्वेदीय मात्रा. हिंगूळ, बचनाग, सुंठ, मिरी, पिंपळी, टाकणखार व पिंपळमूळ ही समभाग घेऊन, एकत्र खलून झालेल्या मिश्रणाला तुळशीच्या, आल्याच्या व धोत्र्याच्या रसाच्या तीन भावना द्याव्या म्हणजे हा रस तयार होतो. हा ज्वर व सन्निपात यांचा नाश करितो.– योर १.३७४. [सं.]

**त्रिभेदी** वि. परमेश्वराच्या अवताराची त्रिविध मायेची मूर्ती : 'मूर्ति त्रिभेदी'. – गरा २७१.

**त्रिमात्रका, त्रिमात्रा** स्त्री. अव. ॐकाराच्या अकार, उकार व मकार या तीन मात्रा : 'कां जे एकाक्षरपणेसीं। त्रिमात्रके चिये कुशी।'– ज्ञा १८.१५१०. [सं.]

**त्रिमाळिक** वि. तीन माळे असलेले; तिमजली (घर, इमारत इ.) :'तरी त्रिमाळिकें धवळारें। करावीं कां।'– ज्ञा ५.११४.[सं.त्रि+म.माळा]

**त्रिमूर्ती** पु. १. ब्रह्मा, विष्णु व शंकर हे तिघे मिळून झालेली मूर्ती, रूप; दत्त. २.(ख्रि.) ईश्वर, पुत्र व स्पिरिट या तिघांची बनलेली मूर्ती; (इं.) ट्रिनिटी. [सं.]

**त्रिमोडी** रणवाद्याचा एक प्रकार.

**त्रियंच** स्त्री. घारी; एक प्रकारची पुरी : 'त्रियंच नाम घारी बरवंट। ब्रह्मपुरीसीं।'– ऋ ८२.

**त्रिरात्रांतला** वि. जो मेला असता त्रिरात्र अशौच पाळावे लागते असा (सगोत्रज).

**त्रिलोक** पु. त्रिभुवन. [सं.](वा.) **त्रिलोकात झेंडा लावणे, निवटणे** – तिन्ही लोकांत नाव गाजविणे, गाजणे. [सं.]

**त्रिवट** पु. (संगीत) त्रिताल. [सं.]

**त्रिवडी–डा** स्त्री. १. तीन पदरी वस्त्र : 'मांजिठी, त्रिवडी ओळगाविली.'– लीचपू ७७. २. तीन वस्त्रांचा समूह : 'कुन्हे मातांराचि त्रिवडी.'– निलिप्र ४.

**त्रिवर्ग** पु. १. मनुष्यमात्राने आपल्या आयुष्यात साधावयाच्या चार पुरुषार्थांपैकी धर्म, अर्थ व काम हे तीन पुरुषार्थ. २. उत्कर्ष, साम्यावस्था व ऱ्हास या राष्ट्राच्या तीन अवस्था. ३. प्रकृतीचे, स्वभावाचे सत्त्व, रज, तम हे तीन गुण. ४. त्रिफळा. ५. त्रिकूट. [सं.]

**त्रिवार** क्रिवि. तीन वेळा; तीनदा. हा शब्द निश्चय, संकल्प, वचन, दंड, धर्म, शिक्षा, बोध, उच्चारण इ. शब्दांसह समासात खचित, निश्चित, ठाम, नेटाचा, जोराचा इ. अर्थाने योजतात. [सं.त्रि+म.वार]

**त्रिविक्रम** पु. १. (बायकी) गोपा. बारशाच्या दिवशी मुलाचे नाव ठेवताना बायका पाळण्याच्या खालून वर, वरून खाली देतात तो कुंची घातलेला वरवंटा, नारळ. २. विष्णूचे नाव. [सं.]

**त्रिवेणी** स्त्री. १. प्रयाग येथील गंगा, यमुना व गुप्त सरस्वती या तीन नद्यांचा संगम होऊन झालेला प्रवाह. २. तीन पेडांची गुंफलेली वेणी, केशरचना. ३. (संगीत) गायनशास्त्रातील एक राग. गानसमय सायंकाळ. [सं.]

**त्रिशंकू** पु. १. (त्रिशंकू राजा हा पृथ्वी व स्वर्ग या दोहोंमध्ये अधांतरी लोंबत राहिला होता, असे पुराणात वर्णन आहे. त्यावरून) धड इकडेही नाही आणि धड तिकडेही नाही अशी ज्याची अवस्था झाली आहे असा मनुष्य. २. दक्षिणेकडील एक तारकापुंज.
वि. तीन खिळे मारलेला (उंबरठा) : 'काय बहु बोलों सुभटां।...नरकाचा दारवंटा । त्रिशंकु हा।'– ज्ञा १६.४३०. [सं.]

**त्रिशिंगी–संधी, तिरशिं(सं)गी** स्त्री. एक फुलझाड. याची फुले सकाळ, दुपार, संध्याकाळ अशा तिन्ही वेळी उमलतात व ती पांढरी, निळसर व पंचरंगी असतात. [सं.त्रिसंधि]

**त्रिशुद्धी** स्त्री. १. (एखादे कागदपत्र) तीन वेळा तपासून शुद्ध केले आहे हे दर्शवण्याकरता त्या अर्थाची त्यावर मारलेली टीप. २. तीन वेळा प्रतिज्ञापूर्वक सांगितलेली (एखाद्या गोष्टीची) शुद्धता, सत्यता, निश्चितता. ३. तीन वेळा स्नान करून, धुवून, घासून, तापवून (कोणताही एखादा पदार्थ शुद्ध करण्याचा प्रकार करून) झालेली (व्यक्ती, वस्तू इ.ची) शुद्धता. ४. तीन वेळा, तीन ठिकाणी स्नान

घालून झालेली विटाळशीची शुद्धी. ५. कायिक, वाचिक व मानसिक शुद्धी.

वि. तीन वेळा तपासून, शुद्ध करून बरोबर, खरे ठरवलेले.

क्रिवि. खरोखर; त्रिवार खरे : 'तरी मी प्राण त्याजीन व्यार्धीं हे त्रिशुद्धी जाणपां ।' – मुवन १.११७. [सं.]

**त्रिशूल–ळ** पु.न. १. तीन फाळ असलेले शंकराचे एक आयुध. २. (सोनारी धंदा) शंकराच्या त्रिशूळाच्या आकाराचे लोखंडी तारेचे सोनाराचे एक हत्यार. याच्या तीन टोकांत वज्रटीकेचे तीन मणी अडकवून डाक देता येतो व टीक करता येते. [सं.]

**त्रिसगडा** पु. तीन वस्तूंचा समूह.

**त्रिसड** स्त्री. चौकशी; शोध.

**त्रिसळ** स्त्री. तिसळ; एक बोराएवढे हिरवे फळ; याचा जिभेस चुरचुर लागतो. [सं.त्रि+शकल]

**त्रिसंधान** न. दोन दोन दर्भांच्या दोन जुळ्या घेऊन त्यांची दोरी वळून अशाच पुन्हा दोन जुळ्या दोन वेळ घेऊन त्यांची तीन ठिकाणी सांधून वळलेली यज्ञयागातील समिधांचे जुडगे बांधण्याची दोरी : 'इध्मा बर्हि त्रिसंधान। करोनिया परिस्तरण।'– भाराबाल २.७०. [सं.]

**त्रिसंध्या** स्त्री. १. दिवसाचे तीन संधिकाळ; प्रभात, मध्यान्ह व सायंकाळ. २. दिवसाच्या तीन संधिकाळी केलेली संध्या.

**त्रिसंध्यायात्रा** स्त्री. गयेला गायत्रीतीर्थावर पहाटे, सावित्रीतीर्थावर मध्यान्ही व सरस्वतीतीर्थावर सायंकाळी स्नान, संध्या व जप करणे, या विधीस त्रिसंध्यायात्रा म्हणतात.– तीप्र १३७. [सं.]

**त्रिसी** क्रिवि. ताठपणे; धडधाकटपणे : 'पांगुळेआतें चरण येंती । ... सांपडजें जैसीं त्रिसीं उडती।'– खिपु १.३५.४६. [सं.त्रिक्]

**त्रिसुपर्ण** न. भोजनाला सुरुवात करण्यापूर्वी म्हणतात ते नारायणीय उपनिषदातील मंत्र. [सं.]

**त्रिक्षार** पु. (वैद्यक.) सज्जीक्षार, जवखार व टाकणखार हे तीन क्षार.– योर १.१७५. [सं.]

**त्रीक** पहा : **तिरी**

**त्रुटि–टी** स्त्री. १. अठरा निमेषांचा काळ : 'गरुडा, नेईं न लागतां त्रुटी।'– मुआदि ५.६१. २. चुटकी : 'त्रुटी न वाजतां अर्जुन। जात सुरेशप्रस्थमार्ग लक्षून।'– ह ३२.२२५. ३. खंड; प्रतिबंध; अडथळा. ४. नाश. ५. शंका. ६. लव; अणु; लेश. [सं.]

**त्रुटित** वि. तुटलेला; निराळा, वेगळा झालेला; तोडलेला; अपूर्ण. [सं.]

**त्रेचा(ता)ळीस** वि. ४३ ही संख्या. [सं.त्रिचत्वारिंशत्]

**त्रेताग्नि** पु. हिंदूंचे तीन पवित्र अग्नी. [सं.]

**त्रेतायुग** स्त्री. न. चार युगांतील दुसरे युग. याचा अवधी बारा लक्ष शहाण्णव हजार वर्षांचा असतो. [सं.]

**त्रेधा** स्त्री. (शक्तीपेक्षा बरेच मोठे काम अंगावर पडल्यामुळे, बरीच कामे उपस्थित झाल्यामुळे एखाद्याची होणारी) धांदल, धावपळ, गोंधळ, गडबड, तारंबळ, ओढाताण; (श्रमाने आलेला) शीण, भागवटा, ताण; (भीती इ.नी उडालेली) धांदल, तिरपीट, गाळण, घाबरगुंडी. क्रिवि. तीन मार्गांनी, प्रकारांनी, पद्धतींनी. [सं.]

**त्रेपन्न** वि. ५३ही संख्या.

**त्रेपन्न टिकलीचा–मंगळीचा, त्रेपन्नी** वि. (अशिष्ट) जाराला, जारपुत्राला उद्देशून द्यावयाची एक शिवी; मात्रागमनी; रंडापुत्र.

**त्रेवटी डाळ** चणे, तुरी, उडीद इ. डाळींचे एकत्र मिश्रण . [सं.त्रि+वृत-पुट]

**त्रेसष्ट–ट** वि.६३ ही संख्या. [सं.त्रिषष्टि]

**त्रेसष्टी** स्त्री. फाशांच्या खेळात पडणारा एक डाव. छ तीन नऊ.

**त्रैराशिक** न. (अंकगणित) आद्यंक, मध्यांक व अंत्यांक किंवा प्रमाण, फल व इच्छा अशी प्रमाणांची तीन पदे दिली असता चौथे फल म्हणजे इच्छाफल काढण्याची रीत. [सं.]

**त्रैलोक्यचिंतामणी** पु. १. (वैद्यक.) एक रसायन, मात्रा. २. साधारणत: सर्व रोगांवर उपयोगी पडणारे औषध. [सं.]

**त्रैविद्या** स्त्री. (वेदान्त.) १. भगवद्गीता, उपनिषदे व ब्रह्मसूत्रे हे तीन ग्रंथ. २. तीन वेद; त्यांचे अध्ययन. [सं.]

**त्रोटक** न. उपनाटक; एक रूपकप्रकार.

**त्रोटक** वि. संक्षिप्त; थोडक्यात सांगितलेला; सारांशरूप. [सं.]

**त्रोटणे** उक्रि. तोडणे; विभागणे; वेगळे करणे; तुकडे करणे. [सं.]

**त्रोहिहेऽ** ना. उद्गा. म्हशीला हाकण्यासाठी म्हणावयाचा शब्द. [ध्व.]

**त्र्यणुक** न. तीन द्व्यणुक मिळून होणारे परिमाण. [सं.]

**त्र्यस(जाति)** पु. (संगीत, वाद्य) ज्यात पहिला विभाग तीन मात्रांचा असावा लागतो असा दक्षिणेकडील तालाचा एक प्रकार.

**त्र्याऐं(य–यं)शी** वि. ८३ही संख्या. [सं.त्र्यशीति]

**त्र्याण्णव** वि. ९३ ही संख्या. [सं.त्रिनवति]

**त्र्याहात्तर** वि. ७३ ही संख्या. [सं. त्रि:सप्तति]

**त्र्याहिक** पु. तीन तीन दिवसांनी, चौथ्या दिवशी येणारा ताप. [सं.]

**त्व** भाववाचक नामे साधण्यासाठी संस्कृत नामे व विशेषणे यांना लावण्याचा प्रत्यय. हा लागून झालेली भाववाचक नामे नपुंसकलिंगी असतात. उदा. मित्रत्व, लघुत्व इ.

**त्वक्पक्ष** वि. किड्यांतील एक वर्ग. या वर्गातील किड्यास त्वचेचे बनलेले चार पक्ष असतात; ते पातळ असून त्यावर शिरा असतात; मध वगैरे द्रव शोषण करण्याजोगें तोंड असतें व दाढा चावण्याजोग्या असतात.– प्राणिमो ११५. [सं.]

**त्वक्पापुद्रा** पु. शेंवड्याच्या त्वक्पेशीतून स्रवणाऱ्या पदार्थांचे शरीराभोवती तयार होणारे एक अखंड पटल. – ज्ञाको क १९०.

**त्वक्शून्यवात** पु. स्पर्शज्ञान नाहीसे करणारा वातविकार. [सं.]

**त्वचा** स्त्री. १. (शरीरावरील) चामडी, कातडी. पंचज्ञानेंद्रियांपैकी स्पर्शज्ञान करून देणारे इंद्रिय. २. (झाडाची) साल. ३. फळाचे साल; टरफल. ४. सर्पाची कात; मेंग : 'त्वचा पायें शिरीं। हालेयाही फडे न करी।' – ज्ञा १६.१२६. [सं.]

**त्वचारोगशास्त्र** न. त्वचा या शरीरातील सर्वात मोठ्या अवयवाला होणाऱ्या विकृतींचे निदान व त्यावर उपचार करणारी वैद्यक शास्त्राची शाखा.

**त्वत्** सना. तू.

**त्वरक** पु. गाडीचा वेग वाढवण्याचे साधन.

**त्वरण** न. वेगबदलाचा दर.

**त्वरा** स्त्री. १. चपळाई; घाई; वेग; शीघ्रता. २. (स्वभाव इ.चा) तरतरीतपणा; हुशारी; तल्लखपणा. [सं.](वा.) **त्वरेवर येणे** – एखादे काम लवकर, झटपट करणे.

**त्वरित** क्रिवि. त्वरेने; जलदीने; घाईने; झटपट; लवकर. [सं.]

**त्वष्ट** पु.न. (एखादे काम करण्याबद्दल दुसऱ्याला केलेला) त्रासदायक तगादा, घाई; उपद्रवकारक आग्रह; त्रास; उपद्रव; लचांड. (क्रि. लावणे, करणे, देणे, लागणे, होणे).
वि. तासलेला; रंधलेला; तोडलेला. [सं.]

**त्वष्टा** पु. १.विश्वकर्मा. २. ब्रह्मदेव. ३. सुतार. [सं.]

**त्वंपुरा** पु. (ल.) शंखध्वनी; बोंब; आरडाओरडा. 'त्वंपुरा सागरोत्पन्न.' इ. शंखाच्या स्तुतिपर श्लोकाच्या आरंभीच्या शब्दावरून.

**त्वा** सना. तू या सर्वनामाचे तृतीयेचे रूप.

**त्वेष** पु. आवेश; रागाची इसळी; संताप; अवसान; स्फुरण. [सं.]

**त्सुनामी** स्त्री. समुद्रात उसळणारी व दूरवर पसरत जाणारी महाकाय लाट. समुद्राच्या तळाशी होणाऱ्या भूकंपानंतर या लाटा निर्माण होतात. यांची लांबी २०० किमीपर्यंत तर उंची १५० मीटरपर्यंत असू शकते. ताशी १०० किमी इतक्या वेगाने त्या पसरतात. [ज. त्सु=किनारा + नामी=लाट]

**त्से त्से माशी** दक्षिण आफ्रिकेत कांगोच्या खोऱ्यात आढळणारी एक अतिविषारी माशी. (ही चावली असता प्राणी मरतात.)





थ मराठी वर्णमालेतील बत्तिसावा वर्ण व सतरावे व्यंजन.

**थई** क्रि. येणे – नागाको.

**थकणे** अक्रि. १. दमणे; शिणणे; चालवेनासे होणे; भागणे. २. शक्ती क्षीण होणे; (रोग, म्हातारपण इ.मुळे) बेजार होणे. ३. मती गुंग होणे; बुद्धी न चालणे. ४. दिवाळे निघणे; पैसा नसल्यामुळे व्यापार थांबणे. ५. कर्जाऊ दिलेली रक्कम बुडणे. [सं. स्थग्]

**थकबाकी** स्त्री. एकूण येण्यापैकी शिल्लक राहिलेली रक्कम.

**थकले कूळ** दिवाळे निघाल्यामुळे किंवा अतिशय गरिबीमुळे कर्ज फेडण्यास असमर्थ असलेली व्यक्ती.

**थकले मांदले** वि. थकले भागलेले; शिणलेले.

**थकवा** पु. १. अतिश्रमाने इंद्रियांना येणारी ग्लानी, शिथिलता; गळणे; दमणूक. २. कुठल्याही पेशीला सतत उत्तेजित करत गेल्यास ती पेशी थकते व काम करू शकत नाही (कारण सततच्या उत्तेजनामुळे पेशीत रासायनिक बदल होतात) ती अवस्था. (ही गंभीर आजाराची निदर्शक असू शकते.) (इं.) फटिंग. [हिं.थकान;त.शवक्कम्]

**थकित** वि. मुदतीत वसूल न झालेले, न फेडलेले (कर्ज). [सं.स्थग्]

**थकी(क्कि,क्की)त, थक्क** वि. १. चकित; आश्चर्ययुक्त: 'थकित होऊनि जन हे पाहती हर्षे परमार्थ ।' – मुक्तेश्वरकृत कटिबंध पृ.४. २. गोंधळलेला; बावरलेला; गुंग झालेला; गडबडलेला. ३. अद्भुत; आकस्मिक. [सं.स्थगित]

**थट** पु. स्त्री. १. समुदाय; जमाव; गर्दी; चेप; रगडा. (क्रि. लागणे). २. दाट रचना, मांडणी. (क्रि. जमणे, बसणे.). [क.थट्टु]

**थटकारणे** उक्रि. १. रचना करणे; व्यवस्थेने लावणे, ठेवणे (विशेषत: देखाव्यासाठी); (पोशाख इ.) घालणे. २. उत्तम रीतीने, थाटाने, सफाईने संपवणे, करणे.

अक्रि. स्वत:चा दिमाख मिरवणे; डौल दाखवणे; ऐट, थाटमाट करणे.

**थटकावून** क्रिवि. एकदम; धाडदिशी; जोराने; आवेशाने: 'हे ऐकून दौला निजले होते ते थटकावून उठोन बसले.'–मइसा ७.११५. [ध्व.]

**थटणे** अक्रि. दिमाखाने चालणे, बोलणे, वागणे; सजणे; नटणे.[सं.तट्]

**थटणे** अक्रि. १. दोन वस्तू एकमेकींना घासल्या जाणे, टेकणे, आपटणे : 'वंचाच्या हातातल्या बाटल्या एकमेकींना थटून आवाज करीत होत्या.'– व्यंमाक. २. अडकणे; खोळंबणे : 'ए मास्तर, एक बैल बगून दे की मला. पेरनी थटली गा !' – बनगर.

**थटथट** क्रिवि. अडखळत: 'कळा हे दावी कीं थटथट वदे क्रोधविकला.'– भामा २२.

**थट्टा, थट्टामस्करी, थट्टेबाजी** स्त्री. दुसऱ्याला चीड येण्याजोगी चेष्टा, विनोद; वाकुल्या; उपहास; टवाळी. (क्रि.करणे) [हिं.ठट्ठा](वा.) **थट्टेवारी नेणे** – गंभीर विषयाला विनोदाचे रूप देणे, तुच्छ मानणे; विचारात न घेणे; हसण्यावारी नेणे; निर्लज्जपणे हसणे.

**थट्टी,थट्या** स्त्री. १. (संस्थान, राजा इ.ची) गाई, म्हशी इ. जनावरे; खिल्लार; जनावरांचे खाते (अठरा कारखान्यांपैकी एक). २. गुरे बांधण्याची जागा; गोशाळा.

**थट्टेखोर-बाज, थट्टेवाईक** वि. उपहास, टवाळी करणारा; थट्टा उडवण्याची खोड, स्वभाव असणारा.

**थड** स्त्री. १. किनारा; तीर; काठ; कड; तड. २. (ल.) सिद्धी; सांगता; समाप्ती; शेवट (काम, धंदा इ.चा). ३. नदीच्या बाजूचे खोरे; दरी. उदा. भीमथड. [सं.तट](वा.) ० **लावणे** – फसवणे; झुलवणे. **ही थड ना ती थड** – निराश्रितपणाची स्थिती; इकडे आधार नाही व तिकडे आधार नाही अशी स्थिती.

**थड** न. स्मशानभूमी : 'तसेच थड्यात – स्मशानभूमीत येताळबाच्या देवस्थानाला येणारे 'निवद' – तराळ-अंतराळ.

**थडक** स्त्री. रट्टा; धक्का; थाप; धडक; ठोकर; आघात: 'चक्रदेव धरिला केशीं । थडक हाणोन उराशी ।' – एरुस्व ९.३९. [सं.तड्]

**थडकणे** अक्रि. १.एखाद्या वस्तूवर आदळणे; एकदम थांबणे. २. आदळणे, आपटणे (पाणी, वारा). [सं.थर्व]

**थडकणे** अक्रि. १. थांबणे; प्रवासाच्या शेवटाला येणे; वेग कुंठित होणे. २. पोहोचणे; योग्य पेढीवाल्याला हुंडी पोच होणे. [सं.स्तंभित]

**थडकन-कर-दिनी-दिशी** क्रिवि. १. धडक, रट्टा इ. आवाज होऊन. २. झटक्याने; थरकाप होऊन. [ध्व.]

**थडगे** न. प्रेत जाळलेल्या अगर पुरलेल्या जागी केलेले बांधकाम. [सं.स्तब्ध]

**थडणे** अक्रि. तटणे; थांबणे; अडकून राहणे: 'राणांत थडावे ऐसे नाहीं.'– पेद २७.५५. [सं.स्था]

**थड(डा)थड-डा, थडाडून, थडाडा** क्रिवि. १. घाईने, भराभर मारलेल्या ठोशांचा आवाज होऊन. २. कापत; हलत. (क्रि. कापणे, हलणे, भिणे, जीव-अंग- ऊर-हृदय इ. उडणे.). ३. भरभर; लवकर.(व.) [ध्व.थड् द्वि.]

**थडथड** स्त्री. कापरे; थरथरी; हुडहुडी. [ध्व.]

**थडथड-डी,थडथडणे, थडथडाट, थडाडणे** पहा : **थरथर**

**थडथाद** क्रिवि. अलिप्तपणाने; न बदलता. [सं.ताटस्थ्यात्]

**थडवा** पु. १. लहान तळे: 'भवसिंधुचा थडवा केला। बोलविला पाहिजे।'–तुगा ३६६८.२.नदीचा काठ; काठावरील जमीन. (व., ना.)

**थडा** पु. दुकानदाराची बसण्याची जागा, गादी. [हिं.]

**थडा** पु. घाट.

**थडाड** पु. १.जोराने व रागाने लाथाडण्याची, मारण्याची क्रिया; मोठ्या आवाजाचे एकामागून एक दिलेले ठोसे, लाथा. २. पराकाष्ठेची धडपड; कापरे. [ध्व.थडथड]

**थडाथडी** स्त्री. १. एकामागून एक मारलेल्या लाथा, बुक्क्या, छड्या, ठोसे इ. २. मोठे कापरे; थरथरी. [ध्व. थड!थड!]

**थडाव** पु. आसरा; निवांत जागा: 'स्वर ऐकुनया कोकिळा घेती वनीं थडाव।' – पला १७.४२.

**थडियावणे** सक्रि. थापटणे: 'जेणे श्रीकृष्णें...तो काळ चि थडियाविला पाठीं । तेणेंचि मिशें। - नरुस्व ३०८.

**थडिवा** पु. काठ; आसमंतातील प्रदेश: 'तयाचें पडलें रण थडिवा प्रभासचिये।'- भाए ६८.

**थडी** स्त्री. गोणांची उंच लावलेली रांग; थप्पी. [क.थड्डु] (वा). ० **मारणे** - भिंत घालणे.

**थडी** स्त्री. चौथरा.

**थडीचा** वि. उत्तम जातीचा, पैदाशीचा (शिंगे असणारा पशू).

**थडे** न. १. धड; कलेवर; प्रेत: 'आत्म्याविण थडें रोकडें शरीराचें ।' - दास १६.८.११. २. थडगे. ३. तपस्येची जागा. [सं.स्तब्ध]

**थतरबितर** वि. भ्रमिष्ट.(कु.)

**थती** न. काशाचे ताट; थाटी. (खा.)

**थत्त** उद्गा. तिरस्कार, अधीरपणा दाखवणारे उद्गारवाचक अव्यय; हट् हट्; छे ! छे; शी शी. [ध्व.]

**थत्तुरमत्तुर** वि. मोठ्या कष्टाने, कसाबसा बनवलेला. पहा : **थंतरमंतर** २ [सं.तंत्रमंत्र]

**थनसरी** स्त्री. छातीवरील स्तनाजवळची जागा : 'नारो बापोजीस तीर थनसरीस लागला.' -पुरं दभा ३ पृ.१३८.

**थना** पु. छाती; स्तन; थान.(को.) [सं.स्तन]

**थनी** स्त्री. घोड्यातील एक खोड, गोम.

वि. छातीवर स्तनाकृती मांस असलेला (घोडा). - अश्वप १.९४.

**थनुला** क्रिवि. पान्हा; स्तनपान. (झाडी)

**थपकट-ड-डा-ण** पहा : **थबकट** इ.

**थपकन** क्रि. वि. एकदम; धबकन.

**थपक(की)ल** स्त्री. धपकन बसणे-पडणे; थप आवाजाने ढुंगणावर पडणे;थपकल, फतकल घालून बसणे.(क्रि.मारणे, घेणे).[ध्व. थप्]

**थपकी न्हानं** १.वाढ खुंटणे; तेथेच थांबणे. २. दबा धरणे.(अहि.)

**थप(ब)डाक, थप्पड** स्त्री. चपराक; थापट; ठोसा; चापट. [ध्व.थप्; त. शाप्पाडु]

**थप(ब)थप-ब-पा-बा** क्रिवि. आर्द्र पदार्थापासून थेंब थेंब द्रव थपथप अशा आवाजाने ठिपकण्याच्या आवाजाचे अनुकरण करून.

**थपथप(ब)णे** क्रि. अक्रि. ओल्या कपड्यातून पाणी थपथप गळणे.

**थपथपीत** वि. आतून थपथप पाणी इ. गळत आहे असे (शरीर, वस्त्र इ.).

**थपाटी** स्त्री. थापटी; चापटी.

**थपिया** पु.(ताल) विवक्षित तालाच्या एका आवर्तनाचे पखवाजावर काढलेले समग्र बोल. [ध्व.थप्]

**थप्प** क्रिवि. एकदम बंद. [सं.स्थापित]

**थप्पडखाऊ, थप्पडवाईक** वि. १. थपडा खाणारा. २. दुसऱ्याच्या मताने वागणारा.

**थप्पा, थापा** पु. लाखेच्या अंगठ्या करण्याचे लकारी लोकांचे एक हत्यार.

**थप्पी-प्पा** स्त्री. रास; ढीग; वजनदार वस्तूंची एकावर एक ठेवून केलेली रचना. (वा.) **थप्पीवर लावनं, वसारनं-** अडगळीत टाकून देणे.

**थबकट-ड-डा** वि. १. सपाट; चापट; बसका. २. बसकट; नकटे (नाक): 'थबकट चेहऱ्याची व स्थूल...' -उपेक्षितांचे अंतरंग. [ध्व.] (वा.) **थबकट बसणे** - एकदम जोराने ढुंगणावर बसणे.

**थबकटे** न. तबक : 'रूप्याची आडकात्री काय सोन्याचे थब्कटें' - धालो ५८. (को., गो.)

**थबकड-ण** स्त्री.बसकण; बैठक; बसण्याचा प्रकार.(कु.) [थब]

**थबकड** स्त्री. थप्पड; चपराक. (क्रि.मारणे, देणे, चढवणे.)

**थबकणे** अक्रि. एकदम उभे राहणे; थांबणे; मध्येच थांबणे.

**थबकन्** क्रिवि. मध्येच थांबून.

**थबकवणे** उक्रि. थोपवणे; थांबवणे; एकदम उभे करणे.

**थब(प)के** वि. थबकड; चपटे.

**थबथबणे** अक्रि. ठिपकणे; टपटप गळणे; टपटपीत ओले असणे.

**थबथबीत** वि. टपटपीत; पाणी गळण्याइतके ओले, आर्द्र.

**थबलक** न. मुस्कट. (गो.)

**थबाबणे** अक्रि. थबथब वाहणे; वाजणे : 'चबाबिती थबाबिती ।कालवे पाट ।' - दास १६.४.२५. [ध्व.थब]

**थमणे** अक्रि. उतार पडणे; स्थिरावणे. [सं.स्तंभन]

**थमन** न.१.उपशम होण्यासाठी, दुःख कमी किंवा शांत होण्यासाठी दिलेली वस्तू. २. उपशम; उतार. (क्रि. पडणे, होणे, बसणे). [सं.स्तंभन]

**थमान** स्थानावर येणे.

**थयथयाट** पु. १. नाचणे, मौजेने ओरडणे इ. प्रकार. २. संताप व्यक्त करण्याची क्रिया. [ध्व.]

**थर** पु. १.पापुद्रा; पडदा; स्तर; मढवण (गिलावा, लेप, रंग इ. ची). २. रास; ढीग. ३. समुदाय; समूह. ४. प्रत, जात, वर्ग इ. अर्थी काही शब्दांबरोबर उपयोग करतात. उदा. पुणे-मुंबईथर = पुण्यामुंबईकडील जिन्नस इ.; ब्राह्मण-कुणबीथर = ब्राह्मण, कुणबी इ.ना योग्य असे (पोशाख, कपडे इ.)[सं.स्तृ-स्तर; फा.] (वा.) **थरचा चिरा थरी बसवणे** - वस्तू योग्य ठिकाणी ठेवणे; व्यवस्थित पायाशुद्ध कारभार करणे: 'परंतु त्यातहि दुसंदेश विचार करून मनसब्याचे चालीने थरचे चिरे थरी बसवून करणी होऊ लागल्यास अवघड काही एक पडावयाचे नाही.' - ऐप पृ.३२७. **थरावर बसणे** - (मनसुबा) पक्का किंवा शाश्वत होणे; चलबिचल नसणे: 'पत्रान्वयें थरावर गोष्ट बसली असतां बरें आहे.'- ऐलेसं ६२३२. **थरास जाणे, येणे-** काम कोणत्या तरी शेवटाला पोहोचवणे.

**थरकणी** स्त्री. कंप; थरकाप.

**थरकणे** अक्रि. थरथरणे; कापणे; भीतीने, थंडीने अंग हलणे: 'अधर स्फुरती जेवीं पवनें । पद्मपत्रें थरकती।' - मुआदि १६.१२८.[ध्व.]

**थरकन-कर-दिनी-दिशी** क्रिवि. अंगावर रोमांच, शहारे उभे राहतील असे; कापरे भरून; थंडी- थरकाप होऊन. (क्रि. कापणे, भिणे.). [ध्व.]

**थरकाप** पु. भीतीने अतिशय कापणे.

**थरकापणे** क्रि. थरथर कापणे.

**थरकावणे** क्रि. थरथर कापायला लावणे : 'पायें थरकावी जगती तळीं ।' - मुआदि ३३.६..

**थरडी** स्त्री. १. फुले ठेवण्याची परडी. २. गंध ठेवण्याची उथळ लहान तबकडी.

**थरणी** स्त्री.१. चिखल व धोंडे यांचा थर (बांध वगैरेवरील). २. थर रचण्याची क्रिया.

**थरणे** अक्रि. निरोगी, बळकट होणे. [सं.स्थिर]

**थरणे** अक्रि. थांबणे; स्थिर होणे; पहा : **ठरणे** : 'असवर बळाची उकळी । वारू न थरती भूमंडळी ।' -गीता १.३२८.[सं.स्थिर] (वा.) **थरून रहाणे** – टिकाव धरून राहणे; स्थिर राहणे.

**थरत, थर्त** क्रिवि. कंप होत; थरथरा कापत.(क्रि. भिणे, कापणे.)

**थरथर–रा** क्रिवि. भीतीने कापत; अंगावर रोमांच येऊन. [ध्व.]

**थरथरणे** अक्रि. थरथर कापणे; कंप सुटणे. [थरथर]

**थरथराट** पु. भयंकर थरकाप : 'मुष्टिघाताचिया ध्वनि । थरथराटें थरके धरणी।' – मुसभा ७.४०.

**थरथरी** स्त्री. कंप; थंडीने थडथडणे; रोमांचासहित कंप.

**थरपील, थरपा** न. पु. ताड, माड इ.च्या फांदीचा खालचा भाग.

**थरफळी** स्त्री. लाकडी पापुद्र्यांच्या थरांची बनवलेली फळी; (इं.) प्लायवुड. (झाडी)

**थरभरे** न. अंबोशी नावाची वनस्पती व तिची पाने. (को.)

**थरमर** स्त्री.तगमग : 'त्या थरमरीतून मी जागा झालो.' – उअ.

**थरविथर** वि. बरेवाईट; उत्कृष्ट–निकृष्ट : ' सोने चोरितां उंदिरु । न म्हणे थरविथरु ।'– ज्ञा १८.५५१. [सं. स्तर]

**थरार–रा, थराथर–रा** क्रिवि. अतिशय कापरे भरले आहे किंवा रोमांच उठले आहेत अशा रीतीने. (क्रि.कापणे, भिणे.)

**थरार** पु. भयचकित करणारे दृश्य, अनुभव.

**थरारक** वि. अंगावर काटा आणणारा.

**थरारणे** अक्रि. अतिशय कापणे, थरथरणे.

**थरारी** स्त्री. अतिशय कंप; थरथरी. (क्रि.सुटणे).

**थरासन** न. स्थिरता; टिकाव. (राजा.) [सं.स्थिरासन]

**थरी** स्त्री. दुधावरील मलई; साय. (व., खा.)[सं.स्तर] (वा.) ० **खानं** – फायदा घेणे, लुटणे.

**थरी** स्त्री. ओळ. – प्राम्रको.

**थरु–रू** पु.न.(कोयता, कुऱ्हाड इ.ची)मूठ; दांडा. [सं.त्सरू]

**थरोथरी** क्रिवि. थरावर थर याप्रमाणे : 'कर्पूर आन्थीरिला । थरोथरीं ।'– मूप्रआदि २८.९३.

**थरोवरी** क्रिवि. थराथरावर; प्रत्येक थरावर :'थरोवरी सुरंग सुतंबर'– मूप्र २६७९. [सं.स्तर+उपरि]

**थर्मामीटर** न. उष्णतामापक यंत्र; ताप पाहण्याची, रेखांकित, काचेची नळी. [इं.]

**थर्मास** पु.द्रवपदार्थाचे तापमान दीर्घकाळ कायम राखणारे उपकरण. [इं.]

**थर्मी** न. स्नानगृह. – ज्ञाको (व) १८९. [इं.थर्म]

**थर्र** क्रिवि. एकदम शहारे अथवा शिसारी येईल अशा रीतीने. [ध्व.]

**थर्रा, थर्रावना** क्रिवि. घाबरणे. (झाडी)

**थल** स्त्री. शेतातील उत्पन्नाचा वाटा, हिस्सा.

पु. स्थान; स्थळ; ठिकाण. [सं. स्थल]

**थलथल–ला** क्रिवि. फोपशा वस्तूच्या होणाऱ्या आवाजासारखा आवाज होऊन; स्थूल शरीराचा मनुष्य चालत असताना होणाऱ्या आवाजासारखा आवाज होऊन. [ध्व.]

**थलथल** स्त्री. फोपशेपणा; (कुजलेल्या फळांची) बिलबिली; ढिलेपणा; हलणारी स्थिती.

**थलथलणे** अक्रि. थलथल हालणे (पातळ चिखल, लिबलिबीत मांस); गलगलीत, बरबरीत, लिबलिबीत असणे (कुजकी फळे, पीठ इ.). [ध्व.]

**थलथलीत** वि. (स्थूलपणामुळे वगैरे) थलथल हालणारे; बरबरीत.

**थव** पु. तळ; ठाव :'कीं स्वधर्मतरी । चालविता भवार्णवीं ।तो तागा अंतराए थवीं। '– सव ५२. [सं. स्था]

**थवथव** क्रिवि. लगडून; भरून; बहरून : 'झाडें फळांनी थवथवून गेल्यामुळें तीं फारच शोभा देत होतीं. '– रत्नप्रभा.

**थवथवा** वि. पातळ; ताजे. (झाडी)

**थवथवित** वि. थबथबीत : 'थवथविता मांसा :' – रकौ ३३१.

**थवा** पु. (मनुष्य, जनावरे, पक्षी इ.चा) समुदाय; जमाव; समूह; सैन्याची टोळी. [सं.स्तोमक]

**थळ–ल** पु. १. (ऊस, सुपारी, केळी, मिरच्या इ.ची) लागवड; बन. २. भुतांनी पछाडलेली जागा; विशेष प्रसंगी भुतांची जमण्याची जागा. ३. (क.) मर्यादित जागा, स्थळ. ४. अर्धेलीने खोताला द्यावयाचा उत्पन्नाचा भाग. ५. एका जमीनदाराच्या किंवा कुळाच्या एकंदर मिळून जमिनी, शेत. ६. घोडा, बैल इ.ची त्यांच्या गुणावरून ठरवलेली जात; बिजवट. ७. थारोळे; तळे: 'तैसें बहुतीं बहुतकाळ सेवसेवूनि केलें थळ।'–मुरंशु ४१५. ८. देवस्थानची पंचक्रोशी.९.जमीन. [सं.स्थल] (वा.) ० **उठणे** – १. पिशाच्चांचा उपद्रव सुरू होणे. २. वस्ती हलणे: 'कोल्हापुरास थळ उठलें आहे. मरीच्या उपद्रवामुळें नित्य २५–४० माणूस मरतें.'–ऐलेसं २६०१. ० **घेणे, देणे, नेमणे, ठरवणे, मागणे** – जमिनीच्या मालकीची अथवा बांधाची भांडणे तोडण्यास कबूल करणे, देणे, नेमणे.

स्त्री. काठ; किनारा.– लोसाको.

**थळ(ल)कर** पु. गावच्या देवस्थानच्या मांडणीतील निरनिराळ्या स्थानांवरील अधिकारी.(कु.)

**थळ(ल)क(भ)री** पु. मिरासदार. पहा : **थळवाईक**

**थळची पूजा** पंचक्रोशीतील लोकांनी बांधलेली देवपूजा.

**थळझाडा, थळवारझाडा, थळवारपत्रक** पु. न. १. गावच्या खेडुतांनी वहितीला घेतलेल्या अथवा दिलेल्या जमिनींची नोंद, तिचा तक्ता. २. (सामा.) यादी. उदा. शेतांचा–कुळांचा थळझाडा.

**थळणे** सक्रि. पत्रा, तबकडी इ. वर कोरून, ठोकून, विंधून आकृती उठवणे.

**थळथांबणी** स्त्री. व्यवस्था.

**थळपत्र** न. गोत, देशक, न्यायाधीश व राजा यामार्फतचा निवाडा. – गांगा ६०.

**थळभरीत** न. १. एखाद्या ठिकाणी माल विकत घेणे व भरणे. २. निर्गतमालावरील कर, जकात. ३. (क.) माल विकत घेण्याचे ठिकाण किंवा त्या ठिकाणचा माल.

**थळमोड** स्त्री. १.एखाद्या जागी थांबून, माल उतरून विकण्याची जागा. २. आयात मालावरील जकात. ३. पहा : **थळभरीत** ३. ४. तळ किंवा बिऱ्हाड हलवणे; जागा सोडणे.

**थळव(वा)डी** स्त्री. मळणीची जागा; खळे.

**थळवाईक** पु. १. उसाच्या मळ्याचा मालक. २. अनेक वर्षांपर्यंत एखादी जमीन कसणारा व त्यामुळे त्या जमिनीवर ज्याला वंशपरंपरागत हक्क प्राप्त झाला आहे असा शेतकरी; स्थायिक.

**थळवारी** स्त्री. शेतजमिनीचे क्षेत्राच्या अनुक्रमाने केलेले पत्रक, नोंद.

**थळी, थळीव** न. पात्र; अलंकार; वडी; कोरीव काम: 'कापुराचें थळिव । आणूनि देईल दैव ।' – ज्ञा १७.२४२.

**थळी** स्त्री. डांगरमळा; नदीच्या काठावरील टरबुजाची शेती. (व.)

**थळीक** वि. ठळक. (गो.)

**थळे** वि. १. पंचक्रोशीत राहणारे नोकरचाकर. २. ग्रामदेवतेला कौल वगैरे लावण्याचा नवस.

**थंड** स्त्री. थंडीचे, हिवाळ्याचे दिवस. (अहि.)

वि. १. गार; शीत. २. दाहशामक (औषध, जेवणातला पदार्थ). ३. (ल.) सुस्त; धीमा; मंद; आळशी; सौम्य; समप्रकृतीचा. ४. शांत; स्वस्थ (देश, वस्तुस्थिती). ५. शांत ; स्थिर (डोळे, प्रकृती, मन इ.). ६. कमजोर; ढिले (काम). ७. भूतखेत इ. उपद्रवरहित (घर, जागा). ८. (ल.) नपुंसक (मनुष्य). [सं.स्तब्ध; क. तंण; त. तण्] (वा.) ० **करणे** – विसर्जित करणे. ० **पाणी ओतणे** – एखादे कार्य बंद पाडणे; एखाद्याचा उत्साह भंग करणे. ० **होणे, पडणे, पावणे**– मरणे.

**थंडक** न. दाहशामक औषध किंवा उपाय.

**थंडगार** वि. १. अतिशय गार. २. स्थिर; शांत. ३. संतोषी; समाधानी (हृदय, आत्मा). ४. मेल्यामुळे थंड झालेला, गार पडलेला.

**थंड वेळ** १. सकाळ-संध्याकाळची वेळ. २.(ल.) स्थिर व शांत वेळ (स्वत:च्या प्रकृतीची वगैरे).

**थंडा** वि. पहा : **थंड** २, ८ [हिं.]

**थंडाई** स्त्री. १. शीतलता. २.(ल.) दाह, ताप कमी करण्याचा गुण. ३. सालसपणा; सौम्यता. ४. मंदी; सुस्ती; औदासिन्य; दुर्लक्ष. ५. उपशम; शांती; उतार. ६. थंड औषध. ७. कुसुंबा. ८. बदाम, गुलाबकळी, खसखस, काकडीच्या बिया व सवयीप्रमाणे भांग वगैरे एकत्र वाटून दूध-साखर घालून केलेले एक पेय.

**थंडा फराळ** केवळ थंड पाणी पिऊन, हवा खाऊन राहणे.

**थंडावचे लिखित** शांततेचा तह.

**थंडावणे** अक्रि. १. थंड, शांत होणे (मनुष्य, विकार, इच्छा इ.). २. दमट होणे; सर्दावून ताठरपणा नाहीसा होणे (कापड, कागद यांचा).

**थंडावा,थंडोसा** पु. (उन्हानंतरचा) हवेचा थंडपणा; सुख; आराम; स्वस्थता; (दु:ख, क्षोभ यानंतर) सुटका, उतार; उपशम; प्रशम.

**थंडी** स्त्री.१. थंडपणा; गारठा (हवेचा, पदार्थांचा); सर्दी. २. थंडीची भावना (क्रि. भरणे, वाजणे). ३. पहा: **थंडाई** २,४

**थंडीक** १. अंगाला मातीचे लेपन करणे. २. थंड पदार्थ.

**थंडीकातरा** पु. थंडीने होणारा त्वचाविकार.

**थंडीचा ताठा** (हवेतील) कडकडीत गारठा.

**थंडीताप** पु. हिवताप; शीतज्वर; अतिशय थंडी वाजून येणारा ताप.

**थंडे थंडे** क्रिवि. १. सावकाश; हलके हलके; ढिलाईने . २. (रात्रीच्या, सकाळच्या वगैरे वेळी) थंड वेळी.

**थंडे युद्ध** प्रत्यक्ष लढाई न करता शत्रुत्वाचे वातावरण राहील असे करणे: 'आता राष्ट्राराष्ट्रात रक्तलांछित युद्धाव्यतिरिक्त एक नवा अहिंसक थंड्या युद्धाचा पर्याय उपलब्ध आहे.' – युद्धजिज्ञासा.

**थंड्या पोटाने** क्रिवि. शांतपणाने; रागात नसताना.

**था** स्त्री. १.तळ; पाया; तळची जमीन. २. ठिकाण; जागा; ठाव: 'भणौनि शिशुपालवधी कथा । जे भक्तीरसाची था ।'– शिव ३०. [सं.स्था]

**थाऊ** वि. स्पष्ट; प्रांजळ.

**थाऊक** न. भांडेकुंडे; ठावके. [सं.स्था]

**थाऊड** स्त्री. गोंधळी वगैरेंना देण्याचा पैसा.

**थाक** स्त्री. गोंधळ; घोटाळा.

पु. १. गाण्यातील अवसान, विसावा, थांबण्याची जागा. (क्रि.तुटणे): 'नृत्यांत अप्सरांचे तोडिति हृत्सहचि सर्व थाक थवे ।' – मोअनु ५.४४. २. थकवा : 'तीन दिवसांनंतर कुचावर कुचानी आलेला थाक नाहीसा झाला...' – विज्ञाविअं ९ पृ. २१२. ३. ठिकाणा; पत्ता; थांग (क्रि. लागणे) : 'उठतां कुरुवीराचे लागों देती जना न थाक थवे ।' – मोभीष्म ८.१८. [सं.स्था]

**थाक** स्त्री. गणती; सीमा; मर्यादा: 'लोकवार्ता आहेत त्यांस तो थाकच नाही!' – ऐलेसं ५२७६. [सं.स्था]

**थाक** पु. खोली; थांग; तळ.

**थाक** पु. धाक; जरब: 'त्याचा गुमास्ता तेथें आहे. थाक दबकावणें व उत्तर साफ देवणें.'– हिंगणें द. भाग २ पृ. १०१.

**थाकणे** अक्रि. थकणे; भागणे; दमणे.

**थाकणे** क्रि. देणे; विकणे. (कर., नंदभाषा)

**थाकी** स्त्री. रीत; पद्धत; शैली; (कार्य करण्याची, भाषणाची) ढब; डौल; चाल.[सं.स्था] (वा.) ० **उतरणे, साधणे, आणणे** – अनुकरण, नक्कल, विडंबन करणे.

**थाट** पु. डौलाची, दिखाऊ, रचना (सैन्य, डेरे, इ.ची). (सामा.) डामडौल; शोभा; भव्यपणा; ऐट; वैभव; दिखाऊपणा.[सं.स्था; क. ताटु]

**थाट** पु. छपराची ताटी किंवा शाकारण्यासाठी तयार केलेली साटी.

**थाट** पु. टोळी; जमाव; गर्दी; समूह : 'गजांचिया थाटावरि । सिंह चालती जया परी ।' – गीता १.३३२.

**थाट** पु. (संगीत) सात सुरांची रचना; स्वरानुरोधाने रागाचे वर्गीकरण.

**थाट** वि. १. दाट व घट्ट विणीचा (कपडा, दोर इ.). २. (ल.) घट्ट;

खंबीर; बळकट (मनुष्य,प्राणी). ३. साधा; सरळ; खडखडीत. [फा. तट्ट]

**थाट** पु. कारस्थान (क्रि.बांधणे) : 'सर्वहि वर्तमान लिहिले तें प्रज्ञाचक्षूकडूनच विसाजी तुकदेऊ आलीयावर थाट वरचेवर लिहून पुसोन बांधत गेले.' – पेद १०.५४.

**थाटणी** स्त्री. थाटमाट; व्यवस्था; रचना: 'यवनानें आपला भला माणूस... अशी थाटणी करून पाठविले.' – मइसा ३.४३३.

**थाटणे** सक्रि. १. व्यवस्थेने लावणे; सजवणे; रचना, देखावा करणे; तयार ठेवणे; जमणे : 'वेळेवर सैन्य तयाचें थाटलें' –विक २६. २. थाटाने चालवणे (संसार, व्यवहार); (लग्न करून) घर मांडणे; शहाणपणाने योजना करणे (कल्पना, मसलत यांची). ३. (सामा.) सज्ज करणे; मांडणे. ४. पेरणे; रोवणे: 'मंदाराचा फोकी थाटिजाति : चांपाटीयांचे कोंडव कीजति' – शिव ३१२. [सं. स्था]

**थाटबंद** पु. चौकट; साटी (छप्पर इ.ची).

**थाटमाट–मांड** पु. १. डामडौलाची मांडणी. २. व्यवस्थित अशी (सामानाची, कामाची) मांडणी. ३. पोषाख, अलंकार घालणे; (एखाद्या प्रसंगासाठी) नटणे; डौलाने बाहेर पडणे; डौल; शोभा; देखावा.

**थाटर** स्त्री. १. साटी. (खा.) २. शेळ्या, मेंढ्या यांना कोंडण्यासाठी केलेली जाळी. (अहि.)

**थाटा** पु. १. कारवीचे झाड; याच्या जून, जाड काठीचा उपयोग कुंपणासाठी करतात. २. काठ; पदर.

**थाटी** स्त्री. १. वाटीच्या आकाराचे धातूचे पात्र. २. गंधाची तबकडी. (कु.) ३. काश्याचे ताट; परात.(व.)

**थाटी** स्त्री.१. सैन्य: 'तिअें थाटी ओळघैला । नायक शिरोमणी ।' – शिव १०३५. २. टोळी; जमाव; मंडळी; समुदाय : 'नागविल्या थाटी । उरों नेदीच लंगोटी ।' – तुगा १४८९.

**थाटी** स्त्री. फास.

**थाटी** स्त्री. तिरडी.

**थाटुळणे** अक्रि. थंडीने आखडणे.

**थाडकन–कर–दिनी–दिशी** क्रिवि. एखादी वस्तू दुसऱ्या वस्तूवर आपटून होणाऱ्या आवाजासारखा आवाज होऊन; छडीचा, चाबकाचा, चापटीचा आवाज होऊन. [ध्व.]

**थाडथाड** क्रिवि. छडी, चाबूक, लाथा इ. मारण्याच्या आवाजासारखा आवाज होऊन. [ध्व.]

**थाडी–डी–डे** वि. अपक्व, न पिकलेले (फळ). (ना., अहि.)

**थाणू** वि. रागीट. [सं.स्थाणु]

**थातं(थं)बणे** सक्रि. १.तसेच ठेवणे; थोपवणे : 'एऱ्हवीं प्राप्तें मतांतरें । थातंबूनि आंगभरें ।' – ज्ञा १३.३१८. २. निसरणे. [सं.स्तंभ्]

**थातारचे** सक्रि. १. फूस लावणे. २. शांत करणे. (गो.)

**थातूमातू, थातूरमातूर** न. १. जादूटोणा; मंत्रतंत्र. २. (जुन्या घराची, वस्तूची काही काळ उपयोगी पडण्यापुरती)डागडुजी. ३. समजावणे; मनधरणी करणे.

**थान** न. मोहरा किंवा पुतळ्यांची मोजदाद करताना वापरावयाचा संख्यावाचक शब्द.

**थान** न. स्त्रीची छाती; स्तन; आमा; जनावरांचे थान: 'मज पाजायां प्रेमें पय पळ धरितीं तिचीं न धिर थानें ।' – मोउद्योग १०.८१. [सं.स्तन] (वा.) ० **गुंतणे** – (काही रोगाने) स्तनातून दूध येण्याचे बंद होणे.

**थानतुटा,थानतुटका** वि. थानापासून तुटलेले; अंगावर न पिणारे; आईपासून दूर केलेले व दुधासाठी दाईच्या स्वाधीन केलेले.

**थानतोड** स्त्री. ताटातूट; संबंध तोडणे (विशेषत: आई व मुलाचा).

**थानमान** पु.न. ठावठिकाण : 'देवासी नाहीं थानमान। कोठें करावें भजन ।' – दास १९.५.२१. [सं.स्थान+मान]

**थाना** पु. चुलीवर पातेले ज्यावर टेकते ते तीन उंच गोल भाग. (अहि.)

**थानापती** पु. मिरासदार; मालक : 'जीउ थानापति करुनु घाली । गुरुगृहिं जो ।'– ज्ञा १३. ३७६. [सं.स्थानपति]

**थानुली** स्त्री. डोळ्यांतील बाहुली : 'निदसति डोळेयांचिया थानुलिया' – रकौ ३०८. [सं.स्थानु]

**थाप** स्त्री. १. थापटी; थापड; रपाटा; चपराक; हाताचा रट्टा, आघात. (क्रि. देणे). २. लाटेचा तडाखा. (क्रि. चालणे, बसणे.). ३. पाण्याच्या धडका अडवण्यासाठी बांधलेला बांध, भिंत. ४. भुलवणूक; झोला; चापाचापी; बाता मारणे. (क्रि. देणे, मारणे). ५. छाप; वरिष्ठपणाचा ठसा. ६. पखवाज, तबला इ. वर त्यांतून आवाज निघेल असा हाताचा हलका प्रहार (गाण्यासोबत). ७. एखाद्या कुंभाराची मातीची भांडी करण्याची विशेष रीत. ८. मडकी तयार करण्यासाठी कमावलेला मातीचा गोळा. ९. शेणाची रास. १०. केळीचे खुंट एकमेकांना जोडून पाण्यावर तरंगण्यासाठी केलेला ताफा. ११. कलावंतिणीचा मेळा. १२. (मल्लखांब) मल्लखांबावर एका हाताने झटक्यांत मारावयाची उडी. – व्याज्ञा ३.५९. १३. खाच; खोल केलेला भाग. (अहि.) [सं.स्था] (वा.) **थापऱ्या देणे** – १. काहीतरी सांगून आपले काम करून घेणे. २.राग शमविणे.

**थाप** वि. १. समान उंचीवर उगवलेले, एकाच उंचीचे पीक. २.पातळी सोडून वर आलेला, सहज लक्षात येणारा भाग.

**थाप** स्त्री. चापा, पाळ वगैरे मिळून होणारा कानाचा बाह्य भाग; टापशी बांधतात तो भाग : 'लवलवित फडकावी । फणै फणै कर्णथापा ।' – दास १.२.१३.

**थापकौल** न. उंच काठ असलेले, हातांनी माती थापून केलेले कौल.

**थापझि(झ)रा, थापविहिरा** पु. स्वच्छ पाणी येण्यासाठी नदीच्या पात्रात हातांनी खणलेला खळगा.

**थापट,थापडणे–डीव** स्त्री.न. चापट; थप्पड; हाताचा रट्टा. [सं.स्थापित] (वा.) ० **पडप** – पाच रुपये बक्षीस मिळणे. (गो.)

**थापटणे** सक्रि. १. थापट, चापट मारणे. २. (ल.) गोडीगुलाबीने वळवणे; शांत करणे; कुरवाळणे; (थापटून) अंगावर सामान घालून तयार करणे (घोडा, बैल). ३. दंड ठोकणे (अंगी पराक्रम, बळ आहे असे दाखवण्यासाठी). ४. जागच्या जागी दाबणे: 'मन राखे हातीं

घेऊनियां काठी। इंद्रियें थापटीं फाकों नेदी।' - तुगा २१२३. [ध्व. थप्पः, सं. हस्तस्फटन]

**थापटणे** न. १. कुंभाराचे मडकी घडवण्याचे हत्यार. २.वस्तरा लावण्याचा कातड्याचा तुकडा. ३. गवंड्याचे गिलावा करण्याचे व ठोकण्याचे हत्यार.

**थापटणेकार, थापटा-टे** पु. न. थापट्या मारून अंगमर्दन, मालिश करणारा सेवक : 'जेयाचे थापटणेकार गोमटे' -उह ७०.

**थापटी** स्त्री. १. थापट. २. (शेणाची) गोवरी : 'घातल्या इष्टेचिया थापटिया ।' - स्वादि २.२.३. ३. मुलांना शिक्षा करण्याची छडी. ४. पहा: **थापटणे** न.३. ५. घर, वस्तू इ. चा उपभोग घेणे, एखादी वस्तू जागेवरून हलवणे यासंबंधी मनाई दाखवणारी त्या घरावर, वस्तूवर केलेली सरकारी खूण. ६. चपटे कौल. (व.)

**थापटीव** वि. १. थापटलेले; कुंभाराच्या थापटण्याने घडवलेले. २. थापटून केलेली (पोळी इ.).

**थाप(ब-बा)डवाईक** वि. १.थप्पडखाऊ. २.भोळा; मूर्ख; सहज फसणारा (मनुष्य). ३. थापा, गप्पा मारणारा; गप्पीदास.

**थापडे** न. थापून केलेला थालीपिठासारखा पदार्थ : 'हें लाकांचे थापडें' - लीचपू ५०५.

**थापणे** सक्रि. १. चापट करणे; थापटणे. २. चिकटेल अशा रीतीने (भिंतीवर चिखल इ. चा गोळा) लिंपणे. ३. कुरवाळणे; गोंजारणे.

**थापणे** अक्रि. गर्दी होणे.

**थापलणे** सक्रि. शीड असलेले तारू वल्ह्याने वळवणे.

**थापलना** अक्रि. चाचपडणे. (झाडी)

**थापल्या** वि. आळशी. (झाडी)

**थापा** पु. १. ढेकळे मोडण्याचे लाकडी हत्यार. २. लाखेच्या अंगठ्या करण्याचे हत्यार. ३. गोवरी. (को.) ४. टेकडीच्या माथ्यावरील किंवा बाजूला असलेली सपाट जमीन, पठार: 'आली थाप्यावरती झाडी असमान फाडी...।' - ऐपो ४३४. ५.बोटे गळून राहिलेला हाताचा किंवा पायाचा पंजा.- प्रामको.

**थापा** पु. थवा; समुदाय: '...जसा चिमण्यांचा थापा । उडुनी जाई।' - स्त्रीस्वभाव. [सं.स्था]

**थापाडी** स्त्री. पारध्यांची मुलूखभर भटकणारी जात.

**थापाथा(थु)पी** स्त्री. भूलथापा; थापेबाजी.

**थापी** स्त्री. १. गिलावा वगैरे लावण्याची, साफ करण्याची, एक प्रकारची लाकडी करणी; गवंड्याची ठोकणी. २. शेणाची गोवरी. (राजा). ३. उतरंड इ. व्यवस्थित लावून ठेवण्याची क्रिया.

**थापीकरणी** स्त्री. (विटांचे बांधकाम) बांधकामात माती अथवा चुना सफाईने बसवण्याचे साधन.

**थापीचे माप** (धान्य इ.) मोजण्याची एक पद्धत; मापाला शीग देऊन हातात पडेल असे माप ज्यात देतात तो मोजणीचा प्रकार.

**थाबडे** न. बारदान. (वा.) **(आपले) ० भरणे** - दुसऱ्याचा पैसा इ. जास्तीत जास्त लाटून गबर होणे.

**थामडे** पु. डोलारा: 'दौलतीचें थामडें कायम ठेवून चार जुने माणसें... होळकर वागवील.' - होकै पृ.१२२.

**थाय** पु. अहंकार.

**थायल्या** वि. भित्रा; भेकड; पुरुषार्थ नसणारा; बायकी. (अहि.)

**थाया** पु. (दूध, रक्त, पाणी इ. सांडून झालेले) लहान डबके; थारोळे.

**थाया** पु. १. रागाने आदळआपट करणे; लाथा मारणे. (क्रि. घेणे, घेऊन बसणे, करणे.). २. हट्ट; छंद; ध्यास : 'म्हणे बाळकें घेतला थाया । तो साच करूनि दाखवी माया ।'- मुआदि १.४३.

**थार** पु. स्त्री. १. विश्रांतीचे, वस्तीचे ठिकाण; (शब्दशः व ल.) बिऱ्हाड; आश्रय; आधार; थारा; ठिकाण. २. एकसूत्रीपणा; ताळ (भाषण, वर्तन इ.तील). ३. जागा; तळ. ४. हमी; जामीन. उदा. व्याजाला, मुद्दलाला, अन्नाला इ. थार. [सं.स्थान, स्थिर] (वा.) **० नसणे** - जागा न सापडणे; (अन्न, धान्य इ.ची) वाण असणे. **थारी बसणे, पडणे** - (वस्तू, मनुष्य, पिशाच्च यांनी) वस्ती करणे. **थारेस लागणे** - शिस्तीत, शेवटास लागणे. **थाऱ्यास करणे** - आश्रयाला नेणे. **(मडके) थारी बसणे** - स्थिर व निर्भय स्थिती प्राप्त होणे.

**थार** वि. १. मोठा : 'भवंता वेढा पडिला थारू' - दह १२७६. २. स्थिर; निश्चल : 'म्हणौनि नाभिया दोंदें गंभिरीः थार केली' - सव ९३.

**थारणे** सक्रि.देणे; पोचवणे: 'निरयत्न म्हणून रुपये त्याजकडे थारले.' - पेद ३३.३७३.

**थारणे** अक्रि. १. स्थिर होणे; थांबणे; विश्रांती घेणे; टिकणे: 'हो सेतु स्वयशतोय थाराया ।' - मोकर्ण २१.७. २. राहणे; नेटाने चालू ठेवणे. ३. थकणे; राहणे; शिल्लक राहणे : 'परंतु मागेपुढे आम्हाकडे यैवज थारला असतां...' - पेद ६.१२४. [सं.स्था]

**थारा** पु. १. आधार; आश्रय; राहण्याची जागा. (क्रि. मिळणे, मोडणे). २. चबुतरा. [सं.स्था, स्थिर] (वा.) **थारी थांबणे** - स्थिर राहणे. **थाऱ्यास करणे** - आश्रयाला नेणे; सुरक्षित स्थळी ठेवणे: 'याउपरी तुम्ही आफ्लेठायीं सावधता करणें मुलें माणसें थाऱ्यास करणे'... - ऐसंसा खंड ६ पृ. ४.

**थाराथार** स्त्री. स्थिरता; घट्टपणा; स्तब्धता.

**थारामारा** पु. ठावठिकाणा; पत्ता : 'पाडियेला ठायीं तुझा थारामारा। अवघा दातारा लपसी तो ।' - तुगा १२२७.

**थारावणी** स्त्री. राहणी; वसती; वास्तव्य.

**थारावणे** उक्रि. १. स्थिरावणे; ठाकणे; राहणे; विसावणे; नांदणे. २.एका जागी उभे राहणे, बसणे.

**थारी** स्त्री. तांब्या. (बागलाणी)

**थारी** स्त्री. गोणपाटाची अंथरी. (झाडी)

**थारू** न. रहाटगाडग्याचे पाणी पडण्यासाठी लावलेला लोखंडी पत्रा.

**थारेपालट** पु. राहण्याची जागा बदलणे; स्थलांतर.

**थारो(र)ळ-ळा-ळे** पु. न. १. जेथे मोट रिकामी होते ती दगडांनी बांधलेली कुंडीवजा जागा. २.(ल.) डबके; (पाणी, रक्त, दूध इ. सांडल्याने झालेला) डोह. ३. विस्तव ठेवण्यासाठी जमिनीत खणलेली खळगी. ४. गुऱ्हाळातले काहिलीखालचे राखेचे भोसके; चुलाण्याचे तोंड. ५. दुधाणे; दूध तापवण्यासाठी जमिनीत तयार

केलेले कुंड. [सं.स्था]

**थाल** पु. शेताचा मगदूर; उत्पन्न : 'शेतकीचा थाल पाहून' – मसाप २.१४०.

**थालणे** अक्रि. प्रकाशणे. – मनको. [सं.स्तृ]

**थाली** स्त्री. १. अन्न शिजवण्याचे भांडे. २. ताट; परात; थाळा. ३. तपेली किंवा लोटा; तांब्या. (ना.,व.) ४. गडू. (तंजा.) [सं.स्थाली]

**थालीठावके** न. भांडीकुंडी.

**थालीपीठ** न. कोणत्याही पिठात मीठ, तिखट इ. घालून थापून व भाजून अगर तळून केलेला पदार्थ.

**थावटणे** अक्रि. राहणे; स्थिरावणे; थोपावणे. [सं.स्थावर]

**थाव(ब)डा** पु.१. शेण.२. शेणात भाताचा कोंडा घालून थापलेली लहान गोवरी.

**थावणे** अक्रि. स्थिरावणे; बळावणे; जोरावणे : 'मग थावली ते वाहटुळी। सैंघ घेऊनि घर डहुळी ।' – ज्ञा ६.२३६. [सं.स्था]

**थावर** पु. १. (तेल कढविण्याची) कढई; घमेले. २. मोठी पळी. ३. उलथणे ( मोठे). [सं.स्था]

**थावरणे** सक्रि. १. तात्पुरते उभे करणे; (दुरुस्ती करून) उभारणे. २. थांबवणे; थांबवून धरणे. ३. धीर देणे; (धीर, उत्साह इ.) कायम राखणे. ४. आटोपणे : 'लक्ष्मण सुमंत्र तेव्हां धैर्याने बाष्पपूर थावरती ।' – मोमंत्ररामायण उत्तरकांड २४२. [सं.स्थावर]

**थावरणे** अक्रि. १. स्थिर होणे; आसरा मिळणे. २. (व्यापार इ. मध्ये) डोके पुन्हा वर काढणे; (आजारी माणसाची) गेलेली शक्ती, अवसान पुन्हा परत येणे.

**थावराथावर** स्त्री. आवराआवर : 'ते लोक आपली थावराथावर करीत होते.' – भारतवर्ष जुन्या ऐति गोष्टी ३४. [सं.स्थावर द्वि.]

**थाळ** स्त्री. १. गोवऱ्यांची,नारळाच्या सालींची वगैरे स्वयंपाकासाठी रचलेली व पेटवलेली रास; झगरे. २. ओझे नेण्याने तापणे; गरम होणे; (डोके, कमर, पाठ यांमध्ये); (पोटामध्ये) उपासाने किंवा तापाने होणारी जळजळ. (क्रि. येणे, उठणे, होणे). ३. चटका; होरपळा (विस्तवाजवळ बसण्याने होणारा). ४. (पुष्कळ वेळ एका ठिकाणी बसण्याने, घोड्यावर बसण्याने इ.) उष्णतेची, शिणाची, बधिरतेची भावना. (क्रि. येणे). ५. दूध, आंघोळीचे पाणी तापविण्याची ओबडधोबड चूल. ६. चुलाण्याची जागा; थारोळे. [सं.तल]

**थाळण** स्त्री. १. पहा : **थाळ** १-४. २. पहा : **थारोळे** १

**थाळल** स्त्री. मोटेचे पाणी ज्यात पडते ती कुंडी.

**थाळा** पु. जेवणाचे उभे काठ असलेले ताट. [सं.स्थाली] (वा.) ० **बसणे** – चांगले व जोरदार पीक येणे. ० **भरणे** – नवरीला सूनमुखाच्या वेळी सर्व दागिने घालणे. ० **वाजणे** – (खाद्यपदार्थ, पैसा इ.) संपणे. ० **वाजविणे** – कोणत्याही गोष्टीची द्वाही फिरवणे; (बायकी) मूल जन्माला आल्याबरोबर काशाचा थाळा वाजवून आनंद प्रदर्शित करणे.

**थाळातांब्या** पु. (ल.) गरिबाचे सर्वस्व; थोडे बहुत; सर्वकाही.

**थाळावाटी** स्त्री. (ल.) समूळ नाश; मालमत्तेचा नाश; (थाळा व वाटी एकमेकांवर वाजविली असता जेवण्याचे संपले असे सूचित होते, त्यावरून) निर्वंश. [सं.स्थलक+वट्ट ]

**थाळिऊ** वि. १. स्थळी आकारलेला : 'निवृत्तीचा थाळिऊ' – भाए २५१. २. ज्या जमिनीचा सारा कायम केला आहे अशी. [सं.स्थल]

**थाळी** स्त्री. छोटे कुरण; वाफा : 'शेतकरी या कुंद्याच्या मोठाल्या थाळींत कुळव घालीत नसत.' – माझ्या आठवणी.

**थाळी** स्त्री. १. लाकडे आणि विस्तव ठेवण्यासाठी जमिनीमध्ये खणलेली खळी, चर, चूल. २. लहान थाळा. [सं.स्थाली] (वा.) ० **पिटणे** – चोहीकडे प्रसिद्ध करणे.

**थाळीपाट** पु. कैद्यांना देण्यात येणारी थाळी व भांडे.

**थांग** पु. १. नेमकी जागा; माग (हरवलेल्या व शोधलेल्या वस्तूचा). २. (ल.) (पाणी,ज्ञान, संपत्ती, गुण इ. ची) खोली; ठाव.[सं.स्था]

**थांग(गा)दोरा–पत्ता** पु. (व्यापक) सुगावा; मार्ग; ठाव; छडा.

**थांगपूस** पु.स्त्री. पत्ता; बातमी; माहिती. (क्रि. लागणे, लावणे.)

**थांगा** पु. पहा : **थांग**

**थांगाथांग–रणी, थांगारणूक** स्त्री. १.चालचलाऊ रचना, व्यवस्था, मांडणी. २. सामान्य मिरवणूक.

**थांगारणे** सक्रि. १. व्यवस्थेने लावणे; (वस्तू ) जागच्या जागी ठेवणे. २. दुरुस्त, नीट करणे. ३. हवाली, स्वाधीन करणे.

**थांगी** पु. चोरांचा साथीदार, चोरीचा माल ठेवणारा. [हिं.]

**थांडगी** पु. विशिष्ट कृत्ये करणारा शूद्र.(गो.)

**थांब** न. शेतात नवे उगवलेले रोप. (गो.) [सं.स्तंब]

**थांबडे,थामडे** न. (ल.) ताट; बशी.

**थांबणे** पहा : **थापणे**

**थांबणे** अक्रि. १. उभे राहणे; विश्रांती घेणे; खोळंबणे; वाट पाहणे. २. (एखादे काम) काही काळ बंद, तहकूब होणे.[हिं.थमना; सं.स्तंभ]

**थांबलणे** सक्रि. सांभाळणे.

**थांबा** पु. गाडी थांबण्याचे ठिकाण; (इं) बसस्टॉप, रेल्वेस्टेशन.

**थिएटर** न. नाटकगृह; चित्रपटगृह. [इं.]

**थिऑसफी** स्त्री. (धार्मिक) ईश्वरविषयक ज्ञान; ब्रह्मज्ञान; आत्मज्ञान. ही एकोणिसाव्या व विसाव्या शतकातील सर्व जगभर पसरलेली एक आध्यात्मिक चळवळ आहे व ती थिऑसॉफिकल सोसायटी नावाच्या सर्वराष्ट्रीय संस्थेच्या वतीने चालविली जाते. [इं.]

**थिकटणे** अक्रि. व्याप्त होणे.

**थिकटे** वि. व्याप्त.

**थिकटेथिकटे** क्रिवि. थेंबथेंब; झिमझिम : 'दारीं थिकटेंथिकटें पाणी पडत असे ' – लीचपू ४७७. [सं.स्तिप्]

**थिकणे** अक्रि. चरफडणे; शोक करणे. [सं.स्तिघ्]

**थिकुले** पहा : **थेकुटे** [सं.स्तोक]

**थिगणे** अक्रि. थिजणे; डगमगणे : ' मार प्रहर सीमेपलीकडे जाहला तों लिहावासा नाहीं परंतु कोणी माणूस थिगले नाहीं'. – पेद ३४.४०.

**थिगरी** स्त्री. कपाळाची कवची.(गो.)

**थिगळ** वि. चेंगट; दीर्घसूत्री; मंद; जड; सुस्त. [सं.स्थगित]

**थिगळी** स्त्री. ठिणगी.

**थिगूर** पु. गोड्या पाण्यातील एक मासा. (गो.)

**थिजणे** अक्रि. १. गोठणे; थंडीमुळे घट्ट होणे. २. (मरणसमयी डोळे) निश्चल होणे. ३. (ल.) तल्लीन होणे; ध्यान, आश्चर्य, चमत्कार, गोंधळ यांत गुंगून जाणे: 'थिजले बघून तुम्हा' – विक ६५. [सं. स्त्यै]

**थिजण्याचा बिंदू** द्रवपदार्थ ज्या उष्णमानावर घनस्थितीत जातात तो बिंदू; (इं.) फ्रीझिंग पॉइंट.

**थिजवि(व)णे** सक्रि. गोठवणे; घट्ट करणे.

**थिजे** क्रिवि. सध्या; चालू काळात.

**थिटा–टी–टे** वि. १. आखूड; अरुंद; अपुरा; अल्प; कमी : 'प्रसाद पट झांकिती परी परा गुरूचें थिटें ।' – केका ९५. २. दोषयुक्त; उणीव असलेले. [सं.त्रुटित]

**थिडसुड** न. वाद्यविशेष : 'मग थिसुअंत थिडसुड वाजवित खलेआ वलघले' – कला १५.

**थित** वि. जवळ असलेले; मूळचे: 'राखों जातां शिष्यातें । गुरुपणही धाडिलें थितें ।' – अमृ २.१२. [सं.स्थित]

**थित** वि. नीच; हलका: 'चित्तें म्हणे अहा म्यां हारविलें हातिचेंहि भव्य थितें ।'– मोकर्ण ५.१. [सं.त्रुटित]

**थिता** वि. १. अल्प; थोडेही : 'म्हणोनि सार थिता, सुगुण न लोपीं ।' – मोकर्ण २१.३७. २. स्थिर : 'जें थितें हें डहुळलें । मानस माझें ।' – ज्ञा ३.१४. ३. व्यर्थ; वाया. [सं.स्थित]

**थित्या** क्रिवि. थोडक्यात : 'थित्या अनुभव दुराविजे ।' – अपरोक्षानुभव १२.१८९.

**थिनणे** अक्रि. असणे: 'हें असो, अव्यक्तपण थिनलें ।' – ज्ञा ९.६५. [सं. स्त्यै]

**थिप(ब)कणे** अक्रि. निथळणे; थेंबथेंब गळणे. [सं.स्तिब्–प]

**थिप(ब)डी** स्त्री. (उष्णता कमी करण्यासाठी) डोक्याला तेल चोळणे, थापटणे इ. क्रिया. (क्रि. घालणे). [ध्व.]

**थिबा** पु. धाब्यातून गळते ते पावसाचे पाणी ; तशा पाण्याची गळती.

**थिमला** पु. रेशमी शेला, खेस. – मुंब माड ३६१.

**थिर, थिरथिर** उद्गा.शेळ्या इ. ना हाकलताना वापरण्याचा शब्द. [ध्व.]

**थिर** वि. १. स्थिर; निश्चल; शांत: 'सभ्य थिर जें गंभीर ।' – वेसीस्व ५.१७. २. बळकट. [सं.स्थिर]

**थिरकणे** अक्रि. १. डौलाने, थाटाने चालणे. २. निघून जाणे. (व.)

**थिरणे** अक्रि. स्थिर उभे राहणे: 'पार्थाचा धैर्य न दे रिपुदमनीं त्या नदा शर थिराया' – मोकर्ण ३६.४५. [सं.स्थिर]

**थिरथिर–रा** क्रिवि. १. चंचलपणे. २. मंदमंद; संथपणाने : 'थिर थिर थिरावे नाच । प्रेमळ भक्तांचा ।' – दास १४.४.१७. [सं.स्थिर]

**थिरबिटी** स्त्री. पातळ द्रव्य; बिरबिटी; बिरबिरीत शेण; पातळ लोणी; चिखल; ज्यात पाणी फार पडले आहे असे पीठ.

**थिरमा–मे** पु. न. पहाडी मेंढ्यांच्या लोकरीपासून बनवलेले वस्त्र : 'राजश्री आपा डेरियास गेले होते तेथें दिली थिरमे जोडी' – पेद २२.३४.

**थिराई** स्त्री. शांतता; स्थिरता; स्तब्धता; निवांतपणा. [सं.स्थिर]

**थिराईखाली, थिरेथिरे** क्रिवि. शांततेने; स्वस्थपणाने; सौम्यपणे.

**थिरावणे** उक्रि. थांबणे; थांबवणे; राहणे; राहवणे; विश्रांती घेणे; चालू ठेवणे; स्थिर होणे. [सं.स्थिर]

**थिल्लट** वि. १. मंद, थंड, दीर्घसूत्री, चेंगट (मनुष्य, काम, व्यवहार). २. पातळ व विरळ धाग्यांचा (कपडा). ३. क्षुद्र; नीच; हलकट, घाणेरडा; बेअब्रूचा. [सं.शिथिल]

**थिल्लटाई** स्त्री. १. मंदपणा; थंडपणा; निष्काळजीपणा; सुस्ती. २.(कापडातील) धाग्यांचा विरळपणा. ३. हलकटपणा; नीचपणा.

**थिल्लर** न. तळे; डबके: 'काय थिल्लरीचे पाणी ।' – तुगा ७००.

**थिल्लर** वि.(ल.) उथळबुद्धी; मंद (मनुष्य). [सं.शिथिलतर]

**थिवथिव** स्त्री.(पावसाचे) थेंबथेंब पडणे. [ध्व.]

**थिसुअंत** पु. स्तुतिपाठक : 'मग थिसुअंत थिडसुड वाजवित खलेआ वलघले' – कला १५.

**थिसुणे** क्रि. स्तुती करणे : 'थिसुइल तरि गुइल'– कला १५.

**थिंकणे** अक्रि. चरफडणे; शोक करणे; रडणे.

**थीक** न. खोटे रत्न.

**थीर थीर** क्रिवि. हळूहळू : 'रामरथ गजभारीं । थीर थीर मिरवे ।' – वेसीस्व ७.८०.

**थीव** न. संकेतस्थान; ठरविलेली जागा.(को.) [सं.स्थान]

**थु, थुः थूः** उद्गा. (निंदाव्यंजक) छीः! थूः ! [ध्व.]

**थुई** स्त्री. थुंकी. [ध्व.]

**थुईथुई** स्त्री. झिमझिम; बुरबुर (पावसाची).
क्रिवि. झिमझिम; थिवथिव; थेंबथेंब (पाऊस पडणे): 'कारंजीं कैशी दिसती । उडतांना थुइथुइसा शब्द करिती ।'– रत्नप्रभा ४२. [ध्व.]

**थु(थुं)कणे** उक्रि. पिंक, थुंकी बाहेर टाकणे.[ध्व.थू] (वा.) **तोंडावर थुंकणे** – छीः थूः,निंदा करणे.

**थुकदाणी–डी** स्त्री. पिकदाणी.(गो.)

**थुकबेदमालगोष्टी** स्त्री. शुष्क, निष्फळ गोष्टी : 'शुष्क भाषण पोकळ ऐकून थुकबेदमाल गोष्टी बोलून आपले घरास यावे ही चाल येथे पडली आहे.' – मशिरा ५ पृ.१३९.

**थु(थुं)करणे** सक्रि. थुंकणे.

**थु(थुं)का–की** पु. स्त्री. तोंडातील द्रव; पिंक. तोंडात जमा होणारी बाहेर टाकलेली लाळ. [थू] (वा.)० **घालून काम करणे** – (थुकी वाळेपर्यंत) जलद काम करणे. ० **झेलणे** – हांजी हांजी करणे; गुलामासारखी चाकरी करणे. ० **तोंडावर उडणे, घेणे, येणे** – फजिती करून घेणे. ० **तोंडावर उडविणे** – छीः थूः, निंदा करणे; शिव्या देणे. ० **न ओलांडणे** – दुसऱ्याच्या मताने वागणे. **थुकला थुका चाटणे** – निंदापर, वाईट शब्द, वचन, आश्वासन परत घेणे. **थुक्याने भिजती चांदण्याने वाळती** – (जी लवकर ओली होते व वाळते अशी) निकस, निःसत्त्व जमीन.

**थुक्याचे काजळ** क्षुद्र व कुचकामाची वस्तू.

**थु(थुं)टा, थुंटण** वि. थोटा.

**थुडथुड** स्त्री. (थंडीने भरणारे) कापरे, काप. [ध्व.]

**थुडथुडा** स्त्री. छीः थूः; फजिती. (व.)

**थुड्डी** स्त्री. शत्रूच्या हनुवटीवर केलेला वार. - मवि ९.११. [हिं. ठुड्डी]
**थुतलना** अक्रि. १.घुटमळणे २. चाचपडणे. (झाडी)
**थुत्तर** न. गालफड.
**थुत्ल्या** वि.संथ; आळशी. (झाडी) [सं.स्थूल]
**थुथुल्या, थुयो-य्यो** पु. (विटीदांडू आणि इतर खेळ) सावध नसल्याचे दर्शवणारा शब्द. (हाताला थुंकी लावून ती वाळेपर्यंत खेळात नसल्यासारखे वागणे.) [ध्व.]
**थुपथुपी** स्त्री. मुलींचा एक खेळ. - मखेपु ३३७.
**थुम(मे)काल-र, थुमोकले** (इडापिडा टळो अशा अर्थी) घातलेल्या शपथांचे निरसन करणे; अपशब्दांचा परिहार.
**थुरटा** पु. काळोख: 'आकाशी दाटली धुवांची धुई । तोचि हा थुरटा दिसे।' - कृमुरा २३.७०.
**थुरथुरवणे** सक्रि. (केस,कान,डोळे) टवकारणे, उभारणे; भयंकर रीतीने पाहणे. [ध्व.]
**थुरा** पु. (जनावरांच्या) शिंगाचे केलेले वाद्य. (गोंडी,झाडी) [सं.तूर्य]
**थु(ठु)ली** स्त्री. भरड दळलेले गहू; सांजा; सोजी. [हिं.]
**थुवर** स्त्री. थोर नावाची वनस्पती. ही कुंपणासाठी लावतात.
**थुळेवचे** अक्रि. तोषणे; संतोष पावणे. (गो.)
**थुंकीझेल्या** वि. खुशामत्या; हांजी हांजी करणारा.
**थुंगा-ग** पु. जमाव; मेळा. (व.)
**थुंगुश्शा** क्रिवि. (मुलींत रूढ) खेळ चालू असताना काही काळ रजा घेताना देण्याची सूचना. (क्रि. घालणे). [ध्व.थू]
**थू** पु.स्त्री. थुंकी : 'कीं सुज्ञहि न असे जे घेती भरवुनि निजास्य ते थूनी ।' - मोसभा १.५०.
क्रिवि. थुंकण्याचा आवाज करून.
**थू** स्त्री. गुप्त गोष्ट. (गो.)
**थूक** पहा: **थुंकी**
**थूडी** वि. उतावळा; युद्धोत्सुक : 'थूडी पाढसळे बळे प्रतपतू ।' - गस्तो ७४.
**थे** चतुर्थीचा प्रत्यय: 'तीयेथें भोगिलें नागवला ।' - उषा १४४७.
**थेकुटे-डे-ले** वि. १. क्षुद्र; लहान: 'तैसी सद्बुद्धि हे थेकुटी । म्हणों नये।' - ज्ञा २.२३८. २. आखूड; अपरे; ठेंगणे; थोटे. [सं.स्तोक]
**थेकुले** न. मतिभ्रम; गोंधळ : ' सांधै पां काइ थेकुले । घडलें आम्हा ।' - ज्ञा १.२६३.
**थेट** वि. अस्सल; चोख; शुद्ध; खरा : 'बोली महाराची थेट मराठी ।' - दामाजी.
क्रिवि. १. बरोबर; हुबेहूब; यथान्याय. २. नीट; लगेचच; न थांबता; न बदलता; न वळता; सरळ. (समासात) थेट पैठणी-नगरी - सणंग, भांडे, पैठण, नगर या गावातच घडवलेला जिन्नस. [सं.तत्रस्थ; हिं.]
**थेट खरि(रे)दी** जिथे माल तयार होतो त्याच ठिकाणी केलेली खरेदी.
**थेटणे** अक्रि. चिकटणे; भिडणे; खेटणे.
**थेटपट्टी** स्त्री. खरेदी केलेल्या मालाची मूळ ठिकाणची यादी, नोंद; बीजक.
**थेटम** पु. थाटमाट; नट्टापट्टा; चट्टीपट्टी. (व.)
**थेटलष्कर** पु. तंबू ठोकणारा.
**थेटे, थेटे पडसे** न. सर्दी; थंडी. (क्रि. येणे, लागणे, होणे.).
**थेतरेपणा** पु. कंप; अडथळा; घुटमळणे : 'तान मारतांना किंचित थेतरपणा येई' - माभ ३८९.
**थेबड** पु. मळवट : 'कुंकुमाचा कपाळभरी थेबडु लाविला '-गोप्रच १५३.
**थेर** पु. १. माकडाचा खेळ करणारी एक जात. २. स्त्रीच्या वेशात नाचणारा मुलगा. याला राधा म्हणतात. ३. नक्कल; विडंबन; अनुकरण. (क्रि. आणणे, करणे, नाचणे, मोजणे.)
न. तऱ्हेवाईक, विलक्षण, बेअब्रूचा मनुष्य.
न. पु. पोरचेष्टा; चाळे. [सं.स्थविर; क. तेर]
**थेर, थेरडा** वि. खप्पड; जर्जर; म्हातारडा (मनुष्य). [सं.स्थविर]
**थेरकरी** वि. नर्तक; नाच्या; नट : 'जैसा थेरकरी नटला मानभावपणे मोडूनी टाकून मांडिलें नाचणें ।' - योसं १८.१८१. [सं.स्थविर]
**थेरभांड** पु. वडीलधाऱ्यांशी भांडणारा. -प्रामको. [सं.स्थविर]
**थेरभोरपी** पु. अव. डोंबारी; खेळकरी; तमासगीर; कोल्हाटी.
**थेरयो-वो** पु. अंगावर खवले असलेला साप. हा आपल्या अंगाची गुंडाळी करून स्वत:चा बचाव करतो. (गो.)
वि. म्हातारडा (मनुष्य).
**थेरीण** स्त्री. पहा: **थेर २**
**थेरू** न. थरू; दांडा; (कुऱ्हाड, फावडे इ. ची) मूठ. [सं.त्सरू]
**थेला** पु. १.जळाऊ लाकडाचा ढलपा. २. (अव.) डेरेदांडे.
**थेवनीकी** पु. व्याजाने पैसे घेऊन व्यापार करणारा. (गो.)
**थेळ** न. १. स्थळ. २.देवस्थानाच्या भोवती असलेली लोकवस्ती.
**थें** अ. साठी; करिता : 'आनंद नरसिंहदेवाथें ...' - कान्हेगाव शिलालेख १.२६. [सं.अर्थे]
**थेंब, थेंबका-टा-डा, थेंबोरा** पु.न. १. बिंदू; ठिपका. २. प्रलयकाळचा मेघ. ३.पाऊस. (व.) [सं.स्तिम्]
**थेंबनळी** स्त्री. शाई किंवा द्रव, औषध घालण्यासाठी एका टोकाला रबराचे पोकळ टोपण (द्रव ओढण्यासाठी व बाहेर टाकण्यासाठी) असलेली लहान नळी; (इं.) ड्रॉपर.
**थेंबाथेंबी** क्रिवि. थेंबथेंब.
**थेंबु(बो)टा** पु. लहान थेंब; बिंदू : 'थेंबुटा सागरीं मिळाला.' - दास ८.६.४३.
**थैक-थै** उद्गा. गुरे हाकण्याचा शब्द: 'गाय निघाली खाऊं साळी! थै, थै म्हणतां ओढाळी ।' - कथा २.१०.११३. [ध्व.]
**थैकार-थ(थै)य्या, थैथय्याट** पु. मोठा आनंद; आनंदीआनंद; नाचणे; गाणे; खेळणे : 'हैकार थैकार,जैकार। तळप चवरें चमत्कार।' - भारा किष्किंधा ९.४४. [ध्व.] (वा.)**थैय्या घेणे, घेऊन बसणे** - १. गडबडा लोळणे, ओरडणे इ. प्रकारे संताप व्यक्त करणे; रागाने, अधीरपणाने नाचणे. २. सगळ्या घागऱ्या हालवून एकसारखे नाचणे. ३.जोराचा प्रयत्न करणे.
**थैथै, थैथैय्या** क्रिवि. मोठ्या आनंदाने; खिदळून (नाचणे, उड्या

मारणे); आनंदाने नाचताना होणाऱ्या आवाजाप्रमाणे आवाज होऊन : 'नाचवितो थैथै तेथें।'- संग्रामगीते ४६. (क्रि.नाचणे,करणे).[ध्व.]

**थैबड** न. १. कपाळावर केलेला औषधाचा अथवा गंधाचा लेप. २.(रक्ताची) गुठळी; (लाळ, शेंबूड इ.चा) लपका; (सारवलेल्या जमिनीवरील शेणाचा) पोपडा; घाणीचे लहानसे थारोळे.

**थैमान** पु. रडणे; ओरडणे; आदळआपट; गोंधळ . (क्रि. करणे, मांडणे, घालणे.). [ध्व.थै थै]

**थैमाला** वि. दंगा करणारा; अवखळ: 'शिवं शेजारी येवडा मळा ऐकूं येत्याती सारं बोलं, बाळा बैल थैमाला थीर चाल.' - बा १६१. (ना.)

**थैला** पु. १. पोते अथवा मोठी पिशवी. २.(उशी इ.ची) खोळ. [हिं.]

**थैली** स्त्री. १. पिशवी. २. सैन्यातील शिपायांची अन्न, कपडे इ. ठेवण्याची पिशवी. ३. (ल.) मोठ्या व्यक्तीकडून मोठ्या व्यक्तीकडे जाणारे-येणारे पत्र: 'आतां तुकोजीरावांना एक थैली लिहा.'- इंप ७२. [त.शाळी, शाळीगे]

**थैलीशहा** पु. भांडवलदार: 'आर्थिक सत्ता अद्यापहि थैलीशहांच्याच हातात आहे.' - जागृत आफ्रिका.

**थो** स्त्री. खेळातील तात्पुरती विश्रांती; थुश्शो. (कु.) [ध्व.]

**थोई-य** पहा: **थुथुल्या**

**थोक** पु. १. रेशमाचे एक परिमाण; चार कळ्या अथवा लहान काटक्यांना गुंडाळून होईल इतके रेशमाचे परिमाण; दहा कळ्यांचा गुंडा. २. कापसाचा गठ्ठा. ३. एकूण जमाव: 'फौज थोक पांच हजार पावेतो'- पेद ११.३४. [सं.स्तोमक]

**थोक** न. गुप्तता; लपून राहणे :'नाना अप्रौढबाळकीं । तारुण्य राहे थोकीं ।'- ज्ञा १३.७९ .

**थोकडे** वि. थोडे; अपुरे : 'हें पांडवसैन्य कीरू थोकडें' - ज्ञा १.११९. [सं. स्तोक]

**थोकणे** सक्रि. उभे रहावयास, थांबावयास लावणे.
अक्रि. १. थांबणे; बंद होणे; स्थिरावणे: 'की थोकले कैवल्यनिधानु।'- शिव ५८. २. गुप्त होणे. ३. येऊन ठेपणे. ४. लहान होणे.[सं.स्तुभ्]

**थोक थोक** क्रिवि. अगदी तपशीलवार : 'आठ पंधरा दिवसाआड येवतेश्वरास जाऊन दरबारचे थोक थोक वर्तमान सांगत जाणें.' - पुरं द भाग १ पृ. १५२.
वि. मोठे मोठे; प्रमुख : 'जमीदारासी तूर्त स्नेहच करून थोक थोक हातीं घेतले आहेत.'- पुरं द भाग २९, पत्र नं. ५.

**थोकबंद** वि. ठोकळ; घाऊक.

**थोगा** पु. समुदाय; जमाव; कळप : 'ठांइं ठांइं स्वापदाचे थोगे ।'- ज्ञा ११.२५३.

**थोट** न. कुभांड.
पु. ठक. - शर.

**थोट, थोटण** न. १. खुंट; खोड ( झाड इ.चे); थोंटा. २. (कड्याचे) धाट; ताट.

**थो(थों)ट-ठ** वि. नीच व आडमुठा; दांडगा; झोंड; (कर्ज परत करण्याच्या वेळी )भांडणारा: 'थोट उद्धट लंपट।'-दास २.३.३०.

**थो(थों)टा, थोटक** वि. हातपाय इ. तुटलेला; वरचा शेंडा, झुपका गेलेले; खोड झालेले (झाड); (शेपूट तुटल्यामुळे) लांडा झालेला. [सं.स्थगु; हिं.ठूंट; क.मोटि]

**थोटाई** स्त्री. नीचपणा; पाजीपणा; दांडगाई.

**थोटा पिंपळ** (ल.) ज्याला बायको, मुलेबाळे, घरदार नाही असा मनुष्य; सडेसोट.

**थोटावणे** अक्रि. १. कुंठित, स्तब्ध होणे: 'मौनपणें वाचा थोंटावल्या चारी । ऐसें तुझें हरी रूप आहे।' - तुगा ३७५७. २. निर्बल होणे; लुळे पडणे : 'नुसुधेपणें थोटावला । अनुभव जेथ।' - अमृ ५.५८. ३. उणे पडणे. ४. अवमानित होणे : 'परि म्हाळसा थोटावली ठाकेल' - लीचऊ २३४.

**थोटू(ठू)क** न. खुंट; थोटण; तुकडा. [सं.स्तुप्]

**थोटे** न. स्तुतिपाठक : 'गाने : भाटे: थोटीं :' - लीचउ १७३. [सं.स्तु]

**थोडका, थोडा** वि. अल्प; अपुरा; लहान.[सं.स्तोक] (वा.) **जीव थोडा थोडा होणे** – काळजी वाटणे.

**थोडकावणे** उक्रि. कमी होणे; तुटणे; घटणे; (परिमाण, संख्या, जोर इ. चा) ऱ्हास होणे.

**थोडक्यात** क्रिवि. थोड्या वेळात, जागेत; संक्षिप्तपणे, लवकर.

**थोडाच** वि. क्वचित; विरळा :'पण त्यांचें प्रेमपूर्वक अध्ययन करणारा थोडाच मनुष्य सांपडेल.' -नि ५५५.

**थोडाथोडका-बहुत, थोडाफार** वि. अल्प प्रमाणाचा; अगदी माफक.

**थोतरणे** सक्रि. सुजणे; वर येणे.

**थोत(द)री** स्त्री. तोंडाची एक बाजू; गाल; थोबाड.

**थोत(थ)ली** स्त्री. फोपसेपणा; मेदवृद्धीमुळे त्वचेला येणारी शिथिलता. [सं.स्थूल]

**थोताडे** धुताड शिपाई; सरकारचा बेलिफासारखा हुकमाची अंमलबजावणी करणारा दूत, शिपाई.

**थोतांड** न. १. कल्पित गोष्ट; खोटा हक्क; खोटे, दाखवलेले कारण; कुभांड; नाटक. (क्रि.रचणे, मांडणे).२. पाखंड; लबाडी.

**थोती(थी)ल** वि. स्थूल; लठ्ठ. [सं.स्थूल]

**थोप** स्त्री. १. थांबवलेली, आटोपून धरलेली स्थिती (होडी इ.ची); थोपवून धरणे. २.पाण्याची थाप; धक्का; बंधारा. ३. टप्पा; मुक्काम; विश्रांतिस्थान. ४. मुक्कामाचे कारण. ५. (ल.) शेवट; सीमा; मर्यादा. (क्रि. राखणे, सांभाळणे, टाळणे, टळणे.). ६. घट्ट उभे राहणे; दम धरून असणे; जागा सांभाळणे. (क्रि.राखणे, ठेवणे, धरणे, बुडविणे, बुडणे.); आणीबाणीची वेळ, पत सांभाळणे; अब्रूचा सांभाळ. ७. प्रसंग; अब्रू; दबाव : 'लष्करांत फितूर असें असतां थोप सांभाळून, तह केला आणि यश घेतले.'- मशियांका पृ. ६७७. ८. पुरामुळे अडलेले प्रवाहाचे पाणी.(झाडी) [सं.स्तुन्द]

**थोपकाड** पु. तोंड. (झाडी) [हिं.थोबडा]

**थोपकाडना, थोबाडना** सक्रि. मारणे. (झाडी)

**थोपटणे** सक्रि. १. थापटणे; हळू हळू थापडणे. २.फूस लावणे; थापटून, गोंजारून वश करणे. [त.शीराड्ढ; सं. स्फोटन]

**थोपटीव** वि. थोपटून आकार आणलेले, घडलेले (मडके, पोळी, गोवरी, मातीचे चित्र).

**थोपणे** उक्रि. १. थांबणे; थांबवणे; टेकू, नेटावा, आधार देणे; मूळ स्थितीत ठेवणे. २. मदत करणे, करवणे; साहाय्य देणे. ३.(पालखी, डोली इ.) खाली ठेवणे; उचलणे. (उचलण्याच्या वेळी दुसऱ्याची मदत लागते म्हणून पालखीवाल्यांत हा शब्द रूढ आहे.) ४. थोपटणे. ५. गती थांबणे: 'बंधूसहित होता मागें। तया स्थानीं थोपला।' – मुआदि २९.१५७. [सं.स्तुभ्]

**थोपाथोपी, थोपवाथोपव** स्त्री. थांबवणे; शांत करणे; शमवणे; काही वेळ दाबात ठेवणे (भांडण, सावकाराचा तगादा); समजावणी.

**थोबड** वि. १. रुक्ष; नीरस; बेढब : 'पांतां चंद्रबिंब थोबडें'– शिव ४०७. २. लहान : 'कीं उखेकाळीं बाळार्कबिंब एकी कोडी : उगवली दीसती थोबडीं' – नरुस्व ९३४.

**थोबणे** अक्रि. लाजणे : 'आंगचेनि दळभिडें । पांतां चंद्रबिंब थोबडें।'– शिव ४०७. [सं.स्तुभ्]

**थोबले राहणे** थबकून राहणे : 'बसालतजंगानें लिहिलें होते. त्याजवरून थोबले राहिले.' –राजवाडे १ पृ.१६३.

**थोब(बा)वाईक, थोपट(ड)वाईक** वि. कोणीही जाता येता ज्याला चपराका माराव्यात असा माणूस.

**थोबाड–डी, थोबकाड** न. स्त्री. पहा : **थोतरी** (कुरूपपणा, स्थूलपणा, घाणेरडेपणा इ. दर्शक निंदाव्यंजक शब्द.) [सं.स्थपुट] (वा.) ० **फोडणे, रंगवणे** – तोंडात मारणे; चांगली अद्दल घडवणे. **थोबाडात माती घालणे** – शरम आणणे.

**थोबाडणे** सक्रि. १. तोंडात चपराक, चापटी मारणे. २.(ल.) बिघडणे; विस्कटणे; पराजित करणे.

**थोम** पु. रोपाचा बुडखा; ठोंब. (व.) [सं.स्तंब]

**थोमाळणे** सक्रि. शांत करणे; थोपटणे; गोंजारणे. [सं.थुम्]

**थोय** न. (लुगड्याचे) अंग. (तंजा.) [सं.स्था]

**थोर** स्त्री. तळे : 'चला जाऊं थोरांत थोराचं पाणी आटलं' – घाश्रलो १३८.

**थोर** वि. १. मोठा; स्थूल. २. (ल.) पूज्य; श्रेष्ठ; सन्मान्य; वय, ज्ञान, कुल, पदवी, अधिकार इ. नी मौठा. ३. परिमाणाने, संख्येने मोठा; फार; बहुत; अतिशय.[सं.स्थविर, स्थूल] (वा.) ० **करणे** – दिवा मालवणे. **थोरथोरा, थोरल्या घरचा** – (उप.) मोठ्या कुळातील म्हणजे महार अथवा परवारी.

**थोरबारस** न. मोठे; अवाढव्य : 'थोरबारसें फरगात जे वारियाविण प्रयोजनाचेच नव्हतें.'– आज्ञापत्र धुळे आवृत्ती पृ.४१.

**थोर भांडे** महत्त्वाचा विषय; मोठ्या वसुलाचा प्रदेश: 'परगण्यांत बखेडा कामाचा नाहीं. थोर भांडे. हंगाम गेला म्हणजे मजकूर ठकावून जाईल' – ऐलेसं ५२४४.

**थोरला** वि. मोठा (वयाने इ.); आधीचा; अगोदर जन्मलेला.

**थोरला कुंवर** पुनर्वसु हे नक्षत्र; (शेतकऱ्याच्या भाषेत ) म्हातारा कुवर.

**थोरली आई** १.अक्काबाई; अवदसा; लक्ष्मीची मोठी बहीण. २. मातृभूमी.

**थोरली पहाट** सूर्योदयापूर्वीचा प्रहरभराचा कालावधी.

**थोरले घर** १. तुरुंग. २. कुंटणखाना. ३. दारूचा गुत्ता.

**थोरवट** वि. १. मोठ्या आकाराचे. २.उच्चकुलीन. ३.(ल.) मोठा; प्रौढ; सभ्य.

**थोरवी, थोरवकी–वट–वाई,थोराई, थोरी** स्त्री. १. मोठेपणा; ऐश्वर्य; भव्यता; मानमरातब. २. वयामुळे प्राप्त झालेला मोठेपणा, मान. ३. कीर्ती; नावलौकिक; प्रतिष्ठा; श्रेष्ठता; महत्त्व. ४. मोठेपणा: 'मानितां कृष्णाचा थोरवट । व्यर्थ तुम्ही ।' – कथा १.१२.४८.

**थोराड** वि. १. मोठा; बळकट; घट्ट; दांडगा; धीट. २. वयाच्या मानाने अधिक वाढलेला, मोठा दिसणारा. ३. सामान्य असावा त्यापेक्षा मोठा.

**थोराय** पु. ज्येष्ठ अधिकारी :'माई राउत देशाअधीपती । तेयाचा भीवु थोरायु' – मनुर शिलालेख १.४. [सं. स्थावर]

**थोराव–वा, थोरीव** पु. स्त्री. १. थोरपणाची जाणीव; अहंता; थोरवी. २. महत्त्व; विस्तार.

**थोरावणे** अक्रि. १. मोठे होणे; बांधा, स्थूलपणा वाढणे. २. मान्यता, गर्व, महत्त्व इ. नी वाढणे.

**थोरि** स्त्री. कड, काठ : 'तंवं कुचतटाचिआं थोरिआं । देओ न पुरती ।' –शिव ६५५.

**थोरीवडा** वि. थोरपणाचा : 'दारिद्रें चिवडाचि सर्व, दवडा थोरीवडा पांवडा।' – आसुदा ४९.

**थोवेकार** पु.१. सवंगडी : 'तवं थोवेकारीं भणितलें गोपाळीं ।'– दाव ७५. २. स्तोमकरी; पथकी : 'मेळविले थोवेकारीं । कडवां पाशी ।' – शिव ५०२. [सं.स्तोमकरी]

**थोंगणे** सक्रि. गाणे म्हणणे. – शर. [ध्व.]

**थोंगाथोंगी** क्रिवि. ठायीठायी : 'थोंगाथोंगीं इतर । राजे जे तयांचे भार।'–गीता १.३४०. [सं.स्तोम]

**थोंब** पु.न. १. गुच्छ; झुपका; गेंद; तुरा; (गवत इ.चा) पुंजका. २. लहान झाडांचा समुदाय.

**थोंब** न. स्तोम; ढोंग : 'वेगळेंच थोंब तयानें केलें।' – ह १०३९. [सं.स्तोम]

**थौरथार** क्रिवि. स्थिरस्थावर : 'दोन दिवस थौरथार जाहला म्हणजे अवघेच रुजू होईल.'– पेद २१.



द

द मराठी वर्णमालेतील तेहतिसावे अक्षर व अठरावे व्यंजन.

**द, दकार** (सांके.) १. हे अक्षर इतर वर्णांच्या लोकांकडून ब्राह्मणांना जाणाऱ्या पत्रांच्या सुरुवातीला 'दंडवत' या अर्थी लिहीत. २. ब्राह्मणांकडून इतरवर्णीयांना जाणाऱ्या उलट पत्रांमध्ये आशीर्वाद, कल्याण यांचे वाचक म्हणून पत्राच्या प्रारंभी लिहीत.

**द** वि. देणारे. (समासात) सुख-द, दुःख-द, मोक्ष-द इ. [सं.]

**दकणे** क्रि. आज्ञा बघणे. (अहि.)

**दखल** पु. १. प्रवेश : 'लढाई न होतां किल्ल्यांत दखल झाला.' – राज ५.६२. २. ढवळाढवळ. ३. ताबा : 'कुल राज्य आपलें, देखील कर्नाटकहि आपणांस सारें दखल आहे.' – चित्रगुप्त १२०.
वि. १. (हिशोबात इ.) प्राप्त झालेला; पोचलेला. २. मांडलेले; लिहिलेले. ३. ज्ञात; परिचित; श्रुत. (क्रि. करणे, कळविणे, देणे, सुचविणे.) : 'राजबीज खरें हें... सर्वांस दखल आहे.'– राज ८.१९८.[अर.दख्ल्] (वा.) ० **घेणे** – विचारात घेणे; नोंद घेणे.

**दखल** स्त्री. इजा; धक्का; अपघात. (व.)

**दखलगिरी** स्त्री.१. माहिती; परिचय; (काम, ज्ञान इ. संबंधी) प्रावीण्य : 'चारशें वर्षेपर्यंत कोठें दखलगिरी अगर नांवही नाहीं.' – वाडबाबा २.१५. २. देखरेख; (कामकरी लोकांवर) नजर ठेवणे. (क्रि. ठेवणे, राखणे.). ३. बातमी देणे; माहिती सांगणे.(क्रि. करणे, देणे.). ४. ढवळाढवळ: 'बापाजी मुसल्मान यासी दखलगिरी करावयास गरज नाहीं.' – राज १५.२९. ५. (ल.) उत्पन्न : 'तुम्हांस कांहींच पर्गणेयांत दखलगिरी न जालीं.'– राज १.२३१.

**दखलदाद** स्त्री. १. (सरकारी कागदपत्रांत रूढ) मिळवलेली माहिती; अनुभव. २. अनिर्णीत प्रकरणांची नोंद.(क्रि. करणे). [अर.]

**दखलपात्र** वि. पोलिसात नोंद घेण्यालायक (गुन्हा, तक्रार).

**दखलबाज–द** वि. (विशेषत: कागदपत्रांत) समाविष्ट, माहीत असलेला; अनुभवात असलेला; दाखल केल्यानंबर नमूद: 'त्यापैकीं मजुरा द्यावयाचे करार केले तें दखलबाज बार केले असते.' – वाडसमा १.१७५. समासात पुढील शब्दांशी जोडून दखलबाद –कलम– जमा–खर्च–मजकूर–रकम. [अर.]

**दखीण** स्त्री. दक्षिण दिशा: 'वीघ्नेश्वरा दखीण भागें ।'–उषा ९.९४.
पु. दक्षिणेचा वारा.(गो.) [सं.दक्षिण]

**दख्खन** पु. नर्मदेच्या दक्षिणेचा प्रदेश; दक्षिण हिंदुस्थान. [सं.दक्षिण]

**दगटणे** अक्रि. खेटून, चिटकून बसणे.

**दगटली** स्त्री. (पदार्थ ठेवण्याची) दगडी. (तंजा.)

**दगड** पु. १. धोंडा; शिळा; पत्थर; शस्त्रावाचून सामान्य प्रयत्नांनी फुटत नाही व पाण्याने विरघळत नाही असा पृथ्वीचा अवयवभूत पदार्थ. २. न्हावी लोकांचा वस्तऱ्याला धार लावण्याचा दगड; निष्णा.
स्त्री. मोठा दगड; खडक; शिळा. ( हा शब्द आणि या प्रकारचे इतर शब्द. उदा. दगडमाती, धोंडा, माती इ. शब्द; एखाद्या माणसाची बुद्धी, ज्ञान, मालमत्ता इ. कुचकामाची आहे असे दाखवायचे असताना उपयोगात आणतात.) [सं.दृषद्; क. दक्कड] (वा.) ० **उचकणे** – एखाद्याविरुद्ध कारस्थान करणे. ० **उचलणे, घेणे, हाती घेणे, फेकणे, मारणे, दगडमार करणे** – रागाने वेडावून जाणे; बेफाम रागावणे. ० **खाऊन दगड जिरविणे** – अतिशय सशक्त कोठ्याचा असणे; काहीही पचवण्याची शक्ती असणे. (कर.) ० **चहूकडे टाकून पाहणे** – प्रत्येक उपाय किंवा युक्ती योजून पाहणे; सर्व दिशांनी प्रयत्न करणे. ० **टाकून ठाव घेणे, पाहाणे** – तळ शोधणे अथवा खोली शोधण्याचा प्रयत्न करणे; खुबीदार प्रश्न विचारून दुसऱ्याच्या मनातील विचारांचा अंदाज बांधणे. ० **नि धोंडे** – (बायकी) सटरफटर, क्षुद्र गोष्टी. **दगडाखाली हात सापडणे, गुंतणे** – काही दुःखकारक अडचणीत, पेचात, नुकसानकारक कामात सापडणे. **दगडाखालून हात काढून घेणे** – अडचणीच्या कामातून स्वत:ला युक्तीने मोकळे करून घेणे. **दगडाची साल, दगडाचा दोर काढणे** – दुष्कर, अद्भुत किंवा अशक्य गोष्ट करणे. **दगडाची छाती** – १. साहसी; निर्भय; बेदरकार; धैर्यवान व सोशीक मनुष्य. २. धारिष्ट; प्रचंड धैर्य; दृढनिश्चय; दिलेरी. (क्रि.करणे.) **दगडापरीस, दगडापेक्षा वीट मऊ** – (हाल, अपेष्टा इ.) दोन स्थितींची, गोष्टींची तुलना करून त्यातल्या त्यात एक बरी असे दाखविणे; निरुपाय म्हणून मोठ्या संकटापेक्षा लहान संकट पत्करणे. **दगडाला पाझर आणणे – निघणे – फुटणे – येणे, दगडाला पान्हा आणणे, दगडाचे, दगडापासून दूध काढणे** – १. नैसर्गिक नडी, अडचणी न जुमानता आपले हेतू सिद्धीला नेणे; अशक्य गोष्ट घडवून आणणे. २. कठीण हृदयाच्या अथवा कंजूष मनुष्याला दया आणणे. **दगडावरची रेघ–** कधीही न बदलणारी, खात्रीची, कायमची गोष्ट. **दगडाशी गाठ पडणे** – कठोर, गळग्रह अथवा न देते कूळ इ. च्या तावडीत सापडणे. **दगडाशी भांडणे** – बलाढ्य शत्रू, मोठी अडचण, कठीण काम इ.शी झगडणे.
वि.(ल.) अज्ञ; अडाणी; मूर्ख; मंदबुद्धीचा (माणूस).

**दगडघाशा** वि. १. हेंगाडा; रानटी; अडाणी; अकुशल (कामगार). २. ओबडधोबड, वाईट आकाराची (वस्तू).

**दगडघाशी** स्त्री. १. कठीण, श्रमाचे काम. २. दळण्याशिवाय इतर काम न करणारी, न ऐकणारी स्त्री.
वि. १. श्रमदायक, कष्टकारक, कठीण व दुःखदायक (काम).२. कष्टाळू; हटून, तटून, झटून मेहनत करणारा; उद्योगी. ३. त्रासदायक रीतीने हट्ट करणारा; आग्रही; घासाघिश्या.

**दगड–डी चौथ** गणेशचतुर्थी. ( या दिवशी चंद्र पाहिल्यास चोरीचा आळ येतो. तो टाळण्यासाठी दुसऱ्यांच्या घरांवर दगड फेकण्याची जुनी पद्धत आहे त्यावरून रूढ.)

**दगडतळी** स्त्री. उचलून दुसरीकडे नेता येण्याजोगे दगडाचे भांडे; दगड कोरून तयार केलेले ताट, वाटी, दगडी (कढी इ. पातळ पदार्थ ठेवण्याची).

**दगडती** स्त्री. चिनीमातीची, खापराची वाटी. (व.)

**दगडपोळ** स्त्री. न. (चुना, माती विरहित) नुसत्या दगडांची घातलेली भिंत; गडगा.

**दगडपोळे** न. नकली अथवा खोटे पोवळे.

**दगडफूल** न. पावसाळ्यात दगडावर किंवा लाकडावर उगवणारी पांढरी वनस्पती. औषधांत किंवा मसाल्यांत उपयोग. रंग पांढराकाळा मिश्र.

**दगडफेक** स्त्री. जमावाने प्रक्षुब्ध होऊन केलेली दगड मारण्याची कृती.

**दगडफोड** स्त्री. कठीण आणि कष्टाचे काम; महत्प्रयासाचा उद्योग. वि. १. कठीण; अवघड; दुःखदायक; श्रमाचे (काम). २. परिश्रमी; जबरदस्त; प्रचंड (निश्चयाचा प्रयत्न अथवा वर्तन). ३. जोराचे; जाचक; कडक; कटू; राग आणणारे (भाषण). ४. सडसडून पडणारा (पाऊस); भडिमाराचा; तडाक्याचा (मारा).

**दगडफोडणी** स्त्री. मुलींचा एक खेळ. - मखेपु ९५.

**दगडफोड्या** वि. १. दगड फोडणारा. २. पहा: **दगडफोड** २. ३. हट्टी; आग्रही. पहा : **कपाळफोड्या**

**दगडमाळ–रान** पु.न. दगडांनी व्यापलेले, भरलेले ( रान, प्रदेश इ.).

**दगडशिवणी** स्त्री. (बायकी) एक खेळ. यात एका मुलीने डाव घेऊन बाकीच्या मुलींनी दगडावर उभे रहायचे व त्या मुली आपआपले दगड बदलत असताना डाव घेणाऱ्या मुलीने त्यांना शिवायचे व ज्या मुलीला ती शिवेल त्या मुलीवर डाव जाऊन पूर्वी जिच्यावर डाव होता तिने दगडावर उभे राहून खेळायला लागायचे.

**दगडसर** स्त्री. पावसाची जोराची सर, वृष्टी.

**दगड(डा)ळ** वि. दगडांनी भरलेले, बनलेले.

**दगडाळी** स्त्री. दगडांचा ढीग : 'आडुखळतां शिसांचीए दगडाळी' – शिव ९५५. [क. दकड + सं. आली]

**दगडांचे पेव** (ल.) कठीण, असाध्य काम (लग्न वगैरेचे); करायला, सहन करायला कठीण व त्रासदायक असे काम, गोष्ट.

**दगडी** स्त्री. १. दगडाचे भांडे. २. (ल.) बायकांच्या छातीवरील कठीण गाठ; अवाळू.
~ वि.१. दगडाचा केलेला; दगडाच्या जातीचा; दगडासंबंधी. २. दगडाळ. ३. कठीण; जाड; कठोर.

**दगडी कास** संकरित गाईला होणारा 'मस्टायटिस' नावाचा रोग.

**दगडी कासव** पाण्यात न राहता दगडात राहणारे कासव.

**दगडी कोळसा** खाणीतून निघणारा कोळसा.

**दगडी जोंधळा– शाळू** जोंधळ्याची एक जात. याचे कणीस भरदार असून दाणा कणखर असतो.

**दगडी निंबू** निंबाची एक जात. याची साल जाड असते. याचा उपयोग रंगांत वगैरे करतात. हे खाण्यायोग्य नसते.

**दगड्या** वि. १. ठोंब्या; मूर्ख; टोणपा. २.(मुलांच्या खेळात) संख्या पुरी करण्यासाठी घेतलेला काल्पनिक मुलगा; पित्त्या; जबरामसणा. (को.)

**दगदग, दगदा** स्त्री. १. खवखव; उपद्व्याप; त्रास; कष्टकारक, त्रासदायक श्रम; कंटाळा येण्याजोगे परिश्रम. (क्रि. काढणे). २. काळजी; कळकळ. [सं.दघ्, थक्क]

**दगदगणे** अक्रि. शिणणे; वीट येणे; त्रासून, दमून, गळून, थकून जाणे.

**दगदगा** पु. दरारा, भीती उत्पन्न करण्याचा गुण.

**दगदगी** वि. कळकळीच्या, काळजीच्या अंतःकरणाचा; सदा चिंताक्रांत; सदा शंकेखोर; संशयी.

**दगदगी** वि. बावन्नकशी; पारखून घेतलेले.

**दगदणे** अक्रि. दगदगीमुळे त्रासणे; दमणे : 'विदेसीं बहु दगदला । विश्रांती घ्यावया आला ।'–दास ३.४.२७. (व.) [दगदग]

**दगदावा** पु. १. मालकी हक्क; वारसा; दावा; स्वत्वसंबंध. (राजा.) २. गैरमर्जी; आकस; राग; वैर.

**दगल** स्त्री. फसविण्याची युक्ती; लबाडी; लुच्चेगिरी; विश्वासघात; कपट; निकमहरामी. [अर्. दघल्]

**दगलचे** अक्रि. नासणे; डागळणे. (गो.)

**दगलफसल** स्त्री. मुद्दाम, जाणूनबुजून केलेली लुच्चेगिरी; कपट.

**दगलबाज, दगा(गे)बाज,दगेखोर** वि. लुच्चा; कपटी; विश्वासघातकी.

**दगलबाजी, दगा(गे)बाजी, दगेखोरी** स्त्री. कपट; ठकबाजी; सोदेगिरी; हिकमतगिरी; विश्वासघात; अप्रामाणिक, कपटाची कृत्ये.

**दगा, दगादुगा, दगाफटका** पु. १. पहा : **दगलबाजी.** २. भय; कूटघात; अपाय; धोका, धोक्याची अथवा गुप्त नुकसानीची जागा. ३. जादू, विष, मूठ यांपैकी एखादे जेव्हा मरणाचे किंवा आजारीपणाचे कारण आहे अशी कल्पना असते तेव्हा हा शब्द वापरतात. (क्रि. करणे, घेणे.). ४. कपटाचा, दग्याचा, फसवेगिरीचा संशय. [फा. दघा]

**दगाई** वि. दगेखोर : 'पांच पन्नास दगाई होते ते काहडून दिले.' – होकै ११६. [फा. दघाई]

**दगागणे** अक्रि. १. कचरणे; नमणे; गळणे; खचणे; कचकणे; बुडणे; भिऊन माघार घेणे; नाश होणे; कोलमडणे; (अपघात इ.मुळे) पडणे. २. दमणे; भागणे. [सं. दघ्]

**दगावणे** अक्रि. पेचात, धोक्यात सापडून नाश पावणे; काही कपटाने किंवा अकस्मात घाला पडून, विश्वासघाताने मरणे. [फा.दघा]

**दगेदगे** उद्गा. हत्तीला पुढे हाकलताना वापरण्याचा शब्द. [ध्व.]

**दग्ध** वि. १.जळलेले; भाजलेले. २.(ल.) करपलेले; नासलेले; बिघडलेले; सर्वस्वी कुजलेले; भ्रष्ट झालेले; कलंकित, दूषित, नष्ट झालेले.[सं.]

**दग्धणे** अक्रि. भाजणे : 'परि तें बीजें जैसीं दग्धलीं ।' –ज्ञा ४.८३.[सं. दह्]

**दग्धतिथी** स्त्री. अशुभ, अमंगल तिथी. [सं.]

**दग्धभूचे धोरण** शत्रुसैन्याची उपासमार व्हावी म्हणून मार्गातील पिके जाळून नष्ट करीत जाण्याचे धोरण. : 'सैन्य माघार घेताना शत्रूचा फायदा होऊ नये म्हणून दग्ध-भू धोरण स्वीकारते.'– सोनार बांगला, पृ.६०.

**दग्धयोग** पु. अशुभ, अमंगल योग. बुधवारी तृतीया, मंगळवारी पंचमी, गुरुवारी षष्ठी, शुक्रवारी अष्टमी, सोमवारी एकादशी, शनिवारी नवमी व रविवारी द्वादशी या तिथी आल्या असता हा योग मानतात.

**दग्धशर्करा** स्त्री.जाळलेली साखर. मिठाई, मद्य यांना रंग देण्याच्या कामी हिचा उपयोग करतात; (इं.) कॅरॅमल.

**दग्धहस्त–स्ती** वि. दैवहीन; भरभराट नसलेला; उतरत्या पायरीचा; अपयशी; प्रतिकूल (दैव); दुर्दैवी; अवलक्षणी; अपशकुनी; उजाड ( देश, गाव, घर, जागा).

**दच** स्त्री.द्वेष; कलह; तंटा; भांडण; द्वैत : 'सेनापति व यमणा याणी तो

आपणासी दच बांधली आहे.' - पेद २६.२६.

**दचक** स्त्री. १. आकस्मिक भास. २. (ल.) भीती; धक्का; अचका. (क्रि. खाणे, बसणे.) : 'तेणें दचक खाऊनि मानसीं ।' - दावि ३६८. [ध्व.]

**दचकणे** अक्रि. १. बुजणे; चमकणे; (भीतीमुळे मनाला) धक्का बसणे. २. थक्क, आश्चर्यचकित होणे; चरकणे; भेदरून जाणे. [सं.दृ + चक्]

**दचकला** पु. आकस्मिक धक्का; (भीतीचा, दुःखाचा) धसका. (क्रि. भरणे, होणे, जाणे.).

**दचकला** पु. चरायला सोडलेल्या गुराच्या एका बाजूच्या पुढच्या व मागच्या अशा दोन पायांना मिळून बांधलेली दोरी; कळवा.

**दचकळी** स्त्री. लहानशी उचकी. [ध्व.]

**दच(चा)ड** वि. अंगापिंडाने जबर; मजबूत; दांडगा. [हिं.सज्जड]

**दचडणे** उक्रि. आदळणे; आपटणे. (ना.) [ध्व.]

**दचाडणे** सक्रि. पुढे चालायला भाग पाडणे. (व.)

**दच्गा-च्चा** पु. थाप; फसवणूक. (क्रि. देणे).

**दच्चावून** क्रिवि. भक्कम; पूर्ण; पुरेपूर; भरगच्च; खच्चून.

**दटणे** उक्रि. भारावणे; दडपणे; जोराने दाबणे : 'दाटिजो पां परि भारे । चित्त न दटे ।' - ज्ञा ६.३६९. [क. दट्टिसु; हिं. दाटना]

**दटाडनं** सक्रि. नियंत्रणात ठेवणे. (अहि.)

**दटावणी-ण** स्त्री. जरब; धमकावणी; दरडावणी; दहशत. [क.दट्टिसु]

**दटाव(वि)णे** सक्रि. भीती घालणे; दरडावणे; खडसणे; खरडपट्टी काढणे; धमकी देणे. [क. दट्टिसु]

**दट्ट** वि. खूप; फार; पुष्कळ.

**दट्टा-ट्ट्या** पु. १. बूच; झाकण. २. (ल.) खडसावणी; खरड; दांडगाई; धमकी; उग्र भाषण; नेट. ३. दडपण. (क्रि. देणे). [क.दट्टिसु]

**दट्ट्या** पु. (सोनारी धंदा) साखळीच्या कड्यांचा मधला फुगीर भाग उडून येण्याकरता उपयोगात आणावा लागणारा खिळा.

**दट्ट्या** पु. इंजिनच्या पंचपात्रात (सिलिंडरमध्ये) मागे-पुढे जाणारा व वाफेच्या प्रसरणशक्तीमुळे गती उत्पन्न करणारा धातूचा रूळ; (इं) पिस्टन.

**दड** न. पु. दव; दवबिंदू. (अहि.)

**दडक, दडकवा** वि. पु. १. मोठा (पाऊस) : 'अशुद्धाचा दडक पाऊस' - उह २०३. २. जमीन टणक, दडस बनवणारा (जोराचा पाऊस). (अहि.) [क. दोड्डा]

**दडकण** न. दाबण्यासाठी ठेवलेले वजन; दडपण. (को.) [सं.दृढ]

**दडकणे** सक्रि. १. दडपणे; वर वजन ठेवून दाबणे. २. ठासून चेपणे.

**दडकणे** अक्रि. दचकणे : 'भये भीयालीया दडके' - विद २०.

**दड(डै)करि-री** क्रिवि. धाडकन : 'दडकरि आंगेसीं आदळला' - उह ११४५; ' आणि दडैकरि पडिले' - लीचपू २९.

**दडकुली** स्त्री. १. लपंडावाचा खेळ. २. स्वतःला लपवणे; फरारी होणे; दडी मारणे. (क्रि. देणे, मारणे.).

**दडग** न. कपारी; खडकाळ डोंगर. (गो.)

**दडगे** न. ज्वाळा : 'पंचाग्नीचीं दडगीं ।'- ज्ञा १७.२५४.

**दडगे अळू** अळवाची मोठी व पांढरी जात.

**दडण** स्त्री. न. १. लपण्याची जागा; गुहा; कपार. २. आसरा. [क.दड]

**दडणी-णे** स्त्री. न. १. खोदणाऱ्याचे, नकसगाराचे एक हत्यार. २. (सोनारी धंदा) साखळीच्या कडीचा खडबडीतपणा जावा म्हणून कडीवर ठेवून वरून ठोकतात तो टोकाशी अर्धवर्तुळाकार असा किंचित् वाकविलेला मोळा.

**दडणे** सक्रि. (सोनारी )कडीचा खडबडीतपणा घालविणे.

**दडणे** अक्रि. १. लपणे; छपून राहणे; गुप्त राहणे. २. मिसळून जाणे; एकत्र होणे; जडणे : 'परि नेणें कैसें पैं गा । जे दडउनि गेले माझिया आंगा ।' - ज्ञा ७.१७८. [क.दडिसु]

**दडणे** सक्रि. दाबणे; दडपणे; (क.) (दागिना इ.वर ठसा) ठोकणे; छाप उठवणे. [क.दट्टिसु]

**दडदड-डा, दडाडा, दडादड-डा** क्रिवि. १. जलद चालताना, पळताना, पायांनी होणाऱ्या आवाजासारखा आवाज होऊन; दुडदुडी. २. जोराने पाय वाजवत. [ध्व.]

**दडदडणे** अक्रि. दडदड आवाज करून चालणे; धावणे; दुडदुड पळणे.

**दडदडाट** पु. दडदड असा मोठा आवाज; पुष्कळ जणांच्या धावण्याचा एकत्र आवाज. [ध्व.]

**दडदडीत** वि. भरड; मोठे; जाड; दणकट; कठीण (गळू, कातडी, वस्त्र इ.). [सं.दृढ; हिं.डाट]

**दडप, दडपण** न. १. पहा : **दडकण** १. २.(ल.) निग्रह; संयमन; धाक; दाब. ३. मनावरचे ओझे, वजन; भार.

**दडपणदास** पु. ऐतखाऊ; ऐदी. (ना.)

**दडपणी** स्त्री. (चुना) तयार करण्याची कृती : 'चुनेयांची दडपणी सांघीतली' - लीचपू ७६. [सं. द्रध]

**दडपणे** सक्रि. १. दाबणे; चेपून संकुचित करणे. २. दाबात ठेवणे; अमलात आणणे; वश करणे; जुलूम करणे. ३. (ल.) छपवणे; ( काम, अपराध) लपवणे; अंदाजाने ठोकून देणे. ४.(ल.) सपाटून खाणे. [सं. दृढ, दभ्, दृप्; हिं. डाट]

**दडपशाही** स्त्री. सत्तेच्या जोरावर गरिबांच्या हक्कांवर, सुखावर गदा आणणारी शासन पद्धती; जुलमी अंमल; अरेरावी; अन्यायाने एखादी (विशेषतः राजकीय) चळवळ दाबून टाकणे; दांडगेपणा. [हिं.]

**दडपश्चमे** क्रिवि. खरी माहिती नसली तर आयत्या वेळी सुचेल ते काहीतरी सांगून वेळ मारून नेणे.

**दडपा** पु. १. दडपण. २. रास अथवा ढीग (प्रवासी लोकांच्या सामानाचा व अव्यवस्थितपणे पडलेल्या वस्तूंचा). ३. (ताप आला असताना घाम येण्यासाठी घेतलेले) जाड पांघरूण. ४. गाडीतील सामानाची गाडीत केलेली सोयीस्कर रचना.

**दडपादडप-पी** स्त्री. १. लांबवणे; पळवणे;(दुसऱ्याच्या मालमत्तेची) लबाडीने व गुप्त रीतीने व्यवस्था लावणे . २. कमी दर्शवणे; दिखाऊ सबबी सांगून काम कमी करणे; छपवाछपवी करणे. ३. दाबून टाकणे.

**दडपीव** वि. दाबलेले; चेपटलेले.

**दडपे पोहे** (पोहे) नारळाच्या पाण्यात भिजवून दडपून ठेवून नंतर वरून कांदा, मिरची, कोथिंबीर घालून फोडणी देऊन केलेले पोहे.

**दडप्या** स्त्री.अव. स्वाती नक्षत्र व त्यात पडणारा पाऊस. (कारण हा

पाऊस पिकांना खाली दाबतो.)
वि. दडपश्चमे करणारा; दडपणारा. (वा.) **दडप्यास लावणे** – दुसऱ्याची वस्तू दडपून उपयोगास आणणे.(व.)

**दडफडणे** सक्रि. आवाज होणे: 'म्हणे पाओ दडफडील । निद्रा स्वामीची मोडैल ।' – ज्ञा १३.२५६.

**दडबडाविणे** सक्रि. भीती घालणे; धाक दाखवणे; आवेशाने दम देणे; धमकाविणे; खडसावणे. [हिं.डाँटना]

**दडवादडवी** क्रिवि. लगबगा; झरझर; लवकर : 'गुढीकारु, पुढें पाठविला । तो दडवादडवीं गेला संप्रधारू ।' – कालिका १७.२१.

**दडवादडी** स्त्री. लपंडाव : 'भणऊनि चालिजे दडवादडीं । हा मंत्रूची नोहे ।'– शिव ४८०.
क्रिवि. तातडातातडी; दडवादडवी: 'दडवादडी धांवतां । उत्कंठा आलेया बहुता ।' – ऋ १००.

**दडस** वि. १.मजबूत; टिकाऊ; दणकट; जाड विणीचे व घट्ट (वस्त्र इ.). २. भरीव; भरपूर. [सं.दृढ; हिं. दट]

**दडसणे** अक्रि. घट्ट होणे; गाठ येणे; सूज येऊन दडदडीत होणे.

**दडा** पु. समूह; कळप. [क.दट्ट]

**दडा** पु. १. बूच; नाक, कान इ.च्या छिद्रात बसलेला मळ; दट्ट्या; (ल.) अडथळा. २. विश्वास; भरवसा; खात्री; आश्वासन. ३. लपून, छपून बसणे; दडणे : 'याचा दडा हुजूर राहील.' – वाडबाबा १७८. (क्रि. मारणे). ४. लपून बसलेली सैन्याची टोळी. ५. (लपून दरोडा घालणारा) पेंढारी.– शास्त्रीको. ६.चेंडू.

**दडाडणे** अक्रि. भडकणे.

**दडाडा** पु. वाद्यांचा नाद.

**दडादडी** स्त्री. १. लपणे; दडणे; लपून बसण्याचा सपाटा. २. लपंडाव.

**दडार** वि. घट्ट; दडदडीत; हरळीने घट्ट बसलेली (जमीन).

**दडी** स्त्री. दडणे; लपून राहणे : 'आपण आदिपुरुषीं दडी । मारून राहे ।' – दास १.३.६. (क्रि. देणे, मारणे.) [क.दडि]

**दड्ड** पु. गवताच्या कुरणाचा शेताचा उंच भाग. – लोसाको.

**दड्ड–ड्डं** वि. घट्ट : 'रान थोडे दड्डं झाले होते.' – डोह पृ. १४०.

**दड्डी** स्त्री. कोकरे कोंडण्याची जागा : 'संध्याकाळच्या वक्ताला साळ्या बा दड्डीला...' – एहोरा पृ.१३३.

**दढा** न. ढेकूळ; नांगराने न फुटलेला शेतातील जमिनीचा भाग. [सं.दृढ]

**दणक(ग)ट** वि. जाडेभरडे; मजबूत; बळकट; कणखर; राकट; आडदांड (माणूस इ.). [सं.दृढवत्]

**दणकणे** अक्रि. लोकांच्या बोलण्याचा, टीकेचा विषय होणे; वाईट तऱ्हेने प्रसिद्ध होणे.

**दणकणे** सक्रि. आवाज करणे; आवाज करून मारणे. [सं.ध्रण]

**दणकन–कर–दिनी–दिशी** क्रिवि. पायाने जो दणदण आवाज होतो तसा आवाज होऊन; दणादणा. [ध्व.]

**दणका–गा** पु. १. आवाज होणारा आघात, प्रहार, ठोसा, घाव, ठोका. २. गर्दी; गडबड; दंगा; धुमश्चक्री; गलबलीचा खेळ; उत्सव; तडाखा; धडाका; कडाखा (वाद्ये, तोफा, मेजवानी इ. चा). ३.लोकांतील भुमका; वदंता; बातमी; बोभाटा. ४. अधिक पैसा खर्चून प्रसिद्धी होण्याजोगा विवाहादी समारंभ.[ध्व.] (वा.) ० **माजणे** – १. गोंगाट होणे. २. धुरळा उडणे. ० **मारणे** – प्रचंड प्रयत्न करणे; जोराने झगडणे (आपल्यापेक्षा अधिक सामर्थ्यवान माणसाबरोबर, यशापयशाचा विचार न करता).

**दणका(गा)रणे** सक्रि. १. खडसावणे; खडकावणे; कचकून शिव्या देणे. २. (क्व. चुकीने) दणकावणे.

**दणकावणे** सक्रि. १. (दणदण असा आवाज होईतोवर) मारणे; सडकणे; ठोकणे. २. दणक्याने, थाटाने विवाहादी समारंभ करणे. ३. खडसावणे; अंगावर जाऊन ओरडणे; घटपट, अरेरावी यांचा उपयोग करणे; अवडंबर घालणे, करणे; प्रतिकाराचे नेटाचे पण व्यर्थ प्रयत्न करणे.

**दणकाहलका** पु. १. (हलका = एक प्रकारचा पखवाज) अनेक पडघम, मृदंग इत्यादी वाद्यांचा तडाखा. २. गलगा; बडबड; दंगा; गोंगाट; बोभाटा; गवगवा; प्रसिद्धी.

**दणणे** अक्रि. समजणे; कळणे : 'ज्याचें त्यासी दणें कोण तें उचित ।' – तुगा भाग १, पृ.४९१.

**दण(णा)दण–णा** क्रिवि. पायांचे दणदण आपटणे; तोफांचा धडाका, जड धोंड्यांचे आघात, कांडण इ.च्या मोठ्या व दण अशा आवाजासारखा आवाज होऊन. [ध्व.]

**दणदणणे** अक्रि. १. दणदण आवाज होणे; (तोफा, बंदुका इ.) मोठ्या गर्जनेने धडाडणे. २. अंगावर जाऊन क्रोधाने ओरडणे; ताव झाडणे; जळफळणे. ३. दणदण पाय वाजणे; हादरणे; दुमदुमणे; (तोफा, वाद्ये इ.च्या धडाक्याने घर, गुहा इ. मध्ये) प्रतिध्वनी उत्पन्न होणे. ४. एकाच्या तोंडून दुसऱ्याच्या तोंडी जाणे; (स्तुती, निंदा) सर्वत्र पसरणे. ५. (फोडणी इ.चा) घमघमाट सुटणे. ६. गलबला, गलका होणे. ७. (शेकोटी, टेंभा) धडधड जळणे; प्रकाशणे; धगधगणे.

**दणदणा** वि. पावले आपटत चालणारा.

**दणदणाट** पु. १. दणदण असा मोठा व एकसारखा होणारा आवाज; दणका. २. फोडणीचा, तळणीचा घमघमाट. ३. माडीवरून चालताना अनेक पावलांचा होणारा आवाज.

**दणदणीत** वि. १. थाटामाटाचे; धामधुमीचे; दणक्याने केलेले (लग्न इ. कार्य). २. उग्र; तीव्र; (फोडणीचा वगैरे) सर्वत्र पसरलेला (वास). ३. धडधडा जळणारा (दिवा, टेंभा).

**दणदण्या** वि. दणादणा चालणारा.

**दणव** पु. दंडाधिकारी : 'दणवें मंगलपण तु सै वौ ।' – पांढर शिलालेख ॥ ७.२९. [सं. दंडवत्]

**दणव, दणवणूक** पु. दमणूक; दमछाक. (बे.)

**दणाण–णा** पु. १. मोठा दणदण आवाज. २. दरारा; वचक. [ध्व.]

**दणाणणे** अक्रि. जोराने दणदणणे. [ध्व.]

**दणादणी** स्त्री. धक्काबुक्की; गुद्दागुद्दी. (ना.)

**दणावणे** अक्रि. वाकणे; मोडणे; नम्र होणे; दबणे.

**दणांतर** वि. मोठा; सणसणीत: 'मरतुकडी दिसणारी नदी एकदा दणांतर ... येऊन गेला म्हणजे...'– तोरण पृ.२७६.

**दत्त** पु. १. ब्रह्मा, विष्णु, महेश या त्रिमूर्तीचा अवतार; दत्तात्रेय. २. दैवप्राप्त वस्तु; प्रारब्ध; नशीब : 'तुका म्हणे भितो पुढिलिया दत्ता । म्हणऊनि चिंता उपजली ।' – तुगा २८६७. ३. देणगी: 'हरी दत्त देईल तें शीघ्र घ्यावें ।' – कचेसुच १३. ४. नेमलेले काम, धंदा; वृत्ती; नशिबाने आलेले (काम). [सं.] (वा.) ० **म्हणून उभे राहणे** – अकल्पित रीतीने येऊन उपस्थित होणे; (स्वयंपाक सिद्ध होताच दत्तात्रेय कोल्हापुरात अकस्मात भिक्षेला येतात अशी दंतकथा आहे, त्यावरून) एखाद्या कार्याच्या सिद्धीसाठी खटपट न करता केवळ उपभोगापुरते किंवा दुसऱ्याच्या मनात नसताना एकाएकी आयते वेळी येऊन हजर होणे. **दत्तात्रेयाची फेरी, स्वारी** – जो मनुष्य नेहमी भटकतो व जो नक्की कोठे सापडेल ते सांगता येत नाही, अशा माणसाचे भटकणे अथवा अवचित आगमन.

वि. १. दिलेले; बक्षिस केलेले; देऊन टाकलेले. (क्रि. करणे, होणे.) २. दत्तक दिलेला (मुलगा). [सं.]

**दत्तक, दत्तपुत्र** पु. दिलेला किंवा घेतलेला मुलगा. औरस पुत्र नसल्यास नाव चालवण्यासाठी व पिंडोदकादी क्रियेसाठी एखाद्याच्या मांडीवर दिलेला किंवा घेतलेला पुत्र. हिंदू धर्मशास्त्रात सांगितलेल्या बारा पुत्रप्रकारांपैकी सातवा प्रकार. [सं.]

**दत्तकविधान , दत्तविधान** न. दत्तकपुत्र घेण्याचा धार्मिक विधी. [सं.]

**दत्तपत्र** न. ज्यात दत्तविधान नमूद आहे किंवा दत्तक घेण्या-देण्याचा अधिकार दिला आहे, देण्याचा आशय आहे असा लेख. [सं.]

**दत्तात्मा** पु. दुसऱ्यांना आपले आई-बाप समजून राहणारा पोरका मुलगा; स्वयंदत्त. हिंदू धर्मशास्त्रात सांगितलेल्या पुत्राच्या बारा प्रकारांपैकी दहावा प्रकार. [सं.]

**दत्तापहार** पु. दिलेले दान किंवा वस्तू परत घेणे; अपहार करणे. [सं.]

**ददाची विद्या, बाराखडी** फक्त देण्याची गोष्ट, क्रिया.

**ददात** स्त्री. १. उणीव; तोटा; वाण; कमतरता; ओढघस्ती; आपत्ती. २. कष्ट, त्रासदायक श्रम, काम; दगदग. [सं. ददाति]

**'द' दिवस** लष्करी परिभाषेत या मुहूर्ताला 'D' Day 'Z'ero hour म्हणतात. शून्य क्षण. – युद्धजिज्ञासा पृ.९२.

**ददोडा** पु. गांध; फोड; उठाणू : 'पोटावर लाल ददोडे आले.' – चित्र ऑगस्ट १९३५.

**दद्रु** पु. खरूज; गजकर्ण; इसब. [सं.]

**दधि** न. दही; दूध विरजले असता होणारा पदार्थ. [सं.]

**दधी** न. राळ; टरपेन तेल.

**दनकुडा** पु. दणका : 'माधाने रातीला बयाचा दनकुडा वाजतो.' -एहोरा- भाग ५ पृ. ३९.

**दन्ना** वि. १. मोठा; अगडबंब; अवाढव्य; प्रचंड; राक्षसी; अफाट; विस्तीर्ण. २. गोंगाटाचा; गलबलीचा; दंगलीचा.

**दन्नाट** क्रिवि. प्रचंड वेगाने: 'ह्यो तिच्यामागनं दन्नाट पळायचा.' -गोतावळा पृ.११. [ध्व.]

**दप** स्त्री. दबा. (क्रि. धरणे). (गो.)

**दपकन-कर-दिनी-दिशी** क्रिवि. जड किंवा भारी वस्तू जमिनीवर एकदम पडली असता होणाऱ्या आवाजासारखा आवाज होऊन; रपदिशी. (क्रि. पडणे, मारणे, वाजणे.). [ध्व.]

**दपकाविणे, दबाविणे** उक्रि. भीती घालणे; धमकावणे; खडसावणे. [सं.दर्प]

**दपटगिरी-निशी** स्त्री. जबरीने, हावरेपणाने हिरावून घेणे; सापडेल ती वस्तू दडपणे, उपटणे; जबरदस्ती; जुलूम.

**दपटणे** सक्रि. १.चोंदणे; कोंदणे; दाबून भरणे; रेटणे; जोराने दडपणे; खुपसणे: 'कळत कळत जो काळ – व्याळमुखीं प्रकट बाहुला दपटी ।' – मोकर्ण ६.७२. २. (ल.) दामटणे; पिटणे; रवाना करणे (घोडा, मनुष्य इ.). ३. खडसावणे; धमकावणे; दहशत, भीती घालणे. ४. हिरावून घेऊन गिळंकृत करणे; (दुसऱ्याची मालमत्ता, जागा इ.) उपटणे, हडपणे; (दुसऱ्याची स्त्री, बायको) जबरीने उपभोगणे; गट्ट करणे; डल्ला मारणे; दडपणे; अफरातफर करणे. ५.(वाद किंवा युद्धात) दुसऱ्याला जिंकणे. ६. भुलणे : 'ज्ञाते वैभवें दपटले । या नांव भ्रम ।' – दास १०.६.२७. [सं.दृभ्, दृफ्]

**दपटश(शा)हा-ही, दपटशा, दपाटा** पु.स्त्री. १. जोराची खडसावणी, खरडपट्टी; भोसडपट्टी; भयंकर धाक; तंबी, धमकावणी; भीती घालणे. (क्रि. देणे, बसणे.). २. गर्दी; तगादा; निकड (कामाची).(क्रि. बसणे, पडणे, लावणे, लागणे, घालणे.) ३. बोकांडी बसणे; जोराची निकड लावणे. (क्रि. काढणे, घालणे, देणे.) (वा.) **दपटशा बेरीज देणे** – घाईने व सरासरीने बेरीज करणे.

**दपट्या** वि. १.(अन्न) दडपून भरणारा, कोंबणारा, खाणारा; आकंठ जेवणारा. २. हिरावून घेऊन पळून जाणारा; जुलमाने घेऊन हडप, हस्तगत करणारा. ३. वाटेल ते काम कसे तरी दडपून पुरे करणारा.

**दपणे** अक्रि. लपणे; दबून बसणे; दडणे. (को.)

**दपने** न. रोप: 'श्रृंगाराचें दपनें सिपें ।'-शिव ३१९. [सं.द्विपर्ण]

**दपमारची** क्रि.१.दबा धरून बसणे. २.डोळे झाकून निजणे. (गो.)

**दपोटा** पु. पोते.

**दफन** न. (प्रेताला द्यावयाची) मूठमाती; प्रेत पुरण्याची क्रिया.

वि. पुरलेले. [अर.दफ्न]

**दफन(ण)णे** सक्रि.पुरणे:'अफझल्खानाकडील मूडधे दफणाऊन टाकावे.' – ऐस्फुले ७२.

**दफा** स्त्री. १. कलम: 'इंग्रजांनीं सात दफेची या(द) – दास्त पाठविली.' – राज ७३. २. अमुक वेळा असे दाखविणारा प्रत्यय. [अर.दफ्आ]

**दफाते** स्त्री. (जुन्या लिखाणात) कागदाला पाडलेली तीन सळांपैकी पहिल्या सळाच्या मध्यापासून तिसऱ्या सळाच्या मध्यापर्यंत ओढलेली रेघ; मराठेशाहीतील जमाखर्चातील एक सदर. [अर.दफ्आत]

**दफे** न. प्रतिकार; शिक्षा; हटवणूक; अडवणूक : 'वेढा राणोजी घोरपड्याचा मारून काढून दूर दफे केला.' – राज १५.१९.[अर.दफ्अ]

**दफेदार** पु. १. देशी घोडदळातील एक कनिष्ठ अधिकारी; शिपायांचा नाईक; सैन्याच्या मोदीखान्याला बैल पुरविणारा कंत्राटदार किंवा अधिकारी. २. सरपट्टेवाला. [फा.दफ्अदार]

**दफेरफे** स्त्री.फडशा; (कर्जाची) फेड; तोड; सफाई; व्यवस्था (काम-

धंद्यासंबंधी).
वि. व्यवस्था लावलेले; फेडलेले. [अर. दफ्अ-रफ्अ]
**दफेवार** वि. कलमवार; प्रकरणानुसार.
**दफ्तर** न. १. लेख; संग्रह; सरकारी कागदपत्रांचा गठ्ठा ; त्या पुडक्यांचा बांधलेला रुमाल; फडक्यात बांधलेला लेखी कागदांचा गठ्ठा. २. शाळकरी मुलांची पाटीपुस्तके इ. ठेवण्याची पिशवी. ३. लेखनसंग्रहाची कचेरी. [अर.]
**दफ्तरणी-नी** स्त्री. १. कागद बांधण्याचे फडके किंवा रुमाल; बांधणीचा पट्टा किंवा दोरी. २. असे बांधलेले पुडके: 'चित्रांची दफ्तरनी तयार झाली म्हणौन विनंति होती.'-पेद १८.५७.
**दफ्तरदार-नीस, दफ्तरी** पु. जुन्या राज्यातील एक अधिकारी. चिटणीस; दफ्तरखान्यावरील मुख्य अधिकारी; कागदपत्रे सांभाळणारा अधिकारी.
**दफ्तरदिरंगाई** स्त्री. कार्यालयात कागद निकालात काढायला उशीर लागणे.
**दफ्तरबंद** पु. दफ्तरातील कागदपत्र नीट व्यवस्थेने ठेवणारा कारकून.
वि. जुळवून, व्यवस्थेने ठेवलेले.
**दफ्ती** स्त्री. पुष्टिपत्र; पुठ्ठा. (काशी)
**दबकणे** अक्रि. १. टेकीला येणे; कचरणे; नम्र होणे; ओझ्याखाली वाकणे. २. (ल.) धाक बसणे; स्तब्ध राहणे; भिणे; दबणे; घाबरणे. ३. दडणे; दबा धरणे; थांबणे. [सं.दर्प, दृभ्]
**दबकणे** अक्रि. आवाज होणे. [क. दवकु]
**दबका** पु. १. खोलगट जमीन; तळ; खळगा; तळवट जागा. २. पोटातील अन्नाचे ओझे, जडपणा. (क्रि. बसणे). ३. धबका; धपका; रपाटा.
**दबकावणी-णे** पहा : **दबावणी-णे**
**दबके** न. (सोनार-कासारधंदा) पत्रा सपाट, सारखा करण्याचे एक हत्यार. [सं.दा-दापन]
**दबडका-गा-घा-शा** पु.१.कामांची धांदल, एकसारखी गर्दी; लोकांची, पाहुणे इ.ची सारखी ये जा. २. (ल.) कामाची निकड. ३. जोराने, मोठ्या आवाजात खडसावणे.
**दबडा-डे** पु.न.तेल,तूप इ. ठेवण्याचा चामड्याचा बुदला; डबडे.
**दबणे** अक्रि. १.पहा: **दबकणे** १. २. (ल.) खचणे; दबले जाणे; आहारी जाणे; हार जाणे; भिणे; ताब्यात जाणे (भीती, दुखणे, जुलूम इ. नी). ३. अंग आखडणे, लोळागोळा होणे. ४. लपून बसणे; दडणे; दबा धरणे. [सं. दप्;अर. दबदब; हिं.दबना]
**दबदब** स्त्री.हालचाल. [क.दब]
**दबदब-बा** क्रिवि. ढिल्या ताणाच्या किंवा फुटक्या नगाऱ्याच्या आवाजासारखा आवाज होऊन. [ध्व.]
**दबदबणे** अक्रि. दबदब आवाज होणे. [ध्व.]
**दबदबा** पु. १. भीती; दरारा; आदर; जुलूम; दहशतीचा परिणाम. (क्रि. बसणे, पडणे, देणे). २. इभ्रत; मोठेपणा; अधिकार; वैभव; डौल; हुकमत. [सं.दा;अर.दबदब]
**दबदबीत** वि. १. मऊ; दबणारे; गलगलीत; बिलबिलीत (अन्न). २. अशा अन्नाने खूप भरलेले (पोट). (क्रि.भरणे). ३. पेरणीला योग्य अशी (जमीन). ४. पातळ; दाटसे (कालवण). (गो.) [ध्व.]
**दबवणे** सक्रि. १. जोराने दडपणे; संकुचित करणे; दाबणे; आवळणे. २.(ल.) जुलूम करणे; जरब देणे; धमकावणे.
**दबा** पु. हल्ला करण्याच्या किंवा उडी टाकण्याच्या तयारीने नेम धरून बसण्याची क्रिया; दडणे; आड लपून बसणे.
**दबाजॉ, दबाटका** पु. (गो.) पहा: **दबदबा** १
**दबाव** पु. १. भीती; धमकावणी; खडसावणी; दहशत. २.दारवठ्यावर किंवा झाकलेल्या गटारावर घातलेला आडवा तुकडा (लाकडाचा किंवा दगडाचा); भिंत अथवा टेकू यावर ठेवलेला आडव्या तुळवटाचा शेवट. ३. वजन; दडपण्याची क्रिया. ४. पहा : **दबदबा** २
**दबावणी, दबाजा** स्त्री. धमकावणी; दटावणे; धमकी. [ध्व.]
**दबावणे** सक्रि. जोराने टाकणे : 'पण दादरे जरा कमी झाले की शिड्या बैल दबावीत होता.' - वळीव ३६.
**दबाविणे** सक्रि. धमकावणे; भीती, दहशत घालणे, दाखवणे.
**दबीर** पु. राजचिटणीस. पहा : **डबीर** [फा.]
**दबेल-ला** वि. १. दरारा बसलेला; भ्यालेला; जुलूम इ. नी दबलेला. २. दुसऱ्याच्या मुठीत असणारा; ओशाळा; मिंधा; परावलंबी.
**दब्ब** क्रिवि. १.(पोट भरणे या शब्दाशी जोडून) आकंठ; फार भरल्यासारखे. २. याचा विशेषण व नाम या दोन्हीसारखा उपयोग होतो. पहा : **दबदबीत** [ध्व.]
**द(दं)भाशी-सी** पु. सारवान; उंट हाकणारा.
**दम** पु. इंद्रियदमन; सहनशीलता; मनोविकार ताब्यात ठेवणे. [सं.]
**दम** पु. १.श्वास; (ल.) प्राण; जीव. २.धाप; सुस्कारा; प्रमाणाधिक श्वासोच्छ्वास; कष्टाने श्वास टाकणे.(क्रि. कोंडणे, खाणे, घेणे, छाटणे, लागणे इ.). ३. स्वत:बद्दलची फाजील कल्पना; अहंमन्यता; अहंकार; महत्त्वाकांक्षा; गर्व; बढाईखोरपणा. ४. क्षण; पळ. ५. जोम; हिंमत; निश्चय; विश्वास; धीर. (क्रि. धरणे.) ६. शक्ती; सत्त्व; चांगलेपणा; सामर्थ्य; (औषधाचा) गुण. ७. श्वास कोंडून धरण्याची शक्ती, अवसान. ८. कायम ओलसरपणा, दमटपणा (जमिनीचा). ९. एखाद्या वाद्यातील (वाजविण्यासाठी कोंडलेली, भरलेली) हवा. १०. वाफ देणे (मंदाग्नीवर ठेवलेल्या अन्नाला). ११. धूम; पखवाज, संबळ इ.चा खर्ज सूर. १२. दृढनिश्चय; सहनशक्ती; उठावणी करण्याची, प्रोत्साहित करण्याची, पाठपुरावा करण्याची शक्ती (संपत्ती, अधिकार, उद्योग यांची); व्यापारधंद्यातील भरभराट, किफायत, गब्बरपणा. १३. धान्याचा सकसपणा जो पदार्थ (केळी, मका इ.) खाल्ला असता लवकर भूक लागत नाही असा त्या पदार्थाचा गुण, कसदारपणा. वस्तूंची अधिक टिकण्याची शक्ती; पुष्कळ वेळ जळत राहण्याची दारूकामाची शक्ती; न तापता पुष्कळ वेळ बार उडण्याची (तोफ, बंदूक इ.ची) शक्ती. १४. (चिलीम, गुडगुडी इ.चा) झुरका. (क्रि. घेणे, पिणे, खेचणे, ओढणे, लावणे.) १५. जोर; शक्ती. १६. धमकी. [सं.दम्; फा.](वा.) ० **टाकणे, सोडणे** - १. आशा, विश्वास,धैर्य सोडणे. २.श्वास, विश्रांती घेणे. ० **देणे** - १. धैर्य, प्रोत्साहन, उत्तेजन देणे. २. धमकी देणे; धाकदपटशा दाखवणे. ३. जोराने खडसावणे; भोसडणे. ४. क्षणभर विसावा घेऊ देणे. ० **धरणे** - १. श्वासावरोध करणे; धीर धरणे.

२. थांबणे; विसावा घेणे. ३. धैर्य धरणे. ४. काही वेळ वाट पाहणे. **०पाहणे** – एखाद्याच्या अवसानाची, शक्तीची परीक्षा घेणे, करणे. **० भरणे** – धमकावणे; खडसावणे; भेडसावणे, तंबी, ताकीद देणे; दहशत घालणे. **० मारणे** – १. (गुडगुडी इ.चा) झुरका घेणे. २. आपल्या करामतीची पराकाष्ठा करणे. ३. गट्ट करणे; (पैसा, अन्न इ.) दाबणे. ४. संभोग करणे. (अहि.) **दमावर घेणे** – घाईशिवाय किंवा न थकता एकसारखे काम करणे. **दमास येणे** – थकणे.

**दमकुल** न. मातीची शेगडी. (व.)

**दमछाट** पु. पुष्कळ वेळ दम, श्वासोच्छ्वास कोंडून ठेवणारा माणूस.

**दमछाटगोळा** पु. कुलपी गोळा; बाँब.

**दमछाटतोफ** स्त्री. गरनाळ.

**दमट, दमकट– कल–सर** वि. १. ओलसर; आंबटओले; कुंद; आर्द्र (जमीन इ.). २. हिरवी; रसभरित (फांदी). [सं.द्रवत्य]

**दमटणे** अक्रि. ओलसर असणे, होणे.

**दम(व)डी** स्त्री. पैशाच्या चौथ्या हिश्श्याचे किंवा दहा,बारा कवड्यांच्या किमतीचे एक नाणे. [सं.द्रम्म] (वा.) **दमडीकरता सौदा मोडणे** – थोडक्यासाठी सर्व कार्याचा नाश करणे. **दमडीवर चमडी करणे, काढणे, मिळविणे** – थोड्या भांडवलावर पुष्कळ नफा मिळविणे.

**दमडीचा** वि. गरीब; हलका; क्षुद्र.

**दमडीपूत** पु. अतिशय चिक्कू; कवडीचुंबक.

**दमणी** स्त्री. एक लहान बैलगाडी; छकडा. (ना.,खा.) [फा.दामन]

**दमणे** अक्रि.१. थकणे; भागणे; कंटाळणे. २. अनुकूल, वश होणे. ३. (ल.) पुष्कळ वेळा पीक काढल्याने जमीन,शेत इ. निकस होणे. ४. एखादी वस्तू वापरल्यामुळे जीर्ण होणे; झिजणे. ५. कुंद, सर्द, दमट होणे; आंबटओले असणे (वस्त्र, लाकूड इ.). ६. शरीरावरील केस किंवा शेतातील गवत एकदा उपटल्यावर पुन्हा न उगवणे. [सं.दम्; फा.]

**दमणे** सक्रि. पराभूत करणे : 'दमीत दुष्टासी स्वामी माझा'– नाम ११९. [सं.दम्]

**दमदम–मा** क्रिवि. १. धमधम आवाज. २. सुगंधाचा घमघमाट.

**दमदमणे** अक्रि. १. ढोल इ. चा दमदम असा आवाज होणे. २. सुगंधी पदार्थांचा घमघमाट सुटणे. [ध्व.]

**दमदमा** पु. १. मोठा नगारा, नौबत, तोफा इ. चढविण्याचा उंचवटा; मेढा; टप्पा. २. तोफखाना. [अर.]

**दमदमीत** वि. १. घमघमीत (वास). २. तृप्त करणारे; चमचमीत; भरपूर (जेवण). ३. भरपूर, आकंठ भरलेले (पोट).

**दमदाटी** स्त्री. धाकदपटशा.

**दमदार** वि. १.ओलसर, दमट (जमीन). २. ओलट; हिरवे (लाकूड); जमिनीतील भट्टीत तयार केलेला व मंद जळणारा (कोळसा); सकस; कसदार (धान्य); नफा होणारे; फायदेशीर (काम, धंदा). ३. धाडसी; नशीबवान; निश्चयी. ४. धीराचा; सहनशील; उत्साही; दीर्घोद्योगी. ५.पैसेवाला; भांडवलवाला; पैशाची ऊब असणारा (सावकार). ६. पुष्कळ वेळा वापरूनही दणकट, मजबूत राहणारी (वस्तू, वस्त्र).

**दमदिलासा** पु. उत्साह; धीर; समाधान.

**दमधीर होणे** अक्रि. थकणे; दमणे : 'मग माझी मीच दमधीर झाले. कोवळ्या शेवंतीच्या कळीने दमावं भागावं ना तशी हं!' – राके ११.

**दमन** न. गाडीचा टप; दमान. [फा.दामन]

**दमन** न. १. वठणीवर आणणे; वश करणे; दाबून टाकणे; रग जिरविणे; खोड मोडणे; संयमन. २.वश किंवा नियमन करणारी शक्ती, कारण. समासात इंद्रिय – दुष्ट – रोग – काम – क्रोध – दमन. [सं.]

**दमनक** न. दवणा ही वनस्पती. [सं.]

**दमनपौर्णिमा** स्त्री. चैत्री पौर्णिमा. या दिवशी कामदेवाचा उत्सव करतात.

**दमनवस्त्र** न. खड्ग; तलवारीचा एक प्रकार.

**दमनीय** वि. वश करण्याजोगे; ताब्यात येण्यासारखे; स्वाधीन करून घेण्यासारखे.

**दमवणे** सक्रि. १. वश करणे; शमविणे; ताब्यात, दाबात ठेवणे; जिंकणे. २. थकविणे; भागविणे.

**दमविकरी, दमाची विकरी** उधारीचा धंदा; उधारीची विक्री.

**दमसर्द** वि. १. थंड. २. नामोहरम; पराजित; हतप्रभ: 'अमर्यादिकांस शासनें करून ... दमसर्द केलें.' – राज ८.१२५.

**दमसास** पु. गायनासाठी लागणाऱ्या श्वासाची शक्ती; अशी शक्ती असणारी, गायकाला स्वराची साथ करणारी व्यक्ती: 'अभिजात संगीताच्या संस्कारामुळे सुरेल आणि दमसास असणारे स्त्रीकलावंत आपल्याकडे खूप आहेत.' – नटश्रेष्ठ आणि चार संगीतिका पृ.३६.

**दमसूट** क्रिवि. पहाटेच्या वेळी.

**दमळ–ट** न. अभ्राच्छादित आकाश; तुफान. (गो.)

**दमा** पु. १. श्वासरोग. २.जोराचा श्वासोच्छ्वास; (पळण्यामुळे लागलेली) धाप. [फा.]

**दमा(म)न–ण** न. १. (नाविक) शिडाची दोरी; शीड; शिडाचा मागचा (काठीजवळचा) भाग. २. वाऱ्यासमोरची बाजू. [सं.दाम;फा.दामन]

**दमानची** पु. कडाबीन, लहान तोफ किंवा बंदूक बाळगणारा सैनिक.

**दमामा** पु. मोठा नगारा; नौबत. [फा.]

**दमामा** पु. १. मोठे पिस्तूल; कडाबीन. २.गडगा; धमधमा; मेढा; (तोफेसाठी रचलेला) टप्पा. [फा.]

**दमारा** पु. पेच; चिमटा; कात्री.

**दमास** न. दमास्कस येथील रेशमी कापड.

**दमास्कस** न. दमास्कस येथे तयार होणारा पोलादाचा प्रकार. – प्रश २४.

**दमी** वि. वठणीवर आणणारा; ताब्यात आणणारा; नियमन करणारा. [सं.]

**दमेकरी** वि. श्वासरोग असलेला; श्वासरोगी.

**दयदय** स्त्री. दारिद्र्यामुळे असणारी कोणत्याही गोष्टीची तूट. (व.)

**दया** स्त्री. १. करुणा; अनुकंपा; कळवळा. (समासात) दया–कर–सागर इ. = दयाळू (माणूस.) २. कृपा; मेहेरबानी. ३. विशेषत: देवाने केलेली कृपा. ४. देण्याचा गुण; दातृत्व : 'जडपाषाण चिंतामणी : तयां चिंतिलेयां अनर्घांची वीणी ऐसी त्रिभुवनीं दयेची जीणी : तो गुण श्रीकरांचा' – ज्ञाप्र ४५१. [सं.]

**द(भ)याद(भ)या,दयाभया** क्रिवि. दया! दया! असे ओरडत दारोदार भीक मागत फिरून. (क्रि.करणे, करत फिरणे, जाणे.).
**दयादया** स्त्री. केविलवाणी स्थिती.
**दयाधर्म** पु. नैतिक व धार्मिक कृत्ये; आचारविचार.(क्रि. करणे, होणे).
**दयामरण** न. एखाद्या रोग्याचा आजार असाध्य व वेदनादायक झाल्यास त्याला हाल न होता सन्मानाने मृत्यू यावा या विचाराने आणवलेला मृत्यू.
**दयाराम मुकुंददासाचे नातू** (ल.) अतिशय श्रीमंत माणूस; (व्यंगोक्तीने) अतिशय दरिद्री माणूस.
**दयावती** स्त्री. (संगीत) पाचव्या श्रुतीचे नाव. [सं.]
**दयास** पु. (चर्मकार.) घोड्याच्या तंगाची वादी.
**दयाळ** वि. दया लाभलेला; दयेचा विषय : 'सोपान दयाळ, गुरूनामें बळ'– सोपान ११. [सं.दया]
**दयाळ** पु. बुलबुलाच्या आकाराचा, काळे पंख असणारा, गाणारा पक्षी.
**दयाळू** वि. कृपाळू.
**दयिता** स्त्री. बायको; आवडती स्त्री; पत्नी. [सं.]
**दर** पु. १. किंमत; भाव; निरख. (क्रि. येणे, चढणे).२. प्रमाणात, किमतीत ठरलेली संख्या, परिमाण. [फा.]
**दर** स्त्री. काठ; किनारा (शेताचा, नदीचा). [सं.धरा; हिं.]
**दर** पु. भीती; भय: 'स्वभक्त सुरपादपा हरि नसेचि सत्यादर।'– केका ६१. [सं.]
**दर** क्रिवि. १. प्रत्येक; एकएक; हर एक. २. पासून या अर्थाचा प्रत्यय. उदा. थन्नदर = तेव्हापासून. (गो.) ३. मध्ये. [फा.]
**दर** पु. शंख: 'वाजत होता संतत दर, जाणों विष वचोगृहीं वमला।'– मोसभा ३.३३. [सं.]
**दर** पु. १. (खांब, खुंटा इ. पुरण्यासाठी जमिनीत खणलेला) खड्डा; भोक; बीळ. (व., खा.) २. दरी. ३. (सोनारी) मण्याचे टरफल अर्धवर्तुळ करण्याची गड्डीमधली वाटी. ४. खळगी (पोटाची): 'रिंदेया चेंदया दरु भरिजे'– लीचउ ७.५४८. [सं.]
**दर** पु. बळी.(गो.)
**दर** स्त्री. रस्ता; मार्ग; रीत : 'हें सर्व दरेनें तुम्हांसीं हमेश बोलण्यात आलें'– मइसा ७.८१. [अर.]
**दरक** पु. १. विचार; बेत; मनीषा: 'उगीच नादीं लाऊन ठेवावें असा इतर सरदारांचा दरक.' – ऐलेसं ११७८. २. पद्धत; सरणी. [अर.दर्क]
**दरक** पु. वंशपरंपरागत, सरकारी, मोठ्या अधिकाराची जागा; श्रेष्ठ अधिकार, हुद्दा. [अर.]
**दरकदार, दरकी असामी** वि. दरक धारण करणारा अधिकारी. उदा. फडणीस, मुजुमदार इ.
**दरकपट्टी** स्त्री. दरकदारांवरील, मुख्यत्वे देशमुख, देशपांडे यांच्या जमिनीवरील दहा वर्षांनी एक वर्षाच्या जमाबंदीइतका द्यायचा कर.
**दरकार** स्त्री.१. अडचण; जरुरी; गरज; पर्वा; आवश्यकता; काळजी; प्रयोजन; संबंध : 'सिद्दी मर्द माणूस याची दरकार आहे.' – वाडसमा २.४. २. संशय: 'तुझा तो भाई यांत बिलकूल दरकार नाही.' – रूपनगरची राजकन्या पृ. १७८. [फा.]
**दरकाल** न. कफाचा बेडका.(कु.)
**दरकुट–टा** पु. १. दरी; गुहा; दडून बसण्याची जागा. २. खळगी (पोटाची) : 'कां रसनेचिया वाट । निघौनि गा सुभट । रसाचा दरकुटा । भरोंचि लागे ।'– ज्ञा १५.३५८. [सं.दर]
**दरकुटे** न. (निंदाव्यंजक) दरक अथवा सरदारी.– देवनाथ. [अर.दरक]
**दरकुल** क्रिवि. झाडून सारा; सर्व.
**दरकूच** क्रिवि. प्रत्येक मजलेला; मजल मारीत मारीत.
**दरकेवचे** अक्रि. भिणे; दरारा बाळगणे.(गो.) [सं.दर]
**दरखास्त–स–ष** स्त्री. १.(कायदा) विनंतीअर्ज; मागणीअर्ज; मागणी; साक्षीदार किंवा दस्तऐवज दाखल करण्यासाठी करावयाचा अर्ज. २. फिर्याद. [फा.दरख्वास्त]
**दरखोती** स्त्री. करार; बोली; ठरावीक दराने मक्ता घेणे; उभ्या पिकाचा मक्ता; इजारा.
**दरगा, दर्गा, दरगाह** पु. १. मुसलमानांची नमाज पढण्याची जागा; इदगा; कबरीची,पिराची जागा; मशीद. २. दरबार; राजसभामंडप: 'त्यांणीं आदिलशाही दरगाहाशी रुजुवाती करून....' – इ १८. [फा.दरगाह]
**दरगुजर–दल, दरगुथ** स्त्री. दुर्लक्ष; कानाडोळा; चालढकल. [फा.दर्गुझर]
**दरज** स्त्री. १. भीती; संकोच.– लोसाको. २. पीडा; उपद्रव. [फा. दर्ज–र्द]
**दरज** स्त्री. विटा; दगड यामधील सांध. [फा. दर्ज–र्द]
**दरजबंदी** स्त्री. चुन्याने किंवा चिखलाने भिंतीच्या विटा, दगडांच्या भेगा इ. भरून काढणे.
**दरड–डी** स्त्री. नदीकाठचा उंचवटा; उंच किनारा; काठ; तीर; उभी चढण; डोंगराचा तुटलेला कडा. [सं.दर + ड प्रत्यय]
**दरड–डी** न. स्त्री. १. दाट वाढणारे गवत: 'दरडी माथेनें घांसे ।' – पंच १.९. (को., कु.) २. ऐचण; ऐतण.
**दरड(डी)वट** वि. खाचखळगे, उंचवटे, दरडी इ. असलेली (जमीन). [सं.दरद् + वत्]
**दरडाई** स्त्री. खडसावणी; धमकी; धाक; दहशत (क्रि. देणे).
**दरडावणे** सक्रि. खडसावणे; धमकावणे; रागावणे; धाक घालणे. [दे.]
**दरडोई** वि. दरमाणशी; प्रत्येक व्यक्तीला; माणसागणिक.
**दरद** पु. हिंगूळ. [सं.]
**दरदर–रा, दरदरून** क्रिवि. सपाटून; भरपूर; फसफसून (जमीन किंवा पीठ ह्यांत पाणी घातले असता किंवा ताक घुसळताना किंवा अंगाला घाम फुटला असता होणारी स्थिती.). (क्रि.फुगणे, फुलणे, घाम – ऊब येणे, पुरळ उठणे, खूप झोप येणे.).
**दरदरणे** अक्रि. १. फेसाळणे; वर येणे; (घुसळताना ताक इ.) फुगणे. २. भीतीने घाम फुटणे. [सं. दॄ]
**दरदरीत** वि. पातळ : 'दरदरीत पाण्या– । माजी रांधियेल्या कण्या ।' – तुगा ६८२.

**दरदवंत** वि. काळजी, आस्था बाळगणारा; लक्ष देणारा; सावध.
**दरदाम** पु. विकत घ्यावयाच्या वस्तूची किंमत व तिच्या संबंधाच्या इतर गोष्टी यांच्यासाठी व्यापक शब्द; भाव वगैरे. [फा.]
**दरपटाण** स्त्री. उग्र, घाण वास. (राजा., कु.)
**दरपडा** पु. वैर.
**दरपये** क्रिवि. सविस्तर; तपशीलवार : 'येविशी गोविंदराव याणीं दरपये सेवेसी विनंती लिहिली आहे.' – पेद १९.९२.
**दरपुस्त** वि. पिढीजात.
**दरपैजाणे** क्रि. प्राण घेण्यासाठी जाणे.
**दरफडणे** अक्रि. आदळआपट करणे; चरफडणे; जळफळणे. [ध्व.]
**दरबंदी** स्त्री. पिकाची आणेवारी; गावाच्या वसुलाचे पत्रक.
**दरबार** पु. १. राजसभा; राजकीय कारभारी मंडळींनी राजाला भेटण्याची जागा. २. (ल.) लोकांची सभा. ३. सरकारने कचेरी अथवा सभा भरविणे व भेटी घेणे. (क्रि. करणे) ४. संस्थानी सरकार : 'दरबारमार्फत जरूर ते अधिकार देण्यांत येतात.' – स्वारीनियम १५.(बडोदे). ५. एक पदवी : 'दरबारी गोपाळदास.' – के ८.११.१९३८. [फा.]
**दरबारखर्च** पु. १. दरबारच्या, सरकारच्या अधिकाऱ्यांना दिलेला पैसा (लाच); कारकुनी. २. दरबाराकरता लागणारा पैसा.
**दरबारतोंड** न. दरबारातील (लाचखाऊ) अधिकारी. (क्रि.भरणे, दाबणे, चेपणे, धरणे, सांभाळणे.).
**दरबारमहशूर** वि. १. दरबाराशी परिचित; दरबारी लोकांशी घसट असणारा. २. जाहीर (वाईट कामाविषयी); सर्वत्र जाहीर (गोष्ट, काम). [फा.दर्बार + अर. मशहूर]
**दरबारी** वि. १. दरबारसंबंधीचा; विशेष शिष्टाचारांना अनुसरून असा (व्यवहार, बोली, मनुष्य इ.). २. वैभवसंपन्न; राजसभेचा घटक असलेला. ३. (ल.) पोकळ; खोटा; वरकरणी. [फा.]
**दरबारी कानडा** (संगीत) एक राग. गानसमय मध्यरात्र. शास्त्रकारांच्या मते हा शुद्ध कानडा होय.
**दरबारी जोडा** (ल.) जुना, फाटका जोडा.
**दर–बि–दर** वि. भणंग : 'आपले वडिलांस दर-बि-दर केलें.' – पकोघे. क्रिवि. दारोदार. [फा.]
**दरभाऊ** पु. एकाच स्त्रीचे दोन नवरे; भाडेभाऊ.
**दरमजल** पहा : **दरकूच**
**दरमहा** पु. प्रत्येक महिन्याचा पगार, वेतन; प्रत्येक महिना. क्रिवि. प्रत्येक महिन्याला, प्रतिमासी. (वा.) ० **करणे** – महिन्याचा पगार ठरविणे. [फा.दर्माह]
**दरम्यान** क्रिवि. मधल्या काळात; मध्यंतरी.
**दररिकीब** स्त्री. (ल.) सैन्याचा प्रत्येक हल्ला.
**दररोज** वि. १. प्रत्येक दिवशी; प्रतिदिनी. २. नित्य; नेहमी.
**दरवठॉ** पु. दरवाज्याचा उंबरठा. (गो.)
**दरवडा, दरवडेकरी–खोर** पहा: **दरोडा** इ.
**दरवळ** पु. उग्र वास (अत्तर इ.चा). [सं.द्रम् + वल्]
**दरवळणे** अक्रि. तीव्रतेने व दूरवर पसरणे (वास, विशेषत: सुगंध).
**दरवंद** पु. दरवाजा; लाकडी चौकट. (गो.)
**दरवाजा** पु. १. घर इ.त जाण्यायेण्यासाठी भिंतीत ठेवलेला मार्ग; दार; ते लावण्याच्या लाकडी फळ्या, कवाड. २. दारवठा. ३. प्रवेशाचे साधन. ४. शरीराची उत्सर्गद्वारे, भोक, छिद्र. ५. तोरण. ६. मुलींचा एक खेळ. – मखेपु ३४४. [फा.दर्वाझा] (वा.) ० **कोंडणे, दाबणे, धरणे** – उगम, उद्गम कोंडणे; रस्ता बंद करणे. ० **देणे** – दार बंद करणे.० **मोकळा टाकून राज्य करणे** – (चोर इ.पासून) सुरक्षिततेच्या, निर्भयपणाच्या बुद्धीने राहणे.
**दरवान, दर्वानकरी, दरवाजकरी** पु. देवडीवाला; पहारेकरी; द्वाररक्षक. [फा.दर्बान]
**दरवारी, दरवारीपत्रक** स्त्री. न. १. खेड्यातील जमिनीच्या जमाबंदीचे पत्रक. २. दरांचे, भावांचे, किमतींचे पत्रक.
**दरवेश–शी** पु. १. मुसलमानातील भिकाऱ्यांची फिरती जात, त्यातील एक व्यक्ती. हे वाघ, अस्वले, माकडे इ. चा तमाशा लोकांना दाखवतात. २. फकीर.
स्त्री.दरवेशाचा धंदा; फकिरी. [फा. दर्वेश]
**दरसाल** क्रिवि. प्रत्येक वर्षी.
**दरळ** वि. कठीण; अवघड : 'सासुरवासु दरळु ।' – उह २२२१.
**दरा** पु. स्त्री. १. खोरे; मोठी दरी; टेकड्यांमधील सखल भाग; कुहर; घोल. २. (ल.) पोट. [फा.दर्; सं.]
**दरा** पु. (कुंभारकाम) खड्डा; खळगा; चाकावरून मडके काढले म्हणजे ते ज्या खळग्यात ठेवून थोपटतात तो खळगा. – बदलापूर ६६.[सं.दर]
**दराखी** स्त्री. १. द्राक्षाची वेल. २. द्राक्ष.
**दराखोरा** पु. दरेखोरे; खाचर; खळगा; ओघळ; भगदाड. (वा.) **दरीखोरीं, दऱ्याखोऱ्यात पडणे, उतरणे, जाणे, घालणे, पाडणे** – दरिद्री होणे; नुकसानीत येणे; अब्रू जाणे; दारिद्र्यात टाकणे, गुरफटणे.
**दरा(र)ज, दर्ज** स्त्री. (सुतारी) लाकूड साफ करण्याचा मोठा रंधा. (कु.)
**दराडणे** अक्रि. १. खडसावून अंगावर जाणे; दरडावणे; आरडाओरडा करणे; धाकदपटशा दाखविणे. २.विभागणे; चिरणे. [सं.द्राड्]
**दराडा** पु. आडोसा : 'घांई अडदरलासि रे सुहाडा । टाकीं कामिनीचा दराडा ।' – उह १५५२.
**दराती, दरकत्ती** स्त्री. तीक्ष्ण पात्याचा विळा. (अहि.)
**दरादर, दरदरा, दरारा, दरारून** क्रिवि. भराभर; फराफर.
**दराब** पु. नाणे पाडणारा.– भाइसंवृ ८५. [फा. झर्राब]
**दरारणे** पहा : **दरदरणे**
**दरारा–ठा** पु. १. जोराचे खडसावणे; धमकी. २. धाक; दबदबा; भीती; अधिकार इ. ची छाप. [सं.दर]
**दरावणे** सक्रि. दटावणे; धाक दाखवणे. [सं.दर]
**दरांडा** पु. वळ; अंगावरील माराने सुजलेल्याची खूण: 'आईनं --- बदडली... पाठीवर कसले दरांडे उठले.' – नागीण ७६.
**दरिद्र** न. १. गरिबी; कंगालपणा. २. अभाव; न्यूनता; वाण; कमतरता. वि. गरीब; गरजू; कंगाल.[सं.] (वा.) **दरिद्रे विश्रांती घालणे** –

दारिद्र्याने ठाण मांडणे.

**दरिद्रदामोदर** पु. अत्यंत गरीब माणूस; ज्याच्या घरी अठरा विश्वे दारिद्र्य आहे असा मनुष्य; दरिद्र्यांचा राजा.

**दरिद्रनारायण** पु. दरिद्रांचा कनवाळू.

**दरिद्री** वि. १. गरीब; कंगाल; निष्कांचन. २. नीच; कद्रू; कंजूष; चिक्कू. ३.(ल.) अपुरा; उणा; सडसडीत; रोडका; भिकारी इ.

**दरिद्री हाड** गरीब हाड; गरीब आई-बाप किंवा कूळ यांत जन्मलेला माणूस; हलक्या पैदाशीचे गुरू.

**दरी** स्त्री. १. लहान दरा; दोन टेकड्यांमधील खोल भगदाड; भेग; चीर. २.गुहा. [सं.]

**दरी** स्त्री. सतरंजी. (व.) [फा.; हिं.]

**दरी** स्त्री. भातशेतीच्या बांधानजीक (बेणून) निघणारा केरकचरा. (आगरी)

**दरुणी-नी, दरुणी महाल** पु. अंत:पुर; जनाना; जनानखाना. न. सातारकर महाराजांच्या खास नेमणुकीला दिलेली वस्त्रे, अलंकार, जमिनी, मोकासे किंवा रोख पैसा खर्ची लिहिण्याचे मराठी दप्तरातील सदर. [फा.दरूनी]

**दरुबंकी** पु. अंतर्द्वारपाल. [फा.]

**दरेकसी** स्त्री. देरकशी, दिरंगाई.

**दरेटी** स्त्री. इमारती वगैरेच्या दगडांवरील जकात.

**दरेमार** पु. पर्वताच्या दरीत लोटून देऊन मारणे; कडेलोट : 'दरेमार तळवेमार होत ।' -दास ३.७.६३.

**द(दा)रोगा, द(दा)रोगेकरी** पु. १. कचेरीतील मुख्य अधिकारी, देखरेख, पाहणी करणारा; खात्याचा मुख्य; पैरवी करणारा अधिकारी; मुकादम. २. सारा जमा करण्यापूर्वी शेतकऱ्याने शेतातील उत्पन्न नेऊ नये म्हणून देखरेखीसाठी नेमलेला अधिकारी; पोलिसांचा मुख्य अधिकारी; कोतवाल. ३. देखरेख; व्यवस्था; पाहणी; ताबा; हुकमत. [फा.दारूघा]

**दरोड(डे)करी-खोर** पु. चोरांच्या टोळीतील एक मनुष्य.

**दरोडा** पु. १. दरोडेखोरांचा हल्ला; जबरदस्तीने लुटणे. २. चोरांचा समुदाय; टोळी. ३. (कायदा) पाच किंवा अधिक इसमांनी एखाद्या मनुष्याला जीव घेण्याची भीती घालून त्याच्या ताब्यातून जंगम माल नेणे. [हिं.]

**दर्क, दर्कदार-पट्टी, दर्कार, दर्खास्त, दर्गा** पहा : **दरक** इ.

**दर्ज, दरज** स्त्री. १. पहा : **दरजबंदी**. २. (ल.) फूट; वितुष्ट : 'तुम्हांकडील उणें पडावें असें बहुतांचें मतें आहे. याजकरिता कोणाचे बोलण्यास दरज न चालेसें करावें.' - ऐलेसं ५.२४४७. [फा.दर्ज़]

**दर्ज** पु.लिहिण्याची जागा. वि. १. लिहिलेले. २. दाखल; समाविष्ट. [अर.]

**दर्जगिरी** स्त्री. १. दरजबंदी. (क्रि.करणे.) २. (ल.) लिहायचा राहून गेल्यामुळे दोन ओळींच्या मधील जागेत लिहिला जाणारा मजकूर.

**दर्जा** पु. १. पदवी; पद; अधिकार; पायरी; योग्यता; सरकारी अधिकार, जागा. २. मुद्दा; गोष्ट : 'हे सर्व दर्जे नबाब यांचे ध्यानात आहेत.' - मइसा १९.९१. [अर.दरजा]

**दर्जी** पु. शिंपी. [फा.]

**दर्जेदार** वि. उच्चस्तरीय; चांगल्या प्रतीचा; वरच्या वर्गाचा.

**दर्डा** वि. क्रोधी; संतापी.

**दर्द, दरद** स्त्री. पु. १. दु:ख; विकार; रोग (विशेषत: हाडी खिळलेला). २. (ल.) काळजी; कळकळ; आस्था; खंत; कीव; जिव्हाळा; भीड. ३. (ल.) मुद्दा; खोच; मर्म : 'तुजमधें बहुत भरल्या इष्की दर्दा ।' - प्रला २३०. ४. सौंदर्य; तत्त्व (भाषण, लेख इ. मधील). ५.फोडातील पू. (कु.) [फा.]

**दर्दभरी** वि. उत्कट भाव असलेली, दु:खपूर्ण (कथा, काव्य इ.).

**दर्दी** वि. १. पहा: **दरदवंत**. २.दुसऱ्याच्या गुप्त गोष्टी, बिंगे जाणणारा; मर्म, मखखी जाणणारा; (गाणे इ. मधील) रसज्ञ; सौंदर्य, तत्त्व जाणणारा, त्याची आवड असणारा; तज्ज्ञ. [फा.दर्द]

**दर्दुर** पु. बेडूक. [सं.]

**दर्प** पु. १. गर्व. २. धीटपणा; धाडसीपणा; बेगुमानपणा; साहस; निधडा उत्साह. ३. उग्र वास. ४. धाक; दरारा; छाप; आदरयुक्त भीती; दाब. ५. प्रतिबिंब: 'दर्पणी पुरुषु दर्पु लाही । परि शिरहीनु दर्पेनि कायी ।' - गीता १.२०५. [सं.]

**दर्पण** न. आरसा. [सं.]

**दर्बा** पु. भाताचे फोलपट. (झाडी)

**दर्भ** पु. १. यज्ञ, होमहवन, पितृकार्यात वापरण्याचे एक प्रकारचे पवित्र गवत.उंची ४-५ फूट. नदी इ. च्या काठी याची बेटे वाढतात. यांच्या मुळ्या शीतल, मूत्रल व तृषाहारक असतात. २. (ल.) जळालेले, शुष्क झालेले पीक.[सं.] (वा.) ० **घेऊन उभा असणे** - दुसऱ्याला काही इजा करण्याच्या संधीची वाट पाहत असणे.

**दर्भक** पु. घोड्याच्या पायाला होणारा एक रोग. - अश्वप २.३८.

**दर्भशिखा** स्त्री. १. (दर्भाची काडी पेटवून इच्छित विषयाच्या पाठीशी लागण्याचा एक मंत्र आहे, त्यावरून) पिच्छा; तगादा; ध्यास. (क्रि. पाठीमागे, पाठीशी लावणे, बसणे.). २. न संपणारा पाठलाग; न चुकविता येणारा त्रास, रोग, प्लेग इ. [सं.]

**दर्भ्या** पु. १. अंत्यविधी चालविणारा ब्राह्मण; कार्टा. २.(ल.) दुर्दैवी, दरिद्री, अपशकुनी माणूस.

**दर्मदिवी** स्त्री. चंद्रज्योत. - हंको.

**दर्म्यान, दर्मियान, दरम्यान** वि. दलाल; मध्यस्थ; जबाबदार; जामीन: 'दरम्यान मसूर घेऊन करा भरपाई, सोडा आम्हांला... ।'- ऐपो २३६. क्रिवि. १. मध्येच; मध्यंतरी; ज्याची संमती घेणे आवश्यक त्याचा सल्ला न घेता स्वत:च केलेले (एखादे काम). २.चिकटून लागून; जवळ: 'भलतया कर्मी जाण । आपण राहतो दर्म्यान ।' - सिसं ६२.(को.) [फा.दर्मियान]

**दर्या, दरीया** वि. पु. आपला संपूर्ण आहार दोन किंवा तीन वेळा विभागून खाणारा साधक : 'अर्धा आहार : पाऊण आहार : दर्या' - लीचउ ५९६. [सं.]

**दर्या, दर्याव, दरिया** पु. १. समुद्र; मोठी नदी; सरोवर; पाण्याचा मोठा साठा, विस्तार. २. मोठी खाडी. (कु.) [फा.]

**दर्याई** वि. रेशमी : 'भोजन करते वेळेस सकल ब्राह्मण स्त्रीनें दर्याई चोळी

घालावी' - पेम ४०४.
**दर्याई** वि. समुद्रावरील; आरमारी.
**दर्याखोबरे** न. खोबऱ्यातील एक जात; झेरीगोठला. - मुंव्या १४९.
**दर्यागर्क** वि. समुद्राने बुडवलेले (गाव, जमीन).
**दर्यात-में खसखस** अतिशय मोठ्या प्रमाणात असणाऱ्या पदार्थात टाकलेली अगदी नगण्य पदार्थांची भर, भेसळ.
**दर्यादर** वि. चाचा; लुटारू. (गो.)
**दर्यावर्दी** पु. खलाशी; नाविक; खारवा; नावाडी. [फा. दर्या -नवर्द+ई]
**दर्याविस** वि. समुद्रकाठचा : 'दर्याविस तालुके मजकूरचे....' - ममारो २.२.
**दर्यासारंग** पु. नौसेनाधिपती. [फा.दर्या + सारंग]
**दर्र** पु. १. खिंड; दोन पर्वतांमधील मार्ग. २. घाट; दरी. ३. खोरे. [फा.]
**दर्रावणे** सक्रि. बैलगाडी जोराने पळविणे; दौडविणे; धावडणे. [हिं.दौडाना]
**दर्वड** वि. उंच; धिप्पाड.
**दर्वाजकरी, दर्वाजा, दर्वेशी, दर्वान** पहा : **दरवान, दरवाजकरी** इ.
**दर्वान** पु. १. फिरता व्यापारी. २. द्वारपाल. [फा.दर्बान]
**दर्वेवचें** सक्रि. भय, क्षिती बाळगणे. (गो.) [सं.दर]
**दर्श** पु. १. 'अमावस्येचा एकंदर काल साठ घटिकांहून जास्त असेल, तेव्हां कोणत्यातरी एका वारीं संपूर्ण अहोरात्रांतील साठ घटिकांचा काल अमावस्येचाच असू शकतो. त्या तेवढ्या साठ घटिका अमावास्याकालाला दर्श म्हणतात. किंवा फक्त एकाच वारीं संपूर्ण साठ घटिका असणाऱ्या अमावास्याकालाला दर्श म्हणतात. त्याचप्रमाणे कोणत्याही सूर्योदयकालाला स्पर्श न केलेली अशी अमावास्या (क्षयतिथी) असेल, तेव्हां त्या अमावास्याकालाला 'दर्श' म्हणतात.' - सुज्यो पृ.३६५-३६६. २. या दिवशी करायचे श्राद्ध. [सं.]
**दर्शक** वि. १. दाखविणारा; सांगणारा. २. (बीजगणित) घातप्रकाशक. ३. पाहणारा; प्रेक्षक; परीक्षक. ४.शास्त्र; कला इ. जाणणारा; तज्ज्ञ; मर्मज्ञ. [सं.]
**दर्शक सर्वनाम** नामाच्या मागे येणारा नामाचा निदर्शक शब्द, हा; तो. उदा. 'हा घोडा चांगला आहे.'
**दर्शन** न. १. अवलोकन; पाहणे. २. स्वप्न; दृष्टांत. ३. तत्त्वाचे ज्ञान होण्याला मदत करणारे शास्त्र; धर्म वा तत्त्वज्ञानासंबंधी सहा पंथ: 'न कळसी दर्शना धांडोळितां।'- तुगा ९२५. ४. (देव, देऊळ इ.ची) भेट; पाहणे; अवलोकन. ५. (ल.) दृष्टी: 'ना ना मावळतेनि तपनें । नेइजती लोकांचीं दर्शनें।' - ज्ञा १५.३६६. ६. नजराणा : 'ग्रंथसुवर्णमुद्रिके : खेवणुं भावमाणिकें : मग दर्सना देवों कवतिकें : श्रीप्रभुराया' - ऋव ३८३. [सं.] (वा.) ० **घडणे** - ओळख होणे; माहिती मिळणे.
**दर्शनकोन** पु.(ज्यो.) दोन दर्शनरेषा मिळून झालेला कोन.
**दर्शनदृष्टि-ष्टी** स्त्री. (नृत्य.) विशिष्ट वस्तूकडे विशिष्ट तऱ्हेने पाहणे.
**दर्शनपट्टी** स्त्री. दार, खिडकी इ. वर नक्षी केलेली लाकडी पट्टी.
**दर्शनपरीक्षा** स्त्री. रोग्याला नुसते पाहून रोगनिदान करण्याची पद्धत.
**दर्शनप्रतिभू** पु. जामीन; हमीदार.
**दर्शनरेषा** स्त्री.(ज्यो.) एखाद्या पदार्थाकडे पाहत असता डोळ्यांपासून पदार्थापर्यंत काढलेली रेषा.
**दर्शनसंतोष-षी** वि. १. देखणा; डौलदार; चांगला दिसणारा. २. (ल.) कपाळकरंटा; देखणा पण कुचकामाचा; दिखाऊ. ३. दर्शनाने तृप्त.
**दर्शनहुंडी, दर्शन धनाकर्ष, दर्शनी देय, हुंडी** पाहिल्याबरोबर पटविण्याची, सादर करताच पैसे मिळतात अशी हुंडी.
**दर्शनक्षमता** स्त्री. दिसण्याचा गुण, सामर्थ्य.
**दर्शनानुशास्त्र** न. प्रकाशशास्त्र; प्रकाशिका. [सं.]
**दर्शनिका** स्त्री. माहिती देणारे पुस्तक. (इं.) गॅझेटर.
**दर्शनी** वि. १. पाहण्यासंबंधी. २. देखणा; सुंदर; आल्हादजनक मुद्रेचा. ३. दिखाऊ; देखाव्यासाठी केलेला. उदा.दर्शनी -बाजू- खिडकी. ४. समोरील; पुढील; अगदी समोर दिसणारी (वस्तू).
**दर्शनी मूल्य** (अर्थ.)नाण्यावर लिहिलेली सरकारी किंमत.
**दर्शनीय** वि. पाहण्यासारखे; सुरेख; सुंदर; मनोहर. [सं.]
**दर्शपूर्णमास** पु. अग्निहोत्र्याने अमावस्या व पौर्णिमा या दिवशी करण्याचा याग. दुसऱ्या दिवशी प्रधानयाग करतात.
**दर्श(र्सा)विणे** उक्रि. १. दाखवणे; भासवणे; (अस्पष्टपणे, संदिग्धपणे) जाणवणे. २.सुचवणे; खुणावणे; अंदाज, अटकळ बांधणे; निर्देश करणे; समजावणे; (अन्योक्तीने, संकेताने) वरवर दाखवणे. [सं.दर्शन]
**दर्शित** वि. पाहिलेले; दाखवलेले. [सं.]
**दर्शी** वि. १. पाहणारा; द्रष्टा; दाखवणारा. (समासात) गुण-दूर-दोष - परिणाम- सूक्ष्म-तत्त्व- दर्शी. २.स्त्री पाहताच जागृत होणारी कामवासना : 'विषयवासने भेद किती ? : च्यारि : दंडी: दर्शी : स्पर्शी: कुचमर्दनी' - लीअ १३५. [सं.]
**दर्सदे** शंभरी; दरशेकडा.
**दल** न. १. पान; दळ. २. फुलाची पाकळी. ३.भाग; हिस्सा (विशेषतः अर्धा). ४. सैन्य; लष्कर. [सं.]
**दलचा** पु. घाई; सपाटा; दंगा: 'वरसंशोधनाचा सारखा दलचा उडवून दिला.' - संपूर्ण बाळकराम पृ.१६८.
**दलणे** अक्रि. द्वेष करणे. [दे.]
**दलदपट** वि. मजबूत; बळकट; धिप्पाड; सशक्त (माणूस, जनावर); टिकाऊ; मजबूत; भक्कम; अवाढव्य (इमारत, खांब); जंगी; राक्षसी; जाड (पोळी, वस्तू).
**दलदल-ली** स्त्री. १. पाणथळ जमीन; रुपण; रेवण; चिबिड; चिखलाची जमीन. २. चिकचिक; मातीत पाणी जास्त असणे.
क्रिवि. लटलट हलत; थरथर कापत. (ना.) [हिं.]
**दलदलणे** अक्रि. थरथर, लटलट हलणे; कापणे (पातळ सरस, पाक, रुपण, तक्तपोशी केलेली जमीन, भिजवलेले पीठ, थलथलीत मांस इ.).
**दलदलाट** पु. १. पावलांनी तुडवण्याचा आवाज (जनावर, माणूस इ.च्या). २. अतिशय दलदल.
**दलदलीत** वि. १. दलदलीने युक्त (जमीन). २.(ल.) शिथिल; लटलट हलणारे (शरीर); थलथलीत (मांस ). ३. फोपशा.
**दलन** न. १. दळणे. २. फोडून तुकडे, पीठ करणे; चुराडा करणे. [सं.]

**दलनायक** पु. सैन्यातील तुकडीचा मुख्य.
**दलबदल** पु. पक्ष बदलणे.
**दलबादल** न. सैन्य अथवा ढग यांचा जमाव; प्रचंड सेनासमूह. (क्रि.पडणे, जमणे, निघणे, भरून येणे.)
वि. मोठा; भव्य; जंगी; प्रचंड; अनेक वस्तूंनी भरलेला. [हिं.]
**दलभंज(ग)न** न. १. घोड्याचे अशुभ चिन्ह; यात तोंडावर (किंवा पुठ्ठ्यावर) पांढरा पट्टा असून त्यात काळा किंवा तांबडा भोवरा असतो. या अशुभ चिन्हामुळे धन्याची संपत्ती नष्ट होते अशी समजूत आहे. २.(ल.) दुर्दैवी; फुटक्या नशिबाचा (माणूस).
**दलभार** पु. १.सैन्याचा समुदाय; सर्व सैन्य; शक्ती; जोर; बळ. २. पायदळ (अश्व-गज इ. प्रमाणे). [सं.]
**दलवट** न. पायमल्ली; तुडवणी :'मोगलाचे फौजेच्या दलवटामुळे खराब जाहला'– पेद १५.४५.
**दलशिंगार** पु. जीनगर, सैन्यातील घोड्यांचे खोगीर व त्यासारखी इतर चामड्याची कामे करणारा. [सं.दल + शृंगारी]
**दलाब** स्त्री. फडताळ; भिंतीतील कपाट.
**दलामालकी** स्त्री. १. दुसऱ्याच्या कामात, धंद्यात बिनफायदेशीर ढवळाढवळ किंवा भागीदारी. २.लांडा कारभार; फाजील लुडबुड. ३.त्रासदायक काम; कंटाळा येण्याजोगी खटपट; बारीकसारीक त्रास.
**दलाल** पु. अडत्या; मध्यस्थ; गिऱ्हाईक व दुकानदार या उभयतांचा व्यवहार मध्यस्थपणे बोलाचालीने साधून देणारा माणूस. [अर.दल्लाल]
**दलाली** स्त्री. १.अडत्याचे काम. २. त्याची मजुरी; अडत; अडतीची मिळकत. ३. मालाचे वजन करण्यासाठी, माप घेण्यासाठी द्यावा लागणारा कर; जकात. [फा.]
**दलांबर** न. मध्यांबरानंतर येणारा, वातावरणातील सुमारे ४०० कि.मी. पर्यंत उंच असलेला व रेडिओ, बिनतारी संदेश व दूरचित्रवाणीच्या संचारणासाठी उपयोगी पडणारा थर.
**दलित** वि. १. दळलेले; भरडलेले. २. फोडलेले; तुकडे केलेले; चुरडलेले; मोडलेले. ३. तुडवलेले; खाली ठेवलेले, चेपलेले, दाबलेले. ४. हलकी जात, वर्ण. [सं.]
**दलित्र** न. कठीण पदार्थ फोडून लहान तुकडे करणारे यंत्र.
**दलिद्दर** वि. १. दरिद्री. २. चिक्कू.(व.) [सं.दरिद्र; हिं.]
**दलिद्दरखाना–वाडा** पु. १. भिकारचोट, दरिद्री माणसाचे घर. (ना.)२. कंजूषपणाचा कारभार.
**दलिया** पु. (विशेषत: खिरीसाठी वापरतात तो) गव्हाचा जाड रवा.
**दलेल** स्त्री. शिक्षा; दंड; अद्दल. (व.)
**दलोत्तराक्ष** पु. (कृषि.) पानावरील डोळा. [सं.]
**दलोर्स** पु. नारळाचा पाणी घालून काढलेला रस, दूध. [सं.दल + रस]
**द(ध)ल्डा** पु. म्हातारा.(अहि.)
**दव** पु. १. वणवा; दावानल. २. अरण्य; वन. [सं.]
**दव** न. १.हिमतुषार; दहिवर; रात्रीच्या वेळी जमिनीत गारठा उत्पन्न होऊन हवेतील आर्द्रतेमुळे जमिनीवर पडणारे थेंब. २. दलदलीत जमिनीपासून निघणारा पाझर. [सं.द्रव]
**दवड–डी** स्त्री. दगडी; अन्नाचे खोलगट दगडी ताट.
**दवडणे** उक्रि. १. दौडणे. २. भरधाव धावायला लावणे; घालवणे; जबरदस्तीने दामटणे; ताबडतोब रवाना करणे (निरोप, पत्र इ.) : 'श्रीनें रक्षक देवर शुचिभक्त परंतु दवडिला रागें ।' – मोरा परंतुरामायण अरण्य २३.११३३. ३.सोडून, फेकून देणे; उधळणे; नासणे; उडविणे. ४. (ल.) (चांगले नाव, कीर्ती, पैसा) गमावणे; घालवणे; हरवणे; नाहीसे करणे; (दूषण, संकट, रोग, दिवा) काढून टाकणे : 'असता दीपु दवडिजे ।' – ज्ञा १.२४७. [सं. धाव्; हिं. दवडना]
**दवणशीर** स्त्री. टाचेवरची मोठी शीर; धोंडशीर.
**दवण शेवंती** नक्षीदार पाने व गेंदाप्रमाणे फूल असणारी सुवासिक शेवंतीची एक जात. हे झाड वीत–दीड वीत उंच वाढते. पिवळी व पांढरी अशा तिच्या दोन जाती आहेत.
**दवणशेवंते** न. दवणशेवंतीचे फूल.
**दवणा** न. १. एक उग्र सुवासिक वनस्पती; याचा सुगंधी पदार्थामध्ये उपयोग करतात. पाने गाजराच्या पानांसारखी असतात. याची झाडे घराच्या आसपास लावल्याने घरात सर्प येत नाही. सर्पाच्या विषावर दवण्याच्या मुळ्या व पाने खावीत अगर रस घ्यावा. गुरांनाही गुण येतो. २. चैत्र महिन्यात दवण्याने कुलदेवतेची पूजा करण्याचा विधी. ३. गांडूळ; काडू. [सं. दमनक; क. दवन]
**दवणा, दवा** पु. १. गुरांचा दलाल. २. नायकिणींच्या पाठीमागे वाद्ये वाजविणारा माणूस. (बे.)
**दवणा पुनव, पौर्णिमा, दवणे पर्व** पहा : **दमनपौर्णिमा**
**दवणे** न. पहा: **दवणा** ३
**दवणे** न. दवंडी. (गो.)
**दवणेगिरी** स्त्री. कुंटीणपणा. (गो.)
**दवदव** स्त्री. दगदग; त्रास; खस्त; काळजी; दु:ख; परिश्रम. (क्रि.काढणे, करणे, पुरविणे, पाडणे,निघणे.) [फा.दवादौ]
**दवबिंदू** पु. १. (भौतिक.) हवेतील बाष्पाचे पाण्यात रूपांतर होण्याची क्रिया ज्या तापमानाला सुरू होते ते तापमान. २. (हवामानशास्त्र) हवेत अधिक बाष्प न निर्माण होता अथवा दाबामध्ये बदल न होता ज्या तापमानाला हवा थंड होऊन संपृक्त होते ते तापमान.
**दवरचे** अक्रि. ठेवणे; राखणे. (गो.)
**दवरणे** न. रस्त्याच्या बाजूने ओझी ठेवण्यासाठी बांधलेला ओटा, कट्टा. (गो., को.)
उक्रि.(ओझे) खाली ठेवणे.(को.)
**दवरा** पु. भोवळ; चक्कर; मूर्च्छा. (अहि.)
**दवली** स्त्री. नारळाच्या नरोटीची पळी; डवली; डाव. (कु.)
**दवलेरी** स्त्री. वारली लोकांत लग्नविधी चालवणारी वृद्ध स्त्री.
**दवसन** स्त्री. सांबराची लोळण्याची जागा.(झाडी)
**दवंडाळ** वि. (बायकी) गप्पिष्ट; बाताड्या.
**दवंडाळणे** अक्रि. भलतीकडे झोके खाणे; मागेपुढे करणे.
**दवंडी** स्त्री.१.डांगोऱ्याचे ढोलके; ढांढोरा. २.(त्यावरून) जाहीर करण्याची बातमी. ३.(ल.) प्रसिद्धी; बभ्रा; दुर्लौकिक; डांगोरा;

जाहीरनामा. [त.डवंडे; सं. डिंडिम; हिं.]

**दवंड्या** पु. दवंडी पिटणारा.

**दवा, दवादारू– पाणी** स्त्री. औषध; औषधी द्रव्य. [अर.]

**दवाखाना** पु. औषधालय; डॉक्टर, वैद्य यांचे व्यवसायाचे स्थान. [फा.]

**दवात** स्त्री. दौत. (काशी) [अर.]

**दवादवी** पु. १. जासूद; हर्कारा. २.आचारी. [फा. दवादव्]

**दवाली** स्त्री. उमेद; ईर्षा. (व.) [फा.दवादव]

**दवासन** न. १. घोड्याच्या गळ्यात बांधण्याचे चऱ्हाट; गळबंद. २. (ल.) आडकाठी.

**दवांक** पु. ज्या विशिष्ट तापमानाला हवा बाष्पसंपृक्त होते तो बिंदू.

**दश** वि. दहा ही संख्या. [सं.]

**दशक** पु. न. १. दहांचा समुदाय. २.(गणित) घेतलेले, धरलेले दहा. ३. दरशेकडा दहा. [सं.]

**दशक** पु. वरचष्मा; वर्चस्व; वरचढपणा. (क्रि. चढविणे).

**दशक्रिया** स्त्री. हिंदू धर्मशास्त्राप्रमाणे व्यक्तीच्या निधनानंतर दहाव्या दिवशी करावयाचा विधी. [सं.]

**दशग्रंथी** वि. वेदाची संहिता, ब्राह्मण, आरण्यक, शिक्षा, कल्प, व्याकरण, निघंटु, निरुक्त,ज्योतिष, छंद हे दहाही ग्रंथ मुखोद्गत असणारा (ब्राह्मण).

**दशदिशा** स्त्री. अव. चार मुख्य, चार उप, ऊर्ध्व व अधोदिशा अशा दहा दिशा.

क्रिवि. सर्व दिशांना–बाजूंना; सर्वत्र; चहूंकडे. (क्रि. पळणे, फाकणे).

**दशन** पु. दात. [सं.]

**दशपदी** स्त्री. दहा ओळींची कविता.

**दशमग्रह** पु. (विनोदाने) जावई.

**दशमद्वार** पु.१. (योग.) ब्रह्मरंध्र (शरीराला नवद्वारे आहेत, ती सोडून टाळूवरील). २. पोत; एखादी जखम वाहण्यासाठी उघडी रहावी म्हणून तिच्यात घालतात ती वात. ३. (सांकेतिक) गुद.

**दशमभ्रांती** स्त्री. मोजताना एखादा मनुष्य स्वत:ला विसरतो तो प्रकार.

**दशमानपद्धती** स्त्री. मेट्रिक सिस्टिम या इंग्रजी शब्दाला प्रतिशब्द. या पद्धतीत मीटर, लिटर ही परिमाणे धरली जातात व इतर परिमाणे दसपटीने किंवा दहाव्या भागाने चढत-उतरत जातात. १ मी. = १.१ यार्ड, वार, १०० सेंमी. १सेंमी. = १० मिमी. इ.

**दशमांश** पु. दहावा भाग; दशांश.

**दशमी** स्त्री. चैत्रादी चांद्र महिन्यांच्या दोन्ही पक्षांतील दहावी तिथी.

वि. दहावी (वस्तू इ.).

**दशमी** स्त्री. कणीक अथवा जोंधळे, बाजरी इ. च्या पिठामध्ये दूध किंवा फळाचा रस घालून केलेली भाकरी. ही पीठ भाजूनही करतात. [सं.दह]

**दशमी दशा** माणसाच्या आयुष्यातील शेवटची अवस्था.

**दशमूळ** न. दहा वनस्पतींच्या मुळांपासून केलेले औषध.

**दशरथ ललिता, दशरथ थळी** आश्विन कृष्ण चतुर्थीच्या रात्री करण्याचे एक व्रत, तत्संबंधी गणपतीपूजन.

**दशवंत** पु. (शीख.) स्वत:च्या उत्पन्नाचा धर्मासाठी द्यावयाचा एकदशांश भाग.

**दशा** स्त्री. १. अवस्था; स्थिती. २. आयुष्यातील बाल्य इ. अवस्था; वय. ३. दैन्य; अडचण; दु:ख, त्रास इ. ची स्थिती; वाईट दिवस. ४. (ज्यो.) जन्मकालीन ग्रहांची स्थिती; सुखदु:खादी फळ मिळण्यासाठी कारणीभूत ग्रहस्थिती. उदा. महादशा, अंतर्दशा इ. ५. दशीचे अगर कापडाचे न विणलेले शेवटचे दोरे, सुते. [सं.]

**दशातला** वि. ज्याचे सुतक दहा दिवस धरावे लागते अशा नात्यातला.

**दशानंद** वि. सर्व प्रकारच्या उत्कर्षाचा आनंद देणारा.

**दशाफळ** न. एक व्रत; पोवते वाहण्याचा विधी. (अहि.)

**दशावचप** अक्रि. निलाजरा होणे. (गो.)

**दशावतारी–र** पु. १. दशावतारांचे सोंग घेणारा, नाटक करणारा. २. दशावतारांची ज्यावर चित्रे आहेत अशा खेळण्याच्या गंजिफा. चंगकांचनी हा याचाच एक प्रकार.

**दशाश्व** पु. चंद्र. [सं.]

**दशाह** पु. सुतकाच्या दहा दिवसांचा काळ.

**दशाहरा–हार** पु. १. ज्येष्ठ शुद्ध दशमी. या दिवशी गंगा अवतरली. २. ज्येष्ठ शुद्ध प्रतिपदा ते दशमीपर्यंतचा दहा दिवसांचा काळ व त्यातील गंगोत्सव.

**दशाक्षय** पु.नवग्रहांच्या दशेची समाप्ती. [सं.]

**दशांग** न. चंदनादी दहा सुगंधी द्रव्यांचा धूप.

**दशांगुळे** न. अव. १. दहा बोटे. २. आठव्या महिन्यात गर्भाला दहा बोटे उत्पन्न होतात, म्हणून गर्भवती स्त्रीचा त्यावेळी करावयाचा संस्कार. ३. दोन हातांच्या दहा बोटांत घालावयाचा एक दागिना: 'पोल्हारें विरुद्या दशांगुळिं वळीं गर्जोनियां पोंचटें।'– अकक २ अनंत सीतास्वयंवर ३९.

**दशां(शी)चे पागोटे** सुट्या दशा (झिरमिळ्या) असलेले पागोटे.

**दशांश** पु. दहावा हिस्सा.

**दशांश अपूर्णांक** (अंकगणित) दहा किंवा त्याचा कोणता तरी घात, ज्या अपूर्णांकाचा छेद असतो तो.

**दशांश चिन्ह** अमुक संख्या दशांश अपूर्णांक आहे हे दाखवण्यासाठी त्या अपूर्णांकाच्या मागे केलेले (.) असे चिन्ह.

**दशी** स्त्री. कापडाच्या टोकाचा न विणलेला दोरा, सूत. (विणकाम) रक्टनच्या पुढे चार बोटे नुसता असलेला उभार. [सं.दशा; क. दशे] (वा.) ० **वाहणे** – शुद्ध प्रतिपदेच्या दिवशी चंद्राकडे जुन्या वस्त्राची दशी फेकतात व 'जुने वस्त्र घे व नवे वस्त्र दे' असे म्हणतात ती पद्धत.

**दशीर** स्त्री. दिव्यातील वात. (गो.)

**दसक** पहा : **दशक** १,२

**दसकों** वि. १. दोन्ही पक्षांतर्फे खेळणारा. २. चहाडखोर. (गो.)

**दसदोनबारा** पु. अव. फाशांवरील बाराचे दान.

**दसनहाण–वंदन** न. लग्नानंतर दहाव्या दिवशी जोडप्याला घालावयाचे अभ्यंग स्नान.

**दसनामा** पु. पंचामार्फत चौकशी.

**दसपगडी** स्त्री. सोंगट्यांचा खेळ : 'दसपगड्याच्या तोडीच्या प्रावीण्या-प्रमाणेच दशावताराच्या गंजिफांच्या खेळांत अखेरीं मारण्यांतही मीं

मोठें कौशल्य संपादिलें होतें.' – बहुरूपी पृ.३७.

**दस(श)पिंड** पु. अव. मृत मनुष्याला पहिल्या दिवसापासून दहाव्या दिवसापर्यंत दररोज एक किंवा दहाव्या दिवशी एकदम द्यावयाचे भाताचे दहा पिंड. [सं.]

**दसपूर्जा** वि. विधुर. (व.)

**दसप्यादा** दोन फाशांवरील प्रत्येकी पाच व एकावरील एक असे अकराचे दान.

**दसम** स्त्री. दशमी तिथी. (गो.)

**दसरवाल** पु. दसऱ्यात निघणारा पावटा. (झाडी)

**दसरंग** पु. (कुस्ती) एक डाव; आपल्याला कोणी खाली घातल्यास आपला एक हात जोडीदाराच्या पोटाखाली घालून आपण त्याच बाजूने फिरून जोडीदाराला चीत करणे. आपला एक पाय जोडीदाराच्या पिंडरीवर घालून जोडीदाराची पिंडरी आपल्या त्याच पायाच्या पंज्याच्या सांध्याने धरावी व आपण त्या बाजूने फिरून जोडीदाराला चीत करावे.

**दसरा** पु. आश्विन शुद्ध दशमी; विजयादशमी; हिंदूंचा एक मोठा सण. या दिवशी राम रावणावर चढाई करण्यासाठी निघाले म्हणून, तसेच हा देवीचा सण आहे म्हणून नवरात्र झाल्यावर या दिवशी शमीचे व शस्त्रांचे पूजन करून मोहिमेवर जायचे असा क्रम मराठेशाहीत होता. [सं.दशाह]

**दसरात पंचरात** एक प्रकारचे दिव्य; यात फिर्यादि किंवा साक्ष दिल्यानंतर दहा-पाच दिवसांत फिर्यादीची मुले किंवा गुरेढोरे मेली तर तो खोटा व मेली नाहीत तर खरा समजून चौकशी करण्यात येई.

**दसरापट्टी** स्त्री. १. दसऱ्याच्या दिवशी बसविलेला जमाबंदीचा हप्ता. २. दसऱ्याच्या खर्चासाठी निराळा काढलेला देवस्थानच्या उत्पन्नाचा भाग.

**दसराबकरा** पु. १. दसऱ्याच्या दिवशी बळी द्यावयाचा बोकड. २. दसऱ्याच्या दिवशी पाटील, कुलकर्णी यांचा हक्क म्हणून द्यायचा बोकड अथवा बकरे.

**दसऱ्या वाजप** एक मोठे वाद्य (दसऱ्याला वाजणाऱ्या पुष्कळशा वाद्यांच्या नादावरून). (गो.)

**दसाडशत** वि. पंधराशे : 'वोविया दसाडशत रत्नमाळ' – तसा १०३६. [सं. दश+अर्ध+शत]

**दसाडे** न. १. पहा: **दशी.** २. तेलाच्या घाण्यातील तेल पुसून काढण्यासाठी केलेला सुताचा, कापसाचा बोळा; जाडेभरडे कापड. [सं.दशा]

**दसी** स्त्री. नीट न विरजल्या गेलेल्या दह्याची कवडी : 'डुळडुळित दसीया होति' –गोप्रच २६. [सं.दसा]

**दसो(स)डी** स्त्री. (निंदाव्यंजक) कापडाची, वस्त्राची दशी: 'तुका म्हणे तुझी नलगे दसोडी।' – तुगा ८४७. [सं.दशा]

**दस्कला** पु. चामड्याचा बंद. [अर.]

**दस्त** पु. न. १. कर; पट्टी; सारा. २. (गंजिफा) हात (चार पानांचा). ३. (ल.) ताबा; हक्क; सत्ता; अधिकार; अंमल : 'डोळेझांक करून तसेंच देशास कजिया सोडून यावें तर तमाम दस्त उठेल.' – मइसा ३.१४९. ४. (जुन्या कागदपत्रांत) हात. ५. जुलाब; ढाळ. (व.) ६. शेला; दुपट्टा. ७. कैद: 'दस्त करा शिवराजाला।' – ऐपो १४. [फा.]

**दस्तअंमल** पु. गावचा वसूल, हिशेब.

**दस्तउतार** पु. (कुस्ती) परस्परांच्या मानेवर हात देऊन उभे असताना आपला डावा हात प्रतिपक्ष्याच्या उजव्या दंडाखाली ठेवून एकदम झटक्याने वर उडवून व उजव्या हाताने मान डावीकडे वळवून त्याच्या पाठीमागे जाणें.' – व्याज्ञा ४.१६९.

**दस्तऐवज** पु. (कायदा) अक्षरे, अंक किंवा खुणा या साधनांनी पुरावा म्हणून उपयोग व्हावा या हेतूने खादी गोष्ट मांडली आहे असा लेख; हातचा कागद; प्रमाणपत्र; हक्कपत्र; कबाला; करारनामा; सही; ज्याच्या योगाने एखादा मनुष्य कायद्यात बांधला जातो अशी कोणतीही गोष्ट (लेख, खूण, हमी, लिहिलेला कागद इ.). [फा.दस्त–आवीझ]

**दस्तक** न. १. परवाना. २. तोंडी, जबानी पुरावा. (कु.) ३. जकातमाफीचे सरकारी पत्र. ४. आज्ञापत्र: 'मार्गी मुजाइम न होतां सुखरूप जाऊं देणें म्हणोन दस्तक.' – वाडबाबा २.१४५. [फा.]

**दस्तकी** पु. लवाजमा, रुसूम किंवा पोलिटिकल पेन्शन घेण्याची सनद ज्याच्या नावाने असते तो (घराण्यातील मुख्य मनुष्य). (व.)

**दस्तखत, दस्क(स्ख)त** न. १. हातचा लेख; सही. २. राजाची सही. ३. सही; शिक्का किंवा तो करण्याचा अधिकार.

**दस्तखत दप्तर** सह्या घेण्याची व दप्तर ठेवण्याची कचेरी.

**दस्तगिरी** स्त्री. १. मदत; साह्य: 'श्रीमंत माझी दस्तगिरी करतील.' – मइसा १.१५७. २. स्नेह; कृपा.

**दस्तगीर** वि. कैद; बद्ध : 'इस्मालमबेग दस्तगिरींत आला.' – दिमरा २.२६.

**दस्तन** स्त्री. सैन्यातील संख्येचे विशिष्ट परिमाण; मराठ्यांच्या फौजेत ११ शिपायांची एक कुंपीन, १०० कुंपीनीची एक पलटण, ११ पलटणींचा एक कंपू व ११ कंपूची एक दस्तन. [फा.]

**दस्तनी** स्त्री. (चिलखताच्या) मुठीची दोरी. [फा.]

**दस्तपंजा** पु. दस्तक; परवाना; कौल; अभयपत्र.

**दस्तबंद** पु. रत्नांचा किंवा मोत्यांचा सर; हातात घालण्याचा दागिना : 'कंठीं, सरपेंच, निगा, दस्तबंद, भुजबंद याप्रमाणें.' – मइसा ७. [फा. दस्त+बंद]

**दस्तबाकी** स्त्री. १. जमिनीचा सारा गोळा करून जमाखर्च दप्तरी दाखल न केलेली रकम; (मामलेदाराच्या) हाती राहिलेली बाकी. २. (जवळ असलेली) शिल्लक.

**दस्तमल** पु. गावचा वसूल.

**दस्तरस्त** पु. बंदोबस्त; जप्तरस्त : 'दस्तरस्त सर्व आपला आहे.' – ऐटी २.७२.

**दस्तरबंदी** स्त्री. पागोटे बांधणे; (ल.) अधिकारदान.

**दस्तरुमाल, दस्ती** पु. स्त्री. खिशातील हातरुमाल: 'वैराग्याच्या वेगानें फडकणाऱ्या भगव्या झेंड्याला दारूबाजाचें तोंड पुसण्याचा दस्तरुमाल केला.'–गडकरी राजसंन्यास ७५. [फा.]

**दस्ता** पु. १. चोवीस कागदांची गड्डी. २. बंदुकीचा मागचा लाकडी भाग. ३. सैन्याची तुकडी. ४. पहा: **दस्त** २. ५. बत्ता. ६.मूठ; पकड; भाता. ७. तुंबा. ८. विड्याची पाने गुंडाळून ठेवण्याचे फडके, डबी.

९. लहान मुलांच्या पाणी घालण्याच्या खेळातील एक संज्ञा. [फा.]

**दस्ताना** पु. १. हस्तत्राण; गोधाचर्म; धनुष्याच्या दोरीचे आघात हातावर लागू नये म्हणून कोपरापासून बोटापर्यंतचा चामड्याचा, लोखंडी हातमोजा; मनगटाच्या सुरक्षिततेसाठी बांधण्याचा चामड्याचा पट्टा. २.(गणित.) हातचे दहा. [फा.]

**दस्तार** स्त्री. पागोटे. [फा.]

**दस्तारबदल** स्त्री. पगडी बदलून मैत्री करणे; पगडभाई होणे.

**दस्ताव(ब)णे** सक्रि. लुबाडणे; हिसकून घेणे; हात घालणे. [फा.दस्त]

**दस्तावायदा** पु. लेखी करार.

**दस्तावेज** पु. चिमटा. [फा.]

**दस्ती** स्त्री. १. चाल; रीत; मार्ग; पद्धत; तऱ्हा; ठसा; छाप; ऐट; स्वभावसूचक विशेष; लकब; लक्षण : 'त्याची दस्ती नाहीं कोणाला।' – ऐपो ३२६. २. (कुस्ती) पवित्र्यानंतरची सलामी. (क्रि.करणे) ३. दसऱ्याचा नजराणा. ४. हातरुमाल. (व.) [फा.दस्त]

**दस्ती** वि. सरकारी कर बसवण्यास योग्य (झाड, शेत इ.).[फा.दस्त]

**दस्तीबूज** स्त्री. गंजिफांच्या खेळातील एक शब्द.

**दस्तुरी** स्त्री. १. मजुरांना काम मिळवून देण्याबद्दल घेतलेली अडत. २. कर; जकात; रस्तापट्टी; नाकेपट्टी; नाके. ३.ओझे; सामान-सुमान; बाडबिछायत. (कु.) [फा.दस्तूर + ई]

**दस्तूर** पु. १. वहिवाट; पद्धत; चाल. २. जकात; कर. ३. नियम; कायदा. ४. हस्ताक्षर; लेख; लेखक किंवा त्याची निशाणी. ५. कारकुनाची सही. ६. नमुना (सरकारी कागदाचा). ७. परवानगी. [फा.]

**दस्तूर** पु. पारशी धर्मगुरू. [फा.]

**दस्तूरअम्मल** १. सरकारी कायदा. २. कायदेशीर शिरस्ता; वागण्याचा नियम.

**दस्तूरखुद-द्** वि. स्वतःच्या हाताने लिहिलेले (पत्र, कागद इ.). [अर.]

**दस्तेकरी** पु. विड्यांची पाने सांभाळणारा नोकर. [फा.]

**दस्यु** पु. १. असुर. २. दास. ३. चोर. [वै.सं.]

**दहक** पु. १. शेकडा दहा; शेकडा १० चा दर. २. पट्टी; कर. ३. दहावा हिस्सा. ४. पत्त्यांतील दश्या; दहिल्या. ५. पहा : **दशक**. [सं.दशक]

**दहकपट्टी** स्त्री. इनाम जमिनी सोडून इनामदाराकडून अवांतर उत्पन्नावर घ्यावयाचा कर. ह्या दर दहा वर्षांनी वसूल करतात.

**दहन** पु. अग्नी.

न. जळणे; प्रेताचा दाहसंस्कार. [सं.]

**दहर** वि. द्रोही. (व.)

**दह(हि)लू-ल्या** पु.(पत्त्यांतील) दश्या; १० ठिपक्याचे पान.

**दहशत** स्त्री. भीती; धास्ती; धाक; भय; धडकी. [अर.]

**दहशतवाद** पु. लोकांमध्ये भीती निर्माण करण्यासाठी केलेले हिंसात्मक गुन्हेगारी वर्तन.

**दहा** संवि. १. एक संख्या; १०. २.(ल.) चारचौघे (लोक); समाज: 'धर्मा होइल दहांत कुत्सा हे।' – मोभीष्म ११.७३. [सं.दश]

**दहाक** न. एक गोंडी वाद्य. हे मोठ्या डमरूसारखे असते. [ध्व.]

**दहाट** वि. तल्लख; जलाल; तापट; तामसी: 'अचाट जाट ते दहाट आट काट मीळती।' – अकक २ अनंत सीतास्वयंवर २३.

**दहिवर** पु. दव; हिम.

**दहिवरणे** अक्रि. दवयुक्त होणे; दवारणे.

**दही** न. दूध विरजल्यावर तयार होणारा पदार्थ.[सं.दधि] (वा.) ० **खाऊ की मही खाऊ** – मनाची संदिग्धावस्था. ० **मही करणे, खाणे** – टंगळमंगळ, काकू करणे.

**दहीकरंबा** पु. दूध-भात कालवून त्याला विरजण लावून केलेला पदार्थ : 'बाइसी भातांतु घातले : ताकाचे बोट लाविले : दहीकरंबा केला' – लीचपू ५२७. [सं.दधि+करभा]

**दहीकरिणी** स्त्री. दही, दूध विकणारी : 'दहीकरिणी... दहीए दुध तुपें विकावेया गेलिया होतीया' – लीचपू २२८. [सं.दधि+कृ]

**दही(हि)कवडी** स्त्री. खडबडीत व अतिशय पांढरी कवडी : 'दही कवड्या टाकून प्रश्नांचीं उत्तरें द्यावीं।' –अरुणोदय १५.

**दहीकाला** पु. उत्सवाच्या अखेरच्या दिवशीच्या कीर्तनात एका मडक्यात दही व लाह्या घालून ती हंडी टांगतात व मग ती फोडून त्यातील हाती लागलेला भाग देवाचा प्रसाद म्हणून खातात तो.

**दहीबुत्ती-भात** स्त्री. पु. भाताचा एक प्रकार. मिरची, कोथिंबीर, फोडणी, दही घालून केलेला भात.

**दहीहंडी, दहें (ह्यां)डी** स्त्री.१.दही ठेवण्याचे मडके. २.गोकुळाष्टमीच्या दुसऱ्या दिवशी दह्याचे मडके उंच टांगून मग माणसांची एकावर एक गोल रिंगणे रचून त्यावर चढणाऱ्या एकाने ते फोडायचे व त्यातील दही सर्वांनी खायचे हा उत्सव; तशी हंडी फोडण्याची वेगवेगळ्या पथकांमधील स्पर्धा. ३. एक कर. काजी याची वसुली करत असे.

**दहेलज** स्त्री. घराच्या, वाड्याच्या प्रवेशद्वाराच्या आतील बाजूला असलेली खोलीवजा बैठक; देवडी. (ना.) [सं.देहली]

**दळ** न. १. पहा: **दल**. २. ओव्याचे औषधी चूर्ण. ३. सत्त्व; सार; मगज; गर; गाभा; (फळे, पाने, जमीन यांतील) रस. ४. फळातील गर; (कागद, पान, हिरा इ.ची) जाडी. ५. कीट; घाण; फळातील आठळी. ६. कवच. – हंको. ७. वर्ख; मुलामा : 'ब्रह्मविद्येचा वोरकली : देवतास्वरूपें कसिली : तंव जाली दळाची तीयें '– उगी ५४७. ८. सुगंधी फुलाचे काढलेले तेल. ९. सैन्य. [सं.दल]

**दळखांब** पु. (विणकाम) विणकराच्या बसण्याचा जागेच्या पुढील खुंट.

**दळखुट** पु. (विणकाम) बैलीच्या पुढचा भाग.

**दळगा** वि. १. कमनशिबी; अपयशी. २. निष्क्रिय.

**दळण** न. १. दळणे. २. दळायचे, दळलेले धान्य, वैरण; दळताना जात्यात घालायचा एक वेगळा घास. ३. दळणवळण; परिचय. (राजा.) ४. (ल.) रेंगाळत केले जाणारे काम. ५.आचरण. [सं.दलन]

**दळणकांडण, दळणभरडण, दळाकांडा** न. पु. बायकांची, मोलकरणीची घरातील ढोबळ कामे.

**दळणवळण** न. परिचय; जाणेयेणे; ओळख; व्यवहार.

**दळणावळ, दळाई** स्त्री. दळण्याची मजुरी, मोल.

**दळणे** सक्रि. धान्याचे जात्यात, गिरणीत पीठ करणे. [सं.दल्]

**दळदपट** वि. जाड; टिकाऊ; अवाढव्य.

**दळदार** वि. जाड; गिरदार; सत्त्वांशयुक्त; भरदार; कसदार (फळ इ.).

**दळप** न. १. पहा : **दळण** १,२.२. दळण्याचे धान्य. ३. दळण्याची मजुरी.

**दळपवित्र** न. सोन्याचा मुलामा असलेले तुळशीपत्र.

**दळपीण, दळणकरीण** स्त्री. दळण दळणारी.

**दळभद्रा** वि. भित्रा; दुर्दैवी.

**दळभार** पु.१. सर्व सैन्य. २. पायदळ.

**दळया, दळ्यां** पु. लाडू. पहा : **दळिया**
वि. १. दळण्याला योग्य (जाड व मोठा तांदूळ). २. (निंदार्थी) बायकांची दळणकांडणाची कामे करणारा (पुरुष). ३. रडका (हरिदास); दळभद्रा.

**दळवटणे** उक्रि. १. पायाने तुडवणे, दाबणे (जमीन, शेत, रस्ता). २. वाईट प्रकाराने वागवणे; (जनावर, वस्तू) दामटणे; कामाने, वापरण्याने (जनावर, वस्तू) वठणीवर आणणे; नरम करणे; माणसाळवणे. ३. वहिवाटणे; सवय लावणे; आपलेसे करणे. ४. खाली रेटणे; रगडणे : 'तो येरा दोहींतें दळवटी' – विसिं ६.७५. [सं.दल्+वट]

**दळवटा–ट** पु. १. तुडविलेली स्थिती; वर्दळ; तुडवणी; राबता. २. पहा: **दळणवळण.** ३. तुडवणीची खूण; माग.

**दळ(ल)व(वा)यी–ई, दळवै–वी** पु. १. सेनापती : 'असोहे आठइ। भाव राउळीचे दळवइ ।' – ऋ ६६. २. एक आडनाव. ३. हैदरच्या पूर्वी म्हैसूरच्या मुख्य प्रधानाची पदवी. [सं.दलपती,दलवाही]

**दळवाड–डा–डे** पु. १. समुदाय; सैन्य; गर्दी; जमावः 'ढांडोळितां उपमेचें दळवाडें ।' – ऋ ३८. २. खांब : 'अरुवार घडले दळवाडें कापुरकेळीचें' – शिव ७६२.
वि.१. संपूर्ण. २. उंच; धिप्पाड : 'वारेयापासौनि वेगाडे : पर्वतापासौनि दळवाडे' – शिव ९३३. [सं. दलावर्त]

**दळवाडे, दळवेपण** न. १. शौर्य : 'आंगीं थोडेंची दळवाडें । पण रागीटु कवणी पाडें ।'– उषा १६५९. २. सेनापतित्व. [सं.दल]

**दळवैनी** स्त्री. नायिकेची मुख्य सखी : 'दळवैनी दीधली सूचना : तें नरेंद्रु सांघैल रचना'– नरुस्व १४. [सं.दल]

**दळा** पु. १. डोंगराच्या कडेचा साफ केलेला व पेरणीसाठी भाजून तयार केलेला जमिनीचा तुकडा (नाचणी, धान्य, भाजीपाला इ. साठी). ही जमीन नांगरता येत नाही. कुदळीने खणावी लागते. २.शेतामध्ये उंदरांनी पाडलेले बीळ; त्यांनी पीक खाल्ल्यामुळे झालेली रिकामी जागा. ३. (ल.) पिकामधील रिकामी राहिलेली जागा. ४. भाजीपाल्यासाठी बागेत वरवंडी घालून तयार केलेला तुकडा. (को.) ५. जमिनीचा तुकडा : 'सदरहू पांचा बिघ्याचा दळा दुमाला करणें.' – मइसा १५.२२८. [सं.दल]

**दळिद्र–द्री** पहा: **दरिद्र–द्री**

**दळिया** पु. दळ्याचा लाडू. हा गव्हाचा रवा भाजून त्यात तूप, साखर इ. घालून करतात.

**दळी** पहा : **दळा** १, २

**दळी** स्त्री. पीठ : 'दळीचीं दिवसीं केलीं'– लीचउ २५१. [सं.दल]

**दळे–ळ्हे** न. १. पहा: **दळा** १, २. २. (विणकाम) दळखुंट व बैली यांना जोडणारी दोरी.

**दळे** न. १. कवच; साल; टरफल; आवरण. २. तरवारीचे पाते; म्यान; कमरबंद; तरवार ठेवण्याचा कमरपट्टा : 'मग देहाहंतेचें दळें। सांडूनि एकेचि वेळे ।'– ज्ञा १५.२५८. [सं.दल] (वा.) ० **बांधणे** – शस्त्र उपसणे; वैर करणे : 'तें यक्षकर्दमें बांधलें दळें : विरहिणीसी'– नरुस्व ५८९.

**दक्ष** वि. १. हुशार; योग्य; कुशल; चतुर; सावध; तत्पर; समर्थ; निष्णात. २. उजवा–वी–वे : 'प्रतिविंध्य दक्षभुज ती (गदा) भेदुनि भूकुक्षि भेदिती झाली ।' – मोकर्ण ५९.२८. ३. निकोप (प्रकृती) : 'गोसावीया एउतें एतां दक्ष जालें' – लीचउ ९२. [वै.सं.दक्ष]

**दक्ष(क्षि)णी** वि. दक्षिणेतला; दाक्षिणात्य; विशेषतः महाराष्ट्रीय.

**दक्षतारोध** पु. बढती देण्यासाठी पार पाडावयाचे निकष.

**दक्षतावेतन** न. दक्ष कर्मचाऱ्यांना मिळणारे अधिक वेतन.

**दक्षिण** स्त्री. १. दक्षिण दिशा. २. दक्षिणेकडील वारा. (क्रि. वाहणे.)
वि. १. उजवा. २. दक्षिणेकडील. ३. (ल.) हुशार, कुशल; उदार; अनुकूल. [सं.](वा.) ० **बाधणे** – झाडे दक्षिणायनाच्या उन्हाने करपणे. **दक्षिणचा दिवा** – (दक्षिणेकडे वात करून लावलेला दिवा दुर्दैव ओढवतो, यावरून) कुळाची बेअब्रू करणारा मनुष्य.

**दक्षिणगोल** पु. (ज्यो.) तुळेपासून मीनेपर्यंतच्या सहा राशी; राशीषट्क.

**दक्षिणणे** अक्रि. दक्षिणायनाच्या उन्हाने, दक्षिणेकडच्या बाजूने जळणे– करपणे (झाडे, फळे इ.).

**दक्षिणदरवाजा, दक्षिणद्वार** पु.न. १. (यमलोक दक्षिणदिशेला आहे, अशा समजुतीवरून) (ल.) तुरुंग; कारागृह. २. दक्षिणेकडील दार. ३. (ल.) यमलोक.

**दक्षिणपालवी** स्त्री. दक्षिणेच्या वाऱ्यासाठी व उन्हासाठी मोकळी ठेवलेली, न पेरता राखलेली जमीन. ही हलकी समजली जाते.

**दक्षिणमार्ग** पु. (संगीत) एकताल. आठ मात्रा प्रमाण. [सं.]

**दक्षिणवारा** पु. दक्षिणदिशेकडून वाहणारा वारा. हा चार–सहा दिवस वाहत राहिला तर तुफान होते. (कु.)

**दक्षिण संगीतपद्धती** मद्रास व म्हैसूर या ठिकाणी प्रचलित असलेली संगीताची पद्धती.

**दक्षिणा** स्त्री. १. ब्राह्मणादिकांना धर्मकृत्याच्या वेळी देण्याचे द्रव्य, दान इ. (सोमयागात दक्षिणा म्हणून गाई दान देत असत व त्या देताना दक्षिणेकडून नेत, त्यावरून रूढ). २. दक्षिण दिशा. ३. व्रताची पूर्णता, सांगता. ४. (ल.) लाच; नजराणा. [सं.]

**दक्षिणाचार** पु. शाक्तांच्या दोन पंथांपैकी एक. यांचा आचारविधी शुद्ध व वेदोक्त मानला जातो. [सं.]

**दक्षिणापथ** न. विंध्य पर्वतापासून दक्षिणेकडील भूभाग; दख्खन. [सं.]

**दक्षिणायन** न. १. कर्कसंक्रांतीपासून मकरसंक्रांतीपर्यंतचा काळ. २.सूर्याचे विषुववरेषेपासून दक्षिणेकडे जाणे, सूर्याचे दक्षिणेकडे जाऊन चरममर्यादेवर, मकररेषेवर पोचणे. त्यावेळी सूर्याचा प्रकाश मागे हटून उत्तरध्रुवापासून २३ ।। अंश दूर राहतो. [सं.]

**दक्षिणायनमार्ग** पु. १. दक्षिणायनाचा मार्ग; सूर्याचा कर्कवृत्तापासून मार्ग. २. पितृलोकाचा मार्ग. [सं.]

**दक्षिणावर्त-र्ती** वि. उजव्या बाजूला वळणारा, प्रदक्षिणेप्रमाणे वळणे असणारा (शंखावरील नागमोडी रेषा, स्क्रूचे पेच, जिन्याच्या पायऱ्या, शरीरावरील भोवरा इ.). [सं.]

**दक्षिणीमहाल** पु. महाराज सातारकर यांचे राण्यांस वस्त्रे अलंकार अथवा गांव जमिनी मोकास अथवा रोख पैसा पावत होता. तो या सदरांत खर्च पडत असे. -भारतवर्ष मराठ्यांचे दप्तर १६.

**दंग** पु. १. कागद तयार करताना जुनी तरट, सण, जुने कागद इ. कुटण्याचे एक हत्यार. २. डंग; ढेकी (चुना, पोहे इ. कुटण्याची). [ध्व.]

**दंग** वि. १. आश्चर्यचकित; दिङ्मूढ; विस्मित; सर्द. २. गर्क; निमग्न; चूर; गुंग. ३. (निंदाव्यंजक) संतुष्ट; खूष; समाधानी.

**दंगदंगा** वि. नागवा; नग्न.(झाडी)

**दंगल** पु. १. अव्यवस्थित मंडळी, जमाव (गाणारे, नाचणारे इ. कांचा); गर्दी; कल्लोळ. २.कुस्त्यांचा फड. ३. धुमाकूळ; धांगडधिंगा; धामधूम; दंगा; आरडाओरड. [फा.]

**दंगा** पु. १. गडबड; गोंधळ; धावाधाव; पळापळ (बंडाची, स्वारीची इ.). २. (एखाद्या साथीने केलेला) नाश; कहर. ३. (मुलांची) आरडाओरड; उपद्रव; तंटा; झगडा; भांडण. ४. ओरड; (असंतुष्ट कामगारांची) गलबल. ५. अनर्थ; राग; जळफळ; आदळआपट. [हिं.]

**दंगाधोपा** पहा: **दंगा** १,४

**दंग्या** पु. १.मृदंग्या. २.सूर (आट्यापाट्यांच्या खेळातील).

**दंड** पु. १. काठी; सोटा; छडी; सोडगा. २. लिंग. ३. मार; (शारीरिक) शिक्षा. ४. शिक्षा म्हणून घेतलेला पैसा. सरकारी न्यायपद्धतीने गुन्हा शाबीत झाला म्हणजे हा आकारला जातो.५. खांद्यापासून कोपरापर्यंतचा हात. ६. केलेल्या, पाडलेल्या भागांच्या खुणांसाठी शेतात किंवा बागेत घातलेला मातीचा उंचवटा; बांध; गडगा; पाणी जाण्यासाठी दोन्ही बाजूंना उंचवटा करून पाडलेली सरी; पाट; नदीकिनारा; काठ. (बे.) ७. लांबी मोजण्याचे परिमाण; चार हातांची काठी.२००० दंड =१ कोस. ८. वेळेचे परिमाण; चोवीस मिनिटे. ९. पैलवानांच्या व्यायामाचा प्रकार; जोर (यावरून) एखादे कठीण काम अथवा प्रचंड उद्योग. (क्रि. काढणे, पेलणे). १०. क्रमाने उतार असलेली किंवा निमुळती पण लांबट टेकडी, सोंड (पर्वताची). ११. डोंगराच्या माथ्यापासून पायथ्यापर्यंत असलेला उतार, ओघळ, अरुंद वाट; दंडवाट. १२. पर्वतरांगेची एक लहान शाखा; डोंगराच्या माथ्यापासून पायथ्यापर्यंत वाकडीतिकडी गेलेली खडकांची ओळ. १३. (कवायत वगैरे प्रसंगी केलेला) सैन्यरचनेचा एक प्रकार; रांग; फरा; व्यूह. १४. ताठ उभे राहणे. १५. जिंकणे; ताब्यात, कह्यात आणणे. १६. अपराधाबद्दल शिक्षा म्हणून घेतलेली रक्कम; जातीत परत घेण्यासाठी दिलेले प्रायश्चित्त. १७. रताळी, ऊस इ. लावण्यासाठी मातीचा केलेला लांबट उंचवटा, वरंबा. १८. तडाका: 'निंदा निस्तेज दंडी कामलोभावर पडी ।'- ज्ञा १३.४९४. १९. हिंसा: 'ऐसा मनें देहें वाचा । सर्व संन्यासु दंडाचा ।' - ज्ञा १३.३१०. २०. पाठीचा कणा : 'माजी उभारलेनि दंडे । शिरकमल होय गाढें ।'-ज्ञा ६.२०२. २१. (वस्त्राचे) दोन भाग, तुकडे जोडण्यासाठी घातलेली शिवण. (क्रि.घालणे). [प्रा.दंडी = जुन्या वस्त्राचा सांधा]. [सं.] (वा.) **० आवळणे, बांधणे, दंडाला काढण्या लावणे** - कैद करणे. **० थोपटणे** - १. कुस्ती खेळण्यापूर्वी दंड ठोकणे; कुस्तीला सिद्ध होणे. २. (ल.) साहसाने अथवा कोणालाही न जुमानता एखादे कार्य करायला उभे राहणे. **० थोपटून उभे राहणे** - (ल.) वादाला, विरोधाला तयार होणे. **० दरदरून फुगणे, ० फुरफुरणे** - आपल्याशी कुस्तीला योग्य असा गडी पाहिला म्हणजे पहिलवानाचे दंड स्फुरण पावणे, फुगणे. **दंडाला माती लावणे** - कुस्तीला तयार होणे (कुस्तीपूर्वी दंडाला माती लावतात).

**दंड** वि. हट्टी; उद्धट; हेकट; झोंड; जबरदस्त.

**दंडअढी** स्त्री. (मल्लखांब) मल्लखांबाला दंड लावून मारावयाची उडी. - व्यायासा ३७९.

**दंडक** पु. १. चाल; प्रघात; पद्धती; संप्रदाय; परिपाठ; वहिवाट. २. एक समवृत्त; अक्षरे २७; गण न, न, ररररररर; यति शेवटी. ३. दळणवळण. ४. वागणूक. ५. (भयाण, ओसाड असा) लांब रस्ता; लांबट जागा. ६. बाहू; हात. ७. (कुस्ती) तरफ. - के ६.१२.१९३८. [सं. दंड]

**दंडकाक** पु. डोमकावळा.

**दंडकारण्य** न. नर्मदा आणि गोदावरी या नद्यांमधील अरण्यमय प्रदेश. दंडक राजाच्या नावावरून हे नाव पडले. [सं.]

**दंडकी** स्त्री. बंडी.

**दंडगे** न. सोडगा; जाड काठी; दंडा. [सं.दंड]

**दंडगोल** न. १. पंचपात्र. २. (गणित) उभट व गोल ठोकळा, नळकांडे.

**दंडग्रहण** न. संन्यास. [सं.]

**दंडणे** सक्रि. १ (मुख्यत: मार देण्याच्या रूपाने) शिक्षा करणे; पैशाच्या रूपाने दंड करणे; खंडणी बसविणे. ३. मारणे; निग्रह, दमन करणे (वासना, मन इ.चे प्रायश्चित्त, तप इ.नी). ४. (क.) योग्य होणे; शोभणे; साजणे. [सं.दंडन]

**दंडणे** अक्रि. शोभणे : 'लाल कुसुंबी पागोटी । बांधणी शिंदशाही । दंडे बाणा मोगलाई । सखा मनाचा देसाई ।'- वलो १०९. (व.)

**दंडथडक** स्त्री. खांद्याच्या बाहेरच्या भागाने केलेला आघात.

**दंडदास** पु. दंडाबद्दल गुलाम होऊन राहिलेला मनुष्य. [सं.]

**दंडधारी** पु. यम: 'नृपेक्षी कदा कोपल्या दंडधारी ।' - राम २७. वि. १. हातात काठी असलेला. २. (ल.) संन्यासी. [सं.]

**दंडन-ना** न. स्त्री. १. (शारीरिक) शिक्षा. २. खंडणी; दंड घेणे. ३. (ल.) मारणे; दमन, निग्रह करणे (वासना इ.चा). [सं.]

**दंडनायक** पु. कोतवाल; पोलिसांचा अधिकारी.

**दंडनीती-शास्त्र** स्त्री. १. नीतिशास्त्र; नीती; संसारातील वर्तणुकीचे व व्यवहाराचे कायदे, नियम. २. (कायदा) अपराध्यांना करण्याच्या शिक्षेसंबंधीचे शास्त्र. ३. राज्य चालवण्याविषयीचे शास्त्र. [सं.]

**दंडनीय** वि. १. शिक्षेला पात्र. २. (द्रव्यरूप) दंड करण्यास अथवा खंडणी घेण्यास योग्य. ३. निग्रह, संयमन करण्यायोग्य. [सं.]

**दंडपत्र** न. दंड ठोठावण्याचे आदेशपत्र. [सं.]

**दंडपक्ष(करण)** न. (नृत्य.) पाय ऊर्ध्वजानु करणे व त्यावर उजवा हात लताख्य करीत राहणे. [सं.]

**दंडपाद – (आकाशी, चारी)** वि. (नृत्य.) नूपुरपाय पुढे पसरून क्षिप्त करणे म्हणजे कुंचित पाय उचलून दुसऱ्या पायाच्या बाहेरील बाजूला पोटऱ्यांचे स्वस्तिक होईल अशा प्रकारे टाचेच्या भारावर टेकणे व मग ते स्वस्तिकातील पाऊल उचलून पसरणे व खाली टाकताना अंचित करून दुसऱ्या पायात अडकवणे. [सं.]

**दंडपारुष्य** न. १. कडक, कठोर शिक्षा. २. काठीने हल्ला करणे; छड्या मारणे; ठोसे देणे; (हात, पाय, शस्त्र इ. नी) मारणे. ३. (कायदा) हल्ला; भीती वाटेल अशा रीतीने हात, काठी उगारणे, मारणे. [सं.]

**दंडपूपिकान्याय** पु. (उंदराने काठी नेली त्याअर्थी तिला बांधलेली पोळी खाल्ली हे उघडच होय, त्यावरून) कार्यकारण, अंग-उपांग, प्रधान-अप्रधान यांचा न्याय; ओघाओघानेच प्राप्त झालेली गोष्ट. [सं.]

**दंडपेटी** स्त्री. दंडात घालण्याचा एक रत्नजडित अलंकार.

**दंडप्रणाम** पु. पहा : **दंडवत** १ : 'दंड प्रमाण करोनिया।'– गुच ९.९.

**दंडफुगडी** स्त्री. (मुलींचा खेळ) परस्परांच्या दंडांना किंवा खांद्यांना धरून उभ्याने फुगडी खेळण्याचा एक प्रकार.

**दंडफु(पु)र(रो)ई** स्त्री. १. दंडासाठी केलेली जप्ती; दंड. २. (अधिकाऱ्याने) बेकायदेशीर बसविलेला दंड; बेकायदेशीर दंड बसविणे. (क्रि. घेणे, देणे, भरणे.).

**दंडमार** पु. परस्परांसमोर उभे राहून परस्परांच्या दंडावर दंड आपटणे. – व्याज्ञा ४.१८१.

**दंडयोजना** स्त्री. शिक्षा लावण्यासाठी असहकार, प्रतिकार.

**दंडवत** न. १. (पूजा करताना, नमस्कार घालताना) शरीर जमिनीवर दंडासारखे पसरणे; साष्टांग नमस्कार. २. शूद्रांनी पत्रात नमस्कार या अर्थी लिहिण्याची विशेष संज्ञा.

**दंडवत होणे** क्रि. एक नवस; नवस केलेल्या देवाला साष्टांग नमस्कार घालत जाणे. [सं. दंड+वत्]

**दंडवळी** स्त्री. कोपरवळी; (दंडावरची) वाक; स्त्रियांचा एक अलंकार. (व.)

**दंडवाक्य,दंडादेश** न. पु. गुन्ह्यासाठी सुनावलेली शिक्षा.

**दंडवाट** स्त्री. १. (उजाड, भयाण असा) लांबच लांब रस्ता; जवळपास गाव, वस्ती नाही असा रस्ता. २. टेकड्यांच्या कडेने गेलेली अरुंद पायवाट. ३. एकमेकांना मिळणारे रस्ते.

**दंडविकल्प** पु. शिक्षेत बदल; शिक्षा कमी द्यावी की अधिक याविषयी विचारणा. [सं.]

**दंडसरी** स्त्री. (बागेमध्ये) पाणी जाण्यासाठी खणलेला लहानसा पाट, चर; खाचण; तसऱ्यांच्या बाजूचा पाट.

**दंडसंयुक्तहस्त** पु. (नृत्य.) हात हंसपक्ष करून बाहू पसरून एका हाताने दुसऱ्या हाताला एकदा कनिष्ठिकेपासून आरंभ करून आतील बाजूने बाहेरच्या बाजूला विळखा घालणे, नंतर कनिष्ठिकेपासूनच पण बाहेरील बाजूने प्रारंभ करून आतील बाजूला विळखा घालणे. [सं.]

**दंडसंहिता** स्त्री. शिक्षेच्या नियमांचे पुस्तक. (इं.) पिनल कोड. [सं.]

**दंडस्नान** न. घाईघाईने केलेले अर्धवट स्नान; नद्यादिकांच्या ठिकाणी अंग न चोळता केवळ दंड भिजतील अशा प्रकारचे केलेले स्नान; काकस्नान; पाण्यात एक बुचकळी मारून केलेले स्नान. [सं.]

**दंडळणे** सक्रि. १. डळमळणे; चळणे; गडबडणे : 'नाना चमत्कारीं बुद्धि। दंडळू लागे।' – दास ५.२.३३. २. भयाने कापणे; घाबरे होणे.

**दंडा** पु. १. फुलांचा हार : 'श्रीकंठीं गळदंडा' –लीचपू ११५. २. दंडक; मापनाचे प्रमाण : 'तो कामिनींचा दंडा : ठाणमाणी जाघाडा'– ऋम ७०९. [सं.दंडक]

**दंडा** पु. डोंगराचा, पुढे आलेला निमुळता भाग, सोंड. (को.)

**दंडा** पु. लाठी; काठी. [सं.]

**दंडाईत** पु. छडीदार; भालदार.

वि. दांडगा; झोंड; आडदांड; धट्ट्याकट्ट्या बांध्याचा.

**दंडादंडी–बाजी** स्त्री. मारामारी; काठ्यांची झोडपाझोडपी; कुस्ती; झोंबी.

**दंडाबेडी** स्त्री. ज्या बेडीला साखळीऐवजी दांडा लावलेला असतो ती बेडी, तुरुंगात शिक्षा म्हणून ही घालतात.

**दंडायमान** वि. १. (अखंड काठीप्रमाणे) अमर्याद; अपार (वेळ, काळ). २.मध्ये आडवा पडलेला, पसरलेला. [सं.]

**दंडा(ढा)र** न. स्त्री. ललित. खेडेगावात मुलांकडून केले जाणारे करमणुकीचे कार्यक्रम. याचे दडंगी व भागवती असे दोन जुने प्रकार. नाटकी दंडार हा अलीकडे निघालेला तिसरा प्रकार.

**दंडारणा** पु. सोटा; सोडगा; बडगा.

वि. जाड; स्थूल; घन (वस्तू); बळकट; मजबूत; जाड (मनुष्य, पशू).

**दंडारा–ळा** वि. (शिवणकाम) ज्याला दंड घातला आहे असे, मध्ये शिवण असणारे (वस्त्र, कपडा).

**दंडावणे** अक्रि. थंडीने किंवा अवघड श्रमाने (शरीर, अवयव) ताठणे.

**दंडासन** न. आळसाने (जमिनीवर) पाय ताणून पसरणे, निजणे; सरळ हात-पाय पसरून आळसाने पडणे. (क्रि.घालणे). [सं.]

**दंडांची भंची पुटकी** वज्रमुष्टीचा व्यायाम. प्रथम दंड काढून पुढें डोकें टेकून गोलांटी मारून पुढें हात टेकून जमिनीवर बसणे. – व्याज्ञा ४.१०३.

**दंडित** वि. १. शिक्षा, दंड केलेला. २. (ल.) निग्रह, वश केलेला; मारलेला; ताब्यात आणलेला. [सं.]

**दंडिता** वि. शिक्षा करणारा; मारणारा. [सं.]

**दंडिया** पु. १. बारा ते पंधरा हात लांबीचे धोतर, लुगडे. २. बाजाराचा बंदोबस्त करणारा छोटा अधिकारी; पोलीस मुकादम. ३. आखूड, अपुरे, तोकडे लुगडे. (ना.) [हिं.]

**दंडी** पु. स्त्री. १. दंड धारण करणारा; संन्यासी. २. द्वारपाल. ३. राजेरजवाडे. ४. अर्ध्या दंडापर्यंत बाह्या असणारी चोळी.

वि. १. दंडधारी. २. दंडारा. ३. हातात दंड घेऊन केलेली (भिक्षा) : 'तुं दंडी भीक्षा करिसी, ते काइ उदास?'–लीचउ १३१. [सं.दंडक]

**दंडी** स्त्री. मेण्यासारखे, चार माणसांनी उचलण्याचे टोपलीचे वाहन. डोंगर चढताना हिच्यात माणूस बसतो व हमाल ही खांद्यावर वाहतात. [हिं.]

**दंडी** न. फेटा; पटका : 'राजेया दंडीचें श्रीचक्रधरा'– लीचउ ४२६.

**दंडी** स्त्री. १. दिंडी; एक वृत्ताची जात. २. एक तंतुवाद्य; हे एका भोपळ्याला कळकाची पोकळ दांडी बसवून केलेले असते.

**दंडी** स्त्री. मनात सतत उचंबळत असणारी वासना : 'विषयवासने भेद किती ? दंडी : दर्शी : स्पर्शी: कुचमर्दनी' – लीअ १३८. [सं.दंड]

**दंडी** स्त्री. सैन्यरचना: 'तेया दंडीं क्षोभलें । लोकत्रय ।' – ज्ञा १.१६५.

**दंडी** स्त्री.दृढता; ताठरपणा: 'दंडी होती ती गेली' – लीचउ १९८. [सं.दंड]

**दंडीइंद** न. एक (मासे पकडण्याचे) जाळे. ही जाळी तयार झाली म्हणजे पाण्यात वापरायला घेण्यापूर्वी सिमेंटच्या पाण्यात उकळून शिंपीच्या चुन्याने माखतात व मग आईन या झाडाच्या सालीने रंगवतात.

**दंडीगाण** पु. (दंडीवर) गाणाऱ्या भिक्षेकऱ्यांची एक जात, व्यक्ती. दिंडीगाण.

**दंडुका** पु. स्त्री. हाताचा पुढचा भाग. – मोको.

**दंडु(डो)का, दंडुकणे, दं(दां)डूक** पु.न. सोटा; बडगा; दांडगे; काठी; लाकडाचा लहानसा जाड तुकडा; शिपायाच्या हातातील सोटा. [सं.दंड]

**दंडुकेशाही** स्त्री. मारहाण किंवा जुलूम करून अंमल गाजवण्याची पद्धती; पाशवी बल; दांडगाई.

**दंडुक्या** वि. काठीने मार देण्यास सवकलेला; दांडगा; आडदांड.

**दंडेल–ली** वि. १. दांडगा; अरेराव; आडदांड; झोंड. २. (मुख्यत्वे) कर्ज फेडण्याचे नाकारणारा.

**दंडेली** स्त्री. अरेरावीची वर्तणूक; दंडेलपणा; अन्याय; जबरदस्ती; सामर्थ्याचा दुरुपयोग (मुख्यत्वे देणे न देण्यासंबंधी).

**दंडोक** पु. लग्नसमारंभातील ठरावीक कृत्ये. (चंद्रपुरी) [सं.दंडक]

**दंड्य** वि. दंडनीय.

**दंणाक** पु. मुख्य शासनाधिकारी : 'श्रीपति दंणाकें द ग' – शिलालेख १.२. [सं.दंडनायक]

**दंत** पु. १. दात; तोंडातील चावण्याचा अवयव. २. हस्तिदंत; सुळा. ३. पर्वतशिखर; सुळका; पुढे गेलेली बाजू. [सं.]

**दंतकथा** स्त्री. लोककथा; काल्पनिक, तोंडातोंडी चालत आलेली किंवा शास्त्रप्रमाणविरहित गोष्ट.

**दंतकाष्ठ** न. दात घासण्याची लिंब इ. झाडाची लहान फांदी, काडी.

**दंतधावन** न. दात घासणे.

**दंतपरिवेष्टनशास्त्र** न.दातांना आधार देणाऱ्या स्नायुबंधनाची माहिती देणारे शास्त्र.

**दंतपरीक्षा** स्त्री. दाताच्या रोगांची परीक्षा.

**दंतपंक्ती–पटी–पाटी** स्त्री. दातांची रांग; कवळी : 'दंतपाटी उखळली ।' – दास ३.५.३९.

**दंतमंजन** न. दंतचूर्ण; दात घासण्याची पूड.

**दंतरोग** पु. दाताचा रोग.

**दंतवैद्य** पु. दंतपरीक्षक; कृत्रिम दात बसविणारा वैद्य.

**दंतव्रण** पु. १. हिरडीला होणारा रोग. २. पहा : **दंतक्षत**

**दंतशल्यशास्त्र** न. दात काढून टाकण्याची विद्या.

**दंतस्थान** न. (व्याकरण) लृ, त-वर्ग, ल, स या वर्णांचे उच्चार मुखातील ज्या स्थानापासून (दातापासून) निघतात ते स्थान.

**दंतहर्ष** पु. १. दातांचा नाजूकपणा (आंबट पदार्थ खाण्यामुळे येणारा); दात आंबणे. २. (चावण्यासाठी) दात शिवशिवणे.

**दंतक्षत** न. १. चावा. २. स्त्रीपुरुषांनी परस्परांना (चुंबनादिप्रसंगी)दातांनी केलेले व्रण.

**दंतावळ** पु. हत्ती.

**दंताळ–ळा** वि. ओठाच्या बाहेर किंवा पुढे दात असलेला, आलेला.

**दंताळवाडी** स्त्री.दंतपंक्ती : 'दंताळवाडी ओस पडली .' – एकनाथी भारुड.

**दंताळे** न. १. (कृषि.) बी पेरल्यानंतर त्यावर माती लोटण्यासाठी लांब दात असलेले लाकडी आऊत. २. कुळव. [सं. दंतालय]

**दंतांतर** न. (ल.) थोडेसे अंतर, भेद.

**दंती** पु. १. हत्ती.

स्त्री. १. जयपाळ. एक ते दीड मीटर उंचीची एक वनस्पती.उंची बहुवर्षायू; भरपूर फांद्या असणारे, झुडपासारखे दिसणारे झाड. पाने साधी, लंबगोल, तळहाताइतकी. क्वचित विभागलेली. फुले हिरवट रंगांची. फळ एरंडाच्या फळासारखे. २. केस विंचरण्याची फणी. ३. चाक.

वि. दात अथवा दाते असलेली (फणी, चाक).

**दंतुर** वि. १. दंताळा २. दाते किंवा खंड असलेला (किनारा वगैरे).

**दंत्य** वि. १. दातासंबंधी. २. दंतमूलाजवळ जिभेचे टोक लावून होणारा (वर्णोच्चार).

**दंद** न. भांडण; बेबनाव; वैमनस्य; द्वैतभाव; बाहुयुद्ध. (क्रि. धरणे, लावणे, मांडणे.). [सं.द्वंद्व]

**दंदावा** पु. द्वेष; आकस; चुरस (क्रि. धरणे, चालविणे, लावणे, मांडणे, पडणे, लागणे.). [सं. द्वंद्व + म. दावा]

**दंदास** पु. त्रास; शीण; कष्ट. (क्रि. येणे, आणणे.). [सं.द्वंद + त्रास]

**दंदिया** पु. योद्धा; द्वंद्व खेळणारा; शस्त्रोपजीवी, जवळ दांडके बाळगणारा पुरुष : 'कां दंदिया हतियेरा । न विसंबे भांडारा ।' – ज्ञा १३.५०१.

**दंदी** वि. द्वेषी; आकसखोर; वैरी; चुरस वाढविणारा; कट्टर; शत्रुत्व बाळगणारा; वादी; भांडखोर : 'ज्यासी वंदावें त्यासी निंदी । मैत्री सांडोनि होतसे दंदी ।' – तुगा ४४२२. [सं.द्वंद्व]

**दंदेह दरफडे** स्वत:च स्वत:ची स्तुती करणे; शेखी; बढाई. (क्रि. गाणे).

**दंपति–ती–त्य** पु. नित्य द्विव. १. नवरा – बायको; लग्नाचे जोडपे. २. मेहूण. [सं.]

**दंभ** पु. १. ढोंग; स्तोम; देखावा; सोंग. २.पोकळ, तोंडाचे ब्रह्मज्ञान. [सं.]

**दंश** पु. १. नांगी मारणे; डसणे. २. चावा; ढास. ३. (ल.) मुद्दा; खोच; वर्म; मर्म (भाषणाचे, कामाचे). ४. (ल.) आकस; चुरस; अदावत; हाडवैर. ५. (ल.) ग्रंथातील कठीण, गूढ भाग. ६. डास : 'कौरवभट दंश मशक विजयधनुर्वल्लि काय ती चवरी ।' – मोभीष्म ११.५३. [सं.]

**दा** पु. मार. (बालभाषा) (गो.)

**दा, दां** अ. एखाद्या संख्यावाचक शब्दाला, तसेच बहु, अनेक, किती, जितका इ. शब्दांना पुढे जोडण्याचा तितके वेळा या अर्थाचा, आवृत्तिवाचक प्रत्यय. उदा. एकदा, पहिल्यांदा इ.

**दा** दादा या अर्थी विशेषनामाला लावण्याचा प्रत्यय. दादा याचा संक्षेप. उदा. केशवदा = केशवदादा.

**दाई, दाइण** स्त्री. १. लहान मुलाला पाजण्यासाठी ठेवलेली स्त्री. २. प्रसूतीच्या वेळी बाळंतिणीची सुटका करणारी कुशल स्त्री; सुईण. ३. पडदा, जातिनिर्बंध इ. कारणांमुळे कोर्टकचेरीत हजर राहू न शकणाऱ्या स्त्रीला शपथ देणारी व तिची जबानी घेणारी प्रारंभीच्या ब्रिटिश अमदानीतील सरकारनियुक्त स्त्री. ४.आई. (गोंडी) – विवि ८.१.३. [सं.धात्री]

**दाईज** वि. १. एका कुळात जन्मल्यामुळे वडिलोपार्जित मिळकतीचे बनलेले भागीदार; हिस्सेदार; दायाद; भाऊबंद : 'अवलाद अफलाद दाइज अगदीं नाहीं.' – वाडबाबा २.३६. २. सगोत्र नात्यामुळे सुतक – सोयेर बाळगणारा. ३. (ल.) हितशत्रू; मत्सर, द्वेष करणारा. [सं.दायाद]

**दाईजगोत्रज** पु. अव. एका गोत्रातील; नातलग; भाईबंद. [सं. दायाद + गोत्रज]

**दाईजजण, दाईजण** पु. अव. १. (समुच्चयार्थी) पहा : **दाईज** १ २.(समुच्चयार्थी) (सरकारी कागदपत्रांत) वंशपरंपरागत अधिकार असलेले (सरकारी) गावकामगार.

**दाईते** न. खंडणी : 'दाईते घेत होते.' – शिचप्र ३९. [सं.दाय]

**दाई(य)म** वि. कायमचा; नेहमीचा; सतत असणारा : 'तूं दाईम हालाल्खोर आहेसी.' – मइसा १५.३१. [अर.दाइम्]

**दाईमा** स्त्री. १. आईच्या ठिकाणी मानलेली स्त्री; दाई. २. (तिरस्काराने) नेभळट, दुर्बळ स्त्री, पुरुष.

**दाई(य)मी** स्त्री. १. शाश्वती; चिरस्थायीपणा; कायमपणा; टिकाऊपणा. २. कायमची देणगी. ३. कायमधारा. ४. जन्मठेपेची शिक्षा झालेला गुन्हेगार, आरोपी.
वि. पहा: **दाई(य)म**

**दाकवचा–ता, दाकोचा–ता, दाखवता** पु. ब्राह्मण व गवळीण यांच्या संबंधापासून झालेली संतती; डाकूता; डाकोचा.

**दाखल** वि. १. येऊन पोहोचलेला; आलेला; प्रविष्ट झालेला; शिरलेला. २. (जमाखर्च, रोजनिशी इ.त ) नमूद; नोंदलेले; प्रविष्ट, केलेले. ३.माहीत असलेला; श्रुत; ज्ञात; अवगत (विषय, गोष्ट, हकिगत). ४. समान; सारखा; प्रमाण: 'चेऊल शहर दंग्यानें मोडून उद्ध्वस्त होऊन जंगलादाखल जाहलें होतें.' – मइसा ३.५१७.
शअ. प्रमाण; सारखे : 'शिंदेही कैदेदाखल आहेत.' – ऐलेसं १०.५५१७. [अर.दाखिल]

**दाखला** पु. १. (एखाद्या गोष्टीच्या स्पष्टीकरणासाठी घेतलेले त्या गोष्टीसारखेच) उदाहरण; दृष्टान्त; उपमा; नमुना. २. (एखाद्याचा) प्रत्यक्ष अनुभव; पडताळा; प्रतीती: 'जी सहस्रशीर्षयाचें दाखले । कोडीवरील होताती एकिवेळे ।' – ज्ञा ११.२६९. ३. पायंडा; उदाहरण; वहिवाट : 'आम्ही चाकरी करू तेव्हां दाखला पडत जाईल.' – ऐस्फुले ६२. ४. (एखाद्या विधानाला पुष्टी देणारा )पुरावा; आधारभूत गोष्ट, प्रमाण. (पुराव्यादाखल हजर करता येईल असे) प्रमाणपत्र, पावती; नोंद. ५. (एखाद्याच्या) लायकीबद्दल पत्र; भलामणपत्रक; शिफारसपत्र. ६. हक्क; अधिकार. ७. बोध. [अर.दाखिला]

**दाखलेचिठी–पत्र** स्त्री. न. १. पहा: **दाखला** ६. २. (विशेषार्थाने) महार, रामोशी वगैरेंना दिलेले शिफारसपत्र.

**दाखलेवाईक** वि. १. उदाहरणे, दृष्टान्त देऊन स्पष्ट, विशद केलेले. २. ज्याच्या खरेपणाविषयी काहीतरी प्रत्यय आला आहे असा.

**दाखलेशीर** वि. विश्वसनीय; सप्रमाण; व्यवस्थित: 'आमचे दौलतींत हालीमाजी होत गेल्यामुळे कागदपत्र दाखलेशीर राहिला नाहीं.' – मइसा १.३१२.

**दाखवणी** स्त्री. जांगडवही. पसंतीसाठी दिलेला माल नोंदविण्याची वही.

**दाखवणूक** स्त्री. १. (केलेला, दाखविलेला, बोललेला) थोडासा नमुना; मासला; नमुन्यादाखल केलेली (भाषण, दाखविणे, करणे इ.ची) थोडीशी कृती. (क्रि. दाखविणे). २. (काही वस्तू, स्थळ इ.) दाखवण्यासाठी घेतलेली, दिलेली मजुरी. ३. (एखाद्याला फसविण्यासाठी केलेला) खोटा आविर्भाव; देखावा; हूल; हुलकावणी; ढोंगीपणाचे कृत्य.

**दाखव(वि)णे** सक्रि. १.(अक्षरशः व लक्षणेने) (एखादी वस्तू इ. दुसऱ्याला) दिसेल, दृष्टीला पडेल असा करणे; दर्शवणे. २. (खेळ, नाटक, तमाशा इ.) प्रेक्षकांच्या नजरेसमोर करणे. ३. (एखादी गोष्ट) प्रत्ययाला आणून देणे; समजावून, विशद करून सांगणे. [सं.दृश्]

**दाखवा** पु. (एखाद्याने) ओझरते तोंड दाखविणे; दृष्टीस पडणे; देखावा. (क्रि. दाखविणे).

**दाग** पु. १. डाग, भाजल्याची, चटका दिल्याची खूण; जनावरावर संख्येचा आकडा इ. चा डाग मारणे. पहा: **डाग**. २. खाणाखुणा. [सं. दह; हिं.]

**दागचेहरा** पु. शरीरावरील खाणाखुणांचे टाचण: 'दाग-चेहरे करून रोजमरे कितेकांचे जारी जाले.' – मइसा ७.५४.

**दागतसिया** पु. घोड्यांच्या व स्वारांच्या निशाण्यांची नोंद : 'त्यापैकी कांहीं स्वार जमा करून सरकारांत दागतसिये जाहाले आहेत.' – पेद १०.७६.

**दागदागिना** पु. वतनदाराचे मानपान, हक्क, लवाजमा.

**दागदागिने** पु. अव.अलंकार व चीजवस्तू, डाग; दागिना.

**दागदार** पु. मस्त हत्तीजवळ घोडा नेणारा स्वार (खेळ्या). (बडोदे)

**दागदूम–क** पु. थांगपत्ता; तपास : 'गुरें घोडीं गेलीं त्याचा दागदूक लावून...लिहून पाठवले.'– पेद ४६.२६.

**दागन** न. स्त्री. (मनुष्य, जनावर इ. ना)डाग देण्याचे हत्यार.

**दागिनदार** पु. मालक; धनी. (राजा.)

**दागिना** पु. शरीर सुशोभित करण्यासाठी, संस्कार म्हणून (नाक, कान इ. अवयवांत) घालण्याची मौल्यवान धातू, काच, मणी इ.पासून बनवलेली वस्तू.

**दाघणे** अक्रि. समर्थ असणे. [सं.द्रांघ्]

**दाजी** पु. १. एखाद्याविषयी, एखाद्याशी आदरपूर्वक बोलताना त्याच्या नावापुढे जोडून वापरण्याचा शब्द. २. (एखाद्याला) आदराचे संबोधन; व्यावहारिक नाव. ३. वडील दीर. (खा.) ४. मोठ्या बहिणीचा नवरा.

**दाट** स्त्री. निकट; गर्दी; दाटी : 'बहुतकरूनि निःशब्द । दाट न रिघे श्वापद ।'–ज्ञा ६.१७६.

पु. १. जोर. २. (मुद्रण.) छापण्याचा फॉर्म आवळताना द्यावयाचा कांड्यांचा दाब. - मुद्रणदर्पण २६. ३. भर; उत्कर्ष : 'मोहाचेनि दाटें मोहपाश गिळी' - निहरि ११.

वि. १. जाड; घट्ट (प्रवाही, सद्रव पदार्थ). २. जाड; बारीक, पातळ नसलेला (कागद, फळा इ.). ३. घट्ट विणीचे; घटमूट (कापड इ.). ४. गच्च; अडच; आवळ; तंग होणारा; अटस (अंगरखा, लहान छिद्रातील मोठी खुंटी इ.). ५. गडगच्च; घनदाट; गर्दीने, चेपाचेपीने, रेटारेटीने, खेटाखेटीने असलेला (जनसमूह, झाडे, पाऊस, जिन्नस इ.). ६. अखंड : 'जेथें आत्मा नाहीं दाट। तेथें अवघें सरसपाट।' - दास १७.३.१४. ७.(ल.) अतिशय घरोब्याची; गट्टीची; परिचयाची; सलगीची पक्की (ओळख, मैत्री, प्रेम इ.); मनस्वी. ८. सर्वत्र माहीत झालेली; लोकांत सर्वदूर पसरलेली ( वदंता, बातमी, गोष्ट इ.): 'वार्ता दाट आली.' - वाडशा २५. ९. अतिशय; पुष्कळ : 'सुगरणी गौळणी चकवाचकवी दाट ।' - ऐपो २४२.

क्रिवि. बळेच, मुद्दाम; दाटून. [क.दट्ट]

**दाटका** पु. दपटशा; बळजबरी.

वि. थोडा; जेमतेम: 'दाटका उतार.' - ऐलेसं ४१२८.

**दाटण** स्त्री. १. दाटी; गर्दी; खेचाखेच; रेटारेटी; गर्दीमुळे झालेली अडचण : 'घोड्या राउता दाटण पाहीं पाहीं त्या मुर्कुंड्या झाल्या ।' - ऐपो ८३. २. (पातळ पदार्थाचा) दाटपणा; जाडपणा; घट्टपणा. [क.दट्टणे]

**दाटणा** पु. अंग पुसण्याचे वस्त्र : 'बाइसे.. सपूर दाटणा वोळगवीति' - पूअ ८.१३. [क.दट्टिसु]

**दाटणी** स्त्री. १. दाटी; दाटण. २. विपुलता; रेलचेल, लयलूट: 'तेथ महानंदाची दाटणी ।' - ज्ञा १६.१२. ३. (कापड इ. च्या गाठीची, गाठोड्याची बांधण्याची) कसणी; आवळण्याची दोरी. ४. दडपण. ५. (क्र.) दाट, घट्ट होण्याची क्रिया.६. व्यापकता : 'देवाचिया दाटणी। देउळा जाली आटणी ।' - अमृ ७३७. ७. कष्ट; परिश्रम : 'न लगे आटणी, तपाची दाटणी ।' - चोखा ४९. ८. मिळणी; भेट : 'नव्हे दाटणी चक्रासी ।' - नाम ३९२.

वि. दाट विणीचे : 'बहात्तर गांठी, सोळा फुंदणी । बांगडी दाटणी होत असे ।' - नाम २०७७. [क.दट्टणे]

**दाटणीवाटणी** स्त्री. पहा : **दाटण १**

क्रिवि. एकमेकांना खेटून, रेटून; दाटी करून; दाटीवाटीने. (क्रि.बसणे, निजणे, पडणे, असणे.).

**दाटणे** अक्रि. १. (द्रवपदार्थ) घट्ट, दाट होणे; (लहान भांड्यात तांदूळ, साबुदाणा इ. शिजताना) घट्ट होणे, आवळणे; त्यामुळे टणक होणे.२.गर्दी, चेपाचेप होणे; चिमटणे; खेटणे : 'दैत्यां दानवांचिआं लोथां । दाटला वसुंधरेचा माथा ।' - शिव १४७. ३. (अंगरखा इ. अंगाला)तंग, घट्ट, आवळ होणे; चिकटून बसणे; (लहान जागेत मोठी वस्तू समाविष्ट झाल्यामुळे ती त्या जागेत) गच्च बसणे; अडचणणे. ४. भाराने दडपले, दाबले, दबले जाणे: 'तरी सांगें कां न दाटिजे । धनुर्धरा ।' -ज्ञा ३.१७७. ५. भिणे : 'जरी चोरां सभा दाटे । अथवा मीना गळु घोटे ।'-ज्ञा ७.९४. ६. (ल.) (आनंद, राग, शोक इ. भावना अनिवार झाल्याने गळा, हृदय इ.) भरून येणे; सद्गदित होणे; कोंडला जाणे. ७. (गर्व इ.ने) फुगणे; ताठणे; भरणे; चढणे : 'जे होते बळवंत आपण असों ऐशा मदें दाटले ।' - मोकृष्ण ५८.२५. ८. भरून जाणे; व्याप्त होणे; व्यापून असणे : 'कीं ब्रह्मगोल वाटे विशिखांहीं दाटला तडा खातो ।' - मोभीष्म ६.४६. ९. अडकणे; अडकून पडणे: 'स्थळीं नावा जिया दाटिजे ।' - ज्ञा १७.३६६. १०. भोसडणे; खरड काढणे; धमकावणे. (व.) ११. चिकटून बसणे: 'लेंकुरुवें बापातें दाटिती । दादिया हलो नेदिती ।' - ख्रिपु २.४२.६०. १२. बुडणे : 'दाटेसि डोळेयांचां वळसां : सभेचे लोक' - नरुस्व ८२. १३. पसरणे; अंथरणे: 'पासवडा दाटिला कमलदळीं' - नरुस्व ४६१. [क.दट्टिसु]

**दाटणे** सक्रि. १. पुसणे; पुसून स्वच्छ करणे : 'चंदने श्रीकर उह्लाळिले । वरि उष्णोदकें प्रक्षाळिले । सर्वेचि निर्मळा आंचळें दाटिले । सेवकजनीं ।' -ऋ ८४. २. दाबणे; दडपणे : 'दाटिजो पां परि भारें । चित्त न दटे ।' - ज्ञा ६.३६९. ३. खुपसणे; जोराने आत शिरकवणे : दाटिली जेणें डोई । आत्मचोरें ।' - ज्ञा १६.४४५. [सं. द्राड्]

**दाटदुपट** स्त्री. धाकदपटशा. (ना.)

**दाटपण** न. दृढता; जवळीक : 'हें प्रीतीचेनि दाटपणें । बहुत घडलें' - ज्ञा ११.५४७. [क. दट्ट]

**दाटबळे** क्रिवि. मुद्दाम; बळेच; जबरीने.

**दाटवळा** पु. वि. बलवानांचा नाश करणारा : 'दाटवळ्या संसाराचा फेडावेया ठाओ' - शिव ७९. [क. दट्ट]

**दाटा** पु. शत्रू : 'तरि तुम्हीं राज्याचे दाटे होंती ।' - ख्रिपु पृ. १४०.

**दाटा** पु. १. (सामा.) दट्ट्या; पाचर; चोंदी; बूच. (क्रि. भरणे, घालणे, बसवणे.). २. (पाटणीच्या खालील) कड्यांमध्ये बसवलेला आडवा दट्ट्या, लाकडी पट्टी : 'बरोदाची लांबी दहा फुटांपेक्षा अधिक असल्यास त्यामध्यें सहा फूट लांबीवर दाटे बसवावे ।' - मॅरेट ६०. ३. (ल.) धमकी; दटावणी; दपटशा; दाट. ४. वल्हे अडकविण्याचा खुंटा. ५. (नाविक) (गलबताच्या) नाळीत अगदी पुढील भागाला काठाच्या किंचित खाली आढी घालून त्यावर फळ्या ठोकून केलेली तक्तपोशी, पाटणी; गलबताचा माळा. (को.)

**दाटावचे** सक्रि. दाट, घट्ट करणे. (गो.)

**दाटिक** न. सर्पविषाची लहरी आलेले माणूस : 'तिया भारणिया घुमत दाटिक : कामकाळडंकाचें' - नरुस्व ५३३.

**दाटी–टि** स्त्री. १. गर्दी; खेचाखेच; चेपाचेप; भीड. २. समुदाय; थवा. ३. (साप इ.ची) लहरी; विळखा; पकड : 'जरि भवभुजंगाची दाटि । - ऋ ७६. ४. (ल.) दाट मैत्री; घरोब्याचा, सलगीचा संबंध, व्यवहार; घसट. ५. (अंधार इ.चा) घनदाटपणा; काळेकुट्टपणा; घनता; निबिडता. ६. (द्रवपदार्थांचा) दाटपणा; (कागद, कापड, फळी इ. ची) जाडी; जाडपणा. ७. (अंगरखा इ. चा) तंगपणा, आवळपणा; (तंग वस्त्र धारण करणाऱ्याची होणारी) चेंबलेली, अवघडलेली स्थिती. ८. (वदंता, बातमी, मत इ.ची) लोकांतील प्रसिद्धी. ९. (एखादा विषय, भाषण, लेख इ.तील) मुख्य मुद्दा; रोख; भर : 'सर्व दाटी हिंदुस्तानचे मनसुबी यांवर आहे.' - मइसा ३.४५०.

**दाटी(टो) वाटी(डी)ने** क्रिवि. एकमेकांशी खेटून; दाटी, अडचण करून. [दाटी द्वि.]

**दाटुगणे** अक्रि. सामर्थ्यवान, मोठा होणे. [सं.द्रढक; क. दट्टी]

**दाटुगा** वि. १. श्रेष्ठ; मोठा : 'केवळ सात्त्विक तूं पैं गा । तापसांमाजी होसी दाटुगा ।'- एरुस्व ११.२. २. बलवान; दांडगा; सामर्थ्यवान : 'धीटु दाटुगा दमनशीलु ।' - गीता १.४३४.

**दाटून** क्रिवि. १. मुद्दाम; बळेच; जाणूनबुजून; बुद्धिपुरस्सर. २. (ल.) खोटेपणाने. ३. उगाच; निष्कारण; विनाकारण: 'देव म्हणे राया तूं दाटुनि धरितोसि कां विषादास।' - मोभीष्म ११.८. ४.धमकावून, धाकदपटशाने. (व.)

**दाटोदाटी** क्रिवि. १. बळेच; सक्तीने: 'रामायण लिहावयासाठीं।... दाटोदाटीं लिहवित ।' - भारा किष्किंधा १.९. २. उत्सुकतेने: 'मम अधरामृताची वाटी । बळें लावितसे वोठीं । जो न घे दाटोदाटी । अमृतासाठीं जो न ये ।' - मुरंशु २४९. ३. गर्दीने; जोराने; त्वरेने : 'लग्न लागलियापाठीं । कायसी यादवांची गोष्टी । कार्य करू दाटोदाटी । आम्ही जगजेठी असतां ।' - एरुस्व ६.३५.

**दाटोळा** पु. गर्दी; दाटी; दाटण. (ना.,व.)

**दाठर** वि. कठीण; निबर; ताठर. [सं.दृढतर]

**दाठ(ढ)रणे** अक्रि. (आंबा न पिकता, गळू न पुवळता) टणक, कठीण, घट्ट, निबर होणे.

**दाठ्ठा** पु. दारवठा; उंबरठा; दरवाजा. (ना.,व.)

**दाड** पु. एक देवचार. हा बहुधा प्रत्येक गावात असतो. (गो.)

**दाड** स्त्री. (सुतारधंदा) पेच पाडण्याचे हत्यार.

**दाड** वि. १. दुष्ट; द्वाड; दांडगा :'कशास हा दाड तुम्हांस व्हावा ।'- सारुह ८.१३. २. वावडे; बाधक; अपायकारक.(व.) [द्वाड]

**दाडफुरई** स्त्री. इकडून तिकडून खटपटीने जमवणे; अडचणीने प्राप्त करणे : 'आतां रुपया होणें तो दाडफुरई करून जमा करितात.'- पेद १४.४५.

**दाडुरंब** वि. गर्विष्ठ; अभिमानी : 'आगम निन्हां दाडुरंब : जाणपणें न पीहति आंब' - शिव ८४.

**दाढ** स्त्री. दाताच्या कवळीतील शेवटच्या मोठ्या दातांपैकी प्रत्येक. यांचा उपयोग अन्न चावण्यासाठी होतो.[सं.दंष्ट्र; गु.; हिं.डाढ] (वा.) ० **उलने** – बडबड करणे; बोलणे. (व.) ० **बांधणे** - १. (मंत्र,तंत्र इ. च्या योगाने एखाद्याची) अन्न खाण्याची शक्ती नाहीशी करणे. २. तोंड, बोलणे बंद करणे; निरुत्तर करणे. **दाढेत सापडणे** – (एखाद्याच्या) तावडीत, कचाट्यात, पेचात सापडणे.

**दाढ** वि. वाईट; अनिष्ट :'लगनाची तिथ बामन सांगे साल दाढ सांगते दुसऱ्या सालाची तिथी काढ.' - लोसाको. (व.)

**दाढ** स्त्री. १. भाताचे रोप करण्यासाठी भाजलेली जमीन, शेताचा तुकडा. २. (ल.) भाताचे रोप करण्यासाठी जमीन भाजण्यासाठी तिच्यावर घातलेले गवत, झाडोरा. ३. (ल.) वरीलप्रमाणे भाजलेल्या जमिनीत झालेले भाताचे रोप. ४. ज्यात भात पेरून त्याची रोपे उगवल्यावर तेथून उपटून दुसरीकडे लावतात ते शेत.(को.) [सं.दग्ध]

**दाढ** वि. कठीण; टणक; कडक. [सं.दृढ]

**दाढगळी** स्त्री. (कुस्ती) एक डाव. प्रतिपक्ष्याच्या जबड्याखाली आपले पंजे घालून त्याची गर्दन मागे ताणणे.

**दाढणे** अक्रि. संकटात सापडणे.

**दाढबंद** पु. चित्त्याला तोंड उघडता येऊ नये म्हणून तोंडाला घातलेला सुताचा दोरीचा फास : 'खाण्याचे वेळी दाढबंद जरा सैल करितात.' - चिमा १४.

**दाढशृंखल–सांखळ** वि. दाढांबरोबर बाहेरच्या अंगाला किंवा गालावर भोवरा असलेला (घोडा). - अश्वप १.९७.

**दाढसांख(क)ळ** स्त्री. १. दाढांना होणारा एक विकार. २. (घोड्याच्या) दाढेच्या सांध्यावर असलेला भोवरा. हा अशुभ मानतात.

**दाढं** न. पु. लांबी-रुंदीला खूप कमी असणारा ओटा.

**दाढा** वि. धीट; पराक्रमी; प्रतापी; बलाढ्य; गाढा. [सं.दृढ]

**दाढावणे** अक्रि. रागावणे. (व.)

**दाढी** स्त्री. १. हनुवटीवरील केस. २. त्यांची हजामत. (क्रि. करणे). [सं.दाढिका] (वा.) ० **तथा वाढी** – ज्यांच्याकडे सत्ता आहे त्यांनाच मान देणे. (अहि.) ०, **दाढीहोटी धरणे, दाढीला हात लावणे** – एखाद्याची विनवणी, काकुळतीने प्रार्थना, खुशामत करून वश करणे. ० **धरून टाचा, पाय तुडविणे** - एखाद्याला बाह्यात्कारी स्तुतीने मोहवून आतून त्याचे वाईट करणे; मैत्रीचा आव आणून घात करणे. ० **पाहून वाढणे** – बाह्यस्वरूपाकडे, पोशाखाकडे पाहून त्याला अनुरूप मानपान, आदरातिथ्य करणे. ० **लावून जाणे** – वेषांतर करून जाणे: 'हे राजश्री येथून दाढी लावून थर्डक्लासमधून गेले ते पळण्याच्या हेतूनें गेले नाहींत असें कोण म्हणेल?' - लो. टिळक केसरीतील लेख भाग १ खंड १. **दाढीला कांदे बांधणे** – एखाद्याची फजिती, अप्रतिष्ठा करणे. **दाढीले दाढी भेटनं** – जशास तसा भेटणे. (अहि.) **(एखाद्याची) दाढी हलविणे** – एखाद्याला रागाने दपटशा देणे; एखाद्यावर ताशेरा झाडणे; एखाद्याला डिवचणे, चिडवणे. **घडी घडी लांब दाढी करणे, मांडणे** – क्षणोक्षणी रागावणे, संतापणे (रागावलेला मनुष्य दाढीवरून हात फिरवीत असतो, यावरून).

**दाढीदीक्षित, दाढीवाला** वि. (ल.) मुसलमान : 'दिल्लीचा दाढीवाला ।' - संग्रामगीते १२३.

**दाढुक** न. १. दाढीवरून बांधलेला कपडा, वस्त्र. (व.) २. दाढीला झालेले गळू. ३. (तिरस्कारार्थी) दाढी. (ना.)

**दाढेरूं** न. दाढेजवळ हिरडीला झालेला फोड.

**दाढेल** वि. मोठी दाढी असलेला.

**दाढेल** न. वडे इ. चे तळण तळून शिल्लक राहिलेले तेल; बढेल.(को.)

**दाढैणे** अक्रि. १. दाढेत, संकटात सापडणे. २. दग्ध होणे. [सं.दग्ध]

**दाढैणे** अक्रि. सुजणे : 'दाढैलें आंग दिसे' - रकौ ३५५. [सं.दृढ]

**दाढ्या, दाढीचा गधडा** वि. (तिरस्कारार्थी) लांब दाढी असलेला; दाढीवाला.

**दाढ्या** पु. दाढेचा एक विकार; रोग.

**दाणया** वि. आंब्याच्या कैऱ्या मिठाच्या पाण्यात घालून ठेवण्याचे लाकडी गोलाकार पात्र; डोण.(को) [सं.द्रोण]

**दाणा** पु. १. धान्य. २. धान्याच्या राशीतील प्रत्येक कण. ३. धान्यकणाप्रमाणे असणारे मोती, मणी; बीज; डाळिंबाचे बी इ. ४. बर्फी इ.च्या ठिकाणी साखर जमून जे कण होतात त्यांपैकी प्रत्येक. ५. (कागद, चामडे इ. च्या) गुळगुळीत पृष्ठभागावर येणारी बारीक कणासारखी फुगोटी, टेंगूळ, नक्षीः 'खराऱ्याच्या आकाराच्या एका हत्यारानें कातडें उभें, आडवें किंवा चोहोंकडून घासतात; म्हणजे त्यावर दाणा उमटतो.' – ज्ञाको क २६३. ६. (कापड इ.च्या गाठीतील) प्रत्येक नग. ७. उत्कृष्ट व एकेक नगाने विकल्या जाणाऱ्या आंब्यांपैकी प्रत्येक नग: 'आम्बे मुरंब्यास दाणे शुमार पन्नास' – मइसा २२.१०५. ८. किरमिजी रंगाचा कण. ९. सीताफळाच्या सालीवरील डोळ्यांपैकी प्रत्येक. १०. एक प्रकारची जाडी साखर.११. गुप्तांगावरील लव. [सं.धान्यक; फा. दाना] (वा.) **दाणे टाकून कोंबडी झुंजविणे** – पदरचे खर्चून मुद्दाम भांडणे लावणे.

**दाणा** वि. १. धूर्त; शहाणा; चतुर; दूरदर्शी; चाणाक्ष. २.(व्यापक) उत्कृष्ट; गुणवान; उत्तम; फार चांगला (मनुष्य, जनावर): 'पादशाहीस वर्तमान कळलें तेव्हां बोलिले कीं दुस्मान दाणा गेला.'– मराचिथोशा ८५. [फा.दाना]

**दाणागोटा** पु. (व्यापक) धान्यधुन्य; धान्य, डाळी इ. जिन्नस.

**दाणादाण** स्त्री. १. पांगापांग; वाताहात; पांगणी; फाकाफाक; सैरावैरा पळणे; भणाणणे. २.विस्कळीत, गोंधळाची, पांगापांग झालेली स्थिती. वि. विस्कळीत; सैरावैरा पळत सुटणारा. [फा.दाना-दाना]

**दाणादीन** वि. धूळधाण झालेला; नष्ट.

**दाणापाणी** न. १. निर्वाह; पोट भरणे; उपजीविकेचे साधन. २. ईश्वराने नेमून ठेवलेले अन्नोदक. ३. दाणागोटा; चारापाणी. ४. कोणी मेल्यावर त्याच्या स्मृत्यर्थ एक वर्षपर्यंत ब्राह्मणाला देण्याचे धान्य व पाणी.

**दाणालाख** स्त्री. बोर, पिंपळ इ. झाडांपासून निघणारी एक प्रकारची लाख.

**दाणावणे** अक्रि. फार दाणा खाल्ल्यामुळे घोड्याला आजार होणे.

**दाणासाखर** स्त्री. फुलसाखर काढून घेतल्यावर खाली राहणारी तांबूस साखर. – कृषि ४८२.

**दाणी** पु. १. धान्यावरील कर वसूल करणारा अधिकारी: 'येतुकेआ दाणी लोकू मेळुनु । बाव्तिस्मु घ्यावया आले ठाकुनु ।'–ख्रिपु २.१८.७४. २. सरकारला धान्य पुरविणारे; धान्याचे व्यापारी. ३. (वरील पेशावरून पडलेले) एक आडनाव.

**दाणी** स्त्री. डागणी; सळई. (गो.)

**दाणी** स्त्री. (एखादी वस्तू ठेवण्याचे) पात्र, उपकरण. (संस्कृत) आलय या अर्थाचा फारसी प्रत्यय. उदा. अत्तरदाणी. [फा.दान्]

**दाणूस** स्त्री. गाडीची चौकट; साटी. (गो.)

**दाणेआळी, दाणेबाजार** स्त्री.पु. १. धान्याच्या दुकानांची पट्टी, गल्ली. २.(ल.) वेश्यावस्ती. (दाणेबाजारात वेश्यावस्ती आहे, त्यावरून).(पुणे).

**दाणेकरी** पु. घोड्याच्या पागेला दाणा, धान्य पुरवणारा मराठेशाहीतील लष्करी अधिकारी.

वि. १. संसाराच्या निर्वाहाला पुरून विकायला उरेल इतके धान्य ज्याच्याजवळ आहे असा. २. पहा : **दाणी २**

**दाणेदार** वि. १. दाण्यांनी भरलेले (कणीस इ.). २. कणीदार; रवाळ. ३. ज्याच्या पृष्ठभागावर दाणे उठले आहेत असा (कागद, चामडे इ.). [फा.दानादार]

**दाणोडा** पु. धान्य अस्ताव्यस्त सांडणे. (ना.)

**दात** १. आशा. २. उपाय.

**दात** पु. १.चावण्याच्या, फाडण्याच्या उपयोगी तोंडातील दृश्य अस्थिविशेषांपैकी प्रत्येक; दंत. २. (ल.) (फणी, करवत, दंताळे इ.चा) दाता; फाळ; नांगराचे टोक; डंगाचे टोक. ३. हस्तिदंत. ४. द्वेषबुद्धी; मत्सर; दावा; डाव; दंश.[सं.दंत] (वा.) ०, **दातओठ खाणे, चावणे** – रागाने दातावर दात घासणे, दातांनी ओठ चावणे; अतिशय चिडणे; रागावणे. ० **काढणे, दाखवणे** –दात विचकून, फिदीफिदी हसणे. ० **किरकिटीस येणे** – विपन्नावस्था, अन्नान्नदशा होणे; हलाकीची परिस्थिती येणे. ० **कोरणे** – इकडून –तिकडून खटपटीने जमवणे; अडचणीने मिळवणे. ० **खाऊन, ओठ खाऊन** – मोठ्या रागाने व अवसानाने. ० **खाऊन, चावून अवलक्षण करणे** – (प्रतिकार करण्याचे सामर्थ्य नसताना) रागाचा दुबळा आविर्भाव आणून, शिव्याशाप देऊन स्वतःचे हसे करून घेणे. ० **खीळ–खिळी बसणे** – निरुत्तर होणे; एखाद्यापुढे बोलता न येणे.०**झिजणे** – निष्फळ उपदेश केल्याने, केलेल्या विनवण्या व्यर्थ गेल्याने, शिकवलेला विषय मूर्ख विद्यार्थ्याला न समजल्याने तोंडाला फुकट शीण, श्रम होणे. ० **धरणे, असणे, ठेवणे, राखणे, बाळगणे** – द्वेष, मत्सर करणे; डाव धरणे; पूर्वीचे शल्य मनात ठेवून एखाद्याच्या नाशासाठी टपून बसणे.० **पडणे** – (एखाद्याची) फटफजिती,नाचक्की होणे. ० **पाजवणे** – एखादी वस्तू (विशेषतः खाण्याची) मिळण्याजोगी नसताना तिच्याबद्दल उत्कंठित, आतुर होणे. ० **पाडणे**– (एखाद्याची) फजिती करणे; वादात पराजित करणे; टोमणा मारणे; निरुत्तर करणे; विरोधकांचे सर्व मार्ग बंद करणे; अद्दल घडवणे.० **पाडून हातावर देणे** – कंबख्ती काढणे; पारिपत्य करणे; उट्टे फेडणे (विशेषतः धमकावणी देताना उपयोग). ० **लागप**– पैसे पदरी असणे; खाऊन–पिऊन सुखी असणे. (गो.) ० **वठणे, लागणे**– (उच्चारलेला शाप एखाद्यावर) फलद्रूप होणे. ० **वासणे** – हाती घेतलेले कार्य शेवटाला नेता येत नाही म्हणून निराश होऊन स्वस्थ बसणे. ० **वासून पडणे** – १. आजाराने अशक्त होऊन अंथरुणाला खिळणे. ० **विचकणे** – १. उपहासाने हसणे. २. याचना करणे; काही मिळवण्यासाठी एखाद्याला विनवणे. **दातकिची खाणे** – (रागाने) कचाकच, कडकड दात चावणे. **दात निसकीस येणे** – १. त्वेष, स्फुरण, आवेश इ. नी युक्त होणे. २. जिवावर उदार होणे : 'मल्हारराव यांचे इरेनें दातनिसकीस येऊन मोठमोठे खेतांत जीवाअधिक केली.' – भाब ११. **दाताओठांवर जेवणे** – चोखंदळपणाने जेवणे. **दाताखाली घालणे, धरणे** – करडा, सक्त अंमल चालवणे; कडकपणाने वागवणे; अतिशय छळणे; गांजणे. **दाताची मिरवणूक काढणे** – स्वतःचे

हसे करून घेणे. (कर.) **दाताचे विष** – मत्सराने, जळफळाटाने काढलेले विषारी उद्गार; शिव्याशाप. **दाताचे विष बाधणे** – १. पहा : **दात वठणे**. २. दुसऱ्याला बाधेल असा शाप देण्यास समर्थ असणे. **दाताच्या कण्या करणे, घुगऱ्या होणे** – १. विनवण्या, याचना करून, व्यर्थ उपदेश किंवा शिकविण्याचा निरर्थक खटाटोप करून दात झिजवणे; तोंड शिणवणे. २. अनेकवार सांगणे, विनवणे. **दातावर मारायला पैसा नसणे** – अगदी अकिंचन, निर्धन असणे, बनणे, होणे; जवळ एकही पैसा नसणे. **दातावर मांस नसणे** – १. पैशाचे पाठबळ नसणे; दारिद्र्याने ग्रस्त होणे : 'आपल्या तर दांतांवर मांस नाहीं. कुटुंब एवढें थोरलें...' – पकोघे. २. कोणाशीही भांडण्याचे किंवा कोणालाही इजा करण्याचे सामर्थ्य अंगी नसणे. **दातावर येणे** – अंगावर येणे; व्यवहार आतबट्ट्याचा होणे. **दाताला–स दात लावून असणे, निजणे, बसणे, रहाणे** – तोंड मिटून, काही न खाता, उपाशी, न बोलता बसणे, रहाणे इ. **दाती घेणे, दातावर येणे** – एखाद्या कार्यात अपयश येणे; व्यापार इ. मध्ये नुकसान होणे. **दाती तृण, तण, कड्याळ धरणे** – मान तुकवणे; नम्रपणा स्वीकारणे; शरण येणे; पराभव मान्य करणे. **दाती बळ धरणे** – अतोनात मेहनत, धडपड, नेट करणे; प्रयासाने, नेटाने काम करणे. **दाती येणे** – १. रागाने दात-ओठ खाणे; भांडायला प्रवृत्त होणे : 'येकीस येकी ढकलून देती। येताति येकीवरी एक दांतीं।'– सारुह ७.६०. २. फार अडचणीत, पेचात येणे, सापडणे. **(एखाद्याचे) दात त्याच्याच घशात घालणे**– एखाद्याची लबाडी बाहेर काढून त्याची फजिती करणे; (एखाद्याची) लबाडी त्याच्यावरच उलटवणे. **सोन्याने दात किसणे** – पैशाच्या राशीत लोळणे.

**दातइळा** पु. दातरा, दाते पाडलेला कोयता.

**दातकडी** स्त्री. दातखिळी. (क्रि. बसणे). (राजा.)

**दातकस** स्त्री. (तोंडातून निघालेले) शब्द; उद्गार, भाषण (विशेषत: अशुभसूचक) इ. (क्रि. बाधणे, लागणे.). पहा : **बत्तिशी**

**दातकस(सा)ई** पु. नेहमी अशुभ भविष्ये सांगणारा व ज्याची तसली भविष्ये खरी ठरतात असे मानले जाते असा मनुष्य.

**दातकस(सा)ळ–ळी, दातकिसळ–ळी** स्त्री. नेहमी दात खाणे, शिव्याशाप देणे, ताशेरा झाडणे इ. युक्त दुर्भाषण; अभद्रसूचक, अशुभ, अमंगल बोलणे; बत्तिशी. (क्रि. बांधणे).

वि. १. नेहमी दात खाणारा; शिव्याशाप देणारा; ताशेरे झाडणारा. पहा : **दातकसाई**. (वा.) **दातकसाळीला येणे**– दात खाऊन असणे, येणे: 'दांतकसाळीस येऊन इंग्रज... आला.' – मइसा १०.८१.

**दातकिरकंड्या** स्त्री. अव. (व.) पहा: **दातकस (सा) ळ–ळा**

**दातकिरकीट–किटी** स्त्री. अव. १. पहा: **दातकस(सा)ळ–ळी** २.(ल.) हट्टाने, घुमेपणाने मौन धरून स्वस्थ बसणे. (क्रि.देणे.) ३. (बायकी) आर्जव, विनवण्या, गयावया करून उसने मागणे; दाताच्या कण्या करणे. [ध्व.]

**दातकिरंडी** स्त्री. हातघाई. (ना.)

**दातकुडी** स्त्री. हनुवटी. (झाडी) [सं.दंतकुटी]

**दातके, दाताळ–ळे, दात्याळ** न. दाते असलेले शेतकीचे औत.

**दातकेणे** न. (एखाद्याचे) नेहमीचे, नित्याच्या जेवणाचे अन्न; भक्ष्य.

**दातकोरणे** न. दातात अडकलेला पदार्थ, अन्नाचे कण इ. कोरून काढण्याची चांदी, तांबे इ. धातूची अणकुचीदार, लहान व बारीक सळई.

**दातखिळी–खीळ** स्त्री. १. सन्निपातामुळे वरचे व खालचे दात परस्परांत घट्ट बसून तोंड उघडता न येणे. २. न बोलणे; मौनव्रत. ३. (ल.) निरुत्तर होणे; एखाद्यापुढे बोलता न येणे.

**दातघशी** क्रिवि. तोंडघशी : 'या रांडा घरघाल्या सख्या तूं पडशी दांतघशी।' – सला १०.

**दातचिना** पु. दात घट्ट, काळे करण्याचे मंजन. [सं.दंत + शाण]

**दातनचिरी** स्त्री. विवाहप्रसंगी पार पाडला जाणारा एक विधी, त्यासाठी लागणारे साहित्य. (अहि.)

**दातनीकिसा** पु. दातावर दात घासणारा : 'दांतनीकिसा। धुसुमूसलु।' – कलानिधी ८. [सं.दंत+ निस् कस्]

**दातरखिंड** स्त्री. तोंडातले दात पडून झालेली खिंड. [सं.दंतुर + म. खिंड]

**दातरडे** न. काळ्या जमिनीतील गवत निंदण्याचे औत. – कृषि २७२.

**दातरा, दात्रा** पु. १. (कोयता, चाकू इ.च्या धारेला पडलेला) कातरा; खांडे; खांडोरे. २. दाता. (राजा., कु.)

**दातरा–ऱ्या** वि. वरचे दात ओठांच्या पुढे असलेला (मनुष्य). [सं.दंतुर]

**दातरी** स्त्री. १. म्हातारपणी उगवणारा, येणारा एक दात. २. लहान मुलाला नुकताच आलेला दात. ३. विरळ दाणे आलेले धान्याचे कणीस. ४. मधून-मधून दाते मोडलेली फणी, दाताळे इ. (वा.) **० करणे** – चिडून (एखाद्याच्या) वसकन अंगावर येणे; खेकसणे.

**दातऱ्या** पु. (सुतारी धंदा) कानशीचा एक प्रकार. ही निमगोल असते.

**दातवडा** पु. लहान मुलाला दात आल्यानंतर त्याच्यावरून ओवाळून ते मुलांकडून लुटवण्याच्या वड्यांपैकी प्रत्येक. (गो.)

**दातवण** न. १. एक टोक चावून शेवटी गोंडेदार केलेली, दात घासण्याची बाभूळ, निंब इ. झाडाची लहान काडी. २. दंतमंजन. ३. दातचिना. [गु.]

**दातवला–ले** न. एक हस्तिदंती दागिना.

वि. दाताचा केलेला; हस्तिदंती: 'अस्थीचा वीटाळ होतां स्नान केलें। चुडे दांतवलें कासयासी ।' – रामदासी स्फुट अभंग ३३. (नवनीत पृ.१५१. ).

**दातवाके** न. शेतीच्या काही औतांचे, अवजाराचे दाते आत वाकवण्याचे एक हत्यार.

**दात(ता)ळ(व, वि)णे** उक्रि. दाते बसवणे (रहाटगाड्याचे तुंब इ.ना); दाते पाडणे. (को.)

**दात(ता)ळी** स्त्री. भांडे धरता, नेता येण्याच्या सोयीसाठी त्याच्या गळ्याला बांधलेली शिंकाळीसारखी दोरी; शिंकाळी.

**दाता–त्या** वि. १. देणारा. २. उदार; देण्याचा स्वभाव असणारा. [सं.]

**दाता–त्या** पु. १. फणी, तिफणी, करवत, रहाटगाडगे इ. वस्तूंचा दातासारखा अवयव. (क्रि. पाडणे, घालणे, करणे.). २. शेतातील चिखल सारखा

करण्याचे एक प्रकारचे दाताळे. ३. केळीच्या देठाला असलेला केळ्यांच्या फणीच्या अवयवांपैकी प्रत्येक. ४. (व्यापक) केळ्यांच्या फणांतून (फणीच्या दाताप्रमाणे) लोंबणाऱ्या केळ्यांपैकी प्रत्येक. ५. केळफुलातील एक लवचीक, लोचट, तंतूच्या आकाराचा अवयवविशेष; पोव्यात असताना केळ्याच्या टोकापासून लोंबणारा तंतुसमूह; केसर; फूल. ६. पुरे न भरलेले, मध्ये थोडा गीर असलेले केळे. ७. (क.) कपची; ढलपा; ढलपी. (क्रि. निघणे.). ८. पदार्थाचा न विभागला जाणारा कण. (मुंबई) ९. जमीन उकरण्याची लाकडी फळी. (गो.) १०. शेवया, चकल्या इ. करण्याचा साचा. (गो.)

**दाताड-डी** न. स्त्री. (तिरस्कारार्थी) बत्तिशी; दातांची कवळी; दातावळी.

**दातार** वि. उदार; दानशूर; धनी; दाता : 'धांवे तुक्याचा दातार आळंगिला वेगीं ।' -तुगा १२२. [सं.दातृ]

**दातावणी** स्त्री. तुंबे इ. दातळण्याची क्रिया. (को.)

**दातावणे** अक्रि. (एखाद्यावर) रागाने दातओठ खाणे; जळफळणे.

**दाताळ** वि. १. पहा: **दातरा**. २. पहा : **दातकस(सा)ई**

**दाताळणे** उक्रि. १. दात लावणे; दातांनी चावणे, कुरतडणे, ओढणे, हिसडा देऊन तोडणे. २. फाजील बडबड करून एखादी गुप्त गोष्ट नकळत बाहेर फोडणे; तोंड पाघळणे.

**दाताळपुरी, दाताळी** स्त्री. १. दंतपंक्ती : 'वर्ती करून दांताळीं। श्वानपुत्र हाडें चगळी।' - दास ५.३.६१. २. दात ज्यात बसलेले असतात त्या हिरड्या. (वा.) ० **ओसाड होणे** – दात पडून तोंडाचे बोळके होणे.

**दातुरडी** स्त्री. १. पहा: **दाताड-डी**. २. पहा: **दातरी** २

**दा(दां)तुरी** स्त्री. (थंडी इ.मुळे) दात वाजणे; कुडकुडणे: 'दांतुरी पंचभूताची।' - भाए ६०२.

**दातृत्व** न. उदारपणा; दानशूरता. [सं.]

**दातेकड** न. रहाटगाडग्याच्या तुंब्याला जोडलेले, दाते पाडलेले लाकूड. (को.)

**दातेफळी** स्त्री.(राजा.) पहा: **दाता** २

**दातोणी** स्त्री. फणी. (गो.)

**दातोरी-रे, दातौर** स्त्री. न. दात; दाताडे; दंतपंक्ती. **दातौर पाडणे** – नाहीसे करणे.

**दात्या** पु. तपकिरी रंगाच्या मुंगीची जात.

**दात्या** पु. भातातील एक गवत; फणीचा दात. (झाडी)

**दात्री** स्त्री. एक झाड. याच्या पानाला कात्रे असतात. (कु.,गो.)

**दाथर** पु. १. (दोन पदार्थांतील) गवत- पाल्याचा थर; मोदक इ. वाफेने शिजतेवेळी पातेल्यात पाणी घालून त्यात घालतात तो गवत, पाने इ.चा थर : 'मातेचिया उदरकुहरीं । पचूनि विष्ठेचां दाथरी । उकडूनि नवमासवरी । जन्मजन्मीनि मरती ।'- ज्ञा ९.३३१. २. उकाडा; वाफारा; उबारा. ३. थर. ४. बांधकाम करताना दगड,विटा इ.वर देतात तो मातीचा, चुन्याचा थर. ५. दद्रु; दराद; नायटा; दाद (कातडीचा रोग). [सं.दृढ+स्तर]

**दाथरवडा** पु. आत पाणी असलेल्या भांड्याचे तोंड कपड्याने बांधून भांड्यांतील वाफेवर शिजवलेला नरम वडा; फुंडका.(ना.)

**दाथरा** पु. नायटा; दाथर.

**दाथरी** स्त्री.आच्छादन; दादरा.

**दाद** स्त्री. १. दुर्बलाने वरिष्ठ अधिकाऱ्याकडे आपली तक्रार कळविण्यासाठी मिळविलेला प्रवेश, मुलाखत; वर्दी. २. तक्रार; फिर्याद. (क्रि. लागणे, लावणे). ३. (वरिष्ठ अधिकाऱ्याने तक्रार वगैरे ऐकून केलेला) तक्रारीचा बंदोबस्त, इलाज, उपाय. (क्रि. देणे). ४. न्याय: 'हा चालवून तुमची किस्त अदा करावी तर न्याय-दाद नाहीं.' - मइसा ५.१३७. ५. (कायदा) पक्षकार स्वतःच्या हक्काबाबत कोर्टाकडे करतो ती मागणी, विनंती. ६.एखाद्या कलाकृतीचे सौंदर्य समजल्याने आस्वादकाने दिलेली प्रतिक्रिया, केलेली वाहवा.[फा.] (वा.) ० **घेणे** – तक्रार ऐकून न्याय देणे. ० **देणे** – अधीन होणे; स्वतःवर दुसऱ्याचा पगडा बसवू देणे; (एखाद्यापुढे) स्वतःचा कमीपणा कबूल करणे. (अकरणरूपी प्रयोग केल्यास व दाद या शब्दाच्या मूळ अर्थाला अनुसरून) तक्रारीकडे दुर्लक्ष करणे; तक्रारीचा बंदोबस्त न करणे; (ल.) न जुमानणे; न गणणे; हार न जाणे. ० **ना फिर्याद** – अन्यायाबद्दल तक्रार करण्याची अथवा न्याय मिळवण्याची अडचण, गैरसोय, पंचाईत इ. दर्शवणारा वाक्प्रचार.

**दाद,दादड, दादरा** स्त्री. न. गजकर्ण; दराद. [हिं.]

**दादगा-ग्या** पु. पुरुष; पुरुषमंडळी. (तंजा.)

**दादड** स्त्री. १. भातात उगवणारे जाडे-भरडे गवत. २.भातातील जाडे पळिंज, न भरलेले लोंबट. (को.)
वि. दाट; घन: 'सोनेयांचिया शाखा पालव दादड'- नरुस्व ८३५. [क. दट्ट]

**दादडणे** अक्रि. (शरीर) गजकर्ण इ. नी विकृत, जाड होणे.

**दादपूस** स्त्री. विचारपूस; चौकशी. (कु.)

**दादभाई** पु. दायाद; भाऊबंद.

**दादर** पु. १.जिना; सोपान:' मध्यमेचेनि दादरेहुनी । हृदया आली ।' - ज्ञा ६.२७१. २. जिना बंद करण्याजोगे जिन्यावर आडवे पाडण्याचे दार, लाकडी झडप. ३.नदी इ. वरील लाकडी, दगडी पूल; (सामा.) पूल. ४. शिडीसारखा काढता-घालता येणारा लाकडी जिना. ५. समुद्राकाठचा उथळ पाण्याचा प्रदेश. [गु.]

**दादर** स्त्री. शाळू; जोंधळा. (खा., नाशिक)

**दादरघाई** स्त्री. कांघाई; कांगावा. (व.)

**दादरणे** अक्रि. घाबरणे; भीतीने गोंधळून जाणे.

**दादरा** पु. १. भांड्यातील पदार्थ झाकलेला रहाण्यासाठी भांड्याच्या तोंडाला पान,वस्त्र इ. चे बांधलेले आच्छादन. २. धूर बाहेर जावा किंवा घरात उजेड यावा म्हणून घराच्या छपराला ठेवलेले छिद्र, गवाक्ष; धाब्यातील झरोका. ३. (ल.) अतिशय थंडीमुळे कानाला बसणारा दडा; कान बंद होणे; कानठाळी. (क्रि. बसणे). ४. पहा: **दादर** पु.२.५. खिडकी; भोक; भगदाड. ६. जिना; दादर. (व.) ७. श्रावण महिन्यातील एक धार्मिक विधी. यात माडाच्या पोयीत भात, दिवा इ. ठेवून समारंभपूर्वक ती नदीत सोडतात. (गो.)

**दादरा** पु. (संगीत) एक ताल. याच्या सहा मात्रा व दोन विभाग असतात. [सं.दर्दरिका]

**दादरी** स्त्री. १. (सोनारी) चांदी, सोने इ. तोडण्याची छिन्नी. २. कानठळी; कर्कश आवाज : 'पहाटेच्या पारामंदी कर्णा वाजतो दादरीचा.' – लोसाको. [सं. दर्दर]

**दादला–ल्या, दादुला, दाल्ला** पु. १. नवरा; पती. २. पुरुष; मर्द; वीर.

**दा दा** उद्गा. गाडी हाकताना बैलाने चालावे म्हणून त्याला देण्याच्या इशाऱ्याचा शब्द. [ध्व.]

**दादा** पु. वडील–बंधू; धनी; मालक; प्रतिष्ठित गृहस्थ; वडीलधाऱ्या माणसासाठी आदराचे संबोधन, व्यावहारिक नाव. [ध्व., सं. तात] (वा.) ०, **बाबा, पुता करणे** – सौम्य, गोड भाषणाने एखाद्याचा राग घालवण्याचा प्रयत्न करणे.

**दादा** पु. मवाल्यांचा पुढारी.
वि. लुच्चा; मवाली; लब्धप्रतिष्ठित.

**दादागिरी** स्त्री. लुच्चेगिरी; फसवेगिरी; वरचढपणा.

**दादी** स्त्री. वृद्ध स्त्रियांसाठी वापरण्याचे आदरार्थी संबोधन. [सिं.]

**दादुलेपण** न. १. नवरेपणा; नवऱ्याचा हक्क. २. स्वामित्वाचा अधिकार: 'खांडेधुआवन मागे अंतराळीं।... दादुलेपणें ।' – शिव १६२. ३. पुरुषत्व; मर्दपणा; पौरुष : 'जळो तुमचे दादुलेपण।' – एरुस्व ८.६.

**दादोड** स्त्री. डास इ. चावल्याने आलेली गांध. (गो.)

**दाद्या** पु. नवरा. (अहि.)

**दान** न. १. देण्याची क्रिया; धर्मादाय; बक्षीस; देणगी देणे. (समासात) विद्यादान, धनदान इ. २. (कायदा) काही मोबदला न घेता एखाद्याने दुसऱ्याला आपली स्थावरजंगम मालमत्ता धर्मार्थ देणे. ३. (सोंगट्यांच्या खेळात) फासे घरंगळत जमिनीवर टाकून ते स्थिर झाल्यावर त्यांच्यावरील पृष्ठभागावर दिसणाऱ्या ठिपक्यांची संख्या; डाव. (क्रि. पडणे, देणे). ४.माजलेल्या हत्तीच्या गंडस्थळातून वाहणारा मद. [सं.]

**दान** न. एखादी वस्तू ठेवण्याचे पात्र; दाणी. [फा.]

**दान** स्त्री. रस्ता; चाकोरी. (व.)

**दानखड** न. लुगडे. (हैद्रा., व.)

**दानत** स्त्री. १. धर्मबुद्धी; उदारपणा. २. सद्वर्तन; नेकी; सचोटी; प्रामाणिकपणा. [अर. दियानत्]

**दानधर्म** पु. १. पुण्यप्राप्तीसाठी केलेले दान; ब्राह्मणभोजन, धर्मशाळा बांधणे इ. परोपकारी, धार्मिक कृत्ये. २. परोपकारासाठी केलेला खर्च.

**दानपत्र** न. देणगीपत्र; देणगीखत; जमीन इ. चे दान केले असता ते चालावे म्हणून दाखल्यासाठी करून दिलेले पत्र, सनद.

**दानप्रतिभू** पु. (कायदा) विकलेल्या मालाबद्दल, कर्जाऊ, उसनवार दिलेल्या पैशाबद्दल ठेवण्याचा जामीन.

**दानमान** पु. आदरसत्कार : 'बहुत देखौनि दानमानः मागतेयाचें संतोषलें मन' – नरुस्व १३५. [सं.]

**दानव** पु. दैत्य; असुर; राक्षस. [सं.]

**दानवा–वे, दानवार** पु. न. गांडूळ; काडू; दवणा.

**दानविधी** पु. १. दान देण्याचा, करण्याचा विधी. २. कर्ज द्यावे किंवा नाही यासंबंधी विचार : 'दानविधि व अदानविधि हे दोन प्रकार धनकोसंबंधीं होत.' – ज्ञाको (क) १११.

**दानवीर–शील–शूर** वि. सढळ हाताने दान करणारा; दान करण्याचा, स्वभाव असणारा.

**दानाई** स्त्री. अक्कल; शहाणपण; सूज्ञपणा : 'हे गोष्ट करणें दानाई व दूरन्देशीपासोन दूर आहे.' – मइसा २२.६१. [फा.]

**दानाकेश** पु. १. थंडीच्या दिवसात वापरावयाचे, लव असलेले व कलाबतूचे काम केलेले एक प्रकारचे उबदार वस्त्र. २. सकेश चामडे; (इं.) फर. [फा.दानह्केश]

**दानाधिसपट** स्त्री. दाणादाण; वाताहात. (गो.)

**दानाध्यक्ष** पु. दानधर्मखात्यावरील मुख्य अंमलदार. [सं.]

**दानाफान** स्त्री. दाणादाण. (व.)

**दानिश** बुद्धी; विवेक; अक्कल.

**दानी** वि. दाता; उदार. (समासात) मोक्ष–जीव–दानी. [सं.]

**दानोडा** पु. अस्ताव्यस्त सांडलेले धान्य. (ना.)

**दान्य** वि. १. दानपात्र. २. (ल.) भिकारी : 'पहिल्या पायरीं पाय दिला, तिथं दान्य भेटला, दान मागूं लागला.' – बदलापूर ८३. [दानीय अप.]

**दाप** पु. १. धाक; दाब : 'पाताळिचे फणिमणी जिंतिले दापें' – नरुस्व २६८. २. अभिमान; गर्व : 'दाप सांडिती दैत्य दारुण' – नरुस्व ११५७. [सं. दर्प]

**दापका** पु. सापळा; पिंजरा. (व.)

**दापकूट** पु. खाचर, गाडी इ. चा सांगाडा, बैठक आखाला जोडणारा मधला लोखंडी, लाकडी खुंट; दाबखीळ.

**दापणी** स्त्री. दटावणी; दपटशा; जरब : 'मला वाघाची दापणी बापाजीची' – लोसामा १ लोगु ४६. (ना.) [सं.दम्]

**दापणे** सक्रि. १. दाबणे; दटावणे. २. नाश करणे; ठार मारणे: 'दापिति अन्योन्य बळें वीर जसें व्याघ्र धेनुकळपातें।' – मोकर्ण ३०.७७. ३. इतर अर्थांसाठी पहा : **दाबणे** [सं.दभ्,दप्]

**दापणे** सक्रि. देवविणे. [सं.दापन]

**दापपर्याय** पु. धमकावणी; दमदाटी : 'आम्ही सर्वाचा म्हणोन निरोप दापपर्यायें आईसाहेबास.... गडावर पाठविले.' – पेद ६.११९. [सं.]

**दापाइता, दापात** पु. वि. निर्दालन करणारा : 'कीं कंदर्पकामदर्पहरणः दापाइते' – मूप्र ५८९. [सं.दृप्]

**दापात** वि. तीक्ष्ण: 'तवं दापातीया धारांचेः सुदर्शन काढिलें डाबेचें' – शिव १०७७. [सं.दृप्]

**दापित** वि. १. शिक्षा दिलेला (मनुष्य). २. कोर्टाने निवाडा, निकाल करून देऊ केलेली (वस्तू, देणे इ.). [सं.]

**दापिता–गा** वि. १. धमकी, जरब देणारा; दटावणारा. २. हट्टी; गर्विष्ठ : 'दापीतेआं देवांचा जगदळ ।' – शिव १५५. [सं.दर्प]

**दापुग** वि. उन्मत्त : 'रगडित समरीं दापुगें दुष्ट वैरी ।' – गरा ४७. [सं.दर्प]

**दाब** पु. १. दडपण; वजन. २. (कागद इ.) दाबून ठेवण्याचे साधन; चाप; ज्यावर दाब घालून दार, छत्री, खिशातील घड्याळ इ.ची उघडझाप नियंत्रित करतात ते खुंटी, खिळा, घोडा, कमान इ.सारखे साधन; दाबखीळ. ३. पायमल्ली; खाली घालणे; रेटणे; दडपणे. ४. दबकावणी; दबावणी; धमकावणी; दटावणी; खडसावणी. ५. धाक; दरारा.

६. रुबाब; दबाबा; दबदबा. ७. पोटावर बांधण्यासाठी केलेली कापडाची पट्टी; अंडवृद्धीचा त्रास असल्यास आवळण्यासाठी केलेला चांदी इ. धातूचा पट्टा. (क्रि. घालणे, बांधणे.). ८. (गंजिफा) दुसऱ्याची तलफ दाबण्याचा एक प्रकार. ९. (शाप.) एका पदार्थाला ढकलले असता, दुसऱ्याचे पहिल्यावर उलट कार्य घडते आणि त्यामुळे दोहोंच्या संलग्न ज्या प्रेरणेंचे कार्य घडूं लागतें ती क्रिया. -यंस्थि २; (इं.) प्रेशर. १०. चेपणी.

स्त्री. (स्त्रिया, देवमूर्ती इ.च्या) कंबरेत घालण्याचा सोने, रुपे इ. धातूचा पट्टा, मेखला : 'मणि खचितां दाब रविद्युती घंटापंक्ति रम्यनादा बरवी।' – मोकृष्ण ३.६. [हिं.;सं.दम-भृ]

**दाबका** पु. भात कुटण्याची तळी.

वि. ठेंगू.

**दाबकाम** न.(मातकाम) माती तयार केल्यावर साच्यात गोळा दाबून आकृती तयार करण्याचे काम.

**दाब(बे)खीळ** स्त्री. १. पहा: **दाब** २. २. गाडीचा आख व आखरी यांना जोडणाऱ्या दोन लोखंडी खिळ्यांपैकी, खुंट्यांपैकी प्रत्येक; (सामा.) पदार्थांमधून जाऊन त्यांना आवळून धरणाऱ्या खुंट्यांपैकी प्रत्येक.

**दाबचे पाणी** वायुमिश्रित पाणी. उदा. सोडावॉटर, लेमोनेड इ. या पेयांमध्ये दाबलेला वायु मिसळलेला असतो : 'उन्हाळ्यांत धरणीमातेवर लोळून दाबचें पाणी पिण्यांत अर्थ नाहीं हें आम्हालापण पटलें.' – महाराष्ट्र मार्च १९४२.

**दाबट** पु. दाभण; एक गवत. (झाडी)

**दाबडणे** सक्रि. सक्त मेहनत करून घेणे; फार राबवून घेणे; ताबडणे.

**दाबडा** पु. कुंकवाचा करंडा. (झाडी)

**दाबण** न. पहा: **दाब** १

**दाबण** न. अतिशय कोवळा फणस; कुयरी. (गो.)

**दाब(भ)ण** पु. न. (सोनारी) बारीक मण्याला भोक पाडण्याचे हत्यार. (गो.)

**दाबणी** स्त्री. दाबण्याची क्रिया.

**दाब(भ)णे** न. दारूच्या उपयोगी पडणारे एक मातीचे भांडे. (गो.)

**दाबणे** सक्रि. १. (एखादा पदार्थ हाताने वगैरे) दडपणे; वजन घालून चेपून ठेवणे. २. धमकावणे; दटावणे; दपटशा देणे; भेडसावणे. ३. (ल.) (एखादी गोष्ट) गुप्त राखणे; दडपून ठेवणे; छपवणे. ४. (गंजिफा) दुसऱ्याच्या तलफेवर दाब घालणे. – शास्त्रीको. ५.गिळंकृत, गट्ट करणे; लुबाडणे. ६. लाच देणे; फितविणे. [सं.दम्]

**दाबदडप** स्त्री. धमकावणी, दटावणी इ. उपायांनी एखाद्याला दडपून टाकण्याचा प्रयत्न.

**दाबदुबारी** स्त्री. हरळी; दूर्वा. (झाडी).

**दाब(बी)दुबी, दाबदूब** स्त्री. १. पहा : **दाबदडप**. २.पहा: **दाब** ८

**दाबदोब** स्त्री. इभ्रत; दाब; सलाबत; रुबाब.

**दाबरोब** क्रिवि. धाकदपटशा देऊन: 'करूनि घेतलियां सार्थकचि आहे।... दाबरोब कायदा राखा म्हणे ।'– दावि ७८३.

**दाबा** पु. पहा : **दाब**. (वा.) ० **देणे** – १. झाकून ठेवणे. २.मालक इ.पासून एखादी वस्तू चोरून, लपवून ठेवणे; चोरणे; लांबविणे.

**दाबाचा प्रेस** काही वस्तू, कागद इ. दाबून ठेवण्यासाठी केलेले दाबणयंत्र.

**दाबाचे कलम** झाडाच्या कलमाचा एक प्रकार. घडवंचीसारख्या उंच वस्तूवर खापरी कुंडी आंत माती भरून ठेवून तींत झाडाची फांदी दाबून बसवितात व फांदीस मातींत मूळ फुटलें म्हणजे तें झाड मोठें वाढवून लावतात असा कलम करण्याचा प्रकार. – कृषी ६८६.

**दाबाडणे** सक्रि. १. (एखादा पदार्थ दुसऱ्या पदार्थाखाली) दाबून, दडपून ठेवणे. २. (पैसा, वस्त्र इ.) उपयोग न करता उगीच संग्रही ठेवणे; दडपून ठेवणे. ३. (एखादी गोष्ट, व्यवहार इ.) छपवणे; दडपणे; दाबून ठेवणे. ४. (चोरलेली वस्तू इ.) लपवून ठेवणे; हाताळणे; लांबवणे. ५. धमकावणे; दटावणे.

**दाबादाब–बी** स्त्री. १. (कागदाचा, कापसाचा गठ्ठा, गाठ इ.)दाबणे, आवळणे. २.(जमीन, गच्ची इ.) ठोकणे, चोपणे, पिटून टणक करणे. ३. (एखादी गोष्ट) गुप्त राखणे, छपविणे, दडपून ठेवणे. ४. धमकावणी; दटावणी. ५. दाबात, धाकात ठेवणे. ६. (दुसऱ्याचे पैसे इ.) गिळंकृत करणे; लुबाडणे. [क.दबादुबि, दाबणे द्वित्व]

**दाबुक** पु. चर्मवाद्य वाजवण्याची काडी: 'दुमदुमा दाबुक हाणती: संसारावरी' – शिव ३२०. [ध्व. धमक]

**दाबोटा साखर** साखरेचा एक प्रकार; दुपेटा साखर.

**दाब्या** वि. १. (हात, तोंड) दाबणारा; लाच देणारा. २. दुसऱ्याची वस्तू पचवणारा. [सं.दभ]

**दाभ** स्त्री. घागऱ्या इ. नी युक्त असलेले स्त्रियांचे कटिभूषण; घागऱ्यांचा करगोटा. (को.)

**दाभ** पु. दर्भ. [गु.; सं.दर्भ]

**दाभण** पु. न. १. गोणपाट इ. शिवण्याची मोठी व जाड सुई. २. तिने घातलेला टाका : 'दाभणांचें गोणटें' – लीचउ १४९.३. पहा : **दाब(भ)ण** [क. दाब्बण]

**दाभणकाठी** वि. १. दाभणाएवढ्या अरुंद किनारीचा (धोतरजोडा इ.). २. दाभणाच्या जाडीच्या (मिशा).

**दाभणकोके** न. स्त्रीसंभोग; रतिसुख. (गो.)

**दाभनळे** न. बैलाच्या गळ्यात घालण्याची गोंड्यांची माळ.

**दाभाड** न. १. जबडा; (विरू.) जांभाड. २. (ल.) कुसू झिजू नये म्हणून त्याला मारलेली लोखंडी पट्टी.

**दाभोटा** पु. घोड्याच्या पायाच्या घोट्यावरील आच्छादन; गुल्फत्राण. [फा.]

**दाभोटा** पु. मोठे पोते; (विशेषत:) साखरेचे पोते. हे दुहेरी व उलटसुलट तोंडे बंद केलेले असते. [सं.दभ]

**दाभोळी लारी** दाभोळ बंदराच्या टाकसाळीत पाडलेले, पूर्वकालीन लारी नावाचे नाणे. – मइसा २१.७९.

**दाम** पु. १. पैसा; रोकड. २. किंमत; मूल्य; मोल. ३. एक जुने तांब्याचे नाणे. – कर्णेश्वर शिलालेख (शके ११०२). ४. द्रव्य; साम, दाम, दंड, भेद यांपैकी शत्रूला धन देऊन वश करण्याचा उपाय; लाच. [सं.द्रम्म]

**दाम** न. १. दावे; दोर. २. फुलांची माळ. [सं.]

**दाम, दवाम** अ. चिरायू; दीर्घायू; चिरंजीव. [अर.]

**दामकाठ** पु. जरीच्या किनारीचा एक प्रकार. (नाशिक) [फा.दामन्]

**दामगा** पु. भातातील एक (जाडीभरडी) जात.

**दामचुंबक, दामजोड-जोड्या** वि. कंजूषपणाने पैसा जोडणारा; कवडीचुंबक.

**दामजड** वि. फार किमतीचे; महाग.

**दामट** स्त्री. (आकाशात ढग इ.आल्याने पडणारी) अंधारी; काळंबन; झापड; मळभ. (राजा.)

**दामटणे** सक्रि. १. (मनुष्य, जनावर इ.ना) पिटाळणे; वेगाने चालायला लावणे; शक्तीबाहेर पळायला लावणे; दापटणे; पादडणे.२. खडकावणे; दणकावणे; धमकावणे; खरडपट्टी काढणे; ताशेरा झाडणे. ३. (एखादी वस्तू, जनावर इ.)वाटेल तशी वापरणे, वागविणे. ४. दुसऱ्याची वस्तू बळेच वापरणे, उपभोगणे. [सं. दम्]

**दामटा-टी** पु. स्त्री. १. थापटून चापट व वाटोळा केलेला पदार्थ. उदा. भाकरी, गोवरी इ. २. (गाय,बैल इ.च्या गळ्यापासून लोंबणारी) पोळी. ३. चपटा पैसा, रुपया. ४. (सामा.) दामटा.[सं.दम्] (वा.) **पोटाची दामटी वळणे** – (उपासमार इ.ने) पोट खपाटीला जाणे.

**दामटीव** वि. १. दामटलेला; वेगाने सोडलेला (घोडा इ.). २. तातडीने, निकडीने पिटाळलेला (जासूद).

**दामणी** स्त्री. स्त्रियांचा बिंदीसारखा एक दागिना. – जनि ६. [सं. दामन्; गु., फा. दामन्]

**दामणी, दामो(मौ)टा** स्त्री. बाभळीच्या शेंगेतील बी : 'दामणीयांचे दाम करा'-लीचपू ७८; 'बाबुळेचेयां सेंगांचे दामौटे यांचे दाम करूं' – लीचपू ७८. [सं.दामवत्]

**दामणे** उक्रि. १. दाबणे; चेपणे; चेंबटणे. २. ठोकणे; ठासणे; मारणे. (गो.)

**दामणे** सक्रि. खुंट्यांशी बांधून ठेवणे; डांबणे. [सं.दामन्]

**दामदस्त** वि. एकूण एक.

**दामदुक(का)ळ** पु. पैशाचा, रोकडीचा तुटवडा.

**दामदुपटीचा नियम** धनकोने ऋणकोपासून कोणत्याही एका वेळी मुद्दलापेक्षा अधिक व्याज न घेण्याबद्दलचा हिंदू धर्मशास्त्राचा नियम.

**दामदुप्पट-दुसा** स्त्री. व्याजासहित झालेली मूळ मुद्दलाच्या दुप्पट रक्कम.

**दामदौलत** स्त्री. भरभराट; वैभव; ऐश्वर्य; संपन्नता.

**दामनगीर** वि. फिर्यादी; दावा लावणारा; दावेदार. (मूळ अर्थ-वस्त्राचा पदर, काठ धरून ठेवणारा). [फा.अर.दामन् + गीर]

**दामा** स्त्री. कारबाईन, कडाबीन, कर्वली बंदूक.

**दामाजीपंत, दामोदर** पु. (सांकेतिक) पैसा; रोकड.

**दामाशाई-ही** स्त्री. १. (पूर्वी कोणी दामसाह नावाचा व्यापारी होता. त्याने आपला बुडितकाळ आला असता आपल्या सावकारांना परत करण्याच्या कर्जाची प्रमाणशीर वाटणी केली. त्यावरून) दिवाळखोराचा जमा होणारा पैसा धनकोंच्या रकमांच्या प्रमाणात वाटणे; बुडत्या कुळाच्या सावकारांना त्यांनी दिलेल्या कर्जाच्या प्रमाणात कुळाचा मिळणारा पैसा; प्रमाणशीर वाटणी. [हिं. दामसाह]

**दामी** स्त्री. कर; सारा; कराची आकारणी. [हिं.]

**दामु(मो)खा, दामोका-टी** पु. स्त्री. पहा : **दामणी, दामोटा**

**दामेंडा, दाडयंडा** पु. विवाहगीताचा प्रकार. (अहि.)

**दामोका** पु. पैसा. – शर.

**दामोदर** न. ऐश्वर्यसंपन्न महाल, दालन ; हवेली; इमारत; मंदिर: 'तंव देखिलें महाद्वार जेथ एकवीस खनांचें दामोदर ।' – शिव ३३७.
वि. श्रीमंत; धनाढ्य; द्रव्यसंपन्न; गर्भश्रीमंत.

**दामॉ-कॉ** पु. अव . खेकड्याचे पाय. (गो.)

**दाय** पु. वारसांना वाटून देण्याची मिळकत, जिंदगी; पितृधन; (एखाद्या) वारसाचा हिस्सा, वाटा. [सं.]

**दाय** पु. पेशा; धंदा.

**दाय** स्त्री. भात वाढण्याची सपाट, उथळ टवळ्याची पळी. (गो., कु.)

**दाय** स्त्री. १. डाळ. (खा.,व.) २. डाळीचे वरण.

**दायक** वि. १. देणारा. (समासात) सुख-दुःख इ. दायक. २. उदार; दाता; दानशूर. ३. दायाद. [सं.]

**दायगंडेरी-गडोर्ली** स्त्री. तीळ घालून फोडणी देऊन केलेली डाळीची भाजी. (अहि.)

**दायजी, दायाद** वि. पु. १. वारस; पितृधनात हिश्शाचा हक्कदार; वाटेकरी. २. (ल.) अशौचादी अधिकार बाळगणारा जवळचा नातलग; भाऊबंद: 'रेव धरून झाल्यार दायजी, मित्र, सोयरे वगैरे मंडळी... नजराणा देतात.' – मसाप ४.४.२५४. [सं.दायाद]

**दायठा** पु. बरड; आधीच्या सालीं भाजलेल्या राबाच्या जागीं बीं पेरून राब तयार केलेली जागा. – बदलापूर २९४. (को.)

**दायते** न. देणे; देव, पिशाच्च, भिकारी, नोकरचाकर इ.ना दरवर्षी देण्याचे वस्त्र, पैसा इ.

**दायभाग, दायविभाग** पु. १. मृताच्या मालमत्तेची वारसदारांमध्ये वाटणी, विभागणी. २. वडिलोपार्जित मिळकतीतील हिस्सा. [सं.]

**दायरा** स्त्री. पु. १. एक प्रकारची टिमकी; खंजिरी; डफ. २. मुसलमानांची स्मशानभूमी. [अर.]

**दाया** पु. मिळकतीवरील हक्क. [सं.दाय]

**दायाद** पु. १. वारसदार; दाईज. २. (ल.) पुत्र : 'कृपाचि जननी तुझी सकल जीव दायाद या ।' – केका ९७.

**दायाधिकारी** पु. सामाईक कुटुंबाच्या मिळकतीत हिस्सा विभागून मागण्याचा अधिकार असलेली व्यक्ती. [सं.]

**दायित्व** न. भार; जबाबदारी. [सं.दा]

**दायी** पहा : **दायक १** [सं.दायिन्]

**दार** न. १. दरवाजा; (घर इ.मध्ये)प्रवेश करण्याचा रस्ता. २.कवाड; दरवाजा बंद करण्यासाठी केलेले फळी, तट्टया इ.चे झडप. ३. (अक्षरशः व ल.) निघण्याची, बाहेर जाण्याची वाट; दारे; निकास. ४. साधन; रीत. [सं.द्वार] (वा.) **दाराकडे जाणे** – (बायकी) लघवीला जाणे. (ना.) **दारात हत्ती झुलत असणे** – एखाद्याची वैभवसंपन्न स्थिती असणे. **दारी जाणे, बसणे, लागणे** – (बायकी) शौचाला, परसाकडे जाणे इ. **दारी, दारावर जाणे** – दुखवटा घेऊन जाणे; मृत मनुष्याच्या आप्तांचा समाचार घेण्यास जाणे.

**दार** वि. ऐपत असणारा; श्रीमंत. [फा.]

**दार** (एखादी वस्तू) धारण करणारा, बाळगणारा, नेणारा इ. अर्थाचा फारशी

भाषेतील प्रत्यय. उदा. जमादार, फौजदार इ. [फा.]

**दारकस** स्त्री. न. दाराच्या चौकटीची बाही, कुसू.

**दारकसा** स्त्री. भाद्रपद महिन्यात गौरीप्रीत्यर्थ दाराच्या बाजूंवर काढतात त्या आकृतींपैकी प्रत्येक.

**दारकारू** पु. द्वारपाल : 'मंत्री, पुरोहित, सेनापति, युवराजा, दारकारू...' -पंच ३.७.

**दारकिंड** न. माशाला भोसकण्याचे एक हत्यार. (ठाकरी)

**दारकोंड-डी** स्त्री. १. आपले पैसे द्यावे म्हणून धनकोने ऋणकोला, त्याच्या कुटुंबियांना इतरांशी व्यवहार करण्याबाबत केलेली आडकाठी. २. कुचंबणा; कोंडमारा (व.); प्रवेशबंदी.

**दारखंडे** न. मिठागर इ. च्या बांधावर ठेवलेले दार, मार्ग.

**दारचिना-शिणा** पु. एक प्रकारचे दंतमंजन, दातवण. [सं.दंतशाण]

**दारठा, दाठ्ठा** पु. दरवाजा; दारवण. (व.)

**दारढवळणे** न. लग्नसमारंभात नवरानवरी घरात शिरताना स्त्रिया त्यांना थांबवतात व गाणे गातात तो प्रकार.

**दारण** स्त्री. दरवाजा; दरवाजाची चौकट. (खा.)

**दार(रु)णा** पु.उंदरी; चाई; कफवातामुळे केस येण्याची जागा कठीण होऊन खाजते व ती रुक्ष होऊन त्या ठिकाणी चट्टे, भेगा पडतात तो विकार. - योर २.४२८. [सं.दारुणा]

**दारधरणी-णे** न. स्त्री. लग्नविधीतील एक शिष्टाचार. यात लग्नाला निघतेवेळी नवऱ्या -मुलाची बहीण दारात उभी राहून 'तुला होईल ती मुलगी माझ्या मुलाला दिली पाहिजे' असे मागणे मागते.

**दारफळणी, दारफळी** स्त्री. १. घरात कोणी राहण्यासाठी न उरल्याने घर ओसाड पडणे; निर्वंश होणे. २. (ल.) दिवाळे वाजणे; सत्यानाश.

**दारबंद** पु. दरवाजावरील मातीचा गलथा, पुढे आलेला भाग. (ना.)

**दारबाकी** स्त्री. ऐपतदाराकडील शिल्लक येणे : 'त्यापैकीं दारबाकी असेल ते रुजू करून सरकारांत देतील.' - समारो १.२७२.

**दारभाजी** स्त्री.एक पालेभाजी; माठ.

**दारमदार** पु. १. ठराव; करारमदार. २. तह; सलोखा: 'स्वामीसी कोणेही प्रकारें बिघाड न करावा व होऊं न द्यावा, दारमदाराने चालावें.'- मइसा १.१९. [फा.]

**दारव(वं)टा-ठा, दारवद, दारिवठा** पु. १. उंबरठा; उंबरठ्याजवळची जमीन : 'राहुनि दारिवठ्यांत हांका मारी दुरोनि राजाला ।' - श्रियाळचरित्र. २. दारावरचा माथा; कपाळपट्टी. ३. किल्ला, गाव इ. चा दरवाजा, वेस : 'कीं मोक्षगडाचा दारवटा । उघडला तो ।'-ऋ ५९. [सं.द्वार+वंठ]

**दारवठा(ठे) कार-करु** वि. १. द्वारपाल; द्वाररक्षक: 'आपण जाला दारवठेकारु ।' - उषा ८६२. २. (ल.) उंबरठे झिजविणारा; (एखाद्याच्या घरी) खेपा घालणारा. - शर.

**दारवर** स्त्री. मरण पावलेल्या व्यक्तीच्या घरी सांत्वनासाठीची भेट. (अहि.)

**दारवंट** पु. १. उंबरठा; वेस. २. दरवाजा: 'सोलौनि किजेति दाखड त्रिशाक ।'-शिव ७६५. (वा.) ० **बांधणे** - रखवाली करणे.

**दारवान** पु. १. पहारेकरी. २. घरवाला. [फा.]

**दारवोटा** पु. वरात. -स्त्रीगीत ६०.

**दारशिणा** (व.) पहा : **दारचिना**

**दारशीक, दारुस्ती** न. पदार्थ इ. ठेवण्यासाठी दाराच्या चौकटीवर बसवलेली फळी; उतरला. (राजा.)

**दारशीग** स्त्री. दिवा ठेवता यावा म्हणून दारकसाला ठोकलेली खुंटी, खिळा इ.

**दारसंका** दरवाजाची कड, बाजू : 'सर्वज्ञ दोन्ही दारसंका दोन्ही श्रीकरीं धरूनि एकु श्रीचरण वक्षेस्थळावरि ठेविति ।' - पूजावसर.

**दारसूणा** पु. दारातील कुत्रा; (ल.) लाचार : 'हिडहिडा : दारसूणा...'- कला८. [सं. द्वार + श्वान]

**दारा-र** स्त्री. बायको; पत्नी. [सं.दारा]

**दाराटी** स्त्री. दरोडा : 'इंद्रियें घेती विषयाची दाराटी ।' - भाए ५०८. [सं.दृ]

**दाराठी** स्त्री. लहान दार. [सं.द्वार]

**दारिद्र्य** न. गरिबी; दरिद्रता; निर्धनता. [सं.]

**दारिद्र्यरेषा** स्त्री. वेळोवेळी सरकारने ठरवलेली दरडोई उत्पन्नाची किमान मर्यादा.

**दारी** स्त्री. (तिरस्कारार्थी) पत्नी; बायको. (व.) [हिं.]

**दारु** न. लाकूड : 'जळीं तुंबिका दारु तैसा तरंगे ।'-मुरायुद्ध ३४. [सं.]

**दारुक** पु. सारथी. [सं.]

**दारुडा-ड्या, दारूबाज** वि. दारुचे व्यसन असणारा.

**दारुण** वि. १. घोर; भयंकर (युद्ध इ.). २. कठोर; मर्मभेदी; रागाचे (भाषण). ३. क्रूर; हिंस्र; रानवट (मनुष्य). ४. जालीम; कडक; जबरदस्त. (सामा.) भयंकर; कठीण; दुःसह. [सं.]

**दारुण नक्षत्र** मूळ, आश्लेषा, आर्द्रा व ज्येष्ठा या नक्षत्रांपैकी प्रत्येक.

**दारुयंत्र, दारुकायंत्र** न. लाकडी बाहुली : 'जैसें चेष्टे सूत्राधीन । दारुयंत्र । - ज्ञा १.८१.

**दारुहळद** स्त्री. एक औषधी वनस्पती. हिच्या लाकडापासून रसांजन नांवाचें औषध व मुळ्यांपासून पिवळा रंग करतात. [सं.दारुहरिद्रा]

**दारू** स्त्री. गंधक, सोरा व कोळसा यांचे ठरावीक प्रमाणात केलेले ज्वालाग्राही व स्फोटक मिश्रण; बारूत. दारू बंदुकी, फटाकडा, सुरुंग इ.त ठासतात. [फा.]

**दारू** स्त्री. १. मद्य; एक प्रकारचे मादक पेय. २. औषध. [फा.]

**दारूकाम** न. १.आतषबाजी; अग्निक्रीडा. २. आतषबाजीची सामग्री; दारू आत घालून बनवलेले नळे, चंद्रज्योती, बाण इ. वस्तू.

**दारूखाना** पु. १. दारूचे कोठार. २. दारू करण्याचा कारखाना. ३. दारूकाम; आतषबाजी: 'दारूखाना सुटला रात्रीं नऊ वाजतांनीं ।' - गापो ७४. ४. पिण्याच्या दारूचा गुत्ता, पिठा. [फा.]

**दारूगोळा** पु. युद्धात उपयोगी पडणारे (दारू, तोफेचे गोळे इ.) सामान.

**दारूचा डल्ला** दारू हातात घेऊन प्रतिपक्षावर पेटवून फेकण्यासाठी बाळगलेला, केलेला गोळा.

**दारूचा बाण** एक शस्त्रविशेष. याला एक मोठी व पोकळ मूठ असून तीत दारू भरलेली असते. पुढे तलवारीसारखे तीक्ष्ण पाते असते. मुठींतील दारू पेटविल्यानें पातें सारखें हालतें व आसपासचे लोक कापले जातात. - नागपूर म्युझियम. (ना.)

**दारूचे फूल** कडक, निर्भेळ, गाळलेली दारू.

**दारूफुल्सरा** पु. फुलचेरी (पाँडेचेरी) येथील फिरंग्यांकडील मद्य; शराब; गाळलेली दारू : 'फिरंगी गोरे व किरिस्ताव जदीद... यांस दारूफुल्सरा नेहमी पाहिजे.' - वाडसमा २.३००.

**दारे** न. १. पाटाचे पाणी आत नेण्यासाठी बाग,मळा इ.च्या कुंपणाला पाडलेले दार, छिद्र, मार्ग. २. पाटाचे पाणी बाहेर, दुसरीकडे नेण्यासाठी त्याच्या बांधाला ठेवलेले दार. ३. भट्टीचे अग्निद्वार. ४. शौचकूपाचे मागील दार. ५. दरवाज्यातील दिंडी. ६. (सामा.) बाहेर जाण्याचा लहानसा मार्ग, दार, तोंड.

**दारेकरी, दारोळ्या** वि. पिकाला, बागेला पाणी देण्यासाठी (कुंपणाचे, पाटाचे) दारे उघडणारा व बंद करणारा.

**दारोगा** पु. पहा: **दरोगा**

**दारोगगी, दारोगी** स्त्री. दारोग्याचे काम; आधिपत्य : 'नजीबखानास तोफखान्याची दारोगी सांगावी.' -मइसा ६.४८३.

**दारोटा–ठा** पहा: **दारवठा**

**दारोदार** क्रिवि. अनेकांच्या घरी जाऊन; घरोघर.

**दारोंबी** स्त्री. डाळिंब.(झाडी) [सं.दाडिम]

**दार्ढ्य** न. १. दृढता; बळकटपणा; कठीणपणा. २. घनता. ३. खंबीरपणा; पक्केपणा; निश्चलता; स्थैर्य. [सं.]

**दार्व(र्वा)म्ल** न. (रसा.) लाकडाच्या निर्जल ऊर्ध्वपातनापासून तयार केलेले अम्ल; ॲसेटिक ॲसिड. [सं.]

**दार्शनिक** पु. १. दर्शनशास्त्रज्ञ. २. गॅझेटियर.
वि. दर्शनविषयक; दर्शनासंबंधी. [सं.]

**दार्ष्टान्तिक** वि. १. दृष्टान्त, उपमा इ.चा विषय; दृष्टान्त देऊन स्पष्ट केलेला. २. दृष्टान्तोपयोगी; दृष्टान्तात योजण्याला योग्य (कल्पना, अलंकार इ.). ३. दृष्टान्त, उपमा इ. संबंधीचा. [सं.]

**दाल** पु. एक किंवा दोन बोटे रुंदीचा नक्षीदार विणलेला सुती किंवा रेशमी काठ, किनार, झालर, फीत; मगजी. यात कधी जरही असते : 'दाल सुती गज सुमार.' -पेद १८.१७३. [फा. दोआल]

**दाल** स्त्री. चामड्याचा कमरपट्टा; रुंद पट्टा. [फा.दोआल]

**दालचिनी** स्त्री. एक झाड व त्याची सुकवलेली साल. सालीचा औषधात व मसाल्यात उपयोग करतात. [सं.दारुचिनी; हिं.]

**दालच्या** स्त्री. अव. तुरीची व हरभऱ्याची डाळ आणि मांस यापासून तयार केलेले एक प्रकारचें सांबारें. - गृशि २.५०.

**दालद** न. मासे मारण्याचा धंदा, व्यवसाय. (को.)[सं.जाल;फा. दोआल]

**दालदाचे जाळे** दालदी लोक समुद्रात जी मोठी जाळी लावतात त्यांपैकी पाच-सहा फूट रुंद व ऐंशी फूट लांब असे जाळे. हे पाच-सहा जाळी एकत्र करून लावतात.

**दालदी** पु. कोळी, दर्यावर्दी, नावाडी अशी जात. हे बहुधा मुसलमान असतात. (को.)
वि. दालदासंबंधी; मासे धरण्याच्या उपयोगाची (होडी, मचवा इ.).

**दाल(ला)न** न. घर, वाडा इ.तील एकसारखा लांब असा कित्येक खणांचा भाग; मोठी खोली; दिवाणखाना; सभामंडप; सोपा. [फा.दालान]

**दालन** न. उसाच्या चरकाचे वरचे तकट. - शर.

**दाली** स्त्री. १.ज्यात तलवार अडकवतात तो कमरपट्टा; पडदळे. २. (ल.) दुसऱ्याला आव्हान देण्यासाठी धारण करण्याचे चिन्ह; शिपायाचे एक चिन्ह. (क्रि. बांधणे, धरणे): 'धन्यावर दाली धरून क्रिया सोडून आला चालून...।' - ऐपो ३३१.[सं.दाल] (वा.) ० **बांधणे** – १. (एखाद्याला) जिंकण्यासाठी अभिमानाने सज्ज होणे: 'बांधोनिया पुण्यावर कंनर चढती दाली ।' - ऐपो २३१. २. जहागीर देणे. ३. वरिष्ठाने कनिष्ठाच्या कमरेला पडदळासह तलवार बांधणे. हा एक प्रकारचा सन्मान मानला जात असे. ० **सोडणे** – शस्त्र टाकून शरणागती पत्करणे.

**दालीबंद** वि. १. दालीला तलवार लटकावून सज्ज झालेला. २. दाली हे आव्हानसूचक चिन्ह धारण केलेला. [सं. दाल+फा.बंद]

**दाले** न. संबळाच्या किंवा एकत्र जोडलेल्या दोन नौबतींच्या दोन नगाऱ्यांपैकी प्रत्येक.

**दाले** न. पारडे; टोपले.(गो.)

**दाव** न. १. फणसाचा देठ, डेख. संख्यावाचक शब्दाला जोडून समासात उपयोग. उदा. दुदाव, तिदाव इ. (राजा.) २. अळवाच्या पानाचा देठ. (गो.) ३. वेळू. (गो.) ४. बारीक मुळी.(गो.) [सं.दामन्]

**दावकू(खू)ल** न. पंजा. (गो.)

**दावगनी** स्त्री. गुरे बांधण्याचा खांब. पहा : **१ दावण**

**दावचक्र** न. बैल फिरू लागल्यावर वरच्या बाजूला फिरणारे, खाली दात असलेले (बिडाच्या पाणरहाटातील) बिडाचे चक्र.

**दावचे** अक्रि. तकतकणे; दिसणे; दर्शविणे; खुलून, उठून दिसणे. (गो.)

**दावडा** पु. रहाटावरील गाडग्यांची माळ ज्यावरून फिरते ते लोखंडी चक्र.

**दावण–णी–न** स्त्री. १. अनेक दावी ज्याला जागोजागी बांधलेली आहेत असा (गुरे बांधण्याचा) लांब दोर. २. (ल.) दाव्यांनी बांधलेल्या जनावरांची ओळ, रांग; कैदी, गुन्हेगार इ.ची ओळ; माणसांची ओळ, रांग. [सं.दामन-नी; क. दावणि] (वा.) ० **देणे** – (अनेक चोर, भामटे इ.ची) ओळच्या ओळ एकाच वेळी ठार मारणे; रांगेत उभे करून कत्तल करणे. **दावणीचे खुंटे उपटणे** – गोठा रिकामा होणे; गोठ्यात जनावर न उरणे.

**दावण** स्त्री. १. (अंगरखा इ.चा) वर्तुळाकार घोळ, घेर; फेर : 'श्रीमंतांच्या झग्याची दावण मागले पायरीवर पडली.'- हब २६. २. डोंगराची बाजू, कड. [फा.दामन्]

**दावण(न)गीर** पहा: **दामनगीर** [फा.]

**दावण(न)मलगी** स्त्री. दवणशेवंतीचे झाड. - शास्त्रीको.

**दावणा** वि. १. दर्शनीय; दिसायला चांगला: '...साधका हाचि दावणा। मिरवणा आधीं।' - गीता १.११३३. २. दाखविणारा. - शर.

**दावणी** वि. दावणीचे; दावणीतील (बैल इ.).

**दावणे** उक्रि. दाखवणे; दर्शवणे: 'हो कांहीं, हांका हय, घडल्यासि वधीन शांतवन, दावा ।' – मोभीष्म १०.७९. [सं.दर्शय्] (वा.) **दावू निघणे** – दिमाखाने, थाटामाटाने दाखविण्यास लागणे.

**दावणे** अक्रि. मनात बाळगणे, ठेवणे, रक्षण करणे. [सं. दे]

**दावत** स्त्री. मेजवानी; पाहुणचार; मैफल. [हिं.]

**दावल** स्त्री. १. (एखाद्या गोष्टीचे केलेले) ढोंग; बतावणी. (क्रि. दाखवणे). २. परीक्षा; झळक.

**दावलामोरस** स्त्री. समुद्रकाठी होणारी एक खारट पालेभाजी. ही घोळीसारखी असते. – वगु ४.१८.

**दावली** स्त्री. गवत खुरपून, तळसून काढण्याचे हत्यार; खुरपे. [फा.दाव्]

**दावली** स्त्री. प्रकटीकरण; दर्शन : 'मग ते माया सूत्रलाघवीं । नाना ब्रह्मांडीची दावली दाखवी' – ऋम ६१२. [सं.दर्शय]

**दावली** स्त्री. वासरू बांधायचे लहान दावे.

**दावली–ल्या** वि. हूड; आडदांड; बालिश; बेशिस्त. (अहि.)

**दावले** न. १. पितळेची उथळ पळी, डाव. २. गळसरीत मध्यभागी गोवतात तो सोन्याचा, मोत्याचा खोलगट दागिना.

**दावा** पु. १. द्वेष; वैर; मत्सर; शत्रुत्व. (क्रि. धरणे, लावणे इ.). २. भांडण; तंटा; कज्जा. ३. मालकी; न्याय्य अधिकार, हक्क. ४. (कायदा) न्याय मिळवण्यासाठी, हक्क प्रस्थापित करण्यासाठी दिवाणी कोर्टात चालविलेला खटला; कज्जा; फिर्याद. (क्रि. लावणे, चालणे इ.). ५. दुसऱ्याच्या विरोधामुळे एखाद्या गोष्टीवर स्वतःची मालकी सांगणे. ६. मागणी: 'राजे आपलें इमान राखून ऐवज अदा करितील तरी व्याजाचा दावा करणार नाही.'– पया ४००. ७. हल्ला : 'बळकट झालें म्हणजे... दावे दरवडे करावे.' – मराआ २२. ८. सापाचा डंख. [अर. दआवा; गु.दाओ] (वा.) ० **उगवणे, घेणे** – एखाद्याने केलेल्या अपकाराचा सूड उगवणे; उट्टे काढणे. ० **गाणे, सांगणे** – सूड उगवेन अशी धमकी देणे. ० **तोडणे** – कज्जा मिटवणे; (हक्कासंबंधीच्या भांडणाचा) निकाल लावणे. ० **साधणे** – यशस्वी रीतीने सूड उगवणे. **दाव्याखाली पडणे** – शत्रुत्व, वैमनस्य लागणे. **दुस्मान, उभा दावा** – कट्टे वैर; हाडवैर.

**दावा** पु. (सोनारी) मासोळीचा ठसा. [इं. डाय]

**दावादरफडा** पु. आरडाओरडा करून धमकावणे; दपटशा देणे; खडसावणे; चडफडाट; दंडेलीचे, उर्मटपणाचे बोलणे. (क्रि. करणे, मांडणे.) (कर्माची षष्ठी योजताना गाणे या धातूचा प्रयोग.)

**दावानल,दावाग्नी** पु. अरण्य जाळीत सुटलेला अग्नी; वणवा : 'तृण नाहीं तेथें पडला दावाग्नि । जाय तो विझोनि आपसया।' – तुगा ३४२४. [सं.]

**दावाळू** न. एक प्रकारचे पांढरे अळू. ह्याचे मूळ अनेक मुळखंडांचे बनलेले असते. हे पाण्याच्या खोबणीत, खाचणी–घळींतून लावतात.

**दावे** न. गुराच्या गळ्याला अडकवून खुंट्याला, दावणीला बांधतात तो दोर. [सं.दामन] (वा.) **दाव्यास दावे असणे** – (गाय, म्हैस इ.ची)संतती न विस्तारणे; एकेरी असणे. **दाव्यास दावे देणे** – गाय, म्हैस इ. अशक्त झाल्यामुळे किंवा इतर कारणामुळे एखाद्याला पोसण्यासाठी दिली असताना त्याने तिचे (वेत) वासरू मात्र धन्याला देणे (व या अटीवर तिचे दूध, तूप इ.चा उपभोग घेणे).

**दावे** न. १. कच्चा फणस. (झाडावर असलेल्या फणसासंबंधीच हा शब्द योजतात.). २. अळवाच्या गड्ड्याला, कंदाला फुटलेले मुळखंड.

**दावेकरी–खोर–दारी–दार–दुश्मन** वि. १.मत्सर, द्वेष, शत्रुत्व करणारा; वैरी. २. आपल्या हक्काची मागणी करणारा; हक्क सांगणारा. ३. धनको. ४. पूर्वीच्या काळी फिर्यादीने गावपंचायतीपुढे फिर्याद केली व पंचायतीने जर त्याचे भांडण मिटवले नाही व त्या फिर्यादीला सरकारात अपील करण्याची ताकद नसली तर तो शेजारच्या गावी जाऊन राही व तेथून स्वतःच्या गावात लुटालूट करीत असे. तशा प्रकारचा मनुष्य. [फा. दआवा + दार]

**दावेफणस** पु. फणसाची एक जात; ह्याच्या मुळाच्या फांगाड्यांना फळे येतात.

**दाशा** पु. १.पातळ भिंतीला मजबुती आणण्यासाठी मधूनमधून तिच्यात जी आडवी किंवा कैचीप्रमाणे लहान लाकडे चिणतात, त्यांपैकी प्रत्येक. २. छपराचे वासे भिंतीवर ज्या आडव्या पाखाडीवर, तुळईवर टेकतात त्या तुळईला आधार म्हणून भिंतीच्या गर्भात जे खांब रोवलेले असतात, त्यांपैकी प्रत्येक. [हिं.दासा]

**दाशाळ, दासवंती** पु. स्त्री. जास्वंद.(बे.) [फा.]

**दाष्ट, दाष्टिक** वि. कठोर बोलण्याने दुसऱ्याला जाचण्याचा स्वभाव असणारा (मनुष्य); खाष्ट; दुष्ट: पहा : **द्राष्ट** : 'लोकीं बहु दाष्टिक ही ऐसी न सुनेसि कंप दे सासु ।' – मोअनु ७.५३.

**दास** पु. १. हलकी कामे करण्यासाठी ठेवलेला चाकर, नोकर; सेवक; गुलाम. (समासात) गृहदास इ. २. गुलाम; दासीपुत्र. हिंदू धर्मशास्त्राप्रमाणे याचे १५ प्रकार आहेत. ३. शूद्राच्या नावापुढे लावण्याचे उपपद. ४. चौथ्या, शूद्र वर्णाचा मनुष्य. ५. (देवतेचा दास, सेवेकरी यावरून) साधू; संत; भगवद्भक्त; देवाचा उपासक: 'मऊ मेणाहूनि आम्ही विष्णुदास।' –तुगा २१०८. ६. रानटी, असंस्कृत, अनार्य माणूस. [सं.]

**दास, दासरी** पु. दक्षिण हिंदुस्थानातील एक विशिष्ट भिक्षेकरी; हा विष्णूचा उपासक असतो.

**दास, दासट–टे–ठा** वि. दाहक; नाशकारक; कष्टकारक: 'बोल हतिये राहूनि तिखट । दिसती अग्निपरिस दासठ ।' – ज्ञा ११.४६३; 'उजालु अधिकाधिक बहुवसु । धडाडितु असे अतिदासु ।'– ज्ञा ११.२९८. [सं.दह]

**दासघडा** पु. मिरवणुकीत काही बायका डोक्यावर घडा घेतात तो प्रकार : 'माझ्या मुलाच्या लग्नांत दासघडा चढणार आहे तो तुझ्याच डोक्यावर'– ज्योत्स्ना, ऑगस्ट १९३८.पृ.२५४.

**दासट(टे)पण** न. १. दाहकपणा. २. उद्धटपणा.

**दासपणाची शिक्षा** (कायदा) सक्तमजुरीच्या कैदेची शिक्षा.

**दासबगल** गुलामासारखे मजुरीकाम.

**दासरी** स्त्री. १. दासी. २.कुणबीण.– ख्रिपु.
वि. कुंकू विकणारी. (व.)

**दास(सि)रू** न.१. दास; कमी प्रतीचा सेवक. २. जोत्यावर खडांगाऐवजी बसवला जाणारा दगड : '..तें दासिरूं हि कीं तया । समान होय ।' – ज्ञा १८.१४०३. (बे.) [सं.दासी,दासेर]

**दासा** पु. ओटा; चबुतरा.

**दासी** स्त्री. १. सेविका; चाकरी करणारी स्त्री; बटीक; गुलाम. २. शूद्राची स्त्री; कुळंबीण. ३. रखेली; नाटकशाळा; राख: 'मल्हाररावाची दासी

बोलली दिनभर बसला डेऱ्यांत ।' -ऐपो ३२४. [सं.]

**दासीपुत्र** पु. १. दासीपासून, रखेलीपासून झालेला मुलगा; कडू संतती; अनौरस मुलगा. २. वेश्यापुत्र. [सं.]

**दासीयोग** पु. अनौरस स्त्रीशी संबंध; वेश्यागमन : 'शूद्रस्त्रीसी संग । नित्य असे दासीयोग ।' - गुच २८.१३. [सं.]

**दासेरक** न. उंटाचे पिल्लू.- सारुह ३.४७. [सं.]

**दास्त** स्त्री. बरदास्त; काळजीपूर्वक रक्षण; निगा; शुश्रूषा. (क्रि.करणे, राखणे, ठेवणे.) : 'जखमांची दास्त लश्करांत न होय, म्हणून बंकापुरी पाठविले आहेत.' - ऐलेसं ६.२८३२. [फा.दाश्त]

**दास्तन** स्त्री. गोष्ट; कथा; मजकूर. [फा.]

**दास्तान** न. १. धान्य इ. साठवण्याची क्रिया; साठवणूक: 'जिन्नस फरोस्त करणें, जर किमतीस फारच अजमासे तोटा येऊं लागल्यास दास्तान करून ठेवणें.'- मइसा १२.१३३. २. धान्य इ. चा साठा; गल्ला; निधी: 'सरकारचें दास्तानापैकीं तूर्त गोळे काय फर्म्यास येतील हे द्यावयाची आज्ञा झाली पाहिजे.' - ऐलेसं १२.६२४४. ३. धान्याचे कोठार; कोठी : 'नख्त नाणें व गल्लेचें दास्तान वगैरा जिन्नस.' - चित्रगुप्त ३५. ४. (बंदरावरील) मालाची वखार; गोदाम; जहाजावरील कोठी, माल भरण्याची जागा. ५. जहाजावरील माल, ओझे. ६. पहा : **दास्त**. ७. गाठोडे. - पया २८३. [फा.दाश्तनं]

**दास्ताना** पु. काठी खेळताना हातावर मार बसू नये म्हणून मनगटापासून कोपरापर्यंत बांधण्याचा चामड्याचा पट्टा. पूर्वी हा पट्टा लोखंडी असे परंतु तरवारीऐवजी काठ्यांचा उपयोग होऊं लागल्यामुळे चामड्याचा पट्टा प्रचारांत आला.' - संव्या ६५. [फा.दाश्तन्]

**दास्य** न. सेवाचाकरी; नोकरी; गुलामगिरी. [सं.]

**दास्यभक्ती** स्त्री. भक्ती करण्याच्या नऊ प्रकारांपैकी सेवा हा सातवा प्रकार.

**दास्त्री** पु. बहुरूप्यांतील एक प्रकार.
वि. (ल.)निर्लज्ज; हलकट. [सं.दास; क. दासरी]

**दाह** पु. १. जळण्याची, जाळण्याची क्रिया; दहन; जाळणे. २. रोगजन्य शारीरिक उष्णता; ताप; तलखी; जळजळ.३.तीक्ष्ण व उष्ण मद्य प्राशन करण्याने होणारा, उष्णता उत्पन्न करणारा रोग. - योर १.७१४. ४.(ल.) संताप. ५. आग; भडका. [सं.]

**दाहक** पु. अग्नी; विस्तव.
वि. जाळणारा; दहन करणारा. [सं.]

**दाहजाळ** पु. उन्हाच्या झळीमुळे, प्रखरतेमुळे होणारा शरीराचा दाह; जळजळ; आग. [सं.दाह + म. जाळ]

**दाहट** वि. १. धीट; धाडसी. २.चपळ; तल्लख; तरतरीत.

**दाहणे** उक्रि. जाळणे. [सं.दह]

**दाहनी** स्त्री. (रसा.) भाजण्याचा चमचा.

**दाहिजा** पु. १. दहा जणांची, विशेषत: दहा शिपायांची टोळी, समूह. २. कुळारग गावात कुळांच्या सत्तेखाली नसलेली खोताच्या ताब्यातील जमीन; सार्वजनिक जमीन. (राजा.) ३. दहा माणसांचे कुटुंब; मोठे कुटुंब.

**दाही** अ. कोणत्याही रकमेला दहाने गुणताना योजावयाचा शब्द. उदा. चारदाही चाळीस.

**दाही** स्त्री. डाव; हार: 'गोसाविया खेळतां जीयावरि दाही ये तेयाचिए पाठीवरी अरुहण करीतिः ' - लीच १.३३.

**दाहुडणे** अक्रि. आटोपणे; संपणे; निरोप देणे: 'त्यावरी दरबार दाहुडला.'- पेद ११.१२. [फा.]

**दाहोतरा, दाहोत्रा** पु. १. दरसाल दरशेकडा दहा हा व्याजाचा दर. २. केळी, नारळ इ. जिन्नस विकताना दर शंभरामागे दहा जिन्नस वर देण्याचा विक्रीचा प्रकार.

**दाह्य** वि. १. पेट घेणारे; ज्वालाग्राही. २. जाळण्यास योग्य; दहनीय. [सं.]

**दाह्या** पु. जिन्याखालील जागेत केलेली लहान खोली. (ना.,चांदा)

**दाळ** पहा: **डाळ**

**दाळ** पु. एकावर एक लावून, रचून ठेवलेल्या वस्तूंचा समुदाय; चळत.
दाळचे. (गो.) पहा: **डाळणे**

**दा(डा)ळकण-चुरी** पु.स्त्री. डाळीचे कण, चूर.

**दाळकांड** पु. (बायकी) जुन्या लुगड्याचा फाडून काढलेला तुकडा.

**दाळगपू** वि. १. डाळभात गट्ट करणारा. २. (ल.) गलेलठ्ठ; मूर्ख: 'दाळगपु हा वदतां भूप । अवघे हांसती विनोदी ।' - दावि २५४.

**दाळगोटा** पु. डाळीतील न भरडला गेलेला सबंध दाणा, गोटा.

**दाळपिठिया** वि. अतिशय सौम्य स्वभावाचा; गरीब (मनुष्य).

**दाळपीठ-रोटी** न. स्त्री. साधे जेवण; (पोटाला आवश्यक असलेली) भाजीभाकर. (क्रि. देणे, चालविणे, मिळविणे).

**दाळवा** पु. (ना.) पहा : **डाळे**

**दाळसांड** स्त्री. हेळसांड; हयगय. (व.)

**दाळी** स्त्री. शिजलेली डाळ : 'दाळी तया ठोंबरेयावरि घाली'- लीचउ ५०५. [सं.दाल, दलित]

**दाळी** स्त्री. बांबूची केलेली लहान टोपली; परडी.(गो.)

**दाळीदी** पु. नातलगः 'माइला तो केसवनायकाचा दाळीदी' - गोप्र १००.

**दाळे** पहा: **डाळे**

**दाक्षणी, दाक्षणा** स्त्री. पु. मुसलमान विवाहित स्त्रिया दात काळे करण्यासाठी वापरतात ते दंतमंजन; दारशिना: 'तुरकांतील संकेत कन्यापणीं दाक्षणा लावणें नाहीं.'- मऐशि १९०७ तंजावर.

**दाक्षिणात्य** वि. दक्षिणेकडचा; दखनी. [सं.]

**दाक्षिण्य** न. १. सरळपणा; चोखपणा. २. हुशारी; दक्षता. ३. हातोटी; चातुर्य.४. औदार्य. [सं.]

**दांग** न. अरण्य; जंगल; रान. पहा: **डांग** : 'मग काळकूटकल्लोळीं कवळिले । नाना महाविजूंचे दांग उमटले ।' - ज्ञा ११.२१७. [हिं.]

**दांग** स्त्री. १. फांदी; डांगः 'वृथा सांवरीची दांग ।' - मुरंशु २३९. २. दोन पायांतील अंतर; ढांग.

**दांगट** न. डोंगरातील चोरवाट : 'माधुर्याची दांगटे आझोड ती धैर्यतें ।' - भाए १९५

**दांगडो** पु. दांडगाई; धिंगामस्ती; धांगडधिंगा. (व.)

**दांगा** पु. नूतन पल्लव. - शर; नवी पालवी. पहा: **दांग, डांग**

**दांगाण** न. जंगली, डोंगराळ प्रदेश; अरण्य; पहा : **डांगाण** : 'मग म्लेंच्छांचे वसौटे । दांगाणे हन कैकटे ।' - ज्ञा १७.२९४.

**दांगूट** न.लहान पाय, टांग. (गो.)

**दांड** पु. १. वेळूची लांब काठी; दांडा. २.पट्टा खेळण्याचा सराव करण्याची काठी. ३. शेताची मर्यादा दाखविणारा उंच बांध. ४. टेकडीचा, डोंगराचा कणा, दंड, रांग. ५. उंचवट्यावरून सखल प्रदेशाकडे पाटाने पाणी नेण्याची सारणी, प्रणाली,दंड. ६. (धोतर, लुगडे इ. चे दोन तुकडे जोडणारी) एक प्रकारची जाड व लांब शिवण. (व.) ७. (शेतांमधून, शेताच्या बाजूने) रहदारीसाठी सोडलेला जमिनीचा लांब पट्टा. ८. जमिनीचा, मार्गाचा, लांबलचक, रखरखीत व ओसाड पट्टा. ९. (फार वेळ एकाच स्थितीत बसण्याने अंगाला येणारा) ताठरपणा; ताटकळा. (क्रि.भरणे).१०. (मळ्यांतील) वाफा; ताटवा. (प्रां.) पु.न. १. शिक्षा म्हणून केलेला दंड. (क्रि. मारणे). (प्रां.) २. चोवीस हात लांबीचा बांध; चोवीस हात लांबीचे परिमाण. -कृषी २१३. ३. चित्त्याच्या गळपट्ट्यापासून कंबरपट्ट्यापावेतो पाठीच्या कण्यावरून बांधण्याची, वेणी घातलेली सुताची दोरी. -चिमा १३. ४.(आट्यापाट्यांचा खेळ) सर्व पाट्यांना मधोमध विभागणारी रेषा; दंड; सूर. (गो.) ५. पाळण्याचा साखळदंड. ६. एकेक मोती. [सं.दंड] (वा.) ० **काढणे** - (मनुष्य, जनावर इ.ना) खूप राबवून घेणे; तांगडणे; पादाडणे.

**दांड** पु. ताठरपणा.
वि. दांडगा; आडदांड; अडमुठा; मस्तः 'दांडभांड गुराखी तुम्ही।' - रासक्रीडा २२.

**दांडक(ग)णे** उक्रि. (दांडक्याने) बडविणे; चोपणे; झोडणे.

**दांडक(ग)पण** न. आडदांडपणा; अडमुठेपणा; उद्धटपणा; असभ्य वर्तन.

**दांडक(ग) मत** न. हट्टाने स्वतःच्याच मताचा आग्रह धरणे; पुरस्कार करणे; हटवादीपणा; हेकेखोरपणा.

**दांड(डु-डू-डो)का-के** पु. न. १.हात, दोन हात लांबीचा वेळूचा तुकडा; दांडू; सोडगा. २. फरा इ. मापावरून फिरवायचे दांडके. ३. आखण्याचा रूळ.

**दांडगा** वि. १. भक्कम; मजबूत; राकट. २. धटिंगण; मस्त व आडदांड; दंडेल; रगड्या; अडमुठा. ३. हटवादी; हेकेखोर; हेकट. ४. धीट; साहसी. ५. प्रचंड; राक्षसी; अवाढव्य; अजस्र (प्राणी, वस्तू इ.). ६. ओबडधोबड; जाडेभरडे (सूत,वस्त्र इ.). ७. भरपूर; विपुल; पुष्कळ; जोराचा (पाऊस, पीक, वारा इ.).

**दांडगाई-वा-वे** स्त्री. पु. न. १.दांडगेपणाचे भाषण, वर्तन. २.स्वेच्छाचार; स्वैर वर्तन; छांदिष्टपणा; उनाडकी. ३. मस्ती; धिंगाणा.

**दांडगागिंग** पहा: **दांड** वि.

**दांडगी** स्त्री. वालाचे वेल चढवण्यासाठी वेलाजवळ उभी केलेली मोठी काठी. (गो.)

**दांडगेला** वि. १. राकट; मजबूत; बळकट. २. उर्मट; उद्धट.

**दांडदपट** स्त्री. (चोर, थकलेले कूळ, देणेकरी इ.ना घाबरविण्यासाठी दिलेली) धमकावणी; आक्रस्ताळेपणा; धाकदपटशा; दटावणी.

**दांडपट्टा** पु. १. एका हातात काठी व दुसऱ्या हातात पट्टा घेऊन खेळण्याचा एक मर्दुमकीचा खेळ. (क्रि.करणे, खेळणे.). २.तो खेळण्याचे हत्यार.

**दांडपाता** फाल्गुनी पौर्णिमा.

**दांडपाळे** न. लाकडाची मूठ बसवलेले लाकडी पाळे.

**दांड(डा)पेंडोळा-ळे,दांडापेंडा** पु. न. १. (प्रदेश, जमीन इ.ची) सीमा; मर्यादा; शीव; हद्द. २. परस्परसंबंधाची जागा; निकटपणा; संबंध. ३. (ल.) विवाह किंवा इतर संबंधांतील (दोन्ही) पक्षांची अनुरूपता; योग्यतेचा सारखेपणा; सारखी लायकी.(क्रि.पुरणे, मिळणे, लागणे.).

**दांडपॅन्न** न. मधली भिंत.(गो.)

**दांडपैड** स्त्री. दळणवळण. (व.)

**दांडफट** स्त्री. दोन नांगराचे तासातील अंतर. (ना.)

**दांड(डा)मेंड-डा** पु. स्त्री. सीमा; मर्यादा; हद्द.

**दांडयारी** स्त्री. (नाविक) काठीला ज्या मुख्य याऱ्या सजवतात त्यांच्याशिवाय आणखीही बारीक दोरीच्या उपयाऱ्या असतात, त्यांपैकी प्रत्येक.(को.)

**दांडरूब** न. धर्मशास्त्रः 'आगमु निऱ्हां दांडरूब । जाणपणें न पिएति आंब ।'- शिव ८४.

**दांडवण-न** स्त्री. खवल्या माशाची एक जात; कन्हेरी. - बदलापूर १३२.

**दांडसाकाळ** पु. एक पिशाच्चदैवत. (कु.)

**दांड(डे)साळ, दांडळ** स्त्री. चाळ; लांबच लांब इमारत.

**दांडळणे** उक्रि. (अश्लील)(युक्तीने, कपटाने) चकवणे, भुरळ पाडणे, उपभोगणे, भोंदणे.

**दांडळणे** अक्रि. (उभे पीक इ. चा दांडा, देठ) जाड व मोठा होणे.

**दांडा** पु. १. (वेळू इ.चा ) जाड व आखूड तुकडा; काठी. २. (पळी, ओगराळे, वेळणी इ.ची) हातात धरण्याची मूठ; (कुऱ्हाड, कुदळ, वाकस इ. हत्याराच्या नेढ्यात घालतात तो) लाकडाचा गोल दंड, काठी. ३. पाट इ. ची पाणी जमिनीत न जिरता वहावे म्हणून जमिनीपासून उंच बांधलेली सारणी, प्रणाली; मोटेचे पाणी बागेत निरनिराळ्या ठिकाणी नेणारा पाट. (व.) ४. पाठीचा कणा. ५. (समुद्र, खाडी इ.त तारू, गलबत यांना अडथळा होण्याजोगा) रेती, खडक इ.चा दंडाकार उंचवटा; दांडी. ६. (डोंगर, टेकडी इ.चा) कणा; दंड; उंचवट्याची चिंचोळी व अरुंद रांग. ७. नाकाचा कपाळापासून शेंड्यापर्यंतचा उंच भाग. ८. नदीचा धक्का. ९. (समुद्रात गेलेला) जमिनीचा लांब व चिंचोळा पट्टा. १०. केळीचा घड. ११. (नथ इ. दागिन्याचा) आकडा. १२. केळीच्या पानाच्या मध्यातून जाणारा देठाचा लांब भाग. १३. (जमीन, इमारत इ.चा) सुळका, शेंडा.१४. माघी पौर्णिमेला होळीच्या ठिकाणी रोवलेला एरंडाचा सोट. १५. (घराचा) वासा; कडी; बहाल; तुळवट. १६. यंत्र फिरवण्यासाठी मूठ बसविलेली काठी.- शर. २१२. १७. कुळागराचा तुकडा.(गो.) १८. शूद्र स्त्रिया नाकात घालतात तो लोंबता दागिना. (गो.)१९. चार हातांचे लांबीचे एक परिमाण. (गो.) २०. भेंडाचा केलेला एक त्रिकोणाकृती अलंकारविशेष. हा अलंकार स्त्रिया मंगलप्रसंगी वापरतात.(तंजा.) २१. (विणकाम) तातू जोडण्यासाठी जी सांध असते तिच्यात घालण्याचा वेळूचा एक तुकडा. २२. (नाविक)गलबताला बाहेरच्या बाजूला काठाखाली वीतभर अंतरावर नाळवऱ्यापर्यंत दोन्ही बाजूंना

ठोकलेली लाकडाची गोल अथवा चौकोनी पट्टी. (नाविक) (को.) २३.(अशिष्ट) लिंग; शिश्न (विशेषत: घोड्याचे लांब असणारे); दांडी. २४. स्त्रियांच्या डोक्यात आंबाड्यावर घालण्याची फुलाची जाळी. २५. पुष्पहार : 'पार्यातकाचे दांडे'- श्रीकृच १८.६१. [सं.दंड] (वा.)

**(घराचे) दांडेवासे मोजणे** - कृतघ्न होणे; उपकार विसरून उपकारकर्त्याच्याच नाशाला प्रवृत्त होणे, त्याचा नाश चिंतणे.

**दांडाईत** वि. दांड; दांडगा; उर्मट.

**दांडार,दांडोळा** पहा: **दांडा** ४,७,१२

**दांडार(व)णे** अक्रि. थंडी, श्रम इ.मुळे शरीर ताठरणे; ताटकळणे.

**दांडावि(ळ)णे** सक्रि. काठीने बडवणे; ठोकणे; चोपणे; मारणे.

**दांडाळवत** न. मध्ये दांडारा, पण टोक नसलेले केळीचे पान, काप. (को.)

**दांडिया** पु. एक गुजराती समूहनृत्य.

**दांडी** स्त्री. १. पालखीच्या वर वाकवलेला, मागे व पुढे सरळ असलेला व दोन्ही बाजूंना (पालखी) उचलणाऱ्यांनी धरण्याचा वासा, दांडा; (ल.) पालखी: 'सर्वे साति लक्षां दांडिया । बारा लक्ष्य तेजिया ।' - शिव २३४. २. नांगर, वखर, कुळव इ. औतांचा सोट, काठी. ३. गाडीची धुरा. ४. घोड्याचे शेपूट किंवा शेपटीचा बुडखा: 'घोडियांच्या दांड्या तोडल्या.' - मइसा १५.२०६. ५. (अशिष्ट) घोड्याचे शिश्न. ६. वस्त्रे इ. वाळत घालण्यासाठी उंचावर आडवी बांधलेली काठी, बांबू इ. ७. तांब्याच्या जुन्या ढब्बूवरील दोन सरळ आडव्या रेघांपैकी प्रत्येक रेघ. ८. तराजूची पारडी अडकवण्याचा आडवा दांडा. ९. समुद्रात लांबवर गेलेला जमिनीचा चिंचोळा भाग; दांड. उदा. (मुंबईजवळची) कुलाब्याची दांडी. १०. वल्ह्याचा पतिंगा, दांडा; यावरून वल्हेकरी; नावाडी. ११. छत्री, पंखा इ. ना धरण्यासाठी लावलेला दांडा, मूठ. १२. वीणा, सतार इ.; या तंतुवाद्यांचा डेऱ्याच्या, भोपळ्याच्या वरचा तारा बसवलेला लाकडाचा भाग. १३. लाकडाचा तासलेला लांब तुकडा; वासा; तुळवट. १४. मोठी व लांबवर पसरलेली लाट. १५. बेडी: 'काळ लोहाचां दांडीं । आधारु कां घालवे ।' -भाए ५९५. १६. कान; कडी (धरण्याची). १७. ओलावा शोषून न घेणारी व लवकर सुकणारी थळ जमीन. [सं. दंडिका; क. दंडिगे](वा.) ० **गुल होणे** - अनुत्तीर्ण होणे; कामावरून कमी होणे; फजिती होणे. ० **चेपणे** - खोटे माप देणे. ० **मारणे** - बुट्टी मारणे; गैरहजर राहणे.

**दांडीकार** पु.एकतारी वाजवणारा: 'एकू दी दांडीकार वाम्नहाकु दरसिना आले'- लीचउ ३९९. [सं. दंडिका + कार]

**दांडी(डे)पू(पौ)र्णिमा - पुनव** स्त्री. माघ शुद्ध पौर्णिमा. ह्या दिवशी होळीचा दांडा रोवतात म्हणून हे नाव पडले.

**दांडीया** न. नवरीला विवाहप्रसंगी नेसवले जाणारे महावस्त्र. (अहि.)

**दांडीवाला** पु. तराजू हातात घेऊन माल तोलून घेणारा व देणारा. वाणी; व्यापारी; उदमी.

**दांडुघाल्या** वि. विघ्नसंतोषी.

**दांडू** न. विटीदांडूच्या खेळातील खेळण्याची लहान काठी, दांडके.

**दांडूपणा** स्त्री. दांडगेपणा. (व.)

**दांडूल** न. कुळागराचा तुकडा; दांडा..(बे.)

**दांडेकरी** पु. ( सांकेतिक) (महाराच्या हातात नेहमी काठी असे म्हणून) महार. (राजा.,कु.)

**दांडेपंडित** पु. शास्त्राभ्यास न करताही उत्कृष्ट वादविवाद करणारा व प्रसंगी दंडादंडी, काठ्यांनी मारामारी करायलाही तयार असणारा बळकट व हुशार मनुष्य.

**दांडेपाट** पु. धरण्यासाठी दांडा, मूठ असलेला पाट, तिवई इ.

**दांडेपान्हवण-ळ** न. १. गाय, म्हैस इ.ना काठीने बडवून दूध देण्याला, पान्हवण्याला भाग पाडणे. २. (ल.) (एखाद्याला) मारून, बडवून त्याचे मन वळविणे; आपले म्हणणे कबूल करायला भाग पाडणे. ३.(सामा.) झोडंपट्टी; मार.

**दांडेपाळ** स्त्री. पाणी वाहून नेण्यासाठी, शेतात खेळवण्यासाठी उंच बांधलेल्या दांड्याची पाळ, कड.

**दांडेपाळ-ळे** स्त्री. न. मूठ बसवलेले लाकडी पाळे.

**दांडेबोर** स्त्री. न. बोरीची एक जात; या बोरीचे फळ.

**दांडेमार** पु. दांड्याने, काठीने झोडपणे; बडविणे.(क्रि.करणे).

**दांडेविंड - भुसा** न. पु. नदीत मासे पकडण्याचे एक प्रकारचे जाळे. याची दोन्ही टोके दोन दांड्यांना बांधलेली असतात. (को.)

**दांडेस्वार** पु. आजारातून नुकताच उठून काठीच्या साहाय्याने हिंडू फिरू लागलेला मनुष्य; हिंडता-फिरता रोगी.

**दांडोरा** पु. १. केळीच्या पानाचा दांडा. २. केळीचे पूर्ण पान; डांग; दांडरा.

**दांडोरा-ली** पु. १. दवंडी; डंका; डांगोरा. (क्रि. पिटणे, फिरविणे.) २. प्रसिद्धी; जाहीर करणे. [सं.डिंडिम; हिं. ढिंढोरी]

**दांडोरे** न. (सुतारकाम) ढेकळे फोडण्याचे फळ्या जोडून केलेले हत्यार.

**दांडोला** पु. पहा: **दांडा** ११

**दांडोळ-ळी** स्त्री. १. ओळ; रांग; पंगत. २. पहा: **दांड(डे)साळ**

**दांत** वि. १. दमन केलेला; जिंकलेला. २. ज्याने इंद्रियांवर ताबा मिळवला आहे असा; संयमी: 'बहु शांत दांत विषयविरत तापसी महा ।' - शापसंभ्रम अंक १. [सं.]

**दांतिर** वि. वाकड्या दातांचा : 'एक बहिरे मुके बोबडे दांतिरे'- वच्छाह २८६. [सं.दंत]

**दांतिरी, दांतोरी, दांतौर-री** स्त्री. दातांची कवळी : 'घाओ हाणौनि उतरीं दांतिरी : अविद्येची '- उगी १५९; 'खटखटां वाजतीं दांतोरी'- नाम ४९९; 'हो काज विजूसि वाजतुसे दांतौर' - नरुस्व ४३८; ' वाजतां दांतौरी: काही आइकिजे ना'- शिव ९५०. [सं.दंत]

**दांपत्य** न. १. पतिपत्नीसंबंध. २. जोडपे; मेहूण; पति-पत्नी.

**दांबडणे** सक्रि. सक्त मेहनत करून घेणे; फार राबवणे.

**दांभिक** वि. ढोंगी; लुच्चा; (धार्मिकपणा, संपत्ती, विद्वत्ता इ.चे) अवडंबर, सोंग करणारा. [सं.]

**दिअ-उ-ऊ-य** पु. दिवस : 'बहुवां दिआंची भूक ।' -ज्ञा ६.२२८. [सं.दिवस]

**दिक-क्क** स्त्री. १. काळजी; पर्वा; भीड: 'येथें दिक् कोठें आहे! राज्य बुडतें ही काळजी कोठें आहे.' - ऐलेसं १०.५३४३. २.अडथळा: 'शिंदे बहुत वाढले आहेत, कांही दिक्क राहिली नाहीं...' - ऐलेसं १०.५३४४.

वि. १. क्षीण; बेजार; दमलेला; आजारी : 'हगवणीनें दिक्क झाले आहेत.' - ऐलेसं १०.५२७३. २. त्रस्त; विटलेला: 'अंतर्यामीं नबाब बहुत दिक्क व विचारांत.' - मइसा ५.१६२. ३. खप्पा; नाखूष: 'वयनींची मर्जी खर्चाची वोढ पडल्यामुळें दिक्क आहे.' -ऐलेसं ११.६००९. ४. थक्क; चकित. [अर.दिक्क]

**दिक(क्क)त** स्त्री. १. सूक्ष्म दोष; शंका; हरकत; आक्षेप; कबूल करण्यात कांकूं : 'इंग्रज दोनी दौलतींत (निजामाच्या व पेशव्यांच्या) पाय घालतात यांत दिक्कत नाहीं ।' - ऐलेसं १२.६८३४. २. तंगी; टंचाई: 'पाण्याचे दिकतीनें आणि उष्णकाळ भारी म्हणून आठशें माणसें मरण पावलीं.' - दिमरा २.८७. [अर.दिक्कत]

**दिक्-ग्** स्त्री. १. दिशा. २.मर्यादा. (समासात) दिक्पाल; दिक्साधन. [सं.]

**दिक्कत** (ना.) पहा : **दिक-क्क** वि.१

**दिक्कतखोर, दिक्कती** वि. १. आढेवेढे घेणारा; हेकेखोर; फाटे फोडणारा; संशयी; शंकेखोर; अडचणी काढणारा (मनुष्य). २. नाकारले जाण्याजोगे (नाणे). पहा: **दिक्कत** २

**दिक्चालन** न. जहाज, विमान यांचा मार्ग होकायंत्राच्या साहाय्याने ठरवणे.

**दिक्पट** वि. सैरभैर : 'भेणे जाले दिक्पट'- ज्ञागा १८९.

**दिक्परिवर्तक** पु. विजेचा प्रवाह उलट करण्याचे उपकरण.

**दिक्पाल** पु. दिशेचा स्वामी; दिशेचे पालन करणारा. [सं.]

**दिखाऊ** वि. १. बाहेरून सुरेख, चांगला दिसणारा. २. पोषाखी; खरी ताकद नसणारा.

**दिखावट** स्त्री. शोभा.

**दिगर** क्रिवि. १. तसेच; आणखी; जास्त; पुढे; शिवाय; भलते; उलटे; नंतर. २. अन्य; इतर : 'मध्ये कोण्ही जो दिगर करील त्यास तंबी करूं.' - मइसा १.४८. ३. भलते: '...जबाब दिगर, सवाल दिगर करू लागले.' - ऐलेसं ७.३५७४. ४. उलट; विरुद्ध : 'तरी हे भाऊकडील सरंजामी गांवाचा बंदोबस्त करितील. आपणांकडून येविशीं दिगर जाबसाल नसावा.' - ऐलेसं ११.५६५४. ५. इनाम, सरंजामी खेड्यांना लावतात. [फा.]

**दिगरजान** वि. जानी; जीवश्च कंठश्च. पहा: **जिगरजान**

**दिगरनंबर** न. जादा अथवा किरकोळ फेरिस्त; सामान्य खाते.

**दिगरवाद** वि. १. अवांतर : 'दिगरबादे चौकी बादशहाचें अडीच तीनशे मैल.' - इमं१९९. २. (कायदा) जमिनीचा मालक म्हणून सरकारकागदीं असलेलें एका इसमाचे नांव रद्द करून त्या ठिकाणीं दुसऱ्याचें नोंदणें. -लँड रेव्हेन्यू कोड.

**दिगंत** पु. १. दृश्य क्षितिज. २. पृथ्वीचा शेवट, सीमांतप्रदेश; अंतिम टोक.[सं.] (वा.) **दिगंती जाणे** - सर्व पृथ्वीवर पसरणे; (कीर्ती, सुगंध इ.) चोहीकडे फैलावणे.

**दिगंतर** न. १. लांबचा, परका देश, दिशा; दूरदेश. २. अंतराळ.

**दिगंबर** वि. १. दिशा हेच वस्त्र नेसलेला; नग्न; नागवा. २. परमहंस संन्यासी. ३. जैन धर्मातील एक पंथ.

**दिगंश** न. सूर्य, तारे किंवा इतर ग्रह क्षितिजाच्या ज्या बिंदूत उगवतात किंवा मावळतात तो बिंदू आणि क्षितिजावरील पूर्व किंवा पश्चिम बिंदू यांमध्ये होतो तो कंस.

**दिगी** स्त्री.आधारासाठी लावलेला टेकू. (गो.)

**दिग्गज** पु. १. पृथ्वीच्या प्रत्येक दिशेला असणारा व प्रत्येकीला आपल्या डोक्यावर उचलून धरणारा एकेक हत्ती. २. (ल.) सुंदर व धिप्पाड माणूस. ३. मोठा पंडित; बडा विद्वान. ४. (थट्टेने) अवाढव्य, राक्षसी, दांडगा माणूस. [सं.]

**दिग्दर्शक** पु. १. दिशा दाखवणारा. २. नाटक, चित्रपट अभिनय इ.चे मार्गदर्शन करणारा.

**दिग्दर्शन** न. १. दिशा दाखविणे; सूचना; दर्शन; किंचित निर्देश. २. स्वरूप, पद्धत इ.ची स्थूल कल्पना, सामान्य माहिती. ३. नाटक, चित्रपट इ. मध्ये अभिनय इ.चे मार्गदर्शन; कलाकृतीची योजना करणे.

**दिग्बंधन** न. १. (जादू) नजरबंदीचा एक प्रकार; दिशा भारण्याचा देखावा. २. ( तंत्रशास्त्र) संध्या, जप इ. कर्मांत करण्याचा एक विधी. [सं.]

**दिग्भ्रांत** वि. हरवलेला; दिशा चुकलेला; अज्ञात प्रदेशात फिरणारा.[सं.]

**दिग्विजय** पु. १. दशदिशा, सर्व जग जिंकणे. २. (उप.) अशिष्ट, बेताल कृत्य; वेडेपणाची, आडदांड, आक्रस्ताळी प्रवृत्ती; दंगा; बंड. [सं.]

**दिघडा** वि. उभट; उंच : 'दिघडु ना खुजटा ।' - ज्ञा ११.२७७ .[सं.दीर्घ]

**दिघळे** स्त्री. बरचीसारखे एक शस्त्र: 'विचाराचे नि दिघळें खोचावा संसारशत्रु ।' - भाए २४४.

**दिङ्निर्णययंत्र** न. दिशा ओळखण्याचे यंत्र; नाविक कंपास; होकायंत्र. [सं.]

**दिङ्मूढ** वि. अचंबित; अवाक; चाट; स्तंभित; चकित; स्तिमित.

**दिठा** पु. १. द्रष्टा; पाहणारा (माणूस): 'आपणपें द्रष्टा । न करितां असे पैठा । आतां जालाचि दिठा । कां करावा ।' - अमृ ७.२१६. २. (ल.) आत्मा. [सं. द्रष्टा]

**दिठावणे** अक्रि. दृष्टावणे; दृष्ट लागून नासणे.

**दिठी, दिठि(ठी)वा** स्त्री. १. दृष्टी; पाहणे; नजर: 'तुझा उजू दिठिवा पडे ।'- शिव ११४. २. कृपादृष्टी : 'तुमचे या दिठिवेयाचिये बोले । सांसिनले प्रसन्नतेचे मळे ।' - माज्ञा ९.४. ३. दर्शन; देखावा. (क्रि.घालणे). [सं. दृष्टि] (वा.) ० **असणे** - १. ऐकण्यात असणे. २. तिळी असणे. (व.)

**दिठीपण** न.पाहण्याचा धर्म: 'दिठी आपणेया मुरडे । तैं दिठीपणही मोडे ।'- अमृ २१२. [सं. दृष्टि]

**दिठोणा** पु. तीळ. [हिं.दिठौणा]

**दिडका-ता** वि. १. एक आणि अर्धा मिळून झालेले; दीडपट (माप इ.). २. एक तुकडा सबंध व दुसरा अर्ध्या रुंदीचा असणारी (पासोडी). ३.दीडपदरी घडीचें (वस्त्र).

**दिडकी** स्त्री. १. एक पैसा; दीड दुगाणी नाणे. २.उजळणीचा एक प्रकार; दिडाचा पाढा; दिडके.

**दिडके** न.१. दीड अथवा याचा कोणताही एकेरी गुणाकार; दिडाचा पाढा. २. (गुळाची अडत) हमालाला दीड मणामागे काही ठरावीक हमाली देतात. त्यापेक्षा जास्त माल भरला तर त्याबद्दल द्यावी

लागते ती दीडपट हमाली.

**दिडदांडी** स्त्री. मधल्या काट्यापासून एक भाग आखूड आणि एक लांब अशी तागडीची दांडी.

**दिडदुमता** वि. दिडका.

**दिडी, दिडीकाडी, दिडे, दिडोत्रा** पहा : **दिढी** इ.

**दिढी** स्त्री. एक आणि अर्धा; दीडपट.

**दिढीका(वा)ढी** स्त्री. पेरणीच्या वेळी दिलेले धान्य पीक आल्यानंतर दीडपटीने घेण्याचा करार किंवा अशा करारावर दिलेले कर्ज.

**दिढीबाद-वजा सूट** (मुलकी, वसुलीमध्ये) एकतृतीयांश सूट.

**दिढे** शअ. दिडक्यांमध्ये दिडाने गुणताना योजलेला शब्द. उदा. दहा दिढे पंधरा.

**दिढोतरा-त्रा** पु. दरमहा दर शेकडा दीड प्रमाणे व्याजाचा दर.

**दितीदिती** क्रिवि. जोराने; घाईने; धापा टाकत (पळणे). [सं.पदृ द्वि.]

**दिदार** पु. चेहरा.

वि. १. देखणा. २. देखणा पण नादान; वरून दिसायला सुंदर परंतु पोकळ, टाकाऊ, निरुपयोगी. [फा.दीदार]

**दिदार पाडणे** क्रि. पराक्रम करणे.

**दिधणे** सक्रि. देणे : 'धर्म म्हणे उद्योगीं जो दिधला तोचि भद्र महिवर हो ।' – मोभीष्म १.९६. [सं.दा]

**दिधन** न. एक औषध, रसायन.

**दिन** पु. दिवस. [सं.]

**दिनकृत्य-चर्या** न. स्त्री. १. रोजचा क्रम, राहणी; नित्याची राहणी, खर्च; प्रत्येक दिवशी करण्याचे काम, कार्यक्रम. २. कसा तरी दिवस घालवणे; पोट भरणे. २. रोजनिशी; डायरी इ. [सं.]

**दिननिर्वाह** पु. पहा: **दिनकृत्य** २

**दिनमर्यादा** स्त्री. १. सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंतचा काळ. २. कालमर्यादा. ३. सूर्यास्त; सायंकाळ. [सं.]

**दिनमान** न. १. पहा: **दिनमर्यादा** १ : 'मावळला दिनमान मोकाम गीर नदीवर झाला ।' – ऐपो ८१. २. परिस्थिती; काळवेळ.

**दिनमेक** पु. दिवसगत; दिरंगाई : 'तुमच्या मारफतीचा कारभार आसोन थैवजास दिनमेक न व्हावा.' – पेद २८.२७९. [सं.दिनम् + एक]

**दिनवाशी** वि. गरीब; दरिद्री. (गो.)

**दिनवास** पु. गरिबी; दारिद्र्य. (गो.) [सं.]

**दिनवृद्धी** स्त्री. दोन सूर्योदयांना एक तिथी आल्यास होणारी तिथीची वाढ; चंद्र व सूर्य यांच्यामध्ये बारा अंशांचे अंतर पडण्यासाठी एका संपूर्ण दिवसापेक्षा अधिक काळ लागल्यास दुसऱ्या दिवशी सूर्योदयाच्या वेळी तीच तिथी असते. अशा वेळी दुसऱ्या दिवसाला दिनवृद्धी झाली असे म्हणतात. [सं.]

**दिनशुद्धी** स्त्री. चांगला मुहूर्त; कोणताही अशुभ योग नसणे; शुभदिवस निश्चित करणे. [सं.]

**दिनक्षय** पु. सूर्योदयानंतर लागून दुसऱ्या सूर्योदयापूर्वीच संपणारी तिथी; सूर्योदयाला एक तिथी असताना दुसरा सूर्योदय होण्यापूर्वीच चंद्र व सूर्य यांच्यामध्ये बारा अंशांपेक्षा अधिक अंतर पडल्यास तिसरी तिथी लागते व मधलीचा लोप होतो. त्याला दिनक्षय म्हणतात. [सं.]

**दिनार** पु. एक जुने नाणे. हे चांदीचे किंवा सोन्याचे सात किंवा दहा ग्राम वजनाचे असे. [सं.दीनार; ग्री. दीनारियस]

**दिनावधि-धी** स्त्री. १.एक दिवसाचा काळ. २. दिरंगाई; आज उद्याची चालढकल; विलंब; उशीर. [सं.]

**दिनांक** पु. तारीख.

**दिने देवडे** क्रिवि. रोजच्या रोज; एकसारखे, रोज नवीन: 'दिनें देवडें, चोळी लुगडें तिळभर नाहीं चुका ।'– पला ८१.

**दिन्हणे** क्रि. देणे.

**'दिप' पासून सुरू होणारे सर्व शब्द 'दीप' इ. मध्ये पहा.**

**दिपकणे** अक्रि. दिपणे. [सं.दीपन]

**दिपडे** वि. तेजस्वी; सतेज: 'नाजुक रुपडें दिपडें ठिकडें जिकडे तिकडे असकारा ।' – पला ४.१२. [सं.दीप्]

**दिपणे, दिपावणे** अक्रि. १. अतिशय प्रकाशामुळे,तेजामुळे दृष्टी स्थिर न राहणे; चक्क होणे; अंधेरी येणे. २. अपूर्व, अद्भुत गोष्ट पाहिल्यामुळे चकित होणे. ३. ज्या तेजाने किंवा प्रकाशाने दिसत असते ते नाहीसे झाल्यामुळे अंधत्व येणे. [सं.दीप]

**दिपलव** स्त्री. दिवेलावणी : 'तथा चारि दिपलवा ग १'– पांढर शिलालेख.

**दिपवा** पु. सारा दिवस ढगांची अंधारी असताना मध्येच थोडा वेळ ढगांमधून येणारे सूर्याचे किरण, पडणारे ऊन. (को.) [सं.दीप्]

**दिपाचा कवडा** (ल.) वृद्ध, अशक्त किंवा कुटुंबातील नाकर्ता माणूस; केवळ नावाला धनी असा मनुष्य.

**दिपारी** वि. प्रकाश पाडणारा.

**दिपावणे** न. देवाला दिव्याने ओवाळण्याचा पूजेचा एक प्रकार.

**दिपावत** जुलूम.

**दिपु(पो)ष्ट, दिपुष्टेल** न. दिवा विझल्यानंतर राहिलेले तेल. [सं. दीप+म. उष्टे]

**दिपु(पो)ष्टाण** स्त्री. विझविलेल्या दिव्याच्या वातीपासून सुटणारी घाण.

**दिबं(म)खुरी-रे** वि. लहान मुलाचे रांगणे. (गो.)

**दि(दी)मक** पु. वाळवी; कसर. [हिं.; फा.]

**दिमडी** स्त्री. टिमकी;एकतारीबरोबर साथ करण्याचे चर्मवाद्य.[क.दुमडि]

**दिमत, दिमतदा(वा)र** पहा: **दिम्मत** इ.

**दिमाख** पु. मगरुरी; तोरा; डौल; गर्व; भपका. [अर.दिमाघ्]

**दिमाखचोट्टा** वि. गर्विष्ठ; अहंमन्य.(ना.)

**दिमाखदार** वि. १. चढेल; डौली; मगरूर. २. (ल.) अतिशय सुरेख; डौलदार. [फा.]

**दिम्मत** स्त्री. १. जिम्मा; हवाला; काळजी; निस्बत; कारभार; व्यवस्था; ताबा: 'याचे दिमती करणे.' – मइसा १५.१७९. २. तैनात; सेवा. ३.स्वाधीन, ताब्यात असलेली सैन्याची तुकडी. [अर.झिम्मत्]

**दिम्मतदार** वि. ताबा, सत्ता, व्यवस्था ठेवणारा.

**दिम्मतवार, दिम्मती** वि. ताब्यात असलेला; हुकमात वागणारा.

क्रिवि. ज्यांच्या दिमतीला वस्तू, माणसे दिलेली असतात त्यांची नाववार (केलेली यादी इ.).

**दिम्हा** स्त्री. सांजवेळ; सूर्यास्तानंतरची वेळ; सायंकाळ. (अहि.)
**दिय** पु. दिवस: 'आम्ही येतुले दिया याची मातुहि नेणों ।' – ज्ञा ६.४२८. [सं.दिन]
**दिरगदारी** स्त्री. अडचण; विपत्ती. पहा : **गिरिबदारी**
**दि(धि)रनं** क्रि. तयार असणे; कृती करायला होकार असणे. (अहि.)
**दिर(रि)म** पु. १. दोन आणे किमतीचे चांदीचे नाणे: 'सरकारचा दामदिरम तफावत न करणें.' – मइसा २०.३०२. २. चवलीभार ; चवलीच्या वजनाची वस्तू. 'दररोज अर्धा दिरीम हिरडा व अर्धा दिरीम सेंदेलोण मिळून द्यावें.' – अश्वप १.१६१. [फा.]
**दिरसाल** वि. पाठवलेले; धाडलेले. [अर.द–इर्साल]
**दिरं(रिं)ग,दिरिंगाई** पु.स्त्री. उशीर; रेंगाळणी; लांबण. [फा.दिरंग]
**दिल** पु.न. हृदय; अंतःकरण; मन.[फा.] (वा.) ० **फाकणे, फाकटणे** – अस्वस्थ, बेचैन होणे; गोंधळून जाणे.
**दिलकश** वि. मनोहर. [फा.]
**दिलकुल** वि. हिरमुसलेला; कष्टी; श्रमी; लज्जित: 'दिलकुल बसले जिकडिल तिकडे सन्मुख एकहि येईना ।' – पला ८५.
**दिलखुलास–सा** पु. शुद्ध भाव; मनाचा मोकळेपणा; समाधान: 'दिलखुलाशाने जाब दिला नाहीं.' – सभासद ३९. [फा.दिल + अर. खिलास]
**दिलखुशी** स्त्री. १. आनंद; संतोष; तृप्ती; चित्ताची प्रसन्नता. २. रुकार; संमती; इच्छा; आपखुशी; पसंती. [फा.]
**दिलखेचक** वि. मनाला आकर्षित करणारे.
**दिलगिरी** स्त्री. दुःख; खेद; खिन्नता; बेदिली.
**दिलगीर** वि. दुःखी; कष्टी; खिन्न; असंतुष्ट; गांजलेला. [फा.]
**दिलचस्प** वि. चित्ताकर्षक; मनोहर; मजेदार. [फा.]
**दिलजमाई** स्त्री. खातरजमा; मनाची मिळणी; मैत्री. [फा.दिलजमुअी]
**दिलजोई** स्त्री. सांत्वन; समाधान: 'तुम्ही आमचे तर्फेने यांची तशफ्फी व दिल्जोई करावी.' – मइसा २२.२५. [फा.]
**दिलदार** वि. उदार; मनमिळाऊ; सहृदय; मोठ्या मनाचा. [फा.]
**दिलदारी** स्त्री. १. उदारता; धीटपणा; खंबीरपणा; सहृदयता; धीर. २. उत्तेजन; खातरजमा: 'मावळे लोक तमाम याची दिल्दारी करून.' – वाडशाछ १.११६.
**दिलपसन** पु. एक फळभाजी; ढेमसे.
**दिलपाक** वि. पवित्र; शुद्ध अंतःकरणाचा; सरळ; निष्पाप. – ब्रप ३०७.
**दिलब(भ,व)र** पु. प्रियकर; वल्लभ. [फा.]
क्रिवि. मनाची तृप्ती होईपर्यंत.
**दिलभरी** स्त्री. समाधान; खात्री; उत्तेजन: 'तमाम रयतेची दिलभरी करून लावणी होय तें करणें.' – मइसा १.३४६.
**दिलरुबा** पु. (वाद्य) गजाने वाजवण्याचे एक तंतुवाद्य; ताऊस या वाद्याचा मोर काढला म्हणजे हे वाद्य बनते.
**दिलवर** न. १. मासे पकडण्याचे मोठे जाळे. (को.) २. पहा : **दिलावर**
**दिलवाण** स्त्री. पणती. (तंजा.)
**दिलसफाई,दिलसाफी** स्त्री. मनाची निखालसता, निःशंकता: 'दिलसाफीचा फर्मान उभयतांनीं बादशहापासून संपादन केला.' –प्रामस ३२.
**दिलसेरी** संतोष.
**दिलहवाली** स्त्री. मनाची अस्वस्थता; विवंचना; काळजी.
**दिलावर** वि. धीर; शूर; धाडसी. – पदमव ८५.
**दिलासा** पु. १. आश्वासन; धैर्य; भरवसा. २. हेतू; मनातील इच्छा.[फा.]
**दिली** वि. जानी; जिवाभावाची (दोस्ती): 'दोन उम्दे मनुष्य दिली दोस्ती जाहीर करावयास रवाना करीत आहो ।' – पअ ६५. [फा.दिल]
**दिलेर** वि. धाडसी; शूर; धीट. [फा.दिलीर]
**दिल्लीचा सोदा, दिल्लीकर–वाला** पटाईत चोर; अस्सल भामटा.
**दिल्लीदरवाजा** पु. १. उत्तरदिशेकडे असलेला दरवाजा किंवा वेस. २. शोभेच्या दारूच्या कमानदार झाडाचा एक प्रकार.
**दिवई** स्त्री. आषाढी अमावास्येचा दीपोत्सव.
**दिवई** स्त्री. लहान नारळ येणारी माडाची एक जात. (को.) [सं.द्वीप]
**दिवखुरे** अक्रि. गुडघ्याने चालणे; रांगणे. (गो.)
**दिवचे** सक्रि. देणे. (गो.) [सं.दा]
**दिवज** न. मातीच्या दिव्यांची पंचारती.जत्रेच्या दिवशी हिच्यात वाती लावून देवळाभोवती प्रदक्षिणा घालतात. (गो.)
**दिवटा** पु. १.मोठी मशाल; मोठा पेटवलेला काकडा; पोत. २.मशालची–जी. ३. कुटुंबाला काळिमा लावणारा माणूस. ४. भविष्य सांगणारा भिक्षेकरी; जोशी.
**दिवटाळे** न. दिवा ठेवण्याची घडवंची.
**दिवटी** स्त्री. १. लहान मशाल. २. नारळाची करवंटी एका काठीच्या टोकाला बसवून तिच्यात तेलात भिजवलेल्या चिंध्या पेटवून केलेला हिलाल. ३. गोंधळी लोकांची गोंधळाच्या वेळी लावण्याची लहान मशाल. ४. (ल.) पुरुषांत मोकळेपणाने मिसळणारी स्त्री : 'कोणत्याही 'दिवटी'चा आसरा झाला तरी भले.' – वासूनाका ३. [सं.दीपवर्ति; क. दि(दी)वटि, दीवटिगे]
**दिवटी जोहार, सलाम** संध्याकाळी दिवेलागणीच्या वेळी राजे लोकांना सेवकांनी करण्याचा रामराम, प्रणिपात.
**दिवटी बुदली** पेशवाईतील मशालीचा मान : 'दिवटी बुदलीची जहागीर ।' – ऐपो ४३.
**दिवट्या** पहा: दिवटा २,३
**दिवट्या वाघ, दिवटे** न. चित्ता.
**दिवठ(ठा)ण** न. घरातील दिवा ठेवण्याची जागा; लाकडी समई. [सं.दीपस्थान]
**दिवड–ळ** न. पु. आधेले; मोठा पण निरुपद्रवी, पाण्यात राहणारा, बिनविषारी साप.
**दिवडा** पहा: **देहुडाचरण**
**दिवताल–नाल–नाली–लाणी** स्त्री. पणती; दिवा ठेवण्याची लाकडी पाटी.(व.) [सं.दीप + तल]
**दिवलावणे** न.दिवा; निरांजन. (तंजा.)
**दिवली** स्त्री. १. लांब दांड्याची लोखंडी पणती; दिवेलावणे; लहान

दिवा. २. तेल किंवा तूप काढण्याचे दांडीचे भांडे.

**दिवशी** स्त्री. तांदळाच्या कण्यांचे एक पक्वान्न.(गो.) [क.दोशे]

**दिवशी अमावास्या, पूजा** पहा: **दिव्याची अवस**

**दिवस** पु. १. एका सूर्योदयापासून दुसऱ्या सूर्योदयापर्यंतचा काळ. २. एका दिवसात काम करण्याचा ठरावीक काळ. ३. सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंतचा काळ; प्रकाशमय, उजेडाचा काळ. ४. (ल.) सूर्य. ५. मृताची उत्तरक्रिया. ६. (ल.) नशीब; सद्दीचा काळ. ७. (ल.) आयुष्य. ८. (बायकी) गर्भारपण; गरोदरपण. [सं.] (वा.) ० **काढणे, घालणे, ढकलणे, दवडणे, रगडणे, लाटणे, सारणे** - अडचणीत, कष्टात दिवस कंठणे. ० **घेऊन, दिवसाउजेडी- सकट- पूर्वी- बरोबर- ढवळ्या-** संध्याकाळपर्यंत; सूर्य मावळण्यापूर्वी. ० **चढणे** - सूर्य वर येणे. ० **झाडावर येणे** - सूर्य थोडासा वर येणे. ० **डोईवर येणे** - दुपारचे बारा वाजणे; भर दोन प्रहर होणे. ० **दारी, दाराबाहेर येणे** - दिवस उगवणे; सकाळ होणे. ० **फिरणे** - वाईट काळ, अवदशा, आपत्ती येणे . ० **मागे पहातात** - काळ वाईट आला आहे, उलटा फिरला आहे. **दिवसा दिवाळी** - उधळपट्टीची राहणी; बेसुमार खर्च करणे. **दिवसाने डोके काढणे** - नुकताच दिवस उगवणे, येणे. **दिवसा मशाल लावणे, पाजळणे** - १. उधळपट्टी करणे; अनीतीची कृत्ये उघडपणे करणे (दारू पिणे, रंडीबाजी, जुगार इ.). २. एखादे महत्कृत्य करणे. **दिवसावर नजर देणे, दिवसासारखा होणे** - काळाप्रमाणे, काळवेळ पाहून वागणे; वारा येईल तशी पाठ फिरविणे. **नवा दिवस उगवणे** - जिवावरच्या दुखण्यातून बरे होणे; महासंकटातून पार पडणे. **वर्षाएवढा दिवस** - १. उत्तरायणातील मोठे दिवस. २. कंटाळवाणा दिवस; दुःखसंकटाचा काळ.

**दिवसगत** स्त्री. ठरलेल्या काळापेक्षा जास्त उशीर लावणे; विलंब.

**दिवसगुजारा, दिवसगुजराण** पु.स्त्री. दिवस कसाबसा घालवणे; गरिबीने चरितार्थ चालविणे. (क्रि.करणे)

**दिवसपाणी** न. थंड पाणी.(व.)

**दिवसबळ** न. दिवसाचा उजेड, प्रकाश, काळ.

**दिवसभऱ्या** वि. कसेतरी टंगळमंगळ करून दिवस भरणारा (मजूर).

**दिवसमावळी** स्त्री. दिवस मावळल्याबरोबर जिची पाने मिटतात अशी वनस्पती.

**दिवसवड** न. दररोजचे वेतन; रोजमुरा: 'चौकीदारासी बहुत खायापियास दिवसवड उदंड देऊन त्यास राजी ठेविले.'- पेद २८.१०२.

**दिव(वे)सळई,दिवसळी** स्त्री. गंधकाडी; आगकाडी.[गु.दियासलाई]

**दिवसा, दिसावडा** पु. एक दिवसाची मजुरी. (कु.)

**दिवसा ढवळ्या** क्रिवि. धडधडीत दिवस असताना; भरदिवसा.

**दिवसा दरोडा** देखत-देखत राजरोस, धडधडीत जुलूम (राजसत्तेचा किंवा भीडमुर्वत नसलेल्या माणसांचा).

**दिवसान दिवस, दिवसें(सो)दिवस** क्रिवि. दिवसामागून दिवस जातात तसे वाढत; उत्तरोत्तर अधिक होत; सतत; एकसारखे.

**दिवसाभऱ्याचा** वि. सगळ्या दिवसासाठी, सगळ्या दिवसाच्या बेगमीचे.

**दिवसांध, दिवांध** पु. घुबड: 'कीं दिवसांधासि भेटला तरणी।' - मोकर्ण २.१६.

**दिवसे** न. दिव्याच्या अमावस्येला केले जाणारे कणकेचे किंवा तांदळाच्या पिठीचे दिव्याच्या आकाराचे पक्वान्न; निवगरी; फळ: 'कीं विप्र पुरोडाश, क्षत्रकुळें त्या पुढें जसीं दिवसीं ।' - मोउद्योग १३.८१.

**दिवळी** स्त्री. १. ओलाणदिवा; ठाणवई इ.मध्ये ठेवण्याचे टवळे; लहान चाडे. २. तेल काढायची उभी पळी. ३. पणती. [सं.दीप]

**दिवळॉ** पु. नांगरलेल्या जमिनीतील मातीची ढेकळे फोडण्याचे लाकडी औत. (गो.)

**दिवंगत** वि.स्वर्गवासी; मृत.

**दिवा** पु. १. दीप; तेल व वात यांच्या साहाय्याने प्रकाश देणारे साधन. वीज, धूर यांच्या साहाय्याने प्रकाश देणारे साधन. २. पहा : **दिवली** १. ३.लग्नविधीत लावायचा कणकेचा केलेला दिवा. ४. वैशाख महिन्यातील अश्विनी इ. पाच नक्षत्रांनी युक्त असे दिवस (दिवे-पंचक). ५ पहा: **दिवसे**. ६. (ल.) मूर्ख; अज्ञानी. ७. (ल.) सूर्य. [सं.दीप] (वा.) ० **न लागणे** - बेचिराख, उजाड होणे (प्रांत, गाव). ० **लावणे** - (उप.) वाईट कृत्यांनी प्रसिद्धीला येणे; अपकीर्ती होणे. ० **सरसा करणे** - वात पुढे करणे, तिचा कोळी झाडणे. **दिवे ओवाळणे** - (उप.) कुचकिमतीचा, क्षुद्र लेखणे; तिरस्कार दाखविणे. **दिव्याने दिवस काढणे, उजेडणे** - रात्रभर जागणे; अतिशय आजारी असणे. .**दिव्याला निरोप, पदर, फूल देणे** - दिवा मालविणे. **दिव्यावातीने शोधणे** - प्रत्येक कानाकोपरा बारकाईने शोधणे.

**दिवा** क्रिवि. दिवसा; उजेडी.

**दिवाकीर्ती** पु. १. (ल.) न्हावी; नापित. २. खालच्या जातीचा, वर्गाचा माणूस; ज्याचे रात्री नाव घेऊ नये असा. [सं.]

**दिवाटनी** स्त्री. महादेवाला जाताना न्यायचा दिवा.(झाडी)

**दिवाण, दिवाणजी** न. १. मुख्य प्रधान; कारभारी; कायदेमंडळातील मंत्री. २.मोंगली अंमलात जमाबंदीखात्याचा प्रांतातील मुख्य अधिकारी, कारकून. ३. दंडाधिकारी. [अर.दैवान; फा.दीवान] (वा.) ० **चे तेल पदरात घेणे** – काहीही नुकसान झाले तरी, आपल्या धन्याची देणगी स्वीकारणे.

**दिवाण-न** पु. १. न्यायालय. २. (पलंगापेक्षा कमी उंचीचा) लाकडी पलंग.

**दिवाणअसामी** स्त्री. १. चरितार्थासाठी असलेली सरकारी नेमणूक, नोकरी, चाकरी. २. सरकारी कामगार.

**दिवाण-इ-आम** पु. प्रजेचे अर्ज ऐकण्याचा दिवाणखाना; सार्वजनिक दरबाराची जागा.

**दिवाण-इ-खास** पु. बादशहाची. खाशांची खाजगी बैठकीची जागा.

**दिवाणखाना, दिवाण** पु. १. राजसभागृह. २. अर्ज ऐकण्याची, न्यायदानाची सदर कचेरी; मंत्र्यांचे सभास्थान: 'तुका म्हणे धरुनि हात । नाही नेलें दिवाणांत ।' -तुगा १४१५. ३. बैठकीची जागा; कचेरी. ४. सरकारी कर- मागणी. (क्रि. फेडणे, चुकवणे, देणे, फडशा करणे, फिटणे, चुकणे.). ५. सरकार; मुख्य सत्ता: 'निपुत्रिकांचें मिरास तें

दिवाणाचें.' - मइसा ८.४९. [फा.दिवानखान]

**दिवाणगिरी** स्त्री. दिवाणाचे काम; प्रधानकी; वजिरात.

**दिवाणचावडी** स्त्री. न्यायकचेरी; सरकारी काम करण्याची जागा; सरकारी कोर्टकचेरी.

**दिवाणदरबार** पु. १. राजसभा; न्यायकचेरी. २. सरकारी न्यायसभेकडून चौकशी. ३. (ल.) कुप्रसिद्धी; बोभाटा.

**दिवाणदस्त – देणे – धारा– सारा** न. पु. सरकारी कर; शेतसारा.

**दिवाणदुय्यम** पु. नायबदिवाण; मुख्य दिवाणाच्या हाताखालचा, अधिकारी.

**दिवाणसाहेब** स्त्री. (बायकी) नवऱ्याची बहीण; नणंद.

**दिवाणा–ना** वि. १. वेडा; पिसाटलेला. २. मूर्ख; निरंकुश. [फा.दीवान]

**दिवाणी** वि. १. मुलकी (कचेरी, खटला, बाब). २. खाजगी किंवा सार्वजनिक हक्कासंबंधाचा; (इं.)सिव्हिल. [फा.दिवानी]

**दिवाणी झाप** लहान जातीच्या ताडाच्या फांद्या; सरकारी ऐनजिनसी कर म्हणून द्यावयाच्या लहान फांद्या.(को.)

**दिवाते** न. शेतात काम करीत असताना खाण्यासाठी मजुराने नेलेले अन्न; न्याहारी; शिदोरी.(को.) [सं.दिवा + अद्]

**दिवादांडी** स्त्री. समुद्रात धोक्याची सूचना दाखविणारा दिवा असलेले उंच घर; दीपगृह; दीपस्तंभ.

**दिवादिवस–से** न. खळे पुजणे; रासुंडा करणे.(व.)

**दिवाभीत** पु. १. घुबड. २. (ल.) चोर. ३. (ल.) लाजाळू. [सं.]

**दिवार–ल–ळ** स्त्री.१. भिंत. २.(शिंपी धंदा) टोपीची उंची. [फा.दीवार]

**दिवारगिरी** स्त्री. भिंतीला लावण्याचा दिवा; शामदान; त्याचा आकडा.

**दिवारतोडी** वि. तट फोडणारी (तोफ).

**दिवा लावणे** शिडीच्या खेळात भट्टा रेषेजवळ पडला असता त्याजवळ भट्टा लावून खेळणाऱ्याला अडचण उत्पन्न करणे.

**दिवा(वे)लावू–व्या** वि.(ल.) कुप्रसिद्ध; ज्याच्याबद्दल फार बोभाटा झाला आहे असा.

**दिवाळखोर** वि. उधळ्या; दिवाळे काढणारा.

**दिवाळखोरी** स्त्री. १. उधळपट्टी. २. दिवाळे वाजण्यासारखी स्थिती.

**दिवाळशीप** न. (कृष्णकमळासारखे) एक पांढरे रानफूल. (ठाकरी)

**दिवाळसण** पु. लग्न झाल्यानंतरच्या पहिल्या दिवाळीला जावई व त्याच्या घरची मंडळी बोलावून त्यांना मुलीच्या बापाने मेजवान्या, पोशाख, देणगी इ. देणे.

**दिवाळा–ळ्या–ळी घोडा–डी** १. ज्याच्या चंदीमुळे मालकाचे दिवाळे निघेल असा, फार खर्च लागणारा घोडा. २. (ल.) मोठा व सुंदर घोडा-घोडी.

**दिवाळी** स्त्री. १.अश्विन वद्य त्रयोदशी (धनत्रयोदशी) पासून कार्तिक शुद्ध द्वितीये(भाऊबीजे)पर्यंतचा सण. २. मार्गशीर्ष शुद्ध प्रतिपदा. ३. (ल.) चंगळ; ख्यालीखुशाली; चैन. ४. (ल.) मेजवानीतील पक्वान्नांची चंगळ; रेलचेल. [सं.दीपावली]

**दिवाळी** स्त्री. कडू दोडकीचा वेल. हा भाद्रपद व आश्विन महिन्यात फुलतो. पाने औषधी असतात.

**दिवाळीचे साल** कार्तिक शुद्ध प्रतिपदेला सुरू होणारे वर्ष; व्यापारी वर्ष.

**दिवाळे–ळू** न. १.(जुन्या काळी दिवाळे काढावयाचे असताना ते काढणारा आपल्या दुकानाच्या उंबऱ्यात, दारात एक शेणाचा दिवा लावून ठेवीत असे त्यावरून) नादारी; भांगोरे; सावकारांना देण्यासाठी जवळ काही नसणे; देणेदार कफल्लक बनणे. (क्रि.निघणे, काढणे, वाजणे.). २. (ल.) कंगालपणा; काही नसणे; दारिद्र्य. ३. संपणे; (जिन्नस, खाद्यपदार्थ) सरणे; केलेले अन्न संपून यजमानाची होणारी फजिती. ४.निंदा; टवाळी.

**दिवाळे** न. दिवाळीचे, कडू दोडकीचे फूल, फळ.

**दिवी** स्त्री. १. ठाणवई; लामणदिवा; पहा: **दिवली**. २. (सामा.) दिवा: 'दिहा दिवीं । मीं तिहीं लोकीं लावीं ।' - शिव ८९८. ३. मशाल: 'तयां तत्त्वज्ञां चोखटां । दिवी पोता साची सुभटा ।' - ज्ञा १०.१४२.

**दिवे** न. नदी किंवा खाडीतील लहानसे बेट.

**दिवे** न. एक प्रकारच्या झाडाचे तिखट मूळ. हे डांग प्रांतात खातात.

**दिवे, दिवेपंचक** पु. पहा : **दिवा** ४

**दिवे ओवाळा–ळ्या** वि. (निंदार्थी) दिवे ओवाळण्यायोग्य; मूर्ख; दिवटा.

**दिवेल** न. १. दिव्यातील तेल. २. एरंडेल. (गु.)

**दिवेलाग(व)ण–णी** स्त्री. १. दिवे लागण्याची, संध्याकाळची वेळ. २. दिवे लावणे; उजेड करणे; प्रकाश पाडणे.

**दिवेलावणी** स्त्री. (ल.) उजाड गावात वस्ती करणे; गाव वसविणे.

**दिवेलावणीचा कौल** उजाड प्रांतात वस्ती करताना काही काळापर्यंत कर वसूल न करण्याबद्दलचे सरकारी आज्ञापत्र, हमी, कौल.

**दिवेलावणे** न. (तांब्याचा) लहान दिवा.

**दिवे सलामी** पहा : **दिवटी जोहार**

**दिव्दिव्से** न. खळ्यातून दाणे घरी आणताना खळ्यात केला जाणारा समारंभ. यात कणकीचे दिवे करून ते तेथे थोडा वेळ लावून ठेवून नंतर धान्यात मिसळतात. (व.) [सं.दीप]

**दिव्य** न. १. आपल्या खरेपणाची साक्ष पटवून देण्यासाठी विशिष्ट देहदंडाची कृती करणे; शपथेचा एक प्रकार, निर्णयाची एक कसोटी. उदा. अग्निदिव्य. २. (ल.) कडक परीक्षा; कठीण प्रसंग.[सं.] (वा.) ० **उतरणे** – कसोटीला उतरणे; खरा ठरणे. ० **लागणे** – खोटा ठरणे. **दिव्यातून, दिव्याला उतरणे** – मोठ्या संकटातून सुरक्षितपणे बाहेर पडणे.

**दिव्य** वि. १. दैवी. २. अतिशय सुंदर; सुरेख; लावण्यसंपन्न. ३. लोकोत्तर; अलौकिक: 'दिव्यौषध जैसे रोगिया।' - ज्ञा १७.३९३. ४. आत्म्याविषयीचे (ज्ञान इ.). [सं.]

**दिव्यचक्षू–दृष्टी** न. स्त्री. अज्ञान; दृष्टीआड असणाऱ्या वस्तू पाहण्याची दैवी दृष्टी; ज्ञानदृष्टी.

वि. दैवी दृष्टी असणारा. [सं.]

**दिव्य पक्ष** एकरंगी व ज्याच्या अंगावर कोठेही भोवरा नाही असा (घोडा). हा सुलक्षणी समजतात.– अश्वप १.९१.

**दिव्यमार्ग** पु. तंत्रमार्ग; शाक्तपंथ: 'कोण्ही दिव्यमार्गीचीं आलीं असति' लीचउ ११. [सं.]

**दिव्य वर्ष** देवांचे, ब्रह्मदेवाचे वर्ष.

**दिव्यज्ञान** न.१. अतींद्रिय ज्ञान. २. ईश्वरी ज्ञान. ३. आत्मज्ञान.
**दिव्याची अवस** आषाढी अमावास्या. या दिवशी दिव्यांची पूजा करतात व दिव्याच्या आकाराचे पक्वान्न करून नैवेद्य दाखवतात व खातात.
**दिव्योदक** न. वर्षाजल; पावसाचे भांड्यात धरलेले पाणी. [सं.]
**दिव्योळी** स्त्री.योगशास्त्राची एक परंपरा: 'वज्रोळी : अमरोळी : सिद्धोळी: दिव्योळी: इया च्यान्ही ओळी नाथांचिया' – लीचउ ४८६. [सं. दिव्य + आवली]
**दिशा** स्त्री. १. दिग्विभाग; पूर्व, पश्चिम इ. आठ दिशा; आकाशाची पृथ्वीकडची बाजू. २. प्रांत; प्रदेश. ३. रीत; प्रकार; मार्ग (कामाचा इ.).[सं.] (वा.) ० **कोंडणे** – अवष्टंभ, अवरोध होणे: 'मुरडा हागवण उन्हाळे । दिशा कोंडतां आंदोळे ।' – दास ३.६.३०. ० **फाकणे, फुटणे, पालटणे, उघडणे** –उष:काल होणे; उजाडणे. ० **भारणे, बांधणे** – मंत्रसामर्थ्याने चोहीकडचा प्रदेश, लोक यांची नजरबंदी करणे; कोणालाही आपले कृत्य कळणार नाही असे करणे. **दिशेस जाणे** – (प्र.) बहिर्दिशेला, शौचाला जाणे. **चारही दिशा मोकळ्या होणे** – (कोठेही भटकणे, भीक मागणे इ. साठी) थोडीही आडकाठी नसणे; अंकुश नाहीसा होणे. **दशदिशा पळणे** – पांगापांग होणे; त्रेधा उडणे.
**दिशाचक्र** न. क्षितिज: 'अथवा दशदिशा समाकुळ। दिशाचक्र ।'–ज्ञा ११.३१५.
**दिशादर्शक** न. १. होकायंत्र. २.कार्याची दिशा दाखवणारा.
**दिशादाह** पु. दिशा पेटल्याप्रमाणे क्षितिजाजवळ आकाश आरक्त होणे: 'चार घटकापर्यंत लाल असते. मागती निवळते. दिशादाह होतो. दुश्चिन्न आहे?'– पेद २२.३६४. [सं. दिग्धाह]
**दिशाभूल–भुली** स्त्री.१. दिशा, वाट चुकणे. २.(ल.) गोंधळ उडणे, होणे; भुरळ पडणे.
**दिशायंत्र** न. होकायंत्र.
**दिशी** शअ. फट्, खट्, चर् इ. अनुकरणवाचक शब्दांपुढे तो तो ध्वनी दाखविण्यासाठी हा प्रत्यय जोडतात. उदा. खाड–ताड–दिशी.
**दिशीचं, दिशी** क्रिवि. १.दिवसाउजेडी; दिवस असताना. २. (ल.) योग्य वेळी; वेळेवर ; उशीर न लावता.(को.)
**दिष्ट, दिष्टावा** स्त्री. पु. नजर; दृष्ट.(गो.) [सं.दृष्टी]
**दिष्टधारा** स्त्री. एकाच दिशेने जाणारा विजेचा प्रवाह;(इं.) डायरेक्ट करंट.
**दिस** स्त्री.दिशा: 'भववार्ता देश दिसे । दवडणे जे'– ज्ञा १६.७०.[सं.दिशा]
**दिस** पु. दिवस: 'ते त्या दिसा पासुनि नित्य देवी । अनन्यभावें कमलेस सेवी ।'– सारुह २.१७.[सं.दिवस](वा.) ०**कासऱ्याला येणे** – सूर्य हातभर वर येणे. **दिसगत होणे** – दिवंगत होणे; मरणे.
**दिसकीर्ण्या** वि. रात्री चावला तर मनुष्य सूर्यकिरण बघणार नाही, ताबडतोब मरेल इतका विषारी, रंग काळा, हातभर लांब असा साप. खडेनाग. – बदलापूर ३४७.
**दिसणे** सक्रि. १. नजरेला येणे; दृष्टीला पडणे. २. अनुमानाने ज्ञान होणे; कळणे; समजणे; ३. भासणे; वाटणे. ४. रागरंग दिसणे; आशा वाटायला लागणे; आव, डौल दाखवणे. ५.स्पष्ट, स्वच्छ, व्यक्त, उघड असणे. ६. मनाला वाटणे. [सं.दृश्]
**दिसल** पु. शेत कापणाऱ्याची रोजंदारी. (गो.)
**दिसवडी** क्रिवि. १. सर्व दिवस; दिवसभर. २.दररोज; रोजी: 'यैसें विचारुनि दिसवडि येक येक बेडुक दे।' – पंच ४.२.
**दिसं(सें)दीस** क्रिवि. दिवसेंदिवस: 'दिसंदीस अभ्यंतरीं गर्व सांचे ।' – राम ११४; 'शशिबिंब दिसेंदिसें । हारपत अंवसे । नाहींचि होय ।'– ज्ञा १२.१०८.
**दिसा** क्रिवि. १. दिवसा. २. दिवसांत: 'जाला तो केवळ दाहा दिसां।' – रामदासी २.८७. [सं.दिवस]
**दिसापट–टी** क्रिवि. दशदिशा; सैरावैरा : 'महाभ्रांती जीवीं धरोंनी । जाहाले दिसापट ।' –ख्रिपु १.२१.७९.
पु.नाश; धुळधाण.
**दिह, दिहाडा** पु. दिवस : 'सत्यलोकीं दिहाचि दिन थोकला ।' – ज्ञा १.१५८; 'माझा एकलु दिहाडा सोनेयाचा जातु आहे' – लीचपू ४७७. [सं.दिवस]
**दिह** पु.गाव; ग्राम. [फा.]
**दिहात** पु. गावांचा समुदाय; एका मालकाची अनेक गावे असताना योजतात. [फा.दिह् चे अरबी अव.]
**दिंड** न. १. कापडाचा गठ्ठा, बस्ता (हा साधारणत: लांबट बांधलेला असतो).२.नागपंचमीच्या दिवशीचे पुरण घालून केलेले पक्वान्न; गाठोडे. ३. (मुलीच्या पाठवणीच्या दिवशी) नवऱ्यामुलाकडील मंडळींना केलेला आहेर. ४. कुळव, पाभर, कोळपे इ.आऊतांचा आडवा लाकडाचा तुकडा; (सामा.) लाकडाचा ठोकळा; ओंडा. ५. खांब; खुंट. ६. (विणकाम) चातीच्या (स्पिंडल)मध्यभागी, रहाटावरील दोरी, पट्टा अडकवण्यासाठी केलेली जागा. हे सुताला अगर कापडाला चिकट पदार्थ लावून चातीच्या मध्यभागी गुंडाळीसारखे केलेले असते. ७.केळीचे काले. (गो.) ८. उसाच्या चरकाची लाट. ९. नांगरणीनंतर ढेकळे फोडण्याचे वजनदार हत्यार. [क.डीडुं]
**दिंडा** वि. (ल.) फार मोठी; वाजवीपेक्षा मोठी.
**दिंडा** पु. एक रानझाड. याच्या दोन जाती असून ज्या झाडाच्या काठ्या उंच न होता जमिनीबरोबर असतात त्यास दिंडी म्हणतात व ज्याच्या काठ्या उंच जातात त्यास दिंडा म्हणतात. – वगु ४.२२. याची काठी गरम करून आपटली असता स्फोट होऊन आवाज होतो. पाने कातरलेली, भाजीसाठी वापर. मूळ कंदमय. [क.दिंड]
**दिंडी–ड** स्त्री. मोठ्या दाराला केलेली लहानशी झाप, खिडकी, दरवाजा. [क.दिड्डि]
**दिंडी** स्त्री. १. लहान तंबोरी; एक वाद्य; वीणा: 'हातीं टाळ दिंडी मुखीं नाम गाणें ।' – तुगा ३४७. २. मिरवणुकीतील निशाणावर हनुमान इ. चे काढलेले चित्र, आकृती किंवा ते निशाण. ३. (देव, ग्रंथ इ.ची) मिरवणूक; भजनी मेळा; छबीना. ४. मराठी काव्यातील एक वृत्त. ५. डोणी; दगडाचे बादलीच्या आकाराचे पात्र. [क.दिड्डि]
**दिंडीगाण** पु. १.दिंडी हे वाद्य वाजवून भिक्षा मागणारा: 'वासुदेव दिंडीगाण । प्रसाद मागूं आले जाण ।' – ललित. २. दिंडी या वाद्यावर

म्हणण्याचे गाणे.

**दिंडीदरवाजा** पु. दिंडी असणारा मोठा दरवाजा. हा मोठ्या वाड्यांना असतो.

**दिंडीपताका** स्त्री. अव. १. वाद्य वगैरे. २. यावरून (समुच्चयार्थी) मूर्तीची मिरवणूक (मंडळी, पताका, दिंड्या, झांजा मिळून); पताका, मृदंग इ. घेऊन मूर्तीच्या अथवा देवळाच्या भोवताली प्रदक्षिणा घालणाऱ्या लोकांची मिरवणूक. (क्रि. काढणे, घालणे, निघणे, फिरणे, मिरवणे.)

**दिंबी–बी** स्त्री. १. गुडघा. २. गुडघे मोडून बसणे. (गो.)

**दिंभ** न. खांब.

**दी** पु. दिवस : 'एथौनी जादवांचे दी भलें ।' – शिव ७०. [सं.दिव]

**दीकरा** पु. मुलगा; डिगरा. (खा.) [गु.दिकरो]

**दीकुळ** न.युग्म; जोडपे: 'नारीकुंजाचीं दीकुळें'– ऋव ४३१. [सं.द्वि + कुल]

**दीख** पु. डिंक. (गो.)

**दीघड** वि. उंच : 'दीघडु ना खुजटा' – ज्ञा ११.२७३. [सं.दीर्घ]

**दीघडी** उंच घर : 'उतरदखीण दीघडीया'– लीचपू २०. [सं.दीर्घ]

**दीघल** न. शस्त्रविशेष; भाला: 'विचाराचेनि दीघलें : खोचावा संसारशत्रु'– उगी २४४. [सं.दीर्घ]

**दीघीया** वि. दीर्घ; लांब: 'जेथ चिंतामणीचें दळवाडें: उमाणुनि दीधिया सपिंडें उभिलें बहुतें कोडें : विश्वकर्मेनि' – शिव ३४६. [सं.दीर्घ]

**दीघुम** उंट : 'तुम्हां जाली वाकमु दीघमुची वानी : दीघुम आलें... वाकुम गेलें'– लीचउ ५०१. [सं.दीर्घ]

**दीठ** स्त्री. १. नजर; अवलोकनशक्ती. २. दृष्ट; दिठी. (व.,ना.)[सं.दृष्टी]

**दीड–ढ** वि. एक पूर्णांक एक द्वितीयांश; एक आणि अर्धा. [हिं.डेढ]

**दीड कानाचा** वि. बहिरट; कमी ऐकू येणारा.

**दीड डोळ्याचा** वि. ज्याला अगदी कमी दिसते असा.

**दीडतांदुळ** पु. (ल.) स्वत:चे कार्य, हेतू, बेत.

**दीड दमडीचा** वि. क्षुद्र; हलका; कमी योग्यतेचा.

**दीड पायाचा** वि.लंगडा.

**दीडशहाणा** वि. शहाणपणाचा अभिमान मिरवणारा; मूर्ख.

**दीड हाताचा** वि. थोटा.

**दीदार** न. तुफान. (मुंबई)

**दीन** पु. १. इस्लाम; मुसलमानी धर्म: 'हजरतांनी दीनचा पक्ष सोडून मऱ्हाठियांचा पक्ष धरिला आहे हे गोष्ट मुसलमानीस ठीक नाहीं.'– दिमरा १.२६७. २. मुसलमानांची युद्धगर्जना. [अर.]

**दीन** वि. १.नम्र; गरीब; लीन. २. अनुकंपनीय; दबेल; दुबळा; केविलवाणा (स्वर, मुद्रा इ.).३.गरीब; दरिद्री; गरजू. [सं.]

**दीन इमान** धर्म : 'हिंदूंचें राज्य झालें त्या दिवसापासून आमचा दीन–इमान सर्व बुडाला.' – दिमरा २.७९.

**दीनदारी** स्त्री. ईश्वरभक्ती.

**दीनदुनिया** स्त्री. १. सारे जग; समाज: 'तुम्ही शाबूत तर दीनदुनियेचें भय नाहीं.' – ऐलेसं १.१७०. २. धर्म आणि लोकव्यवहार.

**दीनवाणा** वि. केविलवाणा; कीव, करुणा उत्पन्न करणारा.

**दीप** पु. १. दिवा; प्रकाशसाधन. २. दिव्याचे आधान; लामणदिवा. ३. (ल.) प्रकाशक वस्तू, व्याख्यान, लेखन, विवरण, फोड (वर्णन इ.). ४. (संगीत) एक राग; दीपक. हा राग आळवल्यास दिवे लागतात अशी समजूत आहे. [सं.]

**दीपक** पु. १. दिवा. २. (संगीत) एक राग; गानसमय सायंकाळ. ३. काव्यातील एक अलंकार. ४. मदन.
वि. १. वाढवणारा; फुलवणारा; चेतवणारा. २. पाचक; वर्धक (औषध, अन्न). [सं.]

**दीपकलिका, दीपकळा** स्त्री. दिव्याची ज्योत. [सं.]

**दीपकल्याण** पु. (संगीत) एक राग. पहा: **दीपक** २

**दीपकिट्ट** न. दिव्याची काजळी. [सं.]

**दीपगृह** न. पहा : **दिवादांडी** [सं.]

**दीपचंदी** स्त्री. १. होरीसारखी गाण्यातील एक चीज. २. एक ताल. यात चौदा मात्रा व चार विभाग असतात. [सं.]

**दीपचित्र** न. मॅजिक लँटर्न किंवा प्रोजेक्टरमध्ये फ्रेम केलेले सरकवून घालण्याचे चित्र.

**दीपडे** न. लहान दिवा: 'निवृत्ति दीपडें वैकुंठ साबडें ' – निगा ११४. [सं.दीप]

**दीपणे** अक्रि. १. पेटणे; प्रज्वलित होणे: 'जेयाचेनि विवेक किरण संगें । उन्मेख सूर्यकांत स्फुल्लिंगें । दीपले जाळीति दांगें । संसाराचीं ।' – ज्ञा १६.८. २. पहा: **दिपणे** [सं.दीपन]

**दी(दि)पतकार** वि. उजेड करणारा: 'दिव्या दिव्या दिपत्कार.' – मसाप २.२३३. [सं.दीप]

**दीपदर्शन** न. १. संध्याकाळी दिवे लावताक्षणी दिव्याला करण्याचा नमस्कार.२. दिवेलावणीची वेळ. [सं.]

**दीपदान** न. और्ध्वदेहिक संस्काराच्या वेळी अकराव्या दिवशी देण्याच्या दानांपैकी एक दान; इतर धार्मिक व्रत–वैकल्याच्या वेळी ब्राह्मणाला देण्याचे दिव्याचे दान. [सं.]

**दीपद्राक्ष** न. काळे द्राक्ष.

**दीपन** न. १. (शब्दश: व ल.) पेटवणे; चेतवणे; प्रज्वलित करणे; पाचन 'जें अग्नीचें दीपन । जें चंद्राचें जीवन ।' – ज्ञा १३.९२६. २. भूक वाढवण्यासाठी औषध; शक्तिवर्धक औषध. ३. ताप; आग: 'आंगीं न लावा गे चंदन । तेणें अधिकचि होतसे दीपन ।'– एरुस्व ५.७२. ४. मंत्राचा वापर करणे.

**दीपनौका** स्त्री. वर धोक्याचा लाल दिवा असलेले, नांगरलेले जहाज.

**दीपमाळ** स्त्री. १.दिव्यांची ओळ. २. देवळापुढे उत्सवात दिवे ठेवण्यासाठी बांधलेला दगडी खांब. ३. (उप.) उंच व किडकिडीत (सुरेख नसणारी) स्त्री. ४. एक झाड; माथेशूळ. हे झाड सरळ पुरुषभर उंच वाढते. पाने कात्रेदार. यास हाताचे अंतरावर मुळापासून एकावर एक, फुलांनी युक्त असे झेंडू लागतात. या झेंडूवर तांबूस रंगाची बारीक फुलें येतात. – वगु ४.२२.

**दीपमूळक** न. दिव्याची मूळ ज्योत: 'नातरी दीपमूळकीं । दीपशिखा अनेकीं ।' – ज्ञा १४.५५.

**दीपरज्ञा** स्त्री. दिव्यांची रांग; दीपमाला.(गो.)

**दीपवडू** पु. लहान दिवा : 'कीं दीपवडु अंधकार प्रकाशु करी ।' – ख्रिपु १.१.६९.

**दीपव(वा)त, दीपत** स्त्री. १. देवापुढे तूपवात लावून ठेवलेला दिवा; सांजवात; तेलवात. (क्रि. लावणे, धरणे.). (को.) २.गाय, म्हैस प्रथम व्याली म्हणजे तिच्या दुधापासून केलेल्या तुपाचा दिवा देवापुढे लावणे. तो लावेपर्यंत त्या जनावराच्या दुभत्याचा उपभोग घेत नाहीत.

**दीपवती–वर्ति** स्त्री.दिव्याची वात : 'प्रतापाची दीपवती । उजळोनी ।'– शिव ७३९. [सं.दीपवर्तिका]

**दीपवृक्ष** पु. १. दिव्याची ठाणवई; खांब. २.दिव्याचे झाड. [सं.]

**दीपशाखा** स्त्री. दोन-तीन फाटे असलेली मशाल, टेंभा. [सं.]

**दीपशिखा** स्त्री. दिव्याची ज्योत: 'दीपशिखा अनेकीं ।' – ज्ञा १४.५५. [सं.]

**दीपस्तंभ** पु. पहा : **दिवादांडी**

**दीपाराधन** न. आरती: 'दीपाराधनें निलांजनें । देव ओवाळिजे जने ।' – दास १६.५.२७. [सं.]

**दीपावली, दिप(पा)वा(व)ळी** स्त्री. १. दिवाळी. २. दिव्यांची रांग; आरास. [सं.दीपावली]

**दीपिका** स्त्री. १. समई; दिव्याची ठाणवई. २. लहान मशाल; दिवटी: 'तरी दीपिका पाजळाव्या सत्वर ।' – रावि २७.६५. ३.ज्योती: 'जे प्रपंचाची भूमिका । विपरीत ज्ञानदीपिका । सांचली ते ।' – ज्ञा १५.८२. [सं.]

**दीपी** पु. समुद्र. – मनको.

**दी–पेस्तर** क्रिवि. उद्या; पुढे : 'हें दीपेस्तर रोशन होईल.' – इंम ६८. [फा.]

**दीपोत्सव** पु. १. दिवाळी सण; दिवे लावण्याचा उत्सव. २. रोषणाई. ३. दिवाळे; नादारी. [सं.]

**दीप्त** वि. १. पेटलेले; चेतवलेले; प्रज्वलित; उज्वल. २. चकाकणारे; प्रकाशणारे. ३. (ल.) सुरेख; नामी; उत्कृष्ट. [सं.]

**दीप्त(प्ति)गोल** पु. आपल्या डोळ्यांना दिसणारी सूर्याची चकचकीत तबकडी म्हणजेच दीप्तिगोल. तिचे तापमान सुमारे ६००० सें. आहे.– निसर्गाचा प्रपंच पृ.१०२.

**दीप्ती** स्त्री. १. उजेड; प्रकाश; तेज; कांती. २.अग्नी: 'दीप्ति जठरीं किरीटी । मीचि जालों ।' – ज्ञा १५.४०७. [सं.]

**दीमीळणी – र्णी** क्रिवि. दिवस मावळते वेळी ; संध्याकाळी: 'दीमीळर्णी गांवाचां कडिसरां टेकावें' – लीचउ ५४. [सं.दिव् + मीलन]

**दीर** पु. नवऱ्याचा भाऊ. [सं.देवर]

**दीर्घ** वि. १. लांब (काळ, स्थान या संबंधात); बराच काळ टिकणारा; बरेच विस्तृत लांबीचे स्थळ व्यापणारा. २. लांब; बराच वेळ चालू असणारा; बराच काळ लागणारा (उच्चार, स्वर). ३. खोल; गंभीर; भारी (विचार). [सं.]

**दीर्घचतुरस्र** न. समांतरभुजचौकोन; रुंदीपेक्षा लांबी अधिक असणारा चतुष्कोन, चौकोन.
वि. समांतरभुज चौकोनासारखा. [सं.]

**दीर्घछंदी** वि. अतिशय नादिष्ट.

**दीर्घदर्शी–दृष्टी** वि. १. दूरदृष्टी असणारा; धूर्त; मागचा पुढचा विचार करून वागणारा. २. भविष्यज्ञानी. [सं.]

**दीर्घदंड** वि. साष्टांग (नमस्कार): 'दीर्घदंड नमस्कार घालूनि ।' – सप्र ३.७०. [सं.]

**दीर्घनिद्रा** स्त्री. मृत्यू; काळझोप. [सं.]

**दीर्घशंका** स्त्री. मलविसर्जन; शौच; परसाकडे जाणे. [सं.]

**दीर्घश्रवा** पु. वि. (ल.) गाढव; अडाणी: 'राज्यविषयक गोष्टींत मात्र आम्ही दीर्घश्रवे होतों.' –आगरकर लेखसंग्रह १२६.

**दीर्घसंधानी** वि. १. व्यापक विचाराचा; दूरवर लक्ष ठेवणारा. २. महत्त्वाकांक्षी. ३. सर्व ठिकाणी संधान बांधणारा.

**दीर्घसूचना** स्त्री. आधीपासून विचार करणे: 'म्हणौन दीर्घसूचनेचे लोक।' –दास १२.१.१५.

**दीर्घसूत्र** न. विस्तार; चर्पटपंजरी; पाल्हाळ. (क्रि.लावणे.) [सं.]

**दीर्घसूत्र–त्री** वि. चेंगट; विलंब, उशीर लावणारा: 'सत्य वदति कैचें राज्य क्लीबास दीर्घसूत्रास ।' – मोशांति ३.१८. [सं.]

**दीर्घ स्वर** १. दोन मात्रांच्या उच्चारकालाचे स्वर. उदा. आ, ई, ऊ, ॠ, ॡ, ए, ऐ, ओ,औ हे स्वर. २. लांब सूर; मोठा आवाज. [सं.]

**दीर्घिका** स्त्री. १. पायऱ्यांची विहीर; मोठे तळे; पुष्करिणी. २.आकाशातील विशेष तारामंडळ. ३.सज्जा; गॅलरी.

**दीव–प** न. द्वीप; पृथ्वीचा भाग; खंड. [सं.द्वीप]

**दीव्यालांबणी** स्त्री. लामणदिवा.

**दीस** पु. दिवस. [सं.दिवस]

**दीसधारा** पु. दिवसाचा कामाचा मोबदला.

**दीक्षा** स्त्री. १. व्रताच्या कालावधीतील नियमाचरण. (क्रि. घेणे,देणे.) २. आचरणाची रीत; नेम; क्रम. ( क्रि. धरणे). ३. (ल.) मोठे काम स्वीकारणे. (क्रि. घेणे). ४. एखाद्या पंथाचा किंवा कलेचा स्वीकार करणे, अनुयायी बनणे. (क्रि. करणे, होणे.). ५. व्रत : 'असेचि धरली नयच्युतदमार्थ दीक्षा करीं ।' – केका १६. ६. उपदेश; शिक्षण.[सं.]

**दीक्षागुरु–रू** वि. दीक्षा, उपदेश, शिकवण देणारा पुरुष. [सं.]

**दीक्षान्त समारोह** पदवीदान समारंभ.

**दीक्षित** पु. वि. १. सोमयाग करणारा; ज्याने यज्ञ केला आहे असा पुरुष किंवा त्याचा वंशज: 'तेथ सोहमंत्रें दीक्षितीं । इंद्रियकर्माचिया आहुती ।'– ज्ञा ४.१३७. २. (ल.)धर्मकृत्यांत गुंतलेला किंवा कलाकौशल्य, शास्त्र यांत प्रवीण असलेला. ३. (ल.) कुशल; अतिशय हुशार; मर्मज्ञ. ४. दीक्षा घेतलेला. [सं.]

**दु** उप. दोन या शब्दाबद्दल समासात पूर्वपदी योजावयाचे रूप. उदा. दुकलमी, दुखंड, दुभाषी, दुतर्फा इ. [सं.द्वि]

**दु** अ.अभाव; निकृष्टपणा; दुष्टपणा इ. चे वाचक. दुर् या उपसर्गाबद्दल समासात योजण्याचे मराठी रूप. [सं.दुर्]

**दुअमल** पु. एकाच गावावर असलेला दोन निरनिराळ्या सत्तांचा अंमल.

**दुअंगी** वि. दुहेरी; दोन्ही बाजूंनी; दोन प्रकारांनी (उपयुक्त); परस्परविरुद्ध गुण असलेले.

**दुआड** वि. कठीण; दुस्तर: 'काम्यकर्मे दुआडें' – ज्ञा १८.५९८. [क. दोड्डा]

**दुआब** पु. दोन नद्यांच्या चिमट्यामधील संगमाच्या अलीकडील प्रदेश. [फा.दोआब]

**दुआसन** न. घोड्यावरील खोगीर: 'बुद्धि दुआसन घेतलें कैसें: तिहीं लोकीं' – रुस्वन ६४५.

**दुआळणे** उक्रि. दुखवणे; पिटणे; पीडा देणे: 'तंवं हडपिनी वारिकी दुआळिलीं ।' – शिव ५५८.

**दुआळी** स्त्री. पीडा; क्लेश; दुर्बुद्धी; पीडा करण्याची बुद्धी. – मनको.

**दुए(वे)त** स्त्री. दुपावणे; नासवणे; गर्भपात.

**दुकटा** वि. दुसरा; बरोबर कोणी सोबतीला आहे असा.

**दुकटे** न. १. गवताला येणारे दोन फाट्यांचे केसर. (राजा.) २. जुळे.

**दुकड** वि. अर्धवट; अर्धा. (व.)

**दुकडी** वि. (धरण्यासाठी) दोन कड्या असलेले भांडे.

**दुकर** स्त्री. डुकरीण. (गो.)

**दुक(क्क)ल** स्त्री. १. (गंजिफा) राजा, वजीर व त्याखालील ओळीने असतील ती पाने समुच्चयाने; राजा व वजीर ही पाने पडून गेल्यावर त्याखालील हुकूम जे ओळीने असतील ते समुच्चयाने. दुकलीतील शेवटचे पान हुकूम असतो. त्याशिवाय वरील सर्व पाने दुक्कल होत. २.द्वय; जोडी.३. कागदाचा पतंग. (वा.) ० **जळणे** – (गंजिफा) आपल्याकडे खेळण्याची पाळी आल्यावर आपल्याकडे असलेली दुक्कल खेळायची राहून जर आपण देणी देणे अथवा दुसरा खेळ खेळला, तर ती दुकलीची पाने निरुपयोगी होतात. अशा वेळी दुकलीच्या पानांतील शेवटचे पान हुकूम होतो व तोच उपयोगात आणता येतो.

**दुकलमी** वि. १. दोन रकान्यांत, दोन पक्षांनी, व्यक्तींनी लिहिलेले; दोन लेखण्यांनी लिहिलेले (पत्रक). २. दोन कलमांचे, परिच्छेदांचे (पत्र, ठराव इ.).

**दुकवळा** पु. जोडी : 'दुकवळा मयोरांचा' – रुस्व ७४७.

**दुकसबी,दुकामी** वि. दोन धंद्यांचे, कामांचे ज्ञान, कौशल्य असलेला. २. (ल.)हुशार; कर्तबगार.

**दुक(का)ळ** पहा : **दुष्काळ**

**दुकळणे, दुकळावणे** अक्रि. (क.) (निंदार्थी) (दुष्काळ इ.मुळे ) अन्नासाठी हपापणे. (अधाशाप्रमाणे खाणाऱ्याला किंवा घरी यथेच्छ खायला असूनही घरोघर जेवायला जाणाऱ्याला उद्देशून योजतात.) :'नाहीं दुकळलों अन्ना । परि या मान जनार्दना ।'– तुगा १०४८.

**दुकळा, दुकाळ्या** वि. दुष्काळातला; दरिद्रीपणाने वागणारा. (गो.)

**दुकळाचा पाया** १. दुष्काळाचे पूर्वचिन्ह. २. (व्यापक) नाशाचे, दारिद्र्याचे पूर्वलक्षण.

**दुकंडा** पु.दोन गंड्यांचे, दोन कवड्यांचे चलन; दोन गंडे; टोली: 'दर चौकास दर बैलास कवडी दुकंडाप्रमाणे राजश्री यशवंतराव पवार याचे अमलांत येऊन रखवाली करीत होतें .' – वाडबाबा १.२५.

**दुकाटी** वि. दोन काट्यांचे (कुलूप, टाळे).

**दुकाठी** वि. दोन डोलकाठ्यांचे (जहाज, गलबत).

**दुकान** न. १. विक्रीसाठी वस्तू मांडून बसण्यासाठी केलेले ठिकाण, जागा; विक्रीची जागा; मांडामांड. २. सोनार, लोहार, कासार वगैरेंचे वस्तू घडवण्यासाठी असणारे ठिकाण, कारखाना. ३. (ल.) विकण्यासाठी मांडून ठेवलेल्या वस्तूंचा समुदाय. ४. लोहार, कासार इ. ची उपकरणे, सामग्री. ५. काही उद्देशाने अनेक वस्तूंचा पडलेला, मांडलेला पसारा. ६. दारूचा पिठा; गुत्ता. (गो.) ७. वस्तूंचे मांडलेले प्रदर्शन; बाजार. [फा.; अर. दुकान्] (वा.) ० **घालणे, मांडणे, रचणे, स्थापणे** – (एखाद्या स्त्रीने) उघडपणे धन, पैसा घेऊन व्यभिचार करू लागणे, कसबिणीचा धंदा करू लागणे. ० **पसरणे** – पसारा मांडणे : 'रे ! काय दवाग्निपुढें पसरूनि दुकान कानन रहातें ।' – मोउद्योग १३.१०८. ०**मोडणे** – दुकान बंद करणे; धंदा, व्यापार इ.पासून निवृत्त होणे.

**दुकानदार** पु. १. दुकानाचा मालक; दुकान चालविणारा माणूस; वाणी. २.दारू विकणारा. (गो.)

**दुकानदारी** स्त्री. दुकानदाराचे काम; धंदा; व्यापार. [क.] (वा.) ० **फैलावणे** – (गोसावी, वेश्या इ.नी) लबाड्यांचे जाळे पसरणे; अनेकांवर पाश टाकणे.

**दुकानपट्टी** स्त्री. दुकानावरील, व्यापारावरील सरकारी कर.

**दुकानी** वि. १.दोन काने असलेली; दारू पेटवण्याची दोन भोके असलेली (बंदूक). २. उचलण्यासाठी दोन कान, कड्या असलेले (भांडे इ.).

**दुकाम** न. पुन्हा करावे लागलेले काम; दुहेरी त्रास.

**दुकार** पु. (ल.) एक आणा.

**दुकाळणे** अक्रि. महाग, दुर्लभ, दुर्मिळ होणे.

**दुकांड** स्त्री. दोन हात लांबीचे बारीक (जाळण्याच्या उपयोगाचे) लाकूड. (को.)

**दुकित्ता** वि. एकाच मजकुराची दोन (पत्रे, कागद इ.); अस्सल बरहुकूम नक्कल; दुहेरी: 'तुम्ही सांडणीस्वाराबरोबर व खिज्मतगाराबरोबर अशीं दुकित्ता पत्रें पाठविलीं.' – ऐलेसं १०. ५५०८.

**दुकी** स्त्री. (मुलांत रूढ) शाळेत उशिरा, वेळेनंतर क्रमाने तिसऱ्या येणाऱ्या मुलाच्या हातावर मारतात त्या दोन छड्या.

**दुकूल** पु. रेशमी, उंची वस्त्र: 'बळ पूजिलें कसें हो बहुमूल दुकूल रत्नहारांनीं.'– मोआदि ३२.८. [सं.]

**दुकोर** पु. डुक्कर. (गो.)

**दुक्का** पु. ज्यावर दोन चिन्हे आहेत असे गंजिफातील पान; दुव्वा; दुरी.

**दुख** न. अश्रू: 'सकळाचे रुदन येकवटले । दुखाचे लोळ मिसळलें ।' – ख्रिपु २.५०.३८. (को.) [सं.दुःख]

**दुखणाईत, दुखणारू, दुखणेकरी** वि. आजारी; रोगपीडित; बेजार.

**दुखणी** वि. दोन खणांची (इमारत, घर इ.) : 'त्यांहीमाजी असती दुखणी । द्वारकापट्टणीं तें नाही ।' – एरुस्व ३.१३.

**दुखणे** न. शारीरिक व्यथा; विकृती; आजार; व्याधी; रोग. [सं.दुःख]

**दुखणे** अक्रि. वेदना, व्यथा इ. होणे.

**दुखणे** न. दोष: 'जियें दुखणें बोलिला अनंतु' – उगी ५८३. [सं.दुस्]

**दुखणे** क्रि. दूषण देणे: 'कां जिव्हालंपटु रोगिया: अन्नें दुखी धनंजया' –

ज्ञा १८.१३५. [सं.दुस्]
**दुखदानी** वि. दु:खदायक: 'एक दुखदानी दु:खें भोगीत' – मूप्र २८२.
**दुखरण** स्त्री. इजा; दु:ख; व्यथा; वेदना. (को.)
**दुखरा** वि. नाजूक; थोड्याशा इजेने दुखणारा; अधू (अवयव).
**दुखरु–रू** न. एखादे क्षुल्लक दु:ख; दुखणे. उदा. नखुरडे इ.(राजा.)
**दुखवटा** पु. १.आपले मनुष्य मेल्याने प्राप्त होणारी दु:खावस्था; अशौच; सुतक. २. मृताच्या पुत्रादिकांना वस्त्रे देऊन त्यांचे दु:खपरिमार्जन करतात तो विधी. ३. शोकप्रदर्शन. ४. दु:ख; शोक. (को.) [सं.दु:ख]
**दुख(खा)वणे** अक्रि. (एखादा अवयव इ.) व्यथित, पीडित होणे.
**दुख(खा)व(वि)णे** सक्रि. १. दुर्भाषण, अपकार इ.नी माणसाला दु:खी करणे. २. खणणे, उकरणे, चेंगरणे, खरडणे, खापलणे, कापणे इ.प्रकारे इजा करणे; शारीरिक पीडा देणे. ३. फळे, झाडे, जमीन इ. च्या पृष्ठभागावर प्रहार करणे.
**दुखंड** वि. दोन भागांत विभागलेले, छेदलेले.
क्रिवि. दुभंग; दोन तुकडे होतील अशा तऱ्हेने दुभंगलेले. (कापणे अथवा तत्सदृश क्रियापदांबरोबर योजतात). [सं.द्वि +खण्ड]
**दुखाणू** न. गळू. (गो.)
**दुखापत** स्त्री. १. चेचणे, कापणे, ठोसा देणे, आघात करणे इ. प्रकारची इजा; दुखणे. २. यामुळे होणारे दु:ख, यातना; वेदना. ३. (कायदा) शरीराला वेदना, रोग, विकार होईल असे कृत्य. [सं.दु:ख +आपत्]
**दुखारणे** अक्रि. खेद, विषाद पावणे; दु:खी होणे; मनस्तापाने पीडणे.(को.)
**दुखार्ती** स्त्री. रोग; शारीरिक अस्वस्थता; इजा; दु:ख.
**दुखाळू** वि. १. नेहमी आजारी असणारा. २. उपदंशाचा, गरमीचा विकार असलेला.
**दुखांदा** पु. वृक्षाच्या खोडाला दोन मोठ्या खांद्या जेथे फुटलेल्या असतात तो भाग.(राजा.)
**दुखांबी** वि. १. दोन खांबांच्या आधारावर उभारलेले (घर, दालन इ.). २. दोन खांबांवर उभारलेला (तंबू, राहुटी).
**दुखांबी कैची** घराच्या छपराला आतून आधारासाठी लावण्याची विशिष्ट कैची.
**दुखी** स्त्री. दुखणे; आजार. उदा. पोटदुखी, कपाळदुखी.
**दुखुरी** वि. खुरावर खुराच्या आकाराचे अवाळू असलेला (घोडा). हा अशुभ मानतात.
**दुखेस्त** वि. दु:खदायक. (गो.)
**दुख्खा(ख्खे)रा** वि. (सांके.) पहा : **दुखाळू** २
**दुगण–न** स्त्री. (संगीत) ठाईचा निमपट काळ; नेहमी ध्रुपद गाण्याला जो काळ लागतो त्याच्या अर्ध्या काळात ते गाणे किंवा वाजविणे.
**दुग(गा)णी** स्त्री. तांब्याचे एक जुने नाणे; अर्धा पैसा : 'न लाभतां तो न मिळे दुगाणी ।' – अकक २ हरिराजकृत मुद्गलाचार्य विरचित रामार्यांचे भाषांतर १०२.
**दुगला–ळा** वि. १. अतिदुर्बळ. २. रोड; कृश. ३. ठेंगणा. ४. अशाश्वत; नश्वर: 'काय कीजती चेइलेपणीं । ... दुगळीचि ते ।' –ज्ञा १५.२१८.
**दुग(घ)स्त** न. (गंजिफा) एक पारिभाषिक शब्द. जेव्हा खेळणाऱ्यांपैकी फक्त दोघांचे हात झाले असतील तेव्हा योजतात.
**दुगाणी, दुलाचा–ची, दुला(ली–लं)च्या** स्त्री. जनावराच्या मागच्या तंगड्यांपैकी प्रत्येक. अनेकवचनात प्रयोग.( क्रि. झाडणे, मारणे इ.).
**दुगामा** स्त्री. घोड्याला शिकवण्याची एक चाल. या चालींत घोड्यानें वाढती चवडचाल चालून मानेस खमदार ठेवून पायांस लोंच करून चेहरा दोन्ही बाजूंस डोलता राखावयाचा असतो.' – अश्वप १.१९४.
**दुगुळ येणे** क्रि. जोडीने येणे.
**दुग्ध** न. १. दूध. २. रुई, वड इ.झाडांचा पांढरा चीक. [सं.]
**दुग्धशर्करा** स्त्री. (रसा.) सस्तन प्राण्याच्या दुधापासून काढलेली साखर. (इं.) लॅक्टोज्. – सेंपु २.३९०.
**दुग्धा** स्त्री. पु. १.अनिश्चितता; शंका; भ्रांती : 'हे जिवंत असतां त्यांचे राज्यांतील माणसांस दुग्धा पडेल.' – मराचिसं २५. २.कासकूस; धरसोड; कांकू; द्विविधता.
क्रिवि.(सामा.) अनिश्चितपणे; संदिग्धपणे; मोघम. [सं.द्विधा]
**दुघई** वि. दोन दालनांची, दुसोपी (घर,इमारत इ.).
**दुघड** स्त्री. रहाटगाडग्याच्या माळेला दोन दोन लोटे बांधून मध्ये एका लोट्याची जागा वगळावी असा लोटे बांधण्याचा प्रकार अथवा तशी रचना.
**दुघड** पु. आंबे, फणस इ. चा दोन फळांचा घड.(राजा.)
**दुघड** वि. दोन; जोडीच्या: 'शेक सगड्या करूं लागल्या चंचळ नारी दुघडा ।' – पला ७८.
**दुघड–डा, दुघड ओनाम्या** वि. १. दोनदोनदा ज्याला पाठ द्यावा लागतो असा. २. (ल.) मंद; मठ्ठ बुद्धीचा; ठोंब्या; दगडोबा; अक्षरशत्रू. ३. अडाणी, अनाडी, अडमुठा (काम करणारा, मजूर इ.).४. हट्टी. ५.मूर्ख; दुष्ट: 'दुघड नार नवऱ्याला शिकवी म्हणे वेगळे निघा ।' – पला ८५.६. परका. [सं.दुर्घट]
**दुघडी** स्त्री. १. दुहेरी, दुमडून केल्यामुळे होणारी घडी. २.दुहेरी घडी केलेले वस्त्र, कागद.
वि. दुहेरी घडीचे (वस्त्र, कागद इ.).
**दुघाड भरणे** अक्रि. अतिशय श्रम केल्याने अंग दुखू लागणे; तारवटणे.(बे.) [सं.दुर्घट]
**दुघोसी बोट** दोन डोलकाठ्यांचे जहाज.
**दुचमळणे** उक्रि. (भांड्यातील पाणी इ.) हिसळणे; हलविणे; ढवळणे. पहा : **डचमळणे**
**दुचश्मी–ष्मी–स्मी** वि. १. दोन्ही डोळे समोर दिसतील अशा रीतीने काढलेले (मनुष्य इ.चे चित्र). २. दोन खणांचे (घर, इमारत इ.).
**दुचंढ** पु. शेतकऱ्याला सरपण आणण्याचा अधिकार असलेले जंगल.(अहि.)
**दुचाळा** पु. १. दोन टोकांचे हत्यार. उदा. कातर, चिमटा इ.२. (ल.) पेच; अडचण; कचाटी; द्विधावस्था; किंकर्तव्यमूढता : 'एके घाई खेळतां न पडसी डाई । दुचाळ्यानें ठकसील भाई रे।' – तुगा २४३.
**दुच्ची–च्छी** स्त्री. बार मारण्याचा एक प्रकार. (गो.)
**दुजा** वि. १. क्रमाने दुसरा. २. अन्य; आणखी; इतर; दुसरा. ३. भिन्न; वेगळा; निराळा; परका.

**दुजाई-यी** पु. शत्रू; वैरी: 'प्राणाशीं दुजायींच्या दाउन ऊर्ध्व वाट माघारे फिरती ।' - ऐपो २६९.

**दुजाईत** वि. दोनदा व्यालेली (गाय, म्हैस इ.). (को.)

**दुजाख मिजास** मोठा गर्व; ऐट; दिमाख. [फा.]

**दुजागी** स्त्री. जुदागी; वेगळीक; अंतर: 'सबब गुलाम कादरासी तुम्ही दुजागी न करितां त्यास सामील असोन आमचे मस्लतींत यावें.' - जोरा १२६.

**दुजाणणे** अक्रि. मानणे; मान देणे; जुमानणे: 'परंतु अंतर्यामी यासहि दुजाणत नाहीत.' - मइसा १.५.

**दुजाभाव** पु. १. मनाचा दुटप्पीपणा; आत एक बाहेर एक अशी वृत्ती. २. परकेपणाची भावना; आपपरभाव. ३. भेदबुद्धी. ४. मतभिन्नता; मतभेद.

**दुजारा, दुजांतरा, दुजांत्रा** वि. दोन दिवसांनी येणारा (ताप).

**दुजे** न. द्वैत; भेदभाव: 'तुका म्हणे देवें । दुजियाचें पोतें न्यावें ।' - तुगा १४१८.

**दुजोडी** स्त्री. दोन्हीकडील दोन्ही तुळ्यांची टोके एका खांबावर येतील असे मधोमध खांब देऊन केलेली दोन सोप्यांची मिळून एक सोप्याची रचना. वि. दोन नळ्या असलेली (बंदूक).

**दुजोर-रा** पु. (बुद्धिबळाचा खेळ) एका पगावर एकाच वेळी असलेला दोन पगांचा जोर.

**दुजोरा** पु. (एखाद्याच्या बोलण्याला, कृतीला दुसऱ्याने त्यासारख्याच क्रियेने दिलेला) पाठिंबा; टेकू; पुष्टी; अनुमोदन; पाठबळ.

**दुटपी-प्पी** वि. खालचे व वरचे टप, चांदण्या असलेला (तंबू इ.).

**दुटप्पी-प्या** वि. १. दोन्हीकडे ज्याचा कल आहे असे; संदिग्ध (भाषण, वर्तन). २. असे भाषण, वर्तन करणारा.

**दुटा** वि. ठेंगू; खुजा. [फा.]

**दुटाकी** वि. दोन टाकांनी, लेखण्यांनी, व्यक्तींनी लिहिलेले.

**दुटाकी** वि. दोनच टाके देऊन लावलेला (द्रोण इ.).

**दुटी** स्त्री. एक प्रकारचे वस्त्र; दुपदरी पासोडी: 'म्हाइंभटांची दुटी अंगीकरणें ।' - ऋ १०९.

**दुटे** न. १. गवंड्याची मापण्याची पट्टी. २. इमारत बांधण्यापूर्वी जमिनीवर काढलेला आराखडा, नकाशा, खुणा. ३. (ल.) (वागण्यासाठी घालून दिलेला) नमुना; कित्ता; नियम; साचा.

**दुटे** न. १. (जकातीत) एका बैलाला नेता येईल त्याच्या निम्मे ओझे (विशेषतः धान्याचे); अर्धे ओझे असलेली गोणी. २. जनावरांच्या पाठीवर लादून, वाहून नेण्याच्या सामानाला गुंडाळण्याची दोऱ्या असलेली गोणपाटाची पिशवी. ३. घोड्याच्या जिनावर टाकण्याची, सामान ठेवण्याची एक प्रकारची पिशवी; पडशी. ४. पहा : **धोटे**

**दुटे** न. दुमडलेला; दोन घड्यांचा, पानांचा कागद.

**दुट्टा** पु. १. घडी केलेला कागद; दुंडा; (इं.) फोलिओ. २. (विणकाम) सुताची दूण, दुमड; दुहेरी सूत. (को.)

**दुट्टा** पु. कापूस भरून केलेले पांघरूण; दुलई; दुपट्टा. (खा.)

**दुट्टा** पु. जोर; दट्ट्या: 'मागून वाऱ्याचा दुट्टा व पुढून वृक्षाची ओढ.'- के ४.७.१९४१.

**दुठरू** न.पुरते पिकल्यावाचून फुटल्यामुळे पुन्हा भरून येते ते गळू. (को.)

**दुड** स्त्री. मातीची घागर; कळशी. [क.]

**दुडकारी** क्रिवि. फाशाच्या खेळातील एक संज्ञा; दुड्डीने जाण्याजोग्या पगी; दुड्डारी. [सं.दु]

**दुडकी, दुडकी चाल** १. बैल, घोडा वगैरेंची चौक आणि चौखूर यांच्या दरम्यानची चाल; दुडदुड धावणे. २. मृदंगाचा धूम वाजवण्याचा एक प्रकार. पहा: **दुगण** [क.दुडुकु]

**दुडता-ती** वि. दुहेरी केलेले; दुपदरी घडी घातलेले (वस्त्र इ.).

**दुडदुड-डा, दुडुदुडु** क्रिवि. जवळजवळ आणि अतिजलद पावले टाकीत (चालणे, धावणे); दुडक्या चालीने; पहा : **तुरुतुरु** [ध्व.; सं.द्रुत]

**दुडवकार** वि. पैसेवाला; धनिक. (गो.) [क. दुड्ड]

**दुडवाक** न. (नाविक) दुंडे, आखूड वाक. याचे एक टोक कमानीचे असते व दुसरे सरळ असते. तळाच्या वर वाकांच्यामध्ये टोक येईल अशा प्रमाणात दुडलेल्या भागात ही घालावी लागतात. ( को.)

**दुडा** पु. समोरासमोरची, एकच पृष्ठांक असलेली पाने.

**दुडा** स्त्री. कळशी व घागर यांची जोडी.

**दुडाण, दुडाण चाल** घोड्याची एक चाल. घोड्याने चारी पाय एकदम उचलून उडी टाकल्याप्रमाणे भरधाव पळणे. पहा : **चाल**

**दुडाळ** न. ज्यामध्ये दोन डाळिंब्या असतात असे तूर, हरभरा इ.सारखे धान्य; द्विदल धान्य. [क.दुड]

**दुडी** स्त्री. मोठा डवरा; मोठे कोळपे. (व.) पहा: **दिंड**

**दुडी, दौडी** स्त्री. शेताच्या कुंपणावर आढळणारे मोगऱ्यासारखे पांढरे फूल.

**दुडु** वीस कासांच्या किमतीचे एक तांब्याचे नाणे.

**दुडुम** पु. नगाऱ्याचा, डंक्याचा आवाज. [ध्व.; सं.दुंदम]

**दुडुमधौशा** पु. मोठा नगारा.

**दुडू-डू** पु. १. पैसा हे तांब्याचे नाणे. (कानडी प्रांतात याची मूळ किंमत एकतृतीयांश आणा होती. कारण एका पैशाचा ४ पै असा हिशेब करीत.). २. पैशाच्या एकचतुर्थांश किंमतीचे नाणे. ३. (ल.) धन; संपत्ती; ऐवज; मिळकत. [क.दुड्डु]

**दुडूबदप** सक्रि.पैसे ठरविणे. (गो.)

**दुड्या** पु. १. मातीची मोठी घागर; घडा; दुड-डी. २. (ल.) मोठ्या पोटाचा मनुष्य.

**दुड्डाचार्य** पु.(निंदार्थी) अंगी विद्वत्ता नसूनही पंडित म्हणून प्रौढी मिरविणारा मनुष्य; शेकोजी. [क.दोड्ड + आचार्य; सं. दोग्धृ + आचार्य ]

**दुड्डारी** क्रिवि. फाशांच्या खेळातील एक संज्ञा; दुड्डी जाण्याजोगे.

**दुड्डी** स्त्री. १. दुंफाशी सोंगट्यांच्या खेळात पडणारे दोनाचे दान. २. (ल.) दोन रुपये, पैसे इ. परिमाणाची दक्षिणा. [क.दुड्डि]

**दुण-णे** वि. दुप्पट.

अ. दोनने गुणताना योजायचा शब्द. उदा. बे दुणे चार. [सं.द्विगुण]

**दुणकाम** न. प्रथमतःच व्यवस्थित न केल्यामुळे पुन्हा मुळापासून करावे लागलेले काम.

**दुणणे** सक्रि. १. दुहेरी घडी घालणे; दुमडणे. २. दुप्पट, द्विगुणित करणे; दोनाने गुणणे. ३. एका खळीत लावलेली मिरची, वांगी वगैरेची रोपे

वादू लागली म्हणजे त्यांना परस्परांची अडचण होऊ नये म्हणून दोन दोन रोपांच्या मध्ये माती घालून दाबून ती एकमेकांपासून दूर करणे. (राजा.) ४. एकदा सरळ नांगरलेली जमीन पुन्हा तिरप्या दिशेने नांगरणे.(को.)

**दुणता** वि. दुघडी; दुहेरी; दोन घड्या घातलेला.

**दुणवटणे, दुणावणे** अक्रि. दुप्पट होणे : 'रोषें प्रेम दुणवटे । पढियंतयाचेनि।' – ज्ञा ९.१८.

**दुणा–णी** वि. दुप्पट; द्विगुणित : 'अती मूर्ख त्या सर्वदा दुःख दूणें ।'– राम ६५. [सं.द्विगुण]

**दुणाव(र)णे** अक्रि. १. (सामा.) दुप्पट होणे. २. (ज्वर, पाऊस, मनोविकार इ.) वृद्धिंगत होणे; वाढणे.

**दुणावणे** सक्रि. १. (एखादी गोष्ट, क्रिया) पुन्हा करणे; (विशेषतः) दुसारणे; दुहारणे. २. पहा: **दुणणे** १, २. ३. दुप्पट करणे. ४. (बातमी, साक्ष, पुरावा, वदंता इ.) खरी, पक्की, निश्चित करणे; पडताळणे.

**दुणी** स्त्री. दुहेरी वस्त्र: 'गोसावीयांसि दुणीची आंगी'–लीचपू १०१. [सं.द्विगुण]

**दुणीदेव्हडी** वि.वाकडीतिकडी: 'दुणीदेव्हडीं आंगें घालितां: घोडेंया राउतां: वेणी पडत असे'– शिव ५६१.

**दुणेदार** पु. पृथ्वीपती: 'माझेया दुणेदारा: पुरवी त्याची आस'– जना ६५. [फा. दुन्यादार्]

**दुतर्फा–र्फी** वि. १. दोन सरकारांच्या अंमलाखालचा (प्रदेश, प्रांत). २. दोहाती; दुहेरी अमलाचे (राज्यतंत्र, सरकार). ३. दोन्ही पक्षांना, बाजूंना सारखे लागू पडणारे ( भाषण इ.). [फा. दुतर्फ]

**दुतर्फा** क्रिवि. दोन्ही बाजूंना, कडांना धरून, व्यापून. [फा.दुतर्फ]

**दुतली** स्त्री. दुधाचे मोठे भांडे; दूध तापवण्याचे मातीचे भांडे.(व.,ना.)

**दुता–दा** पु. शस्त्राचे म्यान. [फा.दोता]

**दु(धु)ताडा** पु. (तिरस्कारार्थी) सावकार, सरकार यांनी तगादा लावण्यासाठी कुळाकडे पाठवलेला उद्धट, त्रासदायक दूत.

**दुतार–री, दुतु** वि. रेशीम इ. चे दोन तंतू एकत्र वळून त्याने विणलेले (वस्त्र).

**दुताळ** पु. दुसरा मजला.

**दुतु** पु. १. उरस्त्राण; अंगरखा. २. पलंगपोस. [हिं.]

**दुतेर** न. लाकडे सरळ करण्याचे एक हत्यार.(कु.)

**दुतोंडी–ड्या** वि. १. दोन तोंडे, डोकी असलेला (सरपटणारा प्राणी,सर्प). २. (ल.) एकदा एक व दुसऱ्यांदा निराळेच बोलणारा, वर्तन करणारा. ३. दोन्ही टोकांना, बाजूंना घडून, तासून चौकोनी केलेला (दगड इ.).

**दुतोंडे** न. पहा : **दुतोंडी** १ [सं.डुण्डुभ]

**दुथडी** स्त्री.(ल.) नदी : 'म्हणोनि जन्ममरणाची दुथडीं। डहुळितें ठेलीं।' – ज्ञा ९.६२.

क्रिवि. (नदी इ.च्या) दोन्ही तीरांना व्यापून; दोन्ही थड्यांवर; काठोकाठ; तुडुंब (भरलेली).

**दुदगे** न. १. माडावरून सूर (ताडी) काढण्यासाठी वापरतात ते पांढऱ्या भोपळ्याचे केलेले भांडे.(गो.) २. पहा : **दुधगा** [सं.दुग्ध; गो. दुद]

**दुदनी** स्त्री.एक वनस्पती; दुग्धिका; क्षीरावी.– मसाप ४५.३. [सं.दुग्ध]

**दुदरोग** पु. मिरचीवरील एक रोग. – कृषि ५७०. [गु.]

**दुदाव** पु. न. दोन फणस लागलेला देठ.(गो.)

**दुदाव(वि)णे** उक्रि. (गाय,म्हैस इ.ना) भीती दाखवून, पाठलाग करून पिटाळून लावणे.

**दुदांडी** वि. १. दोन दांड्यांचे चिन्ह असणारा (पैसा). २. दोन दांडे, मुठी असलेले.

**दुदि(धि)या, दुध्या** पु. १. एक प्रकारचे मादक पेय, औषध; भांगेची पाने वाटून त्यात दूध, साखर व मसाला घालून केलेले पेय. २.दुध्या भोपळा: 'कडु दुधिया माखिला । गुळें जैसा ।' – ज्ञा १३.४६८.

**दुदिरमण** वि. लठ्ठ; स्थूल; भोपळ्यासारखा (मनुष्य). (गो.) [गो.दुदी = दूधभोपळा]

**दुदि(दी)ल, दोदील** वि. १. दुलग; दुटप्पी; दोन्हीकडे संधान बांधणारा: 'येथें जे दुदिले आहेत तिकडील दंगियामुळें उठोन येतील.' – मइसा १.३३९. २. साशंक; चंचल: 'लटक्या कल्पना मनांत घालून दोदील करावे ऐसें करणार करितात.' – मइसा १९.८५. [फा.दूदिला]

**दुदुरली** स्त्री. एक वेल. हिची पाने लहान असून चवीस गुळमट लागतात. हिला रुईच्या फुलासारखी फुलें येतात. – वगु ४.२३.

**दुदुर्ली कुर्ली** पांढरी, दुधी कुर्ली: 'गज्या, मेल्या माका दुदुर्ली कुर्ली गावली! ' – तोरण पृ.३२४.

**दुदेह** वि.दोन गावांतील : 'इनाम जमीन चावर दीड दर सवाद दुदेह पा मजकूर.' – मइसा २०.१११. [फा.दु + देहे]

**दुद्दा** स्त्री. एक प्रकारची जोडतलवार. – प्रश ३६.

**दुधक** पु. माणिक या रत्नात असलेला दोष. यात दुधासारखा पांढरा रंग पसरल्यासारखा दिसतो.

**दुधगा** पु.नुकत्याच व्यालेल्या गाईचे कोवळे दूध प्याल्याने वासरांना होणारा एक विकार.

**दुधट–ड** वि. १. अस्पष्ट; संदिग्ध; दुटप्पी. २.(ल.) वाईट; खराब; खवचट; कुत्सित (मनुष्य, भाषण, वर्तन इ.).

**दुधड** वि. दुधाळ : 'बहु दुधड जरी जाली म्हैस गाय ।' – तुगा २२९४.

**दुधड, दुःधड** क्रिवि. धडापासून मस्तक वेगळे होईल अशा रीतीने (मनुष्य, जनावर इ. छाटणे, कापणे). (सामा.) दुभंग; दोन तुकडे, भाग होतील अशा रीतीने (तोडणे, विभागणे): 'मोहासी मर्धेचि तोडिलें । दुःखासि दुःधडचि केलें।' –दास ५.९.४५.

**दुधणी, दुधाणा–णी** स्त्री. पु. दूध तापविण्याचे मातीचे भांडे: 'घरांत गेली ठेऊ दुधाणा ।'–दावि २३६.

**दुधणे** सक्रि.धार काढणे; पहा : **दुभणे** : 'दूध दुधिलें मरणा'– ज्ञागा २५६. [सं.दुग्ध]

**दुधपिरु** वि. दूध पिळणारा; काढणारा: 'कीं आदिपुरुखु जाला दुधपिरु'– वच्छाह ३०६. [सं.दुग्ध]

**दुधमांडा** पु. दुधात कणीक भिजवून केलेला मांडा : 'गोसावीयांचे कवडे मागौनि दुधमांडे खावे'– लीचउ ११८.

**दुधरी** स्त्री. एक भाजीचा वेल. (को.)

**दुधली** वि. पाटीसारखी; मोठ्या टोपलीएवढी: 'ढाल दुधली फिर्क्या लोखंडी

एकूण.' – वाडबाबा २.४२.

**दुधवणी** न. पाणी मिसळलेले दूध.

**दुधवणी, दुधावणे** स्त्री. न. १. दुधणी. २. दूध तापवण्यासाठी जमिनीत केलेला खड्डा.

**दुधवाल** पु. चवळीच्या जातीपैकी एक वेल; चवळी.

**दुधशिरी** स्त्री. उपरसाळ; उपळसरी; अनंतमूळ. (गो.)

**दुधळ** वि. पुष्ट; बलिष्ठ; द्वाड.

**दुधळी** स्त्री. दूधपाक.(गो.)

**दुधाऽघोंट** स्त्री. सोडता येत नाही व धरता येत नाही अशी गोष्ट. (गो.)

**दुधाचे दात** बाळपणात येणारे पहिले दात.

**दुधाट** पु. सोसाट्याचा वारा.

**दुधाण** न. मोठी टोपली.

**दुधाणी** स्त्री. पायाचे सांधे धरणाऱ्या चाळकबाऊ नावाच्या विकारात (पायाच्या) घोट्यावर बांधतात ती मंतरलेली गारगोटी.

**दुधा(ध)णी** स्त्री. दुधासारखा पांढरा चीक येणारी, फुले येणारी वनस्पती. हिला कुंभा, देवकुंभा, तुंबा, शेतवडा-ड, दुधकलमी, तेवडी अशी इतरही नावे आहेत.

**दुधाधारी** वि. दुधावर राहणारा; दुग्धाहारी.

**दुधापाण्याचा निवाडा** दूध आणि पाणी यांच्या मिश्रणातून दूध व पाणी निराळे करणे. अशी शक्ती हंस पक्ष्यात असते असा कविसंकेत आहे. यावरून अनेक गोष्टींच्या खिचडीतून ग्राह्य तेवढाच भाग घेणे व त्याज्य भाग सोडून देणे. पहा : **क्षीरनीरविवेक**

**दुधार-री** वि. १. दोन धारा असलेला (चाकू, तरवार इ. हत्यार). २. दोन कडी एकत्र करून, जोडून केलेली (बांगडी इ.) : 'उदार मजवर दुधार आणवा पन्हेदार लेऊन चुडे ।' – पला ४.३६.

**दुधारा रोखण** (सुतारधंदा) लाकडाच्या दोन्ही बाजू गुण्यात असून त्याला कडेला विशिष्ट अंतरावर रेघ आखण्याचे सुताराचे हत्यार.

**दुधावळ,दुधाळ-ळू** वि. पुष्कळ दूध देणारी (गाय,म्हैस इ.). [सं. दुग्ध + आवली]

**दुधावी** वि. (यंत्रशास्त्र) ज्या तैलयंत्रातील (ऑईल इंजिनमधील) चारही क्रिया दोन धावांत होतात असे ( तैलयंत्र); (इं.) टु स्ट्रोक सायकल (इंजिन).

**दुधाळू** न. पांढरे अळू.

**दुधिया शांकरी** एक प्रकारचे मादक पेय.

**दुधी** स्त्री. एक वनस्पती. हिचा वेल तोडला असता त्यातून दुधासारखा पांढरा चीक निघतो. हिला लांबट शेंगा येतात. वासरांच्या दुधगा रोगावर हिचा उपयोग होतो. – वगु ४.२४.

**दुधी,दुधीण** स्त्री. दुध्या भोपळ्याचा वेल. [गु.दुधी]

**दुधी** स्त्री. पायाच्या घोट्यावर घालावयाचा स्त्रियांचा एक दागिना. – जनि पारिभाषिक शब्दांच्या व्याख्या पृ.७.( बडोदे)

**दुधीकरटे** न. वाळलेल्या दुधीभोपळ्याचे पात्र: 'गोसावीयांसि दुधीकरटां पाणिभाताची आरोगण जाली' – लीचपू १०५. [सं.दुग्धकरोटा]

**दुधी काच** पहा : **फेनकाच**

**दुधी हलवा** दुध्या भोपळा किसून, धुवून त्यातील पाणी निथळल्यावर तुपात परतून दुधात शिजवून साखर घालून केलेले पक्वान्न.

**दुधोडी** वि. दुधाळ : 'धवळिया गाइः दुधोडीया' – लीचअ ६५.

**दुनल** वि. दुप्पट : ' तयांचीं वस्त्रें दुनलेनि मोलें विकेति'– गोप्रच ५२. [सं.द्विगुण]

**दुनवणी** स्त्री. पुन्हा नांगरणे; आडवे नांगरणे: 'जप तप नांगरणी । न लगे आटी दुनवणी ।' – तुगा ३६०. [सं.द्विगुणी]

**दुनाडा** पु. दुसऱ्यांदा केलेली वखरणी. (झाडी)

**दुनान** पु. पसारा : 'घर केलें दार केलें । दुनान केला मोटा ।' – तुगा भाग १. पृ.१७६.

**दुनावा** पु. नुकसान : ' तुझा दुनावा भरून देतो.' – गोतावळा पृ.६३.

**दुनि(न)या, दुनियाई, दुन्याई** स्त्री. जग; लोक; पृथ्वी; इहलोकः 'याची बद्नामी दुनियाईत जाली.' – मइसा ५.२०. [अर.दुन्या]

**दुनियादारी** स्त्री. १. ऐहिक सुख; राज्यभोग : 'परन्तु दुनियादारी किस्मतींत थोडे दिवस होती.'– ऐटि ३.१७. २. संसार; व्यवहार; लोकाचार. (क्रि. करणे, निभावणे इ. ) [फा.]

**दुनी** वि. १. दुप्पट : 'बळ दुनी शरणागता । स्वामी वाहों नेही चिंता ।' – तुगा १६४. २. दोन्ही : 'तेह वेळीं मा – भणौणिन घसरें चालतां । दुनी देहडी आंगें घालितां ।' – शिव ५६२. [सं.द्विगुणी]

**दुपक** वि. १. अंशतः दोन दिवस (तिथी इ.) आल्यामुळे त्या तिथीचे धर्मकृत्य आज करावे की उद्या करावे इ. वादाला पात्र झालेली (तिथी). २. ज्याविषयी दोन मते, मतभेद आहेत असा (मुद्दा, तिथी, आचारसरणी इ.).

**दुप(ब)की-क** स्त्री. चरता चरता जनावराने दूर जाऊ नये म्हणून त्याच्या दोन पायांत बांधतात ती दोरी; कळवा.

**दुपट** पहाः **दुप्पट**

**दुपट-टी** वि. द्विगुणित; दुप्पट.

**दुपट(ट्ट)करी, दुपेटा** पु. खोताला ठरीव ऐनजिनसी साऱ्याच्या दुप्पट सारा देणारे कूळ.

**दुपटा-ट्टा-टे-ट, दुपे(पा)टा** पु. न. खांद्यावरून टाकण्याचे, घेण्याचे दोन पाटांचे वस्त्र; उपवस्त्र; शेला; दरबार, सभा इ. ठिकाणी जाताना अंगावर घेण्याचे भारी वस्त्र.

**दुपटी-टे** स्त्री. न. १. काचोळी: 'कुचडोंगराचां तळवटीं: लेउनि अनुरागाचीं दुपटीं'– शिव ६४०. २. दुहेरी चिलखतः 'बाणौनि निवृत्तीची दुपटी...ब्रह्मचर्याची'– मूप्र २४७६. [सं.द्वि + पट्ट]

**दुपटे** न. दोन,तीन वस्त्रे एका ठिकाणी शिवून पांघरण्यासाठी, लहान मुलांच्या अंगाखाली घालण्यासाठी करतात ते वस्त्र. [क.]

**दुपणे** न.दोन पानांचे रोप; दुहेरी अंकुरः 'अमृताचेनि वडपें शृंगाराचें दुपणें सिंपे'– शिव ३१९.

**दुपत्ती-पानी** स्त्री. (गंजिफाचा खेळ) सर्व खेळ संपल्यावर अखेर उतरणाऱ्याजवळ राहिलेली एकाच रंगाची दोन पाने.

**दुपदरी** वि. १. दोन्ही शेवटांना जरीचे, रेशमाचे पदर असलेले (पागोटे, लुगडे). २. दुहेरी केलेले (वस्त्र). ३. दोन तार, तंतू एकत्र करून, दुहेरी करून वळलेली (दोरी).

**दुपरतणी** स्त्री.बरा झालेला आजार उलटणे. (राजा.)

**दुपली** स्त्री. दोन पैशाचे नाणे.(ना.) [गु. दुपलो]

**दुपवणे** अक्रि. गर्भपात होणे; नासावणे; दुवेतणे. पहा: **धुपावणे**

**दुपाउली** स्त्री.पावलांची जोडी; दोन्ही पावले: 'दुपाउली अवचिती । कुहामाझि पडिली ।' – ज्ञा ८.६९. [सं.द्वि + पद]

**दुपाखी** वि. दोन पाखी असलेले (घर, सोपा इ.).

**दुपाठी** वि. दोनदा वाचून किंवा ऐकून श्लोक, ग्रंथ इ. ज्याला पाठ म्हणता येतो असा.

**दुपाडगी** वि. दुपाखी. (चंद्रपुरी)

**दुपानी लता** मर्यादा वेल; बकरीच्या खुराच्या आकाराची पाने असणारी एक वेल.

**दुपायी येणे** १.(घोडा) मागील दोन पायांवर उभा राहणे. २. संतापून जाऊन भांडायला प्रवृत्त होणे.

**दुपार** स्त्री. दिवसाच्या मध्यभागाचा, मध्यान्हाचा काळ; दोन प्रहराची वेळ. [सं. द्वि + प्रहर] (वा.)० **उरकणे, काढणे, गुजरणे, घालविणे, टाळणे, ढकलणे, रगडणे, लोटणे** – दुपारचे जेवण उरकणे, पदरात पडणे. **दुपारची मात्रा** – दुपारचे जेवण (क्रि. घेणे, आत्म्याला देणे). **दुपारची सावली** – क्षणभंगुर, थोड्या काळात नाश पावणारी गोष्टी, सुख. उदा. श्रीमंती, संपत्ती, तारुण्य इ. **दुपारची सोय करणे, काळजी वाहणे** – रोजच्या जेवणाची व्यवस्था करणे, काळजी वाहणे.

**दुपारा–री** क्रिवि. दुपारच्या, मध्यान्हीच्या वेळी.

**दुपारी** स्त्री. एक फुलझाड; याची फुले दुपारी उमलतात. पांढरी, तांबडी, पिवळी अशा तीन जाती आहेत.

**दुपारे** न. दुपारी या झाडाचे फूल. याला वास नसतो.

**दुपांडी** क्रिवि. दोन पायांनी.

**दुपांडी** मोर. (तंजा.)

**दुपुडी** वि. १. दोन पुडे, खाती, खाने असलेला (डबा, करंडा, पानपूड इ.). २. दोन्ही तोंडे चामड्याने मढवलेले (चर्मवाद्य). ३. दोन पुडांची, घडीची (पोळी).

**दुपूत** पु. संतती; मुलेबाळे. (गो.)

**दुपे(बो)टा** वि. साखरेची एक जात; दाबोटा साखर.

**दुपेडी** वि. दोन पेडांनी वळलेली (दोरी,दोरा).

**दुप्पट** स्त्री. द्विगुणित परिमाण; एखाद्या रकमेत मूळ रकमेइतकीच पडलेली भर.

**दुफ** पु. डफ. [फा.]

**दुफळी** स्त्री. एकजूट फुटून, फुटाफूट होऊन दोन पक्ष, तट होणे, पडणे. वि. दोन फळ्यांचा केलेला.

**दुफाटा** वि. (वृक्ष, नदी, रस्ता इ.ना) ज्या ठिकाणी दोन फाटे फुटतात तो (भाग).

**दुफा(फो)ड** स्त्री. दोन भाग, तुकडे होतील अशा रीतीने लाकूड, भोपळा इ. मोठे पदार्थ चिरणे, फाडणे, फोडणे इ. क्रिया. (को.) वि. चिरून,फाडून, फोडून ज्याचे दोन तुकडे झाले आहेत असा.

**दुफाशी** वि. १. दोन फाशांनी खेळण्याचा ( सोंगट्यांचा विशिष्ट खेळ). २. ज्याला दोन फासे आहेत असा (दागिना).

**दुफोडी** वि. दुभंग; दोन भाग झालेले: 'दुफोडी करविलीं करकमळें' – शिव ८५२. [सं. द्वि + स्फुट्]

**दुबक** स्त्री. (विटीदांडूचा खेळ) विटीवर दुसऱ्यांदा टोला मारण्याचा प्रकार.

**दुबकणे** उक्रि. १. दुबक घालणे; कळवा देणे. २. बुकलणे; कुबलणे; बडवणे.

**दुबकन–कर–दिनी–दिशी** क्रिवि. डुबकन, धबकन; डुब असा आवाज होऊन किंवा करून. [ध्व.]

**दुबका** पु. बुक्की; ठोसा; बुदका. (को.) [ध्व.दुब]

**दुबजी** स्त्री. स्त्रियांचे लुगड्याच्या आतून परकरासारखे नेसण्याचे वस्त्र. (गो.)

**दुबदुबणे** अक्रि. (फुगलेले पोट, ढेरपोट, पिकलेले कलिंगड इ. हाताने थापटले असता) दुबदुब वाजणे. [ध्व.दुब]

**दुबदुबीत** वि. १. हाताने थापटले असता दुबदुब आवाज करणारे (ढेरपोट, कलिंगड इ.). २. (ल.) संदिग्ध; निश्चितपणे खरी वा खोटी न ठरलेली; उडत आलेली (बातमी, वर्तमान इ.). [ध्व.दुब]

**दुबरदंडी** स्त्री. उधावळी (उधळी). –तंजा.

**दुबरी म्हैस** मुलींचा एक खेळ. – मखेपु ६१.

**दुबळवाडा–डी** पु.स्त्री. दैन्य; दारिद्र्य; लाचारपणा; दुबळेपणा; अगतिकता : 'तेथ भेदाचिया दुबळवाडी । नेणिजे तो ।' – ज्ञा ७.१७९.

**दुबळा** वि. १. विद्या, संपत्ती इ. नसल्याने हीन; निराधार; अगतिक; दरिद्री; लाचार; सामर्थ्यहीन. २. रोड; अशक्त; निर्बळ. [सं.दुर्बल] (वा.) **दुबळ्या देवाची दीपमाळ** – १. एखाद्या क्षुद्र देवापुढे दगड रचून,दांडी रोवून केलेली ओबडधोबड दीपमाळ. २. (ल.) दुबळ्या, पंगु अथवा दरिद्री नवऱ्याची दुबळी बायको. ३. उंच, किडकिडीत, कुरूप मनुष्य.

**दुबळे** न.दैन्य; लाचारपणा; नष्टचर्य; अगतिकत्व.

**दुबळेचार** पु. दुबळेपणा. (गो.)

**दुबंदी** स्त्री. १. घोड्याच्या पुढच्या दोन पायांना करतात ती नालबंदी. २. प्रत्येक घडीत दोन वरख अशा दुमडून दोन घड्या घातलेला देशी सबंध अथवा अर्धा कागद.

**दुबंध** वि. दोन बाजू असलेला; दोन रंगांचे काठ असलेले, गंगाजमनी (लुगडे इ.) : 'दुबंधा क्षीरोदकीं । वाणें परि अनेकीं... ।'-अमृ ५३५. [सं. द्वि+बंध]

**दुबाजू–ही** क्रिवि. दोन्ही बाजूंना, बाजूंकडून: 'जैसी दुबाही बैस पांती । हिरेयांची ।' – ज्ञा ६.२६३.

**दुबार–रा** क्रिवि. दोनदा; दोन वेळा. [फा.; सं.द्विवार]

**दुबारी** वि. १. ज्याला वर्षातून दोन वेळा फळे, फुले इ.चा बहर येतो असा (वृक्ष इ.). २. दोन बार, आवाज होण्याजोगी दारू ज्यात भरली आहे असा (फटाका, बंदूक इ.). ३. दोन पट्टी एकत्र जोडून केलेला उंची दुपेटा.

**दुबा(बे)ळके** न. १.झाडाच्या दोन फांद्या जेथे फुटतात तेथील मधला चिमट्यासारखा भाग. २. शेवटाला दोन फाटे असलेली काठी.

**दुबी(भ्मी) राजा** पु. (गोट्यांचा खेळ) (सांकेतिक) दुसरा नेम मारणारा.

**दुबे** वि. दोन वेदांमध्ये पारंगत असलेला; द्विवेदी. [सं.द्विवेदी]

**दुबेरजी** वि. १. काही विशिष्ट कारणामुळे केलेले रकमांचे दुबार जमाखर्च पक्क्या हिशेबात लिहिताना त्याचा दुबारपणा घालवून एकबेरजीच्या रीतीनेच तो पक्का हिशेब आकारतात. असा जमाखर्च लिहिण्याचा विशिष्ट प्रकार; तो लिहिलेला कागद इ.; जमाखर्च, हिशेब, लिहिणे, कीर्द, कारकून इ. शब्दापूर्वी उपयोग. २. दुसऱ्यामार्फत, दुसऱ्यासाठी रक्कम घेऊन ती जमेला नोंदून त्याला पाठवितात व त्याच्याकडून ती रक्कम पावल्याचे व जमाखर्चात जमेकडे नोंदल्याचे कळल्यावर खर्चाकडे लिहितात. त्या प्रकाराने लिहिलेली (रक्कम इ.).

**दुबोटी गंध** ( कपाळाला) दोन बोटांनी लावलेले गंध.

**दुबोल्या** वि. १.चंचल, अस्थिर बुद्धीचा, वृत्तीचा; ज्याचे मन हेलकावे खाते, घुटमळते असा; धरसोड करणारा. २. रागरंग पाहून वागणारा.

**दुभणी** स्त्री. १. पान्हा. २. दूध काढणे; दोहनः 'कामधेनूचीं दुभणीं। निःकामासी न लगती।'- दास १.४.२६. [सं.दोहन]

**दुभणे** अक्रि.१.(गाय,म्हैस यांनी) दूध देणे. २. (ल.) (ताड,माड इ. वृक्षांपासून) रस वाहणे. ३. (ल.) (जखम, फोड इ.) पुवळणे; वाहू लागणे. ४. (एखादी क्रिया इ.) आपापले फळ देऊ लागून चालू असणे. सक्रि. दूध, धार काढणे; (विरू.) दुहणे. [सं.दुह]

**दुभ(प)ती** वि. दूध देणारी (गाय, म्हैस इ.). [सं.दुग्धवती]

**दुभती गाय-धेनू** (ल.) ज्याच्यापासून नेहमी थोडाबहुत फायदा होतो असा उदार मनुष्य; नेहमीची खाण.

**दुभ(प)ते** न. १. (व्यापक) दूध देणारे, घरी पाळलेले जनावर. २. दूध, दही, तूप इ. ३. दूध काढणे, विरजण लावणे, लोणी काढणे इ. दुधाबाबतची कामे. ४. (ल.) ज्याकडे सदासर्वदा पाहिले पाहिजे, ज्याची अत्यंत काळजीपूर्वक निगा ठेवावी लागते अशी गोष्ट (धंदा, मूल, दुखणे इ. ). [सं.दुह]

**दुभरवसा, दुभरोसा** पु. १. (एखाद्या गोष्टीविषयीचे) होय अथवा नाही असे दोन भरवसे असणे; संदिग्धता; अनिश्चितता; वानवा. २. (एखाद्या गोष्टीचे) द्विविध, संदिग्ध, अनिश्चित स्वरूप.

**दुभं(भां) ग** वि. मध्ये काही अडथळा आल्याने, वस्तू आडवी आल्याने मध्यातून गेलेल्या रेषेने दुभागला गेलेला.

**दुभं(भा)गणे** उक्रि. दोन भाग होणे, करणे.

**दुभाग** वि. दोन तुकडे, भाग करून विभागलेला.

**दुभागणी** स्त्री. दोन भाग करण्याची, दुभागण्याची क्रिया.

**दुभाव** पु. १. (विरू.) दुजाभाव. २. शंका; संशय.(गो.)

**दुभावचे** अक्रि. संशय घेणे; शंका येणे, काढणे, वाटणे. (गो.)

**दुभाषी-ष्या** वि. दोन भाषा जाणणारा; (यावरून) व्यवहार करणाऱ्या दोन जणांना एकमेकांची भाषा समजत नसल्यास त्या दोघांच्याही भाषा अवगत असलेला त्यांचा मध्यस्थी. [सं. द्विभाषीय; हिं. दुभाषीय; त. तूपाशी]

**दुभास** पु. १. (एखाद्या गोष्टीचा, वस्तूचा होणारा) द्विविध भास, ग्रह, ज्ञान. २. (ल.) गैर, उलट समजूत; चुकीचा ग्रह.

**दुभाळू** वि. दुधाळ; पुष्कळ दूध देणारीः 'सर्व तीर्थ हरि दुभाळु धेनुवा।' - मुक्ताबाईची गाथा १३. [सं.दुह]

**दुभीनणे** अक्रि. दोहणे; दूध देणेः 'दुभीनली जगापुरतें । श्रीकृष्णगाय ।' - ज्ञा १८.१६८९.
सक्रि. दूध काढणेः 'ते कृष्णगाये दुभीनली कैशी ।' - गीताचंद्रिका १८.७८. [दुभणेचे कर्मणि रूप]

**दुभेदी** वि. दुटप्पी.

**दुम** वि. मध्यम; दुय्यम. [फा.दुयुम]

**दुम** स्त्री. शेपूट; पुच्छ.[फा.दुम](वा.) ० **करणे** – धूम ठोकणे; पळ काढणे; पाठ दाखवणेः 'दुम करि तो शाहणा ।पाठोवाठीं तयाच्या।'-तुगा २३०.

**दुमची** स्त्री. १. घोड्याच्या शेपटीखालून जाणारा खोगिराचा बंद; लडी : 'गिलच्यास पगडी नाहीं व घोड्यास दुमची नाहीं. -' भाब ९. २.(जनावराची मागची) तंगडी; लाथ; दुगाणी (अनेकवचनी प्रयोग). ३.(ल.) निकड; तगादा. (क्रि. करणे, लावणे.).[फा.](वा.) ० **उचलणे** – अनेक कचाटे घालून उचलबांगडी करणे. ० **पुरवणे** – पाठ धरणे; पिच्छा पुरविणे. ० **सोडवणे** – नामोहरम करून पळवून लावणेः 'त्यांणीं आपले हिमतीनें कंदाहाराचा पातशहा दुराणी गिलच्या याची पगडी व दुमची सोडविली ते मर्यादा अजुनी चालते.' - भाब ९.

**दुमजला-ली** वि. दोन मजले, डेक असलेले (घर, जहाज, आगबोट इ.); दुहेरी; दोन काठ, संजाफ असलेले (वस्त्र इ.).

**दुमटणी** स्त्री. दुमडण्याची, घडी घालण्याची क्रिया.

**दुमट(ड-त)णे, दुमतविणे** उक्रि. दुहेरी घडी करणे; दुणणे. [सं.द्वि + मुड्; क. मुडुक]

**दुमटा होणे** व्याकूळ होणे.

**दुमड** स्त्री. १. दुहेरी घडी; सुरकुती; चुणी; दूण (क्रि. घालणे). २. (दुमडण्याने वस्त्र इ.ला पडणारा) सळ; मोड; दूण.

**दुमडदुम** क्रिवि. तातडीने; लगबगीने; थेट; परभारे.(ना.)

**दुमण** न. १. भात वगैरेची झोडण्यासाठी बांधलेली पेंडी, आयंडा. २. तो बांधण्यासाठी घेतात ती दोरी.

**दुमणी-नी** स्त्री. १. पहा : **दुमची** १. २. जनावराचे ढुंगण; ढिमोरा; चौक. (को.)[फा.दुम] (वा.) ० **मारणे** – घोड्यावर बसल्यानंतर त्याने भरभर चालावे म्हणून त्याला टाचेने बरगडीवर मारणे.

**दुमता** वि. दुमडलेला; घडी केलेला.

**दुमती** स्त्री. दुमडः 'मुदनीप्रमाणें दुमती करून वळलेला भाग वर ठेवून दोन्ही शेंडे त्या खाड्यांत मजबूत पुरतात.' - चिमा १२.

**दुमदुमणे** अक्रि. १. (आवाज) घुमणे; घुमघुमणे; आवाजाने घर इ. दणदणणे; घोषणे; गाजणे. २. (सुगंध इ.) हवेत पसरणे; दरवळणे; घमघमणे. ३. (भावना इ. मनात) उचंबळणे; प्रक्षुब्ध होणे. [ध्व.दुम् द्वि.]

**दुमदुमि(मी)त** वि. १. फुगलेले; तडस लागलेले; फुगून ताठ झालेले (पोट). २. गोंडस; भरदार; टुणटुणीत (बैल इ.). ३. गबर; ऐपतदार; गडगंज (मनुष्य इ.). ४. दरवळणारा; घमघमणारा (सुगंध इ.). ५. अखंड; संपूर्णः 'दुमदुमित अखंडा । मार्जि पडिजे '- परमा ३.३. क्रिवि. खच्चून; कोंदूनः 'अवघें जगचि महासुखें । दुमदुमित भरलें ।'- ज्ञा ९.२००.

**दुमन** वि. दुष्ट; दुटप्पी: 'जे दुष्ट दुमन दुराचारी' - मूप्र २७४१. [सं. दुर्मनस]

**दुमळावचे** सक्रि. त्रास देणे. (गो.)

**दुमाडी** स्त्री. धांदल; गोंधळ. (गो.)

**दुमात्राकाना-कौ** न. स्त्री.१. 'कौ' हे अक्षर लिहिताना, लिहायला शिकताना लहान मुले उच्चारतात ते 'कौ'च्या वर्णनाचे शब्द २. (सांकेतिक) पहा: **दुमोट**

वि. ज्याने दुमोटले खांद्यावर घेतले आहे असा (मनुष्य).

**दुमान-नू-णू** न. करट; गळू: 'तंव मनुष्या आणि मोन जातींतें । दुमानें करटें जाहालीं सकलातें ।' - ख्रिपु १.१६.८७. [सं.द्वि+मुड्]

**दुमारा-रे** पु. न. १.सैन्य इ.वर तोफा वगैरेंनी एकाच वेळी दोन दिशांनी होणारा मारा. २.(ल.) भाषणात वगैरे दोन्ही बाजूंनी पडणारा पेच; कचाटी; कोडे; कातर; चिमटा.

**दुमारी-ऱ्या** वि. १. दोन प्रकारांनी, दिशांनी मारा, आघात करणारे (शस्त्र इ.). २. दोन बार करणारी, दोनदा उडणारी (बंदूक).

**दुमालदार** दुमाले गावाच्या दोन मालकांपैकी प्रत्येक; इनामदार: 'माजगांव तर्फ सातारा हा गांव दुमालदारखेरीजकरून बाकी सुभाकडील अम्मल बेगमीबद्दल पेस्तर सालापासून लावून दिला.' - वाडसमा १.३६.

**दुमाल पत्र** १. नवीन अम्मलदार आला असतां इनामदारास जुन्या अंमलदारापासून आपल्या इनामांचे इनामपत्र लिहून दाखल्यादाखल आणावें लागत असे तें. - भाअ १८३२. २.हुंडीबरोबर खुलाशाबाबत जोडलेले पत्र.

**दुमा(म्बा)ला** पु. १.मागची बाजू; पिछाडी. २. (ल.)दुजोरा; मदत; प्रेरणा; पाठबळ. (क्रि.देणे, राखणे, ठेवणे, उचलणे, सांभाळणे, पुरवणे.). ३. पाठलाग; पिच्छा: 'पाखांड्यांनी पाठी पुरविला दुमाला । तेथें मी विठ्ठला काय बोलों ।'- तुगा ८९२. ४. रुंदी; विस्तार; भिंतीत झाकला जाण्याचा भाग; खोली (चिरा, इमारतीचा दगड, तोड, फाड इ. संबंधी): 'डबर मिळतील तितके समचतुष्कोन चांगल्या दुमाल्याचे, उचलण्याजोगे असावे.' - मॅरट २. ५. तलवारीच्या मुठीत गढलेला भाग.६. नावेचे सुकाणू. [फा.दुम्बाला] (वा.) ० **धरणे, धरून असणे** - एखाद्याजवळ आश्रयासाठी, रक्षणासाठी येऊन राहणे; एखाद्याला चिकटून असणे. **दुमाल्यास लावणे** - खाली लिहिणे; जोडणे.

**दुमाला-ल-ळा-ळे, दुबाला** वि. १. दोन मालक असणारा (गाव, वतन). २. जमीन-महसुलासंबंधी सरकारच्या हक्कापुरता एखाद्या मनुष्याला सर्वांशी अगर अंशत: दिलेला हक्क. ३.सरकारखालसातीकडे नसून लोकांकडे परभारे माफीने चालणारा (गाव, जमीन इ.). ४. स्वाधीन; हस्तगत: 'मौजे मजकूर हा गांव यांचे दुमाला करून...' - वाडसमा २.९५. ५. पूर्वीच्या मालकाचा निर्वंश झाल्यावर सरकारजमा होणारे (इनाम). [फा.दुबाल्]

**दुमाली** वि. दुतर्फी.

**दुमाळदार** वि. त्रास देणारा. (गो.)

**दुमाळी** वि. पाकळ्यांची दोन वर्तुळे ज्यात आहेत असे (फूल).

**दुमाळॉ** पु.अतिशय त्रास. (गो.)

**दुमुखी** पु. गोल हातोडा. पहा: **खोलण्या**

**दुमुंडी** स्त्री. नदीकाठी आणि इतरत्रही उगवणारे एक तण.

**दुमे(र्मे)ळावा** पु. दुर्योग; कुयोग; अडचण: 'दुर्मेळावे येवडे । कर्मामाजीं ।' - ज्ञा १८.६६.

**दुमोट, दुमोटली-ले** स्त्री. न. खांद्यावर घेण्याच्या सोयीचे, दोन मोटा एकत्र बांधून करतात ते, खांद्याच्या पुढे व मागे लोंबणारे ओझे.

**दुमोळी** वि. दोन पाखी असलेले (छप्पर); दुपाखी छप्पर असलेले (घर.)

**दुम्दारी** स्त्री. १. पाठपुरावा; पाठबळ. (क्रि.ठेवणे, राखणे) पहा: **दुमा(म्बा)ला** २: 'घोरपडे दुम्दारीस होते.' -शिचप्र ४४. २. पहा: **दुमा(म्बा)ला** १: 'कडपेकरांचें पथक दुम्दारीस होतें.' - ऐलेसं ४.१८३७. ३.पिछाडीची फौज: 'पाठीमागील दुम्दारी अस्तमानचे सुमारास जागा सोडून गेली.' - ऐलेसं ८.४०२६. [फा.दुम्दार]

**दुय्यम** वि. १. दुसऱ्या प्रतीचा; गौण; मध्यम. २. (अधिकाऱ्याच्या) हाताखालचा; खालच्या दर्जाचा (अधिकारी). [फा.दुयुम्]

**दुय्यम पुरावा** (पुराव्याचा कायदा) सरकारी सहीशिक्क्याच्या नकला किंवा यंत्राच्या साहाय्याने मुळाबरहुकूम मूळ प्रतीप्रमाणे काढलेल्या प्रती इ. नी दिलेला पुरावा; मुळावरून केलेल्या व रुजवात घेतलेल्या नकलेचा पुरावा; ज्याने मूळ लेख वाचला आहे त्याने तोंडी सांगितलेला मजकूर. (इं.) सेकंडरी एव्हिडन्स्.

**दुरकानी ओळ-रेघ** पत्र इ. लिहिताना कागदाला चार सारखे रकाने पाडून दोहो बाजूंचे दोन रकाने समासादाखल सोडून मधल्या दोन रकान्यांत ज्याला पत्र लिहायचे त्याचे नाव इ. लिहिण्यासाठी काढलेली रेघ.

**दुरकी** अ. १.एक या संख्येला दोनाने गुणताना योजण्याचा शब्द. उदा. एके दुरकी दोन. २. (फाशाच्या खेळात) दोन घरांवर; दोन पडले असता मरेल अशी.

**दुरग मरगी** एक रानटी जमात. हे कडकलक्ष्मी- नाडलक्ष्मीचे सोंग काढून भीक मागतात.

**दुरगव्वा मरगव्वा** या दोन क्षुद्र देवता असून गावात पटकीची साथ आल्यास यांचा उत्सव करतात.

**दुरगुसला, दुरगूस** पहा : **धुडगूस**

**दुरटा** पु. तोफ, बंदूक इ.चा वर्षाव; बंदुकीच्या गोळीबाराची फैर; तोफांची सरबत्ती; बाणांचा वर्षाव, भडिमार: 'मुसलमानांचे स्वार पुढें येतांच त्यांच्यावर त्यांनीं गोळ्या व जेजालांचे दुरटे चालविले.' - हिं १९०.

**दुरडी** स्त्री. १. तांदूळ इ. धान्य धुण्याच्या उपयोगाची दुहेरी विणीची बुरडी, टोपली. २.धरण्यासाठी वर्तुळाकार दांडी बसवलेली फुले ठेवण्याची परडी. ३. (सामा.) किरकोळ कामाच्या उपयोगाची बुरडी टोपली; पाटी. (वा.) **दुरडीम्हा भाकर नसणं** - नपुंसक असणे.(अहि.)

**दुरढी** (को.) पहा: **दुद्धी**

**दुरणे** सक्रि. दूर करणे; घालविणे : 'डाग लागतो परी यशाला शिवरायाच्या तो दुरवा ।' - वाग्वैजयंती पानिपतचा पोवाडा. [सं. दुर् + इ]

**दुरतिक्रम** वि. १. ओलांडून जायला कठीण; दुस्तर. २.असाध्य. [सं.]

**दुरत्यय-यी** वि. १. नाश करण्यास कठीण.२. प्रतिबंध करण्यास, टाळण्यास कठीण; अपरिहार्य. ३. असाध्य (दु:ख, आजार, रोग इ.); प्रतिकार करायला कठीण (अडचण, संकट). ४. मन वळवायला कठीण

असा (मनुष्य). [सं.]

**दुरदुर** स्त्री. किरकोळ गोष्टीची, कर्तृत्वाची मिरवलेली ऐट; दिमाख; टुरटुर; फुरफुर.(क्रि.लावणे). [ध्व.]

**दुरदुरी** स्त्री. करंगळीपेक्षा कमी-अधिक जाड अशी पाण्याची पडणारी, झिरपणारी धार. (राजा.) [ध्व.]

**दुरदृष्ट** न. दुर्दैव; वाईट नशीब: 'कीं आड आलें दुरदृष्ट माझें ।' – सारुह १.१०.

**दुरधा** वि. पूर्णपणे न पिकलेले (फळ इ.). (राजा.)

**दुरधिगम्य** वि. १. समजण्यास कठीण; दुर्बोध. २. दुष्प्राप्य; मिळण्यास कठीण. [सं.]

**दुरध्यानी** वि. दुरून, लांबून येणारा : 'दुरध्यानी ब्राह्मण... आला' – लीचउ ३५. [सं. ]

**दुरबिनीत, दुरमीण** न.(नाविक)गलबताच्या झाडीच्या नाळ ते वऱ्यापर्यंत ठोकलेल्या फळ्यांपैकी प्रत्येक; गलबताला आतील अंगाला मजबुती येण्यासाठी वागे, दुवाके, झाड्या यांवरून काही अंतर सोडून ठोकतात त्या जाड्या फळ्या. (हेट., को.)

**दुरभिमान** पु. पोकळ, अवास्तव अभिमान; फाजील गर्व. [सं.]

**दुरवबोध** वि. दुर्बोध; गूढ. [सं.]

**दु(दू)रशी-सी, दुरशिवत** वि. विटाळशी; अस्पर्श; रजस्वला.

**दुरसंदाज** वि. विशिष्ट काम करणारा सैनिक.

**दुरस्ता** क्रिवि. रस्त्याच्या दोन्ही बाजूंनी; रस्त्याच्या दोन्ही बाजू व्यापून दुतर्फा ओळीने: 'चालेति दासीगण हे दुरस्ता ।'–सारुह ८.४३.

**दुरळ** वि. खडतर; कडक; उग्र; कडकडीत (दैवत इ.): 'खंडेराव दैवत दुरळ । प्रचीत दाविली तत्काळ ।' – ह ९.२००.

**दुरंगी** स्त्री. १. दुर्बीण. – ऐपो पृ. ६०३. २.सोंगट्यांचा एक खेळ. – मखेपु पृ.१८५.

**दुरंधर** वि. १. घनघोर: 'क्षेत्र जालें दुरंधर' – उह २०९९.२. दुर्धर; जिंकायला कठीण: 'जीणावा दुरंधरु: आपुलिया आंगवणा' – उगी २३९.[सं.दुर्धर]

**दुरा** पु. नवी खणलेली विहीर.

**दुरा** वि. १. संख्येने, परिमाणाने दुप्पट. २. दुहेरी केलेला; दुमडलेला.

**दुराई-ही** स्त्री. (प्र.) दुराही; द्वाही; शपथ; हरकत; दुराय. (कु.) नियमबाह्य, अनैतिक, बेकायदेशीर वागणाऱ्याला अडवण्यासाठी राजा, सरकार वगैरेंच्या नावाने घालतात ती शपथ.[सं.दुर् + हार्] (वा.) ० **बांधून टाकणे** – एखादी वस्तू, घर वगैरेंच्या उपयोगाबाबत सरकारी मनाईचे द्योतक असे चिन्ह, ती वस्तू, घर इ.वर बांधणे.

**दुराखई** स्त्री. मुलींच्या सागरगोट्यांच्या खेळातील एक डाव. एका वेळी दोन खडे उचलून वर फेकलेला खडा झेलणे.–मखेपु ३३२. [सं.द्वि + म. खई]

**दुराग्रह** पु. लोकविरोध, शास्त्रविरोध, संकटे वगैरेंना न जुमानता एखाद्या गोष्टीचा पिच्छा पुरविण्याचा हट्ट; अनिष्ट आग्रह.

**दुराणी** वि. अफगाणांचा एक वंश; त्यातील व्यक्ती. [फा.दुर्रानी]

**दुरापास्त** वि. घडून येण्यास कठीण; असंभाव्य. [सं. दुर्+अप+अस्]

**दुराय** (कु.,गो.) पहा: **दुराई-ही**

**दुरालभा** स्त्री. एक औषधी वनस्पती; धमासा.

**दुरावणे** अक्रि. वियोग होऊन दूर राहणे, पडणे, जाणे.

**दुरावणे** सक्रि. जमीन दुसऱ्यांदा नांगरणे. (बे.)

**दुरावा** पु. १. दूरपणा; अंतर. २. (दूरदेशी भोगावे लागणारे) कष्ट.

**दुराशा** स्त्री. निरर्थक,फोल, अवास्तव आशा; दुष्प्राप्य गोष्टीची आशा; दुष्ट वासना: 'दुराशागुणें जो नव्हे दैन्यवाणी ।'– राम १६८. [सं.]

**दुरासद** वि. कष्टाने प्राप्त होणारे; जिंकण्यास, मिळण्यास कठीण. [सं.]

**दुरिके** वि. दूरचे; लांबचे.

**दुरित** न. पाप; पातक; संचित कर्म. [सं.]

**दुरी** स्त्री. दोन चिन्हे, टिंबे असलेला पत्ता; दुव्वा: 'एक दुरी काढून ठेवून तिघे पानलागी खेळूं लागले.' – सुदे २६.

**दुरी** क्रिवि. दूर; दूर अंतरावर.

**दुरीग** न. १. दुर्ग; किल्ला. (गो.) २. तट; कोट; गडगा. ३. शिमग्याच्या दिवसांत साजरा करण्याचा एक उत्सव. [सं. दुर्ग]

**दुरीपंथ** पु. आकाशमार्ग.

**दुरील** वि. फार दूरच्या ठिकाणचा; लांबचा.

**दुरुक्त-क्ती** न. स्त्री. वाईट भाषा, शिवी; अपशब्द; अश्लील बोलणे.[सं.]

**दुरुत्तर** न. अपमानकारक, उर्मटपणाचे उत्तर.

**दुरुदुरु** क्रिवि. खळखळ; झुळझुळ (ओढा इ. वाहणे). [ध्व.]

**दुरुद्धर** वि. खंडन करण्यास, खोडून टाकण्यास कठीण असा (पूर्वपक्ष, आक्षेप, आरोप). [सं.]

**दुरुधरायोग** पु. चंद्राच्या द्वितीय आणि द्वादश अशा दोन्ही स्थानी सूर्यावाचून कोणी ग्रह असतील तर दुरुधरायोग होतो. – जातक १७०.

**दुरु(र)स्त** वि. १. यथायोग्य; निर्दोष; बरोबर; नीट. २.अचूक; बरोबर: 'नेमिला जागा दुरुस्त मारणार असे. '– मराआ ३५. ३.(कायद्यात) फेरबदल, सुधारणा केलेला (कायद्याचा नियम). (क्रि.करणे). [फा.]

**दुरुस्ताई** स्त्री. मन स्वच्छ असणे, करणे :'परस्पर दुरुस्ताई होय तर उत्तम आहे.'– जोरा ५.

**दुरुस्ती** स्त्री. दोष काढून पूर्ववत करण्याची, सुधारण्याची क्रिया; डागडुजी; जुने काम खराब झाले असल्यास ते सुधारण्याची क्रिया; नीट करणे.

**दुरू** स्त्री. दूर्वा.(राजा.)

**दुरूक, दुरोख-खी** वि. १. दोन दिशांना रोख असणारा; दोन दिशा दाखवणारा. २. (ल.) दोन डगरींवर हात ठेवणारा; दोन्ही बाजूंना लाग लावणारा; दुलग; दुटप्पी: 'इकडील मातबरांचीं लक्ष्यें दुरोख झालीं आहेत.' – मदबा १.३१. ३. दोन्ही बाजूंना,अंगांना रंगीत वेलबुट्टी उठवलेले छापील (वस्त्र इ.).

**दुरूक** पु. १. फाशावरील दोन टिंबे.– मोल. २. दोन पगे चालून तिसऱ्या पगी सोंगटी बसायाजोगा डाव. – शास्त्री.

**दुरो** स्त्री. दुसरी नांगरणी: 'आजूबाजूच्या गावांतील शेतांतून उमज, दुरो होऊन तास काढणं चाललं आहे.' – सह्याद्रीच्या पायथ्याशीं ११८.

**दुरोख, दुरूक शह** (बुद्धिबळाचा खेळ) घोडा इ. मोहोऱ्याचा प्रतिपक्षीयांच्या वजीर इ. मोहोऱ्यावर उडी पडण्याजोगा राजाला दिलेला शह: 'दुरूक शह न सोसे.' – ऐलेसं १२१२.

**दुरोजा** पु. दोन दिवसांचा खर्च : 'चाळीस पन्नास हजारांचें जवाहीर व

कापड याणें फौजेस दुरोजा पुरणार नाहीं.'- मइसा १२.९०.

**दुर्** अ. दुष्टपणा; वाईटपणा, कठीणपणा, दुःख इ. च्या वाचकशब्दापूर्वी योजावयाचा उपसर्ग. उदा. दुराचार = वाईट वर्तणूक; दुर्लभ= मिळण्यास कठीण. इ. याची संधिनियमानुसार दुर्, दुस् , दुष्, दुश् इ. रूपे होतात.

**दुर्ग** पु. न. १. किल्ला. २. एक शस्त्र: 'सेल भाले दुर्ग ऋषी । छतीसां दंडांचे धनोर्धर' – उप ५६३. [सं.]

**दुर्गत** वि. गरीब; दीन; दरिद्री; लाचार: 'झांकी शरपटलांनीं आढ्य जसा दुर्गतांसि वस्त्रांनीं ।'- मोभीष्म ९.६५. [सं.]

**दुर्गती** स्त्री. १. दुर्दशा; वाईट स्थिती; संकटाची, लाजिरवाणी स्थिती; अडचण; लचांड. २. नरक; नरकात पडणे. [सं.]

**दुर्गम** वि. जायला, दळणवळणाला कठीण (स्थळ, प्रदेश इ.). [सं.]

**दुर्गयंत्र** न. (व्यापक)किल्ल्याच्या रक्षणासाठी ठेवलेल्या तोफा इ. [सं.]

**दुर्गंध–धी** पु. स्त्री. घाण; वाईट वास.

वि. वाईट वास येणारे. [सं.]

**दुर्गंधनाशक** वि. (रसा.) दुर्गंधाचा नाश करणारे; (इं.) डिओडरंट.[सं.]

**दुर्गा** पु. (संगीत) एक राग. गानसमय रात्रीचा दुसरा प्रहर.

**दुर्गाडी** स्त्री. स्मशान; मसणवट. (यात दुर्गेचे किंवा शंकराचे देऊळ असते यावरून).

**दुर्गुण** पु. वाईट गुण; दोष; अवगुण; कुमार्गाकडील कल. [सं.]

**दुर्घट** वि. घडवून आणण्यास, घडून येण्यास कठीण. [सं.]

**दुर्घटना** स्त्री. अशुभ, अनिष्ट गोष्ट घडणे; आकस्मिक आलेले संकट, वाईट परिस्थिती. [सं.]

**दुर्जन** पु. वाईट, दुष्ट मनुष्य. [सं.]

**दुर्जय** वि. १. जिंकण्यास कठीण. २.दुःसाध्य; दुस्तर. [सं.]

**दुर्ति–र्ती** स्त्री. १. अर्क; सार; रहस्य: 'तया आवडी एकवटली दुर्ती: मदनमाणकांची' – मूप्र ६०५. २. स्वाद: 'कालनासि दुर्ति दीधली : परिमळाची'– नरुस्व १७९९.

**दुर्दम–म्य** वि. दमन करण्यास, वर्चस्वाखाली आणण्यास कठीण: 'तिला इंग्लंडांतील प्रबल व दुर्दम प्रजाजनांच्या अडथळ्याशिवाय दुसरें कोणतेंच नियमन नसे.' – पार्ल ६. [सं.]

**दुर्दशा** पहा: **दुर्गती** [सं.]

**दुर्दिन** न. १. वाईट दिवस. २. अकाली ढग आलेला दिवस. ३.वृष्टी. [सं.]

**दुर्दैव** न. कमनशीब; दुर्भाग्य. [सं.]

**दुर्धर** पु. एक नरक. [सं.]

**दुर्धर** वि. १. धारण, ग्रहण करायला कठीण. २. दुःसाध्य; दुष्प्राप्य. ३.(व्यापक) बिकट; खडतर; असह्य; उग्र; कठीण. ४. भयंकर; घोर; भयानक. [सं.]

**दुर्निमित्त** न. निराधार कारण, सबब, निमित्त. [सं.]

**दुर्निवार, दुर्निवारण, दुर्वार** वि. १. निवारण, प्रतिबंध करण्यास कठीण; अपरिहार्य; अनिवार्य. २. कबजात आणण्यास कठीण; दुर्दम्य.[सं.]

**दुर्बल–ळ** वि. पहा : **दुबळा** [सं.दुर्बल]

**दुर्बि(र्बी)ण–न** स्त्री. दूर अंतरावरील वस्तू पाहण्याचे यंत्र. यातील अंतर्गोल व बहिर्गोल भिंगामुळे आपल्याला दूरच्या वस्तू स्पष्ट दिसतात व जवळच्या वस्तू मोठ्या दिसतात. [फा.दूर्बीन्]

**दुर्बुद्धी–मती** स्त्री. १. दुष्ट मनोवृत्ती; खुनशी स्वभाव; मनाचा दुष्टपणा. २. मूर्खपणा; अनिष्टपरिणामकारक बुद्धी.

वि. १. दुर्बुद्ध; दुष्ट मनाचा. २. मूर्ख; खुळा; वेडा. [सं.]

**दुर्बोध** वि. समजायला कठीण (ग्रंथ,भाषण इ.). [सं.]

**दुर्भर** वि.पूर्ण, तृप्त करायला कठीण (पोट, इच्छा, आकांक्षा): 'इंद्रियें वज्रघातें तपे उष्ण वरी ज्वाळ । सोसिलें काय करूं दुर्भर हे चांडाळ ।' – तुगा ३५४.

न.(ल.) पोट : 'तरा दुस्तरा त्या परासागरातें । सरा वीसरा त्या भरा दुर्भरातें ।'– राम ८०. [सं.]

**दुर्भाव** पु. १.दुष्ट भावना, भाव, बुद्धी. २.संशय; वाईट ग्रह. [सं.]

**दुर्भिक्ष** न. १. दुष्काळ; महागाई. २. (दुष्काळाच्या वगैरे काळात अन्नसामग्रीची इ. होणारी) टंचाई; कमीपणा; उणीव.[सं.दुर् +भिक्ष]

**दुर्भेद** वि. बुद्धीचा प्रवेश होण्यास कठीण; दुर्बोध: 'तैसे दुर्भेद जे अभिप्राय ।' – ज्ञा ६.४५९. [सं.]

**दुर्भेद्य** वि. फोडायला, तुकडे करायला कठीण (हिरा,तट). [सं.]

**दुर्मद** पु. दुराग्रहीपणा; हेकेखोरी; गर्वामुळे आलेला हटवादीपणा: 'किती सेवाल धनदुर्मदा ।'– अमृतपदे ५८.

वि. मदांध; मदोन्मत्त; गर्विष्ठ: 'सावियाचि उतत होते दायाद । आणि बळियें जगीं दुर्मद ।' – ज्ञा ११.४८०. [सं.]

**दुर्मनस्क, दुर्मना** वि. खिन्न; उदास मनाचा; विमनस्क; दुःखित. [सं.]

**दुर्मरण** न. (वाघाने खाऊन, पाण्यात बुडून, सर्प डसून इ. प्रकारांनी आलेला) अपमृत्यू; अपघाताने आलेले अमोक्षदायक मरण. [सं.]

**दुर्मि(र्मी)ळ** वि. मिळण्यास कठीण. [सं. दुर + मिल्]

**दुर्मुख** पु. साठ संवत्सरांपैकी एक.

वि. १. घुम्या; तुसडा; आंबट तोंडाचा. २. तोंडाळ; शिवराळ.[सं.]

**दुर्मुखणे** अक्रि. १. तोंड आंबट होणे; फुरंगटणे; गाल फुगवणे. २. (एखाद्या कार्याविषयी) चेहरा निरुत्साही होणे.

**दुर्मेळावा** पु. अनिष्ट गोष्टींचा समुच्चय : 'दुर्मेळावे यव्हडे । कर्मामाझि ।' – ज्ञा १८.६५. [सं.दुर्मेलापक]

**दुर्योग** पु. सत्तावीस योगातील अशुभ योगांपैकी प्रत्येक. [सं.]

**दुर्लभ** पहा: **दुर्मि(र्मी)ळ**

**दुर्ललित** न. चेष्टा; खोडी: 'आमच्या विविध दुर्ललिताबद्दल गुरुजींनीं कसें शासन केलें... ' – आश्रमहारिणी ७. [सं.]

**दुर्लक्ष** न. लक्ष नसणे; हयगय; निष्काळजीपणा; गफलत; अनवधान.

वि.१. लक्ष, अवधान न देणारा, गाफील; बेसावध. २.दिसण्यास, समजण्यास कठीण.

**दुर्लक्षणी–ण** वि. १. वैगुण्याने युक्त (मनुष्य, घोडा इ.). २. दुर्गुणी; दुराचारी. [सं.]

**दुर्लंघ्य** वि. १. ओलांडायला कठीण; दुस्तर (नदी इ.). २. मोडता न येण्यासारखी; अनुल्लंघनीय (आज्ञा, हुकूम इ.). ३. निभावण्यास कठीण (संकट, अडचण इ.). ४.घालवण्यास कठीण (काळ,वेळ इ.).[सं.]

**दुर्वाड** वि. १.अतिशय मोठे; कठीण. २. प्रतिकूल. [सं. दुर् + वह]
**दुर्वाडी** वि. असमंजस; मूर्खः 'तु बोलतां लाजेसिना । दुर्वाडिया ।' - पंच २.४. [सं.दुर्वादी]
**दुर्वात** पु. उलट दिशेचा वाराः'...शोकदुर्वातलहरी । आंदोळत असे ।' - ज्ञा ११.३४८. [सं.]
**दुर्वाद** पु. अपशब्द; निंदाः 'कैसा शतधा दुर्वादीं । निस्तेजलासि ।' - ज्ञा ११.१०१. [सं.]
**दुर्वास** पु. १. एक ऋषी; हा शीघ्रकोपी व खादाड होता. यावरून शीघ्रकोपी, खादाड मनुष्य. २. (ल.) जाच; सासुरवास; त्रास. [सं.]
**दुर्वाहक** वि. ज्यातून सहजपणे वीज, उष्णता यांचे वहन होऊ शकत नाही असा पदार्थ.
**दुऱ्हा** क्रिवि. दूर : 'एऱ्हवी स्वामि दुऱ्हा असिका । मीं केवि उरे ।' - ऋ ५३. [सं.दूर]
**दुऱ्हा** वि. विरोधी; द्रोहीः 'कां जे स्वामिदुऱ्हा गुरुद्रोही'- सह्याद्रिवर्णन ४०७. [सं.द्रोही]
**दुऱ्हा** वि. दुप्पट; दुहेरी. - तुगा.
**दुल(ला)ई** स्त्री. १. आत थोडा कापूस घालून संजाब इ. लावून पांघरण्यासाठी केलेले शोभिवंत वस्त्र; पातळ रजई. २. शिंपल्याला आतील बाजूला लागून असलेला मौक्तिकजंतूचा मांसल भाग. [फा.;सं.दुल, तूल]
**दुलग** वि. १. दुरोख; दुटप्पीः 'संभाजीराजे यांचे लक्षी राहिले व दुलग आहे ऐसें पाहून दूर करून...'-मराचिशोथा ३२. २. पहाः **दुलंगी रेघ**
**दुलडी-ल्डड** स्त्री. स्त्रियांच्या गळ्यांत घालण्याचा दोन सरांचा दागिनाः 'ताईत साखळी गळाची दुलडी ।' - तुगा २९५९.
**दुलदपाय खुलदपाय** घोड्यास होणारा एक रोग. यानें घोड्याच्या पुढील पायावर फोड येतात.'- अश्वप २.३१८.
**दुलदुलीत** वि. लठ्ठ; पुष्ट; गुबगुबीत.
**दुलदुले** न. घोड्याचा एक अलंकार.
**दुलदूल** वि. मऊ; मृदूः 'अरे सख्या रे करीं पिवळी कळी दुलदूल । गुलगुलित असी नादर विरळा ।' - प्रला ९३. [सं.दुल]
**दुलंगी** स्त्री. घोड्याच्या खोगिरावर सामान भरावयासाठी घातलेली पिशवी, पडशी.
**दुलंगी** वि. १. वरचेवर रंग पालटणारा; लबाड; दुटप्पी; खोटाः 'प्राणसखा म्हणे नार दुलंगी । बहु युक्तीने भोगून पलंगी ।'- पला ४.१७. २. कळलाव्या; कज्जेदलाल; आगलाव्या.
**दुलंगी ओळ-रेघ** जमाखर्च पुरा झाला असे दाखवण्यासाठी त्याखाली मारलेली अशी आडवी रेघ. (क्रि.ओढणे, करणे, मारणे.)
**दुलंड** वि. दोन्ही पक्षांशी विश्वासघात, बेइमानी करणारा.
**दुलंडी-दी** पु. एका गावात राहून दुसऱ्या गावात शेती करणारा मनुष्य. (को.)
**दुला-ल्ला** पु. १. कत्तलच्या रात्री मुसलमान लोक पंजा हातात घेऊन ताबुतापुढे नाचताना हसनच्या मृत्यूचा शोक करीत हिंडताना उच्चारतात तो शब्द. २. उद्धट व दांडगा मनुष्य.३. शूर; बेडर; बेफिकीरः 'भाऊसाहेब अंबारीत दुल्ला । दादु माहातानें हत्ती पुढें नेला ।' - ऐपो ११९. ३. रंगेल. [हिं.]
**दुला** पु. एक हत्यार.
**दुला-ल्ला** पु. (जुगार) दुसरा; दुसऱ्यावेळी खेळणारा.
**दुलाचा, दुला(ली-लं)च्या** स्त्री. अव. पहा : **दुगाणी**
**दुलाब** स्त्री. फडताळ; भिंतीतील कपाट.(को.)
**दुलावा-वी-व्या** वि. इकडची गोष्ट तिकडे व तिकडची इकडे सांगून कज्जा लावण्याचा ज्याचा स्वभाव आहे असा; कळलाव्या; आगलाव्या.
**दुलुंगे करणे** सक्रि. (ढोरांचा धंदा)आसूड आखूड झाल्यास लांब करणे.
**दुल्ली** स्त्री. वेली : ' फळपादुल्ली दुभिनल्या'- ज्ञागा ३२९.[सं.दुल्लिका]
**दुल्हन** स्त्री. नवरी; वधू.
**दुल्हा** पु. नवरदेव. [सं.]
**दुल्हादेव** पु. गोंडी नवरीचा एक देव. याचा आकार पायातील पिळाच्या वाळ्यासारखा असतो. [हिं.]
**दुवम** वि. दुय्यम; दुसऱ्या प्रतीचा; मध्यमः 'दुवम जमीन तीन चावर एक पांड.'- वाडबाबा १.२०३. [फा.दूयुम]
**दुवल** पु. रुपयाचा सोळावा भाग; एक आणा.
**दुवली** स्त्री. एक आणेली.
**दुवळ** वि. दोन पेड एकत्र करून वळलेली; दुपेडी. (को.)
**दुवा** पु. १. साखळीतील प्रत्येक कडी. २. पत्त्यातील, फाशातील दोन ठिपक्यांचे चिन्ह. [सं. दु; फा. दुओ]
**दुवा-आ** पु. आशीर्वाद; ईश्वराने एखाद्याचे भले करावे याबद्दलचे अभीष्टचिंतन; ईश्वराजवळ केलेली प्रार्थना. [अर. दुआ]
**दुवाई** स्त्री. भेद. [फा. दुओ]
**दुवागीर, द्वागीर** वि. हितेच्छु; शुभचिंतक; निष्ठावंतः 'आम्ही हजरतीचे दुवागीर.' - चित्रगुप्त ४६; 'खत किताबत पाठवून फकिराचे खबर घेत असले पाहिजे. आम्ही द्वागीर असों.' -ब्रप ३०७. [फा.]
**दुवागो** पु. (न्यायालयीन कामकाजात रूढ) अर्जदार; अर्ज, विनंती करणारा. [फा.दुआगो]
**दुवाड** वि. द्वैत; द्वैतरूप. - मनको.
**दुवाड** वि. द्वाडः 'गुरुकृपें आपणा वोळखीना दुवाड ।' - दावि २४.
**दुवाड** पहा : **दुर्वाड**
**दुवाड** वि. दोन प्रदेशांमधील (भूभाग) : 'उदयगिरि तुर्रे दुवाडसंबंध सखवलग्रामनिवासिने...' - कान्हेगाव शिलालेख १.२३.
**दुवारणे** पहाः **दुसारणे**
**दुवारा** वि. दोनदा सडलेला, कांडून स्वच्छ केलेला (तांदूळ).
**दुवारे** न. एकदा कांडलेल्या साळी पाखडल्यानंतर तांदूळ अधिक स्वच्छ व्हावे म्हणून त्यांना पुन्हा कांडतात ती क्रिया.
**दुवाली** स्त्री. तबल्याची वादी. (व.)
**दुवासन** न. पहाः **दवासन**
**दुवासी** स्त्री. फार कडक दारू.(को.)
**दुवा(हा)ळ** स्त्री. (विणकाम) एकसंध विणलेले दोन पंचे; दोन पंचांचे कापड. पहाः **चवाळे**
**दुवाळणे** अक्रि. एकदा सांगितलेली हकिगत पुन्हा सांगताना किंचित

फेरबदल करून सांगणे.
**दुवाळणे** अक्रि. दौडणे; धावणे: 'राउळां पुढें वाढत : राजवाहन दुवाळितां:' -शिव ५२९.
**दुवाळा** पु. डोहळा.(गो.)
**दुवाळी** स्त्री.क्लेश; कष्ट; पीडा: 'तरी दुवाळी कोणा न व्हावी।' - ज्ञा १३.२६६.
**दुवाळी** स्त्री. १. एखादी गोष्ट दुसऱ्यांदा सांगताना त्यात फेरफार केला आहे असा होणारा समज. २. द्वैत.
**दुवेत** न. १. (गाय, म्हैस इ. जनावरांची) दुसरी प्रसूती. २. अशा प्रसूतीत झालेले वासरू; पारडू. ३.(ल.) खोडसाळ व द्वाड मूल.
**दुवेतणे** अक्रि. (स्त्री) नासवणे; गर्भपात, गर्भस्राव होणे. (को.)
**दुशाख** स्त्री. हंड्यांतील दिवे, मेणबत्त्या लावता येण्यासाठी एका टोकाला दोन-तीन वाकडी लोखंडी शिंगे लावलेली काठी; हिचा मशालीसारखाही उपयोग होतो.
**दुशाल-ला** स्त्री. पु. दुहेरी शाल; शालजोडी: 'शालु रंगलाल वर पिवळी दुशाल.' - पला ४.४२; 'मृदुशय्येवर जी पहुडावी ओढुनि तलम दुशाला.'- विक ५२. [फा; गु.दुशाल]
**दुशि(शी)कडे** क्रिवि. १. दोन्ही बाजूंना, अंगांना. २. दोन्ही दिशांना.
**दुशिडी (महागिरी)** दुकाडी, दोन डोलकाठ्यांचे, शिडीचे गलबत.
**दुशिलावा-व्या** वि. आगलाव्या; कळलाव्या.
**दुशोला** पु. जोड शामदान: 'मोमबत्तीचे दुशोला, येकशोला याप्रमाणें जिन्नस...'- मइसा ७.१५६. [दु + अर.शुअला]
**दुश्चि(श्ची)त** वि. १. अयोग्य, चुकीचा, अपराधी (मनुष्य, कृत्य). २. खिन्न; उदास; अस्वस्थ; बेचैन; दुःखी: 'राजा प्रजा पिडी । क्षेत्री दुश्चितासी तोडी।'- तुगा २९८४. ३. क्षुब्ध : 'परी कुंडलिनी नावेक दुश्चित्त होती।'-ज्ञा ६.२३८. [सं.दुश्चित]
**दुश्मन** पु. शत्रू; वैरी. [फा.]
**दुश्मनगी, दुश्मनग(गि)री, दुश्मनी** स्त्री. वैर; शत्रुत्व; द्वेषमूलक वर्तन.
**दुश्मनदावा** पु. (सामा.) द्वेष; मत्सर; वैरबुद्धी.
**दुष्कर** वि. १. अवघड; करायला कठीण; बिकट. २. दुष्परिणामकारक. [सं.]
**दुष्कर्म** न. वाईट, दुष्टपणाचे कृत्य. [सं.]
**दुष्काळ** पु. १.अतिवृष्टी किंवा अनावृष्टी होऊन पिके बुडून अन्नाची टंचाई होते तो काळ. २. महागाई. ३. (सामा.) (एखाद्या पदार्थाची) अतिशय दुर्मिळता, दुर्लभता जाणवण्यासारखी उणीव, अभाव, कमतरता. [सं.दुस् + काल]
**दुष्कीर्ती** स्त्री. अपकीर्ती; बदनामी; बेअब्रू. [सं.]
**दुष्कृत- त्य - ती** न. स्त्री. १.पापकर्म. २. वागण्यातील दुष्टपणा. [सं.]
**दुष्ट** वि. १. दुसऱ्याचे अहित व्हावे किंवा करावे असे विचार असलेला; वाईट बुद्धीचा. २. पापी; दुराचारी; नीच; अनाचारी. ३. दावेदार; शत्रू. ४. खराब; दोषयुक्त (हवा, ठिकाण इ.). ५. निंद्य. [सं.]
**दुष्टचक्र** न. ज्याच्यातून बाहेर पडता येत नाही असा फेरा. [सं.]
**दुष्टव्रण** पु. १. गळू; फिसके; बेंड. २. नाडीव्रण. [सं.]
**दुष्टाई-वा** स्त्री. १. दुष्टपणा; नीचपणा; अधमपणा. २. खराबपणा; घाणेरडेपणा; दोषयुक्तता. ३. मत्सर; द्वेष; दावेदारी.
**दुष्प्रतिग्रह, दुष्टप्रतिग्रह** पु. १. जो प्रतिग्रह (दानाचा स्वीकार) केला असता स्वीकारणारा अधोगतीला जातो तो. २. निंद्य प्रतिग्रह; अशुभप्रसंगी केलेले दान स्वीकारणे; अपात्र व्यक्तीकडून स्वीकारलेले दान. उदा. शय्यादान, वैतरणी, लोखंड, तेल, म्हैस इ. चे दान.[सं.]
**दुष्प्राप -प्य** वि. दुर्लभ; मिळण्यास कठीण, विरळा; दुर्मिळ. [सं.]
**दुस** पु. प्रमेय.
**दुस** न. १. वस्त्र: 'जे आकारजातीचें दुस । घडी केलें ।'- ज्ञा १५.८३. २. आच्छादन; आवरण: 'वायू भवतें आकाशा। वरी सत्त्वाहंकाराचें दुस ।' - सिसं १.१५२. ३. तंबू : 'कृष्ण निघाला वेगेंसी । ... दुसें चौपाशीं दिधलीं ।' - एरुस्व १४.८. [सं.दूष्य]
**दुसग, दुसगाई** स्त्री. मत्सर; द्वेष; विरोध; भांडण; घासाघीस; कचाकची; वितुष्ट. (राजा.)
**दुसड** स्त्री. पहा: **दुवारे**
**दुस(सा)ड-डा-डी, दुसोटा** वि. १. दोनदा कांडून स्वच्छ केलेले (तांदूळ). २. (वर्षातून) जिच्यातून दोन वेळा पीक काढले जाते अशी जमीन; दुपिकी. ३. वर्षाचे पहिले पीक काढल्यानंतर त्याच जिराईत जमिनीत त्याच वर्षी काढलेले (दुसरे पीक इ.).
**दुसडी** वि. जिला दोनच आचळ, सड आहेत अशी (बकरी इ.).
**दुसढ** स्त्री. सामा. (एखादे काम इ.ची) पुन्हा केलेली आवृत्ती; दुसारणी.
**दुसर** न. १. वस्त्रे; आवरण; आच्छादन.२. जोखड.
**दुस(सा)रणी** क्रिवि. पुन्हा; दुसऱ्यांदा.
**दुसरा-रे** पु. न. दोन सरांचा, दुपदरी हार : 'हा निळ्यांचा दुसरा । या बुद्धी हातु घातला विखारा ।'-ज्ञा ९.१४८.
**दुसरा** वि. १. क्रमाने पहिल्याच्या पुढचा. २. निराळा; भिन्न; अन्य; वेगळा. ३. आणखी; शिवाय; इतर. [सं.द्वि + सर, दु + सर] (वा.) **दुसऱ्याचे घर दाखविणे** - आपल्यावरची पीडा दुसरीकडे पाठविणे. **दुसऱ्याचे घर निघणे** -(एखाद्या स्त्रीने) लग्नाचा नवरा सोडून दुसऱ्या पुरुषाच्या घरी त्याची बायको म्हणून राहणे: 'कोळ्यांच्या बायका जातींतल्या जातींत व्यभिचार करतात व दुसऱ्यांचे घरही निघतात.'- गुजा ५९. **दुसऱ्याचे पागोटे गुंडाळणे** - (एखाद्याला) फसवणे; चकविणे. **दुसऱ्याच्या तोंडाने जेवणे, दुसऱ्याच्या ओंजळीने पाणी पिणे** - स्वतंत्र विचार करण्याची अक्कल नसल्यामुळे दुसरा सांगेल त्याप्रमाणे वागणे, बोलणे, करणे.
क्रिवि. शिवाय; आणखी. (हे क्रियाविशेषण कर्ता अथवा कर्म यांच्या लिंगवचनाप्रमाणे फिरते.)
**दुसरे** न. द्वैत; द्वैतबुद्धी : 'जें करीतेणेंसी दुसरें। आहे म्हणौनि ।' - ज्ञा १७.३७४.
**दुसवटा** पहा: **दुसड** वि. ३
**दुसा** पु. पहा: **दुस** न. ३
**दुसा** वि. खालच्या दाढा आणि दोन दात आलेला (बैल).
**दुसायार** न. आच्छादन; आवरण; साहित्य: 'रुकमीन चुडे लेली वर

बुक्क्याचं दुसायार।' -जनलोकांचा सामवेद पृ. ६२६.

**दुसार** अ. सोंगट्यांच्या खेळातील एक पारिभाषिक शब्द. (क्रि.उठणे, जाणे, निजणे.).

**दुसा(हा)रणी** स्त्री. एकदा नांगरलेली जमीन दुसऱ्यांदा नांगरणे. (को.)

**दुसा(हा)रणे** अक्रि. १. कोंबड्याने पहाटे दुसऱ्यांदा आरवणे. २.एखादी गोष्ट दुसऱ्यांदा करणे.

**दुसाला** वि. दोन वर्षांचा; चालू व मागीलवर्षाचा : 'परगणे पाटोदें येथील हिशेब सन संमान दुसाला दप्तरीं विल्हे लावला नव्हता.' - वाडबाबा २.८५.

**दुसी** पु. फिरता कापड व्यापारी : 'तुझा भाऊ दुसी: तरि आम्हांसि एक वस्त्र देइल घेउनि.' -लीच ३.५०.

**दुसेनरे** न. बुट्टीदार कापड. - वाडसमा २.२८.

**दुसोटा** पु. पटका.(व.)

**दुस्त** न. भरजरी वस्त्र. - पया ३४.

**दुस्तर** वि. तरून जाण्यास, पार पडण्यास कठीण.

न. (ल.) संकट: 'थोर वोढवले दुस्तर । तुटलें सासुरें माहेर।'- एरुस्व ८.५५. [सं.]

**दुस्ता** पु. १.वस्त्राची सुते विरळ झाल्याने मध्ये मध्ये येणारा चाळणीसारखा विरळपणा. २. मानाची पाच वस्त्रे समुच्चयाने.

**दुस्म(स्मा)र** न. अनवधान; लक्ष नसणे; खिन्न अवस्था: 'हडपिणी दुस्मरें विडिया देती'- रुस्व ३९६.

वि. स्वत:ला विसरलेला: 'देवो पाहतां दुस्मारा होती'- धपू ५१. [सं. दुस् + स्मृ]

**दुस्वास** पु. द्वेष; मत्सर; हेवा; असूया. (कुण., गो.)

**दुस्स** न. पु. धणे पेरण्यासाठी वापरले जाणारे दोन फण असलेले एक अवजार. (अहि.)

**दुस्सर** स्त्री. जू; जोखड. - भात्रै ७. (खा.)

**दुस्सा** पु. खोडाला दोन खुंट्या मारलेले औत; कोळपे.(व.)

**दुस्सा** पु. दुस्सा; ठोसा.(व.)

**दुस्साध्य** वि. १. सिद्धीला नेण्यास, पूर्ण करण्यास, साधावयास कठीण. २. बरा करायला कठीण (रोग,रोगी); आटोक्यात आणायला कठीण (शत्रू, संकट, अनिष्ट गोष्ट इ.). [सं.]

**दुस्स्वप्न** न. १. अशुभसूचक स्वप्न. २. (मनातील) कुतर्क, आशंका, विकल्प. [सं.]

**दुहडी** स्त्री. भावाची, बहिणीची मुलगी; धुवडी.(गो.)

**दुहणावळ** स्त्री. दुभत्या जनावराची धार काढण्याची मजुरी.

**दुहणे** उक्रि. धार काढणे.

अक्रि. दूध देणे. [सं.दुह्]

**दुहरावणे** सक्रि. पुन्हा सांगणे; पुनरुक्ती करणे. [हिं. दोहराना]

**दुहव-वा** वि. भाग्यहीन; दुर्दैवी. [सं.दुर्भग]

**दुहवु** वि. धारा काढणारा: 'जिया सत्यलोकु दुहवु केला'- शिव ३१७. [सं.दुह्]

**दुहस(ज)बी, दुहज्बी** वि. १. दोन कान, दोन डोळे इ. सगळे मुखावयव दिसण्याजोगे व भिंत इ.कडे मागील बाजू असलेले, भिंतीवर काढलेले (चित्र). २. जे दोन्हीकडे लागू पडते असे (वाक्य, शब्द इ.). ३. एका रूपात थोडासा फेरफार करून दुसऱ्या रूपात सहज दाखवता येईल असे (चित्र, आकृती, आकडा इ.). ४. दोन कामांमध्ये वापरण्याजोगा (चाकर, घोडा, जनावर, जिन्नस इ.). [सं. द्वि + अर. हस्ब]

**दुहाती बगली** वि. (मल्लखांब) बगली उडीचा एक प्रकार. मल्लखांबाच्या बाजूचा हात बगलीप्रमाणे बांधून, दुसरा हात बगलीप्रमाणे न लावता मल्लखांबाच्या पुढच्या अंगास लावावा. नंतर बगलीप्रमाणे पकड बांधावी व हात सोडून उठावे. नंतर पुन: त्याचप्रमाणे दोन हाताची बगल करीत जावे म्हणजे ही उडी होते. - व्यायाम मे १९२३.

**दुहार** स्त्री. १. दुसारणी. २. दोन ठिकाणी असलेला, चालवलेला (रोजगार, व्यवहार, शेती इ.).

**दुहाशी** वि. दोन्ही बाजूंना, कडांना नक्षीदार किनार, हाशे लावलेली (शाल).

**दुहिता** स्त्री. मुलगी; कन्या. [सं.]

**दुही** स्त्री. दुफळी; भांडण. [सं.दुःख]

**दुहुळा** पु. घोटाळा; घालमेल; गडबड. पहा : **डोहणा**

**दुहेतणे** अक्रि. पहा: **दुवेतणे**

**दुहेरा-री, दुहिरी** वि. १. दुपदरी (वस्त्र इ.). २. दुप्पट; द्विगुणित (काम, श्रम इ.). ३. दोहोंनी बनलेले.

**दुहेरी तारे** एकाच केंद्राभोवती किंवा एकमेकांभोवती फिरणारे दोन तारे.

**दुहेरी पाट** (पत्त्यांचा खेळ) इस्पिक राणी - चौकट गुलाम किंवा किलवर राणी - बदाम गुलाम याप्रकारे दोन जोड (बिझिके).

**दुहेरी पा(फा)सोळाचा** शरीराने जाडाजुडा असलेला; लठ्ठ; दुहेरी हाडाचा, अंगकाठीचा (मनुष्य); मजबूत बांध्याचा; गुबगुबीत.

**दुहेरी शह** (बुद्धिबळाचा खेळ) एखाद्या मोहऱ्याच्या पगात असलेले आपलेच दुसरे मोहरे खेळून दोन्ही मोहऱ्यांचा प्रतिपक्षीय राजावर एकदम केलेला मारा.

**दुहेस** पु. न. दुखणे; पीडा.

**दुहोतरा, दुहोत्रा** पु. दरमहा दरशेकडा दोन टक्के व्याजदर.

**दुळ(ळा)रोस** पु. पाणी घालून काढलेला नारळाचा रस.

**दुंडा** पु.खळ्याच्या भोवती कडब्याचा घातलेला बांध. - मशा फेब्रु १९३५.

**दुंडा** पु. मध्ये घडी घातलेला (कागद); डबल (सुईतला दोरा).

**दुंडा** वि. थोटा (हात इ.). (व.)

**दुंडा पैसा** जुने दोन पैशांचे नाणे; ढब्बू पैसा.

**दुंडावा** वि. बांगड्या नसलेला, भुंडा हात.

**दुंडी** स्त्री.गडबड; दांडगाई; दंगा; बंड; अंधेर. - पया ९१.[सं.द्वंद्व; हिं.दुंद]

**दुंडु** पु. (ना.) ( बालभाषा)वाद्ये; वाजंत्री. [सं.दुंदुभि; हिं. दुंद]

**दुंतणे** उक्रि. दुमडणे; घडी घालणे.

**दुंदुभी** पु. १.एक मोठे चर्मवाद्य; नौबत; नगारा. २. साठ संवत्सरांपैकी छप्पन्नावा संवत्सर.

**दु:ख** न. १. दु:सह, अनिष्ट अनुभव; पीडा; क्लेश; यातना; वेदना. २.अडचण; त्रास; कष्ट; रोग; त्रासदायक गोष्ट. ३. उपदंश; गर्मी. ४. खेद; शोक; पश्चात्ताप. ५. अश्रू; आसू. (गो.) [सं.] (वा.)

० **घोटणे** – दु:ख, शोक करणे: 'बोलतां असें दु:ख घोटिती ।'– कीर्तन १.२७. ० **पाहून डाग देणे** – १. दु:खाचे बीज शोधून तेवढ्याच जागी इलाज करणे. २. अपराधाच्या मानाने शिक्षा करणे. ० **वेशीस बांधणे** – (गावच्या वेशीला बांधलेली वस्तू सर्वांना दिसते यावरून)आपले दु:ख, अडचण सर्वांना कळवणे; आपले संकट, त्रास, पीडा लोकांमध्ये जाहीर करणे. **दु:खावर डाग–डागण्या देणे, फासण्या घालणे, टाकणे** – दु:खी मनुष्याला मर्मभेदक बोलण्याने आणखी दु:ख देणे. **दु:खाचा प्राणी** – ज्याला जन्मभर संकटे, दु:खे सोसावी लागली असा मनुष्य. **दु:खे पापे** – अतिशय कष्ट व त्रास सोसून; मोठ्या प्रयासाने.

**दु:खपरिणामी–पर्यवसायी** वि. ज्याचा शेवट दु:खकारक झाला आहे असे (नाटक, गोष्ट ).

**दु:संबळ** वि. पराधीन : 'तो काई सावाधावा न करी जी दु:संबळ विप्रवलु जी '– अज्ञातच २४.

**दूक** स्त्री. (कडब्याच्या पेंढ्या, विटा इ.ची) जोडी.

**दूख** स्त्री. न. दुखणे; आजार; दुखी; दु:ख. (गो.)

**दूज** न. बारांचा समुदाय; डझन. (गो.) [पो.दूझिआ]

**दूटी** स्त्री. पासोडी; दोनपटी: 'मेघवर्णी दूटी'– प्रमा ६. [सं.द्वि + पट]

**दूड** स्त्री. १. दुपदरी गळसर, माळ; स्त्रियांचे एक कंठभूषण: 'सोने' दूड करण्यास दर तोळा रुपये १५ । प्रमाणें.' – वाडसमा १.७२. २. दोन घागरींची जोडी. [सं.दु; सिं. दुरी]

**दूड** स्त्री. गोचीड; खिरड.

**दूड** पु. भातात उगवणारे एक प्रकारचे गवत. (राजा.)

**दूण** स्त्री. १. दोन्ही काठ एकमेकांना जोडून (वस्त्र इ.) शिवणे; दोन बाजू किंवा कडा एकत्र जोडल्याने होणारी शिवण; दंड. २. वस्त्र, कागद, दोरी इ.ना दुणल्यामुळे पडणारा सळ, मोड, मुरड. ३. एकदा नांगरलेली जमीन पुन्हा नांगरणे. (क्रि. करणे, घालणे.). (को.) ४. घडी; दुमड; मुडपा. ५. (सोंगट्यांचा खेळ) एक-एक मिळून होणारे दोनाचे दान (गो.)

वि. दुप्पट: 'अचपळ गुणगूर्णी बैसली प्रीति दूणी ।' – दावि १५४. [सं.द्विगुण]

**दूत** पु. १. एखाद्याला बोलावून आणण्यासाठी, पत्र देण्यासाठी, निरोप सांगण्यासाठी पाठविलेला मनुष्य; निरोप्या; जासूद; बातमीदार. २.वकील; शिष्टाईसाठी पाठवलेला मनुष्य. [सं.]

**दूत** न. भविष्य. (व.)

**दूतिका** स्त्री. एकांत मैत्रीण; निरोपाची ने-आण करणारी स्त्री.

**दूती** स्त्री. कुंटीण: 'परकार्ये दूतीचे नाक छेदिलें.' – पंचो १६.१०.[सं.]

**दूदा** वि. घोड्याचा एक विशिष्ट रंग. – अश्वप १.२७. [फा.दूदु]

**दूध** न. १. बाळाच्या पोषणासाठी मातेच्या स्तनात उत्पन्न होणारा पांढरा रस; दुग्ध; क्षीर. २. वृक्ष, वनस्पती इ. तून निघणारा पांढरा रस, चीक. ३. नारळाच्या चवातून निघणारा पांढरा रस. ४. धान्याच्या कोवळ्या कणसातील दाण्यांतून निघणारा पांढरा रस. ५. स्तन.(राजा.)[सं.दुग्ध] (वा.) **दुधाची तहान ताकाने घालविणे, ताकावर भागविणे** – इष्ट, इच्छित वस्तू लाभत नाही असे पाहून तिच्यापेक्षा निकृष्ट वस्तूच्या लाभाने संतुष्ट होणे, समाधान मानणे. **दुधात साखर पडणे** – (दूध मुळातच मधुर असते. त्यात साखर टाकल्यास त्याची गोडी अजूनच वाढते. यावरून) आधीच चांगल्या असलेल्या गोष्टीत दुसऱ्या चांगल्या गोष्टीची भर पडणे. **दुधान जेववून ताकान आचवप** – आधी गोड व नंतर कडू , वाईट बोलणे. **दुधाने धुपणे** – निर्दोष असणे. सोज्वळ. (गो.) **दुधाला–स आटणे** – (गाय, म्हैस इ.) कमी दूध देऊ लागणे. **दुधाला–स फुटणे** – (गाय, म्हैस इ.) पुष्कळ दूध देऊ लागणे. **(एखाद्याच्या) ओठावर दूध दिसणे, ओठावरील दूध वाळलेले नसणे** – (तिरस्कार्थी) वयाने लहान असणे; प्रौढ नसणे; जगाचा अजिबात अनुभव नसणे. **प्रथम, पहिल्या धारेचे दूध** – (नुकत्याच व्यालेल्या गाय, म्हैस इ.चे) पहिले दूध; चीक.

**दूधकरीण** स्त्री. लहान मुलाला दूध पाजण्यासाठी ठेवलेली दाई.

**दूधकलमी** स्त्री. एक वनस्पती. पहा : **दुधाणी**

**दूधकाटा** पु. दुधाची सापेक्ष घनता मोजण्याचे उपकरण; लॅक्टोमीटर. (याचा किती भाग दुधात बुडतो यावरून दुधातील पाणी, मेद इ. घटकांचे प्रमाण कळते.)

**दूधकोल्ड्रिंक** न. दुधात बर्फ व सरबत टाकून केलेले पेय.

**दूधखुळा** वि. १. आईबापांच्या लाडामुळे मोठेपणीही पोरकट वागणारा. २. भोळसर; मेषपात्र; अजाण.

**दूधदुभते** न. १. (व्यापक) दुभती जनावरे. २. दूध, दही, ताक इ. दुधाचे सर्व पदार्थ. ३. दुभत्या जनावरांची निगा व दुधाचे पदार्थ बनविणे याबद्दलचे विवेचन करणारे शास्त्र.

**दूधपाक** पु. दूध आटवून तांदळाची केलेली खीर.

**दूधपोहे** पु. अव. १. दुधात कालविलेले पोहे. २. उकळी आलेल्या दुधात धुतलेले पोहे टाकून त्यात साखर व आटीव दूध घालून केलेले खाद्य.– गृशि ४३१.

**दूधभाऊ** पु. (मुलाला) पाजणाऱ्या दाईचा मुलगा. [गु.दूधभाई]

**दूधभात** पु. मेजवानीचा विनयाने उल्लेख करण्याचा शब्द.

**दूधभाताची क्रिया** एका ताटात दूधभातावर जेवून मैत्री जाहीर करणे, मैत्रीची शपथ घेणे : 'दूधभात हात देऊन क्रिया घेतली.' – अष्टप्रधानांचा इतिहास १८५.

**दूधभुकटी** स्त्री. दुधातील द्रवपदार्थ काढून टाकून केलेली दुधाची पावडर.

**दूधभोपळा–ळी** पु. स्त्री. दुध्या, पांढरा भोपळा; दुधी; त्याची वेल.

**दूधमांडा** पु. दुधात साखर घालून त्या दुधाचा बोळा तापल्या तव्यावर फिरवून करतात ती आंबोळी. (बे.)

**दूधमोगरा–री** पु. स्त्री. १.पांढरा शुभ्र दाणा असणारी नाचणीची एक गरवी जात. २. शाळूचा एक प्रकार.

**दूधमोगरा** पु. तगर. (ना.)

**दूधवडी** वि. दुधाच्या (वडीच्या) रंगाचा: 'दूधवडीची करडीं कांबडिं। रोदेचीं सोनेखैरीं ।' – दाव २८९.

**दूधसंचयन** न. मोठ्या शहरांमधून दूध पुरवण्यासाठी ठिकठिकाणांहून दूध आणून त्याचा केलेला साठा. (इं.) डेअरी.

**दूनीची तान** (संगीत) चिजेची जी लय सुरू असेल तिच्या दुप्पट लयीमध्ये घेतलेली तान.

**दूम** पु. १. शेपूट; पुच्छ. २. (ल.) पत्ता; तपास; शोध. (क्रि. लागणे). (कर.)[फा.] (वा.) ० **निघणे, बाहेर पडणे** – फार त्रास, कष्ट होणे; पादाडले जाणे. ० **पुरवणे** – पिच्छा पुरवणे; गळी पडणे; खनपटीला बसणे.

**दूम** वि. १.दुसऱ्या, मध्यम, दुय्यम प्रतीचा : 'जमीन अवल दूम, सीम तिही प्रतीची.'– वाडसमा १.३७. २. दुय्यम; हाताखालचा (अधिकारी इ.); मदतनीस. [फा.दूयुम]

**दूर** क्रिवि. पुष्कळ अंतरावर; लांब.

वि. १. (काळ, अंतर, संबंध, नाते इ.च्या बाबतीत) लांबचा; जवळचा नव्हे असा. २. असंभवनीय; दुरापास्त; दुर्घट. ३. बडतर्फ; नोकरीवरून काढलेला. [सं.; फा.](वा.) ० **धरणे,पाहणे** – परका लेखणे. ० **लोटणे**– संबंध तोडणे.

**दूरगामी** वि. दूरवर पोहोचणारे.

**दूरचित्रवाणी** स्त्री. एखादे दृश्य विद्युत– चुंबकीय तरंगांच्या साहाय्याने एका ठिकाणाहून दुसऱ्या दूरच्या ठिकाणी दाखवणे; (इं.) टेलिव्हिजन.

**दूरछायाचित्रण** न. विशिष्ट प्रकारची, आकार मोठा करून दाखविणारी पण दृश्याची व्याप्ती कमी असणारी, झूम वापरून फोटो काढण्याची क्रिया.(इं.) झूम फोटोग्राफी

**दूरत्वमिति–ती** स्त्री. (न.श.)दूर अंतरावर असलेल्या वस्तूचे अंतर मोजण्याचे शास्त्र.

**दूरदर्शक** पु. दूरवरची वस्तू पाहण्याचे यंत्र, दुर्बीण; (इं.) टेलेस्कोप.

**दूरदर्शन** न. पहा : **दूरचित्रवाणी**

**दूरदर्शन, दूरदृष्टी** न. स्त्री. १. दूरवर विचार करणे; तशी क्षमता. २. बसल्या जागी कितीही दूरचे दिसू शकणे; एक सिद्धी : ' हे तिसरे सिद्धीची लीला। दूरदर्शन कळा ती नांव ।' – एभा १५.७१.४४७. [सं.]

**दूरदर्शी– दृष्टी–देशी– द्रष्टा** वि. १. दूरवर, खोल विचार करणारा. २. भविष्यदर्शी; भविष्यचिंतक. [सं.]

**दूरदस्त, दूर्दस्त** वि. लांबचा; दूरचा: 'लाहोर प्रांत दूर्दस्त आहे.'– इम २६७. [फा.दूदस्त]

**दूरद्रष्ट** न. नशीब; दुर्दैव.

**दूरध्वनी–भाष** पु. दूर अंतरावरील व्यक्तीशी विद्युत व ध्वनितरंगांच्या साहाय्याने संभाषण साधण्याचे साधन; शब्दवाहक तारायंत्र.

**दूरनियंत्रक** पु. दूर अंतरावरून यंत्रांना सूचना देण्याचे कळयंत्र; (इं.) रिमोट कंट्रोल.

**दूरनियंत्रण** न. प्रत्यक्ष संपर्क साधल्याशिवाय भूप्रदेश, त्यावरील पिके, समुद्रावरील घडामोडी यांची नोंद करणे; रिमोट सेन्सिंग.

**दूरमापन** न. एखाद्या गोष्टीचे दूर अंतरावरून मापन करण्याचे तंत्र; (इं.) टेलिमेट्री. याचा उपयोग अवकाशयानांचा मार्ग ठरवणे, रुग्णाच्या हृदयाची स्थिती जाणून घेणे इ. साठी होतो.

**दूरमुद्रण** न. सांकेतिक खुणांनी पाठवलेल्या मजकुराचे पुन्हा सरळ लिपीत केले जाणारे रूपांतर.

**दूरलेखन** न.सांकेतिक संदेशांद्वारे दोन वेगवेगळ्या अंतरावरील जागांमध्ये संदेशवहन करण्याची पद्धत; (इं.) टेलिग्राफी.

**दूरवर** क्रिवि. लांबवर; खोलपणाने; दूरदृष्टीने.

**दूरश्रवणयंत्र** पहा : **दूरध्वनी– भाष**

**दूरसंचरण, दूरसंचार** न. पु. तारायंत्र, टेलिफोन, टी.व्ही. व उपग्रह यांच्याद्वारे होणारे दळणवळण; (इं.) टेलिकम्युनिकेशन.

**दूरसंवेदना** स्त्री. कोणत्याही संपर्काशिवाय दूर अंतरावर असलेल्या दोन व्यक्तींच्या मनात एकाच वेळी एकच विचार येणे; दूरमनोसंप्रेषण; दूरविचारवहन; (इं.) टेलिपथी.

**दूरस्थ** वि. दूर असलेला; लांबचा; दूरदेशी असलेला.

**दूरस्थ शिक्षण** महाविद्यालयात उपस्थित राहू न शकणाऱ्यांसाठी विविध संपर्कमाध्यमांमार्फत शिक्षण देण्याची पद्धत.

**दूरस्थापन रजा** संसर्गजन्य रोगाच्या धोक्यामुळे दूर ठेवलेल्या व्यक्तीला मिळणारी रजा.

**दूरंदेशी** स्त्री. दूरदृष्टी; दूरदर्शित्व: 'दादासाहेब याजकडील जमेत भारी आपला निभाव पडणार नाहीं... ही दूरंदेशी माधवराव साहेब चितांत आणिली.'– मदरू २.८९ [फा.]

**दूरान्वय** पु.ओढूनताणून लावलेला संबंध.

**दूरास्थापनशाला** स्त्री. रोगाची साथ अधिक पसरू नये म्हणून आजारी लोकांसाठी वस्तीपासून दूर केलेली राहण्याची सोय; (इं.) क्वारंटाइन.

**दूराही** वि. दुप्पट मोलाचे : 'हे दाम दूराही' – लीचपू ७८. [सं.द्वि + अर्ध]

**दूर्वा** स्त्री. अव.१. एक पवित्र मानलेली औषधी हरळी. हिची मुळे सदा सर्वकाळ ओली राहतात.२. हरळीचा तीन पात्यांचा शेंडा. [सं.]

**दूर्वाव्रत** न. स्त्रियांनी दूर्वांनी गणपतीची पूजा करण्याचे व्रत. [सं.]

**दूर्वाष्टमी** स्त्री. भाद्रपद शुद्ध अष्टमी. या दिवशी दूर्वाव्रत करतात. [सं.]

**दूर्वेगूष** वि. घोड्याचा एक विशिष्ट रंग. यांत घोड्याचें सर्व शरीर लाल असून त्यांत काळ्या रंगाचें मिश्रण असतें.– अश्वप २९.

**दूशेर** स्त्री. जू; जोखड. (खा.)

**दूषक** वि. १. दोष लावणारा; निंदक. २.दूषित करणारा. [सं.]

**दूषण** न. निंदा; दोष; न्यून; ठपका; आक्षेप. [सं.]

**दूष(षि)णे** उक्रि. १. दोष, उणे, न्यून काढणे: 'काव्य करावे म्यां नच वचकावें दूषितो, परि लघूस।' – मोस्फुटआर्या नवनीत २५४. २. दोष, कलंक लावणे, लागणे; कलंकित करणे, होणे. ३. (कुमारीला, स्त्रीला) भ्रष्ट करणे; कौमार्य, पातिव्रत्य भंग करणे. ४. न पाळणे; मोडणे (वचन, करार). [सं.]

**दूषिक** पु. तोंडावर असणारा काळा डाग; लासे.

**दूषित** वि. १. दोष लावलेले; निंदित; आक्षेप घेतलेले. २.भ्रष्ट; बिघडलेले; दोषयुक्त; कलुषित; कलंकित; अशुद्ध. [सं.]

**दूषित ताप** दोषी, विषारी ताप; (इं.) सेप्टिक फीव्हर : 'माझ्या पत्नीला दूषित ताप येत आहे म्हणून ती जरा घाबरली आहे.' – सुदे १३७.

**दूह** स्त्री. मुलगी; कन्या; दुहिता.(गो.) [सं.दुहिता]

**दृक्–ग्** स्त्री. दृष्टी; नजर. दृक्कर्म, दृग्गोचर इ. सामासिक शब्दांत, डोळे या अर्थाने उपयोग. [सं.दृश्]

**दृक्चेतनी** स्त्री. दिसलेल्या गोष्टीचे आकलन करून देणारा मज्जातंतू.

**दृक्परिषद** स्त्री. संगणकाच्या मदतीने होणाऱ्या उपग्रहाधिष्ठित दृक आणि श्राव्य संदेशांच्या दळणवळण यंत्रणेचा वापर करून जगातील विविध ठिकाणी असलेल्या व्यक्तींचा एकमेकांशी होणारा परिसंवाद; (इं.) व्हिडिओ कॉन्फरन्सिंग.

**दृक्प्रतिमा** स्त्री. डोळ्यांना झालेल्या संवेदनांतून तयार झालेली प्रतिमा. ती पुनर्जीवित करता येते हे तिचे वैशिष्ट्य.

**दृक्प्रत्यय** पु. प्रत्यक्ष पाहिल्याचा पुरावा; दृष्टिप्रमाण. [सं.]

**दृक्शिक्षण** न. नकाशे, चित्रे, दूरचित्रवाणी इ. साधनांचा उपयोग करून द्यावयाचे शिक्षण.

**दृक्श्राव्य** वि. एकाच वेळी ऐकता व बघता येईल असा (कार्यक्रम). [सं.]

**दृक्श्रुती प्रमाणपत्र** नीट दिसू शकते व वाचता येऊ शकते असे डॉक्टरने तपासणी करून दिलेले प्रमाणपत्र.

**दृक्संहितारेखाटन** न. सिनेमाचे देखावे, प्रकाश, नटांना देण्याच्या सूचना इ. तपशील घालून तयार केलेली संहिता.

**दृक्क्षेपमंडळ, दृक्क्षेपवृत्त** न. (ज्यो.) त्रिभोन लग्न (नव्वद अंशां)तून जाणारे लंबवृत्त. दृश्य क्रांतिवृत्ताच्या सर्वोच्च बिंदूतून जाणारे याम्योत्तरवृत्त. [सं.]

**दृग्गोचर** वि. डोळ्यांना दिसणारे. [सं.]

**दृग्गोल** पु. १. बुबूळ. २. (ज्यो.) दृङ्मंडल. [सं.]

**दृग्ज्या** स्त्री. (ज्यो.) नत, नतांश ज्या. [सं.]

**दृग्यंत्र** न.दुर्बीण.

**दृघाड** वि. अवाढव्य; अजस्र; फार मोठा; अवजड (सामान्यत: वस्तूच्या संबंधी प्रयोग). [सं.दीर्घ + म. आड प्रत्यय]

**दृङ्मंडल, दृग्वृत्त, दृग्वलय** न. (ज्यो.) लंबवृत्त; खमध्यवृत्त. [सं.]

**दृङ्मात्र** वि. ज्ञानमात्र : 'जेणें ज्ञान सज्ञान होये । दृङ्मात्र दृष्टीतें विये ।'– अमृ ७.२७३. [सं.]

**दृढ** वि. १. पक्का; घट्ट; कठीण; ज्याचे भेदन, छेदन व चलन करणे कठीण आहे असा. २. निश्चित; कायम; मुक्रर. ३. ठाम; पक्का; स्थायिक. ४. पुरतेपणी निश्चित केलेला; पक्का; अविचल (बेत, विचार, निश्चय). ५. (सामा.) पक्का; चिवट; चिकट. ६. मनात ठसलेली, बिंबलेली. उदा. दृढनिश्चय, दृढभक्ती. [सं.]

**दृढऊती** मृत पेशी असलेल्या, केंद्रक नसलेल्या आणि वनस्पतींना आधार देणाऱ्या तंतुमय ऊती.

**दृढचित्त** पु. एकाग्र चित्त; काळजीपूर्वक दिलेले लक्ष. [सं.]

**दृढप्रतिज्ञ** वि. निश्चयी; कितीही संकटे आली तरी निश्चय शिथिल न होऊ देणारा. [सं.]

**दृढभाजक** पु. (गणित) खाली बाकी उरू न देता काही संख्यांना नि:शेष भागणारी दुसरी सर्वांत मोठी संख्या; विवक्षित संख्यांचा सर्वांत मोठा साधारण विभाजक. [सं.]

**दृढमुष्टी** वि. १. चिक्कू; कृपण; कंजूष; कद्रू; हाताचा जड. २. लगामाचा एक प्रकार. – अश्वप १८५. [सं.]

**दृढमूल** वि. खोलवर रुजलेले.

**दृढसंधि–धी** वि. १. घट्ट विणीचे; घटमूट. २. दाट; घनदाट; मध्ये फट, विरळ जागा नसलेला. [सं.]

**दृढावणे** अक्रि. दृढ, पक्का होणे; बळकट, मजबूत होणे.

**दृढा(ढि)वा** पु. १.दृढपणा; पक्केपणा. २. निश्चय: 'निद्रचिया वा नवचे । ऐसा दृढिवेचेनि अवतरणें नाचे ।' – ज्ञा ६.३४७.

**दृढीकरण** न. १. पक्के करण्याची कृती. २. (ख्रि.) रोम व इंग्लंडमधील चर्चमध्ये बाप्तिस्म्याच्या वेळी लहान मुलांच्या तर्फे जी वचने देण्यात येतात त्यांच्या पूर्ततेची जबाबदारी मुलांनी प्रौढ झाल्यावर स्वत:वर घेण्याचा विधी; (इं.) कन्फर्मेशन.– सा. प्रा. १२१: 'पूर्ण ख्रिस्ती होण्याकरितां हीं दोन साक्रमेंतें म्हणजे बाप्तिस्मा व दृढीकरण हीं अवश्य आहेत.' – ईवि १७८. [सं.]

**दृतशीतन** न. अतिशय तापवलेला धातू थंड पाण्यात किंवा तेलात चटकन बुडवला असता त्यांच्या टणकपणात वाढ होण्याचा गुणधर्म; (इं.) क्वेंचिंग.

**दृति–ती** स्त्री. सुगंध; सुवास: 'पवळेंयां चिआं दृती । जावडे फालओनि नीगुती ।' – शिव ५९०.

**दृप्त** वि. गर्वाने ताठलेला, फुगलेला. [सं.]

**दृप्त (दृष्टी)** स्त्री. (नृत्य.) दृष्टीमध्ये निश्चलता, विकसितपणा व सात्त्विकता दाखवण्याचा अभिनय. हा उत्साहवृत्तीला अनुकूल आहे. [सं.]

**दृश्य** वि. १. दिसणारे. २. बाह्य; बाहेरील (अंग).
न. (ल.) जग: 'तरी तें आपणयापुढें । दृश्य पघळे येवढें ।'– अमृ ७.८७.
पु. (अंकगणित) दिलेली किंवा गृहीत संख्या. [सं.]

**दृश्यकाव्य** न. ज्या काव्याचा अनुभव नटनटींनी रंगभूमीवर केलेल्या अभिनयाद्वारा घेता येतो ते; उदा.नाटक, सिनेमा. [सं.]

**दृश्यचित्र** न. पक्के चित्र. (इं.) शॉट.

**दृश्यप्रसरण** न. (पदार्थ.) पदार्थाचे प्रत्यक्ष झालेले प्रसरण.

**दृश्यमहत्त्व** न. (ज्यो.) नुसत्या डोळ्यांना दिसणारा मोठेपणा.

**दृश्यमान** वि. दिसू लागणारे; नजरेपुढे असलेले, दिसणारे. [सं.]

**दृष्ट** स्त्री. १. दृष्टी; नजर. २. एखाद्याच्या वाईट नजरेने मनुष्य, वस्तू इ. भारला जाणे व त्याला पीडा होणे. (क्रि. होणे, लागणे.).
वि. पाहिलेले, दिसलेले; दिसणारे. [सं.]

**दृष्टकूट** न. कोडे; गूढ; कूटप्रश्न. [सं.]

**दृष्टदोष** पु. १. प्रत्यक्ष, दिसणारा, ढळढळीत अपराध, चूक. २. प्रत्यक्ष दिसणारे पाप; (एखाद्याच्या) हातून घडलेले पाप.
वि. ज्याचा दोष नजरेला आला आहे असा. [सं.]

**दृष्ट(ष्टि)मणी** पु. दृष्ट लागू नये म्हणून लहान मुलाच्या हातात, गळ्यात बांधतात तो पांढरे ठिपके असलेला काळा मणी. [सं.]

**दृष्टस्वप्न** न. दुष्ट स्वप्न; दु:स्वप्न; पुढील अनर्थ सुचविणारे स्वप्न: 'परिणामी काय होईल ते पहावें दृष्टस्वप्न आहे.'– पेद १०.६४.

**दृष्ट(ष्टा)ळणे, दृष्टाव(ळा)णे** अक्रि. दृष्ट लागणे; दृष्टीचा वाईट परिणाम होणे; वाईट मनुष्याची नजर बाधणे.

**दृष्टादृष्ट** स्त्री. परस्परदर्शन; नजरानजर; डोळाभेट; दृष्टिभेट.

**दृष्टान्त** पु. १. दाखला; उदाहरण. २. पहा : **दृष्टावा** २. ३. (साहित्य.) एक अलंकार. [सं.]

**दृष्टार्थ** पु. १. दिसणारी वस्तू; दृष्टीचा विषय. २. ऐहिक जीवनातील (एखादी) उपभोगाची, अनुभवाची गोष्ट.
क्रिवि. इहलोकीच्या फायद्यासाठी, सुखासाठी. [सं.]
**दृष्टार्थकर्म** न. ऐहिक जीवनातील सुखासाठी, फायद्यासाठी करण्याचे कर्म.
**दृष्टार्थवाद** पु. जे जे इंद्रियांना जाणवते, कळते तेवढेच सत्य असे प्रतिपादन करणारा संप्रदाय, मत. [सं.]
**दृष्टार्थशास्त्र** न. दिसणाऱ्या किंवा इंद्रियग्राह्य गोष्टींचे शास्त्र; ऐहिक-जीवनविषयक शास्त्र.
**दृष्टावा** पु. १.स्वप्नरूपाने होणारा देवता इ.चा साक्षात्कार; दृष्टान्त. २. अनुभव; पडताळा; प्रचीती.
**दृष्टाळा** वि. ज्याची नजर, दृष्ट बाधते असा (मनुष्य इ.). (राजा.)
**दृष्टि–ष्टी** स्त्री. १. नेत्रगोलात असणाऱ्या पाहण्याच्या इंद्रियाचे कार्य; तिने झालेले ज्ञान; पाहण्याचे सामर्थ्य; नजर. २.(ल.) (एखाद्या गोष्टीकडे देण्याचे) लक्ष; अनुसंधान. ३. (ल.) खरे, खोटे जाणण्यास कारणीभूत असणारी मनोवृत्ती; कल; (एखाद्याशी वागण्याचा, एखाद्याकडे पाहण्याचा) रोख. ४. पाषाणाच्या देवाच्या मूर्तीला बसवले जाणारे रुपे इ.चे डोळे. (राजा.) [सं.](वा.) ० **ओळखणे** – (एखाद्याच्या) नजरेवरूनच, चेहऱ्यावरून त्याचे मनोगत ओळखणे. ० **खालून जाणे** – (एखादी गोष्ट, वस्तू इ. एखाद्याच्या) डोळ्याखालून, नजरेतून जाणे; स्थूलपणे माहीत असणे. ० **घालणे** – १. डोळ्याने इशारा करणे. २. (एखाद्या गोष्टीकडे) काळजीपूर्वक पाहणे, लक्ष देणे, मन लावणे: 'स्वर्गांगनेसीं जरि साम्य आली । परंतु तेथें दृष्टी न घाली।'– रामदासी २.४३. ० **चढणे**– गर्वाने फुगणे; उन्मत्त होणे. ० **चुकणे**– विसरणे; गोंधळून जाणे; घोटाळ्यात पडणे. ० **चुकवणे, चोरणे**– (एखाद्याच्या) डोळ्याला डोळा न देणे; नजरेला पडण्याचे टाळणे. ० **चेपणे** – डोळ्याला डोळा भिडवणे: 'गोसावीयांची दृष्टी चेपे ना'– लीचपू १०७. ० **चोरणे** – नजर भारून टाकणे; नजरबंद करणे : 'कीं पुढिलाची दृष्टि चोरिजे ।' – ज्ञा १४.५. ० **ठेवणे, देणे, राखणे** – एखाद्या गोष्टीची, वस्तूची काळजी घेणे; लक्ष देणे: 'ठेवीना गर्भींही दृष्टिस ती नीट जळहि सेवीना ।'– मोअश्व ४.८. ०**निवळणे** – (ल.) गर्व, ताठा, उन्माद, भ्रम नाहीसा होणे. ० **पडणे, लागणे, होणे** – (एखाद्याच्या) वाईट नजरेची बाधा होणे. ० **फाकणे** – १.गोंधळून, भांबावून जाणे. २. नजर बेताल, ओढाळ होणे. ० **फाटणे** – (एखाद्याच्या) आकांक्षा, महत्त्वाकांक्षा, हेतू इ. वाढणे, विस्तृत होणे. ० **फिरणे** – १. राग येणे : 'येतां दृष्टी त्याची फिरली म्हणे ।' – रामदासी २.९८. २. ताठा चढणे; गर्व इ.ने बुद्धी बदलणे; धुंदी चढणे. ० **बंद करणे** – नजर भारून, मोहून टाकणे; दृष्टी चोरणे. ० **मरणे** – तीच गोष्ट अनेक वेळा पाहून, ऐकून, करून तिच्याविषयीची भीती, आश्चर्य, हिडीसपणा इ. वाटेनासे होणे. **दृष्टीचा अंमल** – १. पाहण्यात, नजरेत आलेला काळाचा अवधी. २.नजरेचे कार्यक्षेत्र, कर्तबगारी. **दृष्टीचा खेळ** – नजरेने, दृष्टीने करण्याची चमत्कृतिपूर्ण, कुशलतेची गोष्ट. **दृष्टीचा खोटा, पापी** – दुसऱ्याचे चांगले पाहून मनात जळफळणारा; मत्सरबुद्धीचा. **दृष्टीचा पसारा** – डोळ्यांना दिसणारे विश्व. **दृष्टीचिये आळिवे राहणे** –नजरेच्या टप्प्यात राहणे: 'बाइसे दृष्टीचिये आळिवे राहिली'– लीचपू १६५. **दृष्टीची मुरवत राखणे**– (एखाद्याच्या) भावनेला मान देणे; (एखाद्याला) न आवडेल अशी गोष्ट त्याच्यासमोर न करणे. **दृष्टीचे पारणे फिटणे** – जे पाहण्याविषयी उत्कंठा आहे, ते पहायला मिळाल्यामुळे समाधान पावणे. **दृष्टीत न आणणे** – न जुमानणे: 'ऐसें वदोनि आणित नव्हतासि च बा परासि दृष्टींत ।' – मोमहाप्रस्थानिक २.२०.**दृष्टीत न येणे** –(एखाद्याला) तुच्छ लेखणे, कःपदार्थ मानणे: 'ज्याच्या दृष्टींत न ते सहसुत पांडवबळी न कंसारी ।' –मोकर्ण ६.६६. **दृष्टीने शिवणे** – डोळ्यांनी पाहणे: 'म्हणतो नाहीं शिवलों दृष्टी करुनिही धराधवा हविला ।'– मोआदि २.३. **दृष्टीस फाटा फुटणे** – दृष्टी फाटणे; दृष्टीचे सामर्थ्य वाढणे : 'जैसें डोळ्यां अंजन भेटे । ते वेळीं दृष्टीसी फांटा फुटे ।' – ज्ञा १.२३. **आडव्या दृष्टीने पाहणे** – वाकड्या काण्या डोळ्याने पाहणे. **चार दृष्टी होणे** – भेट, नजरानजर होणे.
वि. पाहणारा. पहा : **दर्शी**. समासात उपयोग. उदा. गुणदृष्टी, स्थूलदृष्टी इ.
**दृष्टि–अभिनय** पु. (नृत्य.) पापण्या, पापण्यांचे केस, बुबुळे, बाहुल्या व भिवया यांच्या मदतीने केलेला अभिनय. याचे ३४ प्रकार आहेत.
**दृष्टिकेंद्र** न. आपण पाहतो त्या वस्तूची प्रतिमा डोळ्यांत ज्या ठिकाणी स्पष्ट असते ती डोळ्यांतली जागा.
**दृष्टिकोन** पु. विचार करण्याचे, पाहण्याचे धोरण, रोख; मनोवृत्ती; विचारसरणी.
**दृष्टिगुण** पु. पाहिलेल्या वस्तूंचे, मनुष्याचे बरे, वाईट करण्याची (एखाद्यातील) विशिष्ट शक्ती.
**दृष्टिगोचर** पहा: **दृग्गोचर**
**दृष्टिचरित** क्रिवि. जाणूनबुजून, बुद्धिपुरस्सर केलेले (पाप इ.).
**दृष्टिचोर** पु. दुसऱ्याचा डोळा चुकवून चोरण्याचा, पळण्याचा ज्याचा स्वभाव आहे असा मनुष्य.
**दृष्टिपटल** न. नेत्रभिंगाच्या आतील बाजूस असणारा प्रकाशसंवेदी पडदा.
**दृष्टिपथ** पु. दृष्टीची रेषा; दृष्टीचा टप्पा. [सं.]
**दृष्टिपरीक्षा** स्त्री. (वैद्यकशास्त्र) रोग्याच्या डोळ्यांवरून, दृष्टीवरून रोगाची चिकित्सा करणे. [सं.]
**दृष्टिपात** पु. १. (एखाद्या वस्तूवर, मनुष्यावर) नजर पडणे, वळणे; अवलोकन. २. नजर बांधणे; दृष्ट लागणे. [सं.]
**दृष्टिपिंड** पु. डोळ्यांतील पारदर्शक भिंग.
**दृष्टिबंध–बंधन** पु. न. मंत्रसामर्थ्याने डोळे भारून टाकणे; नजरबंदी : 'कीं पुढिलाची दृष्टि चोरिजे । हा दृष्टिबंधु निफजे ।' – ज्ञा १४.५. [सं.]
**दृष्टिभरू** वि. देखणा; सुंदर; डोळ्यांत भरणारा.
**दृष्टि(ष्ट)भेट** स्त्री. १. आसन्नमरण मनुष्याला त्याच्या दूर असणाऱ्या आप्तांची झालेली शेवटची दृष्टादृष्ट. २.नजरानजर.
**दृष्टिमर्यादा** स्त्री. मनुष्याच्या डोळ्यांना जेवढा पृथ्वीचा भाग दिसू शकतो तेवढी जागा; दृष्टीच्या टप्प्यातील भूभाग; क्षितिज. [सं.]
**दृष्टिरचना, दृष्टिरचनेचा उभार** डोळ्यांना दिसणारा इहलोकीचा सृष्टीचा पसारा.

**दृष्टिऱ्हस्वता** स्त्री. लांबचे न दिसणे. [सं.]
**दृष्टिवा** पु. नजर: 'सहज सरळ सुहावा । दाताराचा दृष्टिवा ।' – ऋ ३६.
**दृष्टिविकार** पु. १. वाईट मनुष्याच्या नजरेची (लहान मुलाला)होणारी बाधा. २. दृष्टीचा रोग; डोळे बिघडणे. [सं.]
**दृष्टिवैषम्य** न. एक दृष्टिदोष. यात नेत्रपटलावर पडणारी प्रतिमा एका बिंदूत केंद्रीभूत न होता पसरते व ती अस्पष्ट असते. (इं.) ॲस्टिगमॅटिझम.
**दृष्टिसातत्य** न. आपण पाहत असलेला पदार्थ बाजूला केल्यावर पदार्थाच्या प्रतिमेची दृष्टिपटलावरील संवेदना त्यानंतरही एक दशांश सेकंदाचा भाग इतकी टिकण्याची क्षमता.
**दृष्टिहेळा** स्त्री. कृपाकटाक्ष: 'जयाचिये दृष्टिहेळाचिं संसारू । निरसोनि जाय ।' – विपू २.२८.
**दृष्टीळा** पु. वाईट नजर. पहा: **दृष्ट** २
**दृष्ट्या** क्रिवि. १. डोळ्यांनी; प्रत्यक्ष. २. दृष्टीने; हेतूने; धोरणाने. समासात उत्तरपदी विशेष उपयोग. उदा. कृपादृष्ट्या, मोहदृष्ट्या.
**देउळी** स्त्री. लहान, कोनाडेवजा देऊळ: 'भैरवाची देउळी'– स्थापो २. [सं.देव + कुल]
**देउळेश्वर** पु. गावदेव; ग्रामदैवत. [सं.देव + कुल+ईश्वर]
**देऊपाशेरी** स्त्री. १. व्यापारी लोक जिन्नस मोजून घेण्याचे एक व देण्याचे एक अशी निरनिराळी वजने व मापे ठेवतात. त्यांपैकी घेण्याचे माप मोठे असते व देण्याचे माप लहान असते. त्यापैकी देण्याचे माप. एक पाचशेरी वजन. मूळ वजनापेक्षा हे कमी असते. त्यामुळे खोटे माप गिऱ्हाइकाला देता येते. २. (ल.) अतिशय कृपणपणा; कंजुषी. वि. कृपण; कंजूष.
**देऊळ** न. देवघर; देवालय; मंदिर. [सं.देवालय]
**देऊळघाट** स्त्री. १. देवळातील घंटा. २. (ल.) बडबड्या, बढाईखोर माणूस.
**देऊळवाडा** पु. देवळाभोवतालचे सेवकांनी राहण्याचे आवार.
**देओमूली** वि.देवाच्या नावाने अर्पण केलेली भूमी: 'ईए भूमी कणैरेश्वर देओमूली'– नेवासे शिलालेख १.६. [सं.देव + मूलिका]
**देओ** पु. दिवस: 'राति देओ न घटे । सूर्यु जैसा ।'– ज्ञा १२.१९४. [सं.दिव्]
**देकार** पु. १. दक्षिणा; दान; धर्मादाय; देणगी: 'जगीं मान्य केलें हा तुझा देकार । कीं कांहीं विचार आहे पुढें ।' – तुगा १२७८. २. लग्नातील आहेर.(व.) ३. एक खंडी भाताचे तांदूळ करण्याबद्दल भाताच्या रूपाने देण्याची मजुरी. (क्रि. देणे, करणे, वाटणे.). (गो.)
**देकारी** स्त्री. जे मागेल ते देऊन टाकण्याची वृत्ती.
**देख** पु. १. दर्शन. २.देखावा. (क्रि.दाखवणे).३. धडा. स्त्री. कित्ता; वळण; चाल.(गो.) [सं.दृश्]
**देख(ग)चा, देचके** पु. न. डेचकी; स्वयंपाकातील मोठे भांडे; डेग. [फा.देग]
**देखणा** वि. सुंदर; मोहक; छबडा. पु. पाहणारा, डोळस माणूस: 'मार्गी अंधासारिखा । पुढें देखणाही चाले जैसा ।' – ज्ञा ३.१५६.
**देखणाऊ** वि. डौली; दिखाऊ; पोशाखी; सुंदर पण कुचकामाचा.
**देखणिक** स्त्री. दृष्टोत्पत्ती; दृष्टी: 'बुद्धी तेजापासूनि झाली । म्हणोनि देखणिकेला आली ।' – सिसं २३.
**देखणीया** वि. सुंदर.
**देखणे** न. १. जमिनीत पुरलेले गुप्तधन; ठेवा: 'येक दाविती देखणीं ।' – दावि ६४. २. भपका: 'देखणें दाखविती आदरें ।' – दास ५.२.२९. ३. प्रकाश; दृश्य; देखावा: 'तेवीं लचकलिया दिठी । मग देखणें जें जें उठी ।' – ज्ञा १४.८४. ४. दृष्टी; नेत्र; अवलोकनशक्ती: 'शस्त्रांपासाव तेज तळपे । तें देखोनि देखणें दिपे ।' – गीता १.३३३.५. मोह; आकर्षण: 'कैसी रूपसे कामाणें : जीवा घालीति देखणे' – ऋव ३४०.
**देखणे** सक्रि. १. पाहणे . २. ध्यान देणे; मनन करणे. ३. शोधणे; चौकशी करणे; हेरणे; तपासणे. [सं.दृश, दृशेन्य, दक्ष्यति]
**देखणेपण** न. १. ज्ञानदृष्टी; पाहण्याची शक्ती; ज्ञान: 'वेदींचें बृहत्सामसूत्र । जें देखणेंपणें पवित्र ।'–ज्ञा १३.६८.२. आकर्षकपणा.
**देखत** क्रिवि. १. पाहताना; डोळ्यांसमोर; प्रत्यक्ष. २. (ल.)जिवंत; हयात असताना; आयुष्यात. ३. उघड उघड; स्पष्टपणे. देखतच्या पुढे खालील शब्द जोडतात. उदा. देखत सोदा, लुच्चा, लबाड, हरामी इ.
**देखतभुली–भूल** स्त्री. १. नजरबंदी; दृष्टिभ्रम (जादूगाराचा). (क्रि. करणे, पडणे, पाडणे.). २. नजरचूक.३. मुलींचा एक खेळ.– मखेपु ३७२.
**देखदुखी–ख्या** वि. मत्सरी; हेवेखोर.
**देखभट्टी** स्त्री. गुरूकडून शिक्षण न घेता नुसते पाहून शिकण्याची कला.
**देखभाल** स्त्री. व्यवस्था; काळजी.
**देखरेख** स्त्री. नजर ठेवणे; चौकशी; पाहणी; पैरवी.
**देखावा** पु. १. किंचित नमुना; दिग्दर्शन; दाखविलेली चुणूक. २. दर्शनी भाग, बाजू; दृश्य; दृश्यभाग. ३. दृष्टिविषय.
**देखी** स्त्री. १.अनुकरण करण्यासाठी अवलोकन, पाहणी; कित्ता; वळण: 'जे आचरतां आपणपेयां । देखी लागेल लोका यया ।' – ज्ञा ३.१५४. २. दृष्टी; दिशा: 'जिया देखी सुभट । जाणते जाले ।' – ज्ञा २.२१३. [सं. दृश्]
**देखीचा** वि. १. अनुकरण करणारा. २. वरवर दिसणारा : 'देखीचें तें ज्ञान करावें तें काई ।'– तुगा २८१०.
**देखीचे** न. (संसर्गजन्य असल्यामुळे) देवीचा रोग. (क्रि.येणे). (को.)
**देखीत–द–ल, देखूत** क्रिवि. १. सुद्धा; ही. २. तसेच. ३. सह; मिळून; समावेश करून: 'बटीक देखील पोरें असामी तीन.'– वाडबाबा २.१९१. ४.मुळे; कारण; म्हणूनच; यासाठी. [फा.दाखिल]
**देखीव** वि. १. पाहिलेले; पाहून माहीत असलेले. २. आनंदकारक; पाहण्यास संतोषदायक; दिखाऊ.
**देखू शकणे** १. पाहू शकणे; सहन करणे (मत्सरी माणसाकडून); सह्य असणे; पाहवणे. २.मत्सरबुद्धीने पाहिले जाणे.
**देखोदे(व–वा–वे)खी** स्त्री. अनुकरण; स्पर्धा; चढाओढ. क्रिवि. १. वरवर; स्पर्धेने; चढाओढीने. २. दुसऱ्याचे पाहून: 'अंतरींचा भाव भाय कळें लोकां । एक मानी एका देखोवेखीं' – तुगा १६५१. ३. एखाद्याच्या दृष्टिदेखत; हातोहात. [देखणे द्वि.]
**देग** स्त्री. धातूचे मोठे भांडे. पहा: **डेग** [फा.]

**देगण** न. मातीचा उंचवटा. (गो.)
**देगंदाज** पु. तोफ डागणारे. - पेम ५३२. [फा.]
**देघ** स्त्री. देणे-घेणे; सावकारी; पैशाचा व्यवहार.
**दे(द्या)ज** न. (काही जमातींत) लग्नात मुलाच्या बापाने मुलीच्या बापाला देण्याचा पैसा-हुंडा; कन्याशुल्क: 'ताक-वीकीतियां गौलणी । देजासि वैकुंठ मनी ।'-शिव २०७. [सं.देय]
**दे(दें)जी** पु. खूण. (गो.) (वा.) ० **मारप** - नाव कमी करणे; नाव गाळणे.
**देटपुळी** स्त्री. पाठीच्या कण्यावरील गळू; काळपुळी.
**देटवा** पु. भाजीचा देठ : 'मालत्या बोटवे शुभ्र देटवे ।'- अमृतसु ३५.
**देटी-ठ** वि. बलवान (पुरुष): 'देटियां देवांचा बापु' - शिव १५४.
**देटुगी** वि. ठसठशीत; बलवान: 'विचाराची देटुगे आकारनिराकार सांगे'- निगा ११७.
**देट्टांग** न. चवली.(गो.)
**देठ** पु. १.फळ, फूल वगैरेंचा दांडा. २. राजगिरा किंवा माठाची भाजी (झाडाच्या कोवळ्या देठांची, कांडाची).३. तंबाखूच्या पानांतील शिरा. ४. (ल.) आधार; थारा; पाया; टेकू; जोर.[क.दं(दें)टु] (वा.) **देठाचा निघणे** - कुळापासून निराळा निघणे, पडणे. **देठी ठेवणे** - आश्रयाला ठेवणे. **देठी लागणे, देठावर येणे** - वाढीस, भरभराटीस येणे; (धंद्याचा) जम बसणे; फलदायी होणे. **देठी लावणे** - १. मुळापर्यंत जाणे; उगम शोधणे; माग काढणे. २. सोपवणे; हवाली करणे (काम). ० **चा तुटलेला** - नवशिक्या; नवथर (माणूस); अपक्व.
**देठकाटा** पु. कारल्याचा देठ व काटा.
**देठगण** पु. झाडावरील कच्च्या फळांचा घोस. (व.)
**देठसुटा** वि. परिपक्व; पूर्ण पिकलेले; पिकून गळावयास झालेले (फळ इ.).
**देठा** पु. खांब. (गो.)
**देठी, देठीचे पान** १. पानवेलीची एक जात; तिचे पान; हे हिरवट, मऊ, विशेष लांब व कमी तिखट असते. २. अळवाचे पान. (को.)
**देठी** स्त्री. अळवाच्या पानाच्या देठाचे रायते. (को.)
**देड** न. बात.(गो.)
**देणगी** स्त्री. (कायदा) काही मोबदला न घेता दुसऱ्याला फुकट दिलेली स्थावरजंगम मिळकत. बक्षीस; दान; इनाम. [फा. देहंदगी, देहनगी]
**देणगीकर** पु. विशिष्ट रकमेच्यावर देणगी म्हणून पैसे दिल्यास त्यावर भरावा लागणारा कर. (इं.) गिफ्ट टॅक्स.
**देणगीपत्र** न. देणगीसंबंधीचे तपशील देणारा कागद.
**देणावळ** स्त्री. चाकरी केल्याबद्दल देण्याचा पैसा; मजुरी; भाडे.
**देणी** स्त्री. १. (गंजिफा) डावात नुसता वजीर आला असता तो हुकूम करण्यासाठी त्या जातीचे दुसरे हलके पान टाकून विरुद्ध पक्षाकडील राजा पाडायचा व आपला वजीर हुकूम करायचा ही क्रिया. याप्रमाणेच खालील पानेही सर करण्यासाठी करण्याची क्रिया. २. (ल.) मुलगी.
**देणे** न. १. कर्ज; ऋण. २. देणगी; दान; भेट : 'वेश्येसि सर्वस्व देणें । तेंचि नागवणें ।'-ज्ञा १३.७४३.३.(ल.) कृपा : 'अरे देणें दिधलें हें रघुरायें।' - दावि ३२. [सं.दा]
**देणे** सक्रि. १.स्वाधीन, हवाली करणे. २. देणगी देणे; बहाल, अर्पण करणे. ३. एकाकडून दुसऱ्याकडे जाणे; सोपविणे. ४. मान्य, कबूल करणे. ५. पुढे करणे, ठेवणे. ६. उभारणे.
**देणेकरी-दार** वि. कर्जदार; ऋणको.
**देता** वि. सढळपणे देणारा; उदार. [सं.दा]
**देताघेता** वि. १. देण्याघेण्याचा व्यापार करणारा सावकार; नियमितपणे कर्ज घेऊन वेळच्या वेळी फेडणारा. २.सढळ, खर्चीक हाताचा. क्रिवि. सौदा ठरवण्याच्या वेळी किंवा नंतर.
**देतावणा-ना** वि. १. देण्यासारखा. २. देणारा; देण्याची सवय असलेला.
**देदीप्यमान** वि. पराकाष्ठेचा तेजस्वी, चकचकीत, प्रकाशित. [सं.]
**देन** स्त्री. १. बलुतेदाराला देण्याचा वार्षिक मोबदला. २. नशीब. (झाडी)
**देपोघेपो** स्त्री.ज्यात लभ्यांश नाही अशी त्रासदायक देवघेव.
**देबाकबदिया** पु. घोड्याचा रोग (काळजाजवळ मोठाले फोड होतात). - अश्वप २.३३०.
**देय** वि. १.देण्याचे; द्यायला योग्य किंवा दिलेच पाहिजे असे. २. बाकी; शेष. [सं.]
**देयक** न. पैसे किती, केव्हा व का द्यायचे असे तपशील दाखवणारा कागद; उधारीचे बिल.
**देयकार** पु. शूद्र भट. (गो.)
**देर** पहा: **दीर** : 'कामक्रोध देर मारिती हे लाता ।'-मध्व ३२७. [सं.देवर]
**देर-री** स्त्री. विलंब; खोळंबा; उशीर. [फा.]
**देरकशी** स्त्री. दिरंगाई : 'असी देरकशी होणें खुश्नुमा दिसण्यांत येते कीं काय?' - मइसा ७८१.
**देरी** स्त्री. गवताची गंजी: 'तबेल्यात गवताच्या देरीआड त्या बिचाऱ्या दोघी तरुणींना धाकदपटशाने दडवून ठेवलेले आढळले.' - ससा ३ पृ.१६०.
**देल्ल** पु. उंबरठा. (गो.) [सं.देहली]
**देव** पु. १. ईश्वर; देवता. २. परब्रह्म; परमेश्वर; आदितत्त्व; शिव; जगन्नियंता. ३. जिच्यात विधिपूर्वक देवत्वाची प्रतिष्ठापना केलेली असते अशी लाकूड, दगड, धातू इ.ची मूर्ती. ४. स्वर्गात राहणारे इंद्रादी दिव्य पुरुष. ५. राजा; श्रेष्ठ: 'तो सहदेवहि देवा! येतां त्वत्सूनुच्या कृपाणातें।'- मोकर्ण १४.२८. ६. यक्ष, किन्नर इ. उपदेव. ७. अंगात येणारे वारे.[सं.दिव्](वा.) ० **आठवणे, दिसणे** - हाल होणे. (व.) ० **देव करणे** - १. सारखे देवपूजा, धार्मिक विधी करणे, देवाच्या मागे लागणे. २. पुष्कळ प्रयत्न, हांजी हांजी, प्रार्थना करणे. ० **देवस्थान घालणे, पडणे** - देवाची प्रार्थना करून त्याच्याकडून शत्रूला त्रास देणे; देवामार्फत शत्रूचा नाश करणे; देवस्की करणे.० **देव्हाऱ्यात नसणे** - मालक, मन ठिकाणावर नसणे. ० **पावणे, नवसाला पावणे** - मनाजोगी गोष्ट घडणे. ० **बाप्पा करणे** - (बालभाषा) नमस्कार करणे. ० **होऊ लागणे** - अरेराव, दंडेल होऊ लागणे; वरचढपणा गाजविणे. **देवाकडे जाणे** - मरणे. **देवाचा दगड, पाषाण होणे** - देवत्व जाऊन दगड उरणे. **देवाचे नाव घेणे** - कार्याला प्रारंभ करणे. **देवाने डावा देणे** - नकार मिळणे; मनात काही हेतू धरून मूर्तीच्या डाव्या - उजव्या अंगाला फुले किंवा अक्षता चिकटवतात. त्या डावीकडे पडल्यास नकार समजतात. **देवाने भरणे,**

**धरणे**-देवाला कौल लावला असता त्याने उजवी, डावी न देणे. **देवावर हात ठेवणे** – शपथ घेणे. **देवाशी बसवणे** – अंगात देव, वारे आणण्यास सांगणे. **देवास-ला करणे** – देवाची करणी, इच्छा याअर्थी एखादे अघटित कार्य घडून आले असता तोंडातून निघणारा उद्गार. **देवास पेचणे** – शत्रूवर संकट आणण्यासाठी देवाला बांधणे. **देवास-ला शिताळ देणे** – देवाला स्नान घालणे. **देवासारखा बसणे** – चुपचाप बसणे. **न देवाय न धर्माय**- कोणत्याच चांगल्या कार्यासाठी (पैसा, श्रम) उपयोगी न पडणे.

**देव** पु. ढग; ढगांचा कडकडाट. (वा.) ० **उठणे** – आकाशात ढग जमून पाऊस पडण्याचे वातावरण तयार होणे. (अहि.)

**देवऋण** न. देवाचे कर्ज. हे यज्ञयागादिकांनी फेडतात व त्यामुळे मनुष्याला सुखप्राप्ती होते. [सं.]

**देवऋषि-षी** पु. ज्याच्या अंगात देवतेचा संचार होतो असा भगत (भक्त); अंगातील भूत काढणारा मांत्रिक; तोडगे करणारा.

**देवक** न. १. विवाहादी कार्याच्या आरंभी गणपती, सप्तमातृका वगैरेंचे पूजन करून करतात ती स्थापना. २. काही जातींमध्ये विशिष्ट वनस्पती अगर प्राणी यांना देवाप्रमाणे मानतात, त्यांना म्हणतात.

**देवक** वि. देवाचे; देवासंबंधी: 'देवका ताट काढा हे ब्रीद माझे: तिही लोकी' – शिव ७६. [सं. दैविक]

**देवकळा** स्त्री. मूर्तीची प्राणप्रतिष्ठा झाल्यानंतर तिच्यात येणारे तेज, वैभव, शक्ती इ. देवासारखे ओज, कांती. [सं.]

**देवकापशी, देवकापशीण** स्त्री. कापसाच्या झाडातील एक प्रकार. याचे फूल जांभळे असते. याच्या कापसास देवकापूस म्हणतात. याच्या बोंडांत वेणीसारखी एक मोठी बी असते. – कृषि ३८३.

**देवकार्य** न. १. देवपूजा. २. कुळधर्मानुसार कुलदेवतेची पूजा, अनुष्ठान, जेवण इ. विवाहाच्या आदल्या दिवशी उभयपक्षी कुलदेवतेचा प्रसाद व्हावा म्हणून करण्याचा विधी.

**देवकावळा** पु. कावळ्याची एक जात. याच्या मानेभोवती पांढुरकी पिसे असतात.

**देवकाळ** वि. मांत्रिक.

**देवकांचन** न. कांचन नावाच्या फुलझाडातील एक जात, त्याचे फूल.

**देवकी चमत्कार** देव, पिशाच्च यांचा चमत्कार.

**देवकुसुम** न. लवंगाचे फूल.

**देवकुळे** न.अव. मृतांच्या पुतळ्यांची संग्रहस्थाने. [सं. देव + कुल]

**देवकुंडी** स्त्री. लग्नाच्या अगोदरच्या दिवशी बोहल्याच्या जवळ शास्त्रोक्त रीतीने ठेवण्याची मडकी.(व.)

**देवकुंभा** पु. कुंभा किंवा दुधाणी नावाचे फुलझाड.

**देवकेळी** स्त्री. कर्दळी नावाचे फुलझाड.

**देवखर्च** पु. देवपूजेचा खर्च किंवा या खर्चासाठी बसवलेला कर.

**देवखव** स्त्री.खटपट.

**देवखळ** अव. (तिरस्कारार्थी) घरातील देवांच्या मूर्ती.(ना.)

**देवगण** पु. जन्मनक्षत्रावरून मनुष्याचे देव, मनुष्य व राक्षस असे तीन वर्ग करतात त्यांपैकी प्रथम.

**देवगणपत** न. (सोंगट्यांचा खेळ) देवाला देण्याचा पहिला हात, दान.

**देवगत-ती** स्त्री. १. नशिबाचा फेरा; दैवयोगाने प्राप्त होणारी दशा, स्थिती. २.(ल.) मृत्यू. ३. विटाळशी असताना मेलेल्या स्त्रीचे पिशाच्च. वि. दैवी (कृत्य, नाश इ.).

**देवगाय** स्त्री. गोसाई; मृगाच्या पावसात दिसणारा, आढळणारा, मखमली किडा.

**देवगांधार** पु. (संगीत) एक राग. गानसमय दिवसाचा दुसरा प्रहर.

**देवगिरी** पु. (संगीत) बिलावल रागाचा एक प्रकार . गानसमय दिवसाचा पहिला प्रहर.

**देवगृह-घर** न. १. देव ठेवण्याची खोली. २. मंदिर.

**देवघाई** स्त्री. देवापुढे ढोल वाजविण्याची विशिष्ट गती, प्रकार.

**देवघाट** पु. देवळात जाण्यासाठी बांधलेली वाट, रस्ता.

**देवघेव** पु.स्त्री. व्यापार; कामधंदा; व्यवहार; व्याजबट्टा.

**देवचार** पु. ग्रामदेवीचे दूतरूपी पिशाच्च; पिशाच्चगण.

**देवचे** क्रि. उतरणे; खाली ठेवणे.(गो.)

**देवचेंडू** पु. पाच किंवा अधिक गड्यांनी चेंडूने खेळण्याचा खेळ.–मखेपु ५८.

**देवजन** पु. देवळातील नोकरचाकर.

**देवजी धसाडा** १. माकडाच्या खेळातील पुरुषाचे कपडे घातलेला माकड. २. (ल.) अडाणी, कुरूप, विद्रूप माणूस.

**देवझाड** न. देवाने किंवा पिशाच्चाने झपाटलेला मनुष्य. (को.)

**देवटे** वि. अधिक.

**देवठिके** न. गावांच्या सीमांचा तंटा देवापुढे दिव्य करून तोडल्यामुळे महाराला (इनाम) मिळालेली बिनसाऱ्याची जमीन.

**देवड** स्त्री. १. अनुक्रम; परंपरा; पुनरावृत्ती. (क्रि. लावणे, चालवणे, बसवणे, लागणे, बसणे.). २. रांग.

**देवडचाल** स्त्री. जलद व दुडकी चाल (घोड्याची, माणसाची).

**देवडबा** पु. चोरगल्ली; मुलांचा एक खेळ. – मखेपु ५८. (व.)

**देवडमार** पु. भडीमार; फैर (तोफ, बंदूक इ.ची).

**देवडंड** पु. महारोग; कुष्ठरोग. (झाडी)

**देवडाकाटी** वि. (नंदभाषा) तीस; ३० ही संख्या.

**देवडांगर** पु. काळा भोपळा; चाकी. हे फळ दुध्या, मुगा/मुगवा, काशीफळ यांच्याहून वेगळे आहे.

**देवडांगरी, देवदाली** स्त्री. १. देवडांगराचा वेल. २. घोसाळीचा वेल. ३. देवताड.

**देवडी-ढी** स्त्री. १. दाराजवळची ओटी; शिपाई, नोकर-चाकर इ. बसण्यासाठी असलेली जागा. २. उंबरा. ३. (ल.) चौकी; पहारा: 'देवढीबराबर सराफखाना।' – ऐपो २१५. ४. गर्दी.५. सैन्याच्या तळावरील तंबू.–पेम ५२१. [सं.देहली; क. देवडि]

**देवडे-ढे** न. वाकडे. पहा: **देहुडा**: 'देवडें पद उभारून बाहे।'– सारुह १.७३.

**देवढामारा** पु. भडिमार; सततचा मारा: 'तोफा लागू जाहल्या असल्या तरी देवढामार करणे म्हणोन लिहिले.– पेद १६.९७.

**देवढा** पु.शिकवलेला प्राणी: 'जेथ देवढे भंवत वळसे। अज्ञानाचे ।' – ज्ञा ७.७५ [क. दिह]

**देवढा** पु. धामधूम; प्रस्थ. (व.)

**देवढी** वि. १. अधिक. -हंको. २.दीडपट: 'अगा देवढी वाढी लाहिजे । तेथ मोल देतां न धाइजे ।' – ज्ञा १८.५९९.

**देवणी–ती** स्त्री. उतरण्याची, खाली येण्याची क्रिया. (गो.)

**देवतरू** पु. १. मंदार, पारिजातक, संतान, कल्पवृक्ष, हरिचंदन ही झाडे. २. जुने व पवित्र असे कोणतेही झाड. [सं.]

**देवतवार** पु. कुळदेवतेच्या पूजेचा दिवस.(राजा.)[ सं. देव + तिथिवार – त्योहार – तेहवार – तवार]

**देवता** स्त्री. १. देव; दैवत; प्रतिमा. २. देवपणा; ईश्वरी सत्ता. ३. इंद्रियांचा अभिमानी ईश्वरांश. उदा. चक्षुरिंद्रियाची देवता सूर्य.४. चार नित्य पदार्थांपैकी एक; मायेपासून यक्षिणीपर्यंतच्या देवता. [सं.]

**देवतार्च(र्ज)न** न. १. देवाची पूजा. २. पूजेची उपकरणी.

**देवताळा** वि. फाजील कर्मठ; देवदेव करणारा.

**देवताळे** न. फाजील कर्मठपणा.

**देवत्तर, देवत्रा,देवस्व** न. (कायदा) देवाला दिलेली मिळकत, देणगी.

**देवत्व** न. देवपण; देवाची स्थिती, अवस्था. [सं.]

**देवथांब** न. भाटीवरील तण.(गो.)

**देवदत्त** पु. १. पाच उपप्राणांपैकी एक. याच्यामुळे जांभया येतात. २. अर्जुनाचा शंख.

वि. १. देवाने दिलेले. २. कोणीएक; उदाहरणार्थ घेतलेली कोणीतरी व्यक्ती.

**देवदया** स्त्री. १.परमेश्वरी कृपा. २. (ल.) देवाच्या दयेने प्राप्त झालेली संपत्ती; गुरेढोरे, मालमत्ता, मुलेबाळे इ.

**देवदरबार** पु. १. देऊळ. २.सभामंडप.

**देवदर्शन** न.१. देवाचे दर्शन. २. विवाहानंतर सपत्नीक कुलदैवताला जाणे.

**देवदार–रू** पु. हिमालयात आढळणारा वृक्ष. फार उंच व दिसण्यात सुंदर; आयुष्य सुमारे दोनशे वर्षे. जसजसे हे वृक्ष जून होतात तसतसे बळकट व टिकाऊ होतात. याचे लाकूड जड, सुगंधी, पिवळ्या उदी रंगाचे व तेलाने भरलेले असते. याच्यापासून काढलेल्या तेलाला 'केलोनका' तेल म्हणतात. लाकूड इमारतीला उपयोगी. लाल, तेल्या, काष्ट इ. यांचे प्रकार आहेत.

**देवदासी** स्त्री. मुरळी; भावीण; दक्षिणेत देवाला वाहिलेली कुमारिका असा अर्थ रूढ आहे. देवाची सेवा व नृत्य–गायन हा हिचा व्यवसाय असतो.

**देवदिशा** स्त्री. उत्तरदिशा.

**देवदूत** पु. देवाची सेवा करून त्याची आज्ञा पाळणारा, पोचवणारा स्वर्गीय बुद्धिविशिष्ट आत्मा.

**देवदेव** पु. देवपूजा; धार्मिक विधी, पूजा–अर्चा.

**देवदेव्हारा** पु. पुष्कळ देवता, सिद्धपुरुष, साधू यांची भक्ती, प्रार्थना इ. करणे (संकट निवारणासाठी वगैरे).

**देवद्वार** न. १. मंदिराचे दार. २. मंदिर; देवस्थान; पवित्र जागा; धार्मिक कृत्ये करण्याची जागा.

**देवधर्म** पु. १. देवदेव, देवपूजा करणे. २. इच्छापूर्तीसाठी, संकटसमयी नवस करणे, कौल लावणे इ.३. नैमित्तिक धार्मिक कृत्य. (वा.) ० **उठविणे**– दुसऱ्याने पिशाच्चादी क्षुद्रदेवतांमार्फत उत्पन्न केलेली पीडा वगैरे दूर होण्यासाठी शांती वगैरेसारखी कृत्ये करणे.

**देवधन्या** पु. (उप.) जिवलग मित्र. (झाडी)

**देवधान्य** न. १. ज्याचा नैवेद्य देवाला अर्पण करावयाचा आहे असे धान्य (तांदूळ, गहू इ.). २. रानात आपोआप उगवणारे देवभातासारखे धान्य.

**देवधूप** पु. देवापुढे लावण्याचा सुवासिक धूप.

**देवन** पु. जुगार; द्यूत: 'देवनकर्ता मजशीं मत्तुल्य सभाग्य कोण गा आहे ।' – मोसभा ४.८. [सं.]

**देवनदी** स्त्री. १. गंगा. २. आकाशगंगा.

**देवन(ना)ळ** पु. बोरूची एक जात: 'मीं जाण देवनळही स्वकरीं धराया ।' – र २७.

**देवनागरी लिपी** भारतातील एक प्रमुख लिपी. सिद्धमातृका किंवा कोलक शीर्षक लिपीतून उत्क्रांत झालेली व दहाव्या शतकापासून स्थिर झालेली, मराठी, हिंदी, संस्कृत इ. भाषांसाठी वापरली जाणारी लिपी.

**देवपण–णा** न. पु. १. पहा: **देवधर्म**२. २. देवकळा. ३. अंगात येऊन प्रश्नांची उत्तरे देणे. (गो.)

**देवपळही–ळ्हे** स्त्री. न. कापसाची एक जात; देवकापशी; देवकापूस.

**देवपाट** पु. देवाची मूर्ती ठेवण्यासाठी व पूजा करण्यासाठी असणारा पाट.

**देवपिसे–सी–शी** न. स्त्री. फाजील धर्मनिष्ठपणा.

**देवपुरी** स्त्री. १. वाटेल त्या येणाऱ्याजाणाऱ्याला मोकळीक असलेले घर. २.(ल.) धर्मशाळा.

**देवपूजा** स्त्री. देवाची पूजा. ( वा.) ० **वाढणे** – मगरूर होणे; थोडीशी प्रतिष्ठा वाढल्यामुळे फुगणे.

**देवप्रश्न** पु. १. देवाला कौल लावणे. २. (फ.ज्यो.) ग्रह पाहणे.

**देवबा** वि. १. सदोदित देणारा.२. खर्चीक.

**देवबाभूळ** स्त्री. कंकर; कंकरी; काळी बाभूळ. सामान्य बाभळीसारखा हिचा वृक्ष मोठा होत नाही. फुले पिवळी असतात. या झाडास लाख येते. पिसाळलेल्या कुत्र्याच्या, कोल्ह्याच्या विषावर उपयोगी आहे. -वगु ४.३०.

**देवबुद्धी** स्त्री. १. देवाविषयी आस्तिक्यबुद्धी. २. चराचर विश्व देवमय पाहण्याची बुद्धी.

**देवबोहरी** स्त्री. देव्हारा झाडण्याची केरसुणी.

**देवब्राह्मण** पु. १. यात्रेच्या सांगतेप्रीत्यर्थ ब्राह्मणभोजन घालणे. २. यात्रेच्या ठिकाणी देवाची पूजा व ब्राह्मणभोजन करणे. ३. लग्न–मुंजीपूर्वी प्रथम करतात ते जेवण; ग्रहमख.

**देवभक्ती** स्त्री. १. देवाची सेवा. २. पिशाच्चांचा उपद्रव नाहीसा करण्यासाठी अंगारा लावणे; आपल्या अंगी पिशाच्चांचा संचार करून घेणे इ.

**देवभक्त्या** वि. पंचाक्षरी; मांत्रिक; देवऋषी.

**देवभात, देवसाळी** न.स्त्री. डोंगरात पाणथळ जागी आपोआप उगवणारे भात; एक उपधान्य. हे ऋषिपंचमीच्या दिवशी खातात.

**देवभाषा** स्त्री. संस्कृत भाषा.

**देवभूमी** स्त्री. १. पवित्र भूमी. २.यज्ञयाग करण्याची किंवा जेथे नद्या, मंदिरे वगैरे आहेत अशी पवित्र जागा, प्रांत.

**देवभोळा** वि. १. साधासुधा, निरंतर देवसेवेत मग्न असलेला (मनुष्य). २. सात्त्विक (मनुष्य).

**देवमण-णी** वि. ज्याचे ऊर सोडून वरीलभागी कंठाचें खाली भोंवरा आहे असा (घोडा). हा शुभलक्षणी होय. - अश्वप १.९२.

**देवमंगळ** वि. ज्याच्या कटीवर, उरावर, शिरावर व कपाळावर मिळून चार-पांच भोंवरे असतात असा (घोडा).-अश्वप १.९०.

**देवमाणूस** पु. निरुपद्रवी, विश्वासू, निष्कपटी माणूस.

**देवमालि-ली** पु. भक्त, देवाची सेवा करणारे यांचा प्रमुख : 'देवमालि पेतय दत्त ग'- शिव २.६.२७.

**देवमासा** पु. एक प्रकारचा मासा; याची लांबी ४५ ते ८० फूट असून हा मांसाहारी आहे. जबड्याची उंची माणूस उभा राहील इतकी असते. हा शेपटीने मोठ्या नावा फोडतो. याचे तेल व जबड्याचे हाड उपयुक्त व किमती असते.

**देवमुलुक** पु. नर्मदेच्या उत्तरेकडील भारताचा भाग.

**देवयज्ञ** न. जेवणाच्या पूर्वी करावयाचा एक यज्ञ; वैश्वदेव.

**देवयान** न. देवाकडे नेणारा मार्ग; उत्तरायण.

**देवयानी** स्त्री.एक तारकापुंज; उच्चै:श्रव्याच्या ईशान्येस त्याला चिकटूनच हा तारकासंघ आढळतो. - अंतरिक्षदर्शन पृ. १०३.

**देवयोनी** स्त्री. उपदेव; विद्याधर, अप्सरा, यक्ष, राक्षस, गंधर्व, किन्नर, पिशाच्च, गुह्यक, सिद्ध, भूत या दहा योनी.

**देवर** पु. पहा : **दीर** : 'चुके न परिसार्थक श्रम न देवराचा करी।' - केका ८४. [सं.]

**देवरस** पु. देवऋषी.

**देवराई, देवराहाटा** स्त्री. देवाची जाळी; देवासाठी राखलेले जंगल: 'कांहीं गांवीं देवराहाट्यांची दुरुस्ती करण्याचें ग्रामस्थांनी ठरविलें.'- बलवंत २८.८.१९४०.

**देवराव** न. मंदिर.

**देवरुखी** स्त्री. १. मंदिरातील गाभारा. २. (देवळातील देव ठेवण्याचा) कोनाडा. (कु.)

**देवरुषी-शी, देवलशी, देवलाविसे** पहा: **देवऋषी**

**देवरु(र-ल) सकी** स्त्री. पहा: **देवरसपण**

**देवल,देवलक** पु. १. देवापुढे ठेवलेली दक्षिणा इ.वर उदरनिर्वाह करणारा ब्राह्मण. २. दक्षिणा घेऊन धर्मकृत्ये करणारा भिक्षुक. ३. गुरव: 'कुंभार देवळक तथा धनगर।' - स्वादि ५.३५.

**देवलंड** वि. १. देवाला तुच्छ मानणारा. २. नास्तिक.

**देवलेश** पु. देवापुढे आलेली सामग्री.

**देवलोक** पु. स्वर्ग.

**देववाणी** स्त्री. १. संस्कृत भाषा. २. आकाशवाणी.

**देववेळ** स्त्री. सकाळची वेळ.

**देवसाख** पु. कानड्या रागाचा एक प्रकार. गानसमय दिवसाचा पहिला प्रहर.

**देवसिमनी** स्त्री. सुगरण पक्षी.(झाडी)

**देवसू** वि. देवाला दिलेली, वाहिलेली (जमीन, उत्पन्न इ.). (राजा., कु.)

**देवस्की** स्त्री. १. देवभक्ती. २.गावदेवतेचा वार्षिक उत्सव. ३. देवाला कौल लावणे.

**देवस्थान** न. १. पुण्यभूमी. २. देवाला अर्पण केलेली जमीन किंवा उत्पन्न. ३. देवाचे संस्थान.

**देवळी** स्त्री. १. कोनाडा. २. लहान देऊळ. (पुजाऱ्यालाही उभे राहता येणार नाही असे.) ३.मंदिरातील गाभारा.

**देवळी** पु. भावीण; तिची संतती. यांच्याकडे दिवे लावणे, वाद्ये वाजवणे इ. कामे पिढीजात असतात. यांची स्वतंत्र जात मानतात.[क.देवलक]

**देवा, देवारा** पु. देणे; कर्जफेड: 'देवा कीजो: मग पुढारें खेळिजो ' - लीचपू १८. [सं.देय]

**देवाईल-ले** न. देऊळ: 'बरें झालें तुझें केलें देवाईल। लेकरें बाईल उपेक्षिली।' - तुगा ६५५.

**देवाचे झाड** जिच्या अंगात देव येतो ती व्यक्ती.

**देवाणघेवाण** न. १. देवघेव; व्यवहार; व्यापार; देण्याघेण्याची क्रिया. २. उसने वाण; उसने फेडणे (फायदा, तोटा इ.). ३. थोडे-फार देणे किंवा घेणे; थोडीफार सूट देऊन वगैरे केलेली तडजोड.

**देवाथी** वि. देवाचा भक्त. [सं.देव + अर्थिन्]

**देवाधर्माचा** वि. १. देवाधर्मासंबंधी; पवित्र; धार्मिक (काम, वस्तू, व्यक्ती). २. देव, पिशाच्च यांच्यापासून उत्पन्न झालेला (रोग इ.).

**देवाधर्माने टाकलेला** जातिबहिष्कृत; धर्मबाह्य.

**देवान्न** न. १. देवभात. २. पक्वान्न; उत्तम अन्न: 'निंदिती कदान्न इच्छिती देवान्न। पाहाताती मान आदराचा।'- तुगा २८२७.

**देवापुढचा(पुढे)देव** १. महादेवापुढचा नंदी. २. (ल.) मूर्खशिरोमणी.

**देवारणे** न. १. डोक्यावरचे ओझे ठेवण्यासाठी रस्त्याच्या बाजूने अर्ध्या अर्ध्या कोसावर बांधलेला ओटा. (राजा.)२. (ल.) अर्धकोस.

**देवारी** वि. माल विकणारा.

**देवारी** पु. देवाचा पुजारी: 'उपाहारु देवारियासि'- बांदोडे शिलालेख १.३३. [सं.देव + करिन्]

**देवालय** न. देऊळ; मंदिर. [सं.]

**देवालेवा** पु. पहा: **देवघेव**

**देवाज्ञा** स्त्री. (ल.) मृत्यू. (क्रि. होणे, येणे.)

**देवांग** न.१. उंची रेशमी वस्त्र: 'देवांग अग्नी आहाळेंले' - ज्ञाप्र १०४०. २. एक विणकर जात. [सं.]

**देवांगण** १. निश्चय; शपथ: 'कां न जुझावेया करावें। देवांगण।' - ज्ञा १८.१२७६. २. गंधर्वनगर : 'इचें (अविद्येचें) जें अनिर्वाच्यपण । तें दुजेंही देवांगण '- अमृ ३२६.

**देवांगना** स्त्री. १. स्वर्गातील अप्सरा. २. भावीण; देवळी; देवदासी.[सं.]

**देविणे** सक्रि. देण्याचे ठरवणे, निश्चित करणे: 'यासी मौजे मजकूरपैकी रुपये पन्नास देविले आहेत.' - पेद ७.३४.

**देवी** स्त्री. १. देवाची स्त्री. २. अव. मसूरिका; फोड्या; विस्फोटक; एक रोग. त्यांच्या प्रतिबंधासाठी दंडावर टोचलेली लस. यांना कुंभाराच्या देवी, माता म्हणतात. (क्रि.येणे, काढणे, कानपणे, सुकणे.) [सं.](वा.) ० **चा थाट** - अंगावर पुष्कळ दाट देवी येणे. ० **जागवणे** - देवीचे एक व्रत; देवीचे जागरण करणे.

**देवी** स्त्री. १. राणी; कुलीन स्त्री. २. (ल.) स्वत:ची स्त्री; पत्नी: 'भीम

म्हणे देवीला सांगा, ती जरि म्हणेल सोडीन।'- मोवन ९.५९. ३. देवळाची झाडलोट करणारी, व्यवस्था पाहणारी स्त्री. (गो.)[सं.]

**देवीधर्मी** क्रिवि. १. देवधर्मामध्ये. २. देवधर्माला, व्रतवैकल्ये किंवा धार्मिक आचारविचार, उपाय, उपचार करून; प्रश्न पाहून.

**देवोत्थान** न. चातुर्मास संपल्यावर, कार्तिक शुक्ल एकादशीला विष्णूचे जागे होणे आणि उठणे. [सं.]

**देव्हडा-डी** वि. अधिक: 'तेथ शब्दांकुर वरिपडी । श्रोत्रा वाढी देव्हडी ।' - ज्ञा १५.१००.

**देव्हारघ(स)र** न. देवघर; देव्हारा ठेवावयाची खोली, जागा.

**देव्हारचौकी** स्त्री. देवघराचा चौक; देवघरातील चौरंग: 'देव्हारचौकिये बिजे केलें।' - भाए ५७.

**देव्हारबडवा** पु. पुजारी: 'देव्हारूबडुवा दिवटा वेचकरू ।' - नरुस्व ६९५.

**देव्हारा** पु. १. देवाचे सिंहासन (मूर्ती ठेवण्यासाठी लाकडी, रुपेरी इ.). २. (ल.) डौलाची पूजा; ढोंग. ३. कळवळ्याचे, भक्तीचे प्रदर्शन करणे.[सं.देवगृह](वा.) ० **अवतरणे** – अंगात येणे. ० **घुमवणे** – अंगात आणणे; देवपूजेचे ढोंग करणे : 'आर्यांचे पूर्वज आतांच्या अडाणी लोकांसारखे देव्हारा घुमविणारेसुद्धा होते.'-जोफु. ० **फैलावणे, माजणे, वाढणे** – कवडीमोल मनुष्याची नस्ती प्रतिष्ठा वाढविणे, वाढणे; देवऋषीपणाचे ढोंग करणे. **देव्हाऱ्यातील देव नाहीसा होणे** – भीतीने किंवा आश्चर्याने मन ठिकाणावर नसणे.

**देव्हारे** न.१. पहा: **देव्हारा**. २. जिच्यावर फार प्रेम केले जाते अशी व्यक्ती, वस्तू. ३. जागृत देवपणा (मनुष्यातील).

**देश** पु. १. प्रांत; प्रदेश; भाषाभेदाने भिन्न झालेला प्रांत. २. जागा; स्थान. ३. योग्य स्थान; सभोवतीची परिस्थिति, भूमी. ४. सह्याद्री, बालाघाट, कर्नाटक व गोदावरी नदी यांमधील प्रदेश. ५. (ज्यो.) औरस चौरस १०० योजनांनी व्याप्त भूभाग. ६. परिसीमायुक्त भूमिभाग. उदा.देश (महाराष्ट्र, कर्नाटक इ.); प्रांत(पुणे, वाईप्रांत इ.).[सं.](वा.) ० **घेणे, आपला देश घेणे** – आपल्या स्वतःच्या कामात लक्ष घालणे. **देशाचा पाटा वरवंटा होणे** – बेचिराख, ओसाड होणे, करणे. **देशी जाणे** – स्वदेशी जाणे.

**देशक** पु. समूह: 'परिमळें भ्रमरांचिया देशका : आन वाताति'- रुस्व ८१२. [सं.]

**देशक सत्ता** स्वराज्यापूर्वीची पाटील व देशमुख यांची ग्राम व परगण्यांची वतनी व्यवस्था.

**देशकार** पु. एक राग. गानसमय दिवसाचा पहिला प्रहर.
वि. देशावरचा. (गो.)

**देशकारण** न. देशभक्ती; राजकारण.

**देशकुळकरणी, देशगावडा, देशलेखक** पु. देशपांड्या; महालातील प्रत्येक गावच्या कुलकर्ण्यावरील मुख्य वतनदार कुलकर्णी. कुळकर्ण्यांचा व खोतांचा हिशेब तपासणे हे यांचे काम होते.

**देशचौगुला** पु. देशमुखाच्या हाताखालील अधिकारी.

**देशठक** वि. अट्टल सोदा; महाठक.

**देशत्याग** पु. १. देशांतर. २. हद्दपारी.

**देशद्रोह** पु. स्वदेशाचा विश्वासघात.

**देशपांडे-ड्या** पहा: **देशकुळकरणी**

**देशभक्त** वि. देशाची सेवा करणारा; देशावर प्रेम, भक्ती असणारा.

**देशभाषा** स्त्री. देशाची भाषा; बोलण्याची भाषा; स्थानिक लोकभाषा.

**देशभाषाज्ञान** न. विविध प्रदेशांतील अनेक भाषांचे ज्ञान.

**देशमर्यादा** स्त्री. १. देशातील आचारविचार, संप्रदाय, नियम, पद्धती. २. देशाची सीमा.

**देशमुख** पु. १. परगण्याचा वतनदार अधिकारी. हा परगण्यातील सर्व पाटलांवरील मुख्य असतो. २. (विनोदाने) सोनाराचे काकता नावाचे हत्यार. ३.(ल.) हुलगा (कारण देशावर हा फार प्रिय आहे). ४. वतल (ओतल) मधून पाणी काढण्याचे मडके. ५. (विनोदाने) पिकदाणीसारखा उपयोग करण्याचे मडके. ६. लग्नात आणलेले मडके. (व.)

**देशमुखी** स्त्री. १. देशमुखाचे काम किंवा अधिकार. २. महालातील नक्त जमाबंदीवर शेकडा सात आणि धान्यावर शेकडा तीन असा कर.

**देशमुखीण** स्त्री. १. देशमुखाची बायको. २. वाकळ; गोधडी.(व.)

**देशवटा** पु. हद्दपारी: 'मोक्ष तो पाहातसे वास । रिद्धिसिद्धी देशवटा त्रास ।'-तुगा ७२७.

**देशवही** स्त्री. लोकांच्या नावांची यादी, चोपडी: 'काळाची देशवही । वाचितां माझे नांव नाहीं।' - भाए १५१.

**देशवळ** वि. देशी; खेडवळ: 'असो हे देशवळ (वृक्ष)' - शिव ३०५.

**देशशा(सा)या** वि. माळवी; सोरठी : 'आणिके देशशाया सांगडी। कोसी कनकवर्णी ।'-दाव २८१.

**देशाटन** न. विविध देशांत फिरणे; मुशाफिरी; प्रवास.

**देशावर** पु. देशोदेशी भीक मागत फिरणे.
न. १. अशा रीतीने मिळवलेली भिक्षा. २. परदेश; परदेशी व्यापाराचा, पेठेचा गाव. ३. परदेशी, आयात माल. ४. परदेशीच्या व्यापारी, किमतीसंबंधी बातम्या. (वा.) **देशावरास, देशावर जाणे** - देशभ्रमण करणे.

**देशावरकर-री** पु. देशोदेशी भिक्षा मागत फिरणारा माणूस.

**देशावरी** जिरे. (तंजा.)

**देशाळणे** अक्रि. देशस्थितीला अनुसरून असणे: 'पं. जवाहिरलाल यांचे भाषण लखनौ येथील भाषणापेक्षां पुष्कळच देशाळलें होतें.'- के ५.१.१९३७.

**देशाळू** वि. देशावरचा; मोठ्या शहरातील.(व.)

**देशांग** (संगीत) मूर्छना; रागाचे देशपरत्वे पालटणारे स्वरूप: 'राग रागांग उपांग देशांग: भाषांगेंसी'- नरुस्व १८४. [सं.देश + अंग]

**देशांतर** न. १. परदेश; दुसरा देश;(धर्मासंबंधीच्या विषयात) साठ योजने दूर असणारा अथवा नदी-पर्वताने तुटक झालेला देश. हा परका समजला जातो. २. याम्योत्तर वृत्तापासून पूर्वेकडील अथवा पश्चिमेकडील अंतर.

**देशिक** पु. १.प्रवासी; मुशाफीर; परदेशात फिरणारा. २. आत्मज्ञानोपदेशक सद्गुरू. ३. समूह; थवा: 'ऐसां कव्हणी नाहीं अभिचरिकू । जो होमीं कोंकिळांचा देशिकू।' - शिव ८४३.

वि. देशोधडी: 'अहंकारेसी मन । कां देशिक जालें' - ज्ञा ११.६५४. [सं.]

**देशी** वि. १. घाटावरील; देशासंबंधी. २. (समासात) त्या त्या देशासंबंधी. उदा. पुणेदेशी, एतद्देशी इ. ३. मराठी भाषा; देशातील भाषा: 'देशियेचेनि नागरपणें ।'- ज्ञा १०.४२.

स्त्री. देशभाषा; मराठी : 'ऐसी देशी आणि संस्कृत वाणी । एका भावाचां सुखासनी - ज्ञा १०.४४. [सं.]

**देशीकार** वि. मराठी भाषेमध्ये रचलेले : 'केलें ज्ञानदेवें गीते । देशीकार लेणें ।' - ज्ञा १०.१८०५.

**देशीय** वि. पहा: **देशी** १,२

**देशोधडी–धडीस** क्रिवि. स्वदेश, स्वत:चे गाव सोडून इतर ठिकाणी पोटापाण्यासाठी (फिरणे); मोठ्या आपत्तीमुळे घरदार सोडून इतरत्र (भटकणे).

**देषावळा, देषाळा** पु. देखावा: 'जी देषावळा पाहा पां नयनी' - उह १२१६; 'बाहीरि पाहीजे देषाळा । तरि लागेल परिकाळा' - उह १२१७.

**देस** पु. १. पहा: **देश** १. २. तुच्छतादर्शक शिवी. - शास्त्रीको. ३. एक राग. गानसमय रात्रीचा दुसरा प्रहर. [सं.देश]

**देसक** पु. समूह; थवा: 'मनोर्थगजाचा देसकु' - ज्ञाप्र ४१५. [सं.देश]

**देस(श)क** पु. पिढीजात वतनदार; सरकारी अधिकारी; प्राय: देशमुख.

**देसकत, देसकी** न. स्त्री. देसकाचे काम, अधिकार; देसाईपणाचा हक्क : 'कागल प्रांताची पूर्वी देसकत होती...' -मराचिथोशा ४१.

**देसकाळिचे** वि. आजकालचे : 'देसकाळिचे आचारीये इतुलेयामध्ये आचारित्व ...'- लीचपू १४५. [सं.देश + काल]

**देसकू** पु. समूह. पहा: **देशिक** ३: 'आईकैल श्रोतयाचा देसकू ।' - भाए १६.

**देसगौड** पु. एक राग. गानसमय प्रात:काळ.

**देसधड** स्त्री. देशत्याग करण्यासारखी विपत्ती.

**देसधूळ** स्त्री. अतिशय विपन्नावस्था; पूर्ण कंगाली.

**देसवट, देसाळ, देसोळी** वि. घाटावरील, देशावरील मनुष्य, प्राणी.

**दे(द)सवटा** पु. १. देशाटन; देशांतर; प्रवास; मुशाफिरी: 'कीं मानिला प्रभुमनें तो दसवटाहि उत्सव नवासा ।' - मोवन १०.७०. २. पहा: **देशवटा**

**देसवळ** वि. सामान्य; साधे: 'एवं नीर्ये चौरासी : देसवळ नांव यासि' - ज्ञाप्र ३१०.

**देसाई–य** पु. १. देशमुखासारखा परगण्याचा वतनदार अधिकारी. २. देशमुख -देशपांड्याच्या वडील मुलाला टोपण नाव.(व.)

**देसाउर** वि. खेडवळ; अडाणी: 'प्रथम देसाउर माणसानें आपल्याला तारेने पाठवण्याचा मजकूर लिहून काढावयाचा'. - के ८.३.१९४०.

**देसी** पु. एक राग. गानसमय दिवसाचा दुसरा प्रहर.

**देसुरी** वि. देशावरील: 'तिखटाचा गोळा खाणारे देसुरी लोक अधिक बळकट असतात.' - सहस्रबुद्धे शिक्षणमीमांसा २०४.

**देसोटा** पु. (व.) पहा: **देशवटा**

**देसोरी** वि. परदेशाशी व्यापार करणारे: 'ते उदेमी देसोरी । वाणिये वणजरे ।'-क्रिप ११.३२,पृ. १२१.

**देस्त** न. कित्ता; वळण. (गो.) पहा: **देख**

**देस्सेदेंत** पु. पोर्तुगीजांचे वंशज; पोर्तुगीज व देशी ख्रिस्ती यांच्यामधील मिश्र विवाहातून निर्माण झालेला गोव्यातील युरेशियन वर्ग. [इं. डिसेंडंट]

**देह** पु. शरीर; काया; अंग.[सं.] (वा.) ० **उगाळणे** – (चाकरी इ. ने) शरीर झिजवणे. ० **करवती घालणे** – देहत्याग करणे. ० **कारणी लावणे** – एखाद्या कार्यासाठी स्वत:ला कामाला लावणे. ० **टाकणे, ठेवणे, मोडणे** – मरणे.० **तुटणे** – आजारी पडणे. ० **लोटणे** – मूर्च्छा येणे. **देहाचा फाल्गुन करणे** – देहाकडे दुर्लक्ष करणे, हेळसांड करणे: '...पोरा, वाट लावून घेतलीस. देहाचा फाल्गुन केलास!' - राकाघाका ११९. **देहात उजेड पडणे** – अपराधाबद्दल शिक्षा भोगल्याने पश्चात्ताप होणे. **देहाला पाझर लागणे** – देहधर्मावर नियंत्रण न राहणे. **देहावर असणे, येणे** – शुद्धीत असणे, येणे. **देहावर गाणे, गीत, अभंग, पद, लावणी, कवन** – दोन अर्थांचे काव्य. याचा उत्तान अर्थ शरीरविषयक असतो व गूढार्थ आत्मा किंवा ब्रह्म यासंबंधी असतो. **देहावर नसणे** – मन ठिकाणावर नसणे. **देहावर येणे** – रानटी खोड्या, बेबंद चाली टाकून देणे. **देही देवपण दाखवणे, आणणे, येणे** – (एखाद्याने) मनुष्यरूपात असूनही याच जड देहावस्थेत असताना आपल्यात दैविक आत्मीय सत्याचे ज्ञान किंवा ब्रह्मज्ञान आहे अशी लोकांना प्रचीती आणून देणे.

**देह** पु. गाव : 'एकूण तेवीस देहे येथील.' - वाडसमा ६.११४. [फा.दिह]

**देहत्याग** पु. मरण; आत्म्याने शरीरातून बाहेर पडणे.

**देहत्रय** न. स्थूल, लिंग व कारण असा तीन प्रकारचा देह.

**देहदंड–दंडन** पु. न. १. तपाने केलेले देहाचे संयमन. २. फाशीची शिक्षा.

**देहदृष्टी** स्त्री. मानवी दृष्टी.

**देहधर्म** पु. शरीराची मलमूत्रविसर्जनादी नैसर्गिक कामे. [सं.] (वा.) **देहधर्माचे करणे** – शौचाला जाणे.

**देहपात** पु. शरीराचे पतन; मरण.

**देहबुद्धी–भाव** स्त्री. पु. १. जीवबुद्धी; देहावरील आसक्ती; अहंभाव; देहाभिमान. २. चित्ताची सावधानता. [सं.] (वा.) **देहबुद्धी राहणे** – धडगत राहणे.

**देहभान** न. स्वत:ची जाणीव; चित्तानुसंधान; मन ठिकाणावर असणे; शांत असणे.२. चित्तशुद्धी; विवेकशक्ती असणे.

**देहयात्रा** स्त्री. १. देहाचा चरितार्थ; उपजीविका. २.आयुष्य; जीवनक्रम.

**देहरा** पु. डेरा; मुक्कामाचे ठिकाण; देवस्थान.

**देहलज, देहली** स्त्री. दार. पहा : **दहेलज** : 'जे शोभवी प्रत्यह देहलीला' - सारुह १.५९. [सं.]

**देहलीदीपन्याय** पु. (ज्याप्रमाणे उंबऱ्यातील दिवा ओटीवर आणि घरात सारखा प्रकाश देतो त्याप्रमाणे) भाषणाचा एखादा भाग मागच्या व पुढच्या भाषणाला सारखाच लागू पडतो तेव्हा हा न्याय योजतात.

**देहविदेवी** क्रिवि. गावोगाव; गावगन्ना: 'जे तिसाला देह विदेवी जमा खंडणी त्याचा वसूल तेरीख वार किर्दी सिलीकबंद आणणें.'- पेद २.६८. [फा.देह – ब – देह]

**देहविद्या** स्त्री. जिच्यामुळे विद्यावंताला सुवर्णमय वज्रदेह प्राप्त होतो ती

विद्या: 'एका देहविद्या होए' - दृपा १०.
**देहशुद्धी** स्त्री. १. प्रायश्चित्ताने शरीराची शुद्धता करणे. २. पहा: **देहभान**
**देहसंकल्प** पु. प्राण पणाला लावून काम करणे; निकराचा प्रयत्न.
**देहसंग** पु. देहाचा अहंकार.
**देहस्थान** न. कबर; थडगे. - चढा १०.
**देहंदगी, देहनगी** स्त्री. देणगी: 'बक्षिसें आणि देहंदगी' - भाइ १८३४ ; 'धर्मदाव देहनगी.' - मइसा ६.३१९. [फा. देहनगी]
**देहाडा** पु. देह: 'पुरला साठीं देहाडा । ऐसें न म्हणे न म्हणे मूढा ।' - तुगा २६८४.
**देहाती** वि. खेडवळ; ग्रामीण: 'ही देहाती काँग्रेस हिंदी जनतेंचें प्रतीक आहे.' - के १.१.१९३७. [फा.]
**देहातीत** वि. देहाच्या पलीकडे गेलेला; अदेह झालेला. [सं.]
**देहात्मवाद - दृष्टी** पु. स्त्री. अनात्मवाद; जडवाद; देहालाच आत्मा मानणे. [सं.]
**देहादिक कर्मे** न. अव. १. पहा: **देहधर्म.** २. दया, माया, प्रीती इ. मनाच्या वृत्ती.
**देहाभिमान** पु. शरीराचा अभिमान; देहबुद्धी; देह म्हणजेच 'मी' अशी दृढ भावना. [सं.]
**देहाय, देहेहाय, देहाये** पु. अव. गावे; गावगन्ना : 'जकायती बंदरें व देहाय परगणे मजकूरचें वतन करार करून दिलें असें.' - वाडबाबा १.१२.
**देहावसान** न. मृत्यू; देह नाश पावणे.
**देही** वि.१. देहासंबंधी. २. देह धारण केलेला; देहधारी.
पु. देहात राहणारा जीवात्मा: 'हें रजोगुणाचें दारुण । देही देहियासी बंधन ।' - ज्ञा १४.१७३. [सं.]
**देहुडा** वि. वाकडा; वक्र.
**देहुडाचरण** वि. एका पायावर भार घेऊन उभे राहून दुसऱ्या पायाचे पाऊल उचलून त्या पायावर टेकले असता वाकणारा पाय.
**देहुडी** स्त्री. देवडी. [सं.देहली]
**देहेवार** क्रिवि. गाववार.
**देंडारी -ऱ्या** स्त्री. १. वांती; उलटी; खाकरणे आणि थुंकणे. (क्रि. देणे.) २. (ल.) (गिळंकृत पैसा, लाच इ.) परत करणे; ओकणे. (या शब्दाचा प्रयोग नेहमी अनेकवचनी करतात.).
**देंडावणे** अक्रि. जड होणे; आळसावणे. (व.)
**देंडुभ** न. माडुळ; सापाची एक जात: 'देंडुभ आंगीचिया चाप लागती । सहस्रमुखेंसी सरी करी दुर्मती । - जांस्व.
**दैत** वि. अतिशय धीमा; चेंगट; आळशी. (व.)
**दैत्य** न. भारतीय पुराणग्रंथातील एक वंश, जात; देवांचे शत्रू; दानव; राक्षस; असुर. [सं.]
**दैत्यपुतळी** स्त्री. मोठ्या पुतळ्यांची माळ.
**दैत्ययुग** पु. दैत्यांचे युग. ब्रह्मदेवाची बारा हजार वर्षे किंवा मनुष्याची चार युगे.
**दैत्यवेळ** स्त्री.तिन्हीसांजा. [सं.दैत्य + वेला]
**दैनंदिनी** स्त्री. १. प्रत्येक दिवशी घडणाऱ्या गोष्टी लिहून ठेवण्याची वही. २. प्रथा. [सं.दिन + दिन]
**दैना** स्त्री. दैन्य; दुर्दशा; दशा; अपेष्टा; हाल; फजिती. [सं.दैन] (वा.) ० **भाकणे** - आपली निकृष्ट स्थिती सांगून, गयावया, प्रार्थना करणे.
**दैनिक** वि. १. दररोजचे (काम इ.). २. दररोज प्रसिद्ध होणारे (वर्तमानपत्र). [सं.]
**दैन्य** न. १. गरिबीमुळे आलेला दीनपणा; प्रतिकूल परिस्थिती; गरिबी. २.हीनपणा; हलकेपणा; उणेपणा. [सं.](वा.) ० **करणे** - भीक मागणे: 'मग निदैव निघे किरीटी । दैन्यचि करूं।' - ज्ञा ९.३११.
**दैबार** पु. सैन्यसमूह. (गो.)
**दैव** न. १. नशीब; प्रारब्ध; विधिघटना. २.जातपंचायत; जातगंगा; जमात; स्वजातीय लोक. [सं.] (वा.) ० **उघडणे, उपटणे, खुलणे**- भरभराट होणे; सुखाची प्राप्ती होणे; चांगली ग्रहदशा येणे. ० **उभे राहणे** - दैवाचा जोर होणे; प्राक्तनाचा परिणाम घडणे; नशिबाने अकस्मात सुख येणे. ० **काढणे, दैवास चढणे** - भरभराट होणे; पुढे येणे. ० **फिरणे** - नशीब प्रतिकूल होणे; वाईट दिवस येणे. ० **शिकंदर असणे** - दैव, नशीब बलवत्तर, चांगले असणे. **दैवाची परीक्षा करणे, पाहणे** - धोका आहे असे समजूनही एखादी गोष्ट करण्याचे साहस, प्रयत्न करणे. **दैवाच्या नावाने हाका मारणे** - नशिबाला बोल लावणे. **दैवातून उतरणे** - नष्ट, नामशेष होणे. **दैवाने उचल करणे, यारी येणे, हात देणे** - नशिबाने मदत करणे. **दैवाने उपट खाणे** - दैव पराकाष्ठेचे अनुकूल होणे. **दैवाने ओढ घेणे, दैव ओढवणे** - वाईट (नुकसानीची) गोष्ट करण्याकडे प्रवृत्ती होणे. **दैवाने धाव घेणे, करणे** - चांगल्या किंवा वाईट गोष्टीकडे अकारण प्रवृत्ती होणे. **दैवाने मागे पाहणे सरणे, हटणे** - नशीब फिरणे.
**दैव** वि. देवापासून झालेला; देवासंबंधी; दैविक; दैवी; देवाचा. [सं.]
**दैवगत-ती** पहा: **देवगत**
**दैवणे** अक्रि. दैववान होणे; उत्कर्षाला चढणे : 'वानूं लाधलों तें दुणेन थावें। दैवलें दैव।' - ज्ञा १६.३१.
**दैवत** न. १. देव; देवता. २. (ल.) अत्यंत लाडका, आवडता माणूस, पदार्थ. ३. पूज्य वस्तू; देवतुल्य गोष्ट. [सं.]
**दैवप्रश्न** पहा : **देवप्रश्न**
**दैवयोग** पु. दैवघटित; दैवाची अनुकूलता किंवा प्रतिकूलता. (एखादी गोष्ट आकस्मिक, अकल्पित घडली असता म्हणतात.)
**दैवलदैव** न. अहोभाग्य : 'वानुं लाधलेति तें दूणेनि यावें। दैवलदैवं ।।' - ज्ञा १६.३१.
**दैववशात -वशे** क्रिवि. दैवयोगेकरून; दैवगतीमुळे.
**दैववाद, दैष्टिकवाद** पु. मनुष्याचे सुखदुःख, यशापयश इ. सर्व नशिबावर अवलंबून आहेत असे मत; नशिबावर सर्वस्वी हवाला ठेवण्याचे मत.
**दैवविवाह** पु. लग्नाच्या आठ प्रकारांपैकी एक; सालंकृत कन्यादान करणे.
**दैवसवा** स्त्री. ईश्वराची इच्छा : 'कव्हणी येकी जन्मीचे । आर्जक होतें दैवसवेचें' - ज्ञाप्र ५०२.
क्रिवि. ईश्वरी कृपेने : 'जो इस्वराभिमुखु : जेया दैवसवा संतोखु' - उगी ३३९. [सं.दैव ]

**दैवहत–हीन** वि. कमनशिबी; अभागी: 'अहा कैसा मी दैवहत प्राणी.' – बालबोध पहिले पुस्तक.

**दैवज्ञ** वि. १. ज्योतिषी; भविष्य सांगणारा; जोशी. २. सोनारीचा धंदा करणारी एक ब्राह्मण जात.

**दैवागळा, दैवाआगळा, दैवाथिला** वि. थोर नशिबाचा; दैववान: 'एवढी हांव तो दैवाआगळा। म्हणऊनि करी।'– ज्ञा १०.३३२; 'मीचि एकु दैवाथिला: माझ्या भाग्या उदयो जाला'– सव ४९५.

**दैवाचा भोपळा** कमनशिबी; दुर्दैवी. ( भोपळा हलका व पोकळ असतो, त्यावरून).

**दैवाचे ताले** भाग्य; दैव. [सं. दैव + अर.ताला]

**दैवाद्य** वि. देवविषयक : ' दैवाद्य मार्ग तो एकु'– लीचउ २९. [सं.]

**दैवावरचा खेळ** प्रयत्न केल्यानंतर नशिबाच्या हवाल्यावर ठेवलेली गोष्ट.

**दैविक** पु. एकनिष्ठ परमेश्वरभक्त.

**दैविक** न. भाग्य, नशीब.
वि. १. नशिबासंबंधी. २. दैवी; देवासंबंधी; देवाचा. [सं.]

**दैवी** स्त्री. मंत्र, तंत्र, प्रार्थना इ.नी रोग इ.वर उपचार करण्याचा प्रकार, पद्धती.
वि. पहा: **दैविक** [सं.]

**दैवीक** न. सुतक : 'आमतें दैवीक पडलें.' – लीच १.४२.

**दैवी संपत्ती** सात्त्विक स्वभाव, वृत्ती; दया, अनुकंपा इ. गुण.

**दैवी सृष्टी** ब्रह्मदेवाने निर्माण केलेले जग.

**दैशिक** वि. प्रादेशिक; देशविषयक; प्रांतिक; स्थानिक इ. [सं.]

**दैष्टिक** वि. १. प्रारब्धवादी. २.दैवासंबंधी. [सं.]

**दैहिक** वि. देहासंबंधी; शारीरिक; कायिक. [सं.]

**दो** वि. दोन. [सं. द्वि; हिं.]

**दोआब** पहा: **दुआब** [सं.द्वि + आप; हिं.]

**दोकडा** पु. १. दुगाणी; अर्धा पैसा. २.(मोत्याच्या वजनामध्ये) एक शंभरांश चव. ३. (सावकारीमध्ये व्याजाचा हिशेब करताना) एकशंभरांश रुपया किंवा एक कच्चा.

**दोखरणे** अक्रि. आवाज घोगरा होणे : 'त्यांचा घसा दोखरल्यामुळे ते रेकून बोलत होते.'– माभू ८.५.

**दोखा** पु. साधे, सुती कापड. (व.)

**दोखा** पु.१. साथ. २. नवीन रीत; टूम. (व.)

**दोखाड** स्त्री. उणीव; तोटा. (व.)

**दोगला** वि. १. मिश्र जातीचा; लेकवळा; अर्धा हिंदु व अर्धा मुसलमान पिंजारी. – के ४.२.१९४१. २. दुतोंड्या; अविश्वासू. (ना.)
[फा. दाघूल, दोग्ला]

**दोगांडे** वि. दुहेरी उपयोगाचा.

**दोघट** वि. दुर्धट; अवघड: 'दोघट तो भारी आहे...' – पेद २९.९९.
[सं.दुर्धट]

**दोघुलेपण** न. १. दोघांमधील प्रेम; एकरूपता: 'ही ठावोवेन्ही वियोग भेडें।....दोघुलेपण।' – अमृ १.६. २. द्वैत.

**दोघे–घी** पु. स्त्री. न. अव. दोन; दोनजण (विशेषत: सजीव प्राण्यांविषयी, त्यातही माणसांविषयी उपयोजतात). [सं.द्वि]

**दोचौ** वि. दोनचार : 'दोचौ दिवसांत किल्लाही घेतला.' – भाब २७.

**दोजक** पु. नरक : 'चांडाळाशी खावया दोजकामधी । मेवा लाविला असे।'– योसं १८.२९९. [फा.]

**दो टक्याने धड** बळकट; धडधाकट.

**दोटा** पु. बाभूळ वगैरे झाडांच्या काट्यांचे एक परिमाण; सात काट्यांचा एक दोटा.(व.)

**दोड** वि. द्वाड; खोडकर; खट्याळ.

**दोड–डा** पु. १. कापसाचे बोंड : 'आणि पळहेचा दोडा ।' – अमृ ७.२६३. २.वेलदोडा. ३. कच्चे फळ : 'वायांविण तुटें दोड । मान सुख इच्छी भांड ।' – तुगा २८७७. ४. शेवरी, रुई किंवा मांदार याचे फळ : 'दोडा अर्कतरूचा अमृतफलस्वाद दावितो थोडा ।'– मोकृष्ण ८७.३४. ५. अफूचे बोंड. – कृषि ४९८.
वि. कच्चा. [क.दोड्डीळे]

**दोड** न. बाजरीचे कणीस. (व.)

**दोडका** पु. १. एक जातीचे भात. २. दोडकीचे फळ; शिराळे. याच्यातील कडू जातीचा औषधात उपयोग होतो. [क. दोड्ड + काई]

**दोडकी** स्त्री. दोडक्याचा वेल.

**दोडी** स्त्री. हरणदोडी; एक वनस्पती.

**दोड्डमूर्ती** स्त्री. कर्नाटकातल्या देवळांतून आढळणाऱ्या प्रचंड मूर्ती.

**दोण–णी** स्त्री. १. गुरांना पाणी पाजण्याची कुंडी; टाके. २. (अशिष्ट) दोणा; मोठे पोट; दोंद. ३. द्रोणाच्या आकाराची लहान होडी; होडगे. (कु.) ४. द्रोण. (गो.) [सं.द्रोण]

**दोणगे** न. लहान होडी, दोण; लाकडी डोणी.

**दोणा** पु. पोर्तुगीज शिपाई: 'ते महागिरी मुंबईहून वरतें साहा दोणे घालून पाणी जोखावयास पाठविली.'– पेत ३४.६१. [पोर्तु. दो]

**दोणा** पु. १. दोंद; मोठे पोट. २. द्रोण.

**दोतुकी–तूक** वि. (संगीत) गायनात ज्याला अस्ताई व अंतराही आहेत, पण आभोग नाही असे दोन अवयवांचे ध्रुपद.

**दोदाणा** पु. धो– धो प्रवाह.

**दोदानी** स्त्री. गळ्यातील एक अलंकार. (झाडी)

**दोन** वि. २ ही संख्या. विभक्तिप्रत्यय लागण्यापूर्वी याचे दोहो असे रूप होते. उदा. दोहोंना–नी.[सं.द्वि] (वा.) ० **जिवांचा निवाडा होणे** – सुखरूप बाळंत होणे. ० **डोळ्यांची भीड** – समोर असतानाच फक्त प्रेम; वरपांगी प्रेम.०, **दोन्ही दरडीवर (काठावर) हात ठेवणे, टेकणे** – दुटप्पीपणा करणे. ० **दिवस**– थोडे दिवस; काही काळ. ० **दिवसांचा** – थोडे दिवस टिकणारा; हंगामी; अशाश्वत (सोबती, संपत्ती अधिकार इ.). ० **दिशा न्हानं** – गर्भवती असणे; गर्भ राहणे. (अहि.) ० **बोटे स्वर्ग उरणे** – अतिशय आनंद होणे; अतिशय गर्व करणे. ० **हात करणे** – मारामारी करणे. ० **हाताचे चार हात होणे** – लग्न होणे. ० **हातांनी खर्च करणे** – मागेपुढे न पाहता खर्च करणे.

**दोनतोंड्या –बारी–बोल्या–माऱ्या** पहा: **दुतोंड्या**

**दोन प्रहर** मध्यान्ह. पहा: **दुपार**

**दोनप्रहरची काळजी** पोटापाण्याची काळजी, चिंता.

**दोनी-न्ही** वि. दोनही: 'दोनी वरुषें बुडी मारिली।' - दा ३.४.१६.

**दोन्हीसांज** क्रिवि. (सकाळी व संध्याकाळी) जेवणाच्या दोन्ही वेळेला, वेळेकरता.

**दोपण** न. द्वैत; भिन्नपणा.

**दोबराद, दोब्राद** वि. दुप्पट; दुबार.(गो.) [पोर्तु.दोब्रो]

**दोब्राद** न. नारळाच्या झाडापासून केलेले उंची मद्य (बेवड्याप्रमाणे). (गो.) [पोर्तु. दोब्रोदा]

**दोभ** पु. आचळ; सड. (कु.) [सं.दुह; म. दुभणे]

**दोमदोम** उद्गा. दावलमलपीराचे भक्त अथवा मुसलमान फकीर यांचा भिक्षा मागण्याच्या वेळचा शब्द. दमदम, दमसाहेब असेही म्हणतात. [ध्व.] (वा.) ० **करीत फिरणे, जाणे** - दारोदार, देशोदेशी भिक्षा मागत फिरणे; भीक मागणे.

**दोमूख** न. संगम.(गो.)

**दोय** स्त्री. १. करवंटीची पळी; डाव. (गो.) २. डोके; डोई. पहा: **डोय**

**दोयना** पु. दूध काढण्याचे भांडे. (व.)

**दोर** पु. १. काथ्या, वाक, अंबाडी, ताग इ. झाडांच्या सालीचे लांब तंतू. २. केळ, अंबाडी, भेंडी इ.च्या सालीची किंवा तंतूंची वळलेली दोरी. (राजा.) ३. (ल.) नासलेले दही, गूळ इ.मधील तार; तार येण्याची अवस्था; चिकटण. [सं.दोरक] (वा.) **दगडाचे दोर काढणारा** - युक्तिवान; उद्योगी.

**दोरक** पु. १. शिवण्याचा दोरा. २. पहा: **दोर** २. [सं.]

**दोरकस** पु. १. गाडी, मोट इ. ना बांधण्याचा दोर; नाडा; चऱ्हाट. २. बारीक दोरी.
न. एकत्र बांधलेल्या पुष्कळशा दोऱ्या.

**दोरखंड** न. १. जाड दोर; सोल. २.दोराचा तुकडा. ३. कालाचा (केळीच्या गाभ्याचा) दोर.

**दोरखंडे** न. अव. गलबताचे दोर; जाड दोर.

**दोरगुंडा** पु. सालींचे किंवा दोरीचे भेंडोळे (शाकारण्याच्या कामी उपयोगी).

**दोरडे** न. १. जाड किंवा मोठा दोर; दोरखंड. (को.)२. (निंदार्थी) दोराचा तुकडा, वाईट, निरुपयोगी दोरा.

**दोरणी** स्त्री. दोरी.

**दोरने** न. दोऱ्यांनी विणलेले टोपरे : 'श्रीमुगुटी दोरने' - लीचउ १४६. [सं.दोर]

**दोरवा** पु. १. अंगात उभ्या जाड रेघा असलेला कपडा; कापडाचा एक प्रकार. २. तडा; चीर; भेग; दगड इ.मध्ये असणारा दोरा. (को.) [त.डोरिया]

**दोरा** पु. १. सूत (शिवण्याचे); वळीव, पिळदार सूत. २. तडा; भेग. ३. (ल.) लहान झरा; झिरण. ४. (ल.) जोड; संबंध; आप्तपणा; धागादोरा. ५.(ल.) गुप्त कारस्थान : 'हळूच लावले सारे दोरे।' - ऐपो २५१. ६. नारूचा किडा; तंतू. ७. वृषणापासून शिश्नापर्यंतचे सूत्र. ८. (पदार्थ इ.ला) लागलेल्या किडीचा मार्ग; किडीच्या संचाराची रेषा. ९. गोगलगाईसारख्या चिकट द्रव टाकणाऱ्या प्राण्याची उमटलेली रेषा.१०. एक प्रकारची बांगडी, दागिना : 'वेगळें निघतां घडीन दोरेचुडा।' - तुगा २९५९. ११. पोटातील आतडी. (ना.) [सं.दोरक]

**दोरावणे** अक्रि. १. दोरा, रेषा, शिरा, तड असणे (लाकूड, धोंडा, मोती इ. मध्ये). २. (नासलेला पदार्थ, तिंबलेली कणीक इ.) दोराळ, चिकाळ होणे.

**दोराळ** वि. दोरमय; तंतुमय (गरा,दही इ.). (राजा.)

**दोरी** स्त्री. १. बारीक दोर. २. जमीन-मोजणीचे एक परिमाण. २० परतन, ८० किंवा १२० बिघे. ३. एक लहान मासा. ४. (सोनारी- सुतारी धंदा) इंचाचा एक अष्टमांश भाग; सूत. [सं.दोरक] (वा.) ० **सैल देणे, सोडणे, ढिली करणे** - बंधन, नियम इ. शिथिल करणे; स्वातंत्र्य देणे.

**दोरीसूत** क्रिवि. सरळ; ओळंब्यात; फेरफार न करता सरळ रेषेत.

**दोरेकार** पु. ब्राह्मण; जानवे घालणारा.

**दोलयात्रा** स्त्री. देवाला दोलात बसवून काढलेली मिरवणूक.

**दोलहणा** पु. टोमणा; आळ : 'तंव तो हरि म्हणे निजांगने वो । लइ नीच कां देसील दोलहणे वो।' - तुगा १४१. [सं.दोलन]

**दोला** पु. १. झोपाळा; झुला; झोका. २. डोली. [सं.]

**दोलामुद्रित** न. मुद्रणकलेच्या आरंभकाळातील पुस्तक.

**दोलायमान** वि. १. हलणारे; डोलणारे. २. डळमळीत; घुटमळणारे (चित्त).

**दोलायंत्र** न. (वैद्यक.) तेल, रस काढण्याचे यंत्र.

**दोव** पु. फार पातळ कागद. (गो.)

**दोवलॉ** पु. १. डवली. २. एक वनस्पती. (गो.) (वा.) ० **करणे** - लुडबुड करणे.

**दोवाड, दुआ (वा) ड** वि. कठीण; दुस्तर; भयंकर: 'हां गा मार्गु दोवाडु होए।' - ज्ञा १८.१७८.

**दोशा-सा** पु. चणे, उडीद, तांदूळ यांच्या पिठापासून केलेले धिरडे.

**दोशिण** स्त्री. जास्वंद. (गो.)

**दोशी** वि. क्रिवि. दोहो बाजूंनी; द्विधा. (गो.)

**दोष** पु. १. वैगुण्य; न्यून; खोड; उणीव. २. पाप; अपराध; कायदा मोडणे; दूषणीयता; निंद्यता. ३.(वैद्यक.)शरीरातील रसांचा क्षोभ; वातपित्तादी विकार; व्याधी; रोग. ४. लेख, भाषण यांतील व्यंग. याचे तीन प्रकार - पद (शब्द) दोष, अर्थदोष, वाक्यदोष.[सं.] (वा.) ० **उडणे** - आरोप, ठपका पुराव्याअभावी खोटा ठरणे.

**दोषणे** उक्रि. दोष देणे; नावे ठेवणे.

**दोषदृष्टी** स्त्री. छिद्रान्वेषण; केवळ दोषच पाहण्याची दृष्टी.
वि. दोषदृष्टीने पाहणारा.

**दोषानुवाद** पु. चहाडखोरी; दुसऱ्याचे दोष बाहेर काढणे, सांगणे.

**दोषारोप** पु. १. एखाद्यावर दोष लागू करणे; दोष देणे. २. आरोप; आळ.

**दोषी** वि. १. अपराधी; गुन्हेगार. २. उणीव, दोष असलेला.

**दोस** पु. गोड आंबा. (गो.) -शिली २.३५. [पोर्तु.]

**दोसीना** स्त्री. घोड्याच्या छातीवर मध्यभागी असलेली दुसऱ्या रंगाची रेघ. - अश्वप १.१०१.

**दोस्त, दोस्तदार** वि. १. मित्र; स्नेही. २. (ल.) प्रियकर; यार. [फा.]

**दोस्तदारी, दोस्ताई, दोस्ती, दोस्तीदाया** स्त्री. १. मैत्री. २. (ल.) अनीतीचे, अधर्म्य, पापी प्रेम.

**दोस्त राष्ट्रे** दुसऱ्या महायुद्धात हिटलरविरुद्ध लढणारी राष्ट्रे.
**दोह, दोहन** पु. न. दूध काढणे. [सं.]
**दोहडावणे** अक्रि. निरोप देणे, दवडणे, धाडणे: 'करनाटकी चादरा देऊनु दोहडावले.' – इमं ७.
**दोहणे** उक्रि. दूध, धार काढणे: 'टाकून धेनू वृशभास दोहे ।'– सारुह १.६४. [सं.दुह्]
**दोहद** न. १. गरोदर स्त्रीची इच्छा, वासना; डोहाळा: 'दोहद कैसा सुंदरि, सांग तुझें काय इच्छितें स्वांत ।'– मोमंत्ररामायण उत्तरकांड २३३. २. (ल.) झाडांना बहर येण्यासाठी आवश्यक स्थिती; त्यांची मनीषा, वांछा. उदा. बकुलास दोहद मधाची गुळणी. [सं.दौहृद]
**दोहरणे** अक्रि. १. दुआई देणे; जाहीर घोषणा देणे. २. पुन्हा, दुसऱ्यांदा सांगणे.
**दोहरी** स्त्री. पासोडी.
**दोहवा** पु. दूधदुभते: 'मंजुळ वेणु वाहे लुब्धल्या धेनुवा । नंदाघरीं दोहवा पूर्ण वाहे ।' – निवृत्तिनाथगाथा ५९.
**दोहा, दोहो(ह)रा** पु. हिंदुस्थानी काव्यातील एक छंद; कविताजाती. [हिं.]
**दोहा** पु. गाई–म्हशींचे दूध काढण्यासाठी नेमलेला माणूस: 'म्हशींच्या कासांशी बसलेले दोहे कासातून धारा काढीत होते.' – वानगी पृ. ११९.
**दोहिरी** वि. दुप्पट; दुगुणी: 'गोरीला लागे पान । नाग गव्हाळ्या मुहीऱ्या । वाऱ्या चालूं द्या दोहिऱ्या ।'– वलो ४८. (व.)
**दोही** स्त्री. १. द्वाही; दवंडी; जाहीर घोषणा: 'अब्दाली यार्णे तेमुरशा बसविला, त्याची दोही फिरविली.'– मइसा १.२५५. २. खबर; बातमी : 'त्यानें कचेरीस येऊन दोही दिली.' – मइसा १५.१०७.३. शपथ: 'बाईची व आमची चित्त शुद्ध नाहीं यामुळें आम्ही दोही दिली.'– मइसा ६.११६. [अर.दुआई]
**दोही–हो** वि. दोन. [सं.द्वि]
**दोहीला** वि. द्रोह करणारा. (व.) [सं.द्रोही]
**दोहेरा** वि. दुहेरी. [हिं.]
**दोहेरापट** पु. (कुस्ती) जोडीदाराच्या दोन्ही गुडघ्यांच्या लवणीत हात घालून आपले डोके पोटास टेकून जोडीदारास एकदम आपटणे.
**दोहो** वि. दोन.
**दोहो टक्क्याने धड** वि. बळकट; दणकट.
**दोहोत्रा** पु. दरमहा दरशेकडा दोन दराचे व्याज.
**दोहो बापांचा** वि. १. व्यभिचारी मातेचा; जारज; अकुलीन. २. द्व्यामुष्यायण.
**दोहो मांडवांचा वऱ्हाडी** १. वधू व वर या दोन्ही पक्षामध्ये सारखाच वावरणारा; मध्ये लुडबुड करणारा. २. (निंदार्थी) लग्न आणि और्ध्वदेहिक या दोहोंमध्ये सारखाच भाग घेणारा. ३. (ल.) ज्याला स्वत:चे काही मत, तत्त्व नाही असा.
**दोंगुल्ली** स्त्री. लहान डोंगर. (गो.)
**दोंचिल** वि. दोन चुली असलेले: 'आघाता येवढां दोंचिला कुंडी: अग्नि पाजळिजे तेयां बुडी'– रकौ ३५.
**दोंद, दोंदिल** न.१. मोठे, वाढलेले पोट. (क्रि. येणे, वाढणे, झडणे.) २. (ल.) एकदम मिळालेली संपत्ती, लौकिक, दर्जा, बढती इ. (क्रि. वाढणे). [सं.तुंद; गु. दुंद] (वा.) ० **येणे** – १. तृप्ती होणे. २. पोट वाढणे; पोट मोठे होणे. **दोंदावर दोंद येणे** – भरून वाहणे; श्रीमंत होणे.
**दोंदाळ–ल, दोंदी–द्या** वि. ढेरपोट्या; मोठ्या पोटाचा; तुंदिल: 'आशारसें दोंदिलु । जाला सांता ।'– ज्ञा ७.१६८.
**दौड** स्त्री. १. दवडणे; दुडकी; धाव. (क्रि. मारणे). २. लष्करी चाल, स्वारी, मोहीम. ३. घोड्याची दौडत जाण्याची चाल. [सं.द्रुत; ध्व. दुड]
**दौडका** स्त्री. एक प्रकारचे वाद्य : 'गिडिबिडीया दौडका दुटाळा ।'– कृमुरा ४०.११. [ध्व.दौड]
**दौडणे** अक्रि. धावणे; पळणे. [सं.द्रु]
**दौडादौडी** स्त्री. धावपळ; धावाधाव; इकडे–तिकडे धावणे.
**दौत** स्त्री. शाईचे भांडे. [अर.दवात] (वा.) **दौतीचा घाणा घालणे** – १. (दौतीत लेखणी तिरपी राहिली असता घाण्याच्या लाटेप्रमाणे दिसते त्यावरून) दौतीत कलम बुडवून ठेवणे. २. (ल.) काम अर्धवट पाडून ठेवणे; एखाद्या गोष्टीचा निर्णय न लावणे.
**दौतपूजा** स्त्री. १. दिवाळीमध्ये सराफ, व्यापारी इ. करतात ती दौतीची पूजा. सोने, वही व दौत ही तीन प्रतीके अनुक्रमे महालक्ष्मी, महासरस्वती व महाकाली यांची आहेत. २. (ल.) (हिशेब लिहिण्यासाठी दौतीत टाक बुडवण्याची फक्त मजुरी) नुसते नावाला भाडे; नाममात्र भाडे.
**दौत्य** न. १. दूताचे काम; निरोप नेणे, आणणे. २. वकिली; शिष्टाई. [सं.]
**दौर** पु. घेर; परकर. [अर.]
**दौरा** पु. फिरती; प्रवास; परिभ्रमण. [अर.दौर्, दौरात]
**दौर्बल्य** न. कमजोरपणा; दुबळेपणा; अशक्तता. [सं.]
**दौलत** स्त्री. १. संपत्ती; पैसा. २. वैभव; ऐश्वर्य; समृद्धी. ३. जहागीर; राज्य. ४. सैन्य : '–झाडून बुणगेसुद्धां दौलत गर्द जाली.'– ऐलेसं ११.६०८६. ५.सल्तनत; साम्राज्य; गादी. [अर.] (वा.) **दौलतीचा खांब** – १. ज्याच्या बळावर कुटुंब किंवा राज्य भरभराटीला येते तो; दौलत कमावणारा, राखणारा. २. मुख्य मुत्सद्दी. – इमं २३६.
**दौलतखा** वि. राजाचा मित्र, हितचिंतक : 'महाराज जानोजी केवळ निखालस, सर्व प्रकारें दौलतखा स्वामींचा आहे.'– मइसा १.१४८.
**दौलतजा(ज्या)दा** स्त्री. १. राजदरबारातील भालदाराचा, राजाला उद्देशून 'राज्य भरभराटीला येवो' या अर्थी जयजयकारवाचक शब्द. २. तमाशातील नाच्याला उत्तेजनार्थ व चढाओढीमध्ये बक्षीस दिल्यानंतर तो करतो तो जयजयकार. ३. (ल.) तमाशात नाच्यापोराशी अगर कलावंतिणीशी भरसभेत केलेली शृंगारचेष्टा. (क्रि. करणे, होणे). (वा.) ० **होणे** – (सरकारदरबारी) प्रतिष्ठा वाढणे.
**दौलतदार–वान–वंत** वि. १. श्रीमंत. २. सत्ताधीश; राज्याधिकारी: 'पाहते अर्थी दौलतवंतास कोणी एक गोष्टीनें सूख नाहीं.'–ऐलेसं १२१५.
**दौलतबंकी** पु. महाद्वारपाल. – राव्य १.१४.
**दौलतमदार** संपत्तीचे माहेरघर; ऐश्वर्याची खाण (जुन्या कागदपत्रांतील एक पदवी).

**दौला** दौलत; राज्य.

**दौहित्र** पु. १. मुलीचा मुलगा. २. दौहित्र प्रतिपदा; आजे पाडवा. (आश्विन शुद्ध प्रतिपदेस करतात). [सं.]

**दौंडाळ** वि. गप्पिष्ट; बाताड्या : 'अशी रांड दौंडाळ गळ्यांतुनी लग्नाची होती ।'- पला ७६.

**द्याज** न. कन्याशुल्क; वधूदक्षिणा. पहा : **देज**

**द्यानती** स्त्री. शुद्ध वासना; दानत. [अर.दियानत्]

**द्याहा, द्याहा ढवळ्या** क्रिवि. दिवसा; दुपारी. [सं.दिवस]

**द्यु** न. १. आकाश; स्वर्ग. २. दिवस. [सं.]

**द्युजीवा, द्युज्या** स्त्री. ध्रुव आणि ग्रह यांच्यातील अंतर; अहोरात्र समांतरवृत्ताची ज्या. [सं.]

**द्युज्या चापांश** आकाशातील ताऱ्यांचे ध्रुवापासून अंतर.

**द्युति-ती** स्त्री. कांती; तेज; प्रकाश. [सं.]

**द्यूत** न. फाशांनी खेळणे; जुगार; जुवा. [सं.]

**द्योतक** न. चिन्ह; गमक.

वि. प्रकाश पाडणारा. २. स्पष्ट करणारा; दाखविणारा. [सं.]

**द्योतन** न. १. चकचकीत, झगझगीत, देदीप्यमान करणे. २. स्पष्ट करणे; उघड दाखवणे. ३. (ल.) शब्दावाचून इतर लक्षणांनी होणारे अर्थप्रकाशन, ज्ञान. [सं.]

**द्योतमान** वि. प्रकाश पाडणारे; चकचकणारे.

**द्योतविणे** उक्रि. १. प्रकाशित करणे. २. स्पष्ट, उघड करणे. [सं.द्युत्]

**द्योतित** वि. १. प्रकाशित; दीप्त. २. सुबोधित; दर्शित.

**द्रम्म** पु. १६ पणांचे एक नाणे; सुमारे सोळा पैसे; पावली. [सं.]

**द्रव** पु. १. रस; पदार्थातील नैसर्गिक ओलावा, आर्द्रता, जलांश. २. पाझर, स्राव; द्राव; गळणे; थिबकणे. ३. वितळणे; गालन; द्रावण; द्रवरूप अवस्था (घट्ट पदार्थाची, अग्निसंयोगाने). ४. (ल.) दयेचा पाझर : 'अमृत घोटितां द्रव न येचि बापा जिला ।'- केका १०४.[सं.]

**द्रवगुरुत्वमापक** न. (पदार्थ.) प्रवाही द्रव्याचे गुरुत्वमापन करण्याचे यंत्र; (इं.) हायड्रोमीटर.

**द्रवणे** अक्रि. १. विरघळणे; वितळणे; रस होणे. २. (ल.) दयेने हृदयाला पाझर फुटणे; अंत:करण मृदू होणे.

**द्रव्य** न. १. धन; संपत्ती; मालमत्ता; पैसा. २. वस्तूतील मूलभूत घटक, तत्त्व, अर्थ, विषय, पदार्थ, प्रकृती. ३. सृष्टीचे मूलतत्त्व. ही नऊ आहेत. ४. औषध; औषधी वस्तू. ५. (व्यापक) ज्याला लिंग, वचन, विभक्ती इ. लागतात असा शब्द. ६. घटक; अवयव; अंगभूत पदार्थ; बाब; विषय; मुद्दा. उदा. औषधी-सुगंधी- होम- द्रव्य. ७. (रसा.) जागा व्यापणारा व पृथ्वीने आकर्षिला जाणारा पदार्थ, वस्तू; जड पदार्थ. ८. (पदार्थ.) भौतिक जगातील वस्तू ज्यापासून बनल्या आहेत ते सूक्ष्म कण प्रत्येकी. ९. (यंत्र.) जी इंद्रियगोचर असून जीस काही आकार व वजन असते म्हणजे जीपासून कांहीं प्रतिबंध होतो ती वस्तू. - यंस्थि १.१०. (सामा.) पदार्थ; वस्तू. [सं.](वा.) **द्रव्याचा धूर निघणे** - पुष्कळ श्रीमंत असणे; घरी लक्ष्मीने पाणी भरणे. **द्रव्याचे धुडके उडवणे, करणे** - पैसा उडवणे, नासणे, उधळणे. **द्रव्याच्या उबेने उडी मारणे** - पैशाच्या बळावर वाईट, धाडसी काम करायला प्रवृत्त होणे. **द्रव्यावर ताव देणे** - पैसा गिळंकृत करणे, दाबणे.

**द्रव्यदृष्टी** वि. द्रव्यावर लक्ष देऊन, द्रव्य मिळेल तरच काम करणारा; स्वार्थी.

**द्रव्यवाचक** पु. (व्या.) नामाचा एक प्रकार; पदार्थाचे, वस्तूचे नाव .

**द्रव्यवाद** पु. पंचतत्त्वांविषयीचे मत; सृष्टी पंचभूतात्मक मानणे.

**द्रव्यादृष्ट-ष्टी** न. स्त्री. नशिबाची, भाग्याची अनुकूलता; द्रव्ययोग असणारे, चांगले नशीब, भाग्य.

वि. पैसा मिळण्याचे, संपत्तियोगाचे (नशीब, भाग्य).

**द्रष्टा** वि. १. पाहणारा : 'ते दावी मज द्रष्ट्यातें ।' - ज्ञा १८.११२१. २. (ल.) ज्ञाता; जाणणारा. ३. साक्षात्कार झालेला. [सं.]

**द्रष्टृत्व** न. १. पाहण्याची शक्ती. २. दूरवर पाहण्याचे सामर्थ्य. [सं.]

**द्राबा-भा-बे-भे** पु. न. मिरी आणि मीठ घालून केलेले कालवण (भाताची पेज, भाजीचे पाणी याप्रमाणे); गरगट; ढपळवणी.

**द्राव** पु. पाझर. पहा: **द्रव** २

**द्रावक** वि. विरघळणारे; वितळणारे.

**द्रावण** न. १. पातळ होणे; विरघळणे; रस, द्रव होणे; गळणे; पाझरणे; स्त्रवणे. २. (वैद्यक.) द्रावक, विरघळवणारे द्रव्य; गळू इ. वाहवणारे औषध. ३. (रसा.) द्रावक अथवा द्रवकारी रस. ४. दोन किंवा अधिक पदार्थांचे एकजीव झालेले पातळ मिश्रण.

**द्रा(द्र)विड** पु. १. चेन्नईपासून कन्याकुमारीपर्यंतचा देश व त्यातील लोकसमाज. २. द्राविडी भाषा (कानडी, तेलगू, तामिळ, मल्याळम् इ.) बोलणारांचा प्रदेश व बोलणारा समाज. ३. एक ब्राह्मणवर्ग व त्यातील व्यक्ती.

**द्राविडकच्छ** पु. द्राविड लोकांची कासोटा घालण्याची पद्धत.

**द्राविडी** वि. द्रविड ब्राह्मण किंवा देश याविषयी.

**द्राविडी प्राणायाम** १. (उजव्या हाताने समोरून नाकाशी हात न नेता डोक्याच्या मागच्या बाजूने हात नेऊन प्राणायामासाठी नाकपुडी धरणे या विचित्र तऱ्हेवरून ल.) आडमार्गाने सांगण्याची, वागण्याची तऱ्हा; वक्रमार्ग; लांबचे वळण. २. (ल.) जवळचा रस्ता न घेता केलेला लांबलचक, कष्टप्रद व निष्फळ प्रवास; लांबचा रस्ता.

**द्राव्य** वि. वितळवण्यास, पातळ करण्यास, विरघळण्यास योग्य. [सं.]

**द्राष्ट** वि. खाष्ट; खट्याळ; दुष्ट; वाईट स्वभावाचा. [सं.दुष्ट]

**द्राक्ष-क्षा-क्षी** स्त्री. अंगूर; द्राक्षाची वेल व तिचे फळ; ही वेल लावल्यापासून तीन वर्षांनी लागवडीला येते. भारतात हिरवी, काळी, पांढरी अशा तीन जाती आहेत.

**द्राक्षापाक** पु. १. द्राक्षांचा केलेला औषधी पाक. २. (ल.) (साहित्य.) काव्य, प्रबंध, व्याख्यान इ. ऐकताच त्यातील रस,गुण स्पष्ट कळणे; या प्रकारचे काव्य इ. (द्राक्षातील रसाप्रमाणे त्यांतील रस बाहेरून दिसणे, सहजपणे लाभणे.). [सं.]

**द्राक्षारिष्ट** न. द्राक्षापासून तयार केलेले एक औषध.

**द्राक्षासव** न. द्राक्षापासून तयार केलेले आसव, मद्य.

**द्राक्षांचा घड** मुलींचा एक खेळ.- मखेपु ३४२.

**द्रुत** पु.(ताल) अर्धमात्रेचा काळ; ताल देण्यामधील विश्रांतीचा विवक्षित अल्प काळ.

वि. १.विरघळलेले.२. त्वरित; जलद. [सं.]

**द्रुतगतिमहामार्ग** पु. ज्यावरून वाहने जलद धावतात असा शहरांना जोडणारा मार्ग.

**द्रुतवाचन** न. विशिष्ट पद्धतीच्या साहाय्याने मजकूर भराभरा वाचणे ;(इं.) रॅपिडरीडिंग.

**द्रुतविलंबित** न. एक वृत्त, छंद. याच्या चरणात १२ अक्षरे व न, भ, भ, र हे चार गण असतात.

**द्रुतिवंत** वि. सुगंधी; सुवासिक: 'आणि ते टाळुकेचे पुष्प द्रुतिवंत । तो ख्रिस्तु स्वामी ।'– ख्रिपु १.३४.४७.

**द्रुती** स्त्री. १. सुगंध; सुवास; मकरंद: 'जैसी पिकली द्रुती आदरें । बोभात निघे ।' – ज्ञा १३.३०४. २. द्रवणे. ३. जलदगती. ४.पळून जाणे. – शर.

**द्रुम** पु. झाड; वृक्ष. [सं.]

**द्रुमिळणे** क्रि. ठिबकणे: 'द्रुम द्रुम पाणि द्रुमिळित ध्यानीं'– निगा ७१. [सं.द्रु]

**द्रेक्काण** पु. (ज्यो.) राशीच्या तिसऱ्या भागाचा अधिपती. [सं;ग्री. देकनास]

**द्रेष्काण** पु. (ज्यो.) राशीचा दशांशात्मक विभाग. [सं;ग्री. देकनॉस]

**द्रोण– णा** पु. १. पळस वगैरे पानांचे, पातळ पदार्थ ठेवण्याचे, चुया टोचून केलेले एक पात्र. २. लाकूड, दगड, लोखंड इ. कोरून केलेले, गुरांना पाणी पाजण्याचे पात्र, साधन; डोणी. ३. (धान्य इ.) मोजण्याचे माप; अर्धा मण : 'जोडी सातमजदार द्रोणमित व्रीहि पंधरा दिवसीं ।' – मोवन ८.३. ४. नदी पार करण्याचे एक साधन. [सं.] (वा.) **हातापायांचे द्रोण होणे** – हातपाय आखडणे.

**द्रोणकाक** पु. १. गिधाड. २. डोमकावळा.

**द्रोणमाशी** स्त्री. साधी माशी (द्रोणावर बसते म्हणून).

**द्रोणी** पहा : **डोणी**

**द्रोह** पु. १. वैर; शत्रुत्व. २. खोडसाळपणा. २. मत्सर; आकस. ३. एखाद्याचे अनिष्ट केल्यामुळे त्याने दिलेला अभिशाप; तळतळाट. [सं.]

**द्रोही** वि. १. द्रोह करणारा; वैरी. २.अभिशापाला पात्र. ३. खुनशी.[सं.]

**द्वय** न. जोडी; युगल; युग्म. समासात दुसऱ्या पदी योजतात. उदा. पुस्तकद्वय, पुत्रद्वय. [सं.]

**द्वंद्व** न. १.(मनुष्य, पशू इ.चे) जुळे; युग्म; जोडी. २. दोघांचे युद्ध; कुस्ती; (यावरून) भांडण; तंटा; कलह.

पु.(व्या.) एक समास. उभयान्वयी अव्ययाने जोडले जाणारे दोन शब्द. उदा. शेलापागोटे. [सं.]

**द्वंद्वयुद्ध** न. दोघांतील लढाई; कुस्ती; लढाईचा एक प्रकार.

**द्वागौ** पु. अव. दुतर्फाचे; मध्यस्थ; दोन पक्षांकडील: 'रामाजी गोसावी व वरकड द्वागौ आहेत.' -पेद १०.१. [सं.द्वि + गम]

**द्वाड** वि. दुष्ट; खट्याळ; उपद्रवी; खोडकर. [सं.]

**द्वाडवाणा–णी** वि. (निंदार्थी) कुत्सित; खट्याळ; द्वाड.

**द्वादश** वि. १. बारा. २. बारावा. [सं.]

**द्वादशस्थान** न. (ज्यो.) कुंडलीतील बारावे स्थान; व्ययस्थान.[सं.] (वा.) **द्वादशस्थानी असणे** – (कुंडलीत गुरु ग्रह द्वादशस्थानी असणे मोठे अनर्थकारक असते. त्यावरून) पराकाष्ठेचे वैर असणे.

**द्वादशांश** पु. अव.(अंकगणित) दशांशपद्धतीप्रमाणे अंक मांडण्याची एक पद्धत.

**द्वादशी** स्त्री. चांद्र महिन्याच्या दोन्ही पक्षांतील बारावी तिथी. [सं.]

**द्वाप(पा)र** पु. कृत, त्रेता, द्वापर आणि कली या चार युगांपैकी तिसरे, ८६४००० वर्षांचे युग. [सं.]

**द्वामों(मां)श** पु. संदिग्धपणा.

वि. मोघम.

क्रिवि. अनिश्चित. पहा : **द्व्यामुष्यायण** ३

**द्वार** न. १. वाट; मार्ग. पहा : **दार** १.२. शरीरातील उत्सर्गमार्ग, छिद्र; विशेषत: गुह्यछिद्रे. उदा. गुद इ. ३. (ल.) जागा; स्थान; कारण; तोंड. ४. साधन; वाट; युक्ती; मार्ग.[सं.] (वा.) ० **निघणे** – यात्रा पूर्ण करून परत येणाऱ्या यात्रेकरूला सामोरे जाऊन त्यांची मिरवणूक काढणे. (पूर्वी महायात्रा करून येणे म्हणजे एका जिवावरच्या साहसातून निभावणे असे मानत. म्हणून असे स्वागत.).

**द्वारक** स्त्री. १. उघडझाप होईल असे झाप, झडप ( कॅमेरा). २.घरणातील पाणी सोडण्याचे दार.

**द्वारदेवता** स्त्री. अव. १. मुख्य देवतांच्या दरवाजावरील देवता. २. (ल.) ज्यांच्यातर्फे राजा, उमराव किंवा मोठे लोक यांच्याकडे प्रवेश मिळू शकतो असे दारावरील अधिकारी.

**द्वारपत्र** न. प्रवेशासाठी परवानगी आहे असे दाखवणारे पत्रक; प्रवेशपत्र.

**द्वारपाल, द्वाररक्षक** पु. पहारेकरी; देवडीवाला. [सं.]

**द्वारपूजा** स्त्री. १.दारसंका; द्वारदेवतांची पूजा. २. (ल.) दारी हेलपाटे घालणे; जोडे झिजवणे.

**द्वारमंडप** पु. मुख्य दरवाजासमोर छत असलेली गाड्या थांबण्याची जागा; (इं.) पोर्च.

**द्वा(दा)रसंका** स्त्री. दाराच्या चौकटीचा उभा खांब: 'कवीस्वरवास द्वारसंकेसि टेकुनि आइकों लागले' – स्मृस्थ २०४. [सं.द्वार ]

**द्वारा** शअ. तर्फे; मार्फतीने; कडून; मध्यस्थीने; पासून. [सं.द्वार]

**द्वारावती** स्त्री. १. द्वारका क्षेत्र. २. गोपीचंदन. हे द्वारकेत सापडते.

**द्वाली** स्त्री. चामड्याचा, पट्टा; कमरबंद. [फा.दोआल, दूआली]

**द्वालीबंद** वि. कमरपट्टा बांधलेला (शिपाई).

**द्वाही** स्त्री. शपथ; हरकत. पहा : **दुराई–ही.** (वा.) ० **फिरविणे, फिरणे** – दवंडी पिटणे; जाहीरनामा लावणे.

**द्वि** वि.दोन. [सं.]

**द्विकरणी, द्विकर्णी करणे** – गौप्यस्फोट करणे : 'द्विकरणी मंत्र करूं नये'– पंचो ७.५.

**द्विगुण** वि. दुप्पट; दोनदा.

पु. (संगीत) स्थायी स्वरापासून आठवा स्वर.

**द्विगुणी पेशी** लैंगिक प्रजनन प्रक्रियेने प्रजोत्पादन करणाऱ्या सजीवांच्या शरीरातील गुणसूत्रांच्या जोड्या असणाऱ्या पेशी.

**द्विगू** पु. पहिले पद संख्याविशेषण व सामासिक शब्द समुच्चयवाचक असणारा समास. उदा. नवरात्र, पंचवटी.

**द्विघात** पु. एका संख्येला त्याच संख्येने गुणून आलेला गुणाकार वर्ग.

**द्विज, द्विजन्मा** पु. १.ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य. (यांची मुंज म्हणजे दुसरा जन्म होतो त्यावरून). २. कोणताही अंडज प्राणी. (पक्षी, साप, मासा इ. यांचा अंडे फुटल्यावर दुसरा जन्म होतो त्यावरून). ३. दात (दोनदा येतात म्हणून).
वि. दोनदा जन्मलेला. [सं.]

**द्विजराज** पु. १. चंद्र. २. ब्राह्मणश्रेष्ठ. ३. हत्ती. [सं.]

**द्विजिह्व** वि. १. दोन जिभांचा (साप). २.(ल.) खोटे बोलणारा, लुच्चा; चहाडखोर. [सं.]

**द्वितत्त्ववाद** पु. परस्परविरोधी तत्त्वांपासून जगांतील सर्व गोष्टींचा खुलासा करता येतो असे प्रतिपादन करणारे मत.

**द्वितीय** वि. दुसरा. [सं.]

**द्वितीयक क्षेत्र** कारखानदारी, बांधकाम, वीज, पाणी-पुरवठा इ. चा समावेश असणारे आर्थिक क्षेत्र.

**द्वितीयकेंद्र** न. (ज्यो.) ग्रहाच्या कक्षेतील सूर्याचे अत्यंत दूरच्या बिंदूपासूनचे अंतर.

**द्वितीयसवन** न. १. वेदपठणातील मध्यमसवन. २. प्रथमसवनावरचा किंचित चढविलेला पठणातील मध्यमसवन. [सं.]

**द्वितीयसंबंध** पु. पुरुषाचा दुसरा विवाह; पुनर्विवाह.

**द्वितीया** स्त्री. १. चांद्रमासाच्या दोन्ही पक्षांतील दुसरा दिवस, तिथी. २. (व्या.) दुसरी विभक्ती. या विभक्तीचे प्रत्यय-एकवचन स,ला, ते; अनेकवचन स,ला,ना, ते. [सं.]

**द्वितीयातत्पुरुष** पु.(व्या.) जेथे द्वितीयेचा लोप होतो तो समास. उदा. विप्रताडन.

**द्वित्त** वि. दुप्पट; दुहेरी; जोड (अक्षर). उदा. क्क,च्च.

**द्वित्व** न. द्विरुक्ती; पुनरुच्चारण (अक्षर किंवा शब्द यांचे).

**द्विदल-ळ** न. फुटून दोन अर्ध होणारे धान्य. उदा. डाळ.
वि. दोन पाकळ्यांचा पानांचा- भागांचा -कळ्यांचा इ.

**द्विधा** स्त्री. मतभेद; दुमत.
क्रिवि. १.दोन जातीचे. २. दोन मार्गांनी, रीतींनी. ३.दोन तुकड्यांत (विभागलेले); दुभंग. [सं.]

**द्विनोंदपद्धती** स्त्री. एकाच आर्थिक व्यवहाराच्या दोन बाजूंना जमा आणि खर्च नोंद करण्याची जमाखर्चाची पद्धत.

**द्विप(पा)द** वि. १. दोन पायांचा (प्राणी, पक्षी इ.). २. (अंकगणित) दोन संख्याचा.

**द्विपाद दृष्टी** (ज्यो.) ग्रहाची अर्धदृष्टी; गुरुवाचून इतर सर्व ग्रह आपापल्या स्थानापासून पाचव्या व चवथ्या स्थानावर द्विपाद म्हणजे अर्ध दृष्टीने पाहतात. - जाबो २३.

**द्विपितृक** वि. दोन बापांचा; दत्तक (मुलगा). [सं.]

**द्विमल्ल** पु. बाणाचा एक प्रकार. - प्रश १९. [सं.]

**द्विमूल्य** वि. दोन परमाणुयुक्त; (इं.) डायटोमिक.

**द्वियुक्तपद** वि. (बीजगणित) दोन संख्यांचा-चे; दोन अवयवांचे (संयुक्त पद).

**द्विरागमन** न. माहेरून दुसऱ्यांदा सासरी जाणे; दुसरी खेप.

**द्विरुक्त** वि. दोनदा बोललेले, म्हटलेले; पुनरुक्त. [सं.]

**द्विरुक्ती** स्त्री. १. पुनरुच्चारण. २. पुनरुक्ती. ३. दुहेरी शब्द. उदा. गडगड, धडधड इ.

**द्विर्द्वादश, द्विर्द्वादशक** न. (वधूवरांच्या पत्रिका पाहताना) एकाची रास दुसऱ्याच्या राशीपासून बारावी येते व तेथून पुढे मोजल्यास पहिल्याची दुसरी येते त्यावेळी हा योग असतो. सबंध राशीमंडलाने वियुक्त. [सं.]

**द्विलिंगी** वि. पुंकेसर व स्त्रीकेसर एकाच ठिकाणी असणारी वनस्पती. उदा. वावडिंग.

**द्विवचन** न. (व्या.) दोन पदार्थ किंवा व्यक्ती दाखविणारे वचन. [सं.]

**द्विविध** वि. दोन प्रकारचा. [सं.]

**द्विशायिका** स्त्री. आगगाडीतील डब्यात फक्त दोन शायिका असलेला विभाग. (इं.) टु टायर, टियर.

**द्विसमत्रिभुज** पु. (ल.) दोन सारख्या भुजांचा त्रिकोण.

**द्विस्वभाव** वि. दोन प्रकृतींचा, स्वभावांचा (मिथुन, कन्या, कुंभ, मीन या राशींचे विशेषण).

**द्वीप** न. १. बेट; सर्व बाजूंनी पाणी असलेली कोणतीही जमीन. २. पृथ्वीचे सात मोठे भाग. [सं.]

**द्वीपकल्प** पु. तीन बाजूंनी पाणी असलेली जमीन. [सं.]

**द्वीपी** पु. वाघ: 'तेथ तो वेष द्वीपी न दिसे तैसा अटोपी' - सव १८४. [सं.]

**द्वेष** पु.१. मत्सर; हेवा; आकस. २. दावा; अप्रीती; राग. (क्रि.करणे) [सं.]

**द्वेषक, द्वेष्टा** वि. द्वेष, शत्रुत्व करणारा, बाळगणारा; खुनशी. [सं.]

**द्वैत** न. १. भिन्नता (मत, भावना, संकल्प इ.ची). २. नावड; विलगपणा; भेदभाव. ३. भेदवाद - म्हणजे ब्रह्म आणि जग, जीव आणि शिव, आत्मा व परमात्मा भिन्न आहेत असे मत. [सं.]

**द्वैती संप्रदाय** माध्वमत, मध्वाचार्यांनी मांडलेले तत्त्वज्ञानविषयक विचार मानणारा गट : 'परब्रह्म व जीव कांही अंशी एक व कांहीं अंशी भिन्न मानणे परस्परविरुद्ध असून असंबद्ध होय. म्हणून दोन्हीही सदैव भिन्नच मानले पाहिजेत. संपूर्ण अथवा अंशत:हि त्यांचे ऐक्य होणे शक्य नाहीं असें रामानुजाचार्यानंतर निघालेल्या तिसऱ्या संप्रदायाचें मत आहे. त्यामुळे त्यास द्वैती संप्रदाय असें म्हणतात.' - गीर १६.

**द्वैध, द्वैविध्य** न. पहा: द्वैत १ [सं.द्विधा]

**द्व्यर्थी, द्व्यर्थक** वि. १. दोन अर्थ असणारा; दोन तऱ्हांनी व्याख्या केला जाणारा; दुटप्पी. २. दुहेरी उपयोगाचा, परिणामांचा; दोन भिन्न गोष्टी साधणारा. [सं.]

**द्व्यामुष्यायण** पु. १. मुंज झाल्यानंतर दत्तक गेलेला मुलगा. २. जारज पुत्र; दोन बापांचा मुलगा. ३. (यावरून) मोघम, संदिग्ध, दुटप्पी भाषण; संशयित, अनिश्चित गोष्ट, कृत्य.
वि. क्रिवि. संदिग्धपणे; संशयितपणे. [सं.द्वि + अमुष्य + अयन]

**द्व्याह्निक** वि. १. रोज दोनदा भरणारा किंवा मध्ये दोन दिवस जाऊन तिसऱ्या दिवशी येणारा (ताप). २. दोन दिवसांच्या संबंधी. [सं.]

■■■



**ध** मराठी वर्णमालेतील एकोणिसावे व्यंजन व चौतिसावे अक्षर.

**ध** पु. धैवत हा गायनातील सहावा स्वर.

**ध** (सांकेतिक) धरणे. (वा.) ० **चा मा करणे** – (सांकेतिक) (आनंदीबाई पेशवे हिने राघोबादादा याच्या हुकमातील 'धरावे' या शब्दात 'ध' चा 'मा' करून 'मारावे' असा फरक केला होता अशी समजूत आहे त्यावरून) मूळच्या लेखात नवीन व स्वत:ला फायदेशीर असा महत्त्वाचा मजकूर लबाडीने घुसडवणे; स्वार्थ साधण्यासाठी बदल करणे.

**धक–ग** स्त्री. पु. १. जोम; उत्साह. २. (विस्तवाची) आच; शेक; झळ; ताप. ३. पेटलेला विस्तव; अग्नी; जाळ. ४. (गर्व, प्रौढी, भावना इ. ची) गुर्मी; जहालपणा; तीव्रता. ५. संताप; जळफळ. (गो.) ६. अंगातील बारीक ताप; कडकी. (कु.)[सं. दह्; बं. गु. धक; क. ढगे]

**धक** वि. योग्य; लायक; सिद्ध: 'हे काम करावयास धक आहेत.' –पेद ९.३.

**धकणे** अक्रि. १. निर्वाह, निभाव होणे; निभावून जाणे. २. (अन्न, जेवण) घशाखाली उतरणे; पोटात जाणे; खपणे: 'तिखटावेगळ भाकर न धके।' – विक ७९. ३. (आगगाडी, वाहन इ.) चालू होणे, धक्क्याने हालणे; ढकलले, लोटले जाणे: 'जितके हरिभजनाला चुकाल। तितके यमाजीकडे धकाल।' – अफला ६२. [सं. दक्ष]

**धक(का)धक** न. स्त्री.१. धडकी; धागधुग; भीती. २. धडधड. ३. दगदग; खटाटोप. [ध्व. धक् द्वि.; हिं. धकधकी; सं. धृष्]

**धकधक – का** क्रिवि. धागधुग; माटमुट; जीव वरखाली होणे. उद्गा. (सांकेतिक) हत्तीने जोराने चालावे म्हणून माहूत वापरतात तो शब्द. [ध्व. धक् द्वि.]

**धकधकणे** अक्रि. ऊर खालीवर होणे, उडणे; धडधड करणे.

**धकाधका–की** स्त्री. (परस्परांत होणारी) धक्काबुक्की; रेटारेटी; झोंबाझोंबी; झोंटधरणी. [धका द्वि.]

**धकाधका–क** क्रिवि. ऊर जोराने धडधडत असताना.[ध्व. धक द्वि.]

**धकावणे** अक्रि. १. (ल.) (सामा.) नासणे; बिघडणे; खराब होणे; नुकसानीत, आतबट्ट्यात येणे; बसणे; खालावणे. २. (प्रवाहाच्या सपाट्यात सापडून) वाहणे; जाणे. ३. कचणे; कचरणे; खचणे; गळणे.

**धकावणे** उक्रि. १. पुढे रेटणे, लोटणे; ढकलणे: 'घोडे पुढें धकावूनी नाना –। सहवर्तमान पुण्यात आले राऊत।' – ऐपो २५३. २. हिसडा, आचका, हबका बसणे, देणे; हिसडणे.

**धकी** स्त्री. (को.) पहा : **धक्का** १ : 'येथून धक्या मारून बाहेर काढून दिला तर कशाला पुसता.' – विवि ८.११.२०६.

**धकेचपेटे** पु. अव. १. टोले आणि ठोसे; धक्काबुक्की; मारहाण: 'व्याप आटोप करिती। धकेचपेटे सोसिती।' – दास १५.३.७. २. नुकसान; तोटा; घस. ३. बोलाचाली; अपमान; निंदा: 'धकेचपेटे सोसावे।' – दास १५.६.२२.

**धक्क** न. भीतीमुळे हृदयाला बसणारा धक्का; धडकी; धस्स. क्रिवि. धडकीने; उरात धस्स होऊन. [ध्व.]

**धक्क** वि. १. धीराचा; निश्चयाचा; चिवट; संकटाला न डगमगणारा; धट्टाकट्टा; धडधाकट; काटक (मनुष्य, जनावर); धड, मजबूत; टिकाऊ; दमदार (दागिना, वस्त्र इ.). २. लखलखीत; लख्ख; चकचकीत; उजळ आणि चांगला (रुपया इ. नाणे). ३. तेजाळ; लखलखीत; लख्ख; तेजस्वी (हिरा, रत्न, शोभेचे दारूकाम इ.). क्रिवि. लख्ख. (क्रि.उजाडणे, उजेड पडणे). [ध्व.]

**धक्कड, धक्कर, धनकर** वि. १. दांडगा; गलेलठ्ठ; धिप्पाड. २.अवजड; अफाट; अवाढव्य.

**धक्का – का** पु. १. हिसडा; हिसका; आचका. २. (एका वस्तूने दुसऱ्यावर केलेला) आघात, तडाखा, प्रहार. ३. भयंकर दु:ख इ.नी हृदयात भरणारी धडकी; ऊर धडधडणे. ४. संकट; धोका; भय. ५. रस्त्याच्या कडेलोटाच्या बाजूने बांधलेली कठड्याची भिंत, वरवंडी. ६. (ल.) (एखादा व्यवहार, पदार्थ इ. मध्ये आलेली, झालेली) अतिशय वाईट अवस्था; नुकसान; हानी; खराबी. ७. (पाणी, वारा इ. चा नेट सांभाळण्यासाठी, गलबत इ. किनाऱ्याला लागण्याच्या सोयीसाठी) नदी, समुद्र इ.च्या किनाऱ्यावर बांधलेली भिंत, चौथरा, कट्टा. ८. प्रवाशांना विसाव्यासाठी, ओझी इ. खाली उतरून ठेवण्याच्या सोयीची (डोंगर इ. तील) रस्त्याच्या बाजूने केलेली ओट्यासारखी ओबडधोबड रचना. ९. आगबोट, आगगाडी इ.तून माल उतरून घेण्याचे ठिकाण. १०. एखादा पदार्थ विद्युज्जागृत करण्याचे, वीज भरण्याचे यंत्र. (याला स्पर्श केला असता धक्का बसतो म्हणून हे नाव.). [सं. धक्क; हिं.; क.]

**धक्का(का,की)बुक्की–की** स्त्री. गर्दीतील रेटारेटी.

**धक्काशोषक** पु. एखादे यंत्र चालू असताना त्याच्या प्रक्रियेमुळे निर्माण होणाऱ्या धक्क्याचे शोषण करण्यासाठी वापरलेले उपकरण.

**धक्की** स्त्री. घागर : 'गंगेमधी धक्की ठेवून सखू चालली यातेरला.' – जसा ८१४.

**धग** स्त्री. धास्ती; हरकत; आडकाठी: 'दहा वर्षे जगण्यास त्यांना अजून धग नाही.' – खेस्व ४०. [ध्व.]

**धगखाक** स्त्री. क्षयरोग. (गो.)

**धगचे** अक्रि. १. जळफळणे; संतापणे. (गो.) २. कृश, क्षीण होत जाणे; झुरणीस लागणे; (मनाला) धक्का बसणे.

**धगटी** स्त्री. १. तट; तीर; काठ (नदीचा). २. शेवट; अंत.

**धगटी – टे** स्त्री. न. १. आगटी. २. कडकी; बारीक ताप. (गो.)

**धगड** पु. उतारा; रामबाण उपाय.

**धगड** पु. १. जार; भडवा; यार; उपपती: 'जड प्रपंच धगडालागीं'। – दावि ७५. २. नवरा; पती. ३. निर्दालन, पराभव करणारा, उरावर बसणारा, पुरे पडणारा, डोक्यावरचा मनुष्य. [सं. धव; हिं. धगडा]

**धगडी** स्त्री. (ग्राम्य शिवी) रखेली; रांड; जारिणी; नाटकशाळा.

**धगधग** स्त्री. १. अग्नीचा भडका; डोंब; भडभड पेटणे. २. (ल.) मिरची इ. तिखट पदार्थाने होणारी आग; भडका. ३. (तापाने होणारी अंगाची) लाही; तलखी; लखलख; फणफणाट. ४. चकाकी. [धग द्वि.]

**धगधगणे** अक्रि. १. पहा: **धकधकणे**. २. (विस्तव, शेकोटी इ.) भडभड पेटणे; रसरसणे; प्रज्वलित होणे. ३. चकाकणे: 'एरिकाजेका परिघाकृती । वज्रप्राय धगधगिती ।' – एभा ३०. १६०. ४. (ताप वगैरेने अंग) फणफणणे; तलखी होणे; अतिशय कढत होणे. [सं. दह्]

**धगधगा** पु. स्त्री. धाकधूक; काळजी; चिंता: 'आला बंधूजी पाव्हना माझ्या जिवाला धगधगा शिंगी अवखळ नवी जागा.' – लोसाको पृ. १७७.

**धगधगीत** वि. १. प्रज्वलित; प्रदीप्त; रसरसून, भडाडून पेटलेला (विस्तव). २. (ताप वगैरेने) फणफणणारे; अतिशय कढत झालेले (अंग). ३. (पुण्य, तप इ.मुळे) तेजस्वी; प्रभावशाली; तेजःपुंज; कडकडीत: 'धगधगीत पुण्यरासी । माहापुरुष ।' – दास १९.४.९. ४. जळफळणारा; चरफडणारा: 'प्राणासी मुकला तृणावर्त ।...धगधगीत मनामार्जी ।' – ह ५.१२९.

**धगमॉडे** वि. किंचित ऊन, गरम; कोमट (पाणी इ.).(गो.)

**धगागणे** अक्रि. पहा: **धगधगणे** १: 'पुढे धूम्र त्यागीं धगागीत आगीं ।' – राक १.९०.

**धगाटा–डी** पु. स्त्री. १. (विस्तवाची) अतिप्रखर धग. २. भडभडाट; भडाड; भडका; प्रखर अग्नी.

**धगाधगा** क्रिवि. धास्तावलेला : 'बंधुजी पावनीया जीव माजा ग धगाधगा.' – लोसाको पृ.१७७.

**धगावणे** अक्रि. (विस्तवाच्या) धगीने होरपळणे; पेटणे.

**धगे** न. आगटी; गवत, पाचोळा इ. पेटवून केलेली शेकोटी; धगटे.

**धज** स्त्री. तगादा; नेट.

**धज** स्त्री. १. डौल; ऐट; चांगली ढब; लकब; हातोटी. २. (विशेषत: अंगाच्या बांध्याचा, रूपाचा) देखणेपणा; ठसठशीतपणा; रेखीवपणा; लावण्य; रूप. ३. घोड्याचा उंचपणा; घोड्याच्या मानेचा ऐटदार बाक. ४. धाडस. [सं. धृज्; हिं.; गु.]

**धजणे, धजावणे** अक्रि. १. (गर्दीत) जोराने घुसणे; वाट काढणे; सरसावणे. २. एखाद्या कार्याचा चिकाटीने पिच्छा पुरविणे; एखाद्या कार्यात मन घालणे, लावणे. ३. एखादे कार्य करण्यासाठी पुढे सरसावणे. ४. (पीक, रोप इ.) तरतरणे; टवटवणे. [सं. धृष्; हिं., गु. धज]

**धजदार** वि. १. भव्य; भारदस्त व देखणा (मनुष्य इ.); घाटदार, उमदा व ठसठशीत (दागिना ). २. (ल.) उदार; सढळ हाताचा; दानशूर; सत्कार्यप्रेमी. [म. धज + फा. दार प्रत्यय]

**धजरा** पु. नखरा; दिमाख; ऐट; झोक : 'दावी बाच्छाई धजरे । पुढें मागें शिपाई हुजरे ।' – प्रला ११२.

**धजाव** पु. १. पीक इ. जोराने तरारणे, फोफावणे; जीव धरणे. २. नखरा; छचोरपणा; छानछोकी; नट्टापट्टा.

**धजी** स्त्री. (लंगोट तयार करण्याचा) कापडाचा तिकोनी तुकडा; कापडाची घडी: 'रुमाली अगर लंगोटाची धजी बनेल तितका शरीराचा भाग झाकूं शकेल अशी आहे कीं नाहीं तें पहाणें.' – बडोदे – पहिलवान लोक व त्यांच्या कुस्त्यांचे नियम ११. [हिं. धजी]

**धट** पु. १. तराजूची दांडी; रोवलेला मोठा तराजू, काटा : 'धट रोंवूनि रमानायक । पारड्यामध्यें घातला ।' – भवि ३१.५६. २. गाडीत, खटाऱ्यात बारदान भरताना गाडीचा मागे तोल जाऊ नये म्हणून मागील बाजूला जमिनीपासून साटीच्या बावखंडाला टेकून पुढच्या दांडीप्रमाणे उभे राहण्याचे दुबेळक्याचे लाकूड, टेकू. ३. (मुलकी खात्यांतील) मोजणीपत्रकातील तपशील, त्याचे पत्रक. ४. निश्चय; नेट. [सं.; बं.] (वा.) ० **लागणे, चालणे** – (एखादी क्रिया, गोष्ट) अव्याहत चालू असणे, केली जाणे. ० **लावणे** – (खाणे, पिणे, बोलणे इ.सारखी क्रिया) बेसुमार व अव्याहत करीत राहणे. (पुष्कळ मालाचे वजन करायचे असल्यास मोठा धट रोवून भराभर ठरावीक हप्त्यांचे वजन करतात त्यावरून हा अर्थ.) **धटास लावणे** – एखाद्या खाजगी, वैयक्तिक क्षुल्लक गोष्टीची शहानिशा करण्यासाठी, पदरी घालण्यासाठी ती जाहीरपणे लोकांपुढे मांडणे.

**धट** पहा : **धट्ट**

**धटडाधोंगडा** वि. जाडाभरडा; मजबूत; धटमूट. (कपडा इ.).

**धटाल्या** वि. आडमुठा; धसफशा; धसमुसळेपणाने वागणारा.

**धटिं(टां)गण, धटिंग, धटुकला** पु. पुरुष : 'खेळतां नेटकें दशावतारी ।...परंतु अवघे धटिंगण ।' – दास ६.८.११ . वि. उर्मट व दांडगा (मनुष्य). [गु. धतिंग; हिं.]

**धटी–ट्टी** स्त्री. १. नेसण्याचे वस्त्र: 'कासे पितांबराची धटी ।' – भूपाळी गणपतीची. २. धोतर इ. चा जाड काठ, किनारी. ३. चिंधी. [सं.]

**धट्ट** वि. १. धीट; साहसी; बेडर. २. उर्मट; दांडगा; आडदांड; धटिंगण. ३. नीट, सरळ जाणारा (रस्ता); थेट. [सं. धृष्ट]

**धट्टकंठ** वि. युद्धाचे नियम बाजूला ठेवणारा.

**धट्टाई** स्त्री. उद्दामपणा; धट्टपणा; उर्मटपणाची धिटाई.

**धट्टाकट्टा** वि. १. निरोगी; निकोप प्रकृतीचा; शाबूत अवयवांचा. २. मजबूत अंगकाठीचा; जाडाजुडा; सशक्त; ताजातवाना. [त.कट्टु;सं. धष्ट, धृष्ट + कट्टा]

**धड** न. गळ्यापासून खालचा शरीराचा भाग; शिरावेगळे, शिराशिवाय शरीर; कबंध. [हिं.] (वा.)**धडात उतरणे, गिळणे, घालणे, टाकणे** – (पैसा, लाच इ.) गिळंकृत करणे; घशाखाली लोटणे.

**धड** न. १. निरोगीपणा; प्रकृतीचे स्वास्थ्य; आराम. २. संरक्षण. ३. हित. ४. सुख. [सं. धृति]

**धड** वि. १. चांगला; शाबूत; अखंड; दोषरहित; मोडतोड, फुटतूट न झालेला; कामाला उपयोगी असे. २. श्रीमंत; गबर; धनसंपन्न. ३. शुद्ध बुद्धीचा; शहाणा : 'धडचि पिसें करावें । पिसेचि उमजवावें ।' – दास ९.८.१५.[सं. दृढ] (वा.) ० **गांडीने** – सुरक्षितपणे; जिवानिशी; अब्रूदारपणाने; सहीसलामत; इजा, नुकसान न होता. **धडा ना गोडाचा** – १. अगदीच सामान्य प्रतीचा; भिकार; निरुपयोगी; टाकाऊ; खैराती. २. संदिग्ध; मोघम; अनिश्चित.

क्रिवि. १. स्पष्टपणे; रोखठोक; निश्चितपणे (सांगणे, बोलणे). २. स्पष्ट ऐकू जाईल असे (वाचणे इ.). ३. चोखपणाने; सचोटीने; निर्भीडपणे (वागणे, चालणे). ४. पुरतेपणी; जसे पाहिजे तसे; पूर्णपणे. (सामान्यत: अकरणरूपात योजतात). ० **इकडे ना तिकडे** – मध्येच लोंबकळत; पूर्णपणे कोणत्याच बाजूला नसलेल्या स्थितीत.

**धड** स्त्री. १. (वस्तूची डावी, उजवी इ. शब्दांनी निर्देशण्यासारखी) बाजू; तोंड. २. (जोते इ. उंचवट्यांची) कड; काठ; किनारी.

**धडक – का** स्त्री. पु. १. (अक्षरशः व ल.) तडाखा; आघात; धक्का; थडक; टक्कर. २. पहा : **धडकी** २. ३. (व्यापार इ. मध्ये येणारी) बूड; घस; ठोकर; नुकसान. [सं. धृष्]

**धडक – का** क्रिवि. (व्यापक) (भय, शंका, दैव इ. मुळे) प्रवृत्तीचा, गतीचा, क्रियेचा संकोच, अवरोध, विराम न होता; थेट; सरळ; अविरोध; न थांबता; एकदम; झपाट्याने इ. [ध्व.]

**धडकण** स्त्री. धाक; धास्ती; धडकी; भीती; जरब.

**धडकणे** अक्रि. १. (विस्तव, दिवा इ.) जोराने, भडक्याने भडभड पेटणे, जळणे, धडधडणे: 'धडकली उद्विग्नतेची ज्वाळा।' – मुआदि १९.४३. २. (ल.) (ताप इ. ने अंग) फणफणणे; अतिशय तापणे; (काम, क्रोध इ. विकार) क्षुब्ध होणे, चेतणे. ३. (हृदय इ.) धडधडणे. ४. डाकोडाक, टाकोटाक, उभ्या पायी येणे, जाणे, येऊन पोहोचणे; उपस्थित होणे; थडकणे. ५. मोठा, धडधड असा आवाज करून (तोफ, बंदूक इ.) उडणे, सुटणे; धडधडाट होणे; धडधड वाजणे. ६. (धक्का लागल्यामुळे इ.नी) आपटणे; आदळणे; धडक लागणे, बसणे. [सं. धृष्;हिं.धडकना]

**धडकन–कर–दिनी–दिशी** क्रिवि. १. आकस्मिक व मोठा धड् असा आवाज होईल अशा प्रकारे; धपकन. २. आग, विस्तव एकदम, भडकन पेटताना होणाऱ्या आवाजांप्रमाणे आवाज होऊन. [ध्व.]

**धडकफ(भ)डक** वि. स्पष्ट; सडेतोड; रोखठोक; कपट, डावपेच इ. रहित; सरळ; धोपटमार्गी (वागणे, वागणारा); अकृत्रिम; उघडावाघडा (वर्तन, व्यवहार इ.). [ध्व.]

**धडकवणी** न. धडाक्याने पडणारा, मुसळधार पाऊस; वळिवाचा पाऊस.

**धडका** पु. १. पहा : **धडक**. २. आवाज; बार.

**धडका** वि. पहा: **धड १, धट्टाकट्टा**

**धडकाधडकी** स्त्री. एकमेकांची मर्यादा, भीड इ. सोडून आवेशाने, जोराने केलेले, झालेले भांडण; वाद; खडाजंगी. [धडक द्वि.]

**धडकाव(वि)णे** अक्रि. १. न कचरता, निर्भीडपणे, कडकडून, कचकावून, भडाभडा बोलणे; खरडपट्टी काढणे. २. धसकावून, झपाट्याने, धडकेसरशी जाणे, शिरणे. ३. (घोडा इ.) पिटाळणे; दपटणे; बेफामपणे हाकणे; भरधाव सोडणे. ४. (एखादे काम इ.) झपाट्याने, उत्साहाने, जोराने करणे. ५. (विस्तव इ.) धडकून, भडभड, जोराने पेटविणे, प्रज्वलित करणे.

**धडकी** स्त्री. १. (भीती वगैरेमुळे होणारी) छातीची धडधड. (क्रि. भरणे.). २. हृदयाला बसलेला धक्का; दचका; धसका. ३. धक्का; हिसका; रेटा.

**धडकून** क्रिवि. सपाट्याने; धडधडून; जोराने.

**धडगत – ती** स्त्री. आशा वाटण्याजोगे, बरे लक्षण; ठीक चिन्ह; निभावण्याजोगी स्थिती, दशा.

**धडगोड** वि. चांगले-वाईट : 'परी धडगोडांचा विचारू।' –एभा ७.४१०.

**धडडड** क्रिवि. तोफ इ. च्या भडिमाराने होणाऱ्या आवाजासारखा आवाज होऊन; (सामा.) फिरून फिरून व मोठ्याने होणाऱ्या आवाजाचे अनुकरण. [ध्व.]

**धडणी–नी** स्त्री. घोड्याची काढणी.

**धडधड – डी** स्त्री. न. भीती वगैरेमुळे काळीज जोराने उडू लागले असता भासमान होणारा आवाज. [सं. ध्राड्; ध्व. धड् द्वि.]

**धडधड – डा, धडाडा** क्रिवि. १. भडभडा पेटलेल्या ज्वाळा वगैरेंच्या, पुष्कळ पावलांच्या आपटण्याच्या, कडकडाट, खडखडाट इ. च्या आवाजाप्रमाणे आवाज होऊन. (क्रि. चालणे, धावणे, वाजणे इ.). २. काळीज जोराने उडताना होतोसा भासणाऱ्या आवाजाने. [ध्व. धड् द्वि.]

**धडधडणे** अक्रि. १. पहा : **धडकणे** १,३. २. (वृक्ष, इमारत इ.) धडधड असा आवाज करून, कडाडून पडणे; कडाडणे. ३. जिन्यावरून घाईने उतरताना, माडीवरून चालताना पुष्कळ पावलांचा धडधड असा आवाज होणे. [सं. धाड्]

**धडधडाट** पु. धड धड असा आवाज; गर्जना; पहा: **धडाड** : 'धडधडित धडाडी धडधडाटें धडाडी।' – दावि २७८. [गु.]

**धडधडीत** क्रिवि. १. निक्षून; साफ; निखालस; स्पष्टपणे. २. अगदी प्रत्यक्ष; उघड-उघड; निःसंशय; निर्विवाद.

वि. धडधाकट; धट्टाकट्टा; बळकट. [सं. धड]

**धडधाकट–ड, धडधोप–धोपट** वि. १. पहा: **धड** १. २. पहा: **धट्टाकट्टा**

**धडधांगडा** वि. जाडाभरडा व टिकाऊ (कापड, वस्त्र इ.).

**धडधूत** वि. पहा: **धट्टाकट्टा**

**धडप** न. पु. ढिलपा; मोठी खपली. (अहि.)

**धडप(फ,ब)ड** स्त्री. १. (काम करताना रागाने, अडाणीपणामुळे केलेली) आदळआपट; चडफड. २. (हूडपणाने, अविचाराने एखाद्या व्यवहारात) ढोबळ चूक करणे, घसरणे. ३. खटाटोप; परिश्रम; खटपट; दगदग. ४. (उंदीर इ. नी केलेली) खडखड. [सं. धृष् + बध्; ध्व.]

**धडप(फ,ब)डणे** अक्रि. १. (संताप वगैरेमुळे) हातपाय आदळणे. २.तळमळणे; बेचैनपणे वळवळणे. ३. पराकाष्ठेची खटपट, प्रयत्न, खटाटोप करणे. ४. अव्यवस्थित रीतीने पडणे. [सं. धृष्+स्फुट्;ध्व.]

**धडप(फ,ब)डाट** पु. पराकाष्ठेची, अतिशय जोराची धडपड.

**धडप(फ)ड्या** स्त्री. अव. (शारीरिक दुःख, संताप इ. ने) हातपाय आपटणे; तडफडणे; चडफडणे. (क्रि. देणे, खाणे.).

**धड(डु)पा** पु. (बायकी) जुनी साडी वगैरे फाडून काढलेला मोठा तुकडा, फडके; धडफा.(माण.) पहा: **धटी–ट्टी** [फा. दर्पा]

**धडपु(फु)डा** वि. १. निश्चयात्मक; खरी; धडधडीत: 'धडपुडी भगवत्प्राप्ती। होऊन चुके अधोगती।' – दास ३.१०.७०. २. प्रज्वलित; प्रदीप्त : 'तेथ मनबुद्धीचिया कुंडा। आतु ज्ञानाग्नि धडफुडा।' – ज्ञा ९.२४१.

क्रिवि. १.खरोखर; निश्चयाने. २. सत्वर; जलदीने; त्वरेने : 'होय धडफुडें देह बुद्ध्या।'– रंयोवा ४.३२८. ३. हातो–पाती. – मनको. [सं. धृष्+ स्फुट्]

**धडफुला** वि. १. पहा: **धडपुडा**. २. पूर्ण. ३. कुशल; चतुर. ४. पोकळ.

**धडबडावचे** सक्रि. हाकून लावणे; धुडकावून देणे. (गो.)

**धडबड्या** वि. बेफिकीरपणे टमकत चालणारा.

**धडबरं-भले** न. १. (विवाहित मुलगी, व्यवहार-धंदा इ. चे) स्थिरस्थावर होणे; सुस्थितीत असणे; सुरळीतपणे चालणे. २.पहा : **धडगत**
**धडबिया** पु. नाचणीचे गुजराथी नाव; या जातीच्या नाचणीचे कणीस गोंड्यासारखे असते. - कृषि २८३.
**धडली** वि. स्त्री. म्हातारी; आजी : 'जळगांव परनाले जासूं व मनी धडली माय.' - लोसामा १. (खा.)
**धडल्याव** वि. अवाढव्य; फार मोठा व बेढब; अगडबंब; धडेल. (कु.)
**धडवई** पु. बाजारात येणारा माल तोलण्याच्या कामावरील अधिकारी. स्त्री. (क.) वरील अधिकाऱ्याचे काम, हुद्दा.
**धडवत** वि. जामीनकी, निश्चितपणा इ. ची खात्री असणारी. - निजामविजय ३०.७.३१.(मराठवाडा)
**धडवता-वंत** वि. निर्भय; शहाणा; विचारी; गुणी; ऐश्वर्यसंपन्न.
**धडवाकडा** वि. सरळ किंवा वाकडा; अखंड किंवा मोडलेला; बरोबर किंवा चूक.
**धडशी** स्त्री. धडक; टक्कर; धक्का; ढुशी.
**धडस-सा** वि. पहा : **धड १**
**धडसखडस - सा** वि. पूर्णपणे धडधाकट; धड. [धडसा द्वि.]
**धडसी** क्रिवि. धैर्याने : 'धडसी चाले बिनधोक।' - संग्रामगीते १०१.
**धडसोबती** पु. शेवटपर्यंत टिकणारा, अखंड मैत्री बाळगणारा, कायमचा स्नेही, सोबती.
**धडा** पु. १. विशिष्ट मुदतीत तयार करण्यासाठी पंतोजीने शिष्याला, शिक्षकाने विद्यार्थ्याला नेमून दिलेला, पाटी इ.वर लिहून दिलेला पाठ. २. पुस्तक वगैरेतील पाठ. ३. (ल.) एखाद्याला वर्तनाच्या बाबतीत घालून दिलेला नियम; शिस्त; उदाहरण; काम करण्याबाबत घालून दिलेली पद्धत, सरणी, वहिवाट, रिवाज. ४. हिय्या; हिंमत; धाडस; निश्चय. ५. एखादी वस्तू मिळाल्यावर विशिष्ट काळापर्यंत येणारी निश्चिंतता. ६. बोध.
**धडा** पु. १. दहा शेरी वजन केलेल्या मापाचे परिमाण. २. तराजूच्या एका पारड्यात (ज्यात पदार्थ घ्यावयाचा ते) भांडे इ. ठेवून काटा समतोल करण्यासाठी दुसऱ्या पारड्यात टाकलेली, वजने इ. अभंड; पासंग : 'तराजुआ निवृत्तिचा। धडा बांधौनि तीर्थाचा।' - ऋ ३९. ३. मण, दोन मण इ.सारखे एकदाच वजन करायचे असल्यास व त्या परिमाणाची वजने जवळ नसल्यास लहान परिमाणाच्या वजनाने तितक्याच वजनाचे दगड इ. मोजून घेऊन त्यांनी बांधतात ते मोठे वजन. ४. सपाटा; तडाखा.(व.) ५. (पेंढारी इ. लुटारूंची) टोळी. ६. सामायिक जमिनीचा, मालमत्तेचा वाटा, हिस्सा, भाग. ७. (जरतारधंदा) २५ ते ३० तोळे वजनाच्या तांब्याच्या रुळावर गुंडाळलेल्या जरतारीसह त्याचे केलेले वजन. [सं. धट; हिं.]
**धडा** पु. घडा; घागर : 'कीं श्रेष्ठेने धडा घातला। रवांतासी।' - शिव ९९४.
**धडा** पु. किनाऱ्यावर गलबत, पडाव ठेवण्याची आच्छादित जागा. (राजा.)
**धडा** पु. भाजीपाला इ. ची पेंढी.
**धडा - डी** पु. स्त्री. घराचे जोते इ.ची कड. (कु.)
**धडा** पु. १. तोफ. (तंजा.) २. तोफेचा बार.
**धडा** पु. पोटात होणारा एक रोग. - मनको.
**धडाका** पु. १. (बंदूक, तोफ, दारूकाम यांचा) आवाज; स्फोट; धडधडाट; (सामा.) मोठा कडाक्याचा आवाज; कडकडाट; खणका; दणदणाट; धूमधडाका. २. (सामा.) आवेश; झपाटा व गडबड यांनी युक्त असे कोणतेही दृश्य. उदा. काम करण्याचा सपाटा, तडाखा; वादळ इ. चा जोर, क्षोभ, तडाखा; साथीचा, रोगाचा धुमाकूळ; लढाईतील धुमश्चक्री; कल्लोळ. (क्रि. मारणे, मांडणे.). [हिं. धडका]
**धडाकेबाज, धडाकेफुलबाजी** स्त्री. (शोभेचे दारूकाम) इंग्रजी फुलबाजीचा एक प्रकार.
**धडाखडा** वि. पहा: **धट्टाकट्टा**
**धडाड-डा** पु. धडाक्याचा मोठा आवाज; धडधडाट; तोफेच्या भडिमाराचा, इमारत, झाड इ. कडाडून पडणे, धडधडणाऱ्या ज्वाळा, मोठ्या स्फोटाचा होणारा दणका यांचा आवाज; खणका. [ध्व.]
**धडाडणे** अक्रि. १. (तोफ, बंदूक इ. उडताना) धड धड असा मोठा आवाज होणे. २. जमीन इ. तापल्यामुळे भेगलणे; दुभंग होणे. ३. पहा : **धडधडणे** [ध्व.; सं. ध्राड्]
**धडाडी** स्त्री. दाह; उष्णता; भडका: 'परि विरहिणीचा मानसीः धडाडी सुटे' - मूप्र १९९.
**धडाडी** स्त्री. १. धडधड; धडधड असा आवाज. २. नेट; जोर; धाडसाचा, उत्साहाचा प्रयत्न; तडफ.
**धडाधड-डी** स्त्री. लागोपाठ, मोठा आवाज करून होणारी क्रिया, गोष्ट; तोफा इ.च्या सातत्याने होणाऱ्या आवाजाने युक्त असे युद्ध इ.; गलबला; किलकिलाट इ. ने युक्त अशी खणकाखणकी, मारामारी, बाचाबाची, कचाकची इ.; हातोडा वगैरेनी ठोकण्याने लागोपाठ होणारा मोठा आवाज: 'रोवला रणखांब होती धडाधड।' - ऐपो १२६. [ध्व. धड् द्वि.; गु. धडाधडी]
**धडाधड-डा** क्रिवि. (इमारती कोसळताना, सोसाट्याच्या वाऱ्याने झाडांवरून फळे इ. पडताना, मुसळधार पाऊस पडताना, बंदुकीची फैर झडताना भराभर चपराका, तडाखे लावताना) सातत्याने, लागोपाठ मोठा आवाज होईल अशा प्रकारे. पहा : **धडक** [ध्व. धड द्वि.]
**धडाधडणे** अक्रि. नाव गाजणे; कीर्तीचा डंका वाजणे; दुमदुमणे: 'काय तयाची कीर्त सांगावी? साहेब नाम धडाधडी।' - ऐपो १३४.
**धडी** स्त्री. १. विशिष्ट वजनाचे, शेराचे माप. हे निरनिराळ्या ठिकाणी भिन्न-भिन्न वजनाचे असते. २. मण इ. प्रमाणांचा करून ठेवलेला दगड इ.; पहा : **धडा** ३. ३. पहा: **धडा** ७. ४. वजन करण्याचा काटा; तराजू: 'सज्जन कसाई मांस विकितां। त्याची लाविसि धडी।' - दत्तपदें ४७.[सं. धट; हिं.; सिं.] (वा.) **धडीने पैसा मोजणे** - श्रीमंतीला पार नसणे; पैशात लोळणे.
**धडी** स्त्री. १. धटी; धोतर, लुगडे अशा वस्त्राचा रेशमी, जरतारी काठ, किनार.२. छपरी; पडवी; पडवीचा काठ. ३. चिंधी. [सं. धटी-ट्टी]
**धडी** स्त्री. १. तुकडा; भाग. २. (डोंगरातील) घाट; बारी: 'आली सातपुड्याची धडी तोफगाडी दाटली घोडी।' - ऐपो ४३३.
**धडीपगडी** स्त्री. (व्यापक) सभा, समारंभ इ. प्रसंगी पुरुषाने घालण्याचा

शेला, पागोटे इ. पोषाख.

**धडीपडी** स्त्री. बरेवाईट, सुख-दुःखाचे दिवस; अडीअडचण : 'बाबा रे, कष्ट करूनही या राज्यांत अन्न मिळत नाहीं, धडीपडीला पैसा नाहीं.' - खेया १३.

**धडु(डू-डो)त, धडौते** न. नेहमी, रोज नेसण्याच्या उपयोगाचे वस्त्र.

**धडुतेपण** न. धडुतीची वस्त्रे, लुगडी इ.: 'अठरा हातांचे प्रमाण। मोजून देई धडुतेपण।' - मुआदि १३.४४.

**धडूत** वि. शोभिवंत.

**धडेल** वि. अगडबंब; अवाढव्य; लडदू; बेढब व मोठे (शरीर इ.).

**धडेवाटप** न. एकत्र कुटुंबातील सर्व हक्कदारांमध्ये स्वतंत्रपणे केलेली जमिनीची वाटणी.

**धडोती** स्त्री. कपडेलत्ते इ. चा नेहमीचा वापर, उपयोग.

**धडोतीचे पाट(ड)गे** (उप. ल.) कामसू व सुदृढ, निकोप प्रकृतीची बायको.

**धडौता** वि. १. पहा : **धड** १. श्रीमंत :' जरि देवांचा तो आंतु धडौता। बाहीरिदीनु।' - ऋ ६९. २. पहा : **धड** २; अव्यंग : 'अर्जुना आघवियाची मानू अंतःकरणे। धडौता आहासि।' - ज्ञा १०.४९. ३. सवस्त्र; सुशोभित: 'जयाचा महिमा पांघरोनि जाहला। धडौता वेदु।' -ज्ञा ११.७१. ४. टिकाऊ; सुरक्षित: 'उद्धवदेवा तुमचा मती। यादवांची राणीव धडौती।' - शिव ४७७.

**धड्ड** वि. मट्ठ; ठोंब्या; निर्बुद्ध; आडमुठा; दांडगा; धटिंगण: 'मी तो महाराजाचा धड्ड पुराणिक। न ये बोलूं वाक्य गोड मधुर।'- दावि ४०४. [क. धड्ड; सं.धृष्ट]

**धड्ला, धल्डा** वि. म्हातारा;वृद्ध. (खा.) [गु. धयडो]

**धढणे** उक्रि. आटणे; कमी होणे : 'जैसा मेघांचेनी तोंडे। सिंधु एके आंगे धढे।' - ज्ञा १५.१२८.

**धण** स्त्री. १. एकाचे नुकसान होऊन, प्रयत्न वाया जाऊन दुसऱ्याला अकल्पितपणे, अनायास होणारा लाभ, झालेली चैन, भर. (क्रि.करणे, होणे) २. पहा: **धन.** ३. पहा: **धणी** १. [सं. धन] (वा.) ० **घेणे** - मनसोक्त, पोटभर खाणे; (खाद्य इ. चा) समाचार घेणे : 'एकाने मोठमोठे लाडवांचे तुकडे करून गट्ट केले, दुसऱ्यानें चटण्या, सांभारी यांची धण घेतली.' - बाळ.

**धणंगणे** अक्रि. (खाद्य, पेय इ. वर) ताव मारणे; चैन, बहार, चंगळ करणे; अधाशीपणाने व मौजेने खाणे.

**धणी** स्त्री. १. इच्छा; आशा; हौस. (क्रि. पुरणे, पुरविणे). २. तृप्ती; समाधान: 'धर्म म्हणे माझी धणी। पुरली नामाची आयणी।' - वेसीस्व ११.८९. ३. धन्यता : 'जलधि-मध्य पुरींत तिचा धणी। वधुनि दे मज आत्मसुखें धणी।' - वामन - लोपामुद्रासंवाद २८. ४. ठेवा; अपूर्व, अकल्पित लाभ : 'परमसुखाची हे लाधलीसी धणी।' - निगा ६. ५. विपुलता; समृद्धी. [सं. ध्राणि]

**धणीचा** वि. पुरेसा; पोटभर; यथेच्छ:' दृश्य देखतां शिणले नयन। धणीचे घ्यावया कृष्णदर्शन।' - एरुस्व ७.२२.

**धणीभर-वरी** क्रिवि. पोटभर; यथेच्छ; तृप्ती होईपर्यंत; मनसोक्त; धनभर : 'पाहीन धणिभरी चरण झाडीन केशीं।' - रामाचा धावा, भक्तिमार्गप्रदीप ४८.

**धतरमतर** वि. अनिश्चित; धरसोडीचे; उडवाउडवीचे (भाषण इ.).

**धता(त्ता)ल-ल्या, धो (धौ) तील** वि. मनातली गोष्ट बेलाशक बोलून जाणारा; भडभड्या; हवी तशी वचने अविचाराने देणारा. [ध्व. धत]

**धताली** स्त्री. १. अविचाराचे, घिसाडघाईचे बोलणे, बडबड. २. अविचाराने हवी तशी वचने देणे.

**धत्तु(त्तू)र** पु.१. पहा: **धोतरा.** २. सोने. [सं. धत्तूर]

**धत्तु(त्तु)रा** पु. १. अभाव; फसवणूक. २. धोत्रा; याचे बी घातलेले पेय. [सं. धत्तूर] (वा.) ० **दाखविणे, देणे** - फसविणे; भोंदणे; धंदरणे; मुंडणे. (धोत्र्याचे बी विषारी व मादक असते. खाद्यपदार्थातून खायला देऊन गुंगी आणून त्याला लुबाडता येते. त्यावरून).

**धत्त्या** पु. बोजा; भार. (व.)

**धन** न. १. पैसा; संपत्ती; द्रव्य; वित्त; (सोने, चांदी, गुरेढोरे, घरदार, जमीनजुमला इ.) मालमत्ता. २. द्रव्याचे साधन; ज्यामुळे पैसा मिळतो ते. उदा. विद्या, कला इ. ३. अत्यंत प्रिय वस्तू. (समासात) कीर्ती - पुत्र -गृह इ. धन. ४. मौल्यवान वस्तू. ५. (गणित) बेरजेचे चिन्ह (+); मिळविण्याची, अधिक करण्याची संख्या. ६. विजेचा एक प्रकार.[सं.] (वा.) ० **पाडणे, लावणे** - (उप.) उत्कर्ष पावणे; वैभवाला चढणे; मानमरातब मिळणे (विपरीत लक्षणेने योजतात).

**धन** स्त्री. पहा: **धण** १ : 'एकट्या विधवेची सर्व धन व्हावी!' - के २६.७.३०.

**धन** न. कोथिंमिरीचे बी; धना. (माण.)

**धन** पु. १. धनुष्य : 'त्या पार्थकरिच निष्ठेल धन।' - गीतार्चंद्रिका १.३०. २. पहा : **धनु** ४ [सं. धनुस्]

**धनकुटा** पु. उंदीर पकडण्याचे धनुष्यासारखे साधन, सापळा.

**धनकुली** स्त्री. १. लहान धनुष्य; किंगरीवाल्याचे किंगरी वाजवण्याचे केसांचे धनुष्यबाण. (अहि.) २. गलोल; धनकुंबी. (को.) ३. धनुष्याप्रमाणे वाकलेले शरीर.

**धनकुंबी** स्त्री. खडे मारण्याचे धनुष्य; गलोल.

**धनको, धनकोनाम** पु. पैसे उसने देणारा; सावकार; कुळांना कर्जाऊ रकमा देऊन त्यांच्याकडून व्याजासह मुद्दल घेऊन व्यवहार करणारा.

**धनकोरिणको** पु. १. कर्ज देणारा व घेणारा, सावकार व कूळ यांच्यातील संबंध. २. देणेदार.

**धनग** स्त्री. स्वार्थ : 'धनग भर' - खावा १०१. (अहि.)

**धनगर** पु. एक जात व त्यातील व्यक्ती; मेंढपाळ. [क. दाङ्ग, धन+करक]

**धनगरहाट** पु. धनगरांची वस्ती.

**धनगरी** वि. धनगरासंबंधी; धनगराचे; धनगर लोकांना उपयोगी (कापड, लोणी वगैरे).

**धनगरी वेड** कमालीचा मूर्खपणा.

**धनचक्र** पु. १. पैशाचे वेड; द्रव्यलोभ. २. पैसा गेल्यामुळे लागणारे वेड.

**धन चिन्ह** अधिक (+) चिन्ह.

**धन(नं)तर, धनवत्तर** वि. १. श्रीमंत; समर्थ; बलिष्ठ; थोर: 'कुबेराला

कर्ज देण्याइतका धनत्तर तुझा बाप.' - एप्या. २. गडगंज; पुष्कळ; मुबलक; भरपूर (पीक, पाणी इ.). ३. खूप मोठा; विस्तृत; विस्तीर्ण (वाडा, पटांगण, देश इ.): 'भले भले धनंतर वाडे हवेल्या जागा।' - ऐपो ४२३. ४. हुशार; चलाख; कुशल. [सं. धनवत्तर]

**धनतेरस, धनत्रयोदशी** स्त्री. अश्विन वद्य त्रयोदशी; दिवाळीचा पहिला दिवस.

**धनदौलत, धनधान्य - माल** स्त्री. न. पु. स्थावरजंगम मालमत्ता.

**धननि:सारण** न. एका देशाकडून दुसऱ्या देशाकडे संपत्तीचा ओघ सुरू असणे.

**धनपाग** न. एक प्रकारचे जाळे. (को.)

**धनपिशाची** स्त्री. १. पैशाचे रक्षण करणारी हडळ. २. (ल.)अति लोभी, कद्रू स्त्री.

**धनप्रभारित** वि. काचेवर रेशमी कपडा घासल्यावर उत्पन्न होणाऱ्या विजेप्रमाणे, ऋणिका (इलेक्ट्रॉन) नसलेल्या विजेने प्रभावित.

**धनप्रेष** पु. पोस्टातर्फे रोख पैसे पाठविण्याची व्यवस्था व त्यासाठी भरावयाचे प्रपत्र; (इं.) मनिऑर्डर.

**धनफस** न. खुंट; जोड.

**धनभर** क्रिवि. यथेच्छ; पहा: **धणीभर** : 'करिं घेऊन पंचारति प्रभुला धनभर ओंवाळुनी।' - ऐपो ३०७.

**धनरेषा-घ** स्त्री. (हस्तसामुद्रिक.) मनुष्याच्या तळहातावरील एक विशिष्ट रेषा; त्यावरून पैसा किती व केव्हा मिळेल ते सांगतात.

**धनवई, धनुइ** वि. धनुर्धारी : 'इंद्रधनुष्या सितें। कवण धनवई न घालिजे ते।' - अमृ ६.२५.

**धनवड** न. लुगड्याचे एक वाण, प्रकार. याला रेशमी किनार साडेचार पुंजी (इंच) व मध्ये एक पांढरे रुईफूल असते.

**धनवडी-टी** वि. धनवड-ट मुलुखातील, प्रदेशातील (हा प्रदेश नाशिकपासून पूर्वेकडे ३० मैलांवर सुरू होई); कर्नाटकातील धनवड गावचे (लुगडे, शेला, पागोटे, जोट इ.).

**धनवर** पु. रानबदक. (झाडी)

**धनशेट** पु. (उप.) धनाढ्य व्यापारी किंवा पेढीवाला; धनत्तर.

**धनसडी** स्त्री. धनेश पक्षी. (झाडी)

**धनसाळ** स्त्री. तांदळाची एक जात.

**धनंजय** पु. १. अग्नी : 'राम धनंजय तुम्ही कापूर, तृण, तूल, काष्ठ, घृत तैल।' - मोरामंत्ररामायण ३१०. २. पाच उपप्राणांतील मृत्यूनंतर शरीरातून सर्वात शेवटी बाहेर पडणारा पाचवा वायू. [सं.]

**धना-ने** पु. कोथिंबिरीचे बी. [सं.धान्याक]

**धनाकर्ष** पु. बँकेत पैसे भरून मिळविलेला धनादेश, लेखी आदेशपत्र; (इं.) बँक ड्राफ्ट.

**धनाजाणे** जनावर गाभण राहणे; फळणे.(ना., व.)

**धनाडी-ढ्य-सा** वि. श्रीमंत.

**धनाध्यक्ष** पु. खजिनदार; कोशाध्यक्ष. [सं.]

**धनाल्ये** न. कोश; भांडार.

**धनाश्री** स्त्री. (संगीत) एक राग. गानसमय दिवसाचा तिसरा प्रहर.[सं.]

**धनिवेऱ्ही** क्रिवि. आकंठ, तृप्त होईपर्यंत.

**धनिष्ठा** स्त्री. तेविसावे नक्षत्र; एक नक्षत्रपुंज. [सं.]

**धनिष्ठापंचक** न. दर महिन्यात येणारी धनिष्ठा, शततारका, पूर्वाभाद्रपदा, उत्तराभाद्रपदा व रेवती ही पाच नक्षत्रे. हे पंचक अशुभ आहे.

**धनी** पु. १. मालक; स्वामी; यजमान. २. जबाबदार, कर्ता पुरुष; ज्याला शास्त्र, रूढी वगैरेमुळे अधिकार प्राप्त झाला आहे असा लायक माणूस. वि. समृद्ध. [सं. धा]

**धनी** स्त्री.पहा : **धणी** : 'धनी न पुरें पाहातां तयाच्या स्वरूपाची धाटी।' -होला ११३.

**धनी गोसावी - मी** (व्यापक) मालक; यजमान; स्वामी; अधिकारी.

**धनीजोग** वि. हुंडी विकत घेणाऱ्याने, ज्याच्या नावाची ती असेल त्याला जिचे पैसे द्यायचे असतात अशी हुंडी; (इं.) ऑर्डर.

**धनीधावण्या** वि. काळजी वाहणारा; घेणारा; रक्षणकर्ता; साहाय्यकारी.

**धनीपण-णा** न. पु. मालकी हक्क; स्वामित्व.

**धनु** पु. न. १. धनुष्य. २. कापूस पिंजण्यासाठी वापरण्यात येणारे धनुष्य. ३. वर्तुळाचा अर्धा भाग; वर्तुळखंड. ४. बारा राशींपैकी नववी रास. ५. चार हातांचे परिमाण; चार हात लांबी: 'धनु रे धनु भणतु। राऊतें बरवतांति।' - शिव ५६५. [सं. धनुस्]

**धनुक** न. धनुष्य : 'पांच सतें धनुका। उचलीली येके वेळें।' - उषा १३.

**धनुकली** स्त्री. १. पहा : **धनु** २. २.पहा: **धनकुली** १,२

**धनुरासन** न. १. पोटावर उपडे झोपून हात पाठीकडे नेऊन पाय उचलून दोन्ही पाय दोन्ही हातांनी टाचांशी घट्ट धरावे. नंतर डोक्याकडे व पायाकडे तोल निरनिराळ्या वेळी झुकेल असे करावे. त्यामुळे अन्नपचन होते. २. (मल्लखांब) बोंडावर कमान टाकून पायांनी मल्लखांब तटवून धरणे. - व्याज्ञा ३.२३६. [सं.]

**धनुर्धर, धनुर्धारी, धनुर्वाड, धनुवाड** वि. १. धनुष्य धारण करणारा; धनुष्याने लढणारा; तिरंदाजी करणारा. २. (ल.) शास्त्र, कला इ.मध्ये निपुण; पंडित; तज्ज्ञ. [सं.]

**धनुर्मार्ग** पु. वक्ररेषा. [सं.]

**धनुर्मास** पु. १. (ज्यो.) धनुराशीत सूर्य येतो तो काळ. त्यावेळी धनसंक्रांत असते. २. (ल.) या राशीत सूर्य असताना सकाळी धनु लग्न आहे तोपर्यंत देवाला नैवेद्य दाखवून करायचे भोजन; झुंझुरमास. [सं.]

**धनुर्वात** पु. ज्यात शरीर धनुष्याकृती होते तो वातविकार. याचे अंतरायामवात व बहिरायामवात असे दोन प्रकार आहेत. [सं.]

**धनुर्विद्या** स्त्री. लक्ष्य भेदण्याचे व तीर मारण्याचे शास्त्र; धनुष्य वापरण्याची विद्या. [सं.]

**धनुलेखणी** स्त्री. भूमापनाचा आलेख तयार करताना शाईने लहान वर्तुळे काढण्यासाठी वापरण्याचे साधन.

**धनुवाट** स्त्री. ढोराची वाट.

**धनुशाखा** स्त्री. एक वेल. हिच्या तंतूंपासून धनुष्याच्या दोऱ्या करीत.

**धनुष्य** न. १. इंद्रधनुष्य. २. पहा : **धनु** १,३,५.[सं.] (वा.) ० **कंठी घालणे**- पराभव करणे: 'घालुनि धनुष्य कंठी सहदेवा अभय दान दे हांसे।' - मोकर्ण ६.५२.

**धनुष्यवऱ्हाडिक** स्त्री. धनुष्य उचलून त्याला दोरी लावण्याचे आव्हान: 'धनुष्यवऱ्हाडिके लागि...कृष्णु पाचारावा.' – श्रीकृच ३१ .
**धनुष्यासन** न. (मल्लखांब) मल्लखांबाचे बोंड पायांच्या अटीत धरून एक पाय लांब करून त्याचा अंगठा हातात धरावा व दुसऱ्या हाताने दुसऱ्या पायाचा अंगठा धरावा. – व्याज्ञा ३.२४५. [सं.]
**धनू** न. गव्हाचे कोवळे रोपटे, रोह : 'घालुनि वेण्या, पाठीवर लांब, खोविलें त्यांत धनू छान।' – काव्यकेतकी पृ. ४८.
**धनेरी लगाम** घोड्याचा एक विशिष्ट लगाम. याला लहान काटे असतात.
**धनेश्वरी** स्त्री. (संगीत) गायनशास्त्रातील एक रागिणी. पहा : **धनाश्री**
**धनेषणा** स्त्री. धनाचा, द्रव्याचा लोभ. [सं.]
**धनोर** पु. १. पावसाळ्यात आकाशात दिसणारे इंद्रधनुष्य. २. धान्यात होणारे किडे, सोंडे; साठवणीच्या धान्यातील लाल भुंगे. (अहि.)
**धन्नास** वि. धनाढ्य; धनवान. (ना., व.)
**धन्नी** स्त्री. धरणी; पृथ्वी; भूमी. (गो.)
**धन्य, धन्यता** स्त्री. भाग्यावस्था; सार्थकता; साध्य गाठलेली स्थिती; कळस होणे; मोक्ष.[सं.] (वा.) **धन्य पावणे** – मरणे; धारातीर्थी पडणे. वि. १. सुखी; दैववान; पुण्यवान. २. कृतकृत्य ; समाधान पावलेला. ३. श्रेष्ठ; पावन; पवित्र.
**धन्यवाद** पु. आभार; दुवा; स्तुती. (क्रि. देणे, गाणे.).[सं.] (वा.) ० **करणे**– मोठा पराक्रम करणे. ० **वाटणे** – स्वत:बद्दल, स्वत:च्या कृत्याबद्दल अभिमान वाटणे.
**धन्वंतरी** पु. १. समुद्रमंथन करताना निघालेल्या चौदा रत्नांपैकी एक; देवांचा वैद्य. २. (ल.) कुशल, चतुर, यशस्वी, पटाईत वैद्य. ३. औषधांचा बटवा; वैद्याची औषधपेटी, पिशवी. [सं.]
**धपक(ब–म)कणे** अक्रि. धपकन्, धबदिशी, एकदम आवाज होऊन पडणे. [ध्व. धप]
**धप(ब)कन–कर–दिनी–दिशी** क्रिवि. (वस्तू, माणूस इ.) खाली पडण्याच्या आवाजाचे अनुकरण होऊन. (क्रि. पडणे, मारणे, वाजणे.).
**धपका** पु. १. हिसका; धक्का; चपाटा; रट्टा; ठोसा. २. काठी, तलवार इ.चा फटकारा; काठीचा मार. ३. धडकी, निराशा, दु:ख यांनी हृदयाला बसणारा धक्का. (क्रि. भरणे, बसणे). पहा: **धसका**. ४. मोठी, जाड भाकरी, थालीपीठ. [सं. धप्; गु. धपको]
**धपका** पु. एकत्रित रक्कम; वट्ट आकडा: 'यानी बादशहाची नजर व घासदाणा...ती करोडीची बेरीज धपका टाकिली आहे.' – मशिरा खंड ५ पृ. १७४.
**धपकाव(वि)णे** उक्रि. १. रट्टा लगावणे; तडाखा मारणे. २. तलवार, कुऱ्हाड इ.च्या प्रहाराने तोडणे.
**धप(ब)घाई** स्त्री. १. धप् असा आवाज (पावसाचा, ठिबकण्याचा). (क्रि. लावणे, करणे, लागणे, होणे, चालणे.). २. पहा: **डफघाई** [ध्व. धप + म. घाई]
**धपटणी** स्त्री. १.बडबड. २.थोपटणे. ३. धोपटणे. (गो.)
**धप(पा)टणे** अक्रि. मारणे; ठोकणे; बडविणे. पहा : **धोपटणे**
**धपन** स्त्री. खंत; काळजी; चिंता: 'काय सांगू बाई मन्या मनन्या धपनी।' – लोसाको.
**धपला–ली** पु. स्त्री. ढलपा; लाकूड, दगड, भिंतीचा गिलावा इ.चा गळून, तुटून अगर फुटून पडलेला तुकडा.
**धपाटा** पु. १.ज्वारीच्या पिठात तिखट, मीठ, मिरची, लसूण, कोथिंबीर घालून केलेला भाकरीसारखा पदार्थ. पहा : **धपका** ४. २. तळहाताचा प्रहार; मार; चापट. (वा.) **(पोटाचा, शरीराचा)** ० **वळणे, होणे** – पोट खपाटीला जाणे.
**धपाटे** न. भाजणीची भाकरी; थालीपीठ. पहा: **धपाटा** १
**धपाधप–पा** क्रिवि. एकामागून एक दिलेले तडाखे, रट्टे यांच्या आवाजाप्रमाणे आवाज होऊन. [ध्व. धप् द्वि.]
**धपापणे** क्रि. थकणे; भागणे; भरभर चालल्यामुळे, काम केल्यामुळे श्वास जोरात चालणे.
**धपे(बे)ला** पु. जिकिरीचे किंवा कष्टाचे काम; दगदग; भरमसाठ काम; ढोरकाम.
**धप्प–प्पा** स्त्री. न. पु.पहा : **धपका** १,२ [ध्व. धप]
**धप्प** न. ढलपा.
**धप्पाधप्पी, धप्पेबाजी** स्त्री. एकामागून एक असे एकसारखे मारलेले रट्टे; जोराची हातपिटी; मारामारी; बुक्काबुक्की; कुटाकुटी.
**धप्पाधप्पी** स्त्री. चिंध्यांचा चेंडू घेऊन मारामारी करण्याचा खेळ.[ध्व.]
**धबक–का** पु. १. वार; प्रहार; थापड: 'ध ध धबका रोकडा जाला ज्ञानबोध।' – दावि २१४. २. धब असा आवाज: 'बहुत वाद्यांचे धबक।' – दावि ५०४. [ध्व. धब]
**धबडगा–शा** पु. कसे तरी ओबडधोबड काम करून वेळ मारून नेण्याची क्रिया: 'त्यापेक्षां चिंचवडी धबडगा करून एक दोन भले खासे बत्ते (भात शिजविलेले हंडे) उतरून लोकांची कुरकूर मिटवीत कां नाहींत.' – नि ९४७.
**धबदूल** वि. १. स्थूल; गबदूल. २. घटमूट; बळकट.[क. दप्प, धप्प+दूल प्र.]
**धब(बा)धब–बा** क्रिवि. १. उंचावरून पडणाऱ्या पाण्याच्या झोताचे किंवा नारळादी फळांच्या झाडावरून खाली पडण्याच्या आवाजाचे अनुकरण करून. २.धबधब अशा आवाजाचे अनुकरण करून. ३. जोराने; मोठ्याने :' धबधबा वक्ष:स्थळ बडवित। थोर आकांत जाहला।' – ह ५.१२३. ४. पहा: **धमधमा** [ध्व.]
**धबधबा–बी, धबाबा** पु. स्त्री. उंचावरून पडणारा पाण्याचा लोट, झोत. [क.दबदबि–बे; ध्व.]
**धबधबीत** वि. १. पहा: **गुबगुबीत**. २. पातळ (तोंडी लावणे). (गो.)
**धबर्गस** वि. अति स्वतंत्र. (गो.)
**धबला** पु. १. जाडेभरडे व भक्कम कापड, वस्त्र: 'भक्ती धबला टाचघोळ जाला वैराग्य बाणली चोळी।' – दावि ४९८. पहा: **धोंगडा**. २. लुगड्याचा झोळ. ( तंजा.) [क. द(ध) प्प + म.ला]
**धबाटकी** पु. भीती; दरडावणी. (गो.)
**धबाधबी** स्त्री. १. पहा: **धप्पाधप्पी**. २. मारामारी : ' तो जर धबाधबी करूं लागला तर मग कसें करशील?' – बाळ २.१५२. [ध्व.]

**धबाफळ** न. विद्रूप दिसण्याइतका लठ्ठ माणूस, जनावर; धूड.
**धबाबणे** अक्रि. धब् धब् आवाजाने खाली पडणे: 'शुष्क जळाचें चळाळ। धारा धबाबे खळाळ।' – दास ११.७.४.
**धबाली, धबय** वि. लठ्ठ; स्थूल; ढमाली (स्त्री). [क. द(ध)प्प]
**धबुला** वि. १. लठ्ठ; जाड; मोठे (फळ). २. ठेंगणा आणि आडव्या अंगाचा; गिड्डा; जाडजूड.
**धब्बल** स्त्री. रपाटा; धपाटा; ठोसा; धबका. [ध्व. धब]
**धब्बल** वि. धष्टपुष्ट; लठ्ठ; दणकट.
**धब्बा** पु. डाग. (व., ना.) [हिं.]
**धब्बे** न. चांगला भरदार व पिकलेला आंबा. (राजा.)
**धम** पु. मृदंग, संबळ यांचा खर्जातला आवाज देणारा भाग; संबळाच्या डाव्या हाताकडील भागाचे नाव. हे भांडे उजव्या बाजूच्या भागापेक्षा आकाराने दीडपट मोठे असते; बंब; धूम. [ध्व.]
**धम** पु. बीळ; जमिनीतील भोक.
**धम, धमक** स्त्री. १. हिंमत; धैर्य; स्वसामर्थ्याची जाणीव. २. शक्ती; बळ. ३. (पाठ, पोट, फरा इ.मध्ये) उठणारी कळ; तिडीक; शिणक; उसण; शिळक; चमक. ४. फुले, अत्तर यांचा दरवळ; दमट जमिनीचा दर्प. ५. आगीची, तापाची जळ. ६. झगझगाट; लखलख (सोने, हिरे यांची). [क. धमकु; हिं. धमका]
**धमक** एक अतिशयत्वद्योतक शब्द; गडदा पिवळापणा व अतिशय गोरेपणा दाखविणारे अव्यय.
**धमकट** न. दांडपणा : 'ते महा धीट रागीट। तिचें मोडारे धमकट।' – कथा ५.१७.४१.
वि. १. मजबूत; टिकाऊ; दणगट (पदार्थ). २. लठ्ठ आणि सशक्त; काटक; घटमूट.
**धमकटचे** क्रि. कफ भरून येणे. (गो.)
**धमकणे** अक्रि. (शीर) उडणे; खालीवर होणे. पहा: **धुमकणे** [सं. ध्मा]
**धमकणे** सक्रि. १.फुंकर घालून, भाता चालवून अग्नी प्रज्वलित करणे. २. धपाटा मारणे. ३. फुंकून वाजवणे. ४. शिरा उडणे. [सं. ध्मा]
**धमकणे** अक्रि. वाजणे; धमधम असा आवाज करणे: 'पैलाड भुईतूनि सीतळ। धमकतां मानिले आहे जळ।' – दावि ३४१. [ध्व. धम]
**धमकणे** अक्रि. भिणे; धाकणे: 'तदाकारें थोरें निशिदिन मनामाजिं धमके।' – दावि २२३.
**धमकना** क्रि. येऊन ठेपणे. (झाडी) [हिं.]
**धमकरे** वि. विशाल. (गो.)
**धमका** पु. रट्टा; ठोसा; धपाटा; फटका; बुक्का. [ध्व. धम]
**धमका–की** पु. स्त्री. दहशत; दबकावणी; मुद्दाम घातलेली भीती; (मारण्याचे, नुकसान करण्याचे) भय. [हिं. धम]
**धमका–की** पु. स्त्री. १. तापाने अंग मोडून येणे; कणकण (तापाची). २. पाऊस थांबल्यानंतरचा उकाडा. ३. पहा : **धमक**
**धमकार** जयजयकार: 'सर्व लोक लिंब नेसायाला उदाचा धमकार झाला.' – एहोरा यल्लमा ९४.
**धमकावणी** स्त्री. दहशत घालण्याची क्रिया; दटावणी. [क. दमकु]
**धमकावणे** उक्रि. १. धमकी, दहशत घालणे; दटावणे. २. रागे भरणे; कानउघडणी करणे.
**धमकुसु** पु. कल्लोळ; हल्ला; घोष; नाद: 'धमकुसु घालिताती मांदळी वंशवीणे वाताती कहाळी'. – नरुस्व १०.३५. [ध्व.]
**धमणी–नी** स्त्री. वर आच्छादन असलेली बैलगाडी; सारवट गाडी; एक्का. (गुजराथमधील दमणी बैल फार जलद जातात त्यावरून).
**धमधकट** वि. दणकट; धडधाकट.
**धमधम–मा** क्रिवि. पडघम, नगारा यांचा अथवा पोकळ भागावर चालले असता जो आवाज होतो तसा आवाज होऊन. [ध्व. धम]
**धमधमणे** अक्रि. १. डबडब वाजणे (फुगलेले पोट, नगारा इ.). २. सळसळणे : 'घंगाळात ऊन पाणी धमधमत होतें.' – इंप ४३.
**धमधमा, धमामा** पु. १. खंदकाच्या बाजूने तोफा लावण्यासाठी रचलेला मातीचा बांध; मोर्चा; बुरूज: 'फौज पळोन धमधमियांपावेतों आली'. – भाब १०९. २. उंचवटा; टेकाड; उंच ओटा; मनोरा; (एखाद्या भागाचे निरीक्षण करण्यासाठी) टेहळणीची, मोक्याची जागा; चढण. ३. पाण्याचे उंच टाके; हौद; कारंजाचा हौद; (पाणी साठवून नळातून सोडण्यासाठी) कुंडे; टाके: 'आगगाडीच्या पुढच्या अंगास जो वाफेचा धमधमा असतो...'–मपु ६, पृ. ४८. ४. किल्ल्यावर चढण्या-उतरण्यासाठी भिंतीला जोडून केलेले उतरते बांधकाम. [फा. दम्दमा]
**धमधमीत** क्रिवि. धमक; पिवळ्या रंगाचा अतिशयदर्शक शब्द. कधी गोरा, पांढरा या शब्दांमागेही लावतात.
**धमन** न. कीटकनाशकाचा धूर करून कीड मारून टाकण्याची प्रक्रिया. शेतात, तसेच मच्छरविरोधी मोहिमेत मोठा वापर;( इं.) फ्युमिगेशन.
**धमन** न. १.(चर्मकार.) काळा रंग वर चढवलेले कातडे. २. भाता.
**धमनी** स्त्री. १. शरीरातील शुद्ध रक्त वाहून नेणारी शीर; नाडी; रोहिणी. २. शरीरातील ज्ञानतंतू; मज्जारज्जू. ३. फुंकणी: 'सरला सुवंशजा ती झाली धात्रेयिकाचि हो धमनी।' – मोवन ९.२९. [सं. ध्मा]
**धमनीकाठिण्य** न. धमन्यांत मेद व ट्रायग्लिसरॉइड यांचा थर साचल्यामुळे धमन्या जाड व कडक होण्याचा रोग.
**धमाका** पु. १. एक फटाक्याची जात. –मुंब्या ११८. २. मोठा आवाज.
**धमाटणे** उक्रि. रपाटा, ठोसा, बुक्की देणे; बदडणे; मारणे.
**धमाटा** पु. रट्टा; तडाखा; धपाटा. [ध्व.]
**धमाटा–टो** पु. १. गुराखी लोक आपल्या हातावर गोवरी किंवा सशाची लेंडी यांच्या विस्तवाने घेतात तो डाग. २. मनगटावर भाजून काढून घेतलेला फोड.(कु.) [सं. ध्मा]
**धमाधमी** पहा: **धप्पाधप्पी**
**धमान** पु. मैदान. [फा. दमदमा]
**धमामा** पु. १. मोठा नगारा; एक वाद्य: 'दमामे धमामे कर्णे शंख भेरी।'– रामदासी २.१८३. २. (ल.) बोभाटा; डंका; प्रसिद्धी; जाहीर करणे. (क्रि. करणे, वाजणे, वाजविणे, होणे.). [फा. दमामा]
**धमार–ल** पु. १. गायनातील एक ताल. यात चौदा मात्रा व चार विभाग असतात. २. या तालातील पद, चीज. [हिं.]
**धमाल** स्त्री. १. मौजमजा; भरपूर गंमत. २. खोटी गोष्ट; खूप गडबड.

वि. अवाढव्य; स्थूल; गबदूल. पहा: **ढमाल**

**धमावणे** उक्रि. फुंकणे: 'ओकारें कमलासनु । तो कैसा धमावा ।' -गीता २.२२२७. [सं. ध्मा]

**धमासा** पु. एक काटेरी व औषधी वनस्पती. हिच्यापासून एक प्रकारची साखर निघते. [सं. धन्वयास, धन्वयवास; गु. धमासो]

**धम्म** वि. क्रिवि. मुग्ध; मुकाट; गप्प; स्तब्ध : 'मास्तरीणबाई धम्म बसल्या होत्या.' -खदे. [ध्व.]

**धम्मक लाडू** धपके; रट्टे; बुक्क्यांनी मारणे. [ध्व.]

**धम्माल** पु. घोड्याची एक चाल. - अश्वप १.१९३.

**धम्मिल्ल** पु. अलंकार, फुले इ. गुंफून घातलेली वेणी: 'जाणो कृष्णपक्षाची निशा । धम्मिल्ल माथा ।' - कथा ४.७.४४. [सं.]

**धयडी, धल्ली** वि. स्त्री. म्हातारी स्त्री : 'एक धयडी काम करे सात जन तिनड कमर धरे.' - लोसाको. (ना.)

वि. म्हातारी : 'आईबाईंनी दिधी भर उठ व धल्ली नवरा कर.' - लोसाको. (अहि.) [गु.]

**धय्या** पु. (पत्त्यांतील, गंजिफातील) दहा ठिपक्यांचे पान, दशा. (कर.)

**धर** पु. १. अडकवून, निरोधून ठेवण्याची, टिकवण्याची शक्ती; (शब्दश: व ल.) चिकटून राहण्याची, धारण करण्याची, जडण्याची शक्ती. २. तोलून धरण्याची, वजन सहन करण्याची शक्ती (पायांची, पायांतील वस्तूंची शक्ती; आधार: 'कड्यावर बांधकाम केल्यावर चांगला धर लागेपर्यंत कड्याखालची जमीन उकरून खाली उतरावें लागतें.' - मॅरेट १७. ३. खळ; (प्राण्यांची मलमूत्रविसर्जन इ.व्यापार) दाबून धरण्याची शक्ती; संयमनशक्ती. ४. कष्ट, मानसिक त्रास सोसण्याची शक्ती; तग; टिकाव. ५. बोलण्यात, वागण्यात व विचारांत एकवाक्यता; सुसंगती; व्यवस्थितपणा; मेळ. ६. धीर (क्रि. तुटणे): 'धर सर्वांचाहि जेधवां तुटला ।' - मोगदा १.२. ७. जम; घडी; बस्तान:'इकडे अद्यापि पक्का धर बसला असें त्यास वाटत नाही.' - सूर्यग्र. ८. पर्वत : 'जो धैर्यें धरसा, सहस्रकरसा तेजें तमा दूरसा ।' - र ४. ९. (समासात) धारण करणारा; ठेवणारा; पाळणारा. उदा. जल-चक्र-गंगा-धर इ. १०. काठ; तीर. [सं. धृ]

**धरण** न. १. बांध; बंधारा; नदी-ओढ्याचा प्रवाह अडवून पाणी साठवण्यासाठी घालतात तो बांध किंवा भिंत. २. समुच्चयाने नऊ आणे; पाव होन. ३. गरोदर स्त्रीचा गर्भपात होऊ नये म्हणून तिच्या गळ्यात बांधतात ती औषधी मुळी. ४. सुमारे चोवीस गुंजांइतके वजन. ५. धारण करणे; बाळगणे. ६. आश्रय; टेकण. [क.] (वा.) ० **फुटणे** - (अश्लील) विटाळशी होणे.

**धरणखांब** पु. १. घराच्या जमिनीपासून आढ्यापर्यंतचा खांब; धारण. २. (ल.) कुटुंबाचा आधारस्तंभ; पोषणकर्ता; कर्ता माणूस.

**धरणमूळ** न.झाडाचे मुख्य मूळ (जमिनीत अधिक असणारे); सोटमूळ; मुळाचा मोठा भाग. (को.)

**धरणी** स्त्री. शैली; धाटणी; वळण (लेखन, भाषण, वर्तन इ.ची).

**धरणी** स्त्री. १. जमीन; भूमी; धरित्री. २. सबंध भूगोल; (जमीन आणि पाणी यांसह) पृथ्वी. [सं.] (वा.) ० **वर पडणे** - मृत्युशय्येवर पडणे; मरणाच्या दारी असणे. (मरताना माणसाला पलंग इ. वरून जमिनीवर ठेवतात, त्यावरून रूढ).

**धरणी** स्त्री. १. धरण्याची क्रिया. २. पहा : **धरणे** न. १

**धरणीकंप** पु. भूकंप; पृथ्वीच्या पोटातील अंतर्गत बदलांमुळे जमिनीला धक्के बसणे. [सं.]

**धरणीची मुलगी** लग्नासाठी पळवून आणलेली मुलगी.

**धरणे** उक्रि. १. पकडणे; मुठीत, हातात ठेवणे. २.निसटू नये म्हणून पायाखाली दाबून ठेवणे; जोराने पकडणे. ३. साठवणे; मनात, लक्षात ठेवणे.४. पकडून ठेवणे; अटकेत, कह्यात, ताब्यात ठेवणे. ५. मनात आणणे; बनवणे; कल्पिणे (शास्त्रज्ञान, विद्या, कला, खुबी, युक्ती इ.). ६. एखादा क्रम, नियम, शिस्त पाळणे; विशिष्ट गोष्ट, कामे अंगीकारणे; एखादा उद्योग नियमित करणे. ७. मानणे; समजणे; पाहणे. ८. विशिष्ट कामी योजणे, लावणे, गुंतवणे. ९. मनाचा ग्रह करून घेणे व तशा ग्रहाने वागणे; गोडी, आवड लावून घेणे. १०. (जमीन, शेत) आपल्या कबजात, मालकीत, ताब्यात घेणे. ११. विचारात, लक्षात, मनावर घेणे; महत्त्व देणे. १२. अवलंबणे; स्वीकारणे; अनुसरणे; (पक्ष, बाजू, भूमिका, वृत्ती) घेणे. १३. (घाई, त्वरा) करणे; योजणे. १४. संपादणे; प्राप्त करून घेणे; (सामर्थ्य, बळ) मिळवणे. १५. बाळगणे; (धास्ती, भीती, अवमान) घेणे. १६. पुरस्कारणे; प्रतिपादणे (कार्य, मत इ.). १७. पकडणे; उघडकीला आणणे (चोरी, लबाडी इ.). १८. समाविष्ट करणे; हिशोबात धरणे. १९. पाळणे; आचरणे (अनुष्ठान, उपास, व्रत). २०. चालवणे; पुढाकार घेणे (गोंधळ, कथा, तमाशा इ.चा). २१. आवड असणे, घेणे; एखाद्यावर ममता करणे. [सं. धृ]

**धरणे** अक्रि. १. चिकटून राहणे; बसून राहणे; वियुक्त, वेगळे न होणे. २. बहर किंवा फळे येणे; निर्माण होणे; धारण केले जाणे. ३. फळे टिकणे. ४. गर्भार, गाभण असणे, राहणे (जनावर) . ५. अंग लुळे, वाकडे होणे, हालेना-चालेनासे होणे. ६. स्मरणात राहणे. ७. ठरली असणे; निश्चित केली जाणे. ८. निवारणे (पाऊस, थंडी - कपड्याने, घोंगडीने). ९. थांबणे; स्थिर राहणे: 'तऱ्हीं रणमदें मातलें । राऊंत धरतीचिना ।' - शिव ९७१. [सं. धृ]

**धरणे** अक्रि. जमिनीत मूळ धरून कायम होणे. [सं. दृह्]

**धरणे** न. १. अपराध्याला पकडण्यासाठी पाठवलेली सशस्त्र टोळी; धरपकड; अटक. २. ऋणको पैसे देत नसल्यास धनकोने अगर त्याच्या माणसाने ऋणकोच्या दाराशी तगाद्याला बसणे; दार अडवणे; उंबरा धरणे. (सामा.) तगादा. ३. देव प्रसन्न करून घेण्यासाठी, आपले इच्छित कार्य सफल व्हावे म्हणून देवळाच्या दाराशी उपाशी बसून राहणे. (क्रि. बसणे); इच्छित गोष्ट मिळेपर्यंत जागेवरून न हलणे; सत्याग्रह करणे. ४. पकड; पगडा: 'वेर्थ संशयाचें जिणें । वेर्थ संशयाचें धरणें ।' - दास ५.१०.१९. ५. सोनाराचे एक आयुध. ६. आवड: 'मनें घेतलें धरणें । भजनमार्गीं ।' - दास १४.७.८. ७. अटकाव; आकर्षण; नजरबंदी : 'आपुलेनि प्रसन्नपणें । दृष्टीसि मांडीति धरणें ।'- ऋ १८. [सं. धृ] (वा.) ० **उठणे** - फेरे थांबणे. ० **बसणे** - नादी लागणे. ० **येणे** - १. यमाचे, मरणाचे बोलावणे येणे. २. अटक करण्यासाठी पोलीस येणे.

**धरणे(ण) करी-दार** पु. १. धरणे धरून बसणारा माणूस. २. हट्टी, लोचट भिकारी.

**धरणेपारणे** न. १. एक दिवस जेवणे व एक दिवस उपास करणे याप्रमाणे करण्याचे व्रत. २. (ल.) आयुष्याच्या गरजा न भागणे; दारिद्र्यामुळे नेहमी अन्न न मिळणे. ३. कर्जफेडीसाठी एक दिवसाआड जेवणे.

**धरती, धरित्री** पहा : **धरणी** [सं. धरित्री]

**धरती** स्त्री. जास्त मादक दारू. (को.)

**धरदमार** पु. दरोडा. (कर्ना., लमाणी)

**धरधरणे, धरधरावणे** अक्रि. १. आजारातून उठणे; प्रकृती सुधारणे; उत्साह वाटणे; पूर्वस्थितीत येणे. २. टिकाव धरणे; टिकून राहणे; सोसणे; सहन करणे; निभावणे; तगणे.

**धरनी** स्त्री. कानाच्या वरच्या पाळीवर वापरण्याचा स्त्रियांचा दागिना.

**धरनेम** पु. (भाषण, वर्तन इ.त) एकसूत्रीपणा; सुसंगती; निश्चितता.

**धरपकड** स्त्री. १. संशयित, गुन्हेगार, चोर इ. माणसांना एकामागून एक पकडण्याची क्रिया; अटक. २. (ल.) (हिशेबात चूक, फसवेगिरी) उमगून येणे; धरली जाणे.

**धरपकडीचा** वि. लोकांना मोहात पाडणारा; जाळ्यात, संकटात लोटणारा (व्यवहार, भाषण, हकिकत इ.).

**धरबंद-ध, धरबंधन** पु.न. १. नेम; नियम; बंधन; नियंत्रण; कायदा; ठरावीक मर्यादा, प्रमाण. २. एकसूत्रीपणा; सुसंबद्धता; मेळ (भाषण, वर्तन यांत). ३. भुताखेतांना मंत्र-तंत्र वगैरेंनी नियंत्रित करणे. ४. बंधनाचा उपाय. ५. परिमितता; प्रमाणबद्धता.

**धरबांध** स्त्री. १. पहा: **धरपकड** १. २. पहा: **धरबंद** ३

**धरबिगार, धरवेठ** स्त्री. बिनमजुरीने, बळजबरीने माणसाला काम करायला लावणे, काम करून घेणे.

**धरमकाडी** स्त्री. पेटत्या चितेवर प्रत्येकाने एक-एक काडी अर्पण करण्याचा विधी. (झाडी)

**धरमधक्का-का** पु. १. व्यर्थ खटाटोप; निष्फळ प्रयत्न; विनाकारण परिश्रम; कार्य न होता फुकट त्रास, कष्ट, मेहनत; सार्वजनिक, परोपकाराच्या कामात पडणारे श्रम, बसणारा चट्टा: 'तोडा जाऊनी खोडा येईल बसेल एखादा धरमधका'. - राला ८५. २. तडाखा; त्रास; मार: '...तिच्या धरमधक्क्यांतून कोणी म्हणतां कोणी सुटलें नाहीं.'- फाटक नाट्यछटा १. ३.ओझी वाहणाऱ्या माणसांना, थकल्यावर ओझी ठेवण्यासाठी वाटेत बांधलेला ओटा. [सं. धर्म + म. धक्का]

**धरमार** पु. स्त्री. हाणमार; मारामारी; ठोकाठोकी. (गो.)

**धरमेळ** पु. (भाषण, वर्तन यांची) एकसूत्रता; ताळतंत्र; सुसंबद्धता.

**धरवणी** न. पावसाचे धरलेले (कौलावरून गळणारे) पाणी; साठवलेले पाणी: 'धरवणी वेंचें सरें। तैसें भोगें प्राचीन पुरे।' - ज्ञा १८.९६५.

**धरवर** वि. अनामत. (ना.)

**धरसवर** स्त्री. १. गृहव्यवस्था; संसार; टापटीप. २. पाहुणचार; आतिथ्य. ३. व्यवस्था; रीत; पद्धत. ४. निगा; सांभाळ; काळजी (मुले, गुरेढोरे इ.ची).

**धरसां(सो)ड** स्त्री. १.अगोदर स्वीकारून मग सोडून देणे; सुरू करून अपुरेपणी बंद करणे. २. अस्थिरपणा; डळमळीतपणा; चंचलता.

**धरा** स्त्री. धरित्री; पृथ्वी; धरणी. [सं. धृ]

**धरातल-ळ** न. १. भूपृष्ठ; वरचा भाग; जमीन. २. पृथ्वी.

**धराधर-री** स्त्री. पहा : **धरपकड**

**धरिया** पु. पोलादी टोक बसवलेला बांबूचा भाला. - खाजगीखातें नोकर लोकांच्या पोषाखासंबंधीं नियम ४१.

**धरी** वि. (आट्यापाट्यांचा खेळ) धरणारा; अडवणारा; शह देणारा. (गो.)

**धरू** पु. १. (चर्मकार.) हत्यारांची मूठ. २. निग्रह : 'मनाचा हान मारु। कां पवनाचा धरु।' - ज्ञा ६.२८९.

**धरून** क्रिवि. १. पकडून; स्वाधीन ठेवून. २. समावेश करून. ३. (स्थलकालवाचक) पासून. उदा. कालचे धरून = कालपासून : 'कवडा धरूनि कोटीधन। जेणें केलें मदर्पण।' - एभा ११.१२१२.

**धरून सोडून** क्रिवि. संदिग्धपणे; दुटप्पीपणाने (क्रि. वागणे इ.).

**धरेचे** क्रि. अति घाम येणे. (गो.)

**धरौता** वि. खालचा. [सं. धरा]

**धर्ता** वि. १. धारक; धारण करणारा; बाळगणारा. २. पकडणारा; धरणारा. [सं. धृ]

**धर्ती** स्त्री. तऱ्हा; प्रकार. [सं. धृ]

**धर्धर** स्त्री. गडबड; चुळबूळ. (कर.) [ध्व. धरणे द्वि.]

**धर्धरणे** अक्रि. हादरणे. [सं. धृ]

**धर्म** पु. १. धार्मिक विधियुक्त क्रिया, कर्मे; परमेश्वरासंबंधीचे कर्तव्य; ईश्वरोपासना; परमेश्वरप्राप्तीची साधने; परमेश्वरप्राप्तीचा मार्ग, पंथ. २. मनुष्याला सदाचरणाला लावणारे व परमेश्वरचिंतनाचा मार्ग दाखवणारे हिंदू, ख्रिश्चन, यहुदी, इस्लामी वगैरे पंथ. ३. समाजव्यवस्थेसाठी शास्त्रांनी घालून दिलेले आचार, नियम, पवित्र विधी, कर्तव्ये. ४. चार पुरुषार्थांपैकी पहिला. ५. सद्गुण; शास्त्रोक्त वागल्याने अंगी येणारा नैतिक, धार्मिक गुण. ६. स्वाभाविक गुण; गुणधर्म; नैसर्गिक प्रवृत्ती. ७. कर्तव्यकर्म; रूढी. ८. कायदा. ९. धर्माचरणाचे पुण्य. [सं.] (वा.) ० **करता कर्म उभे राहणे, पाठीस लागणे** - परोपकार करीत असता आपणच संकटात पडणे. ० **खुंटीस बांधणे** - (जनावराला) उपाशी जखडून टाकणे; ठाणावर बांधून ठेवणे. **धर्माआड कुत्रे होणे** - दानधर्माच्या आड येणे. **धर्माची वाट बिघडणे, मोडणे** - एखाद्या दानधर्माचा ओघ थांबणे, थांबविणे. **धर्माच्या पारी बसणे** - १. दुसऱ्याचे पैसे खर्च करीत रिकामटेकडे बसणे. २. सद्गुणांचे चांगले फळ मिळणे; सदाचारामुळे चांगले दिवस येणे. ३. सतत दानधर्म करणे; धर्मकृत्ये आचरणे. **धर्मावर लोटणे, टाकणे, सोडणे** - एखाद्याच्या न्यायबुद्धीवर सोपवणे. **धर्मावर सोमवार सोडणे** - स्वतः झीज न सोसता परभारे होईल ते पाहणे.

**धर्मआई-माता** स्त्री. काही चर्चमध्ये लहान मुलांचा बाप्तिस्मा होतो तेव्हा त्यांना ख्रिस्ती धर्माला अनुसरून वळण व शिक्षण देण्याची जबाबदारी घेणारी आईपेक्षा वेगळी स्त्री. (इं.) गॉडमदर : 'प्रत्येक

मुलीला एक धर्मबाप व दोन धर्म आया पाहिजेत'. - साप्रा ९०.

**धर्मकर्ता** पु. १. धर्म करणारा, परोपकारी माणूस. २. न्यायाधीश; जज्ज. ३. देवळाचा व्यवस्थापक, कारभारी. (दक्षिण हिंदुस्थान).

**धर्मकर्मसंयोग** पु. प्रारब्धयोग. पहा: **कर्मधर्मसंयोग**

**धर्मकार्य-कृत्य** न. १. परोपकाराचे काम (विहीर, धर्मशाळा इ. बांधणे इ.). २. धार्मिक विधी, व्रत, कृत्य,संस्कार.

**धर्मखाते** न. १. धर्मासाठी जो खर्च करतात त्याचा हिशेब ठेवणारे खाते. २. धर्मार्थ संस्था; लोकोपयोगी, परोपकारी संस्था.

**धर्मग्रंथप्रचारक** पु. (ख्रि.) ख्रिस्ती धर्मशास्त्र व तत्संबंधी इतर पुस्तके विकणारा फेरीवाला; (इं.) कल्पोर्चर. [सं.]

**धर्मदारी कुत्रे** परोपकाराच्या आड येणारा (नोकर, अधिकारी); कोठावळा.

**धर्मद्वार** न. कौल मागणे; ईश्वराला शरण येणे. [सं.]

**धर्मधेनू** स्त्री. १.हरळी; दूर्वा. २.धर्मार्थ सोडलेली, गरीब गाय. [सं.]

**धर्मध्वज** पु. १. धर्माची पताका; धर्मचिन्ह; धर्माचा डौल, प्रतिष्ठा . २. (ल.) धर्माचा फाजील पुरस्कर्ता. [सं.]

**धर्मनाव-तर-नौका** स्त्री. येणाऱ्या-जाणाऱ्यांना तरून जाता यावे म्हणून नावाड्याला वेतन देऊन नदीवर धर्मार्थ ठेवलेली मोफत नाव.

**धर्मपत्नी** स्त्री. १. सशास्त्र (अग्निहोत्रादी ) कर्माकरता योग्य अशी प्रथम-विवाहाची ब्राह्मण पत्नी. २. धर्मशास्त्र व कायदा या दोहोंना मान्य असणाऱ्या पद्धतीने विवाह केलेली पत्नी. ३. विवाहित स्त्री. [सं.]

**धर्मपरायण** वि. क्रिवि. १. परोपकारार्थ; धार्मिक कृत्य म्हणून; धर्मासाठी. २. धर्मार्थ; मोफत (देणे, काम करणे). ३. पक्षपात न करता; धर्मावर लक्ष ठेवून (करणे, बोलणे, सांगणे, वागणारा इ.). [सं.]

**धर्मपक्षी** पु. धर्माची बाजू मांडणारा; धर्मोपदेशक; पाद्री; पुरोहित : 'तो जातीचा धर्मपक्षी होता.' - इंग्लंडची बखर भाग १.२७२.

**धर्मपंथ** पु. १. धर्माचा, परोपकाराचा, सदाचरणाचा मार्ग. २. धार्मिक संघ, समाज. [सं.]

**धर्मपाल** पु. खड्ग, तलवारीचा एक प्रकार. - प्रश १५.

**धर्मपाळ** पु. झाडावर राहणारा धर्मरक्षक, देव, भूत, मुंजा.[सं. धर्मपाल]

**धर्मपिंड** पु. १. पुत्र नसणाऱ्यांना द्यावयाचा पिंड. २. दुर्गतीला गेलेल्या पितरांना द्यावयाचा पिंड.

**धर्मपुत्र** पु. १. मानलेला मुलगा. २. उत्तरक्रियेच्या वेळी पुत्र नसलेल्यांचा श्राद्धविधी करणारा तज्जातीय माणूस; धार्मिक कृत्यात पुत्राप्रमाणे आचरण करणारा माणूस. ३. दत्तक, इस्टेटीला वारस ठरविलेला मुलगा.

**धर्मपुरी** स्त्री. १. तपस्वी, विद्वान वगैरे ब्राह्मण राहतात ते क्षेत्र; धार्मिक स्थळ. २. ज्याच्या घरी पाहुण्यांचा नेहमी आदरसत्कार केला जातो ते घर; पाहुण्यांची वर्दळ, येणे जाणे असणारे घर. [सं.]

**धर्मबाप-पिता** पु. (ख्रि.) काही चर्चमध्ये लहान मुलांचा बाप्तिस्मा होतो तेव्हा त्यांना ख्रिस्ती धर्माला अनुसरून वळण व शिक्षण देण्यात यावे म्हणून जबाबदारी घेणारा पित्याहून वेगळा पुरुष; (इं.) गॉडफादर : 'ज्या प्रत्येक मुलाचा बाप्तिस्मा करावयाचा आहे त्याला दोन धर्मबाप व एक धर्मआई पाहिजे.' - साप्रा ९०.

**धर्मभोळा** वि. १. धर्मावर आत्यंतिक श्रद्धा असणारा; परमधार्मिक. २. (अनादरार्थी) धर्मवेडा; कट्टर सनातनी.

**धर्ममार्तंड** पु. १. धर्माचा श्रेष्ठ अनुयायी, पुरस्कर्ता; एक पदवी. २. (उप.) धार्मिकपणाचे अवडंबर, ढोंग माजविणारा.

**धर्मयुद्ध** न. युद्धशास्त्राच्या नियमाप्रमाणे चाललेली लढाई; समान संख्याबळ व शस्त्रास्त्रांनी सज्ज असणाऱ्या दोन पक्षांमधील न्यायीपणाचे युद्ध; निष्कपट युद्ध.

**धर्मराज** पु. १. युधिष्ठिर; ज्येष्ठ पांडव. २. यमधर्म. ३. धर्माप्रमाणे (युधिष्ठिराप्रमाणे) भोळा माणूस. ४. (ल.) धर्मनिष्ठ, सात्त्विक मनुष्य.

**धर्मराजाची बीज** कार्तिक शुद्ध द्वितीया; भाऊबीज; यमद्वितीया.

**धर्मलंड** वि. (अश्लील) नास्तिक; धर्मकृत्ये न करणारा; धर्माला झुगारून देणारा. [सं. धर्म + फा.लन्द्]

**धर्मवणी** पु. तिलांजळीच्या वेळचा कुंभारी मंत्र. - बदलापूर ७२.

**धर्मवाट** स्त्री. १. शरण आलेल्या शत्रूवर दया दाखवून त्याला करून दिलेली वाट : 'तुज युद्धीं कैंचें बळ। धर्मवाट दिधली पळ।' - एरुस्व ११.३७. २. खुला, मोकळा, बिनधोक, अनिर्बंध रस्ता, मार्ग. [सं. धर्म + म.वाट]

**धर्मविवाह** पु. गरिबांचे स्वतःच्या पैशाने करून दिलेले लग्न; धर्मादाय लग्न. [सं.]

**धर्मवीर** पु. १. स्वधर्मासाठी प्राणार्पण करणारा; धर्मासाठी लढणारा. २. धर्माचे संरक्षण, संवर्धन करणारा; धर्माचा वाली; एक पदवी. ३. (ख्रि.) रक्तसाक्षी; (इं.) मार्टिर. [सं.]

**धर्मवेड -खूळ** न. धर्मसंबंधी फाजील आसक्ती; अडाणी धर्मभोळेपणा; धर्माविषयी अंधश्रद्धा.

**धर्मशास्त्र** न. १. वर्णाश्रमधर्माचे प्रतिपादन करणारे मनुप्रणीत शास्त्र; आचार, व्यवहारादिसंबंधी नियम सांगणारे शास्त्र. २. समाजाच्या शिस्तीसाठी, धार्मिक आचरणासाठी, सामाजिक संबंधासाठी (लग्न इ. संस्थांबद्दल) विद्वानांनी घालून दिलेले नियम किंवा लिहिलेले ग्रंथ. ३. ख्रिस्ती धर्माचे शास्त्र; (इं.) थिऑलॉजी. ४. (सामा.) कायदेकानू. [सं.]

**धर्मशा(सा)ळा** स्त्री. वाटसरू लोकांना उतरण्यासाठी बांधलेली वास्तू. [सं. धर्मशाला] (वा.) **धर्मशाळेचे उखळ** - (धर्मशाळेतील उखळाचा कोणीही उपयोग करतात त्यावरून) वेश्या.

**धर्मशिला-ळा** स्त्री. सती जाणारी स्त्री पतीच्या चितेवर चढताना ज्या दगडावर प्रथम उभी राहते तो दगड.

**धर्मशील-ळ** वि. शास्त्राप्रमाणे वागणारा; धार्मिक; सदाचरणी. [सं.]

**धर्मसभा** स्त्री. १. न्यायकचेरी; न्यायमंदिर. २. धार्मिक गोष्टींचा निर्णय करणारी मंडळी; पंचायत. [सं.]

**धर्मसमीक्षक, धर्मजिज्ञासू** पु. (ख्रि.) धर्मासंबंधी विचार करणारा; शोध करणारा; पृच्छक; (इं.) इन्क्वायरर. [सं.]

**धर्मसंतती-संतान** स्त्री. न. १. कन्यारूप अपत्य. (कारण कन्या कुटुंबाबाहेर जाते) २. दत्तक मुलगा. [सं.]

**धर्मसंस्थान** न. १. पुण्यक्षेत्र; धर्माचे, सदाचरणाचे स्थान. २. पूजा, अर्चा वगैरे करण्यासाठी ब्राह्मणाला दिलेले गाव; अग्रहार. ३. (व्यापक)

धर्मार्थ, परोपकारी संस्था, सभा.

**धर्मसासन** न. धर्मकृत्याचे दानपत्र.

**धर्मसिद्धांत-स्वीकार** पु. (ख्रि.) उपासनेच्या वेळी आपल्या धर्मश्रद्धेचे आविष्करण करण्यासाठी विवक्षित सिद्धांतसंग्रह म्हणून दाखविणे; (इं.) कन्फेशन ऑफ फेथ. [सं.]

**धर्मसेतू** पु. धर्ममर्यादा.

**धर्मज्ञ** वि. १. धर्मशास्त्र, विधिनियम उत्तम प्रकारे जाणणारा. २. कर्तव्यपर (माणूस).

**धर्माचा** वि. १. धर्मासंबंधी (पैसा, अन्न इ.). २. मानलेला; उसना; खरा औरस नव्हे असा (पुत्र, पिता, बहीण इ.). ३. फुकट; मोफत.

**धर्माचा काटा** सोने इ. मौल्यवान वस्तूंचे खरे वजन करून देण्यासाठी विशिष्ट ठिकाणी ठेवलेला काटा. येथे वजन करवून घेणाऱ्यांकडून मिळालेला पैसा धर्मादाय करतात.

**धर्माचा पाहरा** सकाळचा प्रहर (सूर्योदयापूर्वी दीड तास व नंतर दीड तास).

**धर्माची गाय** १. फुकट मिळालेली गोष्ट, वस्तू. २. कन्या; मुलगी (कारण ही दुसऱ्याला द्यायची असते).

वि. गरीब, निरुपद्रवी मनुष्य.

**धर्मात्मा** पु. मूर्तिमंत धर्म; धर्मशील; ज्याने अनेक धर्मकृत्ये केली आहेत असा मनुष्य. [सं.]

**धर्मादाय-व** पु. १. धर्मार्थ केलेले दान, देणगी; भिक्षा. २. सरकारकडून धर्मकृत्यांसाठी प्रतिवर्षी काढून ठेवलेली रक्कम; या कामी ठरावीक धान्य देण्यासाठी दर गावाला काढलेला हुकूम.

वि. क्रिवि. मोफत; फुकट; धर्मार्थ.

**धर्माधर्मी** क्रिवि. धार्मिक व उदार लोकांच्या मदतीने; अनेकांनी धर्मार्थ हात लावल्याने; फुकट; स्वत: पैसे खर्च करावे न लागता. [सं. धर्म द्वि.]

**धर्माधिकरण** न.पु.१. धर्माचारांचे नियंत्रण. २. शास्त्रविधींची पाळणूक होते की नाही ते पाहण्यासाठी, नीतिनियमांवर लक्ष ठेवण्यासाठी खाते, सभा. ३. धर्मशास्त्राची अंमलबजावणी. ४. सरकारी न्यायसभा; न्यायमंदिर.

**धर्माधिकारी** पु. १. धर्मासंबंधी गोष्टी पाहणारा वरिष्ठ अधिकारी; धर्माधिकरणाचा अधिकारी. २. न्यायाधीश.

**धर्माध्यक्ष** पु. सरन्यायाधीश; धर्मगुरू; राजा.

**धर्मार्थ** क्रिवि. १. परोपकारबुद्धीने; दान, देणगी म्हणून. २. मोफत.

**धर्मास-ला** उद्गा. कृपा करून; मेहेरबानीने याअर्थी. उदा. 'मी काम करतो, तू धर्मास नीज.'

**धर्मित्व** वि. गुणित्व; गुण, धर्म, स्वभाव इ. ने युक्त असणे: 'जे धर्मधर्मित्व कहीं ज्ञानाज्ञाना असे।' - अमृ ७.२८३.

**धर्मी** वि. १. धर्माने वागणारा; सदाचरणी; न्यायी. २. ते ते गुणधर्म अंगी असणारा (विषय, पदार्थ). उदा. अम्लधर्मी. ३. दाता; उदार. [सं.]

**धर्मोडा** पु. स्त्रियांचे एक व्रत; चैत्र महिन्यात ब्राह्मणाच्या घरी धर्मार्थ रोज नियमाने एक घागरभर पाणी देणे.

**धर्मोपदेशक** पु. गुरू; धर्माचा उपदेश करणारा.

**धर्म्य** वि. १. धर्मयुक्त; धर्माने मिळवलेले, प्राप्त केलेले; धर्मदृष्ट्या योग्य. २. वंद्य: 'जें पांता जालीं धर्म्यें। वित्त रागांसि।' -ऋ २०. [सं.]

**धर्वट** वि. धुतलेले.

**धर्षण** न. १. दांडगाई; धिटाई; अरेरावी. २. बलात्कार; बळजबरीने उपभोग. [सं.धृष्]

**धर्षणे** उक्रि. १.धाडस, धिटाई करणे. २. जबरी संभोग, बलात्कार करणे.

**धव, धवाड** न. बीळ; भगदाड : 'मुष्यक करितीं धवें।' - भाए ४९१. [सं. ध्मा]

**धव** पु. पती; नवरा; भर्ता. (समासात) उदा. माधव, सीताधव. [सं.]

**धवक** वि. अति आंबट. (गो.)

**धवकडी** स्त्री. १. धाक; रागाचा आविर्भाव. २. धक्का; रट्टा; धसाडा. (व.)

**धवट** न. प्रेतावर, मढ्यावर घालण्याचे पांढरे वस्त्र. (गो.) [सं. धवल]

**धवड, धावड** पु. १. घिसाडी; लोहार; लोखंड शुद्ध करण्याचा धंदा करणारी एक जात. २. (ल.) आडदांड मनुष्य, पशू : 'तो धवडूं असें आवेशला। तेयांवरी तुम्ही राजे चाला।' - शिव ४८९. ३. मोठा दगड. (कु.) [सं. धू, ध्मा]

**धवडी** वि. बेडौल; बेढब.

**धवडी काम** १. लोहारकाम; घिसाड्याचे काम. २. कलाकुसर न लागणारे, घणठोकीचे काम.

**धवताल-ल्या** वि. खर्चीक; उधळ्या; अव्यवस्थित. पहा: **धोताल**

**धवधनी** क्रिवि. अधिक जोमाने : 'अनंगु धवधनीं। सिंपनें खेळतुसें।' - शिव ६८१.

**धवधवीत** क्रिवि. पिवळा, गोरा व पांढरा या रंगांचे आधिक्य दाखवणारा शब्द.

**धवधोरणी** वि. युक्तिमान; कावेबाज.

**धवराळ** स्त्री. चिता; मोठी आग; डोंबाळा : 'धवराळ जळूं लागली।' - ऐपो १४८.

**धवल-ळ, धवा** वि. पांढरा; शुभ्र; ढवळा. [सं.]

**धवला-ळा** पु. १. पहा : **ध(ढ) वळा**. २. गप्पागोष्टी; चकाट्या. (गो.) [सं.धवल]

**धवलागिरी** पु. खड्ग; तलवारीचा एक प्रकार. - प्रश १५. [सं.]

**धवला(ळा)र** न. १. चुनेगची घर; हवेली; मोठा वाडा; प्रासाद : 'तरी लोकांची धवळारें। देखोनियां मनोहरें।' - ज्ञा ३.२२३.

वि. शुभ्रवर्ण; पांढरी शुभ्र : 'ऐसीं नगरमंडीतें देऊळें। देखे गोक्षीर धाम धवळारें। -' ऋ १७. [सं. धवलागर]

**धवलारा** स्त्री. लग्नसमारंभांत गाणे म्हणणारी स्त्री. - बदलापूर ३५. (आगरी)

**धवशा-सा, धशा** स्त्री. पु. १. कीर्ती; पहा: **धोशा** : 'धंवशा वाजे त्याचा.' - ऐपो १२७. २. लावणीचा एक प्रकार. [सं. धवल + सा. प्रत्यय]

**धवसर** वि. पांढरट. (गो.)

**धवसाण** वि. पांढरट; पांढरा शुभ्र.

**धवळ** वि. पातळ. (गो.)

**धवळणे** उक्रि. १. पांढरा, स्वच्छ करणे. २. प्रकाशित करणे : 'तो कवि ह्या काव्याचा जीं हीं त्रैलोक्य धवळिलें सारें।' - कमं १.५.

**ध(ढ)वळा** पु. गाण्याचा प्रकार; लग्नामध्ये म्हणण्याची ओवी. [सं. धवल]
**धवाफ(फू)ल** वि. पांढरे स्वच्छ (बर्फासारखे). (कु.)
**धवाळी** पहा : **टवाळी** : 'करितां धवाळी जन्म गेला।' – व्यनि ३८.
**धवेटी** वि. पांढरी स्वच्छ वस्त्रे वापरणारा. [सं. धवा]
**धशा–श्शा** वि. १. दांडगा; आडदांड; रानवट (मजूर, नोकर इ.). २. धसमुसळेपणाने, आडदांडपणे काम करणारा; अकुशल. ३. उतावीळ.
**धशाख(फ)शा, धसाफसा–सी** क्रिवि. निष्काळजीपणाने आणि दांडगाईने; उद्दामपणे (काम करणे, बोलणे, लिहिणे इ.). [ध्व.]
**धश्चोट** वि. वाटेल तेथे खाणारापिणारा; वाटेल तसे वागणारा; अव्यवस्थित; आडमुठ्या; आडदांड ; रानवट; बेशिस्त.
**धष्टपुष्ट** वि. खायला-प्यायला भरपूर मिळाल्याने लठ्ठ झालेला; गुबगुबीत; निकोप; सशक्त; धट्टाकट्टा (माणूस, जनावर).
**धस** पु. १. खुंटी; टोक; अग्र; खिळा; कुसळ; पुढे आलेला, अणकुचीदार पदार्थ (ज्यामध्ये अडकून कपडा फाटेल असा). २. उद्धट, अविचारी, आडदांड माणूस : 'जया न कळे उपदेश। धस ऐसें त्या नांव।' – तुगा २९१३. ३. दरड; कपारी; उभा उतार (नदीतीर, डोंगराची बाजू इ. प्रमाणे) : 'दोन्ही बाजूचा कडा उंच असून त्याचे धस अगदीं उभे तुटलेले.' – विवि ८.१.१९.४. ज्वारीचे टाट, खुंट, अवशिष्ट मुळखंड; थोठ; फण :'नसे पल्लव लंबित धस उभा परि कोण छ्याया।' – दावि १८६. ५. पहा : **धस्स**; धक्का. (क्रि. होणे). ६. बीळ; भोक. (व.)७. अपकार; छळ.
स्त्री. जोराची मुसंडी; हल्ला; चाल. (क्रि. मारणे). [ध्व.] (वा.) **धशी, धसास, धसावर घालणे, लावणे, देणे** – १. साहसी, कठोर उपाय योजून एखादे काम बिघडविणे; युक्ती न लढविणे. २. अपकार करणे; छळणे. **धसास लावणे** – शेवट करणे; कड पाहणे; तडीस नेणे.
**धस** वि. मंदबुद्धीचा.
**धसकट** न. १. लहान धस; कुसळ : 'रुतले अंगांगीं काटे धसकट।' – विवि ८.९.२२०. २. ज्वारीचे टाट, खुंट.
वि. १. जाडेभरडे; भसाड. २. अडाणी; आडदांड. (ना.)[क. दस्कु]
**धसकटराव, धसकधट्या, धसकनंदन, धसकट्या, धसक्या** पु. १. दांडगाईने काम करणारा माणूस; आडदांड; आदळआपट करणारा मनुष्य. २. अकुशल कामगार; हेंगाडा, अडाणी कारागीर.
**धसकणे** सक्रि. १. हिसकणे; जोराने ओढणे; (काट्याकुट्यांवरून वस्त्र इ.) हासडणे. २. जोराने घालणे; खुपसणे; भोसकणे; आडदांडपणे शिरकवणे.
अक्रि. १. अडकणे व फाटणे; आवाज होऊन फाटणे. २. काडदिशी मोडणे (काटकी, फांदी). ३. दगड इ. उलथून पडणे. [हिं. धसकना]
**धसकफसक** स्त्री. बेदरकार, बेफाम वर्तणूक.
क्रिवि. घाईघाईने; निष्काळजीपणाने; उद्धटपणाने (बोलणे, लिहिणे, वाचणे इ.). [धसक द्वि.]
**धसका** पु. १. आकस्मिक भीती, दुःख इ.ने मनाला बसलेला धक्का, चरका. २. तलवारीचा फटकारा; काठीचा तडाखा; हाताचा रट्टा; धबका. ३. हिसका; हिसडा.
**धसकावणी** स्त्री. तासणी; तोडणी; छाटणी.
**धसकाव(वि)णे** उक्रि. १. जोराने, रागाने खच्ची करणे; तोडणे; ओढणे; सपासप छाटणे. २. अडथळ्यांना न जुमानता हिसडे देऊन ओढणे; फरपटणे. (वा.) **धसकावून बोलणे** – भीडभाड न ठेवता स्पष्ट, निर्भीडपणाने बोलणे.
**धसडवसड** क्रिवि. १. हिडिसफिडीस. २. अव्यवस्थित. (झाडी)
**धसणे** अक्रि. १. जोराने शिरणे; घुसणे; एकदम बसणे; भोक पाडणे: 'शपथ पुरःसर दीपज्वलनज्वालांत जाहली धसती।' – मोमंत्रयुद्ध ७४०. २. पहा : **धजणे**. ३. धसाला लावणे. ४. (अभ्यास, काम यांकडे) अतिशय मन, लक्ष लावणे.
उक्रि. जोराने (आत, पुढे, कडे) ठोकणे, घालणे, ठासणे, सारणे, शिरकवणे. [सं.धस्; हिं. धसना; गु. धसको]
**धसदार, धसाव, धसावणे** पहा : **धजदार, धजाव** इ.
**धसधस** स्त्री. १. धडधड (जिवाची, उराची). २. (ल.) भीती; धास्ती. [ध्व. धस द्वि.]
**धसधस–सा** क्रिवि. १. धडधड उडून; जोरजोराने (उडणे) : 'गांवढेकरी उंदराचा ऊर धाकानें धसधसां उडू लागला'. – छत्रे (इसापनीति). २. कडाडदिशी मोडून, फाटून, तुटून, कोसळून, पडून, फुटून इ.
**धसधसणे** पहा : **धडधडणे १**
**धसमगज** पु. पीठ, मसाला इ. घालून लाडू वळण्यासाठी केलेले सारण.
**धसमस** स्त्री. धामधूम. (को.)
**धसमुसळा–ळ्या, धसकमुसळा, धस्समसूळ** वि. १. गलेलठ्ठ; ढोण्या; ठोंब्या. २. दांडगाईने, निष्काळजीपणाने काम करणारा; आडदांड; धसक्या.
**धसरड** स्त्री. नदीकाठची, टेकडीवरची उभी उतरण; दरड. (को.)
**धसाडा** वि. १.जाड; खरबरीत (सूत, गवत, कोणताही पदार्थ). (व.) २. दांडगा; धसमुसळ्या.
पु. १. (ल.) चापटी; धपाटा; रपाटा. २. रागाने बोलणे; धमकावणे.(ना.) ३. बाटूक, खुंट; धस; चोय. ४. हिसका; धका.
**धसाधशी** स्त्री. कापाकापी; तुकडे तुकडे करणे; छाटाछाट; एकदम, जोरजोराने कापणे, तोडणे. [ध्व.]
**धसाधस–सा** क्रिवि. १. खसाखस, सपासप, फटाफट, तडातड (तोडणे, फाडणे, मोडणे इ.) : 'परि तोडिलेचि वदनीं तृण धरितेही अगा धसाधस ते।' – मोऐषिक १.४. २. धडधड होऊन (जीव, काळीज, उडणे). ३. ओक्साबोक्शी (रडणे). ४. चटकन (निसरणे). [ध्व. धसधसचा अतिशय]
**धसापिटी** स्त्री. रेटारेटी व मारपीट.
**धसाफशी** स्त्री. १. हिसकाहिसकी; निष्काळजीपणाचे काम; ओढाताण; आदळआपट. २. पहाः **धुसफूस**. ३. पहा : **धसाधशी** [ध्व. धस द्वि.]
**धसाल–ली–ल्या** वि. पहाः **धसकटराव**
**धसासा** पु. धसधस; छातीचा ठोका: 'पडति बहुत तेव्हां रुक्मियाचे

धसासे।' – सारुह ७.४. [धस द्वि.]

**धसाळ** वि. १. विसराळू: 'परि बोलत बोलत प्रेमभावें। धसाळ गेलों।' – ज्ञा ११.६६१. २. दांडगा; धसकधट्या. ३. अविचारी; वेडा: 'केवी धसाळ म्हणो देवा तूंत। तरी अधिक हा बोलू।' – ज्ञा १०.३२०. ४. प्रचंड; मोठा: 'नामें एवढें धसाळ देणें।' – एभा ६.६.५. अरसिक. ६. उदार.

**धसी** वि. उतावीळ. पहा : **धशा**

**धस्स** न. भीती, दुःख यांचा हृदयाला, मनाला बसलेला धक्का; आघात, धडकी. पहा : **धक्का** [सं. धस्]

**धंगडे** पु. अव. फाजीलपणाचे, व्रात्यपणाचे चाळे; ढंग; ढंगड्या. [ढंग]

**धंगधोत्र, धंगधोत्रेकरी** पहा : **ढंगधत्तुरा**

**धंगुचे** अक्रि. खंगणे; कृश होणे. (गो.)

**धंडील** वि. शेवटचा; ज्याची खेळी शेवटी आहे असा.

**धंतरमंतर, धंदराधंदर** स्त्री. न. मंत्रतंत्र; जादूटोणा; टाणाटोणा; छांछू; फसवेगिरी.

**धंत्र, धंत्रम** न. (दुसऱ्याचे) धोरण; अधीनता. (व.) पहा : **तंत्र** ६ [सं. तंत्र]

**धंदधद** पु. ढंग; सोंग; रंग.

**धंदर** स्त्री. आशा.

**धंदरणे** सक्रि. भोंदणे; थापा मारणे; पोकळ आश्वासने देऊन फसविणे.

**धंदरा–ऱ्या** वि. धांदल्या; गडबड्या; गोंधळ्या; भ्रांतिष्ट.

**धंदा** पु. १. उद्योग; काम. २. पोटाचा उद्योग; रोजगार; वृत्ती; चरितार्थाचा व्यवसाय. ३. देहविक्रय; वेश्याव्यवसाय. [वैसं. धियंधा; हिं. पं. धंधा]

**धंदेवाईक** वि. १. उद्योग, रोजगार करणारा. २. धंद्यात पडलेला.

**धंदेशिक्षण** न. निरनिराळे उद्योगधंदे, हस्तव्यवसाय इ.संबंधीचे शिक्षण; औद्योगिक शिक्षण.

**धंपाधुळी** स्त्री. नासाडी; ध्वंस. (तंजा.)

**धा** अ. संख्यावाचक विशेषणाला वेळ, प्रकार, प्रसंग अशा अर्थी लावतात. उदा. द्विधा, बहुधा इ. [सं.]

**धाइणे** अक्रि. तृप्त, संतुष्ट होणे : 'अगा देवढी वाढी लाहिजे। तेथ मोल देतां न धाईजे।' – ज्ञा १८.५९९. [सं. धै–ध्रात]

**धाइणे** अक्रि. राहणे; धरणे; ठरणे : 'काय परीक्षा बघूं असली ज्वानी नवी तरणी। इथे प्राण धाइना...।' – प्रला १००. [सं. धा]

**धाइ(य)रीक** स्त्री. नाते : 'धाइरीक सोइरीक तेही नाठवे.' – लीचउ ३७८.

**धाऊ** न. गलबताचा एक प्रकार.

**धाऊ** पु. स्त्री. एक प्रकारचा तांबडा दगड; गेरू. पहा : **धाव** [सं. धातु]

**धाऊ** पु. तास पक्षी. (को.)

**धाए** स्त्री. दाई; धात्री : 'प्रकृती धाएं सूदली।' – शिव ९१. [सं. धात्री]

**धाक** पु. भय; धास्ती; दहशत; जरब; वचक; दरारा. [हिं.; सं. ध्रा (द्रा) घृ] (वा.) ० **ना धोका** – काही भीती, आदर, धास्ती मुळीच न वाटणे; पूर्ण बेडर वृत्ती. **धाकाची का फुकाची** – घाबरून; नाइलाजाने.

**धाकट** वि. अतिदीर्घ; धिप्पाड. [सं. द्राघिष्ट]

**धाक(कु)टपण–णा** न. पु. १. लहानपणा. २. हलकेपणा; अपमान.

**धाकटा–ला** वि. (वयाने, अधिकाराने, योग्यतेने) लहान, कमी. [सं. ध्राक]

**धाकटा** (याचा मधवा, अधवा या शब्दांबरोबर उपयोग करताना) शेवटचा; सर्वांत लहान; कमी प्रतीचा.

**धाकटा कुंवर** (शेतकरी) पुष्य हे आठवे नक्षत्र.

**धाकटा नारायण** तांब्याचे नाणे.

**धाकटा मालेबंद** एक प्रकारचे झाड. याची उंची एक वीतीपासून एक हातापर्यंत असून पान एक बोट रुंद व तीन चार बोटे लांब असते.

**धाकटे** न. मूल. (कु., राजा.)

**धाकटे सरकार** १. धन्याचा मुलगा, वारस. २. युवराज; राजाचा थोरला मुलगा.

**धाकड** वि. १. खरबरीत, जाड, मजबूत (कापड). २. आडदांड; ठोकळा; जाडजूड; बळकट; धीट : 'भारौनि बनकरूं धाकड। आणिलें पार्जातकाचें झाड।' – शिव ४५१. ३. धैर्यवान; धीट: 'महाप्रळयो जेथें। धाकडांसी।' – ज्ञा १.१३१. [सं. द्राघिष्ट]

**धाकडधुकड** क्रिवि. धडधडत; उडत (छाती); बागबूक.

**धाकणे** अक्रि. १. घाबरणे; गांगरणे; वचकणे; गडबडणे; भयचकित होणे: 'कीचक बळाच्या सामर्थ्यें। राजे धाकती सभोंवतें।' – मुविराट ४.१०. २. दिपणे; दबणे: 'सवाई तेजा पुढें धाकलें।' – ऐपो २५०. ३. हेवा करणे. (व.)

**धाकधूक–धुकी, धागधुगी–ग** स्त्री. १. पहा : **धुगधुगी**. २. छाती धडधडणे, उडणे. ३. भीती; काळजी.

**धाका–की–कू** वि. लडिवाळपणाचे नाव. (कुण.) [सं. धाक]

**धाकिनणे** अक्रि. पहा: **धाकणे** : 'मी धाकिनलां मनामाजी।' – भाए ६२.

**धाकी** स्त्री. १. भीती. २. दडपण. (झाडी)

**धाकुटा–ला** वि. १. पहा: **धाकटा–ला.** २. सेवक; दास–दासी; नोकर–चाकर : 'तंवं तो लक्ष्मीकांतु। धाकुटियासी बोल करितु।' – शिव १७६. ३. दणकट; अक्राळविक्राळ. ४. नंतरचा. – एभाको.

**धाकू** स्त्री. द्राक्षविशेष. (गो.)

**धाकूट** पहा : **धाकुटा–ला** : 'तिथें चिरोटे धाकूट।' – मसाप २.२३.

**धाकूडपणी, धाकटेलपणी** वि. (पहिली बायको जिवंत असलेल्या) बिजवराशी केलेला (विवाह).

**धाकेजना** अक्रि. भयग्रस्त होणे. (झाडी)

**धाकॉ** पु. दहिल्या; दहा या अंकाचा पत्ता. (गो.)

**धागा** पु. १. दोरा; सूत; दोरी; सूत्र. २. नाते; संबंध; सोयरीक; धागादोरा. ३. हरवलेल्या वस्तूचा तपास लावण्याचे साधन; माग; खाणाखुणा. [हिं.] (वा.) ० **भरणे** –फाटका कपडा शिवणे. **धाग्यावरून ताग्याची परीक्षा करणे** – अल्पशा नमुन्यावरून, संबंधावरून पूर्ण वस्तू, गोष्ट ओळखणे, तपासणे. **कच्च्या धाग्याची रयत** – अतिशय आज्ञाधारक व गरीब रयत. **कच्च्या धाग्यात असणे, वागणे**– दास होणे; अतिशय गरीब, आज्ञाधारक असणे. **कच्च्या धाग्याने बांधणे** – अगदी आज्ञेत, कह्यात ठेवणे.

**धागादोरा** पु. १. संबंध (नात्याचा, स्नेहाचा, सारखेपणाचा).

२. पत्ता; ठावठिकाणा. (क्रि.लागणे).
**धाट** न. अगदी अडाणी, रानवट लोकांचा गाव; रानटी गाव. (कु.)
**धाट–टी** स्त्री. हल्ला; धाड : 'बळेंचि निघात करी परघात कुटीळ चि धाट जनावरि घाले।' – दावि ४३२. [सं. धाटी]
**धाटण–णी, धाटी** स्त्री. तऱ्हा; पद्धत; रीत; चाल; धर्ती.[सं. धाटी; क. धाटि]
**धाटा** पु. १. वीतभर रुंदीचा, चार–पाच हात लांबीचा पट्टा (डोके, कान बांधण्यासाठी, टोपी–पागोटे यांवरून लपेटण्यासाठी वापरतात.); पंचा. २. प्रसूतीनंतर कंबर, पोट बांधण्यासाठी बायका वापरतात तो पट्टा.
**धाटा** वि. १. धट्टाकट्टा; मजबूत : 'मी धाटा मोठा विचक्षण।' – एभा २३.७६०. २. खंदा; प्रवीण : 'जरी पोंहणार मोठा धाटा।' – यथादी १८.२२६४. [सं. धृष्ट]
**धाटा** पु. कडब्याचे ताट. – शे शेतकरी ३.३.
**धाटामोटा** वि. १. पहा : **धाटा** १ : 'परघातकी धाटामोटा। वाटा पाडी।' –दास १९.३.९. २. आजारातून उठून पूर्वीप्रमाणे सशक्त झालेला. ३. ओबडधोबड; खरखरीत (वस्त्र, अन्न इ.).
**धाटी** स्त्री. पट्टा. (व.) पहा : **धाटा** १
**धाटी** स्त्री. १. पहा : **धाटण–णी**. २. एक चाल; छंद; वृत्त : 'कवि कवित्वाचा प्रबंध। कवि नाना धाटी मुद्रा छंद।' – दास १.७.१७. ३. फास; पाश : 'मग संयमाची धाटी। सूनि मुरडिलीं उपराटीं।' – ज्ञा १२.४७. [सं.]
**धाटी** वि. धीट; उद्धट; धट : 'कांइसे धाटे राऊळ काढिलें। कांहीं जाणसि ना।' – शिव १८०.
**धाटे** वि. धट्टेकट्टे.
**धाड** स्त्री. १. चाल; हल्ला; परचक्र; दरोडा; घाला; एकदम येणारा, पसरणारा, नाश करणारा हल्ला, संकट. २. परके लोक, पाहुणे, मुले, भिकारी इ.चे टोळके, जमाव यांचे एकदम येणे. ३. रोग; आपत्ती; विकार. (क्रि. होणे, भरणे, पडणे.). ४. त्रासदायक, हट्टी मुलगा. ५. कर चुकवल्याचा, बेहिशेबी संपत्ती साठवल्याचा संशय असणाऱ्या लोकांच्या घरी, कार्यालयात आयकर विभागाच्या लोकांनी झडती घेण्याच्या हेतूने अचानक येणे. ६. अतिरेक्यांचा शोध घेण्यासाठी, फरारी गुन्हेगारांना पकडण्यासाठी किंवा बेकायदेशीर व्यवसाय करणाऱ्यांवर पोलिसांनी घातलेले छापे.७. नाश.८.वाघाची वाट, माग. (गो.)[सं. ध्वंस, धाटी] (वा.) ० **पडणे, भरणे** – संकटात असणे; आपत्ती ओढवणे.
**धाड** स्त्री. मागावरील हत्यार (ज्यात फणी बसविलेली असते ती चौकट); वह्या अडकवण्याचे साधन.
**धाडकन–कर–दिशी** क्रिवि. धाड असा आवाज करून (क्रि.पडणे, आदळणे, उडणे, वाजणे). [ध्व.]
**धाडघोडा** पु. १. सुंदर व मोठा पाणीदार घोडा. (गरिबाला हा बक्षीस दिला असता त्याच्यावर एक धाडच पडल्यासारखे होते यावरून.) २. आडदांड व लठ्ठंभारती पोरगा; ढमाली, रानवट स्त्री.
**धाडणे** उक्रि. १. पाठविणे; पाठवून देणे; रवाना करणे (माणूस,पत्र, निरोप इ.). २. गमावणे; घालवणे : 'पूर्वजांचें जोडलें। आपणचि होय धाडिलें।' – ज्ञा २.१९७. ३. वजा करणे : 'कां धाडलिया एका एकु। वाढे तो शून्य विशेखु।' – ज्ञा १८.१२१२. [सं. ध्राड्]
**धाडधडसपणा** पु. धाडस; हिंमत; साहस : 'हीं कर्मे धाडधडसपणाची आहेत.' – पेद १६.
**धाडधाड** क्रिवि. १. घण मारण्याच्या आवाजासारखा; विहिरी, घरे, इमारती कोसळून पडताना होणाऱ्या आवाजासारखा. २. सपाट्याने; पटापट. ३. जोराने (ऊर, काळीज धडधडणे). [ध्व. धाड द्वि.]
**धाडवा** पु. धडाका; घाई; सतत त्रास. (ना.)
**धाडस** न. जोखमीचे काम अंगावर घेण्याची आवड, वृत्ती; धारिष्ट; हिय्या. [सं. धृष्; पं. ढांडस]
**धाडसी–शी** वि. जोखमीचे काम अंगावर घेणारा; धीट; हिंमतवान; साहसी.
**धाडा** पु. १. धाड. २. धाडस; शौर्य.
**धाडा** पु. १. स्त्रियांचा एक सण. २. फाटा; गुंगारा. (क्रि. देणे). (गो.)
**धाडी** स्त्री. पहा : **धाड** १ : 'हे प्रपंचाची धाडी। अभंग हे।' – ज्ञा १३.९९२. [सं. धाटी]
**धाडी** स्त्री. संकट; हल्ला.
**धाडी** स्त्री. घसा; घाटी. (व.)
**धाडी** स्त्री. बांबूच्या कामट्यांचे गवत भरून केलेले झडप; तट्टी; छपरी. (मावळी)
**धाडी** पु. १. शिक्षकाजवळ गायन न शिकलेला गवई. पहा: **अताई**. २. मुसलमानांचा एक वर्ग किंवा त्यातील एक इसम. हे लोक राजे, सरदार इ. लोकांच्या नोकरीत असून स्वारी बाहेर निघाली असता यजमानाच्या स्तुतीची गाणी म्हणत पुढे चालत. (सामा.) भाट, गवई, गवयांचा ताफा : 'नृत्यांगना त्या नाचती। धाडी नटवे गायन करिती।' – जै ८४.८.३. घोड्यावर बसून वाद्ये वाजविणारा.(तंजा.)
**धा(ध्वा)डी** स्त्री. आपल्या किंवा नवऱ्याच्या भावाची मुलगी; पुतणी : 'धाड्या भाच्या आणिल्या सर्व साल्या।' – सारुह ६.१५.
**धाडीधडक, धाडेती** पु. हल्ला करणारा; दरोडेखोर : 'धाडेती लोकही तिने लावून दिलेल्या देणग्यांवर धाड घालीत नसत.' – देवी अहिल्याबाई ३१०.
**धाड्डी** स्त्री. जमिनीला पडलेली भेग.
**धाण** न. १. मोठे जळाऊ लाकूड. २. पहा: **धुवण**
**धाणक** स्त्री. पु. एक डोंबारी जात व त्यातील व्यक्ती : 'इनाम दिले कोल्हाटणी खेळ करणारासी। दोन हजार धाणके गरिबासी।' – गापो २५.
**धाणस** न. फणसाचे गरे वाटून केलेली गूळमिश्रित भाकरी. (गो.)
**धाणी** स्त्री. नाश.
**धाणे** न. वल्हे अडकवण्याची खुंटी. (गो.) [सं. धा–धान]
**धाणे** अक्रि. संतुष्ट, तृप्त होणे; पाहिजे ते मनमुराद मिळाल्यामुळे समाधान होणे: 'ऐसे शेषामृतें धाले। कीं अमर्त्यभावा आले।' – ज्ञा ४.१५३. [सं.ध्रात]
**धाणे** अक्रि. राहणे; धरणे; ठरणे. [सं. धा]
**धाणेरा** पु. दांडोरा; दवंडी : 'आज धाणेरा पिटला की जरिदे स्वारी सांगाते

येणे.' – पेद ३८.५२.

**धात** स्त्री.१. पहा : **धातु** १.२. मूळ; धातू.

**धात** स्त्री. नाचाचा प्रकार : 'कुकुथारी कुकूथारी कु धिलांग उलटी धात।' – दावि ३७.

**धात** स्त्री. १. कल्पित गोष्ट. २. युक्ती; खुबी; बेत : 'प्रवीण सर्वांहुनि हा विधाता। कदापि याच्या न कळेंत धाता।' – सारुह २.३८. ३. गीत. [सं. धा]

**धात, धातळी** स्त्री. वस्त्राची लांबलचक चिंधी. (को.)

**धातकी** पहा: **धायटी**

**धातफळ** न.दृष्टान्त; मासला : 'असो ऐका हो वचन येकादें। धातफळ दाविल्या परीनें।' – दावि २७१. [सं. धा]

**धातमात–न** स्त्री. १. युक्तिप्रयुक्ती; तर्क; अनुमान; अनुभव : 'प्रकृतीची धातमात न चले पैं तेथें.' – दावि १७५. २. मंत्रतंत्र; धंतरमंतर : 'मर्नी कामना चेटकें धातमाता।' – राम १८०. ३. कल्पित व चमत्कारिक गोष्ट : 'प्रसंगीं बोलाव्या अनेक धातमाता।' – दास ४.२.१०. ४. शब्द आणि स्वर यांच्या रचनेचे कौशल्य : 'धातमात करी नटे नाना परी।' – नाम १८३१.

**धातरवास** पु. १. निवाड; तडजोड. (व.) २. मनात नसताना, होत नसतानाही परिस्थितीमुळे एखादी गोष्ट करणे भाग पडणे. (व.)

**धाता** पु. १. ब्रह्मदेव; सृष्टी उत्पन्न करणारा. २. पिता; पालन, पोषण करणारा : 'माता धाता ऋक्षराजाचि त्यातें।' – मुराकिष्किंधा १८. ३. मालक; बाळगणारा (वस्तू इ.चा). ४. साठ संवत्सरांपैकी दहावे संवत्सर. ५. (ज्यो.) ध्रुवमत्स्यांपैकी एक तारा. [सं.]

**धाती** स्त्री. प्रकार; मत.

**धाती** वि. तृप्त झालेली; समाधानी : 'ते गोसावीयांची वास ऐसी धातीया दृष्टी न पाहतीचि।' – लीचपू ४६.

**धातु** पु. स्त्री. १. पुरुषाचे वीर्य; रेत; धात. २. इलेक्ट्रॉन गमावल्यामुळे धन आयन निर्माण करणारे मूलद्रव्य; सोने, चांदी, तांबे, लोखंड इ. जास्त विशिष्ट गुरुत्वयुक्त, अपारदर्शक व एक प्रकारच्या चकाकीने युक्त अशा खनिजपदार्थांपैकी प्रत्येक. ३. पैसा; द्रव्य; धन; नाणे : 'कोणी धातूचा न करिती स्पर्श।' – दावि ४०१. ४. शरीरातील कफ, वात, पित्त या तत्त्वांपैकी प्रत्येक. ५. शरीरातील रक्त, मज्जा, वसा, मांस, अस्थी, मेद, रेत या सात घटकांपैकी प्रत्येक. ६. पृथ्वी, आप, तेज, वायू, आकाश या पंचमहाभूतांपैकी प्रत्येक. ७. पंचमहाभूतांच्या शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध या गुणधर्मांपैकी प्रत्येक. ८. मनशीळ, काव, पारा, गंधक, अभ्रक इ.सारखा पदार्थ. ९. गेरू; काव : 'एकें धातुचिआं उटी घेतें।' – दाव ७७. १०. (तत्त्व.) अहंकार : 'या अहंकारासच तैजस, अभिमान, भूतादि, धातु अशीं दुसरीं नावें आहेत.' – गीर १७२. ११. (संगीत) चिजेचे निरनिराळे भाग, अवयव. १२. कृती; प्रत्यक्ष आचरण. १३. हीन धातूचे सोने करण्याची किमया : 'धातु कैसी कीजे' – लीचउ ३८०.[सं.] (वा.) ० **करणे** – नाणे पाडणे. ० **फुटणे** – वयात येणे.

**धातु** पु. १. क्रियापदाचे मूळ रूप; ज्याला प्रत्यय लावून क्रियापद बनवता येते तो शब्द. २. शब्दाचे मूळ; ज्याचे पुढे पृथक्करण करता येत नाही असा शब्दातील मूळ अवयव . [सं.]

**धातुक** न. ज्या खनिजांपासून एक किंवा अधिक धातू जरूर त्या प्रक्रिया करून फायदेशीर रीतीने मिळवता येतात अशी खनिजे; धातुपाषाण.

**धातुकर्मविद्या** स्त्री. धातूचे शोधन करण्याची विद्या, शास्त्र; (इं.) मेटॅलर्जी.

**धातुकशीर** स्त्री. खाणीत नैसर्गिकपणे आढळणारा पत्र्यासारखा, धातूचा थर.

**धातुकाम** न. धातू ओतून अगर हातोड्याने ठोकून त्याच्या विविध सुंदर वस्तू बनविण्याचे कारागिरीचे काम.

**धातुक्रिया** स्त्री. किमया: 'हातीं चा परीस टाकोनियां। साधूं जावें धातुक्रिया।' – ह २१.२२०.

**धातुखनिज** न. पृथ्वीच्या पोटात सापडणारा धातू.

**धातुनाम** न. क्रियावाचक नाम.

**धातुनिष्कर्षण** न. धातुकापासून शुद्ध धातू मिळवण्यासाठीची प्रक्रिया.

**धातुपाक** पु. शरीरातील धातूंमध्ये (यकृत, फुप्फुसे इ.) तापाने सूज येऊन पू उत्पन्न होणे. [सं.]

**धातुपाठ** पु. (व्या.) धातूंची यादी, कोष्टक. [सं.]

**धातुपात** पु. वीर्यस्खलन; वीर्यपात; रेत गळणे. [सं.]

**धातुपोषण** न. १. (शरीरातील) सप्तधातूंचे पोषण, वर्धन; बलवर्धन. २. (ल.) खुशामत; तोंडपुजेपणा; टाळाटाळ; गोड गोड बोलून खोटा उत्साह उत्पन्न करणे, धीर देणे: 'धातुपोषणार्थ समाधान केले.' – जोरा १७. वि. बलवर्धक; पौष्टिक. [सं.]

**धातुभट्टी** स्त्री. धातूचा रस काढण्याचे चुलाण.

**धातुमळी** स्त्री. धातुकातील सिलिकाचा कॅल्शिअम ऑक्साइडशी संयोग होऊन मिळणारी कॅल्शिअम सिलिकेट.

**धातुमाक्षिक** न. लोखंड व गंधक यांच्या संयोगापासून बनविलेले एक खनिजद्रव्य.

**धातुमेह** पु. १. मूत्रावाटे धातू, वीर्य गळण्याचा रोग. २. वीर्यमिश्रित मूत्र. [सं.]

**धातुयोग** पु. रसायन : 'येक औषधी प्रयोग। येक देती धातुयोग।' – दावि ६४.

**धातुराशी** पु. अस्थी, रक्त इ. सप्तधातूंचा समुदाय; (ल.) देह; शरीर: 'शोषोनि गा धातुराशी। करिती तपें।' – ज्ञा १७.३६४.

**धातुरूप** न. धातूपासून बनलेले क्रियापदाचे रूप. उदा. जातो, गेला. वि. (रसा.) ज्यांना धातूचे स्वरूप आहे (असे मूलद्रव्य) : 'सोयीकरितां एकाकी पदार्थाचे धातुरूप व अधातुरूप असे दोन वर्ग करितात.' – रसापू ६. [सं.]

**धातुलेपक** पु. विजेच्या साहाय्याने धातूचा थर चढवण्याचे साधन.

**धातुवाद, धातुर्वाद** पु. १. किमया; सुवर्णविद्या; सोने करण्याची विद्या : 'नातरी जें धातुवादाही न जोडे। तें लोहींचि पंधरें सांपडे।' –ज्ञा ६.३४. २. अशोधित धातू शुद्ध करणे. ३. रसायनशास्त्र.

**धातुविकार–क्षय** पु. धातुक्षीणतेचा, क्षयरोगाचा एक प्रकार. [सं.]

**धातुविज्ञान, धातुशास्त्र** न. धातुकांपासून धातूचे निष्कर्षण आणि

शुद्धीकरण करण्याची विद्या.

**धातुसाधित** न. धातूवरून साधलेला, बनलेला (शब्द इ.). यात नाम, विशेषण, अव्यय असे भेद आहेत. [सं.]

**धातुसाम्य** न. कफवातादी शरीरातील धातूंची समता, योग्य स्थिती.[सं.]

**धातुस्पर्श** पु.सोने, रुपे इ. धातूंचा स्पर्श. (अकरणरूपी प्रयोग केल्यास) (ल.) अठराविश्वे दारिद्य; दागदागिने मुळीच नसणे.

**धात्री** स्त्री. १. दाई; लहान मुलाला पाजण्यासाठी ठेवलेली बाई. २. जन्मभूमी; पृथ्वी; धरित्री. ३. आवळी; आवळ्याचे झाड. ४. आवळकाठी. [सं.]

**धादडधुदडा** वि. राकट; रांगडी : 'धादडधुदडा गौळिनी.' – शिव ६७५.

**धादडी** अ. जबरीने.

**धादलणे** अक्रि. जळणे : '–धादल धादल म्हणे.' – गोप्र १८१.

**धादा** पु. हल्ला, हरकत, अडथळा (करणारा) : 'त्यास कोणी धादा पाठविला तरी ज्याप्रमाणे दीक्षितांचे वेळी साहित्य लोकांचे होत असे त्याप्रमाणे करीत जाणे.' – मइसा ३.५१९.

**धादांत** पु. प्रत्यक्षप्रमाण; अनुभवसिद्ध, बुद्धिग्राह्य सिद्धांत; स्वानुभव; आत्मप्रतीती; स्वत:चा तर्क ; वैयक्तिक मत : 'जें वेदशास्त्राचें सार। सिद्धांत धादांत विचार।' – दास ५.६.२७.

क्रिवि. धडधडीत; उघडउघड; मूर्तिमंत; प्रत्यक्ष; स्पष्ट. [सं. दो]

**धादांतणे, धादा(धा)वणे** अक्रि. एखाद्या पदार्थाबद्दल उत्सुक, उत्कंठित होणे; हपापणे; खाखावणे; आधासणे : 'काहीं होतीं धादावलीं। तींही मेलीं अजीर्णे।' – दास ३.५.९.

**धादांती** वि. शास्त्राधार न पाहता मनाला पटणाऱ्या तत्त्वानेच वागणारा; प्रत्यक्षवादी; बुद्धिप्रामाण्यवादी: 'धादांत्यालाहि पाझर फुटावे असा हिच्या कवित्वाचा प्रभाव विलक्षण आहे.' – महाराष्ट्र-सारस्वत ६२.

**धादुडा** पु. चिंधी; धांदी : 'धादुडा दुधडा गौळनी। जिअें मानुषें होतीं सिहानीं।' – शिव ६७६.

**धादूस** वि. समाधानी; तृप्त झालेला; धालेला.

**धादोशी** वि. समाधानी; तृप्त. (कु.)

**धादोस** वि. भरपूर; पुष्कळ; मुबलक; अघळपघळ.(गो.)

**धादोसपण** न. समाधान; तृप्ती. (गो.)

**धाधाटा** पु. वाऱ्याचा सोसाटा, धो धो वाहणे.

**धाधावणे** अक्रि. धावपळ करणे; धावत सुटणे : 'उखरडा धाधाविलें ।...दंडनायकापाशीं ।' – शिव ५०४. [सं. धाव]

**धा(धां)धू** क्रिवि. कडाकड, धडाधड असा आवाज करून (वाद्ये वाजणे, तोफा उडणे, वारा वाहणे इ.). पहा : **ठांदू**

स्त्री. १. तोफा, वाद्ये इ.चा कडकडाट. २. जोराचे, कडाक्याचे भांडण; कचाकची; खणाखणी.

**धान** न. १. साळ; भात; कवच असणारा तांदूळ. २. भाताचे रोप. ३. (रोप इ.चा) दांडा, देठ: 'केतकीचें धान आणि उंबराची साल समभाग घेऊन चूर्ण करावें.' – अश्वप २.५०. ४. धणे. [सं.; बं.; गु.]

**धान** न. चांगले वस्त्र : 'नेससू ते नेससू धानऽ नेससू नही ते नागीच बससू.' – खावा ५५.(अहि.)

**धान–नी, धानाधिस्पट** स्त्री. दैना : 'लढाई बुधवारी जाली. खंदाखाली याची फार धाने झाली.' – पेद ३८ पत्र २४.

**धानगवत** न. ज्याला धान्य येते असे गवत. उदा. गहू, ज्वारी इ.चे गवत : 'उदाहरणार्थ रानगवतें व धानगवतें हा धडा पावसाळ्यांतच घ्यावा.' – अध्यापन ७४.

**धानधन्सी** पु. शेतातील पिके. (झाडी)

**धानन(ग)द्दा** पु. धान्य पेरलेला वाफा. (तंजा.)

**धानमटी** स्त्री. धान्याची काडी : 'मुलुखात कही घालून रात्रीची शेते व धानमट्या कापून आणून गांव लुटून आणतात.' – पेद २८, पृ. २८६.

**धाना** पु. दाणा; कण. [सं. धान]

**धाना** स्त्री. अव. लाह्या. [सं.]

**धानायपुनाय** स्त्री. एक प्रकारचे दिव्य : 'एतां आदित्यवारी । कस्तुरीची धानायपुनाय (धानेपुने) करी.' – शिव १९४.

**धानावंत** न. धान्याचे केलेले पक्वान्न : 'षड्सें धानावतें। अपूपें नामें अमितें।' – वेसीस्व १.१११.

**धानाष्टक** न. धणे, वाळलेला किंवा ओला पुदिना व मसाला यांचे एकत्र मिश्रण करून गूळ घालून केलेली चटणी. – गृशि ३१८.

**धानी** स्त्री. लाही. (खा.) [सं. धाना]

**धानी** स्त्री. शहर; नगर : 'रावो जैसा स्वप्नीं। रंकपणें निघे धानी।' –ज्ञा १४.१५४. [सं.]

**धानी** स्त्री. १. गोणी. (अहि.) २. चहा, खाण्याचे पदार्थ घेऊन जाण्याचे उथळ पात्र; (इं.) ट्रे.

**धानी** न. स्त्री. १. लोखंडी सळई. (को., कु.) २.फुंकणी.

**धानी** पु. हिरवा रंग.

**धानी** पु. (संगीत) एक राग. गानसमय दिवसाचा तिसरा प्रहर. हा सार्वकालिकही समजतात.

**धानी** स्त्री. शोध : 'जेथवर कुळे गेली आहेत तेथवर धानी करून येक दोघे मेळवून लावणी करणे.' – शिचसाखं १ पृ. ५८.

**धानोऱ्या** स्त्री. अव. धान्यविशेष : 'ज्यानि धानोऱ्या आणाव्या। रांडापोरा रे घालाव्या।' – ऐपो ५३.

**धान्न** स्त्री. खांब; धारण. (गो.)

**धान्य** न. १. भात, गहू, बाजरी इ. मनुष्याच्या शरीरपोषणाच्या उपयोगाचा पदार्थ; दाणागोटा. २. नवरात्रात देवीपुढे किंवा चैत्रात गौरीपुढे थोड्याशा मातीत गहू किंवा भात यांची काढतात ती लहान रोपे. ३. दसऱ्याच्या दिवशी पागोट्यात, टोपीत खोवण्यात येणारा गहू इ. रोपांचा तुरा. ४. धणे. [सं.; गु.]

**धान्यदेश** पु. पुष्कळ धान्ये पिकणारा, सुपीक देश. [सं.]

**धान्यपलालन्याय** पु. धान्य म्हटले म्हणजे त्यामध्ये पेंढाही अंतर्भूत होतो. त्याला वेगळे महत्त्व नसते. राजाला जिंकल्यावर प्रजाही स्वाभाविकपणे जिंकल्या गेल्या असे मानले जाते. यावरून एखादी मुख्य गोष्ट साध्य, सिद्ध झाल्यावर तदनुषंगिक बारीकसारीक गोष्टी आपोआपच सिद्ध होतात.

**धान्यपंचक** न. गहू, तांदूळ, सातू, तीळ, मूग ही शंकराला लाखोली

वाहण्याला योग्य अशी धान्ये.

**धान्यपंचकाचा काढा** धने, वाळा, सुंठ, नागरमोथा व दालचिनी यांचा काढा.

**धान्यफराळ** पु. उपवासाच्या दिवशी धान्य भाजून केलेले, कोरडे खाद्य पदार्थ इ.ने केलेला फराळ.

**धान्यभिक्षा** स्त्री. धान्याची मळणी होत असताना भिक्षुक गावोगाव फिरून मिळवितात ती धान्याची भिक्षा; बलुते.

**धान्यवणवा–वी** पु. स्त्री. अकस्मात धान्य जळून खाक होणे.

**धाप–पा** स्त्री. १. दम; जोराचा श्वास. २. दमा; श्वास; दम्याचा रोग. [हिं.पं.धप्पा; सं. ध्मा]

**धाप–क, धापळ** स्त्री. द्विदल धान्याचा अर्धा भाग. (गो.)

**धाप** स्त्री. कटकट; लालसा : 'जिराली मनाची धाप.' – ज्ञा १७.२३०.

**धाप** स्त्री. (विटीदांडूचा खेळ) मर्यादारेषा. (वा.) ० **खाणे** – (विटी, चेंडू, कवडी इ.) मर्यादारेषेच्या, हद्दीच्या पलीकडे जाणे.

**धाप, धापट** स्त्री. सरड्याच्या जातीचा एक प्राणी.

**धापट** स्त्री. (भोवऱ्यांचा खेळ) फिरण्यासाठी टाकलेला भोवरा न फिरता राहण्याची स्थिती.

**धापट** न. कांडलेल्या भातातून निघणारा भुसा, चूर.

**धापट–ड** वि. रखरखीत, नापीक, उरवार (जमीन). (को.)

**धापटणेकरी** पु. अंग रगडणारा.

**धाप(व)टी** स्त्री. (उपवास, आजारीपण इ.मुळे पोटाला लागलेली) खपाटी; दामटी (क्रि. वळणे, होणे). पोटाची धापटी असा प्रयोग.

**धापटी** स्त्री. धपाटा; थापून केलेली भाकरी: 'राळेयाची धापटी'. – लीचउ २८७.

**धापडधुपड** क्रिवि. चुटपुटते; अपुरे; तृप्ती न होईल अशा रीतीने( पोट भरणे, जोगावणे इ.सह व जनावरासंबंधी योजतात).

**धापडवट** स्त्री. केवळ पावसाच्या पाण्यावर पीक देणारी जमीन. (को.)

**धापडा–डे** पु. न. जाड थालीपीठ. (व.)

**धापणे, धापल(स)णे** अक्रि. धापा टाकण्याच्या अवस्थेला येणे; दम लागणे, जोराचा श्वास लागणे; गडबडीने, घाईने जाणे. [हिं. धापना]

**धापणे** अक्रि. तृप्त होणे.

**धापणे** सक्रि. ढापणे; झाकणे. (गो., कु.)

**धापसी** वि. १. असंस्कृत; गावडी : 'जा तुम्ही एकी धापसीयां.' – शिव २११. २. धीट.

**धापा** पु. १. एक प्रकारचे गवत. २. चपट्या जातीचे मोठे कौल; ढापा. (वा.) ० **करणे** – नाश, विध्वंस करणे. (को.)

**धापिसे** वि. १. लोभी : 'कामु रुपे धापिसे.' – गरा ९८. २. गावंढळ : 'ब्रह्मादिका लागले जाणिवेचे पीसे : तेथ इतर ज्ञान धापिसे : के रीगैल:' – मूप्र २६६५.

**धापी** स्त्री. उखळीतील पोहे परतण्याचा चपटा पळा. (गो.)

**धापू–पो** क्रिवि. फुकट; व्यर्थ; निरर्थक. (वा.) ० **होणे** – १. मरणे. २. हरवणे. (कु.)

**धापोडा** पु. १. अंगावर एखाद्या ठिकाणी सुजून वर आलेली जागा. (व.) २. थालीपीठ; धापटी. (व., ना.)

**धाप्या, धाप्याचा कांदा** पहा : **कोचिंदा**

**धाब** न. माडी; धाबे. [हिं. धाबा]

**धाबडणी** स्त्री. मोकळ्या फळांची माळ्यासारखी पाटणी; माळा. (को.)

**धाबडधिंगा** पु. धांगडधिंगा; दंगामस्ती. [ध्व.; गु. धाबडाधंगु]

**धाबडा** वि. १. एकमार्गी; सरळ; साधा. २. साधे; विशेष रंग-रूप-रस नसणारे.

**धाबडी** स्त्री. धाबळ (लोकरीचे नेसावयाचे वस्त्र). (कु.)

**धाबळ–ळी** स्त्री. १. सोवळ्यात नेसण्याचे लोकरीचे जाडेभरडे वस्त्र. २. पांघरण्यासाठीचे लोकरीचे जाड वस्त्र. ३. काथ्याचा हातांनी वळून केलेला पेळू. (को.) ४. पांढरी कांबळी. (तंजा.)[क. दावळि,दप्प]

**धाबळ** स्त्री. कबुतरांना राहण्यासाठी करतात ते घर; खुराडे; ढाबळ.

**धाबाधुबी** स्त्री. एकमेकांना धबाधब चेंडू मारण्याचा मुलांचा एक खेळ.(ना.) पहा : **धबाधबी** [ध्व. धब् द्वि.]

**धाबे** न १. घरावर केवळ मातीचा पेंड घालून करतात ते आच्छादन. २. असे आच्छादन असणारे घर. ३. छाती. – मसाप २.४.३६१. (राजा., कुण.)[सं. स्था; हिं. धाबा] (वा.) ० **दणाणणे** – भीतीने घाबरून जाणे; गर्भगळीत होणे; गाळण उडणे. **धाब्यावर बसविणे** – १. (एखाद्याचे) सर्वस्व हरण करून (त्याला) भिकेला लावणे. २. एखाद्याकडून पैसे इ. घेऊन त्याला न जुमानणे, फसवणे.

**धाबोटा** पु. साखरेचे पोते, गोण; दाभोटा. (को.)

**धाम** स्त्री. १. रोगाची साथ. (गो.) २. (ल.) कोणत्याही गोष्टीचा अनेकांना एकदम लागलेला नाद, व्यसन, इसळी, वेड. ३.हुल्लड; दंगा.

**धाम** न. १. घर; स्थान; ठिकाण. २. (ल.) शरीर; देह. ३. रूप; तेज; प्रकाश; प्रभाव.

पु. बदरीनाथ, जगन्नाथ, द्वारका, रामेश्वर या हिंदूंच्या अत्यंत पवित्र अशा तीर्थस्थानांपैकी प्रत्येक. [सं.]

**धाम** पु. धर्मकृत्य; आन्हिक : 'धामाची वेळ आली.' – श्रीकृच ५१.

**धामक** न. वटवाघूळ. (को.)

**धामट** वि. १. ओंगळ; घाणेरडा. २. पिवळसर. (झाडी)

**धामण–णी** स्त्री. १. माशाची एक जात. २. हा मासा ज्यात राहतो तो शिंपला.

**धामण–णी** पु. स्त्री. एक वृक्षविशेष. लाकूड चिवट, इमारतीस उपयोगी. याच्या सालीच्या तंतूपासून कागद व दोर करतात.

**धामण, धामीण** स्त्री. सर्पाची एक जात. हा सर्प आपली शेपटी गुराच्या नाकात घुसडून ती जोराने बाहेर काढतो असे म्हणतात.[हिं. धामिन]

**धामणणे** अक्रि. धामण सर्पाच्या दृष्टीमुळे (गुरे इ.) पीडित होणे.

**धामण्या** पु. एक सर्पविशेष. हा धामण व नाग यांच्या संयोगापासून उत्पन्न होतो असे म्हणतात.

**धामधूम** स्त्री. १. दंगल; गोंगाट; गडबड; गोंधळ; अपूर्व अशा प्रकाराने उडालेली खळबळ. २. धुमश्चक्री; बंडाळी. [हिं.;सं.ध्मा]

**धामना** वि. थोड्या काळसर रंगाचा. (व.)

**धामना** पु. सभामंडप : 'हेमाडी पंडीती धामना दत्त.' –पांढर शिलालेख

II १.२९.

**धामंगड** पु. (उप.) माध्यंदिन किंवा यजुर्वेदी गृहस्थ. धाम्या.-मोल.

**धामा** पु. पहा : **धाम** २

**धामा** पहा : **धमाटा-टो** १

**धामा-म्या** पु. १. गबाळ्या. (खा.) २. पहा : **धामंगड** [सं. धर्म्य]

**धामी** स्त्री. ओळखण्यासाठी वस्तूवर केलेली खूण : 'राउळांचीयाचि धामीया पडताति : आमचीया न पडेति:' - गोप्र १३.

**धामेपणा** पु. गबाळेपणा; अव्यवस्थित वागणूक.

**धामोडा** पु. पुळी. (ना.)

**धामोडा** पु. पहा : **धावडा** : 'आन धामोडे याची साली ।' - सूत्रपाठविचार.

**धाम्या** वि. चिक्कू; कृपण. (व.)

**धाय, धायमाय-व** स्त्री. १. रडण्याची मोठी आरोळी, टाहो; आकांत; ओक्साबोक्शी रडारड; हंबरडा. (क्रि. मोकलणे, फोडणे, घेणे, घालणे.) २.(ल.) हृदय : 'कवणातें मी मोकलूं धाय ।' - मुवन ७.१२७. ३. धापा : 'रथ टाकुनिया एकीकडे । धाय टाकीत राहिला ।' - मुवन १२.९७. ४. धैर्य; धीर : 'मग धाय टाकुनी रडे माये ।' - ब ५५३. [सं. हृदय]

**धाय-या** स्त्री. दाई; लहान मुलाला दूध पाजण्यासाठी ठेवलेली स्त्री. [सं. धात्री]

**धाय** स्त्री. तृप्ती; संतोष; समाधान.

**धायकंप** पु. संकल्पविकल्प; धरसोड. - मनको.

**धायखंडी** स्त्री. शस्त्रविशेष : 'तलवार मिळौनि नाकवसेंआं नाकवसें । धायखंडी हाणताति सरिसें ।' - शिव १०६३.

**धायजा** एक वाहन : 'बेबी महाराज धायजातून परेड ग्राउंडवर आल्या'. - के ४.७.४१.

**धायटी, धायफूल** स्त्री. न. पुरुष, दोन पुरुष उंच वाढणारे एक झाड. हिर्ची फुलें लवंगांसारखी असून हिरवीं असतात; त्यांचा उपयोग औषधांत व रंगाकडे होतो. - वगु ४.३२. [सं. धातकी]

**धायबंधू-भाऊ** पु.धात्रीपुत्र; दाईचा स्वत:चा मुलगा व दाईचे दूध पिणारा मुलगा यांच्यातील नाते.

**धायरु** न. गुरे व घोडे यांना होणारा एक रोग.

**धाये(य)रा** पु. नातलग : 'सोइरे धायेरे मिष्टान्न इच्छिती ।' - पंचो १३४.१९.

**धार** स्त्री. १. तलवार, कोयता, विळी, चाकू इ. हत्यारांची तीक्ष्ण कड; पात्याचे पाणी; पराक्रम (क्रि. मारणे, करणे.); चौकोनी लाकूड इ.ची सरळ कड. २. पर्वत, डोंगर इ.ची माथ्यावरची अगदी उंच कड, कडा. ३. (ल.) तीक्ष्ण, तल्लख, तापट, कडक स्वभावाचा माणूस. ४. डोंगरांची रांग, ओळ. ५. क्षितिज; क्षितिजाची काळी रेषा; दृष्टिमर्यादा. ६. जबाबदारी; भार; ओझे.[सं. धारा] (वा.) **धारेवर आणणे, धरणे** - कडक शिस्तीने, करडेपणाने वागविणे; सक्त अंमल गाजविणे. **धारेवरचा वाघ** - (अशिष्ट) कोणीही, जवरा या अर्थाने रूढ. **धारेवर येणे** -(एखादे काम इ.) कडक शिस्तीखाली चालू होणे, राहणे. **धारेवर वागणे** - सावधपणाने, दक्षतेने, मागे-पुढे पाहून वागणे; कष्टाचा आणि धोक्याचा मार्ग चोखाळणे.

**धार** स्त्री. १. जोराचा, वेगाचा (नदी इ. चा) प्रवाह. २. पाणी इ. पातळ पदार्थाचा वरून खाली पडणारा दोरीसारखा बारीक प्रवाह. ३. तेल, तूप इ. पातळ पदार्थ बाजारात विक्रीला आल्यावर त्यातील काही भाग हक्क म्हणून घेण्याचा पाटील, कुळकर्णी इ. गावकामगारांचा (पूर्वी असलेला) मान; तेल, दूध वगैरे विकत घेतले असता पूर्ण माप झाल्यावर वर्तावळा म्हणून घ्यावयाचा थोडासा अंश. ४. पहा : **धारचिंबपोल.** ५. तेल, तूप इ. द्रवपदार्थाचा किंचित अंश. ६. (गाय, म्हैस इ. जनावराचे) दूध काढणे. (क्रि. काढणे, पिळणे).७. प्रेताला ते जळत असताना दिलेले पाणी : 'मग उधान पिडु दीधला : धार दीधली.' - गोप्र १३८.[सं. धे,धारा] (वा.) ० **देणे**- उंचावर उभे राहून (धान्य इ. स्वच्छ करण्यासाठी) टोपलीतून एकसारखे धारेने खाली ओतणे, वारवणे. ० **पडणे** - पाहिजे तितके धन, धान्य इ. चा आकाशातून (घरात) वर्षाव होणे, पाऊस पडणे. ० **मारणे** - मूत्रविसर्जन करणे. (अहि.) ० **मारून न पाहणे** - एखाद्याला अगदी कस्पटाप्रमाणे लेखणे; ढुंकूनही न पाहणे. ० **लागणे** - फार वाहू, गळू लागणे; गळती, बुळकी लागणे. **चारही धारा तोंडात पडणे** - अनेक मार्गांनी लाभ होणे; विलासाच्या, उपभोगाच्या सर्व गोष्टी मिळणे.

**धार** स्त्री. सखल शेती. (झाडी)

**धार** स्त्री. १. मुख्य हल्ल्याचे तोंड; आघाडी : 'धारेचे तोंडीं शंभर दीडशे स्वार व बार सातशे राहिला.' - पेद ३७ पृ. १३८. २. वहिवाट; हिस्सा; वाटा : 'तुमचे गावीचे पेठेत हक उत्पन्नाचे धार कोणाचे कसे आहेत तें कळवावें.' - पेकासावआप पृ. ८०. (वा.) ० **घेणे, धरणे** - सामन्याला किंवा मुकाबल्याला उभे राहणे; त्यासाठी समर्थ असणे: 'इराणकरासी (नादिरशहाशी) धार कोणी घेतोसे दिसत नाही.' - ऐलेपाम्युप्र पृ. १९६.

**धारक** न. पेज; धान्याच्या कण्या शिजवलेले पाणी; कांजी.

**धारक** वि. धारण करणारा; धरणारा; बाळगणारा. समासात उत्तरपदी योजतात. उदा. आज्ञाधारक. [सं. धृ]

**धारकडा** पु. डोंगराचा तुटलेला कडा.

**धारकता** स्त्री. एखाद्या पदार्थात विशिष्ट विद्युतदाब असताना त्यात किती विद्युत्प्रभार असतो त्याचे मोजमाप; (इं.) कपॅसिटन्स.

**धारकरी** पु. १. योद्धा; पराक्रमी पुरुष; तरवारबहाद्दर : 'पाटणकर घोरपडे निंबाळकर तलवारीचे धारकरी ।' - ऐपो ४३९.२. समर्थसंप्रदायातील संत. हे प्रवृत्तिमार्गी असत.

**धारकस** पु. धारेला लावून केलेली पारख; (ल.) सक्ती; तगादा. (वा.) **धारकशी धरणे, टाकणे, ढकलणे, देणे, लावणे, सोडणे; धारकी धरणे** - मोठ्या पेचात, संकटात आणणे.

**धारके** न. दोरीचे झिरमोळ्या असलेले विणकाम केलेले बैलाच्या शिंगांभोवती बांधलेले वेष्टण.

**धारकोर** स्त्री. लाकडाची धार व कोर; लाकूडकामाची सफाई.

**धारचिंबपोल, धारचिंपोल** न. धान्य वाऱ्यावर उफणताना धान्याच्या

राशीच्या पलीकडे पडणारा कोंडा, भूस, हलके धान्य; धार.

**धारज(जि)णा** वि. अनुकूल; शुभकारक; उपयुक्त; (सेवा, निगा, त्रास, खर्च इ.चे) फळ देणारा (देव, राजा, मनुष्य, जनावर, धंदा, शेत इ.). [सं. धृ, धृंजान, धार्यजीवन]

**धारजिणे** न. (मनुष्य, राजा, देव इ.ची सेवा केली असता) त्यांनी फलद्रूप होण्याचा दैवयोग; (जनावर, धंदा, शेत इ.साठी त्रास घेतला असता, पैसा खर्च केला असता त्याचे) फळ मिळण्याचा दैवयोग. [सं.धृ]

**धारण** स्त्री. १. (धान्य इ.चा) खरेदी-विक्रीचा चालू दर; बाजारभाव : 'लष्करांत धारण इस्तकबीलपासून सात शेर आठ शेर.' - भाब १४. २. दुष्काळ; महागाई : 'धारणेनें मुलें मेलीं।' - दावि ३७७.[सं. धृ; गु.] (वा.) **पाचावर धारण बसणे** - (भीती इ.मुळे) गर्भगळित होणे; घाबरून जाणे.

**धारण** न. १. धरणे; सांभाळणे; अंगी बाळगणे; धारण करणे. २. घेणे; उचलणे; स्वीकारणे (रीतभात, चाल, मार्ग इ.).[सं.] (वा.) **जमीन धारण करणे** - कायदेशीर रीतीने जमिनीचा ताबा घेणे.

**धारण** स्त्री. समजूत; कल्पना : 'जीवींचिये ऐसी धारण।...जाहलें कारण।' - ज्ञा ६.३३६. [सं. धृ]

**धारण** पु. स्त्री. टेकू; (घराचा वगैरे) आधारस्तंभ; मोठा, मुख्य खांब : 'जेवीं आरें धारण गिळिला।' - एभा २३.२५९. २. (ल.) (राज्याचा, संसाराचा भार ज्याच्यावर असतो तो) कर्ता पुरुष.

**धारणत्याग** पु. मालमत्तेवरील अधिकार सुटणे किंवा सोडणे.

**धारण(णे)पारण-णे** न. एक दिवसाआड भोजन करणे.

**धारणा** स्त्री. १. स्मरणशक्ती; बुद्धी. २. अष्टांगयोगातील आठ अंगांपैकी एक; श्वासनिरोध, चित्तैकाग्रता व सर्व नैसर्गिक वासनांचा निग्रह इ. ३. धीर; धैर्य; मनाचे स्थैर्य : 'यदृच्छा आहारू न मिळे। तरी धारणेसि न टळे।' - एभा ८.३३. ४. ढब; तऱ्हा; विशिष्ट, योग्य पद्धत. ५. सरळ मार्ग अवलंबणे. ६. चिवटपणा. ७. कट्टी करण्याची मापे; बट्टा. ८. निष्ठा; श्रद्धा; आदर. ९. समजूत; कल्पना. [सं. धारणा]

**धारणाअधिकार** पु. (कायदा) अधिकारकाळ.

**धारणाशक्ती** स्त्री. १. अनुभवाचे अगर अध्ययनाचे संस्कार मनामध्ये धरून ठेवण्याची शक्ती. २. सामावून घेण्याची क्षमता.

**धारणाप्रकार** पु. विद्यमान व्यक्तीकडे जमीन येण्याचा (वारसा, खरेदी, दान इ.) प्रकार; भूधारणपद्धती.

**धारणावधी** पु. वस्तू विश्वासाने ठेव म्हणून ठेवल्यापासून ती परत देईपर्यंतचा कालावधी.

**धारणी** स्त्री. आधाराचा लहान खांब; लहान धारण. (को.)

**धारणू** न. वाळवलेले लाकूड.

**धारणे** सक्रि. १. अनुमानणे. २. कर्ज देऊ असणे.[सं. धृ अधि+आ+हृ]

**धारदार** वि. तीक्ष्ण धार असलेले (हत्यार).

**धारन** स्त्री. १. रांग. २. समूह. ३. वळचण. ४. बोळ. (झाडी) [सं. धोरणी; क. धारणी]

**धारबळ** वि. बिनहिशेबी; घोटाळ्याचा.

**धारबंद** पु. (वर्तन, भाषण इ.तील) धरबंद, ताळमेळ, सुसंबद्धता. वि. १. शस्त्राची धार बोथट करण्याचे सामर्थ्य असणारा (मंत्र). २. जेर; त्रस्त; पराभूत : 'अबदूल रहीम खानजादे यांणी सिद्दी याकुबखान यास धारबंद करून आपण तख्तनिसीन जाले.' - पेद ३२.१४७.

**धारबोळ-मेर** पु. स्त्री. (अकरणरूपी प्रयोग) भाषण, वर्तन यांतील सुसंबद्धता, ताळमेळ.

**धारबोळ** क्रिवि. काठोकाठ; तुडुंब; भरपूर (द्रवपदार्थ भरणे).

**धारभर** क्रिवि. थोडेसे, अगदी थोडे (दूध, तूप, तेल इ. द्रवपदार्थ).

**धारया** स्त्री. लोखंडी पाते लावलेली काठी : 'धारया धरोनिया पहिल्यानं पुढे चाले ठाकून हो'. - एहोरा जडाव १५८.

**धारराव** पु. १.तरवारबहाद्दर, शूर योद्धा या अर्थाची पदवी : 'धारराव शिंदे'. - मइसा १९.८१. २. (उप.) पराक्रमाच्या पोकळ बाता मारणारा; बढाईखोर.

**धारवट** न. धोरण.

**धारवणी** न. १. दूध तापवताना त्यात घालतात ते थोडेसे पाणी. २. (पाट, प्रवाह इ.चे) धारेने पडणारे, वाहणारे स्वच्छ पाणी.

**धारवसा** पु. पाण्याचा, नदीचा जोराचा प्रवाह; धारसा.

**धारवा** पु. यंत्राच्या वाटोळ्या फिरणाऱ्या भागाला असणारा आधार.

**धारवाडी काटा** १. कर्नाटकातील धारवाड शहरचा काटा; (ल.) तंतोतंत वजन करणारा काटा. २. (ल.) वागण्याचे, काम करण्याचे चोख, समतोल, निःपक्षपाती धोरण.

**धारस-सा** पु. १. धारवसा : 'लोटला प्रेमाचा धारसा।' - कालिका १७.३८. २. शस्त्र इ.चा वार, घाव : 'पडतां खांडेआंचा धारसा। दाटतु लोहाचा वळसा।'- शिव १०५२. ३. कड; धार; रांग : 'मुजऱ्यास धारसा धरावा तैसा फरा बांधोन फौज उभी राहिली.' - भाब ११३. ४. रूढी; वहिवाट. ५. डोंगराच्या कड्याचा काठ, कड, धार.(रत्नागिरी) ६. धीर; आधार; उपराळा : 'पुढे आम्ही यात्रा सोडून फौजसुद्धा यात्रेस धारसा दिला.' - पेद २१.१०२. [सं. धार]

**धारसे** न. धरण. - मनको.

**धारा** पु. १. (भाडे, विक्री, चाकरी, धंदा इ. व्यवहाराविषयीचा) शिरस्ता, वहिवाट, नियम : 'शिवाजी महाराज यांचे वेळचे धारे यांनीं राज्य चालवावें.' - मराचिशोथा ३२. २. (शेतजमीन, बागाईत इ. वरील) सरकारी कर, वसूल, सारा.[सं. धृ; हिं., गु. धार] (वा.) **धाऱ्यावर येणे** - शुद्धीवर येणे.

**धारा** स्त्री. १. शस्त्र इ.ची धार : 'तंव दापतियां धारांचें। सुदर्शन काढिलें डांबेचे।' - शिव १०७८. २. शस्त्राचे पाते, पान : 'लोखंडाचें एक शस्त्र त्याला तीन धारा।' - भज ४७. [सं.]

**धारा** स्त्री. १. पाण्याची धार. २. प्रवाह. ३. वर्षाव : 'मजवरी फिरली हे दैवदुर्वारधारा।' - सारुह ३.७३. ४. विवाहसमारंभातील स्वर्णाभिषेकाचे द्रव्य. ५. (ल.) प्रजा; संतती. [सं.]

**धारा** स्त्री. (घोडा) चौखुरी पळविणे; घोडदौड. - राव्यको ५.३०.[सं.]

**धारा** वि. (वयाने) लहान; कनिष्ठ : 'मोठा सर्वांतहि हा होय महावीर पांडव, न धारा।' - मोभीष्म १२.२२.

**धारा** स्त्री. १. कलश : 'पाहातेयां पाहारां। ते उदके भरिजे कनकधारा।'

– शिव ७८२. २. प्रकार : 'घेता त्रिपेचे चाचरे। वावडाए पांचवीए धारे।' – शिव १०१२.

**धाराइत** वि. पाणी सोडून दिलेले, दान केलेले (इनाम, जमीन इ.) : 'कसबे वाई परगणे मजकूर येथें धाराइत इनाम दिला असे.' – बाडशाछ ३७.

**धारागृ(ग्र)ह, धारादामोदर** न. उन्हाळ्यात उपयोगाचे, कारंजी इ. साधनांनी थंडपणा आणलेले, लताकुंजाचे घर; जलमंदिर : 'ऐसी धाराग्रहे सिंचणांरि। वाणितां स्थळु जाईल विस्तारी।' – शिव ६३४; 'धारांचे दाटेति सायार।...तैंसे ते धारादामोदर।' – नरुस्व ४३२.

**धाराग्नी** पु. अग्निहोत्र; सतत अग्नी धारण करण्याचे व्रत. [सं.]

**धाराणे** पहा : **धारे, धुरांडे**

**धारा(र)तीर्थ** न.(ल.) (शस्त्रांनी चाललेल्या युद्धात मेलेला शूर पुरुष स्वर्गात जातो अशा समजुतीमुळे तरवारीची धार म्हणजेच एक तीर्थ मानले आहे. त्यावरून) रणांगण; समरभूमी. (वा.) **धारातीर्थी पडणे** – युद्धात लढता लढता मरणे.

**धाराधर** पु. ढग; मेघ : 'नाना धाराधर धारीं।...नानाविधीं।' – ज्ञा १३.१०५३. [सं.]

**धाराधाकटा** वि. सुटसुटीत; आटोपशीर.

**धारा(रे)पेंडोळा** पु. १. (व्यवहारातील, बोली करण्याचा, मोल ठरविण्याचा) नेहमीचा, साधारणपणे पडलेला शिरस्ता, नियम, वहिवाट. २. (ल.) कुटुंबाचा वंशपरंपरागत लौकिक, सोयरीक संबंध, लागाबांधा इ. (क्रि. मिळणे, पटणे, लागणे, मिळवणे, दाखविणे, लावणे.).

**धारावर्त** पु. मुसळधार पाऊस; एकसारखा, जोराने पडणारा पाऊस : 'साधु देवालया जातां। पर्जन्यें पीडिला धारावर्ता।' – एभा ११.१५०९.[सं.]

**धारावाहिक** वि. १. क्रमाक्रमाने येणारी (दूरदर्शन इ.वरील मालिका). २. एकाच विषयाच्या ठिकाणी बराच वेळ तदाकार, एकरूप झालेली (बुद्धी).

**धाराशिव** स्त्री. नदीच्या प्रवाहाने ठरलेली दोन गावांच्या, शेतांच्या मधली सीमा, हद्द.

**धारासभा** स्त्री. कायदेमंडळ; कायदेकौन्सिल : 'या गाऱ्हाण्यांची दाद लावण्याच्या त्या कालच्या मार्गाचेच हल्लींच्या काळीं न्यायखातें, धारासभा असे भाग पडले आहेत.' – पार्ल १५. [गु.]

**धाराळ** वि. मोकळा; खुला : 'आपले गड, किल्ले...अफजलखान येणारास त्याचे फौजेनिशी धाराळ सोडून देणे.' – तंजाशिला ३३.

**धारिया** पु. १. गोराडू जमिनींतील गवत निंदण्याचें, तण काढण्याचे एक औत. – कृषि २७२. २. तीक्ष्ण कोयता लावलेला बांबू. – गुजा ६८.

**धारिष्ट** न. भीतीने कर्तव्यापासून माघार न घेण्याचा मनाचा दृढता हा गुण; धीटपणा; साहस; धैर्य; हिय्या. [सं. धाष्टर्य]

**धारी** स्त्री. धोतर, साडी इ. वस्त्राची रंगीत किंवा साधी किनार; वस्त्राचा काठ. [हिं.]

**धारी** वि. (समासात) धारण करणारा; बाळगणारा; घेणारा. उदा. रूपधारी, दंडधारी. [सं. धारिन्]

**धारीदार** वि. १. काठ असणारे; किनारीचे (वस्त्र). २.रंगीत रेघा असलेले (वस्त्र).

**धारूक** पु. घर्षण होऊ नये म्हणून गोल छरे ज्यात घालतात ती खाच; (इं.) बेअरिंग.

**धारूके** न. पाण्याची तोटी.

**धारूळ** न. गहू पेरण्यापूर्वी शेताला देतात ती वाही, उतार. (व.)

**धारे** न. उजेड येण्यासाठी व धूर जाण्यासाठी स्वयंपाकघराच्या भिंतीला किंवा छपराला ठेवलेले भोक, खिडकी; धुरांडे.

**धारे** वि. १. अधम; हीन प्रतीचे. २. लहान; आखूड. [सं. धार]

**धारेएहसान** न. सरकारने कृपेने कमी केलेला सारा.

**धारेएहसानी** वि. जिच्यावरील सारा कमी केलेला आहे अशी जमीन.

**धारे(रा)करी** पु. ज्याला सरकारसारा भरावा लागतो असे कूळ; धाऱ्याने जमीन घेणारा; इजारदार. याला खरेदी, विक्री, गहाण इ.चे सर्व हक्क असतात. खोती गावात खोतातर्फे धारेकरी धारा भरतो. धारेकरी खोताला नफा देत नाही.

**धारेकोरेचा** वि. ज्याचे लाकूडकाम सफाईदार आहे असा : 'तेथे एक पाचखण उत्तम धारेकोरेचा लिंबाचा उत्तम लांकडाचा कां होईना पण सोपा...'– प्रतिआत्मच ३०२.

**धारेधाकुटी** वि. तरुणी : 'धारेधाकुटी : गोरीगोमटी' – लीचपू ५२०.

**धारेबंदी** स्त्री. सरकारी शेतसारा ठरविणे.

वि. बांधलेल्या, ठरीव धाऱ्याचे (शेत, कूळ).

**धारेमाप** न. ऐनजिनसी सारा घेण्याचे सरकारी माप.

**धारेवट** पु. आराखडा; धोरण; कल्पनाचित्र; ठोकळ वर्णन : 'कितेक मसलतीचा धारेवट लिहिला आहे तो कळला.' – मइसा १२.१७१.

**धारेशुद्ध-द्धी** वि. शिष्टसंमत चालीरीतीप्रमाणे चालणारा (मनुष्य); चाललेला (विधी).

**धारोधार** क्रिवि. काठोकाठ.

**धारो(रु)ष्ण** वि. धार काढताना दुधाला असणारा उबटपणा न गेलेले, ताजे दूध.

**धारोळ** न. तिरपे वखरण. (व.) पहा : **धारूळ**

**धार्का** पु. तेल ओतण्याचे नसराळे.

**धार्मिक** वि. १. धर्माचरण करणारा; सत्त्वशील. २. धर्माने सांगितलेले; धर्मासंबंधी. [सं.]

**धाऱ्या** पु. जनावराच्या मांडीचा कमरेजवळचा भाग : 'कमरेजवळची मांडी तो धाऱ्या.'– बलुतं ४५.

**धार्य** वि. १. धरण्याजोगे; पकडण्यासारखे; मावण्यासारखे. २. घेण्याजोगी, अनुसरण्यायोग्य (पद्धत). ३. धारण करायला, वापरायला योग्य.[सं.]

**धाष्टर्य** न. धीटपणा; धट्टपणा; अमर्यादशील वर्तन, भाषण. [सं.]

**धाल** स्त्री. सुकण्यात दुसऱ्या क्रमांकावर असलेली नारळाची पेंड, घड, घोस. (गो.)

**धालचे** अक्रि. डुलणे; डोलणे. (गो.) [सं. दोल्]

**धाला** पु. गर्भ्याच्या पद्धतीचा पौष महिन्यात खेळायचा शेतकरी स्त्रियांचा खेळ. (गो.)

**धाला** वि. तृप्त झालेला; समाधानी; संतुष्ट.

**धाला, धालारा** पु. डोल्हारा. (गो.)

**धालाधाकटा** वि. १. लहान आणि आटोपशीर; लहानगा व नीटनेटका; लहान पण टुमदार. २. लहान पण सोयीचे, सुखी (घर इ.).

**धालेपण** न. तृप्ती : 'तेणें आनंदाचेनि धालेपणें। साभिप्राय अंतःकरणें। – ज्ञा ६.९.

**धाव** पु. स्त्री. १. एक प्रकारचा मऊ, तांबडा दगड; गेरू; काव. २. माकडे तोंडाला लावतात तो तांबडा रंग.

**धाव** स्त्री. बीळ; भोक (साप, उंदीर इ.चे) : 'काय मुख पेंव श्वापदांची धांव।' – तुगा ९०४.

**धाव** न. कुंपणाचे दार. (गो.)

**धाव** स्त्री. १. धूम; पळणे; शर्यत; जोराने चालण्याचा प्रकार. (क्रि. घालणे, घेणे, मारणे, ठोकणे, मोडणे, जिरणे, खचणे, संपणे.). २. पळण्याने आक्रमिलेली जागा, अंतर, मजल; (क्रिकेट) चेंडू मारल्यानंतर दोन्ही फलंदाज एकमेकांना ओलांडून 'क्रीझ'मध्ये पोहोचण्याची क्रिया; (इं.) रन. ३. गाडीच्या चाकाच्या परिघाला बसवतात ती लोखंडी पट्टी. ४. मोटेचे बैल ज्या उतरणीने चालतात ती वाट; मोटेचा उतार. ५. (ल.) सामर्थ्याची, संकल्पाची परमावधी; मनाची तयारी, उडी; जास्तीत जास्त अपेक्षा, कल्पना. ६. प्रगती; जाण्याची, खाण्याची मर्यादा. ७. आश्रयस्थान; आसरा; माहेर : 'तयां मीवाचूंनि धांव। आनौती नाहीं। – ज्ञा १२.७९. [सं. धाव्]

**धावकारू** पु. १. धावणारा; पळणारा. २. पाठीराखा.

**धावचाल** स्त्री. जोराची चाल; धावत जाणे. (को.)

**धावचीत** वि.क्रिवि. (क्रिकेट) चेंडू मारल्यानंतर फलंदाज क्रीझपर्यंत पोहोचण्यापूर्वी चेंडू मारून 'बेल' पडली तर फलंदाज बाद होणे; धावबाद होणे.

**धावड** पु. १. लोखंड काढणारी, तयार करणारी जात. २. घिसाडी; लोखंडाचे काम करणारा. [सं. ध्मा]

**धावड-ण** स्त्री. मजल. (क्रि. पडणे, मारणे.). (को.)

**धावडणे** उक्रि. १. पळवणे; धावायला लावणे; पिटाळणे; दामटणे : 'वहनें धांवडीत सत्वरा। कौरव प्रवेशले नगरा।' – मुआदि २९.१३८. २. घासणे; सारवणे : 'तया शक्ति चक्राचां तगटीं। धावडि जे क्षुद्रानंदाची पीठी ।' – भाए ५४८.
अक्रि. पळून जाणे; पळ काढणे.

**धावडहोड** स्त्री. धावण्याची शर्यत, चढाओढ : 'विषयाचिया धावडहोडी : गेलिया जन्माचिया कोडी :' – उगी ४०८.

**धावडा** पु. बोटाला आलेली सूज. (झाडी)

**धावडा** पु. एक जंगली झाड, वृक्ष. जळाऊ व इमारती लाकडासाठी याचा उपयोग होतो. याचा डिंक चांगला असतो . [सं. धव, धातकी]

**धावडा-डी** पु. स्त्री. धामट, पिवळट रंगाचा कठाण्या तीळ. (व.)

**धावडावणी** स्त्री. हकालपट्टी. (गो.)

**धावडी** वि. १. धावड जातीच्या संबंधी; धावडांनी केलेले. २. लोखंडी (तवा इ.).

**धावण-णी** स्त्री. १. जोराचा पाठलाग : 'साचळ होता बळियाडें। धांवणियासी निघाले।' – देवसंत ९. २. धावणे; धूम ठोकणे; धावण्याची क्रिया : 'मेरूचे शिखरीं पडियेली खाण। तेथें लोभ्यानें काढियेली धावण।' – ब ५९८. ३. सैन्य, जमाव इ.चे धावणे; कूच; मोहीम. ४. रक्षण : 'यावरी कोणपक्षियांचें धावण। करील मी येथें निमालिया।' – जैअ ७७.६८. ५. उपाय; इलाज; धावाधाव : 'अहो सखिये हंसणी। कांहीं करावी धावणी।' – कथा १.४.१८०.

**धावण-न** न.स्वच्छ करणे; धुणे : 'नंदीग्रामीं तूं राहून। केलें वल्कलांचे धावण।' – जैअ ३५.८०. [सं. धावन]

**धावणा** पु. मालकाच्या घोड्यापुढे किंवा पालखीपुढे धावणारा सेवक.

**धावणारा** पु. १. (क्रिकेट) शारीरिक इजेमुळे फलंदाज धावू शकत नसेल तर त्याच्यासाठी धावणारा खेळाडू. २. खेड्यांतून भराभर चालत जाऊन पत्रे पोचवणारा; (इं.) रनर.

**धावणिया, धावण्या** पु. १. सहाय्यतत्पर; धाव घालणारा : 'आता एक करी धावणिया धावा.' – नागा १४२२. २. मंत्रोपचार करणारा; मांत्रिक.

**धावणी** गोव्याकडील प्रभू जातीचे लोक.

**धावणे** अक्रि. १.अतिशय वेगाने चालणे; पळणे. २. रक्षणाला, मदतीला जाणे; धावून येणे.

**धावणे** सक्रि. स्वच्छ करणे. [सं.धाव्]

**धावणे** न. १. धरण्यासाठी, रक्षणासाठी पाठलाग करणारी फौज, लोक, शिपाई, दूत; रक्षक. (क्रि. धाडणे, लावणे.) : 'कीं चोरीं मारितां अरण्यांत। एकाएकीं धांवणें धांवत। त्याच्या सुखासी नाहीं अंत।' – ह ११.१७४. २. धावा; मदतीसाठी प्रार्थना, विनंती. ३. स्वारी; दौड; मोहीम : 'सर्वेचि मागधें धांवणें केलें। मथुरेवरी पूर्ववत।' – ह २२.१२९. ४. गती; विहित कर्तव्य : 'पै द्विजसेवेपरौते। धांवणें नाहीं शूद्रातें।' – ज्ञा १८.८८४. ५. रक्षण; मदतीसाठी धावणे; पाठलाग : 'सुभद्रा हरूनि नेली पार्थें। वेगीं निघा धावणीयातें।' – मुआदि ४७.१०५.

**धावणे धुपणे** अक्रि. १. धावण्याचे श्रम सोसणे; निष्फळ हेलपाटे घालणे. २. घाईने धावत जाणे. [धावणे द्वि.]

**धावत-ती** स्त्री. १.ओढा; तळमळ; चिंता; उत्सुकता. २.उद्योग; तजवीज; महत्त्वाकांक्षा. ३.सामर्थ्य; गती; शक्ती.४. प्रयत्न; मसलत; प्रकार; कारस्थान; खटपट : 'आईसाहेब आपली धावत असेल तेथवरी करतीलच (प्रयत्न).' – पुरंद भाग १ पृ. १३४.

**धावता** वि. १. पटकन सरकणारा; निसटता. २. वरवर; ओझरता. ३. थोडक्यात (वृत्तान्त).

**धावता धोटा** (विणकाम) हातांनी दिलेल्या यांत्रिक धक्क्याने फेकला जाणारा, मागावर आडवे सूत घालीत भरभर फिरणारा धोटा; सटर.

**धावती** १. धावण्याची क्रिया. २. घाईने इकडे तिकडे धावणे; कूच. ३. धावाधाव; गडबड.

**धावते खोड** (वानस.) हवेत वाढत जाणारा बुंधा व जाड शाखा.

**धावदवडा** पु. १. धावाधाव; पळापळ; येरझाऱ्या. २. इतस्ततः, अनिश्चितपणे धावणे, भटकणे.

**धावदोरा, धावता-रा दोरा** पक्क्या शिलाईपूर्वी घालण्याची कच्ची, जुजबी शिवण; लांब लांब टाके घेऊन घालतात ती शिलाई.

**धावधपटी** स्त्री. धावपळ; पळापळी (गो.)
**धाव धरने** क्रि. पत्ती उडवणे. – लोसाको.
**धावधुडकी** स्त्री. पळणे. (झाडी) [सं. धाव्]
**धावधुडी** क्रिवि. धावतपळत; दौडत; यातायातीने; दगदगीने : 'अंबेच्या देवळात जाते मी धावधुडी टाक शेसनाखाली उडी अंबिका माझी आई.' – ममा १६.
**धावधूप** स्त्री. यातायात; दगदग; श्रम.
**धावन** न. १. स्वच्छ करण्याची प्रक्रिया. २. मंजन; स्वच्छ करण्याचे साधन; मलम.
**धावना, धावनिक** पहा : **धावणा, धावणिया** : 'धावनापवनु।' – शिव ५०; 'ऐसें जगळदरणेयांचीया धावनिका हार्ती देति।' – ऋ १३६.
**धावनी** स्त्री. उठवणी; उत्तेजन : '...तऱ्हीं नव्हेंची धांवनी। मन्मथासी।' – शिव ४१९. [सं. धाव्]
**धावनी** स्त्री. १. मंत्रोपचार. २. धुणी-पुसणी; घासणी, चोळणी इ. उपचार : 'विरहानल न मनी धावनी।' – शिव २८२. [सं. धू]
**धावपट्टी** स्त्री. विमान उडण्यापूर्वी व उतरल्यावर थांबेपर्यंत पळण्यासाठी विमानतळावर बांधलेली जागा.
**धावफलक** पु. क्रिकेटच्या मैदानावर सर्वांना दिसेल अशा पद्धतीने खेळाच्या प्रगतीचे तपशील मोठ्या अक्षरांनी लिहून ठेवतात तो फलक.
**धावमार्ग** पु. स्पर्धेत खेळाडूंना धावण्यासाठी आखून दिलेला मार्ग.
**धावय** पु. सापाची एक जात. रंग भुरकट, नऊ-दहा फूट लांब. हा शेपटी तोंडात धरून गाडीच्या चाकाप्रमाणे चालतो. – बदलापूर ३४९.
**धावरा** वि. १. चपळ; धावणारा; वेगवान. २. जलद चालणारा; धावण्याचा स्वभाव असणारा (मनुष्य, पशू). ३. जलद वाढणारी (वनस्पती).
**धावरी मुंगी** मुंगीची लहान, काळी व जलद चालणारी जात.
**धावरे** न. १. त्वचारोगाचा, खरजेचा एक प्रकार. २. घोडे, गाई इ. जनावरांना होणारा एक रोग.
**धावरे** न. खोकड, साळी, उंदीर इ.चे बीळ.
**धावसरे** न. रोगाची साथ. (कु.)
**धावा** पु. १. मदतीला धावून येण्यासाठी (परमेश्वराची) केलेली विनवणी, प्रार्थना. २. प्रार्थनेचे पद, गाणे. [हिं.] ० **करणे** – १. पाठलाग करणे; हल्ला करून जाणे : 'सर्व स्वारांनी तरवारी पडताळून रामोशामागे धावा केला.' – बापू गोखले चरित्र पृ. ६०. २. धावणी करणे; संरक्षणासाठी धावून जाणे : 'कोणास दु:ख सांगावे? श्री देवास संकट आमचें पडलें आहे तो धावा करील.' – वै ४ स १७४३ पृ. २३.
**धावाडा** पु. धाव; पळ; मजल; धावडण. (क्रि. मारणे).
**धावाड्याचा वाघ** दुसरीकडचा, फिरस्ता वाघ.
**धावाधाव** स्त्री. घाईने इकडे-तिकडे पळणे; पळापळ; गडबड; गोंधळ; मदतीची खटपट; एखाद्या गोष्टीवर ताबडतोब उपाय करण्यासाठी केलेली धावपळ.
**धाविन्नणे, धावीनणे** पहा : **धावणे** : 'धाविन्नला अंतरसाक्षी। गजेंद्रा कारणें। – दास ४.७.२७; 'प्रेमभरें वेडैली। मनें आलिंगावेयां धावीनिली।' – शिव ६०७.
**धावुधावु, धावून** क्रिवि. (धावूनधावून) कळकळीने ; आस्थेने;मोठ्या उत्सुकतेने, आशेने : 'किती पुसूं डोळे धावुधावु तुझ्या शेल्यानें।' – होला १३०.
**धावे** न. भिंतीला चोरानें पाडलेलें भोंक. – गुजा ५०.(नगरी)
**धाषा** पु. सरड्याच्या जातीचा प्राणी.
**धासण** स्त्री. ढासण; माऱ्याची जागा : 'आपल्या फौजातील लोकांनी जागजागा धासणे धरून उभे राहिले होते.' – मशियाका पृ. १०३.
**धासधूस** स्त्री. १. धडधड; धागधूग; माटमूट. (क्रि. जीव करणे, होणे.). २. भीती; धास्ती. [ध्व.]
**धासरा** पु. धक्का; धसका.(क्रि. घेणे, धरणे.). पहा : **ढासरा**
**धासळणे** अक्रि. १. एकदम, धडधड आवाज होऊन खाली पडणे; ढासळणे; कोसळून खाली येणे (भिंत, बांध इ.). २. (यंत्राचे) तुकडे तुकडे होणे. ३. कोसळणे; धो धो पडणे (पाऊस, फळे इ.). ४. फिसकटणे; मोडणे (बेत, योजना). [सं. धस्; ध्व. धांस]
**धास्त-स्ती** स्त्री. १. दहशत; भीती. २. काळजी; चिंता; घोर. ३. भीतीचा मनावर झालेला परिणाम; धसका. [सं.ध्वस्ति;अर. दहशत]
**धास्तखोर, धास्त्या** वि. सदैव भीती बाळगणारा; फार भित्रा.
**धास्तदपट** स्त्री. धाकदपटशा; भीती, जरब दाखवणे : 'यद्यापि येखादे अंतर जाहले अशिले तर धास्तदपट करून आणावा.' – पेद ३३.१५.
**धास्तावणे** अक्रि. भीती, दु:ख इ.मुळे गोंधळणे, भांबावणे, गांगरणे.
**धाळ** पु. भेग; फट.(गो.) [सं. धार]
**धांगड-डी** स्त्री. १. गैरशिस्त, उद्धट, आडदांड मुलगी, स्त्री; कजाग व पुरुषी वळणाची स्त्री. (व.) २. खोडकर घोडी.
**धांगड** न. छत्रीवर घालण्यासाठी केलेली (केतकी इ.) पानांची पत्रावळ; छत्रीची पाने.
**धांगड** वि. १. जाडेभरडे; खरबरीत (कापड, सूत इ.). २. खोडकर; दांडगा; अकुशल; धसमुसळा (माणूस, काम). ३. धिप्पाड; मोठाड; जाडजूड; बळकट (माणूस, जनावर). ४. अगडबंब; गैरवाजवी मोठा (पदार्थ).
**धांगडणे** उक्रि. नाचणे; उड्या मारणे; खिदळणे; धांगडधिंगा घालणे.
**धांगडधिंगड** वि. ओबडधोबड; अडाणी; बेडौल (काम).
**धांगडधिंगा** पु. १. ताळतंत्र नसलेले वर्तन; दांडगाई; गोंधळ; चाळे; धिंगामस्ती. २. धांगड मुलगी; आडदांड, धसकट्या पोर : 'धीट धांगड्या धांगडधिंगा।' – अमृत २४.
**धांगडा-डो-ला** पु. दांडगाई; गोंधळ; दंगा; आरडाओरड.
**धांगा** पु. गलबताचा एक प्रकार.
**धांगोडा** पु. लोकांत (बदकर्माचा) बोभाटा, छी: थू: होणे.
**धांडय** स्त्री. गोड्या पाण्यातल्या मासळीचा एक प्रकार. (गो.)
**धांड(डा)ळ** वि. १. जाड, उंच, निबर (कडब्याचे, जोंधळ्याचे ताट). २. (ल.) उंच, सडपातळ, किडकिडीत (माणूस).
**धांड(डु-डो)ळणे** उक्रि. (हरवलेली वस्तू) शोधणे; हुडकणे; धुंडाळणे; नीट, लक्षपूर्वक पाहणे. [सं. अधि + हुड्]
**धांडा** पु. १. ज्वारीचे, कडब्याचे ताट; धाट. (व., खा.) २. बैल; सांड; खोंड. [सं. दंड]

**धांडा** पु. धाड; हल्ला; दरोडा.

**धांडाळ–ळे** न. व्यसन; छंदफंद : 'अनेका धांडाळे याचा येथ असो नेदावे.' – उच १.

**धांडाळी** स्त्री. हगवण; ढेंढाळी.

**धांडोडा–रा–ळा** पु. न. पु. डांगोरा; दवंडी.

**धांडोळणी, धांडोळा** स्त्री. पु. शोध; तपास.

**धांड्या** वि. मोठा (पूर). (व.)

**धांद, धांदी, धांदोटी, धांदूक, धांदीण** स्त्री. चिंधी; कापडाची अरुंद पट्टी; धांदोटी.

पु. मध्यम जाडीचा लांब दोर. (व.)

**धांदड** स्त्री. जबरी; जुलूम; सक्ती : 'मन निजकल्पना कडाडीं। नाचवी धांदडी त्रैलोक्या।' – एभा २३.६७८.

**धांदरट** वि. १.घाबरा; गोंधळणारा. २. बडबड्या.

**धांदरणे** अक्रि. १. घाबरणे; भयभीत होणे; भीतीने गोंधळून जाणे. २. चोळवटणे; घासणे.

**धांदल, धांदलपट्टी, धांदलाधांदल** स्त्री. १. (वस्तू, व्यवहार, कामे इ.ची) अव्यवस्था; गोंधळ; घोटाळा; गडबड. २. मनाची व्यग्रता; त्रेधा; तारांबळ. ३. गलबला; गोंधळ; धामधूम; गर्दी; दंगाधोपा. ४. डावपेच; छक्केपंजे; गौडबंगाल. (क्रि. करणे, लावणे.). ५. हल्ला, दंगा करणे; छापा घालणे. [हिं. धांधल, दंदले]

**धांदली–ल्या** वि. १. नेहमी धांदल, गोंधळ करणारा; भांबावणारा; गडबड्या. २. दगेखोर : 'आम्ही निपाणकरांचा निरोप घेऊन गोकर्णयात्रेस गेलो. तेव्हा निपाणीकरांचा धांदली कारभार.' – दसकैया पृ. ८८.

**धांदा** पु. १. व्यवहार; घडामोड : 'पैं जीवाचिया बोधा। गोचरू जो हा धांदा।' – ज्ञा १५.३४६. २. दोरा. ३. अखंडत्व. ४. उद्योग; काम; खटपट; धंदा : 'म्हणौनि ब्रह्मनामश्रद्धा। सांडूनि कीजे जो धांदा।' – ज्ञा १७.४२२.

**धांधावणे** अक्रि. गांगरून जाणे.

**धिक्–ग** उद्गा. धिक्कार; व्यर्थता इ.मुळे वाटणाऱ्या तिरस्कारादी भावनांचे सूचक; तुच्छता, किळस, तिटकारा, वीट इ. भावना दाखवणारा उद्‌गार. वि. हलके; कमी दर्जाचे; तुच्छ.[सं.] (वा.) ० **असणे** – क्रुद्ध, नाखूष असणे : 'तुम्ही परागंदा होऊन बाहेर गेलेसि तरी याचे सिरी साहेब धिग असता यैसा हैफ जाहला.' – शिचसाखं ५.पृ.२.

**धिक्कार** पु. निंदा, तिरस्कार, तिटकारा करणे; धुडकावणे. [सं.]

**धिक्कारणे, धिगणे** उक्रि. तुच्छ मानणे; तिरस्कारणे; निंदा करणे; झिडकारणे. [सं.]

**धिक्किट, धिमिकिट–धिकट** न. मृदंगाचे बोल. [ध्व.]

**धिगधिग–गा** क्रिवि. (जिणे शब्दाबरोबर उपयोग) सर्वांना धिक्कारीत आयुष्य काढणे; सदा असंतुष्ट, असमाधानी राहणे. [धिक् द्वि.]

**धिगावणे** अक्रि. भीती वाटणे; घाबरणे : 'धास्तीनें धिगाऊन संभाजीराजे यांचें निशाण घेतलें – पेद १०.५०.

**धिगी** स्त्री. १. टेकू; टेकण; वजन खाली येऊ नये म्हणून लावतात ती मेढ. २. कैची; मोरवा; आडव्या तुळयांची चौकट; (इं.) कपल.[सं. स्थग्]

**धिगी–ग्य** पहा : **धिक्**: 'धिगी ऊठ गे ऊठ नष्टे, खट्याळे।' –आकृ १६. (वा.) **धिग्या लावणे** – टोचणे; डिवचणे.

**धिटा(गा)ई, धिटाव, धिटीव–वा** स्त्री. न. १. धीटपणा; धाडस; निर्भयता : 'थोर धिटाव। हे सद्गुरुकृपा।' – दावि ३१३. २. उद्धटपणा.

**धिटुकली** स्त्री. धीट छोकरी, मुलगी.

**धिटे** स्त्री. उद्धट स्त्री : 'बाहीरी धिटे जैसी। दाटुगा पति कळासी।' – ज्ञा १३.५०४.

**धिट्ट** वि. फाजील धीट; उद्धट वाटण्याइतका धीट; अतिशय धट.

**धिपा(प्पा)ड** वि. खूप उंच व बळकट; मजबूत व उंच बांध्याचा (माणूस, जनावर, वृक्ष इ.). [ध्व.;क. दिप्प]

**धिपीधिपी** क्रिवि. आतल्या आत; सारखा : 'लंकेचा रावण जळतो धिपीधिपी।' – जस १९९.

**धिबडी** स्त्री. १. दाटी; गर्दी; मोठा घोळका, जमाव. (राजा.) २. धिंगामस्ती; दांडगाई; धांगडधिंगा. [ध्व.]

**धिब(म)डी** स्त्री. खंजिरी; डफ.(कु.) [ध्व. धिम]

**धिबिडगा** स्त्री. धबडगा; कामाची गर्दी, पसारा; धांदल.

**धिम** पु. वाद्याचा विशिष्ट आवाज : 'धिमि धिमि दुंदुभि वाजति।' – दावि ४१३. [ध्व.]

**धिमकिटी** १. मृदंगाचे बोल. २. नृत्यातील बोल; ठेका; नूपुरांचा आवाज : 'धिमकिटी धिमकिटी तकधा विचित्र।' – ह १.१३. [ध्व.]

**धिमडी** स्त्री. १. तुरमुंडी; डोक्याने जोराने ढकलणे. (गो.) २. डफ.

**धिमभेरी** स्त्री. एक वाद्य; नाचाचा ताल धरताना निघणारा वाद्याचा आवाज : 'धिमिकी धिमिकी धिमभेरी झननन झांनन झनत्कारी।' – राला ३८. [ध्व. धिम]

**धिमा–म्मा** वि. १. शांत प्रकृतीचा; थंड; विचारी; गंभीर; निश्चयी; धीर. २. नरम; सहनशील; धीर धरणारा. ३. (प्रशंसार्थी) संथ; सावकाश; गर्दी, घाई नसलेला. ४. फार उंच न चढलेला पण भरदार (मृदंगाचा स्वर); हलके, सावकाशपणे (वाचणे, गाणे, म्हणणे). ५. मंद; मठ्ठ; जड. [हिं. धीमा]

**धिमानी** स्त्री. जमीन: 'आधी पडल्या कार्तिका रोहेनी मंग पडला मृगाचा पानी. त्या पान्यानं वपली धिमानी.'– एहोरा आदिवासी ८५.

**धिमिल** फुले घालून केलेली केशरचना; धम्मिल्ल.

**धिया** पु. १. हिय्या; धैर्य; धीटपणा; शौर्य. २. खंबीरपणा; दृढनिश्चयीपणा; नेट; जोर; हिंमत; ताकद. [सं. धृति]

**धिरडे** न. आंबोळीसारखा जाळीदार खाद्यपदार्थ. (वा.) **पाठीचे, हाताचे धिरडे काढणे, निघणे** – खूप मारून एखाद्याच्या पाठीचे, हाताचे कातडे धिरड्यासारखे हुळहुळे करणे; खरपूस मारणे.

**धिरणे** अक्रि. १. धीर, दम धरणे; धिराने घेणे; थांबणे; उतावळी, घाई न करणे; वाट पाहणे. २. (सामा.) थांबणे; खोळंबणे. ३. वर्ज्य करणे; टाळणे; सोडणे; वाचून राहणे (मद्य, मांस इ.). (राजा.)

**धिरा** पु. १. आधार; टेका (तुळई इ.ला खांबासारखा). २. (ल.) उत्तेजन; धीर; कृपादृष्टी; आश्रय. ३. मोटेच्या विहिरीचा टेकण दिलेला खांब.

**धिरा–रे, धिरे(रा)धिरे** क्रिवि. आस्ते; सावकाश; हळूहळू; काळजीने :

'नको रे होऊं घाबरा तूं दिलभरा धिराधिरा तुझ्यावरी अर्धी रंग शिंपितें।' – अफला ७८.

**धिराई** स्त्री. धीर; धिम्मेपणा. (ना.)

**धिरावा** पु. आधार; खाचराची फडी ठेवण्यासाठी तीन किंवा दोन पायांचे लावतात ते लाकूड. (व.)

**धिरासा** पहा : **धिरा**

**धिलांग धतिगण** भजनाच्या वेळी निघणारा मृदंगाचा आवाज : 'धिलांग धतिगण रे।' – दावि १७५.

**धि(धिं)वसा, धिसा** पु. १. भीती; भय : 'हिंसेचा पडे धिंवसा।' – सिसं ६.९८. २. धैर्य; धीर : 'दुर्योधनु संतोषावा। सैन्यातें धिंवसा होआवा।' – गीता १.७५६. ३. उत्कंठा; हव्यास; इच्छा : 'आतां पुरला आम्हां धिंवसा। आत्मबोधाचा।' – ज्ञा ३.७. ४. आवाका; अभिमान : 'ऐसा धिंवसा धरोनि चित्तीं।' – मुरंशु ७०.[सं. अध्यवसाय]

**धिवसेकर** वि. इच्छा करणारा : 'तैसें या धिवसेकरां बहुवसां। माजि विरळा जाणें। – ज्ञा ७.१०.

**धिष्ण्य** पु. स्कंध सोडून सहा अंगुळें बाहूचा प्रदेश; घोड्याचा एक अवयव. – अश्वप १.६२.

**धिस** उद्गा. शी! शी! हुर्यो हाड! इ. हाकलून देताना योजावयाचे उद्गार. [ध्व.] (वा.) ० **पिटाविणे** – आरडाओरड, फजिती करून पिटाळणे.

**धिंग** स्त्री. क्षोभ; दंगल; लोकांचा दंगा; खळबळ; जनक्षोभ.

पु. धूम; गजर; घमंड; दंगल : 'टाळ मृदांग चंग उपांग। मेळऊनि करावा कथेचा धिंग।' – स्वानु ८.४.३०. [ध्व.]

**धिंग, धिग्ग** वि. १. उदार; खर्चीक; उधळ्या; पैशाविषयी सढळ. २. व्यसनाधीन; बाहेरख्याली; दुराचारी; बेबंद; छट. ३. तृप्त; संतुष्ट; प्रिय (यात निंदा ध्वनित आहे.) : 'धूर्त तूर्त धावोन आला। धिंगबुद्धीनें धिंग जाला।' – दास १४.४.१९. ४. धिप्पाड; अवजड; बळकट; मजबूत; उंच आणि दांडगा. ५. जागृत; तेजस्वी; कडक : 'नरसीपुरी देव धिंग। गुप्त आहे।' – रामदासी २.१०१. ६. कल्लोळ.

**धिंग(गा)ड** वि. विद्रूप दिसण्याइतका मोठा व अजस्र (मनुष्य, प्राणी).

न. (निंदार्थी) उंच; बेढब; ढंगळ.

स्त्री. दांडगी, धटिंगण मुलगी; नागडीउघडी राहणारी मोठी मुलगी.

**धिंगडणे** अक्रि. उनाडक्या, दंगामस्ती, दंगल करणे; खिदळणे; नाचणे; बाजार मांडणे.

**धिंगा, धिंगाडा–णा** पु. १. धांगडधिंगा. (क्रि. घालणे, मांडणे.). २. आक्रस्ताळेपणा; आकांडतांडव; केस ओढणे, लोळणे, ओरडणे इ. प्रकार. [क. तिल्लाण]

**धिंगाई** स्त्री. उधळेपणा; खर्चीकपणा.

**धिंचे, धिके–ची** न. टीच. (गो.)

**धिंड** स्त्री. पु. १. शिक्षेचा एक प्रकार. सार्वजनिक रीतीने गुन्हेगाराची केलेली अप्रतिष्ठा. (त्याला पाच पाट काढून गाढवावर शेपटीकडे तोंड करून बसवत व वाजतगाजत गावातून मिरवत नेत.). २. अशी धिंड काढलेला माणूस. ३. जाहीर अप्रतिष्ठा; मानहानी; उपहास (शिव्या–गाळी, मारहाण इ.प्रकारे). ४. (तिरस्कारार्थी) वाईट माणसाच्या येण्याजाण्याच्या वेळी म्हणतात. [सं. दण्ड]

**धिंडका** स्त्री. (धिंड काढण्यालायक व्यक्ती) नेहमी मिरवू पाहणारी व पुढे पुढे करणारी तिरस्करणीय व्यक्ती.

**धिंडवडा, धिंडोडा–रा** पु. १. बदकर्माचा बोभाटा, जाहीर अप्रतिष्ठा करणे; अशी फजिती झालेली स्थिती. (क्रि. काढणे) २. कुप्रसिद्धी; बदलौकिक. (क्रि. होणे, वाजणे.). [हिं. धंडोरा]

**धिंडावणे** अक्रि. (एखादा आपल्या मनाविरुद्ध बाहेर गेला असता निंदार्थी) धिंड काढणे; भटकणे; घराबाहेर जाणे.

**धिंधी** स्त्री. गर्दी; दाटी : 'दाट पारकीयांची धिंधि।' – उषा १५०.१७०१.

**धिंबडी** स्त्री. १. चंगळ; (जेवणात खाद्यपेये इ.ची) लयलूट; विपुलता. २. दंगामस्ती; मजेचा धुमाकूळ; रंगेलपणाची दंगल; धिबडी. [ध्व. धिम्] (वा.) **दमडीवर धिंबडी** – थोडक्यात चैन, मजा; अत्यल्प साधनावर आनंद, मौज करणे.

**धी** स्त्री. बुद्धी; मती; मन. [सं.]

**धी** स्त्री. शरीर : 'सखूनं धी दिली झोकून गेली सरगाला निघून.' – जसा ८१३.

**धीट** वि. १. धट्ट; धाडसी. २. उद्धट; दांडगा; ढालगज. [सं. धृष्ट]

**धीटणे** अक्रि. धीट होणे, करणे : 'मग सावधपणें धीटला राव।' – दावि १८२.

**धीटपाठ** पु. १. नवरसयुक्त काव्य.२. भक्तिपर नसणारे शीघ्रकाव्य : 'भक्तिवांचून जें केलें । त्या नांव धीटपाठ ।' – दास १४.३.१०.

**धीड** स्त्री. धाड; झुंड : 'तों तस्कर धीडी शतानुशती। येऊनियां पोंचले।' – नव २५.१८.

**धीणानुरोध** पु. घोड्याच्या नाकाला होणारा रोग. पहा : **खरणी**

**धीप** पु. श्वास; दम : 'की मागिला श्रमाचा धीप.' – ज्ञाप्र ९२४.

**धीमा तिताला** एक ताल. पहा : **तिलवाडा**

**धीमार** स्त्री. एक कोळी जात व त्यातील व्यक्ती. [सं. धीवर; हिं.]

**धीर** पु. १. पुष्कळ वेळ वाट पाहण्याची, सहन करण्याची, चिकाटी धरण्याची ताकद; दम; सहनशीलता; शांतपणा; स्थिरपणा; टिकाऊपणा. २. धर; आवरशक्ती; बंधन; दाब. ३. (बोलण्यात, करण्यात, चालण्यात) शाश्वती; सातत्य; स्थिरता. ४. टिकण्याचा गुण; मजबुती; धट्टपणा (घोडा, घर, खांब, गादी, कापड, कागद यांत). ५. धारिष्ट; धैर्य. ६. विश्वास (संकटपरिहाराबद्दल).

वि. १. धैर्यवान. २. गंभीर; उदात्त. ३. दमदार; उतावळा नसणारा. ४. निश्चयी; करारी.[सं.] (वा.) ० **चेपणे** – भीती जाणे; भीड मोडणे. ० **देणे** – १.प्रोत्साहन, उत्तेजन देणे.२. मानसिक आधार देणे; सांत्वन करणे. ० **निघणे** – धैर्य, निश्चय टिकणे; विश्वास न मावळणे.

**धीर** पु. १. मासे पकडण्याचे कोळ्यांचे साधन. (झाडी) २. कोळी.

**धीर** पु. १. टेका; टेकू; नेट. २. (ल.) प्रोत्साहन; आधार. पहा : **धिरा**

**धीरज** पु. धीर; सहनशीलता. [हिं.;सं. धीर]

**धीरट** वि. धैर्यवान; धीराचा; निर्भय; हिमतीचा : 'धर्म धरी धार धारणा धीरट। निरालंब पीठ सौख्य शोभा।' – निवृत्तिगाथा १३.

**धीरणे** अक्रि. धीर देणे : 'धीरोन गणेंद्र युक्ति साधी ।' - दावि ४०६.

**धीरमुळे** न. अव. (वानस.) मक्यासारख्या वनस्पतीत आढळणारी हवेतील (जमिनीच्या वर आलेली) मुळे.

**धीरी** स्त्री. बंडीचे जू उभे ठेवतात ते लाकूड.

**धीरोपचार** पु. मानसिक रुग्णाला धीर देण्यासाठी प्रोत्साहन देणे, मन वळवणे, अस्मिता जागृत करणे इ. उपचार.

**धीवट** वि. पक्का; खंबीर.

**धीवर** पु. एक कोळी जात व त्यातील व्यक्ती. हे मासे धरण्याचा व्यवसाय करतात. [सं.]

**धुआटी** स्त्री. धूळ; धुरळा : 'तव कर्ममार्गाचिया धुआटी आंधरिली ब्रह्मयाची दिठी.' - उगी ६७१.

**धुआवन** न. धुणावळीचे वर्षासन : 'खांडे धुआवन मागे अंतराळी : कवळे उकळी भूतळी :' - शिव १६२.

**धुइ** स्त्री. १. शपथ; धुश्शो. (क्रि. घालणे). २. धुरी.

**धुई, धुकट-टे** स्त्री. न. धुके; जमिनीजवळ येणारे पातळ अभ्र : 'जैशी अंधारी रात्र पाही । त्याही वरी दाटे धुई ।' - भाराबाल ४.३८; 'धुकटा करवीं धरविलें । अगाध पाणी ।' - दास २०.८.२३. [सं. धूम; गु. धुई - ओ - वो]

**धुकट** क्रिवि. अस्पष्टपणे; अंधुक रीतीने (दिसणे).

**धुकटा** पु. तंबाखू. (नंदभाषा)

**धुकटावणे** अक्रि. (धूर लागणे) १. नाकाडोळ्यांत धूर गेल्यामुळे व्याकूळ होणे. २. तिरसट, दुर्मुखलेला, सुतकी असणे.
सक्रि. १. धुरी देणे. २. व्याकूळ करणे.

**धुकटी** स्त्री. धुरी.

**धुक(म)टी** स्त्री. तंबाखू. (गो.)

**धुक(ग)धुकी-गी** स्त्री. वक्षस्थळावर घालण्याचा स्त्रियांचा एक अलंकार : 'मुक्ताशेखर पोंहच्या धुकधुक्या हीरांगदें उज्वलें ।' - सारुह ३.४२; 'धुगधुगी किंमत रुपये ११५.' - समारो १.७१.

**धुकमुक-कु, धुकडमुकड** क्रिवि. धडधड; माटमूट; धाकधूक.
स्त्री. धडधड.

**धुकलचे** सक्रि. ढकलणे. (गो.)

**धुकाट** पु. धूर. (राजा.)

**धुकान** स्त्री. भात्याच्या नळीसमोरील, विस्तव प्रज्वलित केला जातो ती जागा.

**धुके** न. सांद्रीभवन झाल्यानंतर बाष्पाचे सूक्ष्म जलकणांत रूपांतर होऊन हवेतील धूलिकणांभोवती साचलेले पाण्याचे सूक्ष्म थेंब; मिहिका; आकाशात जमणारे धुरासारखे जलबिंदूंचे पटल; धुई; धुकट.

**धुक्रयेल** वि. १. अशक्त; आळशी; चैतन्यहीन. २. काम करताना नकारात्मक पद्धतीने विचित्र चेहरा व हावभाव करणारा.

**धुगधुगणे** अक्रि. धडधडणे; धडधड होणे, करणे.

**धुगधुगा** पु. भय; भीती; धुगधुगी. (गो.)

**धुगधुगी** स्त्री. १. नाडी फार हळू उडणे; मरण्याच्या वेळची स्थिती; थोडासा जीव असणे; गळ्याशी आलेला प्राण. २. छाती उडणे; धडधड. ३. गळ्यावरची, कंठमण्याच्या खालची खळी. ४. धुकधुकी.

**धुटी** स्त्री. कांबीची मासोळ्याची टोपली. (व.)

**धुड(डं)** वि. आखूड; ठेंगणे. (व.)

**धुडक-का** पु. फडके. (व.)

**धुडका-की** पु. न. स्त्री. १. सुडका; धांदोटी; उडणारी चिंधी; धडकी. २. (अनेकवचनी प्रयोग) फाटकी, तुटकी, भिकार वस्त्रे. (वा.)
**धुडके-क्या उडवणे, करणे** - १. पूर्णपणे पराजित, फजीत करणे; अगदी फटफजिती उडविणे. २. शरीराचे कातडे निघेल इतके मारणे.

**धुडका** पु. धडकी; भीती : 'चोराचिया धुडका मनीं । वसे ध्यानीं लांछन ।' - तुगा ३१९६.

**धुडकावणी** स्त्री. हकालपट्टी; पराजय; फजिती; धुडकावणे.

**धुडका(क)विणे, धुडाविणे** उक्रि. १. जोराने आरडाओरडा करून, शिव्या देऊन बाहेर घालवणे; हाकलून देणे; पिटाळणे. २. पराभूत, नामोहरम करणे. ३. वाटेस लावणे; न मानणे; न ऐकणे : 'जीवें न मारावें धुडाऊनी द्यावें ।' - रामदासी २.३१.

**धुडकी** स्त्री. धाव; पळणे. [सं. द्रुत]

**धुडकू(गू)स, धुडगुसला** पु. १. वाटेल तसे, गर्दीने, जोराने चालणे, नाचणे, लोळणे, तुडवणे; (बिछाना) चुरडणे; सुरकुत्या पाडणे; चोळामोळा करणे. २. धसमुसळी, दांडगी, अपायकारक वागणूक; दांडगाई; धिंगाणा; दांडगाईचे खेळ; धिंगामस्ती. (क्रि. घालणे, मांडणे.). ३. दांडगाईमुळे, धिंगाण्यामुळे झालेला चोळामोळा, चुराडा, नास, दुर्दशा (वस्तू, कपडे इ.ची). [सं. धुर् + घृष्]

**धुडगा** पु. खेकडा. (को.)

**धुडगा** पु. १. वस्त्राची चिंधी. २. धास्ती. ३. दुर्दशा. ४. ध्यास.

**धुड्डी** स्त्री. धुळवड. (ना.)

**धुण** पहा : **धुवण** : 'नातरी तक्रचि गुसळिलें । अथवा धुणचि सेविलें । सावकाश ।' - दास ६.२.३.

**धुणकणे** अक्रि. त्रासणे; हालणे. [सं. धू]

**धुण(न)कणे** उक्रि. १. पिंजणे; कापूस स्वच्छ करणे. २. खरडपट्टी काढणे.

**धुणफुण** स्त्री. १. विंचू इ. चावल्यामुळे होणारी फुणफुण; चुणचुण; आग; वेदना. २. धुसफूस; जळफळ. [ध्व.]

**धुणावळ** स्त्री. १. (कपडे) धुण्याची मजुरी. २. धुण्याची क्रिया, धुणे.

**धुणी** स्त्री. १. पूर्णपणे धुणे, घासणे, स्वच्छ करणे; धुतले जाणे; धुपणी : 'सकळ पापा होऊनी धुणी ।' - एभा २.५२८. २. (ल.) निःशेषपणे, काहीही न उरता जाणे. उदा. शरीरातील रोग. लुबाडणी; नागवण; नाश : 'कर्माकर्मा धुणी सहजेंचि ।' - एभा ५.४८४. ३. धुण्याची जागा. ४. निवारण; दुष्परिणामांचे, संकटाचे निरसन : 'तरी या शापाची धुणी । कैसेन होय ।' - कथा २.७.११८.

**धुणी** स्त्री. १. गोसाव्याची आगटी; धुनी; धुमी; अग्नीची जागा. हिच्यातून धूर निघत असतो व तो गोसावी घेत बसतो : 'धुणींत टाकिलें सर्वेचि ।' - दावि २६२. २. अग्नीचा खळगा, खाच. [सं. धूम] (वा.) ० **घालून बसणे** - आपली मागणी पुरवावी म्हणून हट्ट धरून बसणे.

**धुणीपाणी** पु. सलगीची मैत्री; जीवश्चकंठश्च मित्र; ऋणानुबंध. (पूर्वजन्मीचे हे गुरू आणि शिष्य असून धुणी पेटविणे, पाणी आणणे इ. गुरूचे काम शिष्य करी अशी समजूत. त्यावरून)

**धुणे** सक्रि. १. (पाण्याने वस्त्र, पात्र इ.) घासून स्वच्छ करणे. २. (ल.) नागवणे; उघडा करणे; पूर्णपणे लुटणे. हे क्रियापद सकर्मक असेल तर भूतकाळी कर्त्याप्रमाणे (जेव्हा कर्म शरीर, शरीरावयव असेल तेव्हा) सुद्धा चालते. उदा. मी हात धुतलो, पाय, अंग धुतलो.[सं. धाव्] (वा.) **धुतलेला तांदूळ, धुतलेले मोती** – १. सुंदर, सशक्त, टवटवीत, सतेज चेहऱ्याचा माणूस. २. शुद्ध, स्वच्छ; निर्दोष. **धुतलेला विस्तव** – कोळशाप्रमाणे काळाकुट्ट माणूस.

**धुणे** सक्रि. धार काढणे. [सं दुह्]

**धुणे** सक्रि. कापणे; हालणे. [सं. धू]

**धुणे** न. (समुच्चयाने) धुण्याचे कपडे. (वा.) **(लोकांची) धुणी धुणे** – १.नेहमी दुसऱ्याचे दोष काढीत बसणे २. कायम इतरांची कामे करणे.

**धुणेपाणी** न. (व्यापक) बायकांची दैनंदिन गृहकृत्ये (भांडी–कपडे धुणे इ.).

**धुत(न)कारणे** उक्रि. हिडिसफिडीस करणे; तिरस्काराने व उद्धटपणे अव्हेरणे; छी: थू: करणे व हाकलून लावणे (माणूस, जनावर इ. ना). [सं. धूत्कार; हिं. धुतकारना]

**धुतरा** न. धोतरा : 'उतरे एकहि न कसीं कनकासीं कोटि भांडतां धुतरे।' – मोकृष्ण ८३.८१. (राजा.) [सं. धत्तूर]

**धुतरुय** पु. कांगावा. (अहि.)

**धुतरे** न. सनई, सूर इ. वाद्यांच्या दांड्यास खाली (धोतऱ्याच्या फुलासारखा) बसविलेला पितळेचा भाग.

**धुतरेल** स्त्री. न. धोतऱ्याचे तेल.

**धुतले** वि. स्वच्छ; निर्मळ; स्पष्ट : 'आपला जाबसाल कच्चा पक्का राखून धुतले ठेवले असते म्हणजे त्यासही उमज पडता.' – पेद १९.९३.

**धुतशीर्ष** न. (नृत्य.) नृत्यामधील एक अभिनय. खालच्या बाजूला डोके वाकविणे. उद्विग्नता, विस्मय, शून्य मन इ. गोष्टी ह्या अभिनयाने दर्शवितात. [सं.]

**धुताडा** पु. १. अवधूत; (निंदार्थी) नागडा, घाणेरडा गोसावी. २. (ल.) अगडबंब; दांडगा; उन्मत्त माणूस. ३. फसव्या; तोतया.४. सावकाराकडून आलेला उद्धट दूत; दुताडा. [सं. धूर्तकार]

**धुताडा, धुतूरं** पु. न. बिगूल; मांगाचा पोंगा. (व.) [हिं. धुतुक]

**धुतारणे** उक्रि. फसवणे; लुबाडणे; ठकवणे: 'दाउनि फळ जळ अर्पिति वदति प्रिय मानसा धुताराया।' – मोआदि ५.७८. [सं. धूर्त]

**धुतारा** पु. १. ठक; लबाड; लुच्चा; भोंदू. २. भविष्य सांगणारा; ज्योतिषी; मांत्रिक; चेटक्या; किमया करणारा : 'धुतारे लोक हे भोळे लोकांस कपट करून फार फसवितात. ' –घाको १८१.[गु. धुतारा; सं. धूर्त]

**धुतीपु(पो)ती** स्त्री. १. पहा : **धोतीपोती.** २. स्वत:ला धुणे आणि शुद्ध करणे. (क्रि. करणे). [सं. धूत–पूत]

**धुत्या** पु. अकल्पित येणारा मनुष्य. (व.)

**धुत्रमशाई** वि. १. भपक्याचा; थाटामाटाचा; दणकेबाज (देखावा). २. कडाक्याचा, डौलाचा परंतु कुंचकामाचा (मनुष्य, व्यापार, वस्तू, काम इ.).

**धुद(ध)कार** पु. जोराचा प्रवाह : 'पड्याल रामराजा गड दोघांच्या मधून ये ग गंगा धुदकार तुझा.' – एहोरा पोतराज ६२.

**धुधल** स्त्री. धुळधाण : 'मोगन सन खमसामध्ये कोकणामधे येऊन लूट नागावा केला. तेव्हा धुधल जाहली.' – संकापसा सं ६२.

**धुधळी** स्त्री. धूम; धुमाळी : 'फुन धुधळीयां कटाक्षु : कव्हणी परी' – शिव ७११.

**धुधा** स्त्री. तोफांचा दणका; वाद्यांचा गजबजाट, कडकडाट; पावसाचे, धबधब्याचे धो धो असे मोठ्याने आपटणे; सोसाट्याच्या वाऱ्याचा आवाज . [ध्व.]

**धुधाट** वि. मोठा आवाज करणारा : 'गर्जति वीर धुधाट समीरण ते रणधीर उताविळ झाले।' – लहुकुशाख्यान १६ (मराठी ५ वे पुस्तक).

**धुधु, धुंधुक** क्रिवि. अंधुकपणे; अस्पष्टपणे.

**धुधुका** पु. धुक्याची रांग, पट्टा; धुधुकार : 'मिरवताऐ सातिआंचां धुधुका।' – शिव ५२९.

**धुधुका(क्का)र** पु. सापाचे फुसफुसणे; फूत्कार (क्रि. करणे, टाकणे, देणे.) : 'उठविलें असिवारू। जैसे काळकुटाचे धुधुकारू। – शिव ९३२. [ध्व. धुधु]

**धुधुवणे** अक्रि. धुत्कार, फूत्कार टाकणे. [सं. धुत् + कृ]

**धुधुवाटा** पु. १. फूत्कार; धुधुकार : 'जेथ सावजांचां धुधुवाटी। – शिव ३१४. २. धुधाट, जोराचा प्रवाह (वाऱ्याचा); झंझावात : 'आंगिचेनि धुधुवाटें। वायो न मोडी तनकुटें।' – शिव ४८७. ३. पंखांचा फडफडाट : 'त्याचया पाखांचा धुधुवाटु : आइकिला गगणी.' – उह १८७६.

**धुधुळिया** वि. १. अंगावर धूळ उडालेला : 'धुधुलिया मधुकरा।' – भाए ४३७. २. फेकलेला; उडालेला : 'फुन धुधुळियां कटाक्षु न कढे। कव्हणीं परी।' –शिव ७१२. [सं. उद्धूल]

**धुन** स्त्री. १. धून; ध्वनी. २. रागरंग; अदमास; कयास. ३. ओढ : 'नबाबाची धुन हैदर नाईकाकडे फार आहे.' – पेद ३८ पृ. १११७. [सं. ध्वनि]

**धुन(नू)क** स्त्री. १. रुची; चव; छटा; चुणूक; स्वाद. २. अस्पष्ट आवाज (दूर अंतरावरून येणारा). ३. नाहीसा होत जाणारा ध्वनी. (क्रि. चालणे). ४. लोकांत उठलेली अफवा; भुमका; कुणकुण.(क्रि. निघणे). ५. नुसती, थोडी ओळख; पुसट कल्पना. ६. पहाट; धुंदूक. ७. नाद; व्यसन. (व.) [सं. ध्वनि]

**धुनकणे** उक्रि. (कापूस) पिंजणे.

**धुन(नु)कणे** अक्रि. १.प्रकाशित होणे (दिशा). २. अस्पष्ट आवाज येणे. ३. (ढगांनी भरलेले आभाळ) स्वच्छ होऊ लागणे.

**धुन(नु)कणे** अक्रि. १. प्रतिध्वनी देणे, करणे; दणकणे; दणाणून सोडणे. २. फैलावणे; पसरणे; उठणे (वर्तमान, बातमी, गोष्ट). ३.अयोग्यपणे वापरणे. (झाडी)

**धुनकरणे** अक्रि. कापूस पिंजणे; धुनकणे. (व.)

**धुनकारणे** अक्रि. धुंद होणे; धूळ, धूर दाटणे. (व.)

**धुनर** न. धुणे; धुतलेले किंवा धुण्यासाठी घेतलेले कपडे : 'मग वळल्या यमुनातटीं घाली धुनर वाळवंटी।' – लोसाको ५.४३.

**धुनी** स्त्री. १. गोसाव्याची आगटी. पहा: **धुणी**. २. सर्दी झाली असता विस्तवावर हळदीची पूड टाकून त्याचा धूर नाकातोंडात घेतात ती धुरी.(क्रि. देणे.). ३. धुनीचा खळगा. ४. तृप्ती. (वा.) ० **देणे** – पहा : **धुरी देणे** [सं. धूम; हिं.]

**धुनी** स्त्री. नदी : 'प्रणमन करि रंगीं ते धुनी मेघनीला।' – आसी ७५. [सं. धु]

**धुनी** स्त्री. १. क्षालन; नाश : 'गंगाचरणीं करी पातकांची धुनी। पाउलें तीं मनीं चिंतिलियां।' – तुगा ३५७. २. (शस्त्राला) पाणी देणे : 'जयाचेआं खांडे करावेयां धुनी। न पुरें प्रलय मेघांचें पाणी।' – शिव १०७९.

**धुनू** न. (बालभाषा) वाद्य. (गो.)

**धुनूकधुनूक** स्त्री. पहाटेची वेळ; उषःकाल; झुंजूमुंजू. (क्रि. होणे, फुटणे).

**धुने** सक्रि. धारण करणे : 'अवसे पुढिलीये बीजे....फुलौरा धुनीत।' – रुस्व ४८९.

**धुपट** पहा : **धुवट**

**धुपट** पु. धूर; धूप. (ना., व.)

**धुपणी** स्त्री. १. स्त्रियांचा एक रोग. धातुक्षयाची विकृती. याचे पांढरी व तांबडी हे दोन प्रकार आहेत. (क्रि. लागणे). २. झीज (जमिनीची). ३. सर्वस्व लुबाडणे; नागवण.

**धुपणे** अक्रि. १. धुऊन निघणे; स्वच्छ होणे (पाऊस, नदीचा पूर इ.मुळे जमीन, रोगामुळे शरीर, चोरांमुळे गाव इ.). २. वाहून जाणे.[सं. धु]

**धुपणे** अक्रि. १. धुमसणे; हळुहळू पेटणे : 'क्रोध लोभादि धुपं अगिटी।' – एभा १८.२९६. २. (ल.) रेंगाळणे (आजार); (धंदा) रुटूखुटू चालणे. ३. नासणे; खराब होणे (फार पिकाने जमीन इ.). ४. मनात कुढणे; झुरणे (क्रोध, मत्सर इ. कोंडल्यामुळे). ५. खंगणे; ऱ्हास पावणे; झिजत जाणे; क्षीण होणे. [सं. धूप्]

**धुपधुपीत** वि. स्वच्छ; धुतलेला; शुद्ध केलेला :'... धुपधुपीत पाकाभीतरी। कर्मअहंकारी गुंतले।' – भाराबाल २७.४१.

**धुपवणी** स्त्री. धुपाच्या धुराने पदार्थ सुगंधित करण्याची कृती; वास देणे.

**धुपवणी** स्त्री. खरडणी; लुबाडणी. पहा : **धुणी**

**धुपविणे** उक्रि. धुपाच्या धुरावर पदार्थ ठेवून सुगंधित करणे.

**धुपसार** स्त्री. भाताची एक जात. (झाडी)

**धुपा** पु. १. एक प्रकारचे गवत. २. लव्हाळे.

**धुपा(प)टणे, धुपे, धुपाळ** न. धूप जाळण्याचे भांडे.[सं. धूप; त. दूपगडम्, दूपक्काल] (वा.) **हाती धुपाटणे येणे** – हाती असलेल्या फायद्याच्या दोन्ही गोष्टी मूर्खपणामुळे गमावणे.

**धुपाडी** स्त्री. १. धुपाचे भांडे. २. दाट धूर : 'की महामोहाची धुपाडी।' – रुस्व ४८९.

**धुपाड्डे** न. धुपाटणे. (गो.)

**धुपार** न. धुके : 'मराठ्यांच्या सैन्यावरही हे धुपार पसरले.' – दुरं २०३.

**धुपारा** पु. १. धुपाटणे. २. अंगारा. ३.(ल.) फसवणूक. (झाडी) [सं. धुम्]

**धुपावणार** वि. धुपाटणे घेणारा; धूप जाळणारा. (गो.)

**धुपावणे** अक्रि. १. धुतला जाणे; स्वच्छ होणे: 'सीतेला वनवास। सासु कैकइनं केला। रामाच्या रामटेकी। बरड धुपावला।' – वलो १४. (व.) २. अकाली गर्भपात होणे; नासावणे.

**धुपावली** स्त्री. गर्भपात झालेली स्त्री. (झाडी)

**धुपांग(गा)रा** पु. १. देवापुढे ऊद, धूप जाळण्यासाठी आणलेला निखारा. २. शिजताना करपलेला भात.

**धुपेल** न. १. ऊद, धूप इ.पासून काढलेले सुवासिक तेल : 'हळदि आंगी उटणें चोपलें धुपेलें माथा माखीती।' – स्त्रीगीत २०. २. अत्तर. (गो.)

**धुबकन–कर–दिनी–दिशी** क्रिवि. कापसाचा गठ्ठा, फणस वगैरे पडताना होणाऱ्या आवाजासारखा आवाज होऊन. (क्रि. पडणे, वाजणे). पहा : **धपकन** [ध्व.]

**धुम–म्म** स्त्री. थोडे अंतर; धूम पळत जाता येईल इतके अंतर : 'भाऊयाबिजे दिशी नको राणीच्या हातचं खाऊ हावशा बंधू माज्या एका धुम्मच माजं गाव.' – लोसाको.

**धुमक** स्त्री. पु. नळवायू; पोटात उठणारा वायगोळा. (को.)

**धुमक–का** पु. बुक्की; धम्मकलाडू. [ध्व. धुम]

**धुमकणे** सक्रि. टोकणे; बुकलणे; बदकणे.

**धुमकूस** पहा : **धुडगूस**

**धुमड** स्त्री. १. दंगलीचा, अव्यवस्थित व्यापार; गडबडीचा खेळ; लाथाबुक्क्या; बुकलाबुकली; ओढाताण; खिदळणी. २. चंगळ; लयलूट; अतोनात विपुलता; समृद्धी; झिंबड.

**धुमणे** अक्रि. १. पहा : **धुमसणे** १, २. २. (आंब्यावर) रोग पडणे; खार पडल्यामुळे करपणे (आंबे इ.).

**धुमरा** वि. एकदम न पेटता धुमसणारे (सरपण); धुराचा; धुमसणारा.

**धुमशा** पु. १. गडबडीची, दंगलीची मौज; आडदांडपणाचा खेळ; धुमकूस; धुमड; धुमश्चक्री; धुमाकूळ; धुमाळी. २. दाणादाण; पूर्ण पराभव; धांदल; गोंधळ; गडबड (फौजा, माणसे यांची). ३. अथक व उत्कट प्रयत्न, उपाययोजना. ४. कडाका; जोर (भांडण इ.चा).

**धुमशान, धुमश्चक्री** स्त्री. १. पहा : **धुमड**. २. पहा : **धुमशा** १. (क्रि. करणे, लावणे, मांडणे.).

**धुमस** पु. धुडगूस. पहा : **धुमशा** : 'वनदेवता यक्षिणीपाळे। धुमसें घालिती गदारोळे।' – मुआदि ३५.५६. [ध्व.]

**धुम(मा)स** पु. चोपणी; ठोकणी; जमीन चोपण्याचे उभ्या दांड्याचे औत. चोपणीला आडवा दांडा असून तिने बसून ठोकता येते. धुमस जड असून उभ्याने ठोकतात. [ध्व. धुम; हिं. धमस]

**धुमसणे** उक्रि. १. ओबडधोबड कुटणे (तांदूळ). २. कचकावून बुकलणे; ठोकणे; हाल हाल करणे : 'दूतीं चालविला बांधोनि यमपाशीं। धुमसिती दंडें सावकाश।' – स्वानु ३.१.३५. ३. निष्काळजीपणाने, धसमुसळेपणाने घालणे, वापरणे, उपयोग करणे, वागविणे; (प्राणी, वस्त्र, वस्तू) कामाला लावणे; गुधडणे; घोसळणे; खुंदडणे. ४. माती दाबणे. (झाडी)

**धुमसणे** अक्रि. १. धूर निघणे; धुमणे. २. (ल.) पेट घेणे; हळूहळू वाढत

असणे (भांडण, कलह); धुसफुसणे; आतल्या आत चडफडणे, फणफणणे (मनुष्य).

**धुमसाडणे** सक्रि. १. अंगमस्तीने एखाद्या मनुष्यावर हल्ला करून त्याला जमिनीवर लोळवणे. २. नांगराने जमीन फोडणे, उकरणे. (व.)

**धुमसाधुमशी** स्त्री.परस्पर बुकलाबुकली; एकमेकांना मारणे.

**धुमसाधुमसी, धुमसून धुमसून** क्रिवि. जबरदस्तीने; झपाट्याने; जोराने; तडाख्याने; धसकाफसकीने; दांडगाईने (वापरणे, कांडणे, कुटणे इ.).

**धुमसाळ** स्त्री. धुरांडे : 'आपानाची धुमसाळ : सरीर हे' – उगी ३९६.

**धुमा** पु. १. मृदंगाचा, पखवाजाचा मागचा भाग; मागचे तोंड. पहा : **पुडा**. २. वाद्यांचा गजगजाट; उच्च स्वराचे आणि गजगजीत वादन. (क्रि. गाजविणे).

**धुमा** पु. १. पराजय अथवा पळापळ (सैन्याची). २. नासधूस; दुर्दशा; धुळधाण; पायमल्ली; निर्दालन. (क्रि. करणे, लागणे, उडवणे.).

**धुमाकस** स्त्री. लहान आगबोट : 'शुद्ध भागीरथीत आगबोट चालत नाही, धुमाकस म्हणजे लहान आगबोट मात्र चालते.' – माप्र ४४.

**धुमाकूळ** पु. स्त्री. १. दांडगेपणाची कृत्ये; धिंगामस्ती (मुलांची). २. खिंकाळणे; उड्या मारणे; दुगाण्या झाडणे (घोड्याने). (क्रि. लावणे, मांडणे.) ३. पहा : **धुमशा २**

**धुमाचक्र, धुमाचक्री, धुमाश्चक्री** पहा : **धुमशान, धुमश्चक्री**

**धुमाड** पु. १. वाद्याचा गजर, नाद : 'करिती धुमाड सोऽहंहंसें।' – एभा १२.१०. २. उत्कर्ष; भर : 'तारुण्याचेनि धुमाडें।' – भाए ३४२. ३. धुमाकूळ; गोंधळ; धुमाळी; धामधूम; गडबड : 'जेथें विषयाचा धुमाड।' – एभा २९.५८१. [ध्व.]

**धुमाडा** पहा : **धुमा १, धुमाचा पुडा**

**धुमाडी** स्त्री. धुळवड; गुलाल, बुक्का इ. उडविणे; धुमाळी : 'धुमाडि करितािति मधुकरा।' – शिव २८६.

**धुमाधार** क्रिवि. धो! धो! मुसळधार (पाऊस इ. पडणे).
स्त्री. १. संततधार (पावसाची). २. धुळधाण; वाताहत : 'दिल्लीपत पातशाहीची फौज मारून कुल धुमाधार केली.' – भाब २७.

**धुमाफळी** स्त्री. ताळतंत्र सोडून केलेली कृत्ये.

**धुमारणे** सक्रि. धुरी सोडून हवा शुद्ध करणे.

**धुमारा** पु. अंकुर; कोंब; बळकट, जोरदार अशी झाडाची फूट. (राजा.)

**धुमास** न. १. दमास्कस (एका गावाचे नाव). २.कापडाचा एक प्रकार. याचे पडदे इ. करतात किंवा कोचावर बसवितात. [अर. दमश्क]

**धुमाळ** न. १. दशावताराच्या खेळातील मंगलाचरण. २. गोंधळ; धुमाळी.
वि. दंगेखोर : 'भीतरीच्या भीतरी लांबा धुमाळू चाचरू' – ज्ञागा २५४.

**धुमाळी** स्त्री. १. गोंधळ; धांदल; क्षोभ; दंगा; गडबड; अव्यवस्थित व जुलमी वर्तन : 'लुटीची आवई घातली आणि धुमाळी मांडली.' – भाब १४८. २. चैन; चंगळ; झिंबड; नासधुशीची, दंगलीची, धांगडधिंग्याची मौज, बहार; धुडगूस; धुमाकूळ. ३. खेळ; धुळवड : 'धुमाळी खेळती मधुकरी। प्राणनाथेंसी।' – शिव २८४. ४. हल्ला; घाला : 'नृपावरी धुमाळी।' – दावि १६८. ५. भांडण; कलह : 'सांज सकाळीं नित्य धुमाळी दोघी समतोली।' – पला ७७.

**धुमाळी** स्त्री. १. चाकाची धाव. २. उतरण ; मोठा उभा उतार.

**धुमाळी** स्त्री. एक ताल. यात मात्रा आठ व विभाग चार असतात.
वि. १. धुमाळी तालासंबंधी–सारखा (ध्रुवपद, चाल, गती). २. अखंडित चालू असलेली; चपळ (गती, गतिमान पदार्थ).

**धुमी** स्त्री. गोसाव्याची आगटी. पहा : **धुनी**

**धुमूंकसे** क्रिवि. धुमूक अशा आवाजाने; नृत्यघोषाने; रुमझुम : 'धुमूंकसे हानतीं गजरें मनकटां वरी।' – शिव ४०४. [ध्व.]

**धुमे** न. धुके; धुकट. [गु. धुमेर]

**धुम्म(म)धुमकार** पु. दणदणाट; मोठा ध्वनी : 'जाला धुम्मधुमकार।' – दावि ३३४. [ध्व.]

**धुम्मस** पु. चपट्या आकाराचा वजनदार लाकडाचा ठोकळा, याला मध्यभागी एक दांडा बसवलेला असतो. जमिनीत टाकलेला भराव ठोकण्यासाठी हा वापरतात.

**धुम्मा** क्रिवि. धूम; जोराने; तडक.

**धुया** पु. धीटपणा : 'बैसेंति धुयां। मानुषांवरी।' – शिव ९०१.

**धुयेफुल्ल** वि. पांढरे सफेद; शुभ्र. (गो.)

**धुर** पु. १. गावाची, शेताची मर्यादा, सीमा. २. प्रमुख; पुढारी; सेनापती; धुरंधर : 'पडतां देखोनि मुख्य धुर।' – मुवन ३.३३.
स्त्री. १. गाडीचे जू. २. अग्रभाग : 'पडली देखतां मुख्य धुर।' – रावि ३१.२१३. [सं. धुर्]

**धुर** वि. अढळ; निश्चित. [सं. ध्रुव]

**धुर** स्त्री. बैल जोताला वाहण्याचा काळ, वर्ष वगैरे : 'बैल किती धुराचा असेल? पाठीवर थाप मारून तर पहा.' – खेस्व ६५. [सं. धुरा]

**धुरकट** न. १. धुराने बसलेली काजळी, काळेपणा, घाण. २. धुके.
वि. धूर लागलेले; धुराने बांधलेले, खराब झालेले.
क्रिवि. अस्पष्ट तऱ्हेने; अंधुक (दिसणे). [सं. धूम्रकट]

**धुरकटणे** अक्रि. धूर लागणे; धुरकट होणे; धुराने खराब होणे, मळणे.

**धुरकटाण** स्त्री. धुरकट वास.

**धुरकाप(पु)री, धूरकपूर** स्त्री. एक प्रकारचे जाळे; कापडाचा एक प्रकार : 'तटतटीत चोळी जाई फाटून धुरकापरी।' – प्रला १४२.[हिं. कपरधूल]

**धुरके** न. धूर व धुके यांच्या एकत्रित अस्तित्वाचा परिणाम. हा वायुप्रदूषणाचा मुख्य घटक आहे.

**धुरजड** वि. गाडीच्या धुऱ्याकडून जड; धूजड.

**धुरटेजणे** अक्रि. धुरकटणे : 'धुरटेजेना धूमकल्लोळ।' – एभा २८.३४२.

**धुरणे** अक्रि. धूसर होणे; धुक्यामुळे वगैरे अस्पष्ट दिसू लागणे : 'मग पावसाच्या धारातून धुरणाऱ्या डोंगराची शिखरे दिसेनाशी होऊन बरसात सुरू होते.' – पाणकळा ३.

**धुरत** स्त्री. १. स्मरण; आठवण. २. धोरण; शहाणपण. (व.)[सं. धूर्त]

**धुरतावा** पु. १. धूर्तबुद्धीने तर्क करणे; अनुमान काढणे; अटकळ; अंदाज. (क्रि. बांधणे, धरणे). २. धूर्तपणा; शहाणपणा. ३. लक्ष; काळजी; चित्त; नजर. [सं. धूर्त]

**धुरधुरणे** क्रि. पुढे येणे; अग्रभागी असणे : 'आणि हिंसाविषय पुढारी।

कुकर्म संगें धुरधुरी।' - ज्ञा १५.१७२. [सं. धुर+ धृ]
**धुरनांगीन** स्त्री. सापाची एक विषारी जात.
**धुरपण** न. १. धूर निघणे (जळत्या लाकडाचा). २. नीट जळू शकत नसल्यामुळे ज्यातून धूर निघतो आहे अशी वस्तू. उदा. ओले लाकूड इ.
**धुरपणे** अक्रि. धूर करणे; धूर देत जळणे (लाकूड इ.); धुमसणे.
**धुरपतगौरी** स्त्री. (धुमसणारी गोवरी) (ल.) सदा चडफडणारी, खडसावणारी, त्रास देणारी स्त्री.
**धुरफोड्या** पु. खाणीतून सुरुंग लावून दगड काढणाऱ्यांची जात व त्या जातीतील व्यक्ती; बेलदार.
**धुरमार** पु. धुरी; धुरी देणे : 'बोलाविला पंचाक्षरी। धुरमार पीडा करी।' - दास ३.७.३७.
**धुरवड** स्त्री. धूर होणे, दाटणे. (को.)
**धुरवडा** पु. वर उडणारी, रस्त्यावर, वस्तूंवर दाट बसणारी धूळ.
**धुरवणी** न. धुरकटलेले पाणी.
**धुरसणे** सक्रि. अग्रभागी ठेवणे : 'जेवीं धुरसोनि दिठी। शूर रणामाजी उठी।'- एभा ३.४०१. [सं. धुर्]
**धुरसा** पु. अग्रभाग. [सं. धुर्]
**धुरळणे** सक्रि. १. धुळीने युक्त करणे; शिंपडणे; फवारे उडवणे; पसरणे; फेकणे (धूळ किंवा बारीक चूर्ण). २. झाडावर मारण्याच्या औषधाची पुरचुंडी करून ती हलक्या हाताने पानाफांद्यांवर आपटून मारणे.
**धुरळा** पु. धूळ; उडणारा केर.
**धुरंदळ** न. धुराचा लोट; धुराटी.
**धुरंधर** वि. १. (ल.) शहाणा; हुशार; निपुण; पूर्ण प्रवीण; तरबेज. २. (व्यापक) उमदा; भव्य; सुरेख; टुमदार; उत्कृष्ट (पशू, इमारती, पिके, जमीन, देश इ.). ३. राजकार्यादी व्यवहाराचा भार मुख्यत्वे ज्यावर असतो तो : 'होईल सुख संसारी। राज्य दिधलें धुरंधरी।' - गुच ४१.११. ४. दीर्घ; प्रचंड; थोर : 'गौप्यरूपें असती गुरु।...अनुष्ठान धुरंधरू।' - गुच १७.५. [सं. धुर् + धृ]
**धुरा** पु. १. पहा : **धुर** १,२. २. सीमेवरील वस्तू, पदार्थ. ३. (ल.) ठरावीक काळ; आयुष्य; नेमलेली मर्यादा : 'ऐशीं नव्वद वर्षे झालीं असून नाहीं भरला धुरा।' - पला ३.१३.२७. ४. मुदतीचा शेवटचा हप्ता. ५. मर्यादारक्षक : 'समीप वनस्फुरा। ते म्हणों भक्ति क्षेत्रिचा धुरा।' - ऋ ८७. ६. आघाडी : 'धुरां निजशस्त्र देऊनि त्यासी।' - एभा २८.६३३. ७. पाठीचा कणा. (व.) ८. गाडीचा आंख, कणा. ९. जू; जोखड; गाडीचा पुढचा दांडा. १०. (ल.) जोखीम; जबाबदारी; मुख्य भार. ११. पावलाचा वरचा भाग. १२. नांगर इ. ओढणाऱ्या बैलांच्या जोड्यांपैकी अगदी पुढच्या जोडीतील बैल. १३. तोफेच्या एका भागाचे नाव : 'बऱ्हाणपुरी तोफेचा धुरा मोडून कागवाडावर राहिल्याचा प्रकार लिहीला तो कळला.' - ऐलेसं ३४८३.
**धुरा** पु. (तिरस्कारार्थी) (कु.) पहा : **धुरंधर** [सं. धुर्य-धूर्]
**धुराजरा** पु. तंबाखूचा अगदी बारीक चुरा.
**धुराटी-ड-डा** स्त्री. १. धुराचा लोट; ढग. २. (धुरामुळे) काळोखी, अंधार; अंधुकता. ३. (सामा.) धुरकटपणा.
**धुराड** वि. धुराच्या, जोखडाच्या बाजूला अधिक जड (गाडी).
**धुरा(रां)डी** स्त्री. १. गाडीचे जोखड. २. ज्यावर जोखड ठेवतात ते दोन उभे दांडे, प्रत्येकी.
**धुरा(रां)डे** न. १. घरातील धूर बाहेर पडण्यासाठी आढ्याला, भिंतीला ठेवलेले भोक; धावे. २. धूर जाण्यासाठी केलेला नळ, चिमणी. [सं. धूम्र+द्रा. अट्ट]
**धुराणी** स्त्री. जोखडाच्या शेवटाकडील खुंटी, खीळ. (को.)
**धुरांडखुंटी** स्त्री. (गाडीची) धुरा.
**धुरी** स्त्री. १. पावलाचा वरचा भाग. २. जोड्याचा, वहाणेचा पुढील भाग; धूर. ३. गाडी, नांगर इ.ची दांडी; धूर; धुरा. ४. गाडीवान, सारथी बसण्याची जागा. ५. भार; जबाबदारी. [सं. धुर्]
**धुरी** स्त्री. औषधी द्रव्ये विस्तवात घालून करतात तो धूर. [सं. धूम्र] (वा.) ० **देणे** - १. भोंदणे; ठकवणे; छकवणे; फसवणे. २. गुन्हा कबूल करून घेण्यासाठी, शिक्षा देण्यासाठी मिरच्या इ. जहाल पदार्थांच्या धुरावर माणसाला ठेवणे, त्याच्यावर धूर सोडणे.
**धुरी** पु. (मुलांना) अंगारा लावणारा.
**धुरी** स्त्री. वाघाची वाट. (गो.)
**धुरीण** वि. १. प्रवीण. पहा : **धुरंधर**. २. नायक. ३. अंगावर मार घेणारा. पु. जोखडाला जुंपलेला बैल, घोडा इ. [सं.]
**धुरु** वि. श्रेष्ठ : 'पहाटेच्या प्रहरामध्ये चौघडा झाला सुरू, तोंड धुती माझी धुरु दयाळ अंबाबाई.' - ममा १५.
**धुरुई** स्त्री. नांगर.
**धुरू** पु. जकातीकडील एक अधिकारी.
**धुरू** पु. १. ध्रुव तारा : 'तो धीर सत्त्वाचा महामेरु। अढळ पदीं जैसा धुरू।' - हरिश्चंद्र (नवनीत १८३). २. उत्तानपादराजाचा पुत्र; ध्रुव : 'धुरूं लेंकरूं बापुडें दैन्यवाणें।' - राम ११७.
क्रिवि. चिरकाल; कायम; अखंड : 'कुंभपाकीं वस्ती करूं। होय धुरु कुळेंसी।' - तुगा २८६६. [सं. ध्रुव]
**धुरे** वि. अग्रगण्य; श्रेष्ठ : 'तुका म्हणे इच्छा पुरे। ऐसी धुरे हे विठ्ठले।' - तुगा १०५३.
क्रिवि. पुढे; प्रामुख्याने : 'ते बुद्धि धुरे करुनी। कर्म करिती चित्त देउनी।' - ज्ञा ५.६१.
**धुरे** न. लाकूड; धूर निघणारे लाकूड.
**धुरेकट, धुरएटक** न. जू व गाडीच्या दांड्या एकत्र आवळणारी दोरी.
**धुरेकरी** पु. १. धुरेवर बसून गाडी हाकणारा; सारथी. २. पहा : **धुरा** १२
**धुरोडा-ळा** पु. १. धुराचा लोट. २. पहा : **धुरा(रां)डे**
**धुऱ्या** वि. १. पहा : **धुरेकरी**. २. चिखल्यापासून सुमारें पांच फुटांवर भोंक पाडून एक फूट लांबीचें बसवितात ते लाकूड. - बदलापूर २८७. [सं. धूर्] (वा.) ० **वर ठेवणे, बसविणे** - जाणूनबुजून दुर्लक्ष, उपेक्षा करणे.
**धुला** पु. खेळखंडोबा; नाश; उधळणे : 'अलाण्यांत हैदोस घालून आपल्या हिंदुत्वाचा धुला करु या.' - के २.४.१९३७. (मोहरमात दुला दुला, धुला-धुला असे ओरडतात, नाचतात त्यावरून).

**धुलाई** स्त्री. १. मार. २. गर्भपात. ३. पहा : **धुणावळ** [हिं.]
**धुलाईघर** न. पैसे घेऊन कपडे धुतले जातात ते स्थान; (इं.) लाँड्री.
**धुलाईयंत्र** न. कपडे धुण्याचे यंत्र.
**धुल्ले** वि. शूर; प्रतापी : 'नांवाचे ज्ञानराव धुल्ले.' - ऐपो २.२११.
**धुव** न. धूर : 'परीधुर्कटलें धुपधुपी मोठें। धुवें थिकटें दिग्मंडळ।' - एभा ५.१७२.
**धुवट** वि. १. धुतलेले; कोरे नव्हे असे वस्त्र. २. धुतलेला; मळकट, घाण नाही असा. ३. पवित्र करणारा; शुद्धिदायक : 'ऐसीं प्रायश्चित्तें धुवटें। केलीं येणें।' - ज्ञा १८.१०१७. ४. निर्मळ; पवित्र : 'सभ्या भला भला विधु लाजेल तुझ्याचि मानसा धुवटा।' - मोसभा ५.५५.
**धुव(वा)डी** स्त्री. पुतणी.
**धुवण, धुवणे** न. तांदूळ इ. ज्यात धुतले आहेत असे पाणी; धूण.
**धुवणी** न. धुण्याचे पाणी.
**धुवणे** उक्रि. स्वच्छ करणे. पहा : **धुणे** [सं. धावन]
**धुवर** वि. धुकट; धुराचा. (गो.)
**धुवरी** स्त्री. १. धूर निघण्याची शेगडी. २. धुरासाठी केलेला निखारा. ३. धूर. (गो.)
**धुवरे** वि. धुराचे, जळतांना ज्याचा धूर जास्त होतो असे (लाकूड).
**धुवरे नक्षत्र** धूमकेतू. (गो.)
**धुवा** पु. धूर (व.) [हिं.]
**धुवा** वि. धुवट : 'साखर पिठी धुवा' - ऐरापु ५.३०५.
**धुवा** स्त्री. मुलगी; लेक : 'ब्रह्मपुरीए माए धुवांचे घर:' - लीचपू ११०.
**धुवा** पु. १. आरतीची रचना : 'हा धुवा सर्वज्ञासि ओळगविला' - जद ३. २. धावा; एक काव्यप्रकार : 'पंडितवासी वियोगी धुवा केला.' - स्मृस्थ २६१.
**धुवाटी** स्त्री. धुके : 'कर्म मार्ग धुवाटी। आंधारैली ब्रह्मयाची दृष्टी।'- भाए ६७१.
**धुवाधार** स्त्री. १. जोराने आणि पूर्णपणे स्वच्छ करून नेणे; साफ करणे (मुसळधार पावसाप्रमाणे). २. (ल.) लुबाडणे; नागविणे; बुचाडणे; उघडा करणे.
क्रिवि. धुपून जाईल असे; धो धो (पाऊस पडणे).
**धुवार** स्त्री. धूमयुक्त; वाफा निघणारे; धुराने व्याकूळ : 'जियें घेतां होती धुवारी। नाकेंतोंडे।' - ज्ञा १७.१४६.
**धुवारोटी** पु. कृपण; चिक्कू; कंजूष; भाकरी पाण्यात बुडवून ते पाणी पिणारा.
**धुवो** स्त्री. मघा (नक्षत्र). (गो.)
**धुव्वा-वा** पु. १. मोड; पराजय; पळापळ (सैन्याची). २. फाकाफाक; पांगापांग; वाताहात; नाश; विध्वंस; धुमा. [सं. धुव्]
**धुव्वाधार** स्त्री. अग्नीवर तूप टाकून धूर निघाला म्हणजे तो अग्नी अन्नशुद्धीसाठी पंक्तीतून फिरविण्याचा विधी. (व.)
**धुशरे-र** न. बुक्का; सुगंधी पूड : 'हरिकथेसी तत्पर। गंधे माळा आणी धुशर।' - दास २.७.३२. [सं. धूसर]
**धुशा-सा** पु. एक लोकरीचे वस्त्र; घोंगडी; पांघरण्याची धाबळी; (इं.) ब्लँकेट. [सं. दूर्शम्; हिं. धुस्सा]
**धुश्श** वि. काळा या वर्णाचा अतिशयदर्शक प्रत्यय; अत्यंत (काळा). पहा : **दुस्स**
**धुस** पहा : **धस्स** : 'तैची माझांजीवें धुस गेलें।' - शिव १२५.
**धुसकट** स्त्री. नासधूस; वाताहात.
**धुसकाफुसका** वि. अशक्त; लेचापेचा; हलका; निर्जीव; कमजोर; नादान.
**धुसकीफुसकी** न. अव. व्यंगे; दोष; वर्मे; उणीदुणी.
**धुसधुस** स्त्री. १. कुरकुर; रागाची जळफळ; धुसफुस. २. ठसठस; वेदना (जखम, फोड इ.च्या). ३. सापाचे फुसफुसणे. ४. रुखरुख; काळजीमुळे येणारी अस्वस्थता : 'रात्रंदिवस जिवास धुसधुस होऊन एथें हें पक्वान्न खाणें नको.' - छत्रे इसापनीति. [सं. ध्रुक्ष् + प्रुष्]
**धुसधुसणी** स्त्री. धडधडणे; ठसठसणे; ठणकणे; फुसफुसणे इ.
**धुसधुसणे** अक्रि. १. ठुसठुसणे; ठणकणे; (जखम इ.मध्ये) वेदना होणे. २. कुरकुरणे; कुरबुरणे. पहा : **धुसफुसणे** २. ३. रागाने फूत्कार सोडणे. ४. आतल्या आत, मनात चरफडणे; जळफळणे. ५. जोराचा श्वासोच्छ्वास टाकणे, घेणे : 'देहास करितां स्पर्श सहज सर्वांगीं श्वास धुसधुशी।' - प्रला २५२. [ध्व.धुस!]
**धु(ध)सफु(फ,मु)स** स्त्री. कुरकुर; चडफड; तडफड; उघडउघड होणाऱ्या भांडणाच्या पूर्वीची बोलाचाली. [सं. ध्रुक्ष+ प्रुष्]
**धुसफु(फ)सणे** अक्रि. १. बोलाचाली, बाचाबाची, उत्तर-प्रत्युत्तर होणे; वर्दळीवर येणे. २. धुसमुसणे; जळफळणे.
**धुसम(मु)सणे** अक्रि. १. धुमसणे. २. स्फुंदणे; हुंदके दाबण्याचा प्रयत्न करून रडणे. ३. चरफडणे; कुरबुरणे ; पहा : **धुसधुसणे** ४ : 'केव्हांही धुसमुशिलेपण। नव्हे जाण निजबोधें।' - एभा ८.४२. [ध्व.]
**धुस्कारा** पु. फूत्कार (सर्पाचा, रागावलेल्या माणसाचा).
**धुस्यान** वि. १. जुन्या तांदळाचा वास. २. कुबट वास. [सं. धूसर]
**धुळक(व)ट** वि. धुळीने भरलेला; मळलेला.
**धुळकार** पु. धुळधाण; सर्वनाश : 'दैत्य मारुन जार केले धन्य मल्हार आक सत्तीन आसुद पिऊन केला धुळकार.' - लोसाको.
**धुळदशा-माती, धुळधमासा, धुळधाण-णी, धूळपट-ट्टी** स्त्री. पु. १. पराजय; पराभव; दाणादाण. २. गोंधळ; फजिती; नाचक्की (भांडकुदळ व लचांडखोर माणसाची). ३. नाश; भंग; बिघाड (बेत, योजना यांत). ४. उद्ध्वस्तपणा; ऱ्हास; पडझड (शहर, देश यांची). ५. अव्यवस्था; धुळीस मिळणे; दुर्दशा.
**धुळधुसिर, धुळधुळ** वि. धुळीने माखलेले : 'जटिल धुळधुसिर अंगणी बाळ चंद्र खेळता दिसे.' - ज्ञागा २२५; 'धुळधुळवाणी बसला।...तमसा जोगी।' - भज ४७.
**धुळवट-वाड** स्त्री. १. धुळीने माखलेली जागा. २. धूळ.
**धुळवट** स्त्री. ज्या जमिनीवर उन्हाच्या तापानें खाऱ्या पाण्याचा मिठासारखा पांढरा पापुद्रा येतो व जमीन पांढरी भुरकट दिसते ती जमीन; खाऱ्या जमिनीचा एक प्रकार. - कृषि २११.
**धुळवड-डी** स्त्री. १. होळीनंतरचा धूळ फेकण्याचा दिवस; फाल्गुन वद्य प्रतिपदा. २. या दिवशी करण्याच्या धूळ फेकणे इ. गोष्टी, खेळ.

३. रंगपंचमीचा दिवस. (कु.) ४. धुळीची जागा. [सं. धूलिवर्तिका]

**धुळवडणे** उक्रि. १. धुळवडीच्या दिवशी चिखल, माती, रंग एकमेकांच्या अंगावर टाकणे. २. (सामा.) धूळ फेकणे; धुळीने मारणे.

**धुळा** स्त्री. धूळ. (माळवी)

**धुळाप** स्त्री. १. धुराळा; धूळ. २. पाऊस पडण्यापूर्वी ज्यात बी पेरून ठेवतात असे शेत. (गो.)

**धुळा(ळो–ळौ)रा** पु. वाऱ्याने उडालेली धूळ; धुराळा : 'अविद्येचे धुळारे उठती।' – पांप्र ८.५१; 'तैसा धुळौरा अंतराळीं। सत्यलोकुवऱ्हीं। – शिव ५४२ ; 'उपजेल मायेचा धुळोरा।' – मुआदि २८.१०९.

**धुळाक्षर** न. १. लिहायला शिकताना पूर्वी मुले धुळपाटीवर काढीत ती अक्षरे. २. मुळाक्षरे (अ ते ज्ञ), अंक इ.

**धुळी** स्त्री. १. माती; धूळ : 'अक्रूरें घेऊनि ते धुळी। लाविली भाळीं आपुल्या।' – ह १८.५६. २. (ल.) नाश: 'केली संसाराची धुळी।' – दावि ४०३.

**धुळीवरचे सारवण** (धुळीवर सारवण बसत नाही यावरून) (ल.) अस्थिरता; अशाश्वतता.

**धुळीसारकेत** स्त्री. धूळ आणि राख.

**धुंकार** स्त्री. गर्जना; आरोळी : 'धुंकार कराया सजल्या।' – संग्रामगीते ३१. [ध्व. धुं + सं.कृ]

**धुंगटी** स्त्री. तंबाखू; धुकटा–टी; धुमटी.

**धुंगा** पु. धूर. [सं. धूम; हिं. धुंआ]

**धुंगेजना** अक्रि. धुरकटणे.

**धुंगोरी** स्त्री. धुराची शेकोटी.

**धुंडणी** स्त्री. तपास; शोध. (क्रि. करणे).

**धुंडणे, धुंडाळणे** उक्रि. हरवलेली वस्तू बारकाईने शोधणे; हुडकणे; झडती घेणे. [हिं. ढूंढना]

**धुंडमारी, धुंडाळा** स्त्री. पु. बारीक शोध; धुंडणे; कसून तपास : 'तरी त्वा पृथ्वी करावी निक्षेत्री। धुंडमारी करोनिया।' – भाराबाल १६.१५४.

**धुंडिलराजा** पु. चिटकोबाचा पाट डोक्यावर घेऊन पाऊस पडावा म्हणून घरोघरी नागवा हिंडणारा मुलगा. (मराठ्यांत रूढ). (कर.)

**धुंडु** पु. एक वाद्य. पहा : **दुंडु**

**धुंद** वि. १. अंधुक; मंद (आजाराने). २. गुंग; (औषध, अंमली पदार्थ यामुळे) शुद्धीवर नसलेला. ३. उन्मत्त; चढेल : 'तुम्ही आपले ऐश्वर्यानें व हिमतीनें व इर्षेनें धुंद जाहाला!' – भाव २३. ४. गर्क; (एखाद्या विषयांत) गढलेला; मग्न. ५. आच्छादित; धुईचे; सुन्न (आकाश, दिशा).

पु. गर्व : 'लागतां आधिकचि उठे धुंद।' – दावि ६४.

स्त्री. न. बंड; अंदाधुंदी; जुलूम : 'धुंदचि मांडिलें सिरोन गांवीं।' – दावि २३२. [हिं. धुंध]

**धुंद** स्त्री. (वाद्यादिकांचा) अविरत चालू स्वर. [सं. धुन] (वा.) ० **धरणे, बांधणे** – नाद लागणे; ध्यास घेणे.

**धुंदकणे** अक्रि. धुंद होऊन चालणे.

**धुंदमार** पु. दंगा; नाश : 'फितरती जालिया व दुकलेकाल पडिलिया धुंदमार जाली व कितेक रयत परागंदा जाली.' – शिचसाखं ९ पृ. ४७.

**धुंदर** पु. काजवा : 'सूर्यापुढें जैसे धुंदर। विनयकापुढें पादोदार।' – पांप्र २७.१२६. [सं. धुंधुमार]

**धुंदर** वि. वृद्धापकाळामुळे निकामी; विसराळू.

**धुंदरा** पु. गवत, लाकूड इ.ची गंजी : 'रात्रीं मशाली पेटविण्यांत आली. धुंदरे जाळण्यांत आले.' – सह्याद्री, सप्टें १९४१.

**धुंदा** पु. एक जातीचे कबूतर.

**धुंदाई, धुंदाधुंदी, धुंदावा – वे** स्त्री. पु. न. १. अव्यवस्था; बजबजपुरी; अंदाधुंदी; बंड. २. (सामा.) दंगल; गोंधळ; दंगा. [हिं. धुंधाई]

**धुं(धु)दाट** वि. १. सरळ; थेट; नीट (रस्ता). २. उग्र; दांडगा (माणूस); जोराचा, सोसाट्याचा वारा.

**धुंदाट–ड** पु. जोराची वावटळ; झंझावात; धुधाट. (व.)

**धुंदावा** पु. तर्क; अंदाज; कयास; अटकळ; अनुमान.

**धुंदी** स्त्री. १. मद्य इ. अमली पदार्थांच्या सेवनाने चढलेला कैफ, नशा, अंमल. २. दृष्टीचा अस्पष्टपणा, अंधुकपणाचा विकार. (क्रि. येणे). ३. संपत्ती इ. ने चढलेला उन्माद; गर्व; ताठा. ४. आवरण; (आकाश, दिशा यांना) आच्छादन : 'मोठा कडाखा जाला; धुराची व धुळीची धुंदी जाली.' – भाव १२. ५. पहा : **धुंदाई**

**धुंदीर** न. घराच्या कवेलूला लावलेले अडकण; खळ्यात तुरी अडण्याकरिता लावलेला तुराट्यांचा कट्टा.

**धुंदुर्मास** पहा : **धनुर्मास**

**धुंदुवात** पु. वातावरणातली खळबळ, धुडगूस.

**धुंदूक, धुंदूक(स)धुं(मुं)दूक–स, धुंदूमुंदू** क्रिवि. झुंजूमुंजू; अंधुकपणे; अस्पष्टपणे; अस्वच्छपणे.

स्त्री. अगदी पहाट; अरुणोदय; दिवसाची पहिली दिशाफाक. [धुंद द्वि.]

**धुंदेरा** पु. (तिलोरी महार) प्रेताबरोबर नेलेला भात किंवा त्याची शिंकाळी. हा भात मृताचा मुलगा स्मशानात मयताच्या तोंडात घालतो. – बदलापूर ६१.१७२.

**धुंधाट–ड, धुधाटा** स्त्री. न. पु. घूत्कार; (पक्ष्याचे) ओरडणे : 'दिवाभीतांचे धुंधाट तेथें। पिंगळे थोर किलबिलती।' – ह ११.१९३. [ध्व.]

**धुंधुकणे** अक्रि. १. ओकणे : 'क्रोधे पावक धुंधके नयना' – गरा ७९. २. धुराने वेष्टित होणे.

**धुंधुका** पु. फडफडाट : 'निगतां यदुटिळका : मिरवे सातीयांचा धुंधुका.' – शिव ५२८.

**धुंधुकार** वि. नेत्रदीपक; डोळे दिपवणारे : 'हिरियांचा चुरा दिसे धुंधुकार.' – ज्ञागा १.१.

**धुं(धु)धुकार** पु. १. अंधार; अंधकार : 'अवघा धुंधुकार पडला।' – ऐपो ९७. २. धुके.

**धुंधुटणे, धुंधु(दु)विणे, धुधाणे** अक्रि. फूत्कार टाकणे, करणे : 'तंव जाळीये व्याळ धुंधटी। देखतां भयभीत पोटीं।' – मुहरिश्चंद्राख्यान नवनीत २०५; 'कां कालिया नाग धुंदुवातु।' – ज्ञा १८.७१२. [ध्व. धुधु]

**धुंधुरु** पु. दिवटीचा पोत. [सं. धुंधुमार]

**धुंबलणे** सक्रि. मारणे; बडवणे. (कर.) [ध्व.]

**धू** स्त्री. धूर : 'हें असो दीपाचिये सिद्धी। अवघड धू आधी।' – ज्ञा १८.७८०. [सं. धूम; हिं. धुंआ]

**धू** स्त्री. मुलगी. (कु.) [सं. दुहितृ]

**धूइजणे** पहा : **धुणे** : 'सुधाकराचा खांदवखालीं। धूइजेती कापुराची सुआंळीं।' – शिव ६३३.

**धूज** स्त्री. १. महत्त्वाकांक्षा; ईर्षा. २. आरोप; कर्तव्य.

**धूजड** वि. बैलगाडीत पुढच्या बाजूला ओझे फार झाल्यामुळे बैलांच्या मानेवर जिचा भार आहे अशी गाडी. (ना.) [सं. धूर + जू]

**धूड** न. १. अवाढव्य, अजस्र माणूस. २.प्रचंड साप, जनावर इ. : 'असुरां काळ भासे विक्राळ पुढें। पसरी मुख एक चावितो धुडें।' – तुगा ४७८. ३. मोठे झाड (विशेषतः पाडलेले); लाकडाचा मोठा ओंडा, खडक इ. ४. शेतातील मूळखंड. – भात्रै ७.१ ते ४. (खा.) [क. दोड्ड]

**धूण** न. १. तांदूळ धुतलेले पाणी; धुवण. २. डाळ इ.चे पाणी; पाणचट आमटी, वरण. [सं. धू]

**धूत** वि. १. धुतलेले. २. स्वच्छ, साफ केलेले: 'अति अढळ सत्यधूत वाणी।' – एभा ३.५२७. ३. भीतीने हलणारे; कापणारे. [सं.]

**धूत** उद्गा. छत्; हुडत्; धिक्कारदर्शक उद्गार. (ना.) [ध्व.]

**धूतवस्त्र** न. सामान्य सोवळ्याच्या उपयोगी, धुऊन वाळवलेले वस्त्र.

**धूत्कार** पु. फूत्कार (सापाचा). (क्रि. टाकणे, देणे, करणे.).[ध्व. ;सं.]

**धूधू** पु. धुधुकार; जागे करण्यासाठी योजण्याचा ध्वनी : 'म्हणऊनी धू धू करी घेउनी। जागें करी जननी त्या गरुड ध्वजाला।' – आकृ १३.[ध्व.]

**धून** स्त्री. १. लांबलेला घुमणारा ध्वनी; गुणगुण; झणकार (वाद्यतंतूचा किंवा लांबच्या संगीताचा). २. ध्वनिमिश्रण; ध्वनीची छटा, झाक. ३. लोकांत गुणगुण, कुणकुण. (क्रि. उठणे, निघणे). [सं. ध्वनि]

**धून** स्त्री. (विणकाम) कापड गुंडाळण्याचे चौकोनी लाकूड.

**धूप** स्त्री. १. पावसाने माती वाहून जाणे. २. (शरीर इ.ची) झीज.

**धूप** पु. १. धूर निघणारा ऊद इ. सुगंधी पदार्थ. २. सुगंधी द्रव्यांचा धूर. ३. (सामा.) उदबत्ती.

स्त्री. सूर्यप्रकाश; ऊन.[सं. धूप्; हिं.] (वा.) ० **घालणे** – १. (झपाटलेल्या माणसाच्या अंगातील) भुताने बोलावे म्हणून त्याच्यापुढे ऊद जाळणे. २. मोठ्या नम्रतेने, अजीजीने आर्जव, विनंती, प्रार्थना करणे. ३. (अकरणरूपी प्रयोगासारखा) न जुमानणे; मर्जीप्रमाणे न वागणे. ० **दाखविणे** – चाळवणे; झुलवणे; काही न देणे.

**धूपकाडी** स्त्री. धूप चोपडलेली काडी; उदबत्ती.

**धूपघाल्या** वि. एकसारख्या कलागती लावून भांडण चालू ठेवणारा; कळलाव्या.

**धूपसाळी** स्त्री. एक झाड. ह्यापासून लोबान काढतात.

**धूपायन–वणे** न. धुपाटणे.

**धू(धू)पारती–त, धूपदीप–वात** स्त्री. पु. १. देवाला आरती ओवाळणे; धूप, दीप, नैवेद्य, आरती इ. उपचारयुक्त पूजा. २. धुपाटणे. ३. संध्याकाळची पूजा, आरती. ४. (ल.) खरडपट्टी; निंदा; हजामत. ५. (ल.) मानपत्र इ. प्रकारे सन्मानाची बोळवण.

**धूपित** वि. धूपाने सुवासित केलेला. [सं.]

**धूपी** पु. १. धूप जाळणारा; धुपाटणे धरणारा. २. धूप वगैरे सुगंधी पदार्थांचा व्यापारी, दुकानदार : 'हडपी, बारी व्यवहारी। जळप्राशक धूपी फुलारी।' – भारा अयोध्या ८.४४.

**धूम** स्त्री. १. धाव; दौड; शर्यत; पळ. (क्रि. मारणे, ठोकणे) : 'थाट चाले गाई गोपाळांची धूम। पुढें कृष्ण राम तया सोयी।' – तुगा ३२. २. (ल.) उत्सुकता; धाडस; धैर्य; साहस. ३. चैन; चंगळ; रेलचेल; अतिशयता. ४. हल्ला; गर्दी : 'एकदम हत्यारें उपसून आमच्यावर धूम केली.' – वज्राघात ९७. ५. संहार; बंडाळी; दंगा; गोंधळ; गडबड : 'हरि करिकुळीं परबळीं करि तो अतुल प्रभाव कवि धूम।' – मोशल्य २.५०. ६. उधळण : 'गुलालाची धूम' – नाम ३०.५.

क्रिवि. कडाक्याने; झपाट्याने; तल्लखीने; जोराने; अविचाराने. [हिं.]

**धूम** स्त्री. १. गाण्यात पखवाज, मृदंग, संबळ इ.कांचा निघणारा खर्ज स्वर; असा सूर निघण्याचे स्थान; वाद्याचा असा अवयव. पहा : **धुमा**. २. गर्जना (तोफांची, सिंहाची). [ध्व.]

**धूम** स्त्री. मळणीच्या वेळी खांब्यांत दावण अडकवण्यासाठी वाटोळे विणलेले वेलींचे कडे. (कु.)

**धूम** पु. धूर; वाफ. [सं.]

**धूमउका** स्त्री. धूर ओकणारी मशाल : 'ताम्राक्षी धूमउका पळिपत असिका.' – गरा ३७. [सं.]

**धूमकेतू** पु. १. शेंडेनक्षत्र; वायू व धूळ यांच्या असंख्य कणांचा बनलेला, सूर्यापासून दूर अंतरावर असलेला लांबट, शेपटी असलेला आकाशगोल.

**धूमधडक** क्रिवि. धीटपणाने; झपाट्याने; सपाट्याने; तडाख्याने; रगडून; कचकावून (जाणे, करणे, बोलणे).

**धूमधडाका–खा** पु. १. झपाट्याचा, जोराचा, सपाट्याचा, तडाख्याचा प्रयत्न. २. (सामा.) ओरडणे; दणदणणे; गर्जना करणे; एखादा मोठा गलबला; गंभीर घुमणारा आवाज, गोंगाट. (क्रि. करणे, चालणे, लागणे, लावणे, मांडणे).

**धूमधाम** स्त्री. धामधूम; गडबड; आरडाओरड. [हिं.]

**धूममार्ग, धूमादिमार्ग** पु. १. पितृयान; नरकाचा रस्ता; दक्षिणायनमार्ग. हा अंधाराचा आहे. २.(ल.) यातायातीचा, कष्टाचा मार्ग.

**धूमयंत्र** न. हवेतील कीटक, जंतू मोठ्या प्रमाणावर मारण्यासाठी धूर सोडण्यास वापरतात ते हातयंत्र.

**धूमश** वि. धुरकट रंगाचे. [सं.]

**धूमाग्नी** पु. मंदाग्नी; अग्निमांद्य; अपचन. [सं.]

**धूमावरण** न. शत्रूला हुलकावणी देण्यासाठी सोडलेले धुराचे लोट.

**धूम्र** पु. धूर; धूम.

वि. धुरकट रंगाचा; धुरकटलेला; मळकट; काळसर. [सं.]

**धूम्रदीप** पु. कीटसनचा दिवा.

**धूम्रपत्र** न. (थट्टेने, सांकेतिक) (धुराचे पान) तंबाखू. [सं.]

**धूम्रपान** न. १. धुनीवर उलटे टांगून घेऊन धूर पिणे; धूर पोटात घेणे; योग्यांचा तपश्चर्येचा एक प्रकार : 'गोरांजनें धूम्रपानें। साधिती पंचाग्नी।'

– दास ५.१.२५. २. (सांकेतिक) विडी ओढणे; हुक्का पिणे.

**धूर** पु १. जळत्या लाकडातून निघणारा कोळशाचा वायुरूप अंश. २. जिल्हई; मुलामा (सोने, चांदी इ.वरील). ३. (ल.) मग्नता; तन्मयता; एकतानता; तल्लीनता. ४. धुंदी. ५. एकाच ठिकाणी वा स्थितीत फार वेळ बसल्यामुळे किंवा ओझ्याच्या भारामुळे येणारी कळ. (क्रि. उठणे, निघणे, लागणे, होणे). ६. तिखट, मसाल्याचे पदार्थ खाल्ल्याने नाकातोंडातून सुटणारे उष्ण भपकारे; करपट ढेकर : 'मुखीं घालितां अतितिखटीं। नाकीं तोंडीं धूर उठी।' – एरुस्व १४.१०९. ७. ढगाळलेले आकाश; धुके; मळभ. (क्रि. उठणे, निघणे, होणे).[सं. धूम्र] ० **दाखविणे, देणे** – (ल.) फसवणे; ठकवणे; चकवणे. ० **निघणे** – गुप्त बातमी थोडीशी बाहेर येणें, किंचित् कळणे. **धुरावर धरणे** – गांजणे; निर्दयपणे वागविणे; छळणे.

**धूर** १. जमीन मोजण्याचे एक माप. २. विश्व्याचा एक विसांश हिस्सा. – विल्सन.

**धूर** स्त्री. १. जोखडाची टोके प्रत्येकी; गाडीचा, खटाऱ्याचा दांडा; गाडीचा अग्रभाग; धुरे व जू मिळून होणारा भाग; गाडीच्या दांड्याचा अग्रभाग. २. वहाणेचा पट्टा; बुटाचा तोंडाजवळचा पृष्ठभाग; धुरी. ३. पावलाचा फुगीर पृष्ठभाग. ४. अग्रभाग. ५. समूह; भार : 'अमर्त्यव्याळांचे धूर महाबळ धाडिले।' – मोराघनाक्षर रामायण ३७.

वि. १. पुढारी; नायक; श्रेष्ठ : 'मुख्य धूर रणीं लागल्या हातां। येर कटक जिंकिले न झुंजतां।' – एभा ११.८८३. २. प्रमुख; प्रधान. [सं. धुर्] (वा.) ० **काढणे** – पुढाकार घेणे : 'शिंतोडा न लागतां धूर मी काढी।' – एभा १२.५७७.

**धूरजड** पहा : **धूजड**

**धूरपट्टी** स्त्री. दांड्याच्या शेवटी असलेली आडवी पट्टी.

**धूर्त** वि. १. हुशार; कुशाग्र बुद्धीचा; चलाख; चाणाक्ष. २. लबाड; लुच्चा; कावेबाज. [सं.]

**धूल** स्त्री. धुळधाण : 'डाहाणु प्रगणीयाची धूल राम नगरकरांनी मांडली आहे.' – पेद ४० पृ. १००.

**धूला** पु. हैदोस; दंगा; गडबड. पहा : **दुला, धुला**

**धूलिवंदन** पहा : **धुळवड–डी २** [सं.]

**धूव** स्त्री. कन्या; मुलगी. (गो., को.) [सं. दुहितृ]

**धूशर** न. भंडारा; हळद.

**धूस** पु. वाळूच्या गोण्यांचा तट : 'कानपुरास गंगातटास धूस रचून आत गोरे राहिले होते.' – ज्ञाको (न) २१५, माप्र ४२.

**धूसर** वि. धुरकट; करड्या रंगाचा.

न. १. धुके; धुंदी : 'झड झडाटें सुटला वायो। तेणें धूसर दाटलें।' – मुवन २.३९. २. पूड; चूर्ण : 'वरि बुकियाचें धूसर। अत्तर कस्तुरी केशर।' – निगा ११९. [सं.]

**धूळ** स्त्री. १. बारीक माती; धूली. २. (ल.) गोंधळ; भांबावलेली स्थिती. ३. दुर्दशा; नाश; विध्वंस; पराजय; मोड (सैन्याचा). ४. (सामा.) ऱ्हास; नाश; नष्टप्राय स्थिती. [सं. धूलि] (वा.) ० **उडणे** – (शेत, गाव, मुलूख, घर) ओसाड पडणे. ० **घालणे** – डोक्यात व तोंडात माती घालणे. हे अत्यंत दीन झाल्याचे प्रतीक आहे. ० **चारणे** – एखाद्याला चीत करणे; पराभव करणे; मानभंग करणे. ० **फुंकणे** – (कमी चारा असलेल्या जमिनीत गुरे करतात त्याप्रमाणे.) अन्नान्नदशेला जाणे; पोटापुरतेही न मिळणे. ० **फेकणे, धूळफेक करणे** – गैरसमज करून देणे; खोटे बोलणे; चकवणे. **धुळीचे दिवे खात जाणे** – मोठ्या बेअब्रूने दुःस्थितीत भिक्षा मागत फिरणे. **धुळीचे दिवे लावणे** – वाईट कृत्य करून प्रसिद्ध होणे. **धुळीत रत्न मिळणे, सापडणे** – अनपेक्षित लाभ होणे; अचानक एखादी चांगली गोष्ट लाभणे. **धुळीस मिळवणे** – समूळ नाश, नायनाट करणे; रसातळाला नेणे.

**धूळकोट** पु. (धुळीचा, मातीचा) किल्ल्याभोवतालचा कोट; बाहेरील तटबंदी.

**धूळधमाया** स्त्री. यंवत्यंव; फालतू गोष्टी; फुशारकी.

**धूळपट्टी–ट** स्त्री. खडसावणी; खरडपट्टी; तासडणी.

**धूळपाटी** स्त्री. धुळाक्षरे शिकणाऱ्यासाठी वर धूळ पसरलेली लाकडी फळी. या पाट्या जुन्या काळी दगडी पाट्या निघण्यापूर्वी वापरल्या जात.

**धूळपेरणी, धूळवाफ** स्त्री. १. पाऊस पडण्याच्या सुमाराला किंवा पावसाची पहिली सर पडल्यावर व धूळ पूर्णपणे बसण्यापूर्वी केलेली पेरणी; धूळपेरणी. २. अशा रीतीने पेरलेले भात इ. [सं. धूली + वप्]

**धूळभेट, धूळदर्शन** स्त्री. १. हातपाय न धुता प्रथम दुरूनच, रस्त्यातूनच देवाचे दर्शन घेणे. २. मोठ्या माणसाची भेट. ३. (ल.) उभ्या उभ्या, जाताजाता, ओझरती भेट.

**धूळिरेवा** पु. धुरळा : 'आभूटी धूळिरेवा ग्रसित सकळही देखिले' – गरा ३९.

**धूं, धुं** पु. धूर : 'तें देविये देतां गरळ होओंनि परतलें : नाकें धुं निगतायें :' – नरुस्व ५४९. [सं. धूम्र]

**धृत** वि. धरलेले; पकडलेले. [सं.]

**धृति–ती** स्त्री. १. स्थैर्य; धैर्य; निश्चय. २. धरणे; धारणा; जवळ असणे, ठेवणे. ३. सत्तावीस योगांपैकी आठवा योग. [सं.]

**धृपदिया** पु. धृपद शैलीचा गायक.

**धृवक, धृपद** न. ध्रुपद : 'धृवक कामोद' – दावि १४९.

**धृष्ट** पु. उद्धट; दांडगा : 'अहा निपट धृष्ट मी प्रभुवरासि कां लाजशी।' – केका १६. [सं.]

**धेक** पु. १. दरारा; धाक. २. ढेकर. (गो.)

**धेक, धेकण** पु. गर्जना. (गो.) [ध्व.]

**धेड** पु. १. एक जात व तिच्यातील व्यक्ती. दक्षिणेत बहुधा महारांना ही संज्ञा लावत असत. २. (ल.) एक शिवी.

**धेडकचका** पु. १. धेडांचे भांडण. २. (ल.) आरडाओरडीचे, निकराचे भांडण.

**धेडकावळा** पु. पूर्ण काळ्या रंगाचा कावळा; डोंबकावळा.

**धेडगा** पु. (तुच्छतेने) धेड. (वा.) ० **नाचवणे** – महारांच्या लग्नातील एक विधी. यात नवरानवरीला वेगवेगळी माणसे उचलून घेतात. बिगरतेलाच्या चपात्या नवरीच्या हाती देऊन वाजंत्र्याच्या तालात गोलगोल नाचतात.

**धेडगुजरी** वि. अनेक भाषांची सरमिसळ जिच्यात आहे अशी भाषा; अनेक भाषांची खिचडी.
**धेडवाडा** पु. १. धेड लोकांचा मोहल्ला; महारवाडा : 'धेडवाडा बैसली खोडा घेतली आपुल्या भावें।' - तुगा २९६. २. (ल.) कडाक्याचे भांडण; बाचाबाची; आरडाओरड. (क्रि. माजविणे, मांडणे). ३. (ल.) गोंधळ; अव्यवस्था.
**धेडवाला** पु. जमातदार : 'मागे त्याजकडील गदग्याप्पा पाटील म्हणून हजार पाचशे लोकांचा धेडवाला होता.' - ऐलेसं ७८७९.
**धेडसुगी** स्त्री. १. शेतकरी लोकांचे धान्य तयार होण्यापूर्वी धेडांनी आपले बलुत्याचे मिळालेले व बाजारात विक्रीला आणलेले, विकलेले धान्य. (अर्थात ते बाजारभावापेक्षा स्वस्त दराने विकावे लागते त्यावरून). २. (ल.) अल्प काळ टिकणारी पण अतिशय स्वस्ताई.
**धेडा** पु. १. विवाहात मधुपर्क विधीच्या वेळी वराच्या शेजारी दुसरा सोबतीला बसवलेला मुलगा; पाणजावई. (कु., हेट.) २. (गंजिफाचा खेळ) सुरख्याबरोबर जे हलके पान हुकूम होत असते, तो हुकूम.
**धेडी** स्त्री. नवरीची पाठराखीण. (गो., कु.)
**धेडीसूत** न. धेड लोक पूर्वी कातून बाजारात विकायला आणीत ते सूत.
**धेणे** उक्रि. धरणे : 'तरि मौन धेलेंचि अर्जुनें। - गीता २.१६२८. (फक्त भूतकाळी प्रयोग होतो.) [सं. धृ]
**धेनू** स्त्री. गाय. [सं.]
**धे(धै)प** स्त्री. लांब; टांग; मोठे पाऊल. (गो.)
**धेर** पु. घोड्याचा रंग. - अश्वप १.२८.
**धेला** पु. पैसा. [हिं.]
**धेसापिट** क्रिवि. दशदिशा : 'आलें रे आलें भणत। धेंसापिटें जालें राऊत।' - शिव ९६६.
**धेंगसॉ** पु. धमकी; धाक; दम. (गो.)
**धेंचा** पु. हिरवळीच्या पिकाचे खत.
**धेंड-डे** न. १. अवजड आणि अवाढव्य शरीराचा माणूस; धूड. २. मोठा, प्रसिद्ध, श्रेष्ठ, प्रतिष्ठित माणूस; बडे प्रस्थ; मोठा विद्वान. ३. वेडगळ; अर्धवट माणूस. ४. शिरावेगळे शरीर. [हिं. ढेंढा]
**धेंडरवाळी** स्त्री. कराष्टमीपासून दिवाळीपर्यंतचे दिवस. यात एक एक दिवा दररोज वाढवून लावतात (व.)
**धेंडलॉ** पु. दिवाळीतील गुराख्यांचा एक उत्सव. कार्तिक शुद्ध प्रतिपदेला गुराख्यांची मुले कृष्णाच्या मूर्तीची डोक्यावरून मिरवणूक काढतात व नाचत घरोघर हिंडतात.
**धेंडवाळी** स्त्री. कोलीत; जळते लाकूड.
**धेंडशी-सी** स्त्री. एक भाजीचा वेल; दिलपसंत.
**धेंडस-से** न. त्या वेलीचे फळ; ढेमसे; दिलपसंत. (खा.)
**धेंड(डा)ळणे** अक्रि. गुदद्वाराने पातळ मळ वारंवार पडत असल्याने गळून जाणे, थकणे.
**धेंडा** पु. १. वरातीच्या दिवशी वधूवरांना खांद्यावर घेऊन कुलदेवतांची नावे घेऊन नवरीच्या मांडवात नाचतो तो माणूस : 'धेंडा नाचवील कृष्णनाथा।' - एरुस्व १६.१६६. २. धेंडा नाचविण्याचा कुळाचार, प्रकार. (क्रि. नाचविणे).
**धेंडा** पु. दवंडी : 'धेंडा फिरवूनि वानरफौजु।' - कृमुरा ४७.११७.
**धेंडा-ड** वि. दांडगा; मस्त.
**धेंडा(डो)ळी** स्त्री. डरंगळ; हगवण; वारंवार शौचाला होण्याचा आजार.
**धें(धे)डी** स्त्री. बायकांचे कर्णभूषण; तानवड : 'कानी धेंड्या आणिक वेलबाळ्या मोत्याचे सर।' - अफला ५५.
**धेंडे** न. समुदाय : 'आणि बाह्येंद्रियांचें धेंडें। पिटूनि विधीचेनि दंडें।' - ज्ञा १८.८३५.
**धेंडेवाळी** स्त्री. कोलीत : 'पिशाहार्ती धेंडे वाळी।' - एभा १०.५६८.
**धेंडोली-ळी** स्त्री. बलिप्रतिपदेला, कार्तिक शुद्ध प्रतिपदेच्या दिवशी गुराखी आपल्या गुरांच्या भोवती ओवाळतात ती गवताची चूड. (गो.) पहा : धेंडलॉ
**धेंड्या** पु. धेंड याचे तिरस्कारार्थी रूप.
**धेंपॉ** पु. ढेकूळ. (गो.)
**धैर्य** न. १. धीर; दम; निश्चय; अढळपणा. २. धाडस; धडाडी; धीर. ३. टणकपणा : 'पृथिवी सांडी जरी धैर्यातें।' - दाव ३९३.
वि. धैर्यवान : 'तरी धनुर्धरा धैर्या। निकें अवधान देई बा धनंजया।' - ज्ञा ९.९७. [सं.]
**धैर्यवान-शाली, धैर्याचा** वि. सोशीक; दृढनिश्चयी; धीराचा.
**धैवत** पु. सप्तस्वरांपैकी सहावा स्वर. [सं.]
**धो** उद्गा. एक विशिष्ट आवाज (वस्तू पडण्याचा). [ध्व.]
**धो** स्त्री. गाडीच्या चाकाला बसविलेली लोखंडी धाव, पट्टी.
**धो** स्त्री. खेळण्याचे हत्यार. - संव्या ६८.
**धोक** न. वेड. - बदलापूर १३५.
**धोक** पु. विणायला उपयोगी असा न उकललेला सुताचा गुंडा; थोक.
**धोक(ग)टी, धुकटी** स्त्री. (विशेषतः) न्हाव्याची वस्तरे ठेवण्याची, कातड्याची, दोन कप्प्यांची पिशवी. [हिं. धोकटी]
**धोकड** वि. बळकट; धाकट-ड. [हिं.]
**धोकडा** पु. (निंदार्थी) अगडबंब, लठ्ठ माणूस. (राजा.)
**धोकडे** न. वि. नीरस; बेचव.
**धोकणार** वि. (दारू) पिणारा, ढोसणारा; सुराभक्त. (गो.)
**धोकणी-नी** स्त्री. चिंता; चुटपुट; हुरहुर; फिकीर. (ना.)
**धोकणे** अक्रि. १. जमणे; गोळा होणे : 'धाकें धाकें धोकला रंग अवघा।' - दास १४.४.१९. २. हादरा बसणे. [सं. स्तोक]
**धोकर** पु. दगा. (व.)
**धोकरा** पु. म्हातारा. (गो.) [गु. डोकरा]
**धोकसुचे, धोगसप** सक्रि. (काठीने) ढकलणे, ढोसणे. (गो.)
**धोका** पु. १. भीतीचे कारण; भय; संकट. २. काळजी; चिंता; अनर्थाची शंका; कुकल्पना : 'दिवटा सरवदा भाकून गेला। अंतरीं धोका लागला।' - दास ३.७.५९. ३. आपत्ती; वाईट प्रसंग; ओढवलेले संकट; खरी झालेली भीती. ४. व्यापारात तोटा; बूड; दुर्दैवाचा फटकारा. ५. (ल.) झोका. ६. बंडाळी; दंगा. [हिं. धोखा; गु. धोको] (वा.) ० **देणे**- फसविणे; ठगविणे. **धोक्यात आणणे** - चालू गोष्टीत अडथळा आणणे.

**धोका** पु. दस्ता; कापूस पिंजताना तांतीवर मारण्याचा ठोकळा.
**धोकाबिंदू** पु. पुराचे पाणी ज्या पातळीच्या वर गेले असता काठावरच्या शेतांना, घरांना इ. धोका असतो ती पातळी दाखविणारी खूण; धोक्याची पातळी.
**धोकावणे** क्रि. १. धोका येणे : 'स्वहित न घडे जाशील धोकावला।' – दावि ४४०.२. दगावणे.
**धोकाळ** पु. मोठा धडधड जळणारा विस्तव; प्रज्वलित अग्नी. (को.)
**धोकुटे** न. पोर.
**धोकेजना** क्रि. चिंताग्रस्त होणे. (झाडी)
**धोट** वि. धुवट.
**धोटणे** उक्रि. अधाशीपणाने, एकसारखे पुष्कळ प्रमाणाने पिणे. (को.) [ध्व. धोट धोट]
**धोटधोपट** स्त्री. मारहाण.
**धोटनी** स्त्री. लोचटपणा. (व.)
**धोटा** पु. १. गांजाचा अंमल; गांजा पिणे; गांजाचे व्यसन. २. अधाशी–पणाने, गटगटा पिणे. (क्रि. लावणे).
**धोटा–टे** पु. न. १. (विणकाम) उभ्या सुतात आडवे धागे टाकण्याचे साधन. २. गुरांना औषध पाजण्याचे नळकांडे. ३. पोकळ नळा; पिचकारी : 'घेओनी कनकाचे धोटें। सिंपताती एकें जवटें।' – शिव ६६९.
**धोड** स्त्री. निबर; टणक; कडक; कोवळा नसलेला : 'रोड बदरिची फोड जोडतां वोढवितो मुरू धोड.' – अमृत सुदामचरित्र १०. (व.)
**धोडकारा** पहा : **धोड्यारो**
**धोडधोडा** पु. वाहत्या पाण्यामुळे पडणारा खड्डा. (झाडी)
**धोडा** पु. नाली; पाणी जाण्याचा मार्ग.
**धोडा** पु. कच्चे फळ. (गो., हेट.)
**धोडावचे** सक्रि. ठोकणे; ठोठावणे. (गो.)
**धोडी** स्त्री. भांडी घडवण्याचे तांबटाचे हत्यार : 'तांबटास भांडी घडावयाची धोडी कल्याणास आहेत म्हणून विदीत झाले.' – पेद ९.६४.
**धोडी** स्त्री. १. गायकांची एक जात. २. गायनाचा एक प्रकार : '४७।।। धोडी गाणार आसामी २ यास एकूण सनगे ३.' – इसंपेदसपमा पृ. १५७.
**धोडी** स्त्री. पुतणी. (जुन्नरी) [सं. दुहितृ]
**धोडो** पु. काकडा; पोत; चूड. (गो.)
**धोड्यारो** पु. एक प्रकारचा पांढरा मासा. याच्या कपाळात तीन पांढरे दगड नेहमी सापडतात असे म्हणतात. (गो.)
**धोण** न. १. झाडाचे खोड; बुंधा. २. ठोकळा; ओंडा. पहा : **ढोण**
**धोणका, धोणा–ण्या** वि. अडाणी; गावंढळ; आडदांड.
**धोणकी, धणकुटी** स्त्री. अतिरक्तस्रावामुळे होणारी मृत्युसूचक वेदना.(गो.)
**धोणके** न. एकही सुका दाणा नसलेले कणीस. (गो.)
**धोणा** पु. १. ठोकळा; ओंडा; धोण. २. वल्ही अडकवण्याचा दांडा. (कु.)
**धोण्या** पु. माकडांच्या टोळीचा म्होरक्या.
**धोत** पु. १. झोत; लोल; पाण्याचा धबधबा. २. आगीचा लोट, झोत. [ध्व.]
**धोत** स्त्री. ओंजळ; दुप्पट पसा.
**धोत** स्त्री. १. एक विवाहोत्तर विधी. २. सुंभाची दोरी. (झाडी)
**धोतडी** स्त्री. जुनेराचा पाळणा.
**धोतडेजना** अक्रि. तांदळाला जळमटे लागणे.
**धोतडेजला, धोतडेला** वि. जळमटे लागलेला.
**धोतर** न.पुरुषांचे नेसण्याचे, पांघरण्याचे वस्त्र. (क्रि. नेसणे). [क. दोत्र; सं. धौत्र] (वा.) ० **सोडून नाचणे** – मोठा आनंद व्यक्त करणे; आनंदाने बेहोष होणे.
**धोतरजोडा–डी** पु. स्त्री. एक सलग विणलेली धोतराची जोडी.
**धोतरपाडवा** पु. दौहित्र प्रतिपदा.
**धोतरा** पु. एक फुलझाड व त्याचे फूल, बी. हे विषारी असते.[सं. धत्तूर] (वा.) ० **घालणे, देणे** – (स्त्रीला ती भ्रमिष्ट होण्यासाठी) धोतऱ्याचे बी, विष देणे. (या वेडातील बडबडणे भविष्यसूचक असते अशी समजूत आहे.) ० **येणे, होणे** – धोतऱ्याच्या विषामुळे भ्रमिष्ट होणे, बडबडणे.
**धोतरा** वि. वेडा; पिसाट; निर्बुद्ध; मूर्ख; अजागळ (माणूस).
**धोताटी** स्त्री. आंबे उतरण्याचे साधन; आकडी; गळ. (बे.)
**धोताल–ल्या** वि. १. फार खर्चीक; सढळ हाताचा; उदार; दानशूर (चांगल्या व वाईट अर्थी). २. सढळ, भरपूर, अनियंत्रित (खर्च). ३. वचने देण्यात, गप्पा मारण्यात अघळपघळ. ४. तोंडाळ; अव्यवस्थित; व्यसनी; बेछूट वृत्तीचा.
**धोती** स्त्री. (काशी) पहा : **धोतर** [हिं.]
**धोतीपोती** पु. हठयोगसाधनांपैकी एक प्रकार. मुखावाटे पांढरे स्वच्छ फडके गिळून ते गुदद्वाराने (आतील भाग स्वच्छ करून) बाहेर काढणे.
**धोत्रपात्र** न. १. वस्त्रे, पात्रे इ. २. धोतरे व तसल्या दुसऱ्या वस्तू.
**धोत्री** पु. डॉक्टर; वैद्य : 'दुलेखान यास गोळी लागली तेव्हा धोत्रीकडे घेऊन चालले तेव्हा वाटेतच काळ आला.' – पेद भाग ४१ पत्र २१०.
**धोत्र्या** पु. १. धोतरे धुणारा ब्राह्मण; शागीर्द. २. (चोळणा नेसणारे ब्राह्मणेतर लोक ब्राह्मणांना निंदेने म्हणतात.) ब्राह्मण; धोतर नेसणारा.
**धोदर** वि. फुगीर; सुजरा.
**धोदर–रा–री** स्त्री. पु. फुगवटा; फुगीरपणा; सूज.
**धोदरणे** अक्रि. सुजणे; एकदम मोठे होणे; फुगणे.
**धोदराट** पु. एकदम पुष्कळ आलेली सूज.
**धोदरी** स्त्री. छिद्र; भोक. (व.)
**धोदऱ्या–ल्या** पु. फोपशा. (राजा., व.)
**धोद(न)शी–सी** स्त्री. थुलथुलीतपणा; फोपशेपणा; फुगीरपणा.
**धोदा–धा** पु. उंचावरून पडणारा पाण्याचा लोट, लोंढा; धबधबा.[ध्व.]
**धोदाट, धोधाट–टा–णा–णी** पु. १. पाण्याचा लोंढा; धोत. २. आगीचा डोंब. ३. वाऱ्याचा मोठा झोत; सोसाटा. ४. बंदुका, तोफा इ.चा धूमधडाका; धाडधाड आवाज. [ध्व. धोदा]
**धोदाणा–ना** पु. १. पाण्याचा जोरदार प्रवाह; वेगाने वाहणे. २. मोठ्या आवाजाची पिपाणी.
**धो(धों)धवड** न. धोटा; पिचकारी : 'मकरंदाची धोधवडे : नागवीति

संयमाते' - उगी ४३६.

**धोधाटणे** अक्रि. १. अतिशय पिणे; गटगटा ढोसणे. २. तहानेने व्याकूळ होणे. [ध्व.]

**धोधाणी** स्त्री. १. धबधबा. (को.) २. (ल.) जखमेतून वाहणारा मोठा रक्तप्रवाह.

**धोधावणे** अक्रि. एकदम खाली कोलमडून पडणे; आदळणे. [ध्व.]

**धो धो, धों धों, धोधोधो** क्रिवि. पाण्याच्या, धबधब्याच्या, जोराच्या पावसाच्या, तोफ इ. च्या होणाऱ्या आवाजाचे अनुकरण : 'धोंधों जे हे लागले येथ वाहों ।' - विवि ८.३.५९. [ध्व.; सं. अंधः अंधः]

**धोनारणे** क्रि. मुरगाळणे : 'धोनारिती चोखोट मन्मथचये ।' - भाए ४०७.

**धोन्यामेळा** पु. लग्नातील एक कुळाचार. (कु.)

**धो(धू)प** स्त्री. १. लांब व सरळ तरवार. हिला 'आसासमशेर' असेही म्हणतात. २. वरील तरवारीच्या सपाट बाजूने मारलेला, दोन्ही हातांनी काठी धरून मारलेला फटका, तडाखा. ३. (ल.) (झाड इ. चे) फताडे पान, पात. (वा.) ० **सांभाळणे** - बाणी, प्रसंग, नड सांभाळणे : ...'परंतु (म्हणून) आज धोप सांभाळावी.' - ऐलेसं ५२५७.

**धोप** पु. १. लांब व मोठे कणीस. २. फुलांचा गेंद. (अहि.)

**धोप** अ. पांढरा या शब्दाला जोडून येणारा अतिशयत्वदर्शक प्रत्यय.

**धोप** स्त्री. १. उत्साह; उमेद. (कर.) २. रोख; मोहरा; आवई; झोक : 'निपाणीवर जाण्याची धोप घातली.' - ऐलेसं ५१३९.

**धोप** वि. १. अखंड; शाबूत; मजबूत. २. लांबलचक; सरळ ;(यावरून) लांब हत्यार; त्याचा तडाखा. [सं. स्तुप्, स्तुभ्]

**धोपकाट** पु. धोब्यांचे धुणे धुण्याचे ठिकाण.

**धोपट** न. भाकरी; थालीपीठ : 'समर्थासी कपटबुद्धीनें आमंत्रण दिधलें। समर्थें सजगुऱ्यांचें धोपट करविलें।' - सप्र १८.११.

**धोपट** वि. धुवट; धुतलेले.

**धोपट** वि. सरळ; मोठा; फार दळणावळणाचा (रस्ता). क्रिवि. सरळ; तडक; थेट.

**धोपटणे** सक्रि. (काठी इ.ने) बडवणे; मारणे; चोपणे; ठोकणे. [ध्व. धप्प;क. दोप्पळिसु]

**धोपटणे** सक्रि. निभावून नेणे; कसेतरी काम करणे. (व.)

**धोपटमार्ग** पु. १. राजमार्ग; ज्याने गेले असता चुकण्याची फारशी शक्यता नसते, असा सरळ रस्ता. २. नेहमीची, परंपरागत चालत आलेली पद्धत, रीत; वहिवाट.

**धोपटीव** वि. काठीने, दांड्याने बडवलेला (कपडा, साल, काथ्या इ.).

**धोपणे** अक्रि. १. ऊन आणि श्रम यांच्यामुळे व्याकूळ होणे; अतिशय तहानणे : 'दु:शासनासि वधितों मी भीम गजासि धोपला हरिसा।' - मोकर्ण ४५.८. २. (ल.) (एखाद्या गोष्टीकरता) अतिशय उत्सुक, आतुर होणे. ३. व्याकूळ, दु:खित होणे : 'धर्ममर्यादेच्या संकोचें धोपले।' - मोरोपंत - सीतागीत - नवनीत पृ. २६१. [सं. धूप्]

**धोपरसंध्या** स्त्री. गुडघ्यापर्यंत पाय धुणे.

**धोपळा** पु. एक सर्पविशेष; भिवण. (गो.)

**धोपळा** पु. मोठे छिद्र; भगदाड.

**धोपा** पु. अळू. (ना.,व.)

**धोपाटी** स्त्री. दोन्ही हातांनी काठी धरून जनावरांना इ. जोराने मारलेला फटका; धोप.

**धोपारधडा** पु. भरमसाटपणाने, कसेतरी, अव्यवस्थितपणाने काम करण्याची पद्धत; चालढकल.

**धोबकार** न. चुनेगच्चीचे घर.

**धोबड** स्त्री. म्हैस; डोबड. (मालेगाव)

**धोबड** वि. १. बोजड आणि जाडाभरडा; (एखाद्या कामाच्या दृष्टीने) अयोग्य, मोठी असलेली (वस्तू). २. ओबडधोबड; अडाणीपणाची; अकुशल (एखाद्या वस्तूची बनावट, कारागिरी इ.). [क. दोप्प]

**धोबला** पु. जाडेभरडे वस्त्र.

**धोबी** पु. कपडे धुण्याचा धंदा करणारा; परीट. [सं. धू; सिं.; हिं., क. धोबि]

**धोबी** पु. झाडावरील किडे खाणारा एक पक्षी; बाणपाखरू.

**धोबीपछाड** पु. (मल्लविद्या) एक डाव. (प्रतिपक्षाला धुण्याच्या वस्त्राप्रमाणे आपटून चीत करणे.) प्रतिपक्षाच्या बगलेत आपला खांदा देऊन फिरून पाठीवरून त्याला पाडतात असा डाव.

**धोम्या** पु. धोतरबडव्या; शागीर्द; धड्ड. (माण.)

**धोया** पु. (नाविक) खुंटीच्या आकारासारखे लाकूड. (हेट.)

**धोया, धुय्या** वि. नागडाउघडा; अवधूत.

**धोरड** पु. धुरा; दोन शेतांमधील बांध किंवा सीमा; दोन्ही शेतांच्या दरम्यान सोडलेली, न नांगरलेली व न पेरलेली पड जमीन : 'त्याजखाले पूर्वाभिमुख धोरड माचाडास आडसरावरी आला' - मइसा १८.१.

**धोरडा** पु. (झाडाची साल, वस्त्र इ.ची) चिरफळी; चिंधी; धांदोटी; चिरोटी. (वा.) ० **काढणे** - लुबाडणे.

**धोरण** न.पु. १. तोंड; दिशा; संधान; नेम; रोख. २. केवळ नजरेने पाहून एखाद्या गोष्टीच्या स्वरूपाविषयी केलेला अंदाज, अजमास; अटकळ बांधण्याची बुद्धीची चतुरता; खरा तर्क. ३. (बोलताना, एखादी गोष्ट करताना करण्याचा) मागचा पुढचा विचार; पोच; सारासार विचार. ४. (एखाद्याच्या बोलण्यावागण्यावरून त्याच्या) उद्देशाची, हेतूची तर्काने कळणारी दिशा, रोख, स्वरूप. ५. सावधानतेची नजर, दृष्टी; लक्ष्य; काळजी. ६. (मनाचा, विचाराचा) कल, झोक, रोख. ७. (एखादे काम करण्याची) हातोटी; विशिष्ट पद्धत; सरणी; शैली. ८. धारा; व्यवहार इ.तील संप्रदाय; वळण; वहिवाट. ९. पूर्वापार चालत आलेली पद्धत; रीत. १०. मार्ग; रस्ता : 'कीं तेथ अनुभवाच्या पाउलीं। धोरणू पडिला।' - ज्ञा ६.१५४. ११. सुषुम्नानाडीचा मार्ग. (क्रि. पडणे.) - हंको. [सं. धुर्]

**धोरणी** वि. दूरवर विचार करण्याची बुद्धी ज्याला आहे असा; धूर्त; दूरदृष्टी असलेला; तर्ककुशल.

**धोरणे** सक्रि. मैथुनाद्वारा (स्त्रीला) उपभोगणे; संभोग करणे.

**धोरवटा** पु. धोरण या शब्दाच्या काही अर्थी वापरतात.

**धोरवा** पु. धोरण; धारणक्रिया : 'आम्ही कार्याकारणे कमी जाजती सिबंदीचा धोरवा धरुन आहो.' - पेद ६७.११२. [सं. धृ]

**धोरवा** पु. १. सखल शेत. २. रांग. (झाडी)

**धोलासन** न. एक आसन. उताणे झोपून पाय डोक्याकडे पाठीमागे नेऊन उजव्या हाताने डाव्या पायाचा व डाव्या हाताने उजव्या पायाचा अंगठा धरावा. – व्याज्ञा ४.५०४.

**धोलेरा** पु. अफूचा दोडा; बोंड. – कृषि ४९८. (गुज.)

**धोवट** न. धुण्याची क्रिया : 'करितां वस्त्राचें क्षाळण । स्वच्छपण धोवटीं ।' – एभा १९.२६३.

वि. पहा : **धुवट**

**धोवट** वि. बलवान; निर्दोष.

**धोवभाव** पु. नवरेपणाचा आविर्भाव, वरचष्मा.

**धोशा, धौशा–सा** पु. १. मोठी नौबत; नगारा. २. (ल.) डंका; गाजावाजा; बोभाटा. (क्रि. गाजविणे, होणे). ३. निशाण; ध्वज. ४. (ल.) मोठा लौकिक; नाव; बडेजाव; प्रसिद्धी. ५. हल्ला; रणकंदन : 'चोहोंकडून हर! हर! म्हणोन घोडे घातले; एकच धौशा केला.' – भाब १२१. ६. मर्दुमकी; पराक्रम; यशाचा झेंडा : 'या प्रमाणें यश संपादून धौशा गाजवून जनकोजी शिंदे शहाजणें वाजवीत गोटास चालले.' – भाब १३५. [ध्व.; हिं. धौंसा]

**धोशा, धौशा–सा** पु. १. नेटाचा, झटून केलेला, निकराचा प्रयत्न; आवेश व परिश्रमयुक्त कार्य; (एखाद्या गोष्टीवर) तुटून पडणे; निकराचा हल्ला. (क्रि. लावणे). २. उद्दामपणाची, दंडेलीची वर्तणूक; कांच; जाच; छळ. ३. धाक; भीती : 'धोशा धुळपाचा अति आनंदराव रणशूर ।' – ऐपो ४५१. ४. मनाला लागलेली टोचणी; ध्यास; धोसरा; ससेमिरा; टुमणे : 'येऊनजाऊन भाषांतराचा धौशा.' – नि १९५. ५. सपाटा; तडाखा; ठोका; सारखा क्रम. उदा. पेरणीचा – लिहिण्याचा – काहीतरी करण्याचा धोशा. [हिं. धौस]

**धोष्ट–ष्ट्या** वि. सुस्त; मंद आणि अजागळ; गबाळ्या; गैदी राहणीचा (मनुष्य). (को.)

**धोस** पु. त्रास; जाच. (गो.)

**धोसचे** सक्रि. त्रास देणे; छळणे. (गो.)

**धोसणी** स्त्री. टोचणी; ढोसणी.

**धोसरा** पहा : २ **धोशा** १, ३–५

**धोसा** पु. लोकरीचे एक प्रकारचे जाडेभरडे कापड; धुस्सा. [हिं.]

**धोळ** पु. अग्नीच्या ज्वाळांचा लोळ, लोट. (को.)

**धोळती** स्त्री. धोटनी; लोचटपणा. (व.)

**धोंगड** वि. १. खरबरीत (कापड, चटई, बैठक). २. ओबडधोबड; अकुशल; धसमुसळे (काम, युक्ती) : 'तेथ मी ज्ञाता हे धोंगडी युक्ती । स्फुरे निश्चितीं सूक्ष्म दंभें ।' – एभा २३.२३९. ३. बेढब; अडाणी; असंस्कृत (माणूस) : 'मी तो महाराजांचा धोंगडसा वाणी ।' – दावि ३३२. [हिं. धोकड]

**धोंगडा–डे** पु. न. दणकट, जाडेभरडे कपडे; चिरगूट, कापड इ. : 'वस्त्र नेसलीसे धोंगडा ।' – मसाप १.२.

**धोंगस** पु. सुरत; संभोग. (गो.)

**धोंड** स्त्री. १. मोठा, जड धोंडा, दगड; खूप मोठी शिळा; खडक. २. (ल.) व्यापारात आलेली बूड. ३. सरकारने लादलेला फार मोठा कर. ४. मोठे संकट, दुःख. ५. दडपणारी काळजी, चिंता. ६. मोठा आळ, आरोप. ७. ओझे; भार. [क. दोड्ड] (वा.) ० **डोकीवर चढविणे, देणे, वाळविणे; ० पडणे, येणे** – १. प्रचंड वित्तहानी होईल असे दरोडा इ. संकट येणे. २. एखाद्यावर बळेच काम लादणे. ३. एखाद्या मागणीविषयी जुलमाने कबुली घेणे, रुकार मिळविणे.

**धोंडगळ** वि. दगडमय; खडकाळ (जमीन).

**धोंडदिवस** पु. धर्मकृत्याला योग्य अशा दोन तिथींमधला तिथिवृद्धीमुळे येणारा दिवस; भाकड दिवस.

**धोंडपय** स्त्री. अडथळा. (अहि.)

**धोंडफूल** न. दगडफूल; पावसाळ्यातील दगडावरची, लाकडावरची फुलासारखी उगवण.

**धोंडफोड्या** वि. १. पाथरवट. २. (ल.) पहा : **दगडफोड्या**

**धोंडभट्टी** स्त्री. स्नान केलेले नसताना ते केल्यासारखे दिसण्यासाठी गंध, भस्म इ.नी आपले शरीर सजविणे; स्नानाशिवाय गंध लावणे. (क्रि. करणे) : 'येतो हा धोंडभट्टी द्विज करुनि सदा तीर्थ द्याया पदांचे ।' – मसाप ४.३.१६४.

**धोंडमहिना–मास** पु. पुरुषोत्तममास; अधिकमास; मलमास. (या महिन्यात धर्मकृत्ये होत नाहीत म्हणून).

**धोंडवणी** न. (चव, लज्जत येण्यासाठी) ज्यात ठिकरी विझविली आहे असे ताक; ठिकरी तापवून चटका दिलेले ताक; (निंदार्थी) ठिकरीचा वास लावलेले ताक; ताकतव.

**धोंडवाण–वण–वन–वायन** न. १. अधिक महिन्यात ब्राह्मणाला दिलेली वायने, दिलेले भोजन. २. दिंड; आत पुरण घालून उकडलेला कणकेचा गोळा; धोंडा. अधिक महिन्यात याचे वाण देतात.

**धोंडशीर** स्त्री. १. पायाच्या टाचेवरची मोठी शीर. २. हाताची शीर. ३. कानाजवळची शीर.

**धोंडा** पु. १. दगड. २. अधिक महिना. हा प्रत्येक अडीच वर्षांनी येतो. ३. पहा : **धोंड** २. ४. (ल.) मूर्ख, अक्कलशून्य माणूस. ५. कठीण हृदयाचा, निर्दय, पाषाणहृदयी माणूस. (वा.) ० **लोटणे, घालणे** – एखाद्यावर मोठे संकट आणणे, कचाट्यात घालणे. **धोंडे खणून काढणे** – पाया, पाळेमुळे खणून काढणे; निर्मूलन करणे; उखडणे; काढून देणे; एखाद्याने अजिबात निघून जावे म्हणून हात धुऊन त्याच्या पाठीला लागणे. **धोंडे फोडणे** – एखाद्याच्या नावे त्याने अहित केले अशा समजुतीने शिव्या घालणे. **धोंडे मारू लागणे** – १. एखाद्यावर चालून जाणे; मारायला धावणे. २. (उप.) वेड लागणे; वेडा होणे. **धोंड्याखाली हात सापडणे** – पेचात, अडचणीत येणे. **धोंड्याचे दोर काढणे** – १. अशक्य गोष्ट करण्याचा प्रयत्न करणे. २. साधनांची अनुकूलता नसताना मोठ्या युक्तीने, निश्चयाने काम सिद्धीला नेणे. **धोंड्यावर धोंडे घालणे** – निष्फळ, निरुपयोगी प्रयत्न करणे. **धोंड्यावर धोंडे घालून करणे** – पैसे इ. पाठबळ नसताना प्रयत्नांनी, युक्त्यांनी कार्य करणे. **धोंड्याशी कपाळ घासणे** – (मूर्खाला शिकवणे इ. मध्ये) स्वतःला व्यर्थ शिणवणे. **चार ठिकाणी धोंडे टाकून पाहणे** – स्वतःचे काम साधण्यासाठी अनेक ठिकाणी, अनेक

प्रयत्न करून पाहणे. **पायावर धोंड ओढून, पाडून घेणे** – आपल्यामागे नसते लचांड लावून घेणे; स्वत:वर संकट ओढवून घेणे. **वाटोळा धोंडा** – दुसऱ्याच्या पेचात, तावडीत, सापळ्यात कधीही न सापडणारा धूर्त माणूस. **हाती धोंडा घेणे** – अतिशय चिडणे; मारायला धावणे.

**धोंडाळ** वि. १. दगडाळ; खडकाळ. २. एक प्रकारची काळी (जमीन). हिच्यात फार धोंडे असल्यामुळे पाणी जास्त टिकते, म्हणून पिकाला ही चांगली असे समजतात.

**धोंडी** स्त्री. वरुणदेवाला प्रसन्न करण्यासाठी निंबाची पाने अंगाभोवती गुंडाळून सज्ज केलेली व्यक्ती. (अहि.)

**धोंडी** स्त्री. आकार.–मनको.

**धोंद** न. लोंढा : 'धोंदावरी धोंद धोंद पडलं दोहींचं भरताराचं सुख बाई काशीयाबाईचं.' – राके २५०.

**धोंदराट** पु. मोठा धडधडणारा विस्तव; धोकाळ.

**धौ** स्त्री. गेरूचा रंग; काव.

**धौकडी** स्त्री. भूलथाप. (ना.)

**धौत** वि. १. धुतलेला; स्वच्छ केलेला; निर्मळ. २. पवित्र : 'आणि तीर्थें धौतें तटें। तपोवनें चोखटें।' – ज्ञा १३.६११. [सं.]

**धौतल–ल्या** वि. उदार; खर्चीक; पहा : **धोताल** : 'भलाच धौतल्या दिसतोस.' – बाळ २.१८३.

**धौती** स्त्री. शरीरांतर्गत भागांची शुद्धी. – संयोग ३५५. [सं.]

**ध्याई** स्त्री. १. मन. २. पोट. ३. छाती. (बे.)

**ध्याजत** स्त्री. नामुष्की; अप्रतिष्ठा : 'परंतु ध्याजतीनें तोंड दाखवील ऐसे नाहीं' – पेद १६.७७.

**ध्याड** पु. दिवस. (कुण.)

**ध्याणे** सक्रि. ध्यान, चिंतन करणे. [सं. ध्यान]

**ध्यात** वि. चिंतिलेला; ज्याचे ध्यान केले आहे असा. [सं. ध्यै]

**ध्यातव्य** वि. १. ध्यान, चिंतन करण्यास योग्य, शक्य; चिंतनीय. २. विचारात घेण्यासारखा; विचारार्ह. [सं.]

**ध्याता** वि. ध्यान, चिंतन, मनन करणारा. [सं.]

**ध्यादिवसा** क्रिवि. भरदिवसा; दिवसाढवळ्या : 'ध्या दिवसा लेका सवास्त पडलाइस ढोरावाणी घोरत!' – माटे – अस्पृष्टांच्या डायरीतील पाने.

**ध्यान** न. १. मनन; चिंतन. २. (विशेषत:) अष्टांगयोगातील वृत्तिनिग्रहरूप अंग, प्रकार; मनाची एकाग्रता. ३. विषयाचे आकलन करण्याची शक्ती; लक्ष. ४. देवाची मूर्ती, चित्र इ.मध्ये आयुधभेद, वीरासनादी स्थितिभेद, उग्रता, सौम्यपणा इ. विशिष्ट गुणयुक्त दाखवलेले स्वरूप, मुद्रा : 'सुंदर तें ध्यान उभें विटेवरी।' – तुगा १. ५. परमेश्वराचे, एखाद्या देवतेचे स्वरूपवर्णन करणारी कविता, पद इ. ६. (व्यापक) विशिष्ट रूप; ढब; मोडणी; डौल; चिन्ह; तऱ्हा; पद्धत. ७. (उप.) गबाळा व भोळसट मनुष्य; द्वाड व घाणेरडा मुलगा. ८. सावधगिरी; अवधान. ९. स्मरण; आठवण; स्मृती. १०. शरीरावयवांची विषयग्रहणाविषयी जागृती; भान जाग्यावर असणे; शुद्धी. ११. आवड; पसंती. [सं.] **ध्यानात येणे** – पसंत पडणे; आवडणे; बरी आशा वाटणे. **ध्यानास लागणे** – एखाद्या गोष्टीचा ध्यास लागणे; एखादी गोष्ट डोक्यात घोळणे. **ध्यानीमनी नसणे** – कल्पनेत नसणे.

**ध्यानका** स्त्री. कुरूप, हिडीस, धिप्पाड दिसणारी, पुरुषी स्त्री.

**ध्यानणे** अक्रि. उमजणे; समजणे; जाणणे; उमगणे : 'गोसावी मनांत ध्यानला' – मसाप १.२.२३.

**ध्यानधारणा** स्त्री. १. एकाग्रतेने केलेले चिंतन, मनन. (क्रि. करणे, धरणे.). २. (एखाद्या गोष्टीचे, माणसाचे) बाह्यस्वरूप, चर्या, मुद्रा.

**ध्यानमुद्रा** स्त्री. १. ध्यान करताना विशिष्ट प्रकारे बसण्याची स्थिती, बैठक, आसन. २. ध्यान करताना भ्रुकुटी वाकड्या होणे इ. प्रकारांनी युक्त चर्या, मुद्रा.

**ध्यानयोग** पु. ईश्वरप्राप्तीचे ध्यानरूप साधन; अमूर्तचिंतन.

**ध्यानवा** स्त्री. गाय; धेनू.

**ध्यानस्थ** वि. १. ईश्वरचिंतनात मग्न झालेला, गढलेला. २. विचार करण्यात गुंग झालेला; विचारमग्न. [सं.]

**ध्यानी, ध्यायक** वि. (ईश्वराचे) ध्यान, चिंतन करणारा : 'ध्यायक हृदयीं हृदयस्थ।' – भूपाळी गणपतीची ४. [सं.]

**ध्यानीमनी** क्रिवि. १. अंत:करणाच्या अनेक अवस्थाभेदांच्या ज्या वृत्ती त्यांपैकी एका वृत्तीत. (अकणरूपी प्रयोग). २. अवस्थाभेदांनी होणाऱ्या अंत:करणाच्या अनेक वृत्तींना व्यापून.

**ध्यास** पु. (एखादी गोष्ट, व्यक्ती इ.चा) क्षणमात्रही विसर पडत नाही असा अंत:करणाला होणारा भास; घोकणी.

**ध्येय** वि. १. ध्यान करण्यास, चिंतण्यास योग्य. २. साध्य, प्राप्त करून घेण्याजोगे.

न. आयुष्यातील इतिकर्तव्य; अंतिम साध्य; इष्टसिद्धी. [सं.]

**ध्रुपद** न. १. (संगीत) चिजेचा एक प्रकार. अस्ताई, अंतरा व आभोग असे यात तीन भाग असतात. २. (गाण्याचे, पदाचे) पालुपद, अकडकडवे. ३. अभंगातील प्रमुख विचार सांगणारा चरण. बहुधा दुसऱ्या चरणात हा विचार असतो. (वा.) **(एखाद्याच्या मागे) ० धरणे** – एखाद्याची री ओढणे.

**ध्रुपद्या** पु. हरिदासामागे उभे राहून त्याला ध्रुपद, पालुपद म्हणू लागणारा, साथ करणारा माणूस, साथीदार.

**ध्रुव** पु. १. पृथ्वीच्या उत्तरेला असणारा एक अढळ तारा. २. पृथ्वीच्या, खगोलाच्या आसांच्या दोन टोकांपैकी प्रत्येक; उत्तर व दक्षिण ध्रुव. ३. (ज्यो.) सत्तावीस योगांपैकी बारावा योग. ४. सूर्यवंशातील उत्तानपाद राजाचा मुलगा. ५. पहा : **ध्रुपद** २. ६. (ताल) एक मात्राप्रमाण. पहा : **ध्रुवताल**. ७. नाकाचा शेंडा; नासिकाग्र.

वि. १. शाश्वत; निरंतर. २. स्थिर; अढळ; अचल. [सं.]

**ध्रुवक** पु. (ज्यो.) ज्या अंकावर काही संस्कार करून विवक्षित तिथी, ग्रह इ. काढता येतात ते अंक; कच्चे गणित.

**ध्रुवताल** पु. (संगीत) कर्नाटक संगीत पद्धतीतील एक ताल. याचे ११, १४, १७, २३, २९ असे पाच मात्रा प्रकार आहेत.

**ध्रुवपद** न. १. ध्रुवबाळाला दिलेले अढळ स्थान. २. ध्रुवताऱ्याचे स्थान,

पद. ३. (ल.) शाश्वत टिकणारे, वैभवाचे उच्च स्थान, पद. ४. पहा : **ध्रुपद** [सं.]
**ध्रुवभोग** पु. ध्रुवताऱ्यापासून नक्षत्र, ग्रहादिकांचे अंशात्मक अंतर. [सं.]
**ध्रुवमत्स्य** पु. (ज्यो.) लघुऋक्ष; लघुऋक्षातील दोन मुख्य ताऱ्यांपैकी एक.
**ध्रुववृत्त** न. ध्रुवापासून २३।। अंशावर असणारे विषुववृत्ताशी समांतर कल्पितवृत्त. विषुववृत्तापासून उत्तरेला व दक्षिणेला असलेले ६६।। अंशांवरील अक्षांशवृत्त.
**ध्रुवक्षेत्र** न.उत्तर भारतातील एक ठिकाण. या स्थानाला ब्रह्मावर्त म्हणत. या प्रांतात ग्रामरचना सुरू झाली असावी.
**ध्रुवा** स्त्री. पृथ्वी; वसुंधरा. [सं.]
**ध्रुवाकर्षप्रेरणा** स्त्री. (ज्यो., पदार्थ.) मध्यबिंदूकडे ओढणारी प्रेरणा, शक्ती. (इं.) सेंट्रिपीटल फोर्स.
**ध्रुवात्मक** वि. (पदार्थ.) ज्यामध्ये चुंबकासारखे आकर्षण उत्पन्न केले आहे असा; ध्रुवसंपन्न झालेला, केलेला (धातुमय पदार्थ, शलाका इ.).
**ध्रुवांक** पु. गणित करताना सुरुवातीला गृहीत धरलेला अंक.
**ध्रुवांश** पु. (ज्यो.) अवकाशस्थ गोलाचे (त्याला जवळ असलेल्या) ध्रुवापासूनचे अंशात्मक अंतर.
**ध्रुवीभवन** न. १. एखाद्या पदार्थाची, धातूची दुसऱ्या पदार्थावर रासायनिक क्रिया होऊन तो पदार्थ ध्रुवसंपन्न, चुंबकासारखा आकर्षणयुक्त बनणे. २. प्रकाशलहरींच्या कंपनांमध्ये फरक होणे; (इं.) पोलरायझेशन.
**ध्रुवोत्सारप्रेरणा** स्त्री. मध्यापासून दूर लोटणारी प्रेरणा, फोर्स.
**ध्रुवोन्नती** स्त्री. (ज्यो.) ध्रुवाची एखाद्या पातळीपासून अंशात्मक उंची; ध्रुवाचा उन्नतांश.
**ध्रुवोन्मुखता** स्त्री. चुंबकाची दोन टोके अनुक्रमे उत्तर व दक्षिण या दिशांकडे आकर्षिली जाण्याचा चुंबकाचा गुण. –मपु ६.१८७५. पृ. ७८.
**ध्वज** पु. काठी किंवा खांबाला लावलेले विशिष्ट चिन्हांकित वस्त्र; निशाणी झेंडा; पताका. [सं.] (वा.) ० **लावणे** – १. विद्या, शौर्य इ.मुळे मोठी कीर्ती संपादणे; नाव गाजविणे, कमाविणे. २. (उप.) कुप्रसिद्ध होणे; अपकीर्ती मिळविणे.
**ध्वजनौका** स्त्री.नौसेनाधिपती(ॲडमिरल)ना घेऊन जाणारे जहाज.
**ध्वजपात–भंग** पु. क्लीबत्व; षंढपणा; नपुंसकत्व.
**ध्वजसंहिता** स्त्री. १. राष्ट्रध्वजारोहणासंबंधीचे नियम. २. झेंड्यांच्या साह्याने संदेश पाठविण्याची सांकेतिक भाषा; (इं.) फ्लॅग कोड.
**ध्वजस्तंभ** पु. ध्वजाचा खांब; निशाणाची काठी. [सं.]
**ध्वजा** स्त्री. १. निशाण; पहा : **ध्वज**. २. वर्षप्रतिपदेच्या दिवशी उभारतात ती गुढी.
**ध्वजापर्वणी** स्त्री. गुरु ग्रह सिंह राशीत संक्रांत होतो तो सिंहस्थाचा दिवस. या दिवशी त्र्यंबकेश्वरात गोसाव्यांचे बरेच आखाडे (निरनिराळ्या ध्वजांचे) येतात.
**ध्वजाय** पु. घराच्या जमिनीच्या लांबी–रुंदीवरून आठ प्रकारचे आय सांगितले आहेत त्यांपैकी एक. पहा : **आय**
**ध्वजारोपण** न. १. वर्षप्रतिपदेच्या दिवशी गुढी उभारण्याचा विधी. २. (सामा.) निशाण, झेंडा रोवणे, उभारणे, लावणे. [सं.]
**ध्वजा(ज)वंदन** न. राष्ट्राच्या निशाणाला सामुदायिक वंदन करण्याचा विधी; झेंडावंदन. [सं.]
**ध्वजाहृत** वि. १. युद्धात जिंकून आणलेला (दास इ.). २. अविभाज्य धनाचा एक प्रकार. [सं.]
**ध्वजिनी** स्त्री. सेना; सैन्य.
वि. झाडे इ.नी ठरविलेली हद्द, सीमा. [सं.]
**ध्वनणे** सक्रि. सांगणे; दर्शित करणे : 'न सांडिता होय माझी भेटी। तेही गोष्टी ध्वनिलीसे।' – एभा १३.७१७. [सं. ध्वनन]
**ध्वनन** न. १. आवाज करणे. २. (एखादी गोष्ट) प्रत्यक्ष त्या शब्दांत न बोलता, अर्थापत्तीने सुचविणे; दर्शित, ध्वनित करणे. [सं.]
**ध्वनि** पु. १. श्रोत्रेंद्रियाला आकलन करता येणारा आवाज, शब्द. २. वाच्यार्थाव्यतिरिक्त अर्थ सूचित करण्याचा वाक्य इ.च्या ठिकाणी असणारा गुण; गर्भितार्थ. ३. काव्याचा व्यंगार्थबोधक एक प्रकार. ४. स्पष्टपणे न ऐकलेली, संदिग्ध, संशयित गोष्ट, अफवा; कुजबुज : 'तरि अगा ऐशिया ध्वनी। झणे थारा देशी हो मनीं।' – ज्ञा ८.१२३. ५. भावार्थ; अभिप्राय; सूचित, ध्वनित अर्थ. ६. ज्याचा निश्चित अर्थ स्पष्टपणे कळत नाही असे संदिग्ध वाक्य. [सं.]
**ध्वनिकी** पहा : **ध्वनिव्यवस्था**
**ध्वनिग्रह** पु. चुंबकीय साधनाने मुद्रित केलेला आवाज प्रसारित करण्यासाठी पकडणे.
**ध्वनिग्राहक** पु. ध्वनिलहरींचे परिवर्तन करणारे साधन.
**ध्वनिचित्र** न. रेडिओलहरींद्वारा पाठवलेले चित्र.
**ध्वनित** वि. १. वाजवलेला. २. सूचित; गर्भित (अर्थ इ.). ३. गूढ; अस्पष्ट; संदिग्ध : 'नातरी झकवीतु आहासी माते। कीं तत्त्वचि कथसी ध्वनितें।' – ज्ञा ३.१६. ४. संक्षिप्त; त्रोटक : 'बहुत बोलतां वाढेल ग्रंथ। ध्वनित बोलतां न कळे अर्थ।' – पांप्र ३६.९. ५. काव्यरूपाने, अलंकारिक रीतीने सांगितलेला (अर्थ, गोष्ट). [सं.]
**ध्वनित करार** मूकपद्धतीने एखादी गोष्ट कबूल करण्याचा (शब्दांइतकाच बंधनकारक) प्रकार.
**ध्वनितंतू** पु. स्वरयंत्रातील स्वरतंतू. यांच्या स्पंदनामुळे ध्वनी निर्माण होतो.
**ध्वनिद्वार** न. श्वासनलिका. [सं.]
**ध्वनिप्रदूषण** न. १८० डेसीबलपेक्षा मोठ्या व सततच्या आवाजाने (विशेषत: कानांवर) होणारे दुष्परिणाम.
**ध्वनिप्रक्षेपकयंत्र** न. ध्वनी दूरवर वाहून नेणारे यंत्र; (इं.) ब्रॉडकास्टिंग मशीन. [सं.]
**ध्वनिप्रक्षेपण** न. यंत्राद्वारा ध्वनी दूरवर पोहोचवण्याची क्रिया.
**ध्वनिफीत** स्त्री. एका बाजूला आयर्न ऑक्साइड लावलेली प्लॅस्टिक पट्टी. हिच्यावर ध्वनिलहरी साठवता येतात व चुंबकीय 'हेड'चा उपयोग करून साठवलेल्या लहरी प्रसारित करता येतात.
**ध्वनिमंजूषा** स्त्री. कंठनाल; नरडे; (इं.) व्हॉइसबॉक्स.
**ध्वनिमुद्रण–लेखन** न. मॅग्नेटिक टेपवर (गाणे, संवाद इ.) आवाज मुद्रित करणे; ध्वनिलहरींचे चुंबकीय लहरीत रूपांतर करून

ध्वनिफितीवर साठवून ठेवणे.

**ध्वनिमुद्रिका** स्त्री. आवाज (गाणे इ.) उमटवलेली तबकडी.

**ध्वनिरूपक** न. आकाशवाणीवरून प्रसारित केलेले नाटक; श्रुतिका.

**ध्वनिरोधक** वि. ज्याच्यातून ध्वनिलहरी जाऊ शकत नाहीत असा; ध्वनीला अडवणारा.

**ध्वनिलहरी** स्त्री. अव. आवाजाची निर्मिती झाल्यावर हवेमध्ये सुरू होणारी कंपने, तरंग.

**ध्वनिलेखन(मुद्रण) यंत्र, ध्वन्यनुकारी यंत्र** मेणाच्या, कथिलाच्या फिरत्या तबकडीच्या पृष्ठभागावर ध्वनीचे लेखन करून तो मूळ ध्वनी पाहिजे तेव्हा उत्पन्न करून देणारे यंत्र. (इं.) फोनोग्राफ.

**ध्वनिवर्धक-क्षेपक** पु. आवाज मोठा करणारे यंत्र.

**ध्वनिविकार** पु. आवाज बसण्याचा एक रोग. [सं.]

**ध्वनिविद्या-शास्त्र** स्त्री. न. १. (पदार्थ.) ध्वनीचे गुणधर्म, सिद्धांत इ.चे विवेचन करणारे शास्त्र; (इं.) ॲकॉस्टिक्स. २. भाषेतील ध्वनींचा अभ्यास करणारे शास्त्र. (इं.) फोनेटिक्स.

**ध्वनिविज्ञान** न. बोलताना होणाऱ्या उच्चारांचे वर्गीकरण, उगमस्थान व कालौघात उच्चारात होणारे बदल यांचा अभ्यास करणारे शास्त्र.

**ध्वनिव्यवस्था** स्त्री. प्रतिध्वनी निघणार नाही, आवाज घुमणार नाही व सगळीकडे स्पष्ट ऐकू जाईल अशी स्टुडिओची, खोलीची रचना; ध्वनिकी.

**ध्वनिक्षेपणकेंद्र** न. आकाशवाणी केंद्र.

**ध्वन्यर्थ** पु. ध्वनित, सूचित केलेला अर्थ; व्यंग्यार्थ. [सं.]

**ध्वंस, ध्वंसन** पु. न. (मोडणे, जळणे इ.मुळे एखाद्या वस्तूचा झालेला) नाश; नासाडी; निर्दालन; जमीनदोस्त होणे, करणे. [सं.]

**ध्वंसणे** उक्रि. नष्ट, जमीनदोस्त, उद्ध्वस्त करणे; नाश करणे. [सं. ध्वंस]

**ध्वाडी** स्त्री. पुतणी : 'विठोजी गावडे याची बायको सुर्याजी येवले याची ध्वाडी.' – वाडबाबा २.३८. [सं. दुह]

**ध्वांत** पु. न. अंधार; काळोख. [सं.]





**न** मराठी वर्णमालेतील विसावे व्यंजन व पस्तिसावे अक्षर.

**न** पु. नकार: 'त्वद्वदनोत्थ न पडला अर्थिजनाच्या कधींहि कानीं न।'- मोउद्योग १०.७४.

**न** अ. १. निषेधार्थी, नकारार्थी शब्द; नाही. २. नको. [सं.] (वा.) **न चा, नन्नाचा पाढा वाचणे, सांगणे, घट्ट करणे, घोकणे-** नेहमी प्रत्येक गोष्ट, काम नाकारणे.

**न** उअ. १. त्याच त्याच दोन शब्दांमध्ये ते दोन शब्द जोडण्यासाठी योजण्याचा, ने-सह-बरोबर-मागून इ. अर्थाचा शब्द. उदा. पैसा न पैसा, पायरी न पायरी इ. २. आणि, व, अन्. उदा. घोडा न बैल. (बोलताना हा 'न' निराळा न उच्चारता जोडीतील पहिल्या शब्दाला जोडून अर्ध्या 'न्' सारखा उच्चारला जातो.).

**नई** स्त्री. नदी: 'नई हो कां भरतैसी थोरी।'-ज्ञा १७.३२४. [सं.नदी]

**नईस** स्त्री. प्रेत वाहून नेण्याची तिरडी: 'नईस न्यावयास ब्राह्मण तेलंग केले.'-मइसा ६.५. [अर.नअश]

**नउ-ऊ ने सुरू होणारे शब्द येथे न सापडल्यास नव, नौ मध्ये पाहावेत.**

**नऊ** वि. ९ ही संख्या. [सं.]

**नकटा** वि. १. ज्याचे नाक कापलेले आहे असा. २. आखूड, चपट्या, बसक्या नाकाचा. ३. (ल.) काही अंशी अपुरी, दोषयुक्त राहिलेली, व्यंगयुक्त गोष्ट, कार्य इ. [हिं.]

**नकटावकटा** वि. कुरूप आणि हिडीस, ओंगळ दिसणारा.

**नकटे** न. अर्ध्या पावशेराचे माप; निपटे; पिटके; १० तोळ्यांचे वजन; नवटाक; नवटके.(खा.)

**नक(ख)तरी** पु. शेतात देवकृत्ये करणारा शूद्र; नक्षत्रावरून ज्योतिष सांगणारा. [सं.नक्षत्र]

**नकदीकरण** न. रोख पैशांत बदलून मिळणे.

**नक(क्क)ल** स्त्री. १. प्रतिलिपी; मूळ प्रतीवरून केलेली हुबेहूब दुसरी प्रत. २. हुबेहूब प्रतिकृती, प्रतिमा. ३. एखाद्याच्या वागण्या-बोलण्याचे वगैरे केलेले हुबेहूब अनुकरण; कित्ता.४. हास्यकारक, चमत्कृतिजनक, गमतीची गोष्ट इ. ५. पहिली, मूळ प्रत. ६. नाटकात पात्राने बोलण्याचे भाषण; संवाद.

स्त्री. न. समूळ नाश; निर्वंश, नामशेष होणे: 'कित्येकांचीं घरें बसलीं, कित्येकांच्या नकला जाहल्या.'- पाब ४९. [अर.नक्ल]

**नक(क्क)लणे** सक्रि. १. अनुकरण करणे. २. प्रत करणे, लिहिणे.

**नकलनवीस, नकलनीस** पु. लेख, कागदपत्र इ.च्या प्रती लिहिणारा कारकून. [फा. नक्ल +नवीस]

**नकली** वि. १. अस्सल, मूळ वस्तूसारखा दिसणारा दुसरा; अनुकरण करून केलेली ( वस्तू इ.). २. दिखाऊ; कृत्रिम; टाकाऊ. ३. गमतीच्या, मजेदार, चमत्कृतिजनक गोष्टी सांगणारा. ४. खोटा; बनावट.

स्त्री. अस्सल लुगड्यासारखे दिसणारे लुगडे. [फा. नक्ली]

**नकली** स्त्री. मेंदी. (माण.)

**नकल्या** वि. १. नकली; गमतीच्या गोष्टी सांगणारा. २.(दुसऱ्याची) नक्कल करून दाखविणारा; सोंगे आणणारा; विदूषकीपणा करणारा.

**नकवाणी, नक्वाली** स्त्री. अप्रतिष्ठा; कमीपणा; हलकेपणा; लाज; शरम.

**नकश** नक्ष; अब्रू; कीर्ती. [अर.नक्श]

**नकशा, नक्शा** पु. १. पहा: **नकाशा** १. २. पहा: **नक्षी**. ३. पहा: **नक्षा**

**नकशान** न. नराणी; नखे काढण्याचे हत्यार. (कु.)

**नक(का)शी, नकसगिरी** स्त्री. पहा: **नक्षी**

**नकशीव** वि. नकशी, नक्षी काढलेले; जाळ्या, वेलबुट्टी, चित्रे कोरलेले, खोदलेले (काम); कोरीव; कलाकुसरीचे.

**नकसकंगोरा** पु. १. नक्षीदार, कोरीव, खोदीव कंगोरा, कड, गोलची, खांचणी इ.; (सामा.) नक्षीदार कोरीव काम. २. (अनेकवचनी प्रयोग) नखरा; चोखंदळपणा; तोरे मिरविणे.

**नक(का)सकाम** न.१. नक्षीकाम; बारीक कलाकुसरीचे काम. २. नकाशा काढण्याची कृती.

**नकसगिरी** स्त्री. १. नक्षीकाम. २. नक्षी काढण्याचे कौशल्य. [अर.नक्श+ फा. गिरी]

**नक(का)सणे** उक्रि. नक्षी, कशिदा इ. काढणे, करणे; कोरणे.

**नकसि(सी)री** स्त्री. शत्रूच्या नाकावर केलेला वार.

**नकसुद-सूद** वि. मोजकी, निवडक कामे करणारा.

**नकळा** वि. न जाणणारा; अजाण.

क्रिवि. नकळत; अजाणतेपणी.

**नकादुवा** पु. कवड्यांनी खेळण्याचा एक खेळ; एकी बेकी. [हिं. नक्का]

**नकाब** पु.पडदा; घुंघट. [फा.]

**नकार** पु. १. नाही म्हणण्याची क्रिया; निषेध; नाकबुली. २. (हुंडी इ.चा) स्वीकार न करणे; न स्वीकारण्याबाबत हुंडीवर मारलेला शेरा. [सं.]

**नकारघंटा** स्त्री. अभाव; वाण; नसल्याची खूण. (क्रि. वाजवणे).

**नकारणे** उक्रि. १. नाकारणे. २. (हुंडी इ.) न स्वीकारणे. [हिं. नकारना]

**नका(को)राई** स्त्री. १. हुंडी न स्वीकारली गेल्यामुळे द्यावी लागणारी नुकसानी, दंड. (सामान्यत: सकाराई या शब्दाला जोडून प्रयोग.). २. हुंडी न स्वीकारणे.

**नकारी** वि. नाकारी; वाईट; वाकडी.

**नकाराधिकार** पु. राष्ट्राचा सर्वोच्च अधिकारी, अध्यक्ष इ.ना विधिमंडळ इ.नी केलेला कायदेशीर ठराव न मानण्याचा, फेटाळण्याचा असलेला घटनात्मक अधिकार.(इं.) व्हेटो.

**नकाल** वि. १. नकल्या. २. (ल.) नाटकी; ढोंगी; कपटी. [अर.नक्काल]

**नकाशा** पु. १. (सामा.) चित्र; (स्थळ, देश, इमारत, जमीन इ.ची) सप्रमाण रेषाकृती, आराखडा, नमुना. २. हकिकत; अहवाल; बातमी: 'लढाईचे आणून नकाशे।'- ऐपो २१८. ३. मोक्याचे ठिकाण, जागा; उंचवटा. (व.) [अर.नक्शा]

**नकाशाकला** स्त्री. पृथ्वीवरील गोष्टींचे प्रमाणबद्ध आलेखन लहान आकारात दर्शविण्यासाठी नकाशे तयार करण्याची कला.

**नकाशी** पु. नक्षीचे खोदकाम, शिल्पकाम, कलाबतूचे काम करणारा.

स्त्री. नक्षी.

वि. नक्षीदार; कोरीव. [अर.नक्शा]

**नकास** पु. गुरे विकत घेणाऱ्याने दलालाला देण्याची रक्कम; जकात; बाजारदस्तुरी: 'सालाबाद तूप व तांदूळ भाडें व नकासची (जकातीची) शिबंदी...'- थोमारो २.७१. [अर.नख्खास]

**नकासगार** पु. धातूंवर कोरीव नक्षीकाम करणारा.

**नकी–क्की** वि. (संगीत) गायनामध्ये नाकाने काढलेला सूर. [हिं.नक]

**नकी** स्त्री. चंदनाचा तुकडा. (झाडी)

**नकीत** न. काहीही न खाता–पिता केलेले उपोषण.(कु.)

**नकीब, नकीबदार** पु. ललकाऱ्या; हुजऱ्या; भाट:'भालदार चोपदार नकीब।'- देवनाथ, कटिबंध ६.१.

**नकील** स्त्री. उंटाच्या नाकातील लगाम अडकविण्याची कडी; वेसण.

वि. नाकात अडकविलेले. [हिं. नक, नकेल]

**नकीव** पु. बगदादमधील मुख्य धर्मगुरू.

**नकुतला** वि. अपूर्व; विलक्षण; अद्‌भुत; अपरूप. (माण.)

**नकुल** पु. मुंगूस. [सं.]

**नकुलांग** न. खड्ग; तरवारीचा एक प्रकार. [सं.]

**नकुसले, नकूय** वि. क्षुल्लक; क्षुद्र; किरकोळ.(व.)

**नकूच** वि. क्षुल्लक; क्षुद्र; किरकोळ: 'नकूच गोष्टीकरितां सरकारचें मन दूषित होण्याजोगे लेख ते मुळींच लिहीत नाहीत.'- विक्षिप्त ३.१४९. [फा. नकस्]

**नको** १. द्वितीयपुरुषी निषेधार्थी आज्ञार्थी रूप. २. एखाद्या क्रियेचे प्रयोजन, इच्छा, आवड इ.चा अभाव दर्शविणारे क्रियावाचक रूप. [सं. न्यक्कृ] (वा.) ० **नको होणे**– एखाद्या गोष्टीचा वीट येणे; तिरस्कार, अनासक्ती उत्पन्न होणे.

**नक्कल** पहा: **नकल**

**नक्कस** स्त्री. पत्त्यांचा एक जुगार. (ना.)

**नक्का** पु. १. नाक. २. (ल.) नक्षा; दिमाख; तोरा. (क्रि. उतरणे, दाबणे, मोडणे.). ३. (कवड्यांचा खेळ) उताणी पडलेली कवडी. [हिं.]

**नक्कार** वि. वाईट. (खा.)

**नक्की–की** वि. १. अगदी बरोबर; तंतोतंत (वजन, माप, प्रमाण इ.). २. अंतर, फरक न ठेवता; निखालस सांगितलेली; निश्चित; फेरबदल होणार नाही अशी (किंमत, भाषा, अट इ.). ३. खरी; खात्रीची; संशयरहित; यथातथ्य (हकिकत, विधान). ४. चांगला; शुभ (शकुन इ.). [अर.नकी]

**नक्कीकस** पु. १. (मल्लविद्या) कुस्तीतील एक डाव. जोडीदाराच्या बाहेरील बाजूने बगलेत हात घालून तोच हात जोडीदाराच्या मानेवर घालून त्याला पिळगटून चीत करणे. २. मल्लखांब पकडून मारण्याची उडी; मुसकबंद.

**नक्कीमूठ** स्त्री. मुलांचा एक खेळ.- मखेपु २६.

**नक्टी** स्त्री. १. कापसाच्या बोंडातून कापूस काढून घेतल्यावर राहिलेला बोंडाचा भाग. (ना.) २. रानटी झाडाझुडपांना येणारी काटेरी, वाळलेली फळे, बोंडे. (अहि.)

**नक्त** न. दिवसभर उपास करून रात्री जेवण करण्याचे व्रत.

**नक्त–ख्त–क्द** न. रोख. पहा: **नगद**

**नक्तचक्र** न. खगोलातील काही ठळक ताऱ्यांचे वेध घेऊन रात्रीची वेळ समजण्यासाठी बनविलेले विशेष उपकरण.

**नक्तठराव, नक्तखंड** पु. कुळांनी खोताला खोतीचे उत्पन्न गल्ल्याच्या रूपाने न देता दस्ताच्या काही पटींइतकी रक्कम सरकार- ठरावाप्रमाणे देणे.

**नक्त(क्ती)बाब** स्त्री. कुळाने सरकारला रोख रकमेच्या रूपात देण्याचा कर.

**नक्तंचर** वि. पु.१. रात्रीच्या वेळी फिरणारा. २. राक्षस. ३. चोर. [सं.]

**नक्तंदिव** क्रिवि. रात्रंदिवस: 'धम्मिल्ल अंधतमरूपभासे। वक्त्रेंदु नक्तंदिव हा प्रकाशें।'- सारुह ७.१३५. [सं.नक्तदिवा]

**नक्तीचे दुमाले** वर्षासने, नेमणूक व रोजिना हे तीन दुमाले.

**नक्ती शिरस्ता** रोख रकमेच्या स्वरूपात ठरवलेला जमिनीचा वसूल.

**नक्र** पु. १. मगर; सुसर. २. घोरपड. - शास्त्रीको. [सं.]

**नक्राश्रू** पु. अव. १. मगराचे अश्रू .२. (मगर आपल्या भक्ष्याला खाताना त्याच्याबद्दल दुःखाने अश्रू गाळतो असे म्हणतात. त्यावरून ल.) खोटे अश्रू गाळणे; वरपांगी दुःख दाखवणे. [सं.]

**नक्रासन** न. (मल्लखांब) बोंडावर ताजवा करून हातपाय जुळवून लांब करून केलेले आसन.

**नक्वाली** (व.) पहा: **नकवाणी**

**नक्श** स्त्री. आकृती. [अर.]

**नक्शा** पु. १. पहा: **नकाशा**. २. कार्यक्रम; बेत; विचार: 'जखणवाडीचे मैदानात भेटीचा नक्शा ठरविला.'-मराचिशोथा ६३. ३. व्यूह: 'फौज जरब खाऊन होती तथापि त्याणें नक्शा बांधून उभे राहिले.'- होकै ५६. ४. पहा: **नकाशा** ५ [अर.नक्श]

**नख** पु.न. १. मनुष्याच्या हातांच्या व पायांच्या बोटांच्या टोकाला असणारे शिंगाच्या जातीचे पातळ कवच. २. पशुपक्ष्यांच्या पंजाला असणारे तीक्ष्ण अणकुचीदार हाड; पंजा. ३. खवल्या मांजराच्या अंगावर असलेल्या खवल्यांपैकी प्रत्येक. ४.(सोनारी) खरवईच्या दुसऱ्या टोकाशी असणारी नखाकृती लोखंडी मूठ. ही गडवे घडण्याच्या उपयोगी असते. [सं.] (वा.) ० **दृष्टीस न पडणे**– (एखाद्या कुलीन स्त्रीने) बाहेर मुळीच न दिसणे, पडणे; पडद्याच्या आत राहणे; अतिमर्यादशीलपणे वागणे. ० **देणे, लावणे**– ठार करणे. ० **नख बोलणे**– दिमाखाने, ऐटीने, कुर्रेबाजपणाने बोलणे. ० **शिरणे**– शिरकाव, चंचुप्रवेश होणे. **नखाबोटावर काम करणे**– नाजूकपणाचा आविर्भाव, दिमाख करून काम करणे. **नखाबोटांवर खेळवणे, चाळवणे**– एखाद्याला भूलथाप देणे, झुलवत ठेवणे, भुरळ पाडणे. **नखाबोटांवर चालणे**– ठुमकत, मिजासीने चालणे. **नखाबोटांवर जेवणे**– चाखत-माखत, चोखंदळपणाने जेवणे. **नखाबोटांवर दिवस मोजणे**– एखाद्या गोष्टीची अत्यंत आतुरपणे वाट पाहणे. **नखांना आग लागणे**– (अजून सारे अंग जळावयाचे आहे.) संकटांवर संकटे यायला सुरुवात होणे, अजून पुष्कळ संकटे

यायची असणे. **(एखाद्याच्या) नखी दोष नसणे, नखाला माती न लागणे–** अत्यंत शुचिर्भूत, पवित्र, निष्कलंक असणे. **नखी पातक लागू न देणे–** पापापासून दूर राहणे; जराही पाप न करणे. **नखे चावत, कुरतडत, वाजवत बसणे–** १. निरुद्योगी, रिकामटेकडे असणे; उद्योगधंदा न मिळवता राहणे. २. कुंठित, हिरमुसले होऊन बसणे. **नखे बाहेर काढणे–** खरे रूप उघड करणे. **जेथे नख नको तेथे कुऱ्हाड लावणे–** साध्या साधनाने काम होईल अशा ठिकाणी मोठमोठी साधने, शक्ती उपयोगात आणणे. शक्तीचा अपव्यय करणे.

**नखचित्र** न. कागदावर नखाने काढलेले उठावदार चित्र.

**नख(खे)जणे** उक्रि. १. कापडाला वगैरे घातलेल्या टिपेचे टाके साफ बसावेत म्हणून त्यावरून नख फिरवून ते दाबणे. २. नखाने घासून गुळगुळीत करणे. ३. (क्व.) नखाने ओरबाडणे, बोचकारणे.

**नखजीन** न. नखे काढण्याचे न्हाव्याचे हत्यार; नऱ्हाणी. (राजा.)

**नखणे** उक्रि. नखी नावाच्या हत्याराने कापणे.

**नखतेल** न. १. एक औषधी तेल; नखल्याचे तेल. २. टर्पेंटाइन. ३. पेट्रोलियम व दगडी कोळसा यांपासून काढलेले तेल; (इं.) नाफ्था.

**नखबोटी** स्त्री. लाडिकपणा; अगत्य.(व.)

**नखभर** वि. नखावर मावण्याइतके; अत्यंत थोडे; थेंबभर.

**नखमूळ–रडू, नखरू** न. नखाच्या जवळ होणारा फोड, सूज इ.विकार.

**नखर** न. नख: 'या दु:सहें धनंजयशस्त्रें हरिचीं गजा जशीं नखरें ।– मोसभा ७.८५.

**नखरणे** उक्रि. १. नखाने लावणे, कोरणे (कपाळावर गंध इ.). २. नखाने ओरबाडणे; खाजविणे.

**नखरा** पु. १. (स्त्रीने) मन वेधून घेण्यासाठी केलेला शृंगारदर्शक खोटा हावभाव; नटणे; मुरडणे; नट्टापट्टा. २. (ल.) ऐट; दिमाख; मिजास; गमजा; नक्षा. [फा.;हिं.;अर.]

**नखराई** स्त्री. नखरा, नट्टापट्टा करणारी स्त्री.(नगरी)

**नखरूड** न. १. पहा: **नखमूळ**. २. (निंदार्थी) फार वाढलेले आणि त्यामुळे बेढब दिसणारे नख.

**नखरेदार–बाज** वि. १. नट्टापट्टा, नखरा करणारा-री; भपकेबाज; मिजासखोर. २. ऐटदार; डौलदार; सुंदर.

**नखरे(रं)बाजी** स्त्री. ऐटबाजपणा; विलासीपणा; मिजासखोरी; भपका.

**नख(खु)लणे,नखाळणे** उक्रि. १. नखांनी, बोटांनी केस विंचरणे. २. पहा: **नखजणे**. ३. नख लावणे: 'खुडुं नको प्रीतीचा नखलुन देंठ ।'– प्रला १९०.

**नखला** पु. एक सुगंधी, औषधी द्रव्य; नख. हे एका जनावराचे नख असते असे म्हणतात.

**नखला** पु. १. एक प्रकारचे वळवट; खिरीत घालण्याचा गव्हल्यासारखा पण नख टोचून केलेला पदार्थ; नखुला; नखोला. २. लहान मुलांचा एक दागिना; वाघनख. [सं.नख;गु.]

**नखलामी** स्त्री. १. नुकसानी; खराबी. २. अपशकुन. ३. शिक्षा.(गो.)

**नखवणी** न. ज्यात मनुष्याने नखे बुडविली आहेत असे धार्मिक कृत्याला निषिद्ध पाणी.

**नखविख–ष** न. १. नखातील विष. नखाने फार खाजविले असता खाजवलेल्या भागाला ते बाधते. २. नखातील विष बाधून झालेला व्रण, जखम.

**नखशिखपर्यंत, नखशिखांत** क्रिवि. पायांच्या नखांपासून शेंडीच्या टोकापर्यंत; आपादमस्तक; सर्व शरीरभर.

**नखशी** स्त्री. १. नखजीन; नराणी. २. नखुरडे; नखमूळ.

**नखसू,नखसूय** न.स्त्री. १. नखे काढण्याचे हत्यार; नराणी; नखशी. २. नराणीने नखाला लागणारी जिव्हाळी.

**नखा–ख्खा** पु. तरवारीचे पाते मुठीला ज्या ठिकाणी जोडलेले असते त्या ठिकाणी मुठीचा पात्यावर येणारा टोकदार भाग.

**नखाग्री** क्रिवि. १. नखाच्या टोकावर. २. (ल.) लिहिताना चटकन आठवेल इतका पाठ असलेला (धडा, श्लोक इ.).

**नखी** स्त्री. १. सतार इ. तंतुवाद्याच्या तारा छेडण्यासाठी तर्जनी, करंगळी या बोटात घालण्याचे तारेचे तिकोनी वेटोळे, मुदनी. (हिचे एकेरी, दुहेरी, तिहेरी, पिळाची, पोतेची, स्प्रिंगची इ.प्रकार आहेत त्यावरून.) २. (ल.) गाण्यातील उंच, चढा सूर. ३. नागवेलीची, विड्याची पाने खुडण्याचे, अफूच्या बोंडाला चिरा पाडण्याचे एक हत्यार. ४. (पशुपक्ष्यांचे) नख; पंजा. ५. वेलाच्या अंकुराचा, पागोऱ्याचा, आकड्याच्या आकाराचा अग्रभागी असलेला अवयव; धुमारा. ६. (वासरू इ.च्या) खुराचा नखाप्रमाणे पुढे येणारा भाग; खुरकी; खुराचा दुभागलेला प्रत्येक भाग. ७. (जनावरांच्या, कोंबड्यांच्या) टाचेच्या वर असलेले शिंगाच्या आकाराचे अवाळू, अवयव; गेळ. ८. जनावराच्या पायाला होणारा पायखुरीसारखा एक रोग.– शे १०.१३२. ९. निश्चय.– मनको. १०. आश्रय; आधार: ' एकहि न लाहातीचि नखी । म्हणूनि उखिविखि । सांडिली जिहीं ।' – ज्ञा १७.३९. ११. गती; प्रवेश. (क्रि. लागणे): 'मनाची नखी न लगे । जेथ बुद्धीची दृष्टी न रिगे ।'– ज्ञा १२.४१. १२. टाकी: 'नखी लागैल ढाळें ढाळें । वैराग्याची ।'– माज्ञा ६.५७. १३. सूक्ष्म भाग; थेंब; अल्प प्रमाण: 'दंतोष्ट संपर्की । न लगे रसनेची नखी ।– ऋ ७९. १४. फळाच्या देठाजवळचा भाग, तोंड. १५. विडी वळल्यावर वरचे तोंड मुडपून बंद करतात व खालच्या बाजूला दोरा बांधून खालच्या तोंडाला फक्त एकच नख रोवून देतात तो दाब. १६. कासाराचे ओळी करण्याचे एक हत्यार.– बदलापूर ९६. १७. खेकड्याची नांगी. [सं.नख](वा.) **नख्या बाहेर काढणे–** खरे स्वरूप प्रकट करणे; एखाद्यावर उलटणे. (वाघ, मांजर इ. प्राणी इतर प्राण्यांना मारताना आपली नखे बाहेर काढतात. त्यावरून हा अर्थ.)

वि. नखे असलेला (प्राणी, जनावर).

**नखी** स्त्री. १.(विणकाम) धोतर वगैरेंच्या काठाला असलेली रेशीम इ.ची अगदी बारीक धार, कड; किनारीचा कडेचा भाग. २. धुतलेले रेशीम.

**नखीझुल** स्त्री. (विटीदांडू) नखाएवढ्या अंतराची झूल. (कर.)

**नखीदुवा** पहा: **नखुली**

**नखुदा–डा** पु. कप्तान; संघावरील मुख्य. [फा.]

**नखुरडा** पु. पहा: **नखसू**

वि. १. नखाने खरवडून काढता येण्याजोगा (कोवळ्या नारळातील मगज इ.). २. नेहमी (नखांनी) खाजविणारा, बोचकारणारा.

**नखु(खो)रडा–डे** न.पु. नखमूळ.

**नखु(खो)ल** पहा: **नखला**

**नखुली–ल्या** स्त्री. खेळणाऱ्या दोन पक्षांनी परस्परांच्या नखांत नखे घालून खेळण्याचा लहान मुलींचा एक खेळ.

**नखुले** न. (व.) पहा: **नखमूळ**

**नखूट** न. १. पायाच्या, हाताच्या बोटाचे नख. २. (पशुपक्ष्यांचा) पंजा.

**नखोडा** पु. नकासगाराचे हत्यार.

**नखोदा** पु. गलबतावरील मुख्य अधिकारी, मालक. पहा: **नाखवा**: 'नखोदाचा हिशेब हुजुरकारखानियांत केला जाईल.'– वाडसमा २.३. [क.नाखुदा]

**नखोरा** पु. (शरीरावर) नखाने काढलेला ओरखडा; बोचकारा.

**नखोला** पु. (बायकी) वळवट; नखला; नखुला.

**नग** पु. १. पर्वत. २. झाड; वृक्ष: ' जयावरी होय निगा नगांची । सदैव विश्रांति खगामृगांची ।'– र ५२. ३. अरण्य; जंगल: 'करी तशा घोर नगीं तपाला ।'– नरहरि गंगारत्नमाला ५६.(नवनीत पृ. ४२२.).[सं.]

**नग** पु. १. स्त्रियांचा डोक्यात घालण्याचा एक दागिना. २. (सामा.) रत्न; दागिना; अलंकार. ३. (वस्तू इ. मोजताना) वस्तु; डाग; रकम; जिन्नस. ४. लेखनात हत्तींच्या संख्येचा निर्देश करताना संख्यावाचक शब्दापूर्वी योजण्याचा शब्द. ५. अंगठीत बसवलेला हिरा, खडा. ६. कच्च्या रेशमाची लड.[फा.](वा.) **नगास नग देणे**– एका वस्तूऐवजी दुसरी (कशीही) वस्तू देणे.

वि. पक्का; ज्याला फसवणे कठीण असा.

**नग** पु. कापसाचे वजन करण्याचे एक परिमाण. हे २४ पौंडाचा एक मण याप्रमाणे आठ मणांचे (१९२ पौंड) असते.

**नग** पहा: **नको**: 'नग नग पळून जाऊं तुं नारी ।'– मृ ८. [सं.नकि]

**नगण्य** वि. लक्षात न घेण्याइतके; क्षुल्लक.

**नगद** न. रोख पैसा; रोकड.[अर.नक्द] (वा.) ० **होऊन बसणे**– दिवाळे निघणे; नादार होणे.

वि. निवडक; उत्कृष्ट, अस्सल प्रतीचा; शेलका.

**नगद–दा–दी माल** रोकड, दागदागिने इ.ची तोडमोड करून पैशांत, नाण्यांत रूपांतर करता येण्यासारखी मालमत्ता.

**नगदविक्री** स्त्री. १. रोख किंमत घेऊन केलेली विक्री. २. अशा विक्रीचे उत्पन्न.

**नगदा** पु. काचेच्या बांगडीचा एक प्रकार. [हिं.]

**नगदानगद–दी** क्रिवि. रोखीने; रोखीच्या व्यवहाराने.

**नगदानगदी** वि. पहा: **नगद माल**

**नगदी** स्त्री. रोकड; रोख नाणे; पैसा.

वि. १. रोख; नक्द. २. रोखीसंबंधी; महसूल, जमाबंदी इ.संबंधी.

**नगदी असामी** विरक्त मनुष्य: 'कोणी वदती हो ध्यानासी आणा । नगदी असामी दोघे जाणा ।'– दावि २४७.

**नगदी बाब** जमिनीवरील सरकारी वसुलाच्या दरावर ठरविलेला दर. बिघ्यामागे देण्याचा एक कर. यात निरनिराळ्या जिल्ह्यांत निरनिराळ्या वसुलाच्या बाबी समाविष्ट केल्या जातात.

**नगदी साल** सारावसुलीचे साल; एप्रिल ते मार्चअखेर वर्ष.

**नगन** स्त्री. शत्रूच्या, सरकारच्या कचाट्यातून शहराला सोडवण्यासाठी गावातील श्रीमान लोकांनी शत्रूला, सरकारला देऊ केलेली रक्कम.

**नगन(द)नारायण** पु. १. (उप.) गलेलठ्ठ, नागवा मनुष्य. २. दरिद्री, कफल्लक, मित्रहीन मनुष्य.

**नगर** न. १.मोठ्या वस्तीचे व सर्व पदार्थ, वस्तू जेथे मिळू शकतात असे ठिकाण; शहर. २. (विशेषार्थाने) अहमदनगर. [सं.]

**नगरतळ** न. जिच्यावर नगर वसले आहे ती जमीन.

**नगरनायक, नगरशेट** पु. शहरातील मुख्य सावकार, पेढीवाला.

**नगरनियोजन, नगररचना** न. स्त्री. शहराची सर्वांना सोयीची ठरेल अशी व्यवस्थित, पद्धतशीर मांडणी.

**नगरपरिषद, नगरपालिका** स्त्री. नगरासाठी विषयक आरोग्य, शिक्षण, रस्ते इ. सुविधा पुरवणारी, शहरातील लोकांनी निवडून दिलेल्या प्रतिनिधींची संस्था.

**नगरपंचायत** स्त्री. नव्याने विकसित होणाऱ्या आणि लोकसंख्या भराभर वाढणाऱ्या गावांना छोटी नागरिक क्षेत्रे म्हणून घोषित करण्यात येते. त्यांच्यासाठी लोकांनी निवडून दिलेल्या प्रतिनिधींची शासनसंस्था.

**नगरपालिका निकाय** निर्वाचित तसेच नियुक्त सभासद व प्रशासकीय विभागातील मिळून सर्व लोक.

**नगरपालिकाविधी** पु. राज्यसरकारने नगरपालिकांची संस्थापना, सभासदसंख्या व व्यवहार यासंबंधी केलेला कायदा.

**नगरपिता** पहा : **नगरसेवक**

**नगरप्रदक्षिणा** स्त्री. १. देवाच्या मूर्तीची, छबिन्याची शहराच्या भोवताली काढलेली मिरवणूक. २. शहराभोवती, शहरभर भटकणे;(ल.) रिकामपणी गावभर हिंडणे.

**नगरभवन** न. नगरशासनाची कार्यालये असणारी व एक सार्वजनिक सभागृह असलेली इमारत.

**नगरभवानी** स्त्री. १. गावभर भटकणारी, रिकामटेकडी स्त्री. २. वेश्या.

**नगरभवान्या** पु. आळशी, बेढंगी, बदफैली मनुष्य: 'पण तूं रे?– तूं रे नगरभवान्या नाच्ये पोन्ये घेवोनी ।'– केक १५५.

**नगरलेखक** पु. कुळकर्णी: 'नगरलेखकांच्या दिव्यमंदिरीं ।'– सप्र १.२३.

**नगरसेना** स्त्री. शहरात शांतता राखण्यासाठी उभी केलेली नागरिकांची संघटना; (इं.) होमगार्ड.

**नगरसेवक** पु. पालिकेवर प्रभागातील लोकांचा, निवडून दिलेला प्रतिनिधी.

**नगराध्यक्ष** पु. नगरपरिषदेचा अध्यक्ष.

**नगरांतर भाष** एका गावाहून दुसऱ्या गावाला दूरध्वनी करण्याची सोय. (इं.) ट्रंक कॉल.

**नगरी** स्त्री. लहान शहर. [सं.]

वि. अहमदनगरचा.

**नगरी पैसा** अहमदनगर येथील प्राचीन राजवटीतील पैसा.

**नगारखाना** पु. १. चौघडे, नगारे इ. ठेवण्याचे ठिकाण; वाद्यांचा कारखाना. २. चौघडा वाजविणाऱ्यांचा संच, ताफा. ३. देऊळ, वाडा इ.च्या प्रवेशद्वारावर ठरावीक वेळी चौघडा इ. वाजवण्यासाठी बांधलेली खोली. [फा.नकारा+ फा.खाना]

**नगारची–जी** पु. नगारा वाजविणारा वादक. [फा. नकारची]

**नगारा** पु. १. एक मोठे चर्मवाद्य; नौबत; डंका. लोखंडी, लहान–मोठ्या तोंडाच्या व निमुळत्या बुडाच्या भांड्याचे तोंड चामड्याने मढवून हा तयार करतात. हे वाद्य लाकडी टिपऱ्यांनी वाजवितात.(क्रि. करणे, वाजणे, वाजविणे इ.). २.(ल.) मोठे पोट. [अर. नकारा] (वा.) ० **भरणे–** पोट भरणे; भरपूर जेवण होणे. ० **मढविणे–** नगाऱ्यावर कच्चे कातडे ताणून बांधणे. ० **वाजणे, नगाऱ्यावर टिपरू पडणे–** जगजाहीर करणे.

**नगारी** पु. एक मुसलमान जात. हे ताशा, ढोल वगैरे वाजवतात.

**नगि(गी)ना** पु. १. रत्न; अंगठीत बसविण्याचा हिऱ्याचा खडा: 'सारी अहमदाबाद बघाया लोटली सैना। इश्क नगिना।'– सला २०. २. (ल.) कोणतीही उत्तम, सुरेख, उत्कृष्ट वस्तू: 'विश्वासराव नानाचा पुत्र नगीना।'– इपुस्त्रिपो १३५. [फा. नगीन्]

**नगिनी** क्रिवि. नागवेपणी; नम्रपणे: 'नगिनी यावें नगिनी जावें वरती लवलाही।'– (मरतिकाची लावणी) मसाप १.१.३.

**नगीननागवा** वि. अगदीच नागवा.

**नगीना** वि. विचित्र; वेगळा. पहा: **नग**

**नगोटा–टे** पु.न. रत्न; जवाहीर; दागिना; नगनगोटा.

**नगोली** स्त्री. धाब्यावरील जिना व गच्ची.(खा.)

**नग्गा** वि. नागवा; नग्न. [सं.नग्न]

**नग्न** वि. १. वस्त्रहीन; नागवा. २. (ल.) दरिद्री; कफल्लक; अकिंचन.

**नग्नदीक्षा** स्त्री. नागवे राहण्याचे व्रत. (क्रि. घेणे). काही विशिष्ट वर्गातील गोसावी ही दीक्षा घेतात.

**नग्नवस्त्र** न. लंगोटी; केवळ नागवे राहू नये म्हणून लोकलज्जेस्तव धारण केलेले वस्त्र: 'काशायांबर नग्नवस्त्र। संन्याशासी हें पवित्र।'– सप्र ३.१६.

**नग्निका** स्त्री. वयात न आलेली, कुमारी मुलगी. [सं.]

**नग्मा** पु. गीत.

**नच–चि** शअ. नाही; मुळीच नाही: 'त्या अंगा नचि इच्छिती रसिक ते भूषा विधीतें खरे।'– कमं २.६५.

**नचक, नचकल** स्त्री. फुटकी, वरचा फुगीर भाग उडालेली कवडी.

**नचननु** न. काकू; नानू; कानकून; कांकरणे. [सं.नच+ननु संशयवाचक अव्यय]

**नजद** पु. घोड्याच्या पायाला होणारा एक रोग.– अश्वप २.२८२.

**नजदीक** क्रिवि. जवळ; नजीक. [फा. नझ्दीक]

**नजर** स्त्री. १. दृष्टी. (क्रि. पडणे, खिळणे, टाकणे.). २. धोरण; उद्देश. ३. (ल.) कृपादृष्टी; कृपावलोकन; आनुकूल्य. ४. इच्छा; हाव. (क्रि. फाकणे). ५. (ल.) वाईट व बाधक दृष्टी; दृष्ट; लोभी, कामी दृष्टी. ६. (ल.) तर्क; अवलोकनाची शक्ती. ७. निगा; काळजी. ८. दृष्ट. ९. लक्ष; पर्वा. (क्रि. वेधणे).[अर.नझर; हिं.;गु.] (वा.) ० **उतरणे–** पाणउतारा, अपमान करणे. ० **करणे–** निगा ठेवणे. ० **गुजर करणे–** प्रत्यक्ष निरीक्षण करणे. ० **तेवत ठेवणे–** दृष्टी जराही न हलवता लक्ष ठेवणे: 'सकाळीच जाळीला नजर तेवत ठेवत्याल नी.'– नरभक्षक १४.१५. ० **देणे–** एखादी गोष्ट विचारात घेणे. ०**पक्की होणे–** सतत बारकाईने पाहून बारीकसारीक गोष्टी टिपण्याची व त्यांचा अर्थ लावण्याची सवय होणे. ० **मरणे–** (तीच तीच गोष्ट वारंवार पाहिल्यामुळे तिच्याविषयी) भय, आदर, किळस इ. नष्ट होणे; दृष्टीला परिचित होणे. **नजरेचा खेळ–** १. केवळ दृष्टिक्षेपाने, एकदा नजर टाकण्याने होणारे काम, गोष्ट, किरकोळ, सुलभ काम. २. मुख्यत: दृष्टीनेच साध्य असलेले काम, विषय. उदा. चित्रकला, तिरंदाजी इ. ३. दृष्टीचे अद्‌भुत, विलक्षण कृत्य. ४. चांगली, बळकट दृष्टी; पराकाष्ठेची तारतम्यदृष्टी. **नजरेची बाधा–** दृष्ट. **नजरेचे पाप** – एखादी वाईट गोष्ट पहाण्याने लागणारे पाप. **नजरेने पाषाण उलणे–** फार वाईट नजर असणे. **नजरेस येणे–** पसंत पडणे.

**नजर** स्त्री. १. वरिष्ठांची कृपा संपादन करण्यासाठी त्यांना भेट म्हणून दिलेली वस्तू; उपायन. (क्रि. करणे). २. मुलाखतीच्या, चर्चेच्या वेळी परस्परांना भेट म्हणून दिल्या जाणाऱ्या वस्तूंपैकी प्रत्येक; नजराणा. (क्रि. करणे). ३. बापाच्या गादीवर, हुद्यावर बसताना मुलाने सरकारला किंवा सरकारी प्रतिनिधीला देण्याची जुन्या राजवटीतील खंडणी. ४. (ल.) भेट; मुलाखत. ५. (सामा.) भेटवस्तू; अहेर; नजराणा. [अर. नझर]

**नजरकारखाना** पु. घाटाजवळ राजापूर तालुक्यात जंगलांतील लाकडे तोडण्याचा दिलेला मक्ता.– मोल.

**नजरकैद** स्त्री. साधी अटक.

**नजरखोलाई** स्त्री. शेतातील पीक कापण्याची परवानगी मिळण्यासाठी खेड्यांनी, गावांनी देण्याचा कर.

**नजरगलबत, नजरजहाज** न. गलबतांवरील कर.

**नजरगहाण** स्त्री. गहाण ठेवलेली मिळकत सावकारांच्या ताब्यात न राहता ऋणकोजवळच राहते, तो गहाणाचा प्रकार.

**नजरगुजार–रा,नजरगुजारत** पु. स्त्री. १.परीक्षा; पारख: 'आपण राजियांनी नजरगुजर करून एक एक माणूस पाहून ठेवावें.'– सभासद २१. २. नजरानजर; दृष्टादृष्ट; भेट.

वि. डोळ्याखालून घातलेले; पारखलेले. [अर.नझर् +फा. गुझार]

**नजरघी** न. सरकारी नोकरांच्या बडदास्तीसाठी गावकऱ्यांना द्यावे लागणारे तूप. [हिं.]

**नजरचूक** स्त्री. दुर्लक्षामुळे, नकळत घडलेली चूक, दोष.

**नजरचोर** पु. धूर्तपणाने, कावेबाजपणाने नजर चुकविणारा; दृष्टीला पडण्याचे टाळणारा.

**नजरपट्टी** स्त्री. १. धान्याच्या प्रत्येक खंडीमागे द्यावा लागणारा कर. २. नजर म्हणून द्यायची रक्कम जमवण्यासाठी बसवलेली वर्गणी, कर.

**नजरबंद** पु. १. नजरबंदी करणारा; गारुडी. २.(को.) पहा: **नजरबंदी**

क्रिवि. साध्या अटकेत; ज्याच्या हालचालीवर सक्त नजर आहे अशा स्थितीत. [फा. नझर्‌बंद]

**नजरबंदी** स्त्री. १. दृष्टीला भुरळ पाडणे; हातचलाखी. २. नजरकैद. [फा. नझरबंदी]

**नजरबाग** पु. १. घर, राजवाडा इ.समोर शोभेसाठी केलेला, सहज दृष्टीला पडण्याजोगा बाग. २. गच्चीवर, खिडकीपुढे फुलझाडांच्या कुंड्या वगैरे ठेवून केलेली बागेसारखी टुमदार रचना.

**नजरबाज** वि. १. सूक्ष्म नजरेने परीक्षा, निरीक्षण करण्यात कुशल. २. हेर; टेहळणी करणारा. ३. डोळे मोडणारा, मारणारा; नेत्रसंकेत करणारा.

**नजरभूल** स्त्री. पाहण्यात झालेली चूक; डोळ्यांना पडलेली भुरळ.

**नजरभेट** स्त्री. १. सरकारी अंमलदाराला प्रथम भेटीच्या वेळी दिलेला नजराणा. २. पूर्वी जमाबंदीच्या वेळी प्रत्येक पाटलाने सरकारला देण्याची एक रुपयाची नजर.

**नजरमिठारू** मीठ नेणाऱ्या गलबताकडून घेण्याचे शुल्क.

**नजरस्वारी** स्त्री. पिकांवरून घोडदळ, पायदळ इ.ची स्वारी नेऊ नये म्हणून शेतकरी स्वारीवाल्यांना देत ती खंडणी.

**नजराणा** पु. १. पहा: २ **नजर** १ ते ३. २. (कायदा) स्थावर मिळकत वहिवाटीला घेण्यासाठी नवा पट्टा करताना मालकाला देण्याची रोख रक्कम. [अर. नझ्राना]

**नजरानजर** स्त्री. एकमेकांकडे पाहणे; दृष्टादृष्ट.

**नजला** पु. १. काही विकारामुळे डोळ्यांतून वाहणारे पाणी. (क्रि. डोळ्यात, डोळ्यावर उतरणे.). २. डोळ्यांतून पाणी वाहण्यापूर्वी होणारी डोळ्यांची जळजळ. [अर.नझ्ल्]

**नजाक(फ)त** स्त्री. १. सुबकपणा: 'नजाफत व कारागिरी व चांगली वस्त पूर्वी आपण पाहिली आहे.'– ऐटि २९६. २. लालित्य. [अर.नजाफत]

**नजा होणे** क्रि. उत्साह नसणे; अंग मोडून येणे. (कु.)

**नजीक–ख, नज्दीक** क्रिवि. शअ. जवळ; सन्निध. [फा.नझ्दीक]

**नजीब** वि. थोर, उच्च (कुळातला, स्वभावाचा).

स्त्री. हिंदी शिपायांची एक तुकडी, वर्ग. [अर.;क.]

**नजीर** पु. १. देखरेख करणारा. २. तपासनीस.

**नजीस** वि. १. कंजूष; चिक्कू; कृपण. २. रागीट; तापट; तिरसट; चिडखोर. ३. त्रास देणारा; द्वाड; (खडतर व खचरट या शब्दांच्या बऱ्याच अर्थी चुकीचा उपयोग.) [अर. नजिस =घाणेरडा, ओंगळ]

**नज्म** १. ज्योतिष. २. कुंडली. ३. तारा किंवा ग्रह.

**नझूल** पु. १. सरकारी गावठाणाची जमीन. (व.) २. बेवारस ठरल्यामुळे सरकारजमा झालेली जमीन. [अर.नुझुल]

**नञ** अ. न या अव्ययाबद्दल संस्कृत व्याकरणात योजलेला पारिभाषिक शब्द. [सं.]

**नञ् समास** पु. त्याचा अभाव, त्यापासून भिन्न, तदभावविशिष्ट असा अर्थ सांगायचा असताना संस्कृत स्वरादी व व्यंजनादी शब्दांच्या मागे अनुक्रमे अन् व अ या वर्णांचा योग होऊन होणारा एक प्रकारचा समास. उदा.अब्राह्मण=ब्राह्मण नव्हे असा (मनुष्य); अज्ञान = ज्ञानाचा अभाव. या समासाचे नञ्तत्पुरुष व नञ्बहुव्रीही असे दोन प्रकार आहेत.

**नट** पु. १. एक जात व त्यातील व्यक्ती; डोंबारी; कोल्हाटी; बहुरूपी नट. हा स्त्रिया इ.चा वेष धारण करून नाचणे, दोरीवर चालणे, उड्या मारणे इ.अनेक प्रकारचे खेळ करून उपजीविका करतो. नाच्या पोऱ्या; सोंगाड्या. २. (नाट्य.) नाटकात स्त्री–पुरुष भूमिकेचे काम करणारा मनुष्य, पात्र. ३. नटण्याची सवय, स्वभाव असलेला मनुष्य. ४. उनाड, व्रात्य, कपटी, हरामी मनुष्य: 'ठस ठोंबस खट नट। जगभांड विकारी।'– दास २.३.३२. ५. चेष्टा; हावभाव: 'वदतां रददीप्ति दावि नटें।'– अकक २ किंकरकृत शुकरंभासंवाद २०. ६. वेष; अवतार; रूप; सोंग: 'धरोनिया रुद्राचा नट। नंदीवरी जाहला उपविष्ट।'– कथा २.१२.२४. [सं.] (वा.) **नटामाजी नेटकी जाया–** (सुंदर पुरुषनटाने स्त्रीवेष धारण केला तरी तो जसा कृत्रिम असतो व त्या भूमिकेतील तशी सुंदर स्त्री जशी दुर्लभ असते त्यावरून) दिसण्यात अतिशय सुंदर पण बनावट व दुर्लभ अशी वस्तू.

**नट** पु. मळसूत्र; खिळ्याला (स्क्रूला) घट्ट धरून ठेवणारा भाग. [इं.]

**नट** पु. (संगीत) एक राग. गानसमय रात्रीचा दुसरा प्रहर.

**नटका** वि. नटणारा; नखरेबाज; नटवा: 'जो नर नटका। हरि वदनीं नयेचि घटका।'– आपद ३९. [सं.नटक]

**नटखट** वि. लुच्चा; सोदा; हरामी. [हिं.]

**नटणा–ना** स्त्री. लीला: 'मग सर्वज्ञनाथें नटणा केली।'– दाव २६०.

**नटणे** अक्रि. १. सजणे; वेशभूषा करणे; अलंकार, वस्त्रे इ.नी सुशोभित बनणे. २. एखाद्याचा वेष, रूप धारण करणे; भूमिका घेणे. ३. खेळणे; नाचणे: 'जैसा गोकुळीं नाचतां मुकुंद। सर्वहि नटों लागले।'– दावि ९४. ४. डौल मिरविणे; दिमाख, तोरा दाखविणे: 'वरी नटती तें फुडें। दरिद्र जाण।'– ज्ञा ३.६५. ५. ठमकणे; नखऱ्याने, नटूनथटून, ठमकत चालणे.

उक्रि. नाचवणे; खेळवणे; खेळ दाखवणे: 'बाहेरी नटी छायाचित्र। चौऱ्यांशीं लक्ष।'– ज्ञा १८.१३०३. [सं.नट]

**नटणे** क्रि. १. (लबाडीने) नाकबूल होणे. २. नाकारणे; कचरणे; मान्य न करणे; कांकू करणे. [हिं.नटना]

**नटतिया** पु. नाटककार.– शर.

**नटतोटक** न. एक वृत्तविशेष. तोटक वृत्ताच्या शेवटी एक गुरू अक्षर घातल्यावर हे वृत्त बनते.

**नटधारी** वि. नाटकी: 'पाहून लुब्धलों तुसी आता किती दिवस चाळिवसी नटधारी।'– होला ८९.

**नटन** न. १. नटाचे काम; अभिनय; वेष, रूप धारण करणे. २. क्रीडा; लीला. ३. नृत्य; नाच. [सं.]

**नटनर्तक** पु. अव. (व्यापक) नट, डोंबारी, कोल्हाटी, नाचणारे, सोंगाडे इ. समुच्चयाने.

**नटनं** क्रि. माघार घेणे; हार पत्करणे.

**नटनागर** वि. नटून, सजून गावभर हिंडणारा.– शर.

**नटनाच** पु. १. उल्लास; उत्कर्ष; प्रताप ; आधिक्य: 'हें असो या चिन्हांचा। नटनाचु ठायीं जयाच्या।'– ज्ञा १३.२१५. २. हावभाव; अभिनय; अंगविक्षेप: 'मातें गाती वानिती। नटनाचें रिझविती।'– ज्ञा १६.३६१.

**नटनाटक–की** पु. १. नाना प्रकारचे चमत्कारिक खेळ करून दाखवणारा

परमेश्वर, श्रीकृष्ण इ. देवता. २. नाटकी, सोंगाड्या माणूस.

**नटबाज, नटबाजिंदा** वि. १. दिमाखाने, ताठ्याने, नटून चालणारा; अक्कडबाज; नखरेबाज; नटवा. २. दांडगा व धसकट (मनुष्य). [सं.नट+फा.बाझ]

**नटबाजी** स्त्री. १. दिमाखदारी; अक्कडबाजी. २. नटवेपणा; नखरा.

**नटबाट** वि. लुच्चा; सोदा; हरामी.

**नटबिलावल** पु. (संगीत) एक राग. गानसमय दिवसाचा पहिला प्रहर.

**नटमल्हार** पु. (संगीत) एक राग. गानसमय दुसरा प्रहर.

**नटमोगरा** पु. नटणारा मनुष्य.

**नटरंगी** वि. नाटकी; खेळी; लपंडाव खेळणारी: 'काय बाई नटरंगी मुलगी ही.'– चित्रवंचना ९८.

**नटराज** पु. १. तांडवनृत्य करत असणारा शंकर, त्याची मूर्ती; नटेश. २. अर्धनारीनटेश्वर, उजवे अंग पुरुषाचे व डावे स्त्रीचे असे स्वरूप.

**नटवा** पु. १. डोंबारी जात. २. नाचणारा; नाच्या; पहा: **नट** १. ३. नटणारा; छेलछबेला; नखरेल.

**नटविणे** सक्रि. १. वस्त्र, अलंकार इ.नी सजवणे; वेषभूषेने सुशोभित करणे. २. नाटकातील भूमिका करणे, वठवणे, संपादणे. ३. नाचवणे; नाचायला लावणे.

**नटंग–गे** न. १. गुडघा. २. नडगी-गे. (वा.) **नटंगावर नेसणे**– असभ्यपणाने नेसणे.

**नटाई** स्त्री. लुच्चेगिरी; सोदेगिरी; कपट. (क्रि. करणे).

**नटिनी, नटी, नटीण** स्त्री. (नाच, तमाशा इ.त) सोंग घेणारी, नाचणारी स्त्री; नर्तकी. [सं.नटिनी, नटी]

**नटिया** पु. नट; सोंग घेणारा: 'नटिया एकचि एकला ।'– एभा ११.८६५.

**नटी** स्त्री. १. सूत्रधाराची पत्नी. २. नाटकात काम करणारी स्त्री; स्त्रीपात्र. ३. नर्तिका; नाचणारी स्त्री; कलावंतीण. [सं.]

**नटुली** वि. ठेंगणी; लहानसर: 'माहेरा मी जातें बाई ।... नटुली भावजई ।'– वलो ९६.

**नटोवा** पु. नट: 'आंगीचीआं रवरवां ।... जैसा रणरंगिचा नटोवा सराऊं करितुसें ।'– शिव १००४.

**नट्टापट्टा** पु. १. वेणीफणी करणे; केस विंचरणे; चांगले कपडे, दागिने घालणे. २. नटणे; मुरडणे; छचोरपणाची वेशभूषा; नखरा; चट्टीपट्टी. [सं.नृत्य प्रवृत्त–मसाप २.३.२३९.]

**नठारा** वि. वाईट; निकामी; गयाळ; रद्दी; रद्दड. [सं.नष्टतर]

**नड** पु. भाताच्या रोपात येणारा पोकळ दांडा. (कु.) [सं.]

**नड** स्त्री. १. अडथळा; प्रतिबंध; हरकत; अडचण. २. उपाधी; त्रास; उपसर्ग; उपद्रव. (क्रि. पडणे, होणे). ३. गरज (क्रि. काढणे). [सं.नड्]

**नड** स्त्री. १. पिशाच्च. २. पिशाच्चाची बाधा. (गो.)

**नडग–गी–गे** पु.स्त्री. न. १. (देशावर, उत्तरेकडे रूढ) अस्वल; रीस. २. (ल.) वयस्क, जरठ, मनुष्य.

**नडगी–गे–घा** स्त्री. न. १. गुडघा. पहा: **नटंग**. २. पायाची नळी; नळगुडी. ३. पुढे आलेले हाड. ४. (मल्लविद्या) दोन्ही पायांच्या नळ्यांवर वार. [क. नडगि] (वा.) **नडग्यावर लागणे** – जिव्हारी लागणे.

**नडगे** न. कणिंग; कणगी. (को.)

**नडघे** न. १. तबल्याचे एक परडे; खोड. २. ढोलाप्रमाणे एक चर्मवाद्य: 'डोल नडघें गिडिबिडें चंग । गुजुगुजें झांझ नगारा उपांग ।'– स्वादि १०.२.४६.

**नडघेमोड** स्त्री. उभी दरड; जेथे चढताना ढोपरांना, नडग्यांना लागण्याचा संभव असतो अशी चढण: 'उमाबाई दाभाडी पुणियांत नडघेमोडीपाशीं डेरे देऊन राहिली होती तेथें वारली.'– मइसा ६, पृ. ९९.

**नडणी** स्त्री. १. शेतातील पिकात उगवणारे निरुपयोगी व पिकाला घातुक असणारे गवत; रान; खुराड. (क्रि. काढणे). (कु., राजा., हेट., गो.) २. असे गवत काढणे; बेणणी. [सं. नड, नडिनी]

**नडणे** अक्रि. १. गुंतणे; अडकणे; लागणे; गच्च, घट्ट होणे; अडकणे; दाटणे. २.अडवला जाणे; आड येणे. ३. (घोडा इ.) अडणे; भीती इ.मुळे पुढे न सरणे. ४. कुंठित, स्तिमित होणे; खुंटणे. ५. त्रासदायक, उपद्रवकारक होणे, असणे. [सं. नड्;क.नड्ड]

**नडणे** सक्रि. पिकातील, बागेतील निकामी गवत काढणे; बेणणे; कुंदा काढणे; तणणे; शेतातील आधीच्या पिकाच्या धसड्या, धसकटे, रान काढणे. [सं.नड]

**नडनाच** पु. १. पहा: **नटनाच**. २. मिष. – मनको. [सं.नट+म.नाच]

**नडपी** स्त्री. नडणी, बेणणी करणारी स्त्री. (राजा., कु., गो.)

**नडव(वि)णे** उक्रि. १. नडणे; अडथळा करणे. २. दुखापत, इजा करणे.

**नडवी** स्त्री.ओसरी. (तंजा.)

**नडाव** पहा : **नड**

**नड्डा–ड्डी** पु. स्त्री. घसा; नरडे; नरडी.(ना., व. ) (वा.) ० **पाडणे**– आक्रोश करणे; ओरडणे; घसा खरडणे.

**न(ने)णत्** वि. नेणता; अजाण; बालिश.(गो.)

**नणं(ण)द, नणदु(दो)ली** स्त्री. नवऱ्याची बहीण. [सं.ननान्दृ]

**नणंदा, नणदया–दाई** पु. नणंदेचा नवरा. (कु.)

**नणं(ण)दावा, नणदवडा** पु. नणंदेचा जाच, छळ, अरेरावी.

**नत** वि. नम्र; वाकलेला; ओणवा.

न. (नृत्य.) डाव्या-उजव्या बाजूला मान न वळवता नुसती पुढे वाकवण्याचा अभिनय. [सं.]

**नत, नतभाग, नतांश** पु.न. (ज्यो.) खमध्यापासून इष्ट प्रदेशापर्यंतचे उतरते चक्रांश; खमध्यापासून ग्रहापर्यंतचे अंतर ; पहाणाराच्या स्थळीं खस्वस्तिक आणि खस्थ पदार्थ ह्यांमध्ये जो कोन होतो त्याला खस्थाचे नतांश म्हणतात.'– धारपकृत सूर्यमाला १६.

**नतकाल** पु. (ज्यो.) सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंतचा काळ.

**नतजंघा** स्त्री. (नृत्य.) नृत्याच्या वेळी पाय अंचित केला असता टाचेवर भार पडतो तेव्हा जंघा किंचित वाकते ती स्थिती.

**नतद्रष्ट** वि. १. कवडीचुंबक; पराकाष्ठेचा कंजूष. २. खाष्ट; दुष्ट.

**नतनाडिका** स्त्री. (ज्यो.) मध्यान्हानंतरची व मध्यरात्रीपूर्वीची जन्मघटिका.

**नतनासिका** स्त्री. (नृत्य.) नृत्यात नाकपुड्या वारंवार जवळ आणणे.

**नतपर्व** पु. बाणाचा एक प्रकार.

**नतपार्श्व** पु. (नृत्य.) नृत्यात कोणत्याही एका पायावर शरीराचा तोल सांभाळत असताना वाकलेला त्या बाजूचा शरीराचा भाग.

**नति** स्त्री. १. नमन; वंदन. २. नम्रता. ३. (ज्यो.) त्रिभोन लग्नाचे अंशात्मक लंबन; स्थानभेदांश. [सं.]

**नति(ती)जा** पु. १. फळ; परिणाम; शेवट. २. शिक्षा. [अर., हिं.नतीजा]

**नत्र** पु. वातावरणातील एक मुख्य घटक.

**नत्राम्ल** पु.न. एक तीव्र अम्ल; ह्यात चांदी, तांबे इ. धातू विरघळतात.

**नथ** स्त्री. १. नाकात घालण्याचा स्त्रियांचा एक दागिना; नासामणी. २. नाकात घालण्याचे, नाकातून द्यावयाचे औषध (तूप इ.). [सं.नाथ; क.नत्तु]

**नथडा** पु. मोठी नथ.

**नथनी–णी** स्त्री. १. लहान नथ; चमकी. (तंजा.) २. जनावरांच्या नाकात घातलेली वेसण; नाथ. ३. कुलूप नसताना कोयंड्यातून कडी निघू नये म्हणून कोयंड्यात अडकवलेले लोखंडी वेटोळे. ४. तरवारीच्या मुठीला अडकवलेले लोखंडी वेटोळे, कडी. [हिं.नथनी]

**नथु–थ्या** वि.नाक टोचलेला (मुलगा). (मुलगा जगत नसल्यास नवीन मुलाचे नाक टोचतात व त्याला हे नाव देतात.).

**नथूशाई** वि. एका विशिष्ट जातीचा (हिरा, रत्न इ.). (नथूशाह या पूर्वी होऊन गेलेल्या धनाढ्य गृहस्थाच्या नावावरून).

**नथ्थी** वि. एकत्रित केलेले (कागदपत्र). (ना.)

**नद** पु. मोठी नदी. उदा. शोण, सिंधु, ब्रह्मपुत्र इ.ना नद म्हणतात. [सं.]

**नदर** स्त्री. १. दृष्टी; नजर. २. संधी; संधान: 'नबाब तर्वारीस हात घालावयासि गेला, ती नदर राजियानें धरून वार केला.'– सभासद २८. [अर.नझर]

**नदी** स्त्री. ताज्या पाण्याचा मोठा व नैसर्गिक असा डोंगरातून येणारा, समुद्राला मिळणारा मोठा प्रवाह. [सं.]

**नदीगर्क–बुड** वि. नदीच्या पुरांत, पाण्यांत बुडणारी, बुडालेली (जमीन इ.). – बदलापूर ३६८. [सं. नदी+अर.घर्क]

**नदीमातृक** वि. नद्यांच्या पाण्याने, कालव्यांनी सुपीक बनलेला; पिकासाठी कालव्यांवर अवलंबून असलेला (प्रदेश, देश इ.).

**नदीमुख** न. समुद्राच्या भरतीचे पाणी नदीच्या प्रवाहाला जेथे येऊन मिळते ती जागा.

**नदीवड** पु. यज्ञोपयोगी वृक्ष. जसे:– उंबर, पिंपळ, पळस, शमी इ.

**नदैव** वि. दुर्दैवी: 'आम्ही नदैवे: आमते काहीचि नाही.' – लीचपू १५१. [सं.]

**नधरत** वि. क्रिवि. अविरत: 'नधरत चालिलें स्पुंदन।'– एभा ६.३३२.

**नधाड** न. फुटल्यामुळे निरुपयोगी झालेले भांडे. (व.)

**न न** उद्गा. १. नको! नको!; नाकारणे; अमान्य करणे; नकार देणे. २. एकाच वाक्यात दोन नकार असल्यास त्या वाक्याचा करणरूपी, होकारार्थी अर्थ होतो: 'न पुरी न कटककोपें उग्रा गरळाग्निच्या कुळा व्याली।'– मोवन १२.३४.

**नन** स्त्री. ख्रिश्चन भिक्षुणी, संन्यासिनी.

**ननबटल** पु. एक फुलझाड; तगर; अनंत. (बे.)

**ननाटा–टी–ठी** पु. स्त्री. सर्पाची एक विशिष्ट जात.

**ननाट्य** न. एक आधुनिक नाट्यप्रकार.

**ननिबाळ** स्त्री. केळीची एक जात. [हिं.नन्हा+क. बाळे]

**नन्ना** पहा: **न, न न**

**नन्नुबाळ, निन्निबाळ** पु. न. १. लहान मुलाला लाडाने संबोधण्याचा शब्द. २. (उप.) मोठ्या मुलाला उपहासाने लावण्याचा शब्द. [गु. नन्नु+ म.बाळ]

**नप(ने)टी** स्त्री. वेळूच्या नळीत जाईल असा किंचित आखूड दांडा करून तिच्या तोंडी आसाणा इ.चे फळ घालून आवाज काढण्याचे यंत्र; बंदूक; फटकफळी.

**नपड** स्त्री. परस्परांचे न पटणे; बेबनाव; वाकडीक. (राजा.)

**नपतेल** न. टर्पेंटाईन. पहा: **नखतेल**

**नपश्चात** वि. नष्ट, धुळधाण झालेले; नामशेष. (गो.)

**नपाई** स्त्री. १.कानउघाडणी. २.मोजणी. (झाडी) [हिं.]

**नपुंसक** वि. १. स्त्रीही नाही व पुरुषही नाही अशी (व्यक्ती); हिजडा; तृतीयपंथी; षंढ; संभोग करण्याला असमर्थ (पुरुष). २. पराक्रमहीन; गांडू; दुबळा (पुरुष). ३.शब्दांच्या तीन लिंगांपैकी एक. पहा: **नपुंसकलिंग.** [सं.] (वा.) **नपुंसकाच्या हाती पद्मीण, रंभा–** उपभोग घ्यायला असमर्थ व्यक्तीच्या हाती अतिशय सुंदर, बहुमोल वस्तू (पडणे, राहणे इ.); विजोडपणा.

**नपुंसकलिंग** न. ज्या नामांवरून प्राणिवाचक किंवा अप्राणिवाचक पदार्थांच्या पुरुषत्वाचा किंवा स्त्रीत्वाचा बोध होत नाही, पण जी (नामे) त्या संपूर्ण जातीची किंवा त्या जातीतील व्यक्तीची (एका घटकाची) वाचक असतात, त्यांचे नपुंसकलिंग असते. उदा. ढोर, कुत्रे, लाकूड, तेल इ.

**नप्पस** वि. नपुंसक; षंढ; शेळपट. (ना.)

**नफख** पु. घोड्याच्या पायास टांचेजवळ होणारा एक रोग.– अश्वप २.२८२. [अर.नफीस]

**नफब** न. चोराने पाडलेले भगदाड. (ना.)

**नफर** पु. १. घोड्याची चाकरी वगैरे हलकी कामे करणारा नोकर, सेवक, गडी: 'हिलालखोर साहेबाचा नफर आहे इतबाराचा।'– समर्थकृत दिवटा ३. २. व्यक्ती; जण; इसम: 'नफर मजकूर हुजूर आल्यावर जें द्यावयाचें तें पावेल.'– मइसा ३.३८७. ३. डाग; नग. ४. उंट; उंटांची संख्या लिहिताना संख्यावाचकापूर्वी योजण्याचा शब्द: 'उण्ट नफर पंचवीस.'– पया ३. ५. उंटावरील कर: 'उंटाला नफर, बैलाला सर... शब्द उपयोजिला जातो.'– बदलापूर ३६३. [अर.]

**नफरत** स्त्री. तिरस्कार. [अर.]

**नफराई** स्त्री. हलकी सेवा, चाकरी: 'लेकराचे लेकरीं पटेलगी खाऊन दिवाण–नफराई करून सुखी असो.'– मकुइ ३.२५.

**नफरी** स्त्री. नफराई: 'साहेबीं आपणास हातीं धरून पांढरीवर बैसवून आपल्या हातें नफरी घेतली पाहिजे.'– वाडसनदा १८४. • वि. मोलाची; भाडोत्री; टाक भाड्याची: 'लश्करचाकरी नफरी, काम मनोजोगे होणार नाही.'– वाडसनदा १८४.

**नफा** पु. व्यापार, दुकानदारी इ. व्यवहारांत खर्चवेच फिटून व्याजमुद्दलही मिळून वर मिळतो तो पैसा; फायदा; किफायत. [अर.नफ्अ]

**नफातोटा** पु. १. (अंकगणित) नफा आणि तोटा. २. खरेदी-विक्रीतील नफा व तोटा या दोन बाबींवर उभारलेले अंकगणितातील प्रकरण.

**नफेबाजी** स्त्री. मिळेल तेवढा जास्त नफा मिळविण्याची लागलेली खोड.

**नफेरी** स्त्री. १. वाद्यविशेष; तुतारीचा एक प्रकार: 'सनया नफेरिया बुरंगें।'- मुवन १२.५९. २. पडघम. [फा. नफीर]

**नफ्फट** वि. निगरगट्ट: 'पण मी नफ्फटपणं बसून रहाते!'- हेतो प्रबो ३३.

**नबळा** वि. नेभळा; दुबळा; निर्बळ. [सं.निर्बल; गु.नबळुं]

**नबा(वा)ब** पु. १. मुसलमान राजा, संस्थानिक. २. मोठा श्रीमंत माणूस; बडा उमराव. [अर. नूवाब, नव्वाब; फ्रें.; पोर्तु. नबाबा]

**नबेदा** अक्रि. अदृश्य होणे. (अहि.)

**नभ** पु.न. १. आकाश; अंतराळ; अस्मान. २. मेघ; ढग. [सं.]

**नभकट** न. लहान ढग: 'नभकटें धुकटें कट पाभळी।'- दावि ८६.

**न भूतो न भविष्यति** पूर्वी कधी झाला नाही व पुढे कधी होणार नाही असा; अलौकिक. [सं.]

**नभोनाटिका** स्त्री. आकाशवाणीतून ऐकवली जाणारी नाटिका; श्रुतिका.

**नभोवाणी** स्त्री. आकाशवाणी; ध्वनिक्षेपणकेंद्र. [सं.]

**नम** पु. १. वाकणे; नमणे. २. पडते घेणे. (क्रि. खाणे, घेणे, जाणे, येणे.). ३. उतार: 'अशा प्रकारच्या पटाईत तुळईच्या २० फूट लांबीस तीनचतुर्थांश इंच या मानानें नम द्यावा.'- मॅरट ६०.
वि. कमी; कमती. (खा.)

**नमक** पु.शतरुद्रीय स्तोत्रांतील पहिला भाग. यात रुद्रस्तुती असून 'नमो' शब्द वारंवार येतो. [सं.]

**नमक** न.मीठ. [फा.;हिं.]

**नमणे** उक्रि. १. वाकणे; लवणे; बाकवले, मुरडले जाणे (लाकूड इ.). २. नम्र होणे; वंदन करणे. ३. मान तुकवणे; हार जाणे; शरण येणे; पड खाणे; हात जोडणे. ४. (गर्व, राग, संताप, रोग इ.) शांत, कमी होणे, ओसरणे. [सं.नम्]

**नमता** वि. वाकणारा; कमी; शांत झालेला; पडता.

**नमदा, नम्दा** पु. १. खळीत, डिंकात लोकरीचा लगदा लाटून, दाबून केलेले जाड कापड; बुर्णूस; (इं.) फेल्ट. २. काथ्या, जाडी लोकर इ. भरून केलेली गादी; पायपुसणे: 'सतरंजीची पट्टी टाकावी व त्यापुढें दोन नमदे टाकून प्रवेशद्वारास मश्रूचा पडदा लावावा.'- ऐरापुप्र ११.६०३. ३. घोडा, हत्ती वगैरेंच्या खोगिराखालील जाड बुर्णुसाची गादी. [फा.नमद्]

**नमन** न. १. नमस्कार; वंदन. २. लवणे; वाकणे. ३. कीर्तन, पुराण वगैरेंच्या आरंभी ईश्वरस्तुतिपर श्लोक म्हणण्याची क्रिया; तमाशा इ.च्या आरंभीचे वंदन; मंगलाचरण. ४. (ल.) आरंभ; सुरुवात; प्रस्तावना. [सं.]
(वा.) **नमनात-ला घडाभर तेल जाळणे-** एखाद्या कार्याच्या आरंभालाच जास्त वेळ, पैसा खर्च करणे.

**नमरी** वि. धूर्त. (झाडी)

**नमविणे** सक्रि. १. वाकवणे. २. शरण यायला, हात जोडायला भाग पाडणे; जिंकणे; वठणीवर आणणे.

**नमश्री** स्त्री. सुरुवात; प्रारंभ. (गो.) [सं.नमः+श्री]

**नमस** स्त्री. १. देवाचा नैवेद्य इ.चा खर्च चालवण्यासाठी देवालयाला इनाम दिलेली जमीन. (कु.,गो.) २. शिपाई लोकांची वतनवाडी.(गो.)

**नमस्कार, नमस्या** पु. स्त्री. १. हात जोडून व डोके वाकवून करतात ते वंदन; अभिवादन; नमन. २. परस्पर अभिवादनासाठी हात जोडण्याची कृती.[सं.](वा.) ० **करणे-** सोडून देणे; त्याग करणे; रजा घेणे; रामराम ठोकणे. **(एखाद्याला) नमस्कार असो-** एखाद्याचे नावही घेणे नको.

**नमस्कारदंड** पु. दंडाचा एक प्रकार. यात दंड काढल्यावर हात जोडून नमस्कार करतात.

**नमस्ते** १. तुला नमस्कार असो या अर्थाचे संस्कृत वाक्य. २. (संघ-व्यायामातील) नमस्कार करण्याची क्रिया; तीबद्दलचा हुकूम.- संव्या ३९. [सं.]

**नमा** स्त्री. प्रतिबंध; मनाई.

**नमःकार** पु. अग्नीत आहुती टाकताना 'नमः' म्हणून केलेला उच्चार.

**नमाज** स्त्री. १. मुसलमानांची ईश्वरप्रार्थना. (क्रि. करणे, पढणे.). २. (ल.) अंगलट आलेली, गळ्यात पडलेली एखादी अनिष्ट गोष्ट; लचांड; लिगाड; ब्याद; भार, संकट वाटण्याजोगे जनावर इ. (क्रि. पडणे, घालणे.). [फा.नमाझ्]

**नमाजबंद** पु. (मल्लविद्या) कुस्तीतील एक डाव. जोडीदाराच्या आपल्याकडील हाताचे मनगट धरून त्या हातावरून आपला पाय घालून आपल्या दुसऱ्या मांडीच्या जांघेत तोच हात धरून व जोडीदाराच्या हातात घातलेला आपला गुडघा जमिनीवर टेकून जोडीदाराला या डावाने चीत करता येते. (नमाजाच्या बैठकीप्रमाणे हा डाव बांधायचा असतो म्हणून हे नाव रूढ.).

**नमान** न. चोख उत्तर. (कु.)

**नमार** वि. तांदळाची एक वन्य जात. (बडोदे): 'ऋषीधान्यसांवा व नमार या दोन जातीचे तांदूळ...'- ऐरा १४४. [सं.नीवार]

**नमित** वि. वंदिलेला; नमस्कार केलेला. [सं.]

**नमिता** वि. नमस्कार करणारा.

**नमु(मो)ना** पु. १. नकाशा; आराखडा. २. मासला; आदर्श; उदाहरण. ३. नक्कल; प्रतिमा. ४. प्रकार; तऱ्हा. [फा.नमूना]

**नमुनाघटक** पु.अव. नमुनापद्धतीने सर्वेक्षण करताना माहिती गोळा करण्यासाठी निवडलेले घटक.

**नमुनाचाचणी** स्त्री. सर्वांना लागू पडतील असे निष्कर्ष काढण्यासाठी काही निवडक घटकांची पाहणी करणे.

**नमुनाचौकट** स्त्री. अभ्यसनीय समूहातील नमुने निवडण्यासाठी केलेली सर्व वस्तूंची यादी.

**नमू(मो)द** पु. स्त्री. प्रसिद्धी; जाहिरात; प्रख्याती: 'स्वामी ज्यास हातीं धरितील त्यांस नमुदांत आणितील.'- मइसा १.१५४.
वि. १. (सरकारी कामकाजात रूढ) निर्दिष्ट, नोंद, दाखल, रुजू केलेली. २. (ल.) मुक्रर; निश्चित: 'सदर प्रमाणें न झाल्यास लढाई नमूद आहे.'-

इनाम १४४. ३. प्रसिद्ध; प्रख्यात: 'दौलतीस धक्का बसलियावर प्रस्तुत दुन्याईंत नमूद तुम्ही व्हाल.' - मइसा ५.१९. ४. देखणा; सुरेख; भव्य; थाटामाटाचा. ५. राजी; कबूल; तयार. [फा.]

**नमोदा** पु. आखणी; आराखडा; नमुना; नमूद: 'त्याप्रमाणे कामाचा नमोदा करिती ग्रामस्थ।' - पैमा.

**नमोनमो** नमस्कार. [सं.नमः द्वित्व] (वा.) ० **करणे**– एखाद्याबद्दल अतिशय आदर, भीड दाखविणे, राखणे.

**नमोनारायण** उद्गा. गोसाव्यांना नमस्कार करताना व गोसाव्यांनी परस्परांना अभिवादन करताना उच्चारण्याचा शब्द.

**नमोस्तु** १. नमस्कार असो. २. एकमेकांना नमस्कार करताना महार लोक उच्चारत तो शब्द. [सं.]

**नम्र** वि. १. (भार, ओझे इ.नी) वाकलेला; लवलेला. २. विनयशील; लीन; आज्ञाधारक. ३. मऊ. [सं.]

**नम्रता, नम्राय** स्त्री. विनय; लीनता. [सं.]

**नय** स्त्री. नदी; नई : 'यांच्या क्रिया विलोकुनि, म्हणतिल पंकप्रसूति हाय नया।' - मोआश्रम ३.६७. [सं.नद-दी]

**नय** पु. १. नीति-न्यायशास्त्र; नीती; न्याय; सन्मार्ग; सच्चेपणा. २. मार्गदर्शकत्व; पुढारीपण; नेतृत्व. ३. राजनीती; राज्यकारभार; (संस्था, राज्य इ.चे) अनुशासन. [सं.]

**नयन** पु.न. डोळा; पाहण्याचे इंद्रिय. [सं.]

**नयनयतां** अनिच्छेने: 'आम्ही नयनयतां जरि तुम्ही निक्षेपिलों आहवी.' - गरा १०६.

**नयवाद** पु. जैनमत. नय म्हणजे अंश, अंग किंवा पाहणाऱ्याचा विशिष्ट अभिप्राय.

**नया** स्त्री. (नाविक.) काठीच्या व कलमीच्या दोऱ्या लावण्यासाठी असलेली गलबताच्या बाहेरील दांडी. (हेट.)

**नयार** स्त्री. डोंगरकपार; डोंगरसपाटी.

**नये** क्रि. एखाद्या अप्रासंगिक, अनिष्ट क्रियेचा सौम्यपणे निषेध करायचा असता धातूच्या ता किंवा ऊ प्रत्ययान्त रूपापुढे योजण्याचे निषेधार्थी क्रियापद. [सं.न एव]

**नव्या** पु. (गंजिफा, पत्त्यांचा खेळ) नऊ ठिपक्यांचे पान; नव्वी. (कर.)

**नर** पु. १. मनुष्य. २. पुरुष; पुरुषजात; ज्याच्या शरीरात रेत, वीर्य, शुक्र तयार होते असा सजीव. ३. जोडीच्या पदार्थांतील मोठा पदार्थ. ४. परमपुरुष; पुराणपुरुष; आदिपुरुष. ५. घोडा: 'कोतल नर कोतवाल वारण मगनमस्त किल करित।' - ऐपो २००. ६. (ल.) मळसूत्री खिळा; दारांच्या झडपांना असणाऱ्या लोखंडी पट्टीत-मादीत बसणारा चौकटीचा खिळा. ७. (ल.) उसाच्या चरकातील तीन लाटांपैकी मधली किंवा दोन लाटांतील उजवी लाट; नवरा. ८. बुद्धिबळातील सोंगटी. ९. (मुद्रण.) (ल.) टंककृतीत पोलादी खिळ्यावर घासून तयार केलेला ठसा; (इं.) पंच. १०. मोती डोळ्यांसमोर धरल्यावर आतील बाजूला चिरल्यासारखी दिसणारी रेघ. ११. अंकुर; कोंब.- शे ३.६. १२. वाशांतील, वाळलेल्या कळकातील उभा घट्ट तंतू. १३. नखाच्या मुळावरचे उचकटलेले कातडे. १४. (ज्यो.) उन्नतांश ज्या. [सं.](वा.) ० **मोडून नारायण घडणे**– १. एखादी वस्तू घडणे, मोडणे व पुन्हा घडणे; त्याच त्याच गोष्टीची घडामोड करणे. २.मनुष्याला देवपदाला, श्रेष्ठपदाला पोचवणे. **नरो वा कुंजरो वा**– (अश्वत्थामा या नावाचा मनुष्य की हत्ती युद्धात मारला गेला हे मला माहीत नाही, असे गुळमुळीत उत्तर देऊन धर्मराजाने द्रोणाचार्यांना चकवले त्यावरून) एखाद्या गोष्टीविषयी पूर्ण अज्ञान, औदासीन्य दाखवण्यासाठी दिलेले संदिग्ध उत्तर; माहीत नाही असे दाखविणे.

**नरक** पु. १. यमनगरीतील विष्ठा, रक्त, पू इ. घाण वस्तूंनी भरलेली, पापी लोकांना मृत्यूनंतर यातना भोगण्याची जागा. याचे ८४ प्रकार आहेत. २. (ल.) विष्ठा; मल; घाणीचा संचय; (सामा.) गू. ३. विष्णूने मारलेला एक राक्षस. ४. (ख्रि.) ईश्वरी सहवासाचा व तज्जन्य आध्यात्मिक अनुग्रहाचा अभाव. ५. (ख्रि.) सैतान व दुरात्मे यांचे वसतिस्थान. [सं.](वा.) ० **अंगावर घेणे**– वाईट, दुष्कीर्तिकारक काम अंगावर घेणे. ० **उपसणे**– एखाद्याच्या घाणेरड्या गोष्टी, कृत्ये बाहेर काढणे; त्यांची शहानिशा, चर्चा करणे. ० **तोंडात साठवणे**– तोंडात नेहमी अपशब्द, ग्राम्य शब्द भरलेले असणे; नेहमी अश्लील, शिविगाळीचे भाषण करणे. **नरकाची वाट दाखविणे**– एखाद्याला वाईट कामाकडे प्रवृत्त करणे; वाईट उदाहरण घालून देणे. **नरकाची सामुग्री**– १. नरकवासाला पात्र करणाऱ्या दुष्कृत्यांचा समुदाय. २. (रागाने) संसार. ३. (रागाने) नकोशी, तिरस्करणीय गोष्ट, काम. **नरकाचे खापर, टोपले**– कर्ज; आतबट्ट्याचा धंदा; लोकापवाद; अपकीर्ती इ. (क्रि. येणे, फुटणे, घेणे, डोईवर येणे.). **नरकात जीभ घालणे**– १. खोटे बोलणे. २. घाणेरड्या गोष्टीचे अभिवचन देणे. **नरकात धोंडा टाकून शिंतोडे घेणे**– १. घाणेरडी कृत्ये करण्यात पुरुषार्थ, समाधान मानणे. २. वाईटाशी संबंध ठेवून त्याचा वाईट परिणाम भोगणे. **नरकात प(पि)चणे**– घाणेरड्या, किळसवाण्या जागेत, परिस्थितीत खितपत पडणे. **नरकाने अंग भरणे**– (ल.) कर्जाखाली बुडणे; पराकाष्ठेचे कर्जबाजारी होणे. **नरकी ध(ध्व)जा लावणे**– ज्यामुळे नरकात श्रेष्ठपणा गाजेल अशी घाणेरडी कृत्ये करणे. **लोकांच्या नरकात बुडणे**– लोकांचे पराकाष्ठेचे देणे होणे; लोकांच्या कर्जात बुडणे.

**नरककुंड** न. १. पापी मनुष्य मृत्यूनंतर जेथे खितपत पडतो ते नरकाचे कुंड. २. (ल. तिरस्कारार्थी) गर्भाशय. [सं.]

**नरककेस** पु. अव. (मुलाला) उपजत असलेले, गर्भावस्थेत आलेले केस.

**नरकचतुर्दशी** स्त्री. विष्णूने नरकासुराचा वध केला तो दिवस; आश्विन वद्य चतुर्दशी. या दिवशी पहाटेला, चंद्रोदयाच्या वेळी अभ्यंगस्नान करून यमतर्पण करायचे असते.

**नरकवास** पु. १. नरकात राहणे. २.(ल.) गर्भवास. ३. घाणेरड्या, यातना भोगाव्या लागणाऱ्या जागी राहणे. ४. अधर्मस्थान.

**नरकाड-डी, नरकड** स्त्री. घाणीची, दुर्गंधीयुक्त जागा; गुखाडी.

**नरकाडी** स्त्री. फजिती: 'शूरांहूनि मानिलें लंडी। तरी युध्यप्रसंगीं नरकाडी।' - दास १३.१०.१७.

**नरकीचा कांदा** सर्पदंशावर देण्यास उपयोगी असा एक कंद.

**नरगष** न. कांद्याच्या रोपासारखे झाड. फळ वाटीच्या आकाराचे.

**नरगसी कलिया** एक प्रकारचा मांसाहारी खाद्यपदार्थ. हा चिकन व भाज्या घालून करितात.- गृशि २.६७. [फा. नरगिस्+अर. कलिया]

**नरगा, नर्गा** पु. वेढा. पहा: **जर्गा** [तु. नर्गह]

**नरघा** पु. एक वाद्य; तबला.- (बडोदे) कला १३६. [गु.]

**नरटवणी** न. नारळाच्या नरोटीने भरावे लागण्याइतके (ओढ्याचे, विहिरीचे कमी झालेले) उथळ पाणी.

**नर(रो)टी, नर(रं)वटी–टे** स्त्री. न.१ माणसाच्या डोक्याची कवटी; कवटीचे हाड; नरकपाल. २. नारळाची करोटी; करवंटी.

**नरटेल** न.नारळाच्या नरट्या जाळून काढलेले तेल.

**नरड, नरडपे – व,नरडपेच** पु. जनावरांच्या गळ्याला होणारा एक प्रकारचा घातुक रोग. याने पुष्कळ गुरे मरतात; काळपुळी; गळोटी. (कु.)

**नरडणे** सक्रि. नरडी दाबणे; ठार मारणे.

**नरडी–डे** स्त्री.न. १. घसा; अन्नमार्ग. २. गळ्याच्या वरच्या भागात दिसणारा, पुढे येणारा भाग; घाटी; गळा; कंठमणी. [सं.नर्दी; हिं., गु.नरडो](वा.) ० **घेणे–** ठार मारणे: 'अभावाची घेतली नरडी।'- दास ५.९.४६. ० **दाबणे–** गळा दाबून जीव घेणे. ० **धरणे–** १. जेवायला खोळंबा करणे. २. गळा धरणे; संकट आणणे. ० **फोडणे–** मारणे. ० **बसणे–** घशातून आवाज न निघणे. **नरडीचा घोट घेणे, नरडीचे रक्त पिणे–** ठार मारणे; जीव घेणे. **नरडीला नख देणे, लावणे–** मूल जन्मताच त्याचा गळा दाबून ठार मारणे. **नरडीला हात घालणे–** ठार मारणे. **नरडीस बसणे–** खनपटीला बसणे; पिच्छा पुरवून, तगादा करून सतावून सोडणे; गळी पडणे.

**नर(रा,ऱ्हा)णी** स्त्री. न्हाव्याचे नखे काढण्याचे हत्यार.[सं.नखहरणी]

**नरतबेला** पु. फक्त, पुष्कळ पुरुषच राहतात अशी जागा; पुरुषांचे वठार. [सं.नर+हिं.,फा.तबेला]

**नरतुरंगम** पु. (ज्यो.) एक नक्षत्रपुंज.

**नरद** स्त्री. बुद्धिबळे, फासे इ.च्या खेळांतील सोंगटी:'आमचें जुग विसकटतांच नरद ठार केली.'- भाब १७. [फा.नर्द]

**नरद** स्त्री. फट; भेग; सांध्यांतील अंतर.(अहि.)

**नरनरणे** अक्रि. पडसे येणे.

**नरनरा** वि. ताजे. (झाडी)

**नरनाल** स्त्री. एका माणसाने वाहून नेण्यासारखी लहान तोफ.

**नरप** न. कपाळ.(व.)

**नरपट्टी–पाटी** स्त्री. आटे पडण्याची वस्तू घट्ट धरणारे यंत्र. यात दोन बाजूंना हात व मध्ये चपटा भाग असतो. चपट्या भागात निरनिराळ्या आकारमानांची भोके असतात.

**नरपती** पु. १. राजा. २. पायदळातील सैनिकांचा मुख्य.- हंको.

**नरपशू** पु. (निंदार्थी) पशूंप्रमाणे वर्तन करणारा; मूर्ख व अधर्मी, दांडगा व निर्दय मनुष्य; नराधम.

**नरपात** न. नखे काढण्याचे यंत्र.

**नरपुडा** वि. मरतुकडा; रोडका.

**नरपुंगव** पु. नरश्रेष्ठ; मनुष्यात उत्तम, वरचढ, अग्रणी. [सं.]

**नरबली–ळी** पु. १. यज्ञात बळी देण्याचा मनुष्य. २. पहा: **नरमेध** [सं.]

**नरभक्षक** वि. माणसाला खाणारा; माणसाच्या रक्ताची चटक लागलेला. [सं.]

**नरभू** स्त्री. प्राचीन काळी हिंदूंना माहीत असलेल्या जगाचा मध्यभाग; मध्यवर्ती देश; भरतखंड. [सं.]

**नरम** वि. १. मृदू; कडक नसलेले; गुलगुलीत; मुलायम. २. (ल.) कठोर, जहाल नसणारा; गरीब; सौम्य; लीन; मवाळ. ३. भोळा; साधा; बावळट. ४. बायकी; बुळा. ५. स्वाभाविक तेज, कडकपणा, तीक्ष्णता कमी असलेला. उदा. कोमट पाणी इ.[फा.नर्म; गु.] (वा.) ० **पडणे, होणे–** (बाजारभाव इ.) कमी होणे, उतरणे, मंदीस येणे. ० **येणे–** (एखादा मनुष्य इ.) स्वभावाने गरीब बनणे; सौम्यपणाने वागू लागणे. **(एखादे) काम नरम करणे–** काम फत्ते करणे.

**नरमगरम** वि. १. फार उष्ण किंवा फार थंड नाही असे. २.तेजीमंदीचा. ३. मवाळ–जहाल.

**नरम चारा** (ल.) उंची व नाजूक खाणे, अन्न.

**नरमछापी** वि. जुनेपणामुळे ज्यावरील छाप, ठसा विरूप, खराब झाला आहे असे (नाणे).

**नरमणे** अक्रि. (वारा, पाऊस, विकार, संताप, ताप इ.) कमी, मंद, सौम्य होणे; मंदावणे.

**नरमाई, नरमी** स्त्री. मृदुत्व; नरमपणा; कोमलता; मवाळपणा. [गु.]

**नरमादी** स्त्री. १. जोडीच्या दोन पदार्थांतील पुरुष व स्त्री. २. जोडीच्या दोन पदार्थांतील स्त्री–पुरुष संबंध; लहानमोठेपणा. ३. (व्यापक) (दोन पदार्थ, व्यक्ती इ.तील) श्रेष्ठकनिष्ठभाव; तरतमभाव; उजवा–डावा प्रकार. ४. उसाच्या चरकातील लाटा. ५. बिजागरी. ६. एक प्रकारचे कुलूप. [फा. नर्मादा]

**नरमावणे** अक्रि. १. नरम, सौम्य होणे. २. (ल.) शांत, सुसह्य, कमी, मंद होणे.

**नरमिना** पु. १. रेशीम. २. रेशमी वस्त्र, कापड इ.:'नरमिन्याचीं दिंडें सवें शिकारखाना।'- निगा ३२५. [फा. नर्मीना, नर्म]

**नरमेध** पु. मनुष्ययज्ञ; ज्यात नरबळी देतात तो यज्ञ. [सं.]

**नरयान** न. माणसांनी माणसांना वाहून नेण्याचे साधन. उदा. पालखी, मेणा, रिक्षा इ.

**नरलवंग** स्त्री. लवंगांची एक जात.

**नरवरी** वि. नरवर शहरात बनलेला (लोखंडी जिन्नस, अडकित्ता, तरवार इ.): 'मोठमोठाले नरवरी नवे। उभे करावे त्यावरी।'- अफला २५.

**नरवा** स्त्री. घाण्यातून गाळलेले तेल जिथे पडते ती खाच.

**नरवा** पु. करवसुलीची रयतवारी पद्धत: 'तिसऱ्या पद्धतीचें नांव नरवा.'- बडोद्याचे राज्यकर्ते ३५८.

**नरवी** स्त्री. आधार: 'बोला न लाहोनि नरवी.'- अमृतानुभव ६.९८.

**नरवादार** वि.ज्यांनी प्रथम खेड्यांची वसाहत करून जमीन लागवडीला आणली त्यांपैकीं प्रत्येक. - बडोद्याचे राज्यकर्ते २५८.

**नरशा** पु. नवस करून झालेला मुलगा.(व.)

**नरसाळे** न. तेल इ. द्रवपदार्थ भांड्यात ओतण्याचे साधन; गळणी; नाळचे; चाडी.

**नरसिंग-ह** पु. १. विष्णूचा चौथा अवतार. २. (ल.) सिंहासारखा उग्र व पराक्रमी पुरुष; पुरुषश्रेष्ठ.

**नरसिंग** न. वाजविण्याचे एक प्रकारचे शिंग; तुतारी.

**नरसिंहावतार** पु. दैत्यराज हिरण्यकश्यपूचा वध करण्यासाठी विष्णूने धारण केलेले सिंहाकृती मनुष्याचे रूप, अवतार. (वा.) ० **घेणे**– अतिशय रागावणे; कोपाविष्ट होऊन उग्र रूप घेणे.

**नरसुविद्या** स्त्री. संजीवनीविद्या: 'अमृतसंजीवनीविद्या । बृहस्पति नेणे नरसुविद्या ।'– मुक्तेश्वरकृत महाभारत आदिपर्व १७.१६.

**नरसे** न. स्वत:च्या छंदाने चालण्याचे वेड; हेकडपणा; गाठेपणा; दुराग्रहीपणा अथवा त्याची लहर. (राजा.)

**नरसोबा** पु. रागीट, तापट मनुष्य. (नरसिंह ही उग्र देवता आहे यावरून).

**नरहरदेवाची पालखी** १. नरसिंहाची पालखी. ती उचलण्याचे पुण्य लाभावे म्हणून तिच्या दांड्याला खांदा द्यायला भक्त उत्सुक असतात. तेव्हा साहजिक फार गोंधळ उडतो. २. (त्यावरून ल.) जे काम करण्यासाठी खूप लोकांची गरज असते, कामाची जबाबदारी कोणा एकावर सोपवलेली नसते व काम होण्याची किंवा चांगले होण्याची कोणी काळजी करत नाही अशा वेळी अव्यवस्थितपणे होणारे काम; बारभाई कारभार.

**नरा** पु. १. वंगण ठेवण्याचे बांबूचे नळकांडे. २. पोट.

**नराचा आख** (बिडाचा कारखाना) उसाच्या चरकाच्या मधली वृत्तचिती किंवा नर बसविण्यासाठी त्याच्या मधोमध असलेल्या भोकात बसविण्याचा आख.

**नराचे चाक** (बिडाचा कारखाना) चरकातील वरची पाटली व मधली वृत्तचिती यांच्या दरम्यान बसविण्याचे दंतुर चाक.

**नरा(ऱ्हा)णी** पहा : **नरणी**

**नरांडी** स्त्री. १. सांडपाणी जाण्यासाठी काढलेला पाट; नाला; गटार. २. गळा; अन्ननलिका; घसा; घाटी; नरडी. ३. पहा : **नळकांडी**

**नरांबा** पु. एक झाड. याचे लाकूड इमारती कामांत वापरतात.

**नरी** स्त्री. (जोडे इ. शिवण्यासाठीचे) बकऱ्याचे कमावलेले, रंगवलेले कातडे. [हिं.;गु.]

**नरीस** न. कूस; टोक. (गो.)

**नरुली** स्त्री. वासरांना पातळ पदार्थ पाजण्याचे बांबूचे साधन. (व.)

**नरोटी-टे, नरेटी** स्त्री.न. १. पहा: **नरटी**. २. (ल.) अतिशय थोडे दूध देणारी गाय, म्हैस. (वा.) ० **लागणे**– (विहीर इ.तील) पाणी नरटीने काढण्याइतके कमी होणे. ० **हातात घेणे** – भीक मागायला लागणे. ० **हातात येणे**– एखाद्याला मिळकतीपैकी काहीही न मिळणे, न उरणे; भीक मागण्याची वेळ येणे.

**नर्तक** वि. १. नाचणारा. २. नाच्या; नट. [सं.]

**नर्तन** न. पहा : **नाच**

**नर्दे(दैं)व** वि. दुर्दैवी; करंटा: 'थोडे जाणीवेनें नर्देव । होती लोक ।'– दास १५.३.६.

**नर्म** न. खेळ; क्रीडा; करमणूक. [सं.]

**नर्मद्या** पु. १. नर्मदा नदीत सापडणारा तांबड्या रंगाचा गणपतीचा बाण. २. (ल.) गोटा; दगड; मूर्ख; ठोंब्या. [सं.नर्मदीय]

**नर्मयुक्त** वि. खुबीदार.

**नर्मसचिव** पु. खुशमस्कऱ्या. [सं.]

**नर्मोकपास** स्त्री. देवकापशी. (गु.)

**नर्वा** पु. सोनाराची फुंकण्याची नळी. (झाडी)

**नर्स** स्त्री. १. लहान मुलांना सांभाळण्यासाठी ठेवलेली बाई; दाई. २. रोग्याची शुश्रूषा करणारी स्त्री; परिचारिका. ३. सुईण; बाळंतपणाच्या वेळी मदत करणारी स्त्री. [इं.]

**नर्सरी** स्त्री. १. विक्रीसाठी तयार रोपे ठेवलेली बाग. २. ३ ते ५ वर्षांच्या मुलांची शाळा; बालकमंदिर. [इं.]

**नलक** न. कोमल अस्थी; कूर्चा. [सं.]

**नलकट** वि. निर्लज्ज. (व.)

**नलद** पु. वाळा नावाचे सुगंधी गवताचे मूळ: 'शुद्ध सवांग कुश नलद परि उपभोगोचितत्व नलदासी ।'– मोवन ४.७५. [सं.]

**नलसुरी** पु. घोड्याचा एक रोग. यानें घोड्याच्या पोटांतून मैल निघतो. याला असहाल असेंहि म्हणतात.– अश्वप २.१९६.

**नलिका** स्त्री. नळी. [सं.]

**नलिकाकूप** पु. जमिनीत खोलवर यांत्रिकपणे भोक पाडून मग त्यात बसवलेल्या नळीतून पाणी काढले जाते अशी विहीर; विंधनविहीर.

**नलिकाग्रंथी** स्त्री. रक्तवाहिन्यांशी नलिकेने जोडलेली ग्रंथी. उदा. अश्रू-घर्म-ग्रंथी.

**नलिकास्थी** न. लांब हाड. [सं.]

**नलिनी** स्त्री. १. कमळांचा समूह. २. कमळांनी भरलेले तळे. ३. कमळाचा देठ. ४. अष्टनायिकांतील एक नायिका प्रकार. [सं.]

**नलिनीपद्मकोश (संयुक्तहस्त)** पु. (नृत्य.) पद्मकोशहात करून एका हाताने दुसऱ्या हाताला आधी करंगळीपासून आतून बाहेर व मग बाहेरून आत विळखा घालणे इ. अभिनययुक्त क्रिया. [सं.]

**नलिस्त** वि. वाईट; नीच; दुर्गुणी. [फा. नारास्त]

**नल्याख** वि. नालायक; द्वाड; खट्याळ : 'बहुत मानेल तो ल्याख । वरकड जाणावे नल्याख ।'– दावि ३५२.

**नव** वि. १. नवीन; नूतन; नवे. २. कोमल; चिमुकले; लहान: 'सुंदर दंडलें नव बाळ ।'– तुगा ४२४०.

**नव** वि. नऊ; ९ ही संख्या. [सं.]

**नव** अ. न; नच; नये: 'गो-धनीं बहु पुढें नव जावें । ठाव एकचि धरूनि थिजावें ।'– वामन-वेणुसुधा २२. [सं.न वै, नैव]

**नवकथा** स्त्री. नवीन आकारबंध किंवा आशय असलेली कथा.

**नवकल्पक** पु. संशोधक (प्रामुख्याने उत्पादनक्षेत्रातला).

**नवकवी** पु. अव. केशवसुतांपासून नंतरच्या काळातील आत्मनिष्ठ कविता करणारे कवी.

**नवकाव्य** न. इंग्रजी वाङ्मयाच्या प्रभावामुळे निर्माण झालेले केशवसुतांपासून लिहिले गेलेले, नवनवे प्रयोग करून पाहणारे व आपल्या भावना व्यक्त करण्यावर भर देणारे काव्य.

**नवकीर्द** स्त्री. प्रथम लागवड: 'नवकीर्दीस कोठें कोठें नांगरीत होते तें

काम सोडून या धंद्यास लागले.'- ऐलेसं ९५९.

वि. नव्याने लागवडीला आणलेली (जमीन). [फा. नौकीर्द]

**नवकुलपांचे तारू** लढाऊ गलबत: 'विलायत जंजिरा नवकुलपांचं तारू।'- विवि ८.३.५४.

**नवक्लृप्ती** स्त्री. चालू कार्यपद्धतीत सुधारणा करण्यासाठी काढलेली कल्पना.

**नवकोटनारायण** पु. १. अतिशय श्रीमंत, कोट्यधीश मनुष्य. २.(ल.) अतिशय दरिद्री, कंगाल मनुष्य.

**नवखंड** न. अव. पृथ्वीच्या नऊ खंडांचा समुदाय.

**नवखा** वि. १. नवीन; अपरिचित. २. (व्यवहार, धंदा वगैरेमध्ये) सराईत न झालेला.

**नवगजी** पु. स्त्री. १. नऊ गज लांबीचा सोपा. राजदरबारचा भव्य दिवाणखाना; कचेरी; सदर: 'राजा नवगजींत बैसला।'- ऐपो १७. २. तंबू; डेरा: 'बाडें सुंदर खाबगे नवगज्या सिद्धाच होत्या घरीं।'- सारुह ३.४५.

**नवगडधा** पु. जुलूम-जबरदस्ती; दंगा; गडबड: 'सेटियावर जुलूम जाला. नवगडधा होतो म्हणून सांगावयासहि आले होते.'- पेद २२.२९५.

**नवगण** स्त्री. (गोदी इ. ठिकाणी हमालांमध्ये रूढ) मोठे, वजनदार पदार्थ उचलण्यासाठी उपयोगात आणतात तो वासा व दोरखंड किंवा शिंके.

**नवगणित** न. जुन्या गणिताकडे पाहण्याचा नवीन दृष्टिकोन. यात गणनाकौशल्यापेक्षा तर्कशुद्ध विचार, अनुमान व आकलन यावर भर दिला जातो.

**नवगण्या** वि. नवगण, दोरखंड इ.ने वजन, ओझे उचलणारा (मजूर).

**नवगंध** पु. सुगंधाचा घमघमाट.

**नवगुण** पु. अव. (न्यायशास्त्र) बुद्धी, सुख, दुःख, प्रयत्न, इच्छा, द्वेष, संस्कार, पुण्य व पाप असे नऊ गुण.

वि. नऊपट.

**नवगुण** वि. नऊ दोऱ्यांचे (यज्ञोपवीत इ.); नऊ फेऱ्यांचे.

**नवगोजी** पहा: **नवगजी** २

**नवग्रह** पु. अव. १. सूर्य, चंद्र, मंगळ, बुध, गुरू, शुक्र, शनी, राहू व केतू हे नऊ ग्रह. २. (उप.,निंदार्थी) जूट; टोळके; कंपू.

न. मंगलकार्याच्या सुरुवातीला करतात ती नऊ ग्रहांची पूजा; ग्रहमख: 'दोन्हीं घरी नवग्रहें झालीं।'- कालिका ३६.४१.

**नवघड** वि. नवीन घडलेले, नवट (भांडे).

**नवघड-ण** स्त्री. न. पहा: **नवगण**

**नवचंडी** स्त्री. १. देवीची आराधना (विशेषत: तिच्या स्तोत्राचे, सप्तशतीचे नऊ वेळा पठण करून केलेली). २. पहा: **नवरात्र**

**नवचंदरी म्हैस** ज्या म्हशीस चार पाय, एक डोळा, एक आंचूळ व तोंड, शेपटी आणि कपाळ हीं पांढरी असतात अशी म्हैस.- नवाकाळ ७.३.१९३४.

**नवचांद** पु. १. अमावास्येनंतर नवीनच, प्रथम दिसणारा चंद्र; शुद्ध द्वितीयेचा चंद्र. २. अमावास्या.

**नवछिद्रे** पहा: **नवद्वारे**

**नवजणी** स्त्री अव. १. नऊ स्त्रिया. २. (ल.) नवविधा भक्ती.

**नवजणे** अक्रि. न समजणे; न कळणे.

**नवजवान** वि. १. तरुण; ज्वानीत आलेला. २. (ल.)अनभिज्ञ; नेणता; अननुभवी : 'बहुत करून सर्व नवजवान आहेत.'- मइसा ५.५४.[फा.]

**नवजात** वि. नुकताच जन्मलेला. [सं.]

**नवजीवन** न. १. पुनर्जन्म. २. चरित्राचे, आयुष्यक्रमाचे पालटलेले स्वरूप; नवचैतन्य; नवी उमेद; स्फूर्ती. ३. युरोपमध्ये १६व्या शतकातील कला, साहित्य व विचार यांमध्ये नवे वारे वाहू लागून निर्माण झालेले जीवन.

**नवज्वर** पु. दूषित तापाचा नऊ दिवस मुदतीचा व बहुधा घातक प्रकार.

**नवट** वि. १. अगदी ताजे; ज्याचा नवेपणा अजून गेला नाही असे. २. नुकतेच कापलेले, तोडलेले (लाकूड इ.). ३. नवा; नवीन.

**नवटाक-टके** न. १. शेराच्या अष्टमांशाचे, अर्ध्या पावशेराचे, अदपावाचे माप, वजन.२. दारू.

**नवटाकी** स्त्री. तलवारीचा एक प्रकार.

**नवतर** वि. अलीकडच्या काळातला; नवा.

क्रिवि. पहा: **नवथर**

**नवत(ता)रणे** सक्रि. फार जुन्या वस्तूची दुरुस्ती करून ती नवी दिसेल असे करणे, सुधारणे.

**नवतरा** पु. नवे तळे. (झाडी)

**नवतरी** स्त्री. भाताच्या कापणी व मळणीचा हंगाम. [सं.नवत्वरी]

**नवतसू** न. पहा: **तसू**; बाराचा (गजाचा) विसावा किंवा चोविसावा भाग; करंगळी व तिच्या शेजारचे बोट यांच्या रुंदीइतके माप.

**नवति-ती** वि. नव्वद; ९० ही संख्या. [सं.]

**नवती** स्त्री. १. तारुण्याचा भर. २. नवी पालवी; वसंत ऋतूत नागवेलीला नवी पालवी फुटण्याची अवस्था. ३. तरुणी. ४. नव्याने लावणी केलेल्या केळी; केळीची नवी बाग.

**नवथर-ळ** वि. अलीकडचा; नुकताच होऊन गेलेला, अस्तित्वात आलेला.

**नवथळ** पु. स्त्री. तरुण पिढी, मंडळी. (व., ना.)

**नवदर** पु. (मल्लविद्या) कुस्तीतील एक डाव. यात जोडीदाराच्या बरगडीजवळून आपला हात घालून त्याच्या धरलेल्या मनगटाला पिरगटून चीत करतात. [हिं.नौना]

**नवदिगर, नौदिगर** न. १. (सरकारी कर्मचाऱ्यांमध्ये रूढ) अनिष्ट फेरबदल; भांडणाला व हुकूम, करार इ. मोडण्याला प्रवृत्त होणे; वितंडवाद; विरोध; हरकत; तक्रार. (क्रि. करणे, लावणे, मांडणे, घडणे, पडणे.): 'करार जाहला असतां त्यास नव्‌दिगर करावें म्हणावें हें कसें घडेल?'- मइसा ३.२०६. २. (केलेला) ठराव, करार इ. नाकबूल करणे; (त्याबाबत) बदलून जाणे; भलतेसलते, कमजास्त बोलणे : 'कांहीं नौदिगर करून बिघाड करूं म्हणाल तर आम्ही तुमचे रफीक नाहीं.'- मइसा १.५२.

वि. नाकबूल; बेईमान. [फा.]

**नवद्वारे** न. अव. दोन डोळे, दोन कान, दोन नाकपुड्या, तोंड, गुदद्वार, मूत्रद्वार अशी शरीराची नऊ द्वारे, छिद्रे.

**नवधान्य** न. १. नवे धान्य, दाणागोटा. २. दरवर्षी पिकणाऱ्या नवीन धान्याचा वापर करण्यापूर्वी करायचा संस्कार, कुळाचार. ३. तांदळाची एक जात.
**नवनवती** स्त्री. तारुण्याची आरंभदशा; यौवनारंभ; मुसमुसणारे यौवन.
**नवनागोऱ्या** पु. चेंडू-लगोऱ्यांचा खेळ.
**नवनीत** न. १. लोणी; ताजे लोणी. २. सार; सारभूत अंश. [सं.]
**नवपाषाणयुग** न. (भूशास्त्र) अत्यंत प्राचीन पाषाणयुगाचा उत्तरार्ध.
**नवप्रविष्ट** वि. नव्याने नियुक्त वा भरती करून घेतलेला; (इं.) रिक्रूट.
**नवबौद्ध** पु. आंबेडकरी पंथाचा अनुयायी.
**नवभक्त** वि. १. नव्या गोष्टींचा शौकीन. २. (चुकीच्या अर्थाने रूढ) नुकतेच धर्मांतर केलेला; बाटगा.
**नवम** वि. नववा: 'तो एकलाचि नवमीं।'- ज्ञा १०.३१. [सं.]
**नवमत** न. सुधारणावादी, अर्वाचीन, नवीन मत.
**नवमंदिर** न. राजवाडा; प्रासाद.
**नवमांश कुंडली** (फलज्यो.) प्रत्येक राशीचा पहिला नवमांश विवक्षित राशीच्या स्वामीचा मानून तयार केलेली कुंडली.
**नवमी** स्त्री. चांद्रमासाच्या दोन्ही पक्षांतील नववी तिथी. [सं.]
**नवरकळा** स्त्री. लग्नसमारंभात अभ्यंग, वस्त्रे-भूषणे इ.नी नवऱ्या मुलाला आलेले विशेष तेज, कांती, टवटवी.
**नवरजाती, नवरजोडा** पु. (चर्मकार.) लग्नसमारंभात नवऱ्या मुलाने घालण्याचा चामड्याचा जोडा.
**नवरदेव** पु. वर; नवरा मुलगा.
**नवरभान** न. नवरानवरीच्या वडिलांनी एकमेकांना भेटल्यानंतर पंचांना दारू पाजण्याचा विधी : 'सकाळीं नवरानवरीचे बाप भेटतात तेव्हां नवरभान काढा असा पंच आग्रह धरतात.'- बदलापूर ११९.(कातकरी)
**नवरस** पु.अव. अलंकारशास्त्रात सांगितलेले- शृंगार, वीर, हास्य, करुण, रौद्र, भयानक, बीभत्स, अद्भुत, शांत हे नऊ रस. [सं.]
**नवरंगडा** वि. १.नित्य नव्या तऱ्हा करणारा. २. नवरसांमध्ये रंगणारा.
**नवरा** पु. १. विवाहयोग्य झाल्यापासून लग्न होईपर्यंतच्या अवस्थेतील पुरुष; वर. २. नवरदेव; लग्नसमारंभातील नवरा मुलगा. ३. पती. ४. उसाच्या चरकातील मधली लाट; नर. ५. मळसूत्री खिळा. ६. लंगडीच्या खेळात पाय दमले म्हणजे आपल्याऐवजी धावण्यासाठी मागून घेतलेला गडी. [सं.नववर]
**नवरानवरी** स्त्री. अव. १. वर आणि वधू. २. उसाच्या चरकातील नर व मादी अशा दोन लाटा.
**नवरी** स्त्री. १. वधू. २. विवाहयोग्य, उपवर मुलगी. ३. पत्नी; बायको. (सामान्यत: ऋतुस्नात न झालेली विवाहित मुलगी.). ४. उसाच्या चरकाच्या दोन लाटांपैकी किंचित लहान असलेली लाट; मादी. ५. दाराच्या झडपांना असलेली लोखंडी पट्टी; मादी. [सं.नववरिका]
**नवरी** स्त्री. (सांके.) पैसा: 'नवरी कोट (एक कोट रुपये) पावली.' - मइसा ३.२२०.
**नवरी** स्त्री. ज्वारी खुडण्याची मजुरी देण्याची टोपली.(व.)
**नवरोज, नौरोज** पु.१. पार्शी वर्षाचा पहिला दिवस. २.मोगल बादशहा आपल्या राज्यारोहण दिनापासून जो नवीन सण सुरू करीत त्याच्या आरंभीचा दिवस. ३. या दिवशी करावयाचा उत्सव; समारंभ वगैरे. [फा.नव्‌रोझ]
**नवल** न. १. आश्चर्यकारक, विलक्षण, अद्भुत गोष्ट; चमत्कार; सांगण्या-ऐकण्याजोगी नवी गोष्ट. २. आश्चर्य; अचंबा; कौतुक; कुतूहल.
वि. आश्चर्यकारक; विलक्षण; अद्भुत: 'परी नवल त्याचें लाघव।'- एभा १.९९. [सं.]
**नवलकथा** स्त्री. १. पहा : **नवल**. २. कादंबरी; (इं.) नॉव्हेल. [गु.]
**नवलकोल** पु. भाजीच्या उपयोगाचा उग्र वासाचा कंद. [इं.नोहल+कोल]
**नवलपण** न. १. नवेपण; नवीनपणा; कौतुक: 'तेथ अध्यात्माचें नवलपण पुरे।'- ज्ञा ७.१७७. २. अनोळखीपणा.
**नवलपरी** स्त्री. आश्चर्य; नवल.
वि. पहा: **नवल**
क्रिवि. आश्चर्यकारक, विलक्षण रीतीने, प्रकाराने.
**नवलपरी** स्त्री. खणाच्या कापडाची एक जात.
**नवलविंदानी** पु. नवल घडवून आणणारा; आश्चर्यकारक, अद्भुत गोष्ट करणारा: 'कैसा नवलविंदानी। पुतळियां चालेंति वळनवाहानी।'- शिव ७७१.
**नवलाई** स्त्री. १. एक पिशाच्चदेवता. पहा : **जखीण**. २. (सामा.) ग्रामदेवता.
**नवलाई-र-वा-व** स्त्री. पहा: **नवल** १
**नवलाख्या** वि. अतिशय श्रीमंत, लक्षाधीश माणूस.
**नवलाव-वा** पु. १. फरक; विशेषता. २. पहा: **नवल**
**नवली** स्त्री. १. टवटवी; तेज; कांती; नूर. (क्रि. पालटणे, फिरणे). २. वृत्ती; मनाचा कल; स्वभाव: 'तुझी सुखधामा नवली।'- मोकृष्ण ३९.४५.३. एक योगक्रिया.
**नववा** वि. क्रमाने मोजताना आठव्यानंतर येणारा. [सं.नव]
**नवशा-सा-सी** वि. नवस करणारा.
**नवशिका, नवशीक -ख** वि. १. अननुभवी; नवखा; नुकताच शिकू लागलेला. २. प्रथमच गरोदर झालेली (स्त्री). ३.प्रथमच लागलेले, फळे धरलेले (झाड ).
**नवशी(सी)क** वि. १. नवसाचा; नवससंबंधीचा. २. नशिबाचा; हुकमाचा.
**नवशे** वि. नवीन, प्रथमच आलेले (प्रेक्षक).
**नवशोध** पु. कल्पकतेने सुविधा पुरवण्याचे नवीन यंत्र, तंत्र शोधून काढणे; (इं.) इन्व्हेन्शन.
**नवस** पु. १. इच्छित कार्य सिद्धीला जावे म्हणून देवाची प्रार्थना करून कार्यसिद्धी झाल्यावर देवाला (एखादी) वस्तू अर्पण करण्याची प्रतिज्ञा. २. त्या प्रतिज्ञेतील देवाला अर्पिण्याची वस्तू. [सं.नमस्] (वा.) ० **देणे**- मार देणे. (व.) ० **पुरणे, फळास येणे** - (एखाद्याचे) इष्ट कार्य (नवस केल्यामुळे) सिद्धीला जाणे. ० **फेडणे**- नवस फळाला आल्यावर, पूर्ण झाल्यावर देवाला वस्तू इ. अर्पण करण्याची केलेली प्रतिज्ञा पार पाडणे. **नवसाला पावणे**- (नवस केलेल्या देवतेने तो

करणाऱ्याचे) मनोरथ पूर्ण करणे. **नवसाचा नाऱ्या** – नवस करून झालेला मुलगा. (व.)

**नवसणे** उक्रि. नवस करणे; नवसाविषयी यात्रा, पदार्थ इ.ची प्रतिज्ञा करणे.

**नवसदेव** पु. ज्याला नवस केला असेल तो देव; नवसाला पावलेला देव.

**नवसर** वि. १. अलीकडचा; नवीन. पहा : **नवतर**

पु. नऊ पदरी हार.

**नवस(सा)रणे** उक्रि. १.पहा : **नवत(ता)रणे**. २. (सांगितलेली गोष्ट विसरू नये म्हणून) पुन:पुन: सांगणे.

**नवससायास** पु. अव. एखाद्या कार्याच्या सिद्धीसाठी देवाकडे केलेली मागणी; नवस व शारीरिक कष्ट, प्रयत्न इ.

**नवसागर** पु. (रसा.) कल्हई लावण्यासाठी वापरण्याचा क्षार. हे अमोनिया व क्लोरिन यांच्या संयोगाने बनलेले खनिज आहे. (इं.) अमोनियम क्लोराईड. [सं., गु. नवसार; अर.,हिं. नवसादर]

**नवसाहार** पु. मोत्यांचा हार: 'तोडिला नवसाहार... मोती उनारत गेली।'– जनलोकांचा सामवेद ३१८.

**नवसाक्षर** वि. नुकतीच लिहायला व वाचायला शिकलेली (व्यक्ती).

**नवसीय** वि. नवस केलेले दैवत: '... नवसियां देती उंडी । बाळकांची।'– ज्ञा १७.९७.

**नवसुती** वि. नऊ दोऱ्यांना पीळ देऊन केलेला.

**नवळका** वि. नवीन; अपूर्व; विलक्षण.

**नवंबी** स्त्री. नव्या लावणीची पानवेल. (को.)

**नवा** वि. १. नवीन; अस्तित्वात येऊन फार दिवस झाले नाहीत असा. २. अनभ्यस्त; अननुभवी; अशा माणसाचे काम. ३. वापरून जुना, अस्ताव्यस्त न झालेला. ४. अभूतपूर्व; अपूर्व; अपरिचित. ५. न उपभोगलेला; न वापरलेला. ६. नुकतीच ज्याने (कार्याची, कारभाराची) सूत्रे हातात घेतली आहेत असा (कारभारी, त्याचा कारभार).– शास्त्रीको. ७. तरुण. [सं. नव] (वा.) ० **जुना करणे**– जुना बदलून नवा घेणे, करणे (करारनामा, हिशेब, करार, अंमलदार इ.). ० **जुना होणे**– नवीनपणा, नवखेपणा नाहीसा होणे; परिचित होणे; वहिवाटणे.

**नवाई** स्त्री. १. पहा: **नवल**. २. तारुण्याची टवटवी. ३. नवेपणा.

वि. नवीन; नवा. [गु.]

**नवाज** वि. कनवाळू; पोशिंदा: 'आम्हीं पदोपदीं महाराज । अन्याई गरीबा नवाज।'– होला १३४. [फा. नवाझ]

**नवाजखानी–णी** वि. तीक्ष्ण धारेचे: 'ढाल फिरंग नवाजखाणी निशंग गगन लकेरी खुण।'– ऐपो १०९.

**न(ना)वाजणी, नवाजणूक** स्त्री. १. स्तुती; वाखाणणी; प्रशंसा. २. परामर्श; पोषण.

**नवाजणे** उक्रि. १. स्तुती, प्रशंसा, वाखाणणी करणे. २. प्रतिपाळ, रक्षण, लालन–पालन करणे; परामर्श घेणे. ३. पारितोषिक देणे; सत्कार करणे. [हिं. नवाझना]

**नवाजिक** वि. नामांकित; अपूर्व; अलौकिक: 'मानवा नवाजिक तनु मिळाली परि विफळा करिशी रे।'– राला २५.

**नवाजी** स्त्री. स्तुती; प्रशंसा: 'त्या करेंकरुनि अर्जुनवाजी । खाजवी करुनि नित्य नवाजी।'– वामन, पार्थभाग्य २.

वि. नामांकित; प्रख्यात: 'त्रैलोकीचे नवाजी।... तया रथासी शोभले।'– वेसीस्व ८.१०९. [फा. नवाझी]

**नवाडा** वि. नवखा; अपरिचित; परका. (ना.,व.,खा.)

**नवाण–न** न. तांदळाची एक जात.

**नवादे** न. पडीक भाग काढून पेरणीयोग्य केलेली जमीन,शेत. (अहि.)

**नवानवशी, नवानवसाने** क्रिवि. पुष्कळ नवस इ. करून (जन्मलेला मुलगा इ.); फार प्रयत्न, कष्ट करून साध्य केलेले (कार्य).

**नवान्नपौर्णिमा** स्त्री. नवे धान्य खायला सुरुवात करण्याचा दिवस. हा कोकणात आश्विन शु. १५ व देशावर माघ शु. १५ असतो.

**नवाब** पहा: **नबाब**

**न(नु)वार** स्त्री. १. तीन–चार बोटे रुंदीची आणि पुष्कळ लांब असलेली, पलंग विणण्याची सुती जाड पट्टी; नाडा : 'एक नवारीची खाट, त्यावर चवाळ्यासारखें कांहीं तरी टाकलेलें.' – वज्राघात ८७. २.(चर्म.) कातडे घोटण्यासाठी असलेला जाडाभरडा कपडा. [फा.]

**नवारणे** उक्रि. (पलंग इ.) नवारीने विणणे. (राजा.)

**नवासा** पु. नातू. [फा.]

**नवा(व्हा)ळी** स्त्री. १. एक जंगली फुलझाड; नेवाळी; रानजाई. २. गांधर्व पद्धतीने विवाह केलेली पत्नी: 'नवाळी भावजाय पुसे नणंद आईला.'– गांगा १०.

**नविस्ता** पु. पत्र; लिखित; लिखाण: 'याचा नविस्ता आला असेल.'– पया ४८८. [फा.नविश्ता]

**नवी** अ. एकाला नवाने गुणताना योजण्याचा शब्द.

**नवीकरणक्षम स्रोत** सतत निर्मिती करता येते असे ऊर्जेचे स्रोत.

**नवीन** वि. नवा; नूतन. [सं.]

**नवी नवरी** १. नववधू. २. (उप.) स्वाभाविकपणे जे माहीत हवे ते माहीत नसलेला, तसा आव आणणारा, लाजाळू मुलगा–गी.

**नवी नवा(व्हा)ळी** १. पहा: **नव्हाळी**. २. वर्षाचे नवे धान्य, फळ प्रथम खाण्याचा योग. ३. नवीन, अपूर्व व सुंदर वस्तू.

**नवीस–श** अ. लिहिणारा या अर्थी फार्शी प्रत्यय. याचे 'नीस' असेही रूप होते. उदा. चिटनवीस, चिटनी(णी)स.

**नवे** न. १. दरवर्षी होणारे नवीन धान्य खाण्याच्या वेळी करण्याचा संस्कार, कुळाचार. २. नवान्नपौर्णिमेला नव्या भाताच्या लोंब्या, आंब्याची पाने एका कामटीच्या ताटीवर बांधून घराच्या मुख्य दारावर बांधण्यासाठी करतात ते तोरण; नवधान्याचे तोरण. (वा.) **नवे टाकणे**– नवा उपक्रम सुरू करणे; दीर्घकाळानंतर एखादी गोष्ट करणे.

**नवे** अ. एक या अंकाशिवाय इतर अंकांना नऊ या संख्येने गुणताना योजण्याचा शब्द.

**नवे जुने** १. जुने अधिकारी काढून नवीन नेमण्याचा प्रकार. २. जुन्या वस्तू देऊन नवीन घेण्याचा, परस्पर बदलण्याचा प्रकार. (क्रि.करणे).

**नवे पाणी** पावसाळा; बरसात.

**नवोड** वि. अफूच्या पिकासाठी राखून ठेवलेल्या जमिनीत पावसाळ्यात ज्वारीचे पीक काढून पुढे जिच्यात अफू करतात अशी जमीन.

**नवोढा** स्त्री. १. नवीन लग्न झालेली, नवपरिणीत स्त्री; नववधू. २. लग्न होऊन अद्याप पतिसमागम न झालेली स्त्री. [सं.]

**नवोदित** वि. नुकतेच उदयाला, प्रसिद्धीला आलेले.

**नवोदित देश** दुसऱ्या महायुद्धानंतर स्वतंत्र झालेले देश.

**नव्याण्णव** वि. नव्वद अधिक नऊ; ९९ या संख्येसाठी योजण्याचा शब्द. [सं. नवनवति; गु. नव्वाणुं] (वा.) ० **वाटांनी, हिश्शांनी, टक्के** – बहुतेक; बहुत अंशी. **नव्याण्णवावा फेरा**– (एका तपस्वी, आत्मचिंतक मनुष्याला नव्याण्णव रुपयांची थैली सापडली. त्यामुळे त्याला शंभरावा रुपया मिळविण्याची इच्छा झाली व पुढे ती वाढत जाऊन तो भ्रष्ट बनला. त्या गोष्टीवरून) गुरफटवणारी, वाढतच जाणारी वासना, हाव.

**नव्या ताण्याचा** १. विणून तयार होऊन फार दिवस झाले नाहीत असे वस्त्र. २. अशा वस्त्राचे सूत.

**नव्वद** वि. ९०; नऊ दशक. [सं.नवति]

**नव्हता** वि. नसणारा; नसलेला: 'नव्हतेनि वल्लभें । आहेवपण कां शोभे ।– अमृ ६.६३.

**नव्हा(वा)ळी** स्त्री. नावीन्य; अपूर्वता; नवलाई: 'वाणितां वनगाळी । शब्दसुखाची होए नव्हाळी ।'– शिव २३ ; 'ऐसी त्या युद्धाची नवाळी ।'– जै ३७.९२. २. प्राप्ती: 'मग पावेन नव्हाळी । ब्रह्मसुखाची ।'– विपू १.१. ३. गोडी; इच्छा: 'सेवावया स्वानंदनव्हाळी ।'– एभा २८.२२२. ४. तारुण्याचा बहर: 'की प्रथमवयसाकाळीं । लावण्याची नव्हाळी ।'– ज्ञा १.४२. ५. हंगामातील धान्यांचा, फळांचा पहिला बहर. ६. नवीनपणा; नवेपणा. ७. टवटवीतपणा; कांती; तेजगी: 'चरणनव्हाळी आरक्त ।'– एभा ३०.२१३.

**नव्हांड** स्त्री. वाण; कमतरता; अभाव; फन्ना; चट्टामट्टा. (क्रि. होणे, पडणे).

**नव्हे** क्रि. नाही या अर्थाने जोडला जाणारा शब्द. जसे:– मी नव्हे. (याचा उपयोग कर्त्याचे अस्तित्व, स्थानिक संबंध इ. संबंधाने होत नसून कर्त्याचे गुण, जात, स्वभाव, प्रकार, रूप इ.संबंधीच्या वाक्यातच होतो.)

**नशणे** अक्रि. नाश पावणे; नष्ट, नाहीसे होणे: 'बीज मोडे झाड होये ।... परी न नशे ।'– ज्ञा १७.५९. [सं.नश्]

**नशा** स्त्री. १. कैफ; धुंदी; गुंगी. २. कैफ आणणारा अंमली पदार्थ; त्याचे सेवन. ३. मादकपणा; कैफाचा गुण. [फा.नशात्]

**नशाखोर–बाज** वि. कैफी; अंमली; दारूबाज.

**नशिअ(ह)त–यद, नश्यत, नशित–द** १. पहा: **नसीहत**. २. अद्दल. (व.). ३. तंबी. [अर. नसीहत्]

**नशीब** न. १. नेमणूक. २. वाटा. ३. दैव; प्रारब्ध. [अर. नसीब] (वा.) ० **उघडणे, उचकटणे**– भाग्य उदयाला येणे; चांगले दिवस प्राप्त होणे. ० **फुटणे**– मोठी आपत्ती येणे; अभागी असणे, होणे. ० **शिकंदर असणे**– दैव भरभराटीचे, चांगले, बळकट असणे. **नशिबाचे ताले**– कर्मानुसार घडणाऱ्या बऱ्यावाईट गोष्टी; दैवयोग; प्रारब्ध.

**नश्वर** वि. नाश पावणारा; अशाश्वत; न टिकणारा; हंगामी. [सं.]

**नष्ट** वि. १. नाश पावलेला; नाहीसा, जमीनदोस्त, धुळधाण झालेला. २. दुसऱ्याचा नाश, वाईट करण्याचा स्वभाव असणारा; दुष्ट : 'तुका म्हणे नष्टा । अबोळण्या तुझ्या चेष्टा ।'– तुगा १४१९.३. निरर्थक; अनावश्यक. ४. वाईट. [सं.]

**नष्ट** न. (संगीत) इच्छित स्वरांपैकी अमक्या प्रकारच्या स्वररचनेचे स्वरूप अमक्या अमक्या स्वरांचे आहे असे सांगून ते स्वर काढून दाखवणे. [सं.]

**नष्टचर्य–र्या** न. स्त्री. दुर्दैव; हीन–दीन स्थिती; उतरती कळा.

**नष्टजातक** न. ज्याची जन्मवेळ माहीत नाही अशा मनुष्याची जन्मपत्रिका करण्याचे शास्त्र. [सं.]

**नष्टबुद्धी** वि. कमकुवत बुद्धीचा; कमी समज असलेला.

**नष्टाई** स्त्री. १. दुष्टपणा; हरामखोरी; दगलबाजी; कपट: 'खान नष्टाई करणार नसला तर...'– सूर्योदय २९९. २. संघर्ष.

**नष्टांश, नष्टवंश** वि. निर्वंश, बेवारस. [सं.]

**नष्टोळा** वि. दुष्ट; द्वाड; नीच; कपटी.(कु.)

**नस** पु. स्त्री. १. मोठ्या आतड्याचा एक भाग (जो वायु इ.नी फुगतो); नळ. २. शीर; अशुद्ध रक्तवाहिनी; नाडी. (क्रि. घेणे, तोडणे.). ३. स्नायू. ४. नराणी. [सं.नसा; अर.] (वा.)० **दाबणे, धरणे**– चालू काम इ. थांबविणे, अडवणे.

**नस** स्त्री. १. नाकाने हुंगण्याचे औषध. २. तपकीर. [सं.नस्य;हिं.]

**नसकोणा** वि. अंगी एकही गुण नसणारा ठेंगणा व रोड मनुष्य. (कु.)

**नसणे** अक्रि. न असणे; अभाव असणे. (वा.) **नसल्या–बसल्या शिळका करणे**– उठता बसता कोणाची ना कोणाची कुरापत काढणे. (व.)

**नसतरंग** पु. गळ्याच्या शिरांवर (वाद्य) ठेवून शिर फुगवून वाजविण्याचे एक वाद्य.

**नसता** वि. १. अस्तित्वात नसलेला; अविद्यमान. २. खरी, प्रत्यक्ष नसलेली; खोटी; निराधार: 'हठें बाई कैसी धरुनि बससी गोष्टि नसती ।'– सारुह ६.१२२. ३. अनावश्यक; फाजील; अवास्तव: 'तूं फार करितोसि टवाळी । नसतीच चढविली कळी ।'– शनि ७०. ४. नुकसानीचा; तोट्याचा. ५. गरीब; अकिंचन; दरिद्री. ६. (गरिबाकडे गडी, नोकर नसतात. त्याला श्रीमंतांना पानसुपारी, मेजवानी इ. देण्याचा प्रसंग आला तर तो थट्टेने, उपरोधाने आपल्या खोट्याच गड्याला 'नसत्या' म्हणून हाक मारतो. अशा अर्थी) नसणारा; लुटुपुटीचा (माणूस, गडी). क्रिवि. वाचून; विना.– शर.

**नसद्धी** वि. नुसती; एकटी: 'निगालेआं यदुपती । न शोभेची द्वारावती । जेवी नसद्धी शांती । विवेकेंविणु ।'– शिव ५३८. [सं.न+सत्+हि]

**नसनखवडा** वि. माणूसघाण्या; मत्सरी; एकलकोंडा, तुसडा.

**नसनस** स्त्री. किरकिर; कटकट; लसलस. (व.)

**नसबंदी** स्त्री. संततिनियमनासाठी पुरुषांची शस्त्रक्रिया.

**नसर(रू)ड** स्त्री. (निंदार्थी) अशक्त, हट्टी व कोडग्या मुलाला संबोधन. वि. शरीरात पराक्रम नसतानाही ज्याला बोलल्याची लाज नाही असा कोडगा (मनुष्य).

**नसरता** वि. ज्यावाचून अडत नाही असा; निरुपयोगी : 'तो मी नसरता केला काम । क्रोधा आणिला उपशम ।'– एभा ४.१२६.

**नसराणा-णी** वि. १.(उप.) लुच्चा; सोदा; वस्ताद. २. (उप.) द्वाड; उनाड. ३. स्वार्थी; मतलबी. [अर. नस्रानी]

**नसराळे** पहा : **नरसाळे**

**नसल** न. कुळाचे, वंशाचे बीज; प्रजा; संतान: 'राजाचे नसल नाहीं म्हणोन आईसाहेबांनीं साफच सांगितलं.'- मइसा ६.३४९.

वि. औरस नसलेला; दत्तक: 'पादशाही नसलावरी छत्र धरील.'- शिचप्र ४०. [अर.नस्ल्]

**नसाणा-ना-न्या, नसानखोर** १. पहा: **नसनखवडा**. २. किरकिऱ्या; चिडखोर. (व., ना.)

**नसाय** वि. १. असह्य. २. अप्रिय; नावडता. (गो.) [सं.न+सह्य]

**नसाव** न. कुटुंब; बीज; प्रजा. (गो.) [पोर्तु. नासाओ]

**नसी** शअ. निशी(=च्या सह) या प्रत्ययाबद्दल योजतात: 'स्वसंपत्तीनसीं तेथें तया। प्रतिस्थापना।'- स्वादि १०.३.४१.

**नसीह(य)त, नसेत-द** स्त्री. १. उपदेश; सल्ला; समजावणी. २. अद्दल; शिक्षा; शासन: 'पुढें राजदर्शन जाल्यावरी जे नसीहत करणें ते हुजुरून करूं.'- मइसा ३.३३३. [अर.]

**नसुधा** वि. १. साक्षात; केवळ: 'तिये विद्येचें नसुधें। भांडार तूं।'- गीता १.५०९. २. नुसता; फक्त: 'किंबहुना मुखरूपें नसुधा। आस्वादिजे श्लेष्मेयांचा बाधा।'- भाए ७६३.

**नस्कुटा** वि. कृश; रोड; क्षीण.

**नस्त** न. १. नदी, खाडी इ.च्या मुखाशी समुद्रात असलेला वाळूचा उंचवटा दांडा; अडवण. २. ज्यावर समुद्राच्या लाटा आपटतात अशा डोंगराळ, खडकाळ प्रदेशाची रांग. ३. जहाजे समुद्रातून खाडीत नेण्या-आणण्याची वाट; खाडीचे तोंड.

**नस्तर** न. शस्त्रक्रिया करण्याचा लहान चाकू; टोकाला तिरपी धार असलेली लोखंडी सळई; नराणी. [फा. निश्तर]

**नस्ती** स्त्री. संचिका; कागदपत्राची चोपडी;(इं.) फाईल.

**नस्य** न. १. नाकाने हुंगण्याचे औषध. २. तपकीर. ३. हुंगणे; नाकात घालणे.

वि. नाकासंबंधी; नाकाने ओढण्याचे; नाकात घालण्याचे. [सं.]

**नस्वरीत** क्रिवि. त्वरित; सत्वर: 'आर्त जीवींचें जाणती। तया भेटती नस्वरीत।'- निगा १६४.

**नहर** पु. १. पाण्याचा पाट, नळ; कालवा. २. शहरातील घाण पाणी वाहून नेणारी मोरी, गटर, सारणी. ३. हौद.- शर. [अर.]

**नहरणी** स्त्री. नराणी. [हिं.;सं. नखहरणी]

**नह(हे)ला, नहल्या, नह्याला** पु. गिलावा करण्याची गवंड्यांची लहान करणी; थापी.

**नहलू, नह(हि)ल्या** पु. (गंजिफा, पत्ते यांतील) नऊ ठिपक्यांचे पान; नवल्या.

**नहाण** न. १.(अंगाला तेल लावून, अभ्यंग करून केलेले) स्नान, आंघोळ. २. प्रथम रजोदर्शन; ऋतुप्राप्ती.[सं.स्नान; हिं. नहान; क. नने] (वा.) **नहाणपदास येणे**- मुलगी ऋतुस्नात होण्याच्या वयात येणे.

**नहाण(णी)घर** न. स्नानाची खोली; बाथरूम.

**नहाणणे** सक्रि. स्नान, आंघोळ घालणे: 'कीं पाणिअें नहाणिला। काळकूटाचेनि।'- शिव ९९९.

**नहाणे** अक्रि. १. (विशेषत: तेल अंगाला लावून) स्नान करणे. २. रजस्वला, विटाळशी होऊ लागणे (विटाळशीला चौथ्या दिवशी स्नान घालतात त्यावरून). [सं.स्नान; हिं. नहान; गु. न्हावुं]

**नहाळकट** न. लहान ओढा; नाला. (को.,ठाणे)

**नहू** वि. नव्वद. (व.) [गु.नेवुं]

**नहून** अ. उलटपक्षी; नाही तर; नाही पेक्षा.- के २.१२.३०.

**नहोन-नी** क्रिवि. न होऊन; नसून: 'कांहींच न नहोन असणे। या नांव साधक।'- दास ५.९.२२.

**नळ** पु. १. मोठ्या आतड्याचा, वरचा भाग (जो वायू इ.ने फुगतो). २. जमिनीतून पाणी वाहून नेण्यासाठी दगड, माती, सिमेंट किंवा धातू इ.चे फुंकणीच्या आकाराचे करतात ते पोकळ पात्र. ३. झाकलेले गटार. ४. नाला; (पाणी वाहून नेण्याचा) पाट; सारणी. ५. पोटातील आतड्याला होणारा एक विकार. (गो.) ६. मोठी नळी. ७. पन्हळी. ८. पहा: **नळा**. ९. पहा: **नळी**. [सं.नल] (वा.) ० **गाठ एक होणे**- पोटातील नळ कठीण होण्याचा विकार होणे. **नळात भरणे**- (उपाशीपोटी किंवा श्रम केल्यावर) उभ्याने पाणी प्याल्याने ते (पोटातील) नळात जाऊन नळ दुखू लागणे.

न. १. कमळाचा देठ; नाल. २. (ल.) बेंबीचा देठ; नाळ; वार.

**नळक(कू)ट-कु(को)टे** पहा : **नळकांडे**

**नळकणे** अक्रि. निसटणे; पळून जाणे.(व.)

**नळकाठी** स्त्री. बोरू.

**नळकारागीर** पु. पाणी वाहून नेणाऱ्या पाइप इ.च्या दुरुस्तीचे व सफाईचे काम करणारा कामगार.

**नळकांडे** न. एक बाजू बंद व एका बाजूला उघडी असणारी धातू, लाकूड, वेळू इ.ची नळी.

**नळकुटी** स्त्री. १. पायाचे गुडघ्यापासून घोट्यापर्यंतचे लांब नळीसारखे हाड. २. (कागद इ.ची) लहान वळकुटी; नळी; नळकांडी. ३. गोल कौलाचा तुकडा. (गो.)

**नळगुटी-डी** स्त्री. पहा: **नळकुटी**१

**नळगूत-द, नाळगूत** न. जलोदराच्या वर्गातील एक रोग. यात बेंबीपासून छातीपर्यंतच्या शरीराला सूज येते.

**नळनळ** क्रिवि. टळटळ; तकतक; तळतळ.

**नळनळी** स्त्री. तुळतुळीतपणा; तकतकी.

**नळनळीत** वि. १. तुळतुळीत; तजेलदार: 'घोडा काळा निळा बोर नळनळीत।'- ऐपो १३९. २. मोठा व चकचकीत दिसणारा; टळटळीत; डिळडिळीत (फोड, गळू इ.).

**नळपट** न. १. (तिरस्कारार्थी) बेंबी. २. शिस्न. ३. नळकांडे; लहान नळी; नळाचा तुकडा.

वि. १. प्रमाणाबाहेर लांब. २. ढिला; सैल; पोकळ (कपडा इ.).

**नळपटणे** न. पहा: **नळपट** २

**नळपट्टी** स्त्री. (पूर्वी शहरदुरुस्तीसाठी सरकार अशी पट्टी घेई.) घरात नळाने पाणी आणल्याबद्दल भरावा लागणारा पैसा; पाणीपट्टी.

**नळपट्या, नळपटनारायण** वि. १. (गबाळ्यासारखे) बेंबीच्या खाली धोतर नेसणारा. २. ढेरपोट्या (मनुष्य).

**नळपाक** पु. १. स्वादिष्ट व श्रीमंती खाद्यपदार्थ बनवणे. २. सात्त्विक व पौष्टिक पदार्थांचे बनविलेले पक्वान्न. याउलट भीमपाक. (नळ व भीम हे पाककलेत कुशल होते. त्यांच्यातील भेद वरील अर्थात दाखवला आहे.). [नळ+सं.पाक]

**नळवडी** स्त्री. झाकलेले गटार; मोरी; नहर.

**नळवात–वायु–वाट** पु. स्त्री. पोटातील नळात विकृती होऊन उत्पन्न होणारा वायू. याने पोटात गुबारा धरतो.

**नळसडा** वि. वडा. (को.)

**नळसंग्रहणी** स्त्री. आतड्याचा एक विकार; आंत्रदाह.

**नळंगणे** अक्रि. (फार जेवल्याने पोट इ.) जड होणे; जाड्य येणे. (कर.)

**नळा** पु. १. अखंड गोल कौल; नळ्यासारखे, वाटोळे कौल. २. एक शोभेचे दारूकाम. हे बांबूच्या नळकांड्यात किंवा मातीच्या कोठ्यात दारू भरून करतात. ३.पहा : **नरा** १. ४. (सामा.) (बांबू इ.चे) नळकांडे. ५. गुरांना औषध पाजण्याचे वेळूचे नळकांडे. ६. पहा: **नळकुटी** १. ७. पहा: **नळी** १२. ८. (उंदीर इ.चे) बीळ. ९. पाणी तापविण्याच्या बंबातील धुरांडे.

**नळाळी** स्त्री. अतिशय नळनळीतपणा; चकाकी; तकाकी.

**नळांडी** स्त्री. १. मोरी; झाकलेले गटार. २. (चुन्याची घाणी इ.तील) चाकाच्या गतीने पडलेला खोल मार्ग, चाकोरी. ३. नदी, ओढा इ.च्या पात्रात प्रवाहाने पडलेली ओघळ. ४. रस्त्याच्या बाजूने पाणी वाहून जाण्यासाठी केलेली सारणी; गटार. ५. पन्हळ. ६. (ल.) पहा : **नळी** ११. ७. (सामा.) अरुंद गल्ली, मार्ग. ८. नळी.

**नळी** स्त्री.१. (सामा.) दोन्ही तोंडे खुली असून मध्ये पोकळ असणारा धातूचा, लाकडाचा, वेळूचा लांब तुकडा. २. बंदूक; ज्यात दारू ठासतात तो बंदुकीचा भाग. ३. मूत्रनलिका. ४. श्वासनलिका; अन्नमार्ग; गळा; कंठ: 'वासनेहातीं बांधवी नळी ।'– तुगा २७९९. ५. (विणकाम) धोटा; गणा किंवा कांडी ज्यात ठेवतात ते टोपण; कोश. ६. फुंकणी. (कु.) ७. पहा: **नळकुटी** १. ८. नाकपुडीचे छिद्र. ९. नळीच्या आकाराचे कौल. याचे एक तोंड जास्त रुंद व दुसरे किंचित निमुळते असते. १०. पाभरीच्या फणाला बसवलेल्या बांबूच्या पोकळ तुकड्यांपैकी प्रत्येक. याचे एक टोक फणाच्या भोकात व दुसरे चाड्यात बसवलेले असते. यातून बी जमिनीत पडते. ११. डोंगरातील अरुंद खिंड, मार्ग. १२. (ल.) बंदूकवाला. (बार, घोडा इ. शब्दांच्या लाक्षणिक अर्थांप्रमाणेच हा अर्थ.) १३. पळ; धूम. (गो.) [सं. नलक, नलिका] (वा.) **नळीचे वऱ्हाड करणे–** स्वत:ची तुंबडी भरणे. **नळी नख देणे, नळी दाबणे–** १. एखाद्याची निर्वाहाची साधने नष्ट करणे. २. निष्ठुरपणे वागवणे.

**नळीचे कुलूप** जुन्या काळचे वाटोळे गावठी कुलूप. हे लांब सळईच्या किल्लीने उघडते.

**नळीचे पीस** साळूचे बारीक निमुळत्या नळीच्या आकाराचे पीस: 'सड, केंस, लव, पिसें, नळ्यांची पिसें... इतके आच्छादनाचे प्रकार आहेत.'– मपु ६.१८७५ पृ. ८.

**नळीचे वस्त्र** नळ्यात ठेवलेले सपूर वस्त्र: 'वस्त्र श्रावणीचे तथा नळीचे': – प्रभा ७.

**नळीतेड** निशोत्तर; एक औषधी.

**नळीदार चोळणा** पायांच्या नडग्या झाकणारी, घोट्यापर्यंत लांब असलेली विजार, पायजमा.

**नक्षण–न** न. नखे काढण्याचे हत्यार; नराणी.

**नक्षत्र** न. १. तारा; तारका. २. चंद्राच्या कक्षेत असलेल्या सत्तावीस तारकापुंजांपैकी प्रत्येक. ३. भूचक्राच्या सत्तावीस विभागांपैकी प्रत्येक; तेरा अंश व वीस कला इतके अंतर ओलांडण्यासाठी चंद्राला लागणारा काळ. ४. जन्मटिपण. (गो.)[सं.] (वा.) ० **उतरणे, (एखाद्याच्या) तोंडावर नक्षत्र पडणे–** सारखी बडबड, वटवट करण्याचा स्वभाव असणे. **पायावर नक्षत्र पडणे–** नेहमी भटकत राहणे. **हातावर नक्षत्र पडणे**– चोरी करण्याची सवय लागणे, असणे.

**नक्षत्रगंडान्त** न. अश्विनी, मघा व मूळ या नक्षत्रांच्या आरंभीच्या दोन घटका व रेवती, आश्लेषा व ज्येष्ठा या नक्षत्रांच्या शेवटच्या दोन घटका अनुक्रमाने मिळून चार घटकांचे एक अशी तीन गंडान्ते होतात. त्यांपैकी प्रत्येक.

**नक्षत्रदर्शन** न. १. (संध्याकाळी) नक्षत्र, तारे दिसू लागणे. २. (ल.) नक्षत्रे दिसू लागतात ती संध्याकाळची वेळ.

**नक्षत्रनाम** न. जन्मनक्षत्रावरून ठेवलेले नाव.

**नक्षत्रबार** पु. बाण उंच उडाल्यावर तो फुटून त्यातून निरनिराळ्या रंगांचे तेजस्वी गोल निघतात असे दारूकाम.

**नक्षत्रमंडळ–ल** न. ताऱ्यांनी व्याप्त असलेले नभोमंडळ.

**नक्षत्रमाला–ळा** स्त्री. १. सत्तावीस मोत्यांचा हार. २. सत्तावीस नक्षत्रांची सारणी, यादी. ३. विवाहादी प्रसंगी एका उंच काठीला कागद, पितळपान इ.च्या फुलांच्या माळा बांधून समारंभाच्या मिरवणुकीत पुढे चालवतात ती काठी. या नेहमी मिरवणुकीच्या दोन्ही बाजूंना दोन असतात. ४. देवांच्या पुढे शोभेसाठी मांडून ठेवतात ती चांदी–पितळेची लहान भांडी समुच्चयाने: 'नाना उपकर्णे नक्षत्रमाळा ।'– दास ४.५.२३.

**नक्षत्रयंत्र** न. वेधयंत्र; सूर्य व इतर तारे यांची क्षितिजापासून उंची मोजण्याचे यंत्र. [सं.]

**नक्षत्रवासर** पु. आषाढ, भाद्रपद व कार्तिक या महिन्यांतील शुक्लपक्षाच्या द्वादशी तिथींचा अनुक्रमे अनुराधा, श्रवण व रेवती या नक्षत्रांशी योग असतो असा दिवस. [सं.]

**नक्षत्रविद्या** स्त्री. ज्योतिषशास्त्र; ग्रहगणितशास्त्र. [सं.]

**नक्षत्रवृष्टी** स्त्री. उल्कापात; आकाशातून अनेक तारे तुटून पडणे. [सं.]

**नक्षत्रसूची** वि. ज्योतिषशास्त्राचे ज्ञान नसूनही केवळ नक्षत्रे माहीत आहेत म्हणून स्वत:ला ज्योतिष म्हणविणारा मूर्ख (मनुष्य).

**नक्षत्रासारखा** वि. (नक्षत्राप्रमाणे) सुंदर; रूपवान.

**नक्षलवादी** पु. १. नक्षलबारी प्रदेशातील, मार्क्सिस्ट कम्युनिस्ट पक्षाचे

लोक. २. भारतीय राजकारणातील एक साम्यवादी जहाल गट. पश्चिम बंगालमधील नक्षलबाडी जिल्ह्यात याचा उदय झाला.

**नक्षा** पु. १. कीर्ती; नावलौकिक: 'आज भाऊ मारिला थोर नक्षा झाला।'- ऐपो ३३६. २. ताठा; वरचढपणा; अभिमान; घमेंड. (क्रि.उतरणे).

**नक्षी** स्त्री. कारागिरीचे, कलाकुसरीचे, कौशल्याचे खोदकाम, शिल्पकाम; वेलबुट्टी; कशिदा.

वि. (क्व.) वेलबुट्टीदार; नक्षीदार. [अर. नक्श]

**नक्षीची दोरी** (विणकाम) नक्षी उमटविण्याच्या आटणीची दोरी.

**नक्षीपट्टी** स्त्री. पडदे, कपडे इ.च्या किनारीला लावण्याची वेलबुट्टीदार कापडी पट्टी इ.;(इं.) लेस.

**नंग** पु. १. प्रतिष्ठा; नावलौकिक: 'धण्यासी निष्ठेनें वर्तोन आपले नंगानें राहोन कीर्ति सम्पादोन घेतल्या.'- मइसा ८.१५७. २. दरारा: 'आधींच तुमचा नंग त्या रानीं.'- ऐलेसं ८४१. [फा.]

**नंगडे** न. ताप. (बे.)

**नंगनामोश** पु. १. ख्याती; कीर्ती: 'तुमचे नंगनामोश तुमचे वडीलाप्रमाणें व्हावे, हेंच स्वामीस अगत्य.'- मइसा ८.१३६. २. पराक्रम: '...त्यास हातीं घेऊन भाऊपणें चालोन नंगनामोश करून सेवा केली.'- इमं १८८. [फा.नंग्+अर.नामूस]

**नंगा** वि. १. वस्त्रहीन; नागवा; नग्न; दिगंबर. २. (ल.) निर्धन; अकिंचन; दरिद्री; कफल्लक. ३. (ल.) बेफिकीर; निर्लज्ज; अब्रू नसणारा: 'फिरस्त्यासारख्या नंग्या लोकाशीं उद्योगी कुणबी शेतकरी भांडण्याला तयार नसतो.'- गांगा १२५. [सं.नग्न;हिं.]

**नंगा नाच** बेताल, अश्लाघ्य,निर्लज्जपणाचे वर्तन; धांगडधिंगा; धुडगूस.

**नंगी समशेर-तरवार** १. नागवी, म्यानातून बाहेर काढलेली तरवार. २. (ल.) सुंदर व चपळ स्त्री.

**नंतर** क्रिवि. मग; पश्चात; मागाहून.

**नंद** पु. बाळंतिणीला होणारा एक वायू; उन्मादवायू. (राजा.)

**नंद** पु. १. (तिरस्कारार्थी) विचारशून्य निष्काळजी व बेफिकीर मनुष्य. २. केवळ मूर्ख. [सं.नन्दी]

**नंद** पु.गर्व; मद; माज; धुंदी; आढ्यता. (कु.) [सं.आनंद]

**नंद-दी** पु. १. विवाहविधीतील अंतर्पटावर कुंकवाने काढलेले स्वस्तिक. २. पावा; मुरली. [सं.]

**नंद, नंदकी** पु. स्त्री. १. दलाल. २. दलालाला देण्याचे वेतन; दलाली.(नंदभाषा) (वा.) ० **थाकणे, ठेवणे**- गुप्तपणे दलाली मिळविणे.

**नंदई** पु. नणंदेचा नवरा; नणदोई.(व.)

**नंदक** पु. विष्णूचे खड्ग. [सं.]

**नंदकोल** पु. स्वस्तिकचिन्ह काढलेले निशाण : 'नंदकोले नाना निशाणें। तळपताती माहिनिशाणें ।'- दावि २७१.

**नंदणे** अक्रि. १. आनंद करणे; हर्ष होणे; सुखी असणे. २. नांदणे: ' नंदति नि:शंक वनांत शृंगी।'- जगन्नाथ (शक १६६९) (राजवाडे-ग्रंथमाला). [सं.नंदन]

**नंदन** पु. १. मुलगा; पुत्र. २. साठ संवत्सरांपैकी सव्विसावे संवत्सर. न. १. स्वर्गातील उपवन; इंद्राची बाग. २. आनंदवणे; सुखवणे.[सं.]

**नंदपुडी-पूड** स्त्री. अनेक औषधांचे चूर्ण, पूड.

**नंदबहिरी-रा** पु. मूर्ख, ठोंब्या, शुंभ, ढोण्या मनुष्य.

**नंदभाषा** स्त्री. बाजारात (दलालाच्या) नोकरांना, गिऱ्हाइकांना समजू नये म्हणून व्यापारी लोक उपयोगात आणतात ती सांकेतिक भाषा.

**नंदश-स** स्त्री. नणंद. (को., राजा.)

**नंदा** स्त्री.(ज्यो.) शुक्लपक्षातील प्रतिपदा, षष्ठी, एकादशी या तिथी.

**नंदाचे गोकूळ** (ल.) मुलेबाळे, गायी, म्हशी व कुटुंबातील माणसे इ.नी आनंदाने गजबजलेले घर, कुटुंब.

**नंदादीप** पु. देवापुढे अहोरात्र तेवत ठेवलेला दिवा. [क.नंदा+सं. दीप]

**नंदाय-ळे** न. खरकटे पाणी साठविण्यासाठी वापरले जाणारे मातीचे पसरट भांडे; खापराची परात.(खा.)

**नंदाळ** न. स्नानाचे पाणी ठेवण्याचे गंगाळ, घंगाळ.(खा.)[सं.नंदालय]

**नंदाळ-ळा-ळी-ळे** न. पु.स्त्री. (तिरस्कारार्थी) (उप.) जाड व मोठी भाकर.

**नंदिनी** स्त्री. १. कामधेनू. २. मुलगी; कन्या.

**नंदी** पु. १. शंकरांचे वाहन असणारा बैल; कामधेनूचा पुत्र; शिवगणांपैकी एक. शिवमंदिरात देवासमोर बसवतात ती बैलाची दगडी प्रतिमा, मूर्ती. २. (ल.) मूर्ख, ठोंब्या, टोणपा मनुष्य. [सं.नंद]

**नंदीपुत्र-बाळ** पहा: **नंदी २**

**नंदीबाळ** पु. नंदीबैलाला मिरवणारा व त्याचा खेळ करणारा मनुष्य.

**नंदीबैल** प. १. संकेताने होय, नाही इ. अर्थाने मान हलवण्यास शिकवलेला, वस्त्रालंकार घालून मालकाच्या उपजीविकेसाठी घरोघर फिरवला जाणारा बैल. २. अशा बैलाला फिरवून उपजीविका करणारी जात. ३. (ल.) पहा: **नंदी २**

**नंद्या** पु. नंद; दलाली मिळविणारा; दलाल.

**नंद्या** पु. नंदी; बैलोबा; मूर्ख.

**नंबर** पु. १. अनुक्रमांक; अनुक्रम. २. संख्या. ३. पाळी; वेळ. ४. शेत; शेताचा अनुक्रमांक; सर्व्हेनंबर. ५. (चर्म.) चपला इ.वर आकारमाननिदर्शक अनुक्रम, आकडा मारण्याचे हत्यार.(क्रि. मारणे). [इं.](वा.) **शंभर नंबरी**- अगदी उत्कृष्ट; पहिल्या प्रतीचे.

**नंबरकरी** पु.अव. एकाच गटातील, सामूहिक गुन्ह्यातील, समान कलमाखाली शिक्षा झालेले सहआरोपी.

**नंबरछपाई** स्त्री. (घोडे, झाडे इ.वर) नंबर टाकणे, छापणे.

**नंबरदार** पु. १. शेताचा मालक.(ना.) २. सरकारशी पैशाच्या बाबतीत देवघेव करणारा.

**ना** अ. १. पक्षांतरबोधक अव्यय. हे दोन शब्दांच्यामध्ये योजतात व त्याचा अर्थ दोन्ही गोष्टींचा नकार, अभाव दाखविणे असा होतो. उदा. दिवस ना रात्र; बाप ना माय. २. द्विरुक्त क्रियाविशेषण किंवा सर्वनाम यांच्यामध्ये योजले असता जर तर, ते नाही तर हे, हे नसले तर ते असा अर्थ होतो. उदा. काही ना काही, कोणी ना कोणी इ. ३. नकारार्थी क्रियाविशेषण. उदा. तो देईना-येईना-घेईना इ. ४. एखाद्या संशयावरून उत्पन्न झालेल्या आश्चर्याचे द्योतक; प्रश्नाच्या निश्चित कथनाच्या शेवटी

आले असता होय किंवा नाही असे स्पष्ट उत्तर यावे म्हणून योजण्याचे अव्यय. उदा. तू येतोस ना? खातोस ना? इ. ५. वर्तमान कृदन्तामागून येणारे अतिरिक्त अव्यय. उदा. असताना, बोलताना इ. ६. कालवाचक क्रियाविशेषणानंतर अतिरिक्त अव्यय म्हणून उपयोग. उदा. एव्हाना, तेव्हाना इ. ७. नामाच्या व सर्वनामाच्या द्वितीयेच्या व चतुर्थीच्या अनेकवचनांना लागणारा प्रत्यय. उदा. झाडांना, त्यांना इ. ८. नकारार्थी फार्शी प्रत्यय. हा शब्दाच्या पूर्वी लागतो. उदा. नाखूष, नापसंत, नापीक.

स्त्री. १. नाकारणे; नाही म्हणणे. (क्रि. करणे, बोलणे, म्हणणे.). २. नकार; मनाई; असंमती.

उअ. १. किंवा; अथवा; असे नाही तर: 'ना तें आनंदाचें रसायणु। भवरोगियांसी।'- शिव ५८. २. परंतु; की. [सं.न,ना]

**नाइकडा, नाइकव(वा)डा, नाइकी-नाइटा-नाइरी** इ. पहा: नायकडा इ.

**नाइता** पु. कोकणातील मुसलमानांचा एक ज्ञातिगट.[सं.नव; फा. नाईति-त्]

**नाइलाज** पु. निरुपाय; अगतिकता; लाचारी.

वि. लाचार; अगतिक.

**नाई-ऊ-हू** पु. न्हावी. [हिं.]

**नाईक** पु. १. मुख्य; म्होरक्या; टोळीचा नायक; मजुरांचा मुकादम. २. भाड्याने देण्याच्या घोडे, गाड्या इ.च्या अड्ड्याचा मालक, व्यवस्थापक. ३. ईस्ट इंडिया कंपनीच्या सैन्यातील कार्पोरलच्या दर्जाचा बिनसनदी अधिकारी. ४. ब्राह्मण जातीच्या सराफाला लावली जाणारी मोठेपणाची पदवी. ५. शूद्रातील एक पोटजात; रामोशी. (माण.) ६. मराठे व इतर सैन्यातील लहान अंमलदार; पत्तिनायक. [सं.नायक]

**नाऊळ** स्त्री. एक वेल. हिच्या पानांच्या खालच्या बाजूला कूस असते. पानांची भाजी करतात.

**नाक** पु. स्वर्ग: 'तें नाक नाक माज्या चित्ताचें हा विमूढ लाजेना।'- मोमंरा किष्किंधा १.१०. [सं.]

**नाक** पु. नाईक याचे संक्षिप्त रूप. हे महार, बेरड इ.च्या नावापुढे लावतात. उदा. रामनाक इ.

**नाक** न. १. श्वास व वास घेण्याचे इंद्रिय; श्वासनलिकेची सुरुवात; घ्राणेंद्रिय; नासिका. २. (ल.) धान्य, बटाटे इ.ला ज्या ठिकाणी मोड येतो ती जागा; डोळा. ३. सुई, दाभण इ.चे भोक; नेडे. ४. (कुटुंब, सभा इ.तील) मुख्य उत्कृष्ट मनुष्य; देशातील मुख्य शहर किंवा किल्ला. ५. नथीकरता नाकाला पाडलेले भोक, छिद्र. ६. धीटपणा; दम; खात्री. ७. निलाजरेपणा. ८. अब्रू; चांगली कीर्ती, नाव; उजळ माथा.

[सं.नासिका] (वा.) ० **ओरबाडणे**- नाकातील अलंकार हिसकून घेणे. ० **कापणे**- खोडकी, गर्व जिरविणे; पराभव करणे. **(आपले)** ० **कापून दुसऱ्याला अपशकुन, अवलक्षण करणे**- दुसऱ्याचे नुकसान व्हावे म्हणून आपला स्वतःचा नाश करून घेणे. ० **कापून पाटावाने पुसणे**- एखाद्याची मोठी अप्रतिष्ठा करून नंतर थोडा सन्मान करणे. ० **खाजवणे**- चिडवणे; वेडावणे; खिजवणे. ० **खाली पडणे, पाडणे, होणे**- गर्व नाहीसा होणे, करणे; मानहानी होणे. ० **गुंडाळणे**- आपला कमीपणा, पराभव कबूल करणे; शरण जाणे; क्षमा मागणे. ० **गेले तरी भोके राहिली आहेत असे म्हणणे**- मागील गुन्ह्याची लाज सोडून पुन्हा निर्लज्जपणे बोलणे, वागणे. ० **घासणे**- १. आर्जव, खुशामत करणे; हांजी हांजी करणे. २. क्षमा मागणे; चूक कबूल करणे. ० **चढवून बोलणे**- उद्धटपणाने बोलणे. ० **ठेचणे** - फजिती करणे; नक्षा उतरणे; खोड मोडणे. ० **जळणे, नाकातले केस जळणे**- फार दुर्गंधी येणे. ० **झाडणे**- १. तिरस्कार दाखवणे; ताठा, गर्व उतरविणे. २. नाक शिंकरणे. ३. घोडा इ. जनावराने जोराने नाकातून वारा काढणे. ०**तोडून कडोस्रीला खोवणे**- १.भीक मागण्यासाठी लाजलज्जा सोडणे; अगदी लोचट बनणे. २.नापसंती दाखवणे; नावे ठेवणे. ० **धरणे**- वाट पाहायला लावणे; खोळंबा करणे. ० **धरल्यास, दाबल्यास तोंड उघडणे**- एखाद्याला पेचात धरल्याशिवाय तो आपल्या म्हणण्याला कबूल होत नाही म्हणून त्याला पेचात धरणे. ० **धरून बसणे**- १. (प्राणायामावरून) धार्मिक कृत्यांत गुंतलेला असणे. २. कर्तव्य न करता वेळ दवडणे. ० **मुठीत धरून जाणे**- निरुपायाने, नाइलाजाने शरण जाणे; अभिमान सोडून जाणे. ० **मुरडणे, मोडणे**- नाक वाकडे करून नापसंती दर्शविणे; फजिती उडवणे; गर्व उतरवणे. ० **लावून (करणे)** - धिटाईने; निलाजरेपणाने (करणे).० **वर करणे, वर करून चालणे, वर असणे**- १. दिमाख, ताठा, गर्व, निर्लज्जपणा दाखवणे; वरचढ असणे. २. स्वतः दोषी असतानाही दिमाख दाखवणे; शरम न वाटणे. ० **वाहणे**- पडसे येणे. ० **सावरणे**- (बायकी) मूल जन्मल्याबरोबर त्याला न्हाऊ घालताना त्याच्या नाकात तेलाचे एकदोन थेंब सोडून त्याच तेलाच्या हाताने नाकाच्या वरच्या भागापासून शेवटपर्यंत हलके चोळणे. **नाकधु(दु)ऱ्या काढणे**- १. अतिनम्रपणाने विनवणे; शरण जाणे; क्षमा मागणे. २. केलेल्या अपराधाबद्दल प्रायश्चित्त भोगणे. **नाकपुड्या पिंजारणे, फुलविणे, फुगविणे, फुरफुरविणे, फेंदरणे**- रागाने खेकसणे; अंगावर जाणे; नाक फुगवून राग दाखविणे. **नाकमुष्ट्या हाणणे**- हिणवणे; नाराजी दाखवणे. **नाकाचा कानवला करणे**- नाक मुरडणे. **नाकाची घाण मरणे, जाणे** - १. सवयीमुळे, पडशामुळे वास न येणे; सवय होणे. २. (ल.) सवयीमुळे वाईटाचा तिरस्कार न वाटणे. **नाकात काड्या घालणे**- चिडवणे; टोमणे मारणे; कुरापत काढणे; चीड येईल असे वागणे. **नाकात दम येणे**- निरुपाय होणे; अत्यंत थकणे. **नाकात बोलणे**- नाकातून, गेंगाण्या स्वरात बोलणे; (कोकणी लोकांप्रमाणे) अनुस्वारयुक्त बोलणे. **नाकातोंडाची गुंजडी करणे**- (नाक, तोंड आवळून, चंबूसारखे करून) राग, नापसंती दाखवणे. **नाकाने कांदे, वांगी सोलणे**- १. नसता, खोटा शुचिर्भूतपणा दाखवणे; उगीच पावित्र्याच्या गोष्टी सांगणे. २. एखादे वेळी फार चोखंदळपणा करणे पण एरवी वाटेल तसे वागणे. **नाकापेक्षा मोती जड होणे**- गौण वस्तूला अधिक महत्त्व प्राप्त होणे; कनिष्ठ दर्जाचा मनुष्य वरिष्ठाहून वरचढ होणे. **नाकाला चुना लाव(ग)णे**- १.बदनाम करणे, होणे : 'सोसे कुलजा मृत्यु, न अयशाचा सोसवे चुना नाकीं।'- मोद्रोण २१.५८.२. डिवचणे. **नाकाला जीभ लावणे, झिमोटा घालणे**-

तिरस्कार दाखवणे; गर्व, ताठा, दिमाख दाखवणे; नाक मुरडणे. **नाकाला पदर लावणे** - १. लज्जेने, अपकीर्तीमुळे तोंड झाकणे. २. घाणीचा तिरस्कार करणे. **नाकाला मिरच्या झोंबणे**– एखादी गोष्ट मनाला, वर्मी लागणे. **नाकावर असणे**– अगदी तयार असणे. **नाकावरची माशी तरवारीने हाणणे**– लवकर राग येणे. (व.) **नाकावर जीव येणे**– कमालीचे कष्ट पडणे. **नाकावर टिचणे**– १. एखाद्याचे पैसे ताबडतोब देणे. २. काकूं न करता, अडथळ्याला न जुमानता एकदम देणे, करून टाकणे. **नाकावर निंबू घासणे, पिळणे**– प्रतिपक्षाला न जुमानता आपले काम साधणे; प्रतिपक्षाला चीत करणे. **नाकावर पदर येणे**– १. वैधव्य येणे. २. लाजेने लपून एकांतवासात बसणे. **नाकावर पाय देणे**– विरोधाची पर्वा न करणे; प्रतिपक्षावर मात करणे. **नाकावर बोट ठेवणे**– १. गुप्त ठेवायला, गप्प बसायला सांगणे. २. (रागाने किंवा अन्य कारणाने एखाद्याला) दबकावणे. **नाकावर माशी बसू न देणे**– अतिशय चिडखोर असणे; अपमान किंवा तिरस्कार अगदी सहन न होणे; थोडेदेखील उणे बोलणे सहन न होणे. **नाकावर वाट करणे** – विरोधाला न जुमानता काम सिद्धीला नेणे. **नाकाशी सूत धरणे**– अगदी मरणोन्मुख होणे. (मरताना श्वास आहे की नाही ते पाहण्यासाठी नाकाशी सूत धरतात). **नाकासमोर जाणे, चालणे**– अगदी सरळ मार्गाने जाणे. **नाकाहोटांवर जेवणे**– चाखतमाखत, चोखंदळपणाने जेवणे. **नाकी(का)चा बाल**– १. अत्यंत आवडता, जिवलग माणूस; गळ्यातला ताईत. २. मोठ्यांच्या परमप्रीतीतला दुर्जन. **नाकी नऊ, नळ, नव येणे**– १. अतिशय दमणे, कंटाळणे, भागणे (श्रमाने). २. (नऊ इंद्रियांची शक्ती नाकात येणे) मरणाच्या दारी असणे. **नाकी वेसण घालणे**– एखाद्याला कह्यात, कबजात ठेवणे.

**नाककरंटा** वि. अभद्र; कंगाल; नीच: '...या नाककरंट्या भावांनी वेळ आणलीय?'– आभाळाची सावली २२२.

**नाकचिंबा** वि. बसल्या नाकाचा; नकटा.

**नाकझाडणी** स्त्री. कानउघाडणी; खरडपट्टी; फजिती.

**नाकटा** वि. नागडा; नग्न. [सं.नग्न]

**नाकटी** स्त्री. दीड पावशेराचे माप. (गो.)

**नाकतोडा–ड्या** पु. मोठ्या जातीचा, गवत्या टोळ.

**नाकनिपट** स्त्री. १. शेंबूड काढणे; नाक साफ करणे. २. (ल.) पश्चात्ताप; सावरासावर; निस्तरानिस्तर.

**नाकपकड** स्त्री. मुलांचा एक खेळ.

**नाकपट्टी** स्त्री. (मल्लविद्या) आपल्या हाताची पोटरी जोडीदाराच्या नाकपुडीवर दाबून वर दाब देऊन त्याला चीत करणे.

**नाकपुडी** स्त्री. नाकाचा एका बाजूचा भाग; नासारंध्र. [सं.नासापुट]

**नाकफोड** स्त्री. लाठीचा नाकावर केलेला वार.

**नाकबूल** वि. १. इच्छा न करणारा; कबुली न देणारा; नाखूष. २. नापसंत; प्रतिकूल. [फा.]

**नाकभुंकन** वि. नाकावर भोवरा असलेला (घोडा).– मसाप २.५७.

**नाकमोड** स्त्री. नकार; नापसंती.

**नाकर चळवळ** करबंदीची, कर न देण्याविषयीची चळवळ.

**नाकर्ता** वि. अक्षम; दुर्बळ; अयोग्य.

**नाकलंगडी** स्त्री. स्काऊटच्या मुलांचा एक खेळ.

**नाकवणी** न. १. तपकीर; नस्य. २. नाकात ओतण्याचा तीक्ष्ण पदार्थ: 'नाकवणी चुनवणी।'– दास ३.७.६८.

**नाकवसे** न. तोंडाचा नाकावरील भाग: 'मिळौनि नाकवसेया नाकवसे: घायखंडी हानताति सरिसे'– शिव १०६२. [सं.नासिक्य]

**नाकशिमरो** वि. १. नकटा. २. निलाजरा. (गो.)

**नाकशिंकणी** स्त्री. एक वनस्पती; भुताकेशी; हिच्या पानाच्या वासाने शिंका येतात.

**नाक(ख)शी** स्त्री. नखुरडे.

**नाकसचे** सक्रि. नखांनी ओरबाडणे. (गो.)

**नाकस(सू)रश्रु.** न. १. एक वाद्य; गारुड्याची पुंगी. २. नाकातून बाहेर पडणारी हवा, श्वास. (क्रि. वाहणे, बंद होणे). [सं.नागस्वर]

**नाकस्ता** पु. १. न्यूनता; तोटा; तूट; नुकसान. (क्रि. काढणे, खाणे, घेणे, पडणे, भोगणे, येणे, सोसणे, होणे.) २. गोंधळाची, घोटाळ्याची स्थिती; घाबरगुंडी. [सं.नाकिस्]

**नाका** पु. १. नाके; दोन अथवा अधिक रस्ते जेथे एकत्र मिळतात ती जागा; तिठ्ठा; चौहाटा. २. रस्त्याचा शेवट; टोक. ३. जकातीचे ठाणे; दस्तुरी घेण्याची जागा. ४. पोलीस चौकी.

**नाका** पु. (कासारी धंदा) कळशीसारख्या भांड्यास जे करकोचे असतात त्यापैकीं पहिल्यास पालव व दुसऱ्यास नाका म्हणतात.– बदलापूर ९७.

**नाका** अ. नको. (गो., चि.)

**नाकाचा दांडा, वासा** नाकाचे लांबट हाड.

**नाकाचा पडदा, नाकाची पडदी, भिंत** दोन नाकपुड्यांतील पडदा.

**नाकाटणी, नाकाटी** स्त्री. अपमान; पाणउतारा. (क्रि. करणे).

**नाकाड–डा** न.पु. (निंदार्थी) १. मोठे नाक. २. डोंगराचा पुढे आलेला नाकासारखा भाग. ३. भूशिर; जमिनीचे टोक. ४. आंब्याच्या फळाचा मागील बाजूचा नाकासारखा उंच भाग.

**नाकादाई** स्त्री. १. खोड. २. खरडपट्टी. (क्रि. काढणे). (व.)

**नाकार, नाकारणी** पु.स्त्री. नकार. पहा: **नाकबुली**

**नाकार–रा** वि. निरुपयोगी; असमर्थ; वाईट; कवडीमोल; कर्तृत्वहीन: 'नाकार असतील त्यांस किल्ल्यांत न ठेवणें.'– वाडबाबा १.२०१; 'ऐसा नाकारा कशास पाहिजे म्हणून दिला.'– मइसा ५.२०.

**नाकारणे** उक्रि. १. नापसंत म्हणून अमान्य करणे. २. (पदार्थ, कृती इ.त) खोड ठेवणे.

**नाकिर** पु. मोत्याच्या शिंपीतील कालवाच्या शरीरात मोत्याप्रमाणे चमकणारा द्रवपदार्थ.

**नाकि(की)र्द** वि. बिनलागवडीची; पडीक (जमीन). [फा. नाकर्द]

**नाकुली** स्त्री. मुंगुसवेल. [सं.नकुल]

**नाकु(को)स्ती–ष्टे** स्त्री.न. १. नापसंती; नकार दाखवण्यासाठी तिरस्काराने नाक मुरडणे. (क्रि. मारणे, देणे, हाणणे). २. प्रकृतीची तक्रार.

**नाके** न. १. डोंगरी किल्ल्याच्या चढावाचे वळण. २. थांबण्याचे ठिकाण. ३. पहा: **नाका** १ ते ४

**नाकेदार** पु. नाक्यावर जकात वसूल करणारा कारकून; नाकेवाला.

**नाकेबंदी** स्त्री. १. येण्याजाण्याचे रस्ते, मार्ग अडवणे, रोखणे. २. जकात, दस्तुरी यांची जमा; गल्ला.

**नाकेरा** पु. १. बैलाच्या नाकपुडीला छिद्र पाडण्याचे साधन. २. रानबदक. ३. नकटा पक्षी.

**नाकेला, नाकील** वि. सरळ, लांब व सुंदर नाक असणारा.

**नाकोटो-टे** पु.न. (निंदार्थी) नाक.

**नाखडू** वि. १. दुर्बळ.२. आळशी; अव्यवस्थित; बिखडू.[हिं.ना+खड्डू]

**नाखवा, नाखु(खो)दा** पु. १.(नाविक) जहाजावरचा मुख्य अधिकारी; कप्तान; तांडेल; मुख्य नावाडी. २. कोळी, दालदी इ. जातीचा गलबतावरील मुख्य. (को.) [फा. नाखुदा]

**नाखशिणे, नाखी** न. नऱ्हाणी; नखे काढण्याचे हत्यार.(गो.) [सं.नखशीर्ण]

**नाखशी** स्त्री. नखाखाली होणारा फोड; नखुरडे.(गो.)

**नाखळ** वि. दुष्ट, नाठाळ, त्रासदायक (मनुष्य, पशू).

**नाखाटॉ** पु. पिसारा. (गो.)

**नाखिव** वि. कोरीव; खोदीव; कोंदणातील.

**नाखिवा** स्त्री. नखुले-ली; एक पक्वान्न: 'नाखिवा माळतिया सळिवें। इत्यादि वळिवटू बरवें।'- ऋ ८२.

**नाखी** स्त्री. नखाचा स्पर्श: 'नाखि लागैल...वैराग्याची'- ज्ञा ६.५७. [सं.नख]

**नाखु(खू)श-ष** वि. अप्रसन्न; असंतुष्ट; नाराज; रुष्ट. [फा.नाखुश]

**नाखूट** न. नख.(कु.,गो.)

**नाग** पु. एक आदिवासी जमात; त्यातील व्यक्ती.

**नाग** पु. १. फणी असलेला, विषारी साप. रंग काळसर चकचकीत किंवा पिवळसर. काहींच्या फणीच्या मागे १० आकड्यासारखी आकृती असते. लांबी ३ ते ६ फूट. २. एक उपदेवता. कमरेवरचा भाग माणसाचा व खालचा सापाचा असे स्वरूप. ३. विषमूळ; बचनाग. ४. पंच उपप्राणांपैकी एक. ५. हत्ती. ६. शिसे. ७. बायकांचा डोक्यात घालण्याचा नागाकृती अलंकार. ८. पतंगाच्या मागे लावलेले कागदी शेपूट.
न. (ज्यो.) दहावे करण. [सं.]

**नागकन्या** स्त्री. १. (पौराणिक) नागांपैकी अर्धमनुष्याकृती स्त्री, स्त्रीजात. २.(ल.) फार सुंदर, लावण्यवती स्त्री; नागीण.

**नागकुडा** पु. आल नावाचे झाड.- कृषि ४१५.

**नागकुंडल** न. १. नागाचे वेटोळे. २. या आकाराचा कानातील अलंकार.

**नागकूळ** न. १. नागपंचमीच्या दिवशी बत्तीसशिराळे येथे आढळणारे सापासारखे लहान प्राणी; नागपंचमीला निघणारा साप. २. नागपंचमीला जमिनीवर इ.काढलेली शेणाची किंवा गंधाची नागाकृती.

**नागकेश(स)र** न. एक औषधी झाड व त्याचे फूल. यात काळे व तांबडे या दोन जाती आहेत. काळे लवंगेएवढे व थंड असून मसाल्यात वापरतात, तांबडे गुणांनी उष्ण आहे. [सं.]

**नागचंद्रकोर** स्त्री. बायकांचा डोक्यात घालण्याचा एक दागिना.

**नागचंपक, नागचाफा-फणी** पु. १. एक फुलझाड. हे कोकण-कर्नाटकात होते. वृक्ष मोठा, पाने मोठी. लाकूड मजबूत. ७-८ वर्षांनी मधुर वासाची, सुंदर, तळहाताएवढी मोठी फुले येतात. २. नागदवणीसारखे एक फुलझाड, याला पिवळी फुले येतात.

**नागचाट्या** पु. नागपंचमीदिवशी जेवायला बोलावलेला मुंजा.

**नागजोडी** स्त्री. (ल.) संगनमत: 'त्यासी नागजोडी करून नामाजीनें आपणासी बेइमान होऊन.'- इमं ५६.

**नागझरी** स्त्री. लहान ओहोळ, ओढा, नाला.

**नागटा-डा** वि. १. नागवा; नग्न; उघडा. २. (ल.) म्यान नसलेली (तलवार); दोरा न ओवलेली (सुई); पर्णहीन (झाड); छत नसलेले (घर); तारा नसलेले (तंतुवाद्य); अलंकाररहित, बुच्चे (कान, नाक इ.). ३.अगदी ढळढळीत, स्पष्ट दिसून येणारा. [सं.नग्न]

**नागटा गोसावी** नंग्या गोसाव्यांचा एक पंथ.

**नागडधोया** वि. उघडा नागडा; अवधूत.

**नागदवण** स्त्री. अननसाच्या झाडासारखे झाड. पाती एक वीत पर्यंत रुंदीची व रंगाने पांढरी असतात. झाडाच्या मध्यभागी तीन हात लांबीचा दांडा येतो. त्यावर लांबट पांढरी फुले येतात. यांत बिया असतात. सर्पविषावर नागदवणीचे मूळ थंड पाण्यात उगाळून प्याले असता वांती होऊन विष उतरते. [सं.नागदमनी]

**नागदाळी** स्त्री. फड्या निवडुंग; नागफणी.(तंजा.)

**नागदिवाळी** स्त्री. मार्गशीर्ष शुद्ध पंचमी. या दिवशी कणकेचे नाग करून त्यांची पूजा करतात.

**नागनादिया** स्त्री.अव. नागाच्या आकाराचा अलंकार: 'कोण्ही रायमंडळीकु विन्हावे असती तेहि अंगणीं सरी, मुदी, नागनादिया घालौनि पहाती.'- अज्ञातच.

**नागपंचमी** स्त्री. श्रावण शुद्ध पंचमी. या दिवशी नागपूजा करतात.

**नागपाश** पु. १. एक अस्त्र; लढाईत शत्रूला मंत्राने बांधण्याचा पाश. २. नागाकार, वर्तुळाकार बंधन; वरुणपाश.

**नागपुरथर** पु. (नगरी, कोष्टी) नागपुरी; नागपूर पेठेसारखा लुगड्याचा प्रकार. मधला पोत कोणताही व रेशमी किनार, त्यामध्ये नक्षी करवत व चार गोमी, गोम मोठी.

**नागपुरी आकडा** कापडावर, जिन्नसावर घातलेला आकडा. ज्यामध्ये काही बाद आहे असा किमतीचा आकडा, संख्या.

**नागफण** पु. (नृत्य.) एक हस्त-अंगविक्षेप.

**नागफणी** वि. नागफणीच्या आकाराचा (खिळा).

**नागफणी** स्त्री. ढालीचा एक प्रकार.

**नागफणी** स्त्री. एक काटेरी वनस्पती; फड्या निवडुंग. याच्या अंगावर सापासारखे खवले असतात. याचा शेंडा नागाच्या फणीसारखा असतो.

**नागफासा** पु. १. (सोनारी धंदा) सरी वगैरेचा नागफणीसारखा अडकवण्याचा फासा. २. पहा: **नागपाश**

**नागबली-ळी-ळ** पु. १. स्त्रीचे गर्भाधान झाल्यावर गर्भधारणा होत

नसेल तर, कर्त्याच्या हातून या जन्मी अथवा पूर्वजन्मी सर्प मारला गेला असल्यास त्यामुळे गर्भधारणेला होणारा प्रतिबंध नाहीसा होण्यासाठी करण्याचे कर्म, विधी. २. नाग मारल्याबद्दलची शांती.

**नागबळ** स्त्री. अतिशय आजारी, मरणोन्मुख माणसावरील अरिष्ट नाहीसे व्हावे म्हणून करण्याचा विधी.

**नागबंद–ध** पु. १. नागाचे तोंड असलेला कंबरपट्टा. २. दृढपाश; नेसणे सुटू नये म्हणून खोवण्याची सुपारी, सोंगटी: 'पीळीव नागबंध षोवीलें।'– उषा १०८३. ३. स्त्रियांच्या दंडातील एक अलंकार. (तंजा.)

**नागबाळी** स्त्री. बायकांच्या कानातील बाळ्यांचा एक प्रकार.

**नागबिंब** न. सूर्याला किंवा चंद्राला ग्रहण असेल त्या दिवशी ब्राह्मणाला दान करण्याची राहू–केतूच्या प्रतिमेसहित सूर्य किंवा चंद्राची धातूची प्रतिमा.

**नागमणी** पु. नागाच्या डोक्यावरील (काल्पनिक) विषघ्न मणी.

**नागमल्ली** स्त्री. जाई; फुलवेलीचा एक प्रकार.

**नागमुडी** (गो.) पहा: **नागमोड १**

**नागमोड** स्त्री. १. नागाच्या आकाराची बांगडी. २. नागाच्या वळणासारख्या वाकड्या रेषा, वळण, मार्ग, धोरण. (क्रि. घालणे, साधणे). (वा.) **नागमोडीचा पितांबर नेसणे**– नागवे असणे.

**नागमोडी** वि. सर्पाकृती, नागाच्या गतीप्रमाणे वळणे घेऊन गेलेला, वाकडा, वळणदार (काठ, मार्ग, बांगडी, नदी इ.).

**नागमोडी शर्यत** स्काऊट मुलांचा एक खेळ.

**नागर** न. सुंठ.

**नागर** वि. १. नगरा– शहरासंबंधी. २. (ल.) हुशार; चतुर; जाणता; चाणाक्ष; धूर्त: ' ना तरी नगरांतरीं वसिजे । तरी नागरचि होईजे ।'– ज्ञा १.४१. ३. नागरिक; नगरवासी: 'नागरां देवां खोंबकरू।'– शिव १५२. ४. सुरेख; सुंदर; सुसंस्कृत: 'भूमंडळींच्या कन्या नागर ।'– ह २६.१४५. ५. लबाड; अनीतिमान.६. सुंदर; तेजस्वी; कांतिमान. ७. ऐश्वर्यसंपन्न. [सं.नगर]

**नागरगोंडा** पु. लग्नापूर्वीच्या अवस्थेतील, लहान वयाचा मुलगा: 'नंदघरिंचे नांगरगोंडे । कव्हडे येथें आलें धेंडे ।'– मध्व ६३५.

**नागरचुडा** पु. बांगड्या: 'सुढाळ मुक्तें कांठोकांठ । नागरचुडा नागरे।' – वेसीस्व ९.१४०.

**नागरपाटा नेसणे** (लहान मुलीला म्हणतात.) नग्न असणे.

**नागरफणी** स्त्री. नाग; बायकांच्या डोक्यातील दागिना: 'फरा आणि नागरफणी ।'– वेसीस्व ९.१३१.

**नागरमोथा** पु. ओलसर जागी वाढणारी, ४०–५० सेमी उंच, खोड सरळ भरीव, टोकास त्रिकोणी; चवऱ्यांसारखे मोठे फुलोरे असलेली, सुगंधी वनस्पती. [ हिं.; पं.; सं. नागरमुस्ता]

**नागर संस्कृती** 'हडप्पा संस्कृती'सारखी संस्कृती. वैशिष्ट्ये: तटबंदी असलेली, सांडपाण्याची व्यवस्था असलेली, २० ते ३० घरांचे प्रभाग असलेली, निवास व प्रशासकीय असे स्वतंत्र विभाग असलेली नगरे.

**नागरिक** पु. नगरातील रहिवासी; शहरवासी.
वि. १. शहरासंबंधी. २. जाणते; सुसंस्कृत. [सं.]

**नागरिकतांतर** न. एका देशाचे नागरिकत्व सोडून दुसऱ्या देशाचे घेणे.

**नागरिकत्व** न. नागरिकाची वृत्ती, गुण, हक्क इ.

**नागरिकशास्त्र** न. नागरिकांचे अधिकार व कर्तव्ये यांचा अभ्यास करणारे शास्त्र.

**नागरिक स्वातंत्र्य** नागरिकांचे भाषण, लेखन इ. करण्याबद्दलचे सर्व हक्क.

**नागरी** वि. १. नागर ब्राह्मणांसंबंधी. २. नगरासंबंधी; शहराची. ३. पहा: **देवनागरी**

**नागरीकरण** न. शहरे वाढून बहुसंख्य लोक शहरात राहू लागणे व सोबतच नागरी संस्कृतीचा प्रसार होणे.

**नागरीकरण प्रमाणपत्र** परकीय व्यक्तीला देशाचे नागरिकत्व दिल्याचे प्रमाणपत्र.

**नागरी विमान** प्रवाशांची व मालाची वाहतूक करणारे विमान.

**नागरी संहिता** नागरिकांच्या खाजगी बाबींसंबंधीच्या कायद्यांचा एकत्रित केलेला संग्रह; (इं.) सिव्हिल कोड.

**नागल** वि. श्रीमंत: ' नागलें देखोनि चांगलें बोले । आपुलें वंचूनि त्यापुढें खुले ।'– तुगा ३०५७.

**नागलकुडा** पु. एक प्रकारचे कुड्याचे झाड.

**नागला–ली** पु.स्त्री. एक धान्य; नाचणी.

**नागलोक** पु. १. नागांचे वसतिस्थान; पाताळ. २. नाग नावाचे एक प्राचीन राष्ट्र व जाती. महाराष्ट्रात प्रथम यांची वस्ती होती असे काहीजण मानतात.

**नागवण, नागवणूक, नागवणे** स्त्री. न. १. लुटालूट; दरोडा; लुबाडणे (चोर, राजा इ.नी). २. सरकारी खंड, दंड: 'मग राजा पुसेल आपणाकारण । तरी पडेल नागवण तें देऊं।'– भवि ५४.१५४. ३. व्यापारातील तोटा. ४. (सामा.) द्रव्यहानी; बुडणूक. (क्रि. घेणे, घालणे.). ५. द्रव्यापहारामुळे होणारी दुर्दशा; लुबाडल्यामुळे झालेली अवस्था: 'दंभ तोचि वायां नागवण ।'– तुगा २१. ६. लूट: 'विषयदेशींचें नागवणें ।'– ज्ञा १८.४६४.

**नागवणा** वि. नागवणारा: 'नाहीं माझे मनीं । पोरें रांडा नागवणी ।'– तुगा ३११७.

**नागवणे** अक्रि. आटोक्यात न येणे; न आटोपणे; अनावर होणे: 'इंद्रियद्वारें मन धांवें सैरे । नागवे करितांचि कांहीं ।'– तुगा ११४५. [सं. नागम्]

**नागवणे** उक्रि. १. नागवे, वस्त्रहीन करणे. २. लुटणे; जुलूम करणे; लुबाडणे; बुचाडणे. ३. फसवणे. ४.लुटला, लुबाडला जाणे.

**नागवसा** पहा: **नागोसा**

**नागवा** वि. १. नग्न; वस्त्रहीन; नागडा; उघडा; विवस्त्र. २. गरीब; दरिद्री; उघडा; पोरका. ३. दिवाळखोर; धंद्यात बुडालेला.४. भिकार; क्षुद्र; किरकोळ.५.स्पष्ट; उघड. [सं.नग्न] (वा.) **नागवे कोल्हे, नागवी सवाशीण भेटणे** – अकल्पित लाभ होणे: 'की भेटला कपटमिष साक्षात् कोल्हाचि नागवा याला ।'– मोसभा ४.६५. **नागवे नाचणे**– १. अतिशय आनंदाने बेहोष होणे. २. वाटेल तसे, स्वैर, अप्रतिबंध वागणे.

**नागवे** न. १. न्यून; तूट; वाण; उणेपणा. २. उघडा, अरक्षित भाग.

**नागवेल-वल्ली** स्त्री. विड्याच्या पानांची वेल; पानवेल. काळी व देठी हे दोन प्रकार. कोल्ह्याच्या विषावर नागवेलीचे मूळ पाण्यात बारीक वाटून दिल्यास वांती होऊन विष उतरते. [सं.नागवल्ली]

**नागस(सू)र** न.पु. १. गारुड्याची पुंगी: 'नागसर वाजविला दिवडापाशीं।'- सिंस ८.१८०. २. पहा: **नागस्वर**

**नागस्वर** पु. सनई. (तंजा.)

**नागा** वि. नंगा; नागडा.

**नागा** पु. १. तहकुबी; खोळंबा; विलंब; खंड; अंतर (कामात, गतीत). २. खाडा; मोडा; गैरहजेरीचा दिवस. [हिं.; फा. नाघा]

**नागाणा** पु. फुटाणा; भाजलेला हरभरा: 'नागांची पूजा केली, जवळ नागाणे, लाह्या, दुध इ. ठेविलं.'- नागाची कहाणी २२.

**नागारी** पु. भाट; स्तुतिपाठक: 'बंदीजन मागध नागारी।'- दाव ३१४.

**नागावा** पहा: **नागवण**: 'सरकारचे खिलारी यासी कजिया करून नागावा करावयास प्रयोजन काय?'- वाडशाछं ११८.

**नागीण-गिनी, नागी** स्त्री. नागकन्या: 'नागीपुत्र इरावान् सत्कीर्ति सरस्वती सदरविंद।'- मोभीष्म ८.२९.

**नागीण** स्त्री. १. नागाची मादी. २. विषाणूजन्य, पुटकुळ्या उठणारा, पसरत जाणारा, दाहक त्वचारोग.

**नागीण** स्त्री. एक बायकी दागिना; कंठा.- ऐरापुविवि १२५.(बडोदे)

**नागेशेवळ** स्त्री. देवापेक्षा प्रकृतीला श्रेष्ठ मानणारा व कलगी लावण्या म्हणणारा शाहिरांचा एक वर्ग. याउलट हरदासवळ.

**नागोत्र-त्रा, नागोदर** न. १. बायकांच्या कानातील एक दागिना: 'नागोत्रे श्रवणीं विराजति फुल्या त्या दूहिरी साखळ्या।'- अनंतसीस्व ४३; 'कर्णीं लेइलीं कर्णपत्रें। रत्नखचित नागोदरें।'- कथा २.११.९२. २. दागिन्यांवरील नागाचा ठसा, छाप.

**नागोरची** स्त्री. लगोऱ्या; चेंडू लगोरीच्या खेळातील मध्यभागी मांडलेली लाकडाच्या ठोकळ्यांची, दगडांची अगर विटांची एकमेकांवर रचलेली हार-रचना. (व., घाटी)

**नागोला-ळा, नागोला भोदला** वि. नागवा. (व., ना.)

**नागोवा** पु. पहा: **नागवण**: 'तो सुख दु:खांचा नागोवा।'- ज्ञा १३.८५.

**नागोस-सा** पु. १. ज्यामध्ये दरवाजाची वरची कुसे अडकवलेली असतात असा उंबरठा, त्याजवळची फळी. २. दाराच्या चौकटीवर तिच्या रुंदीइतका दीर्घ चतुष्कोनी कोनाडा; उतरला (उंची वीतभर). ३. सुळकुंबा तोरणाशी उभा केल्यानंतर तो तसा राहण्यासाठी व फिरण्यासाठी बांधतात ते अर्धवर्तुळाकृती भोकाचे लाकूड. ४. नागवसा; जोखडाच्या मधोमध (इसाडा बांधण्याची दोरी अडकण्यासाठी) बसवलेला खिळा. (को.)

**नाघाण-न-णी-नी** क्रिवि. नाहकपणे; चुकीने; अकारण; अन्यायाने; गैरशिस्तपणे. [फा.ना-गाह; हिं.नागहानी]

**नाच** पु. नर्तन; नाचणे; सुयोग्य पोशाख करून गायन-वादनाच्या साथीने अभिनयासह शरीराची लयबद्ध व सुंदर हालचाल. [सं.नृत्य; हिं.,गु. नाचना] (वा.) ० **नाचावा लागणे, नाचणे**- अनेक प्रकारची खटपट करणे (लग्नकार्यात). ० **मांडणे**- धांगडधिंगा घालणे. **(कोणाच्या तरी) पुढे पुढे नाचणे**- एखाद्याला ज्या ज्या वेळी जे जे पाहिजे ते त्वरेने देणे; खुशामत, हांजी हांजी करणे.

**नाचकरी** पु. नाचणारा; तमाशात नाच करून उदरनिर्वाह करणारा; नाच्या.

**नाचकंड-कण, नानकण** न. १. लहान हत्यारांचा संच (जराणी, चिमटा, कातर इ.). २. काटे वगैरे उपटण्याचे साधन. ३. नराणी. [फा.नाचख]

**नाचकुच-कुचकुच** न.(मुलींचा खेळ) एका बाजूची मुलगी वस्त्राखाली लपवून तिला दुसऱ्या बाजूच्या म्होरक्याने 'नाचकुच का कुचकुच' म्हणून विचारायचे. त्याला लपलेल्या मुलीने कुचकुच असे उत्तर द्यायचे. तिच्या आवाजावरून तिला ओळखले तर डाव जिंकला. [ध्व.]

**नाचके** न. झारीच्या तोटीचे भोक किंवा लहान छिद्र; भांड्याला झारीसारखे केलेले लहानसे छिद्र. [फा. नाचाकी; सं.नासिका]

**नाचक्की** स्त्री. १. अप्रतिष्ठा; मानहानी; पच्ची; फजिती. २. भांडण; बिघाड; बेबनाव; फाटाफूट; वितुष्ट. [क.नाचिके =लाज, शरम]

**नाचण-णी, नाचणघुगरी-टिपरी** स्त्री. १. नर्तिका. २. नखरेबाज, नटवी स्त्री; रंगेल, छिनाल, छबेली स्त्री.

**नाचण-णा-णी** पु. स्त्री. नर्तक-की.

**नाचणकांड** न. नाचणीचे गवत.

**नाचणा-णी** पु. स्त्री. एक धान्य. हे कोकणात व देशात गरीब लोकांत फार खपते. दाणा बारीक मोहरीसारखा व तशाच रंगाचा; जाडी व बारीक हे दोन प्रकार आहेत. याचे आंबील, भाकरी, खापरपोळी इ. अनेक पदार्थ करतात.

**नाचणे** अक्रि. १. नाच, नृत्य करणे. २. उड्या मारणे; धांगडधिंगा घालणे; बागडणे (घोडा, मूल). ३. ताठ्याने, हातवारे करून बोलणे. ४. हुरळून, मोठ्या आशेने, हर्षाने बोलणे. ५. अतिशय आनंद होणे.

**नाचणे कुंबरी** श्रेष्ठ जातीचा नाचणा. कुमरी पद्धतीने पिकवलेली नाचणी. पहा: **कुमरी**

**नाचण्याची मळणी** (ही लवकर होत नाही, दाणे पडायला वेळ लागतो. यावरून ल.) रडगाणे; पिरपिर; तोंडाची टकळी इ.

**नाचपोचा** पु. पोटरी व घोटा यांमधील भाग: 'पोटरी नाचपोचाच्या ७५% मोठी.'- के २६.१.१९३७.

**नाचरा** वि. १. नाचणारा; चाळे करणारा. २. पुढे पुढे करणारा; लुडबुड्या. ३. उतावीळ; अविचारी.

**नाचरी** स्त्री. १. पहा : **नाचणा-णी.** २. पाय झाडणे; थैमान घालणे; धिंगाणा करणे; पाय आपटणे.

**नाचरेपणा** पु. (विद्यार्थी) नाचण्याची खोड; चाळे करणे.

**नाचविणे** सक्रि. १. नाचायला लावणे (मनुष्य, बाहुल्या इ.). २. उड्या मारायला लावणे. ३. इकडे तिकडे करणे; वेडेवाकडे हलवणे, फिरवणे. ४. दपटणे; घाई करणे; सक्ती करणे; त्रासदायक रीतीने अमलात आणणे. ५. वारंवार स्थलांतर करणे. [हिं.नचवाना, नचाना]

**नाचाखी** स्त्री. बोलाबोली; बाचाबाची; भांडण.

**नाचार** वि. १. गरीब; कंगाल; दरिद्री. २. लाचार; असमर्थ; अनाथ; निराधार; दुर्बळ: 'वर्ते यांच्या बुद्धी तो नर पावेल सत्य नाचारा।'-

(सखारामतनय) रुस्व ५८. [फा.]

**नाचारगत, नाचारी** स्त्री. १. गरिबी; कंगाली. २. लाचारी; नाइलाज; निरुपाय; निराधार स्थिती.

**नाचारा** पु. संसार.

**नाची** स्त्री. नर्तिका; नाच करणारी.

**नाचीज** वि.१. व्यर्थ; निष्फळ: 'रिकामें बैसोन लोकांहातीं नाचीज खाववून काल व्यर्थ न गमावणें।'- इमं १०५.२.क्षुद्र; बिनमहत्त्वाची (व्यक्ती इ.). [फा.ना-चीझ्]

**नाच्छो** उद्गा. खेळांतील तात्पुरती तहकुबी; थुश्शो.

**नाच्या, नाच्या पोऱ्या** पहा: **नाचकरी**

**नाज** पु. दाणा; धान्य; अनाज.(व.) [सं.अन्न; हिं. अनाज]

**नाजकाई-य** स्त्री. १. नाजुकपणा; मृदुता; कोमलता. २. सूक्ष्मता; बारीकपणा; तलमपणा. ३. चांगलेपणा; सुरेखपणा; खुमाशी. ४. चोखंदळपणा; विचक्षणपणा.

**नाजनी** वि. १. सुकोमल. २. भंगूर. ३. मौल्यवान. [फा.नाजनीन]

**नाज(जी-झ)र** पु. दिवाणी कोर्टातील एक अधिकारी; देखरेख करणारा. [फा.नाझिर]

**नाजरीबाजार** पु. मीनाबाजार; मोगलाईतील बायकांनी बायकांसाठी चालवलेला बाजार. यात फक्त बादशहा एकटाच जाऊन देखरेख करू शकत असे.

**नाजीब** न. पायदळ; पलटण. पहा: **नजीब**

**नाजीर** न. (ख्रि.) १.परमेश्वरासाठी स्वत:ला वाहून घेतलेला यहुदी पुरुष: 'तो मुलगा गर्भावस्थेपासून मरेपर्यंत देवाचा नाजीर होईल.'- शास्ते १३.७. २.पहा : **नाजर**

**नाजू(जु)क** वि. १. कोमल; सुकुमार; नरम; हलकेपणाने, काळजीने वापरण्याच्या उपयोगाचा; कष्ट सहन न करणारा. २. दुर्बळ; अशक्त; बारीक; हलका (मनुष्य, वस्तू). ३. पातळ (पोळी इ.). ४. दिखाऊ; सुरेख; सुंदर (वस्तू). ५. कुशलतेचे (काम). ६. गुप्त (गोष्ट, अंग इ.); जनानी; बायकांसंबंधी (काम). ७. चोखंदळ; दिमाखाचा. ८. अवघड; बंदोबस्तीची: 'येवंक्रमेण जागा बहुत नाजूक.'- पेद १५.८१.९. कमी; मोजके (जेवण, खाणे). १०. गुप्त; युक्तीचे (काम, खलबत). ११. अनैतिक (काम, संबंध इ.). उदा. वेश्यागमन, लाचखोरी इ. [फा.नाझुक]

**नाट** पु.न. १. तुळई; मोठी मयाळ; लाट. (व.) २. विशाल, अवजड आकार. ३. घराच्या आढ्याचा आडवा लांब वासा.(तंजा.) [हिं.]

**नाट** पु.न. १. अडथळा, अपशकुन करणे; हटक; प्रतिकूलता; नड; अडचण. (क्रि. करणे, लावणे, येणे इ.). २. दुर्दैव; अभाग्य; अननुकूलता; एखादी बिघडवणारी, अडथळा आणणारी, इजा इ. करणारी अशी योजना, शक्ती.३. तूट. (क्रि. येणे, जाणे.). [सं. नष्ट] (वा.) ० **जाळणे, भाजणे**- बोहणी करणे; एखादी गोष्ट हिंमत बांधून छातीने करणे.

वि. अमंगल; अशुभ; अननुकूल; आडफाट्या; नुकसानकारक (वेळ, मुद्दा इ.). [सं. नष्ट]

**नाट** पु. १. ठावठिकाण; स्थान: 'तयांचिये भजनाचे नाटीं ।'- ज्ञा १०.१०९. २. प्रदेश; देश; नाड. ३. सुरुवातीचे ठिकाण; मर्मस्थान. [द्रा.नाडु-ड]

**नाट** पु. १. नृत्य; नाच. २. नाटकासारखे खेळ करणारी हलकी जात: 'उग्रगंधा अरूप गौळणी । नाट जातीच्या हस्तिणी ।'- जै ९.५९. [सं.नट]

**नाट** पु.न. १. कवड्यांचा एक खेळ. २. या खेळातील (पाच) कवड्या. ३. या खेळासाठी ओढलेल्या रेघा, काढलेली आकृती, कोष्टक; हा खेळ खेळण्याचा पट.

स्त्री. गोट्यांच्या खेळातील एक शब्द. मारण्यासाठी गर्र करून फिरवतात तो गजरा.(कु.)

**नाट** पु. १. शेतातील पाण्याचे द्वार. २. पाणी देण्याची खेप.

स्त्री. भाताचे कोठार.

**नाट** पु. १. दिवाळखोर, ठरलेल्या रकमेइतके पीक येत नसल्याने पैसे देऊ न शकणारे कूळ. २. एखाद्या दोषामुळे कुळाला लागलेला बट्टा.

वि. १. दिवाळखोर; नादार; धुळीस मिळालेला; पैसा देण्यास असमर्थ; लुच्चा; उडवाउडवी करणारा (ऋणको). २. सर्वस्वी, पूर्णपणे नष्ट झालेला; बेपत्ता; ज्याचा पत्ता नाही असा; फरारी.

क्रिवि. गोंधळाच्या मन:स्थितीत; अशरण स्थितीत. [सं.नष्ट] (वा.) ० **करणे**- चोरून नेणे; पळविणे; उपटणे.

**नाट** क्रिवि. समुद्राच्या आत; जमिनीपासून दूर.

**नाटक** न.पु. १. सोंग घेऊन करण्याचा खेळ; एखादी गोष्ट अनेक स्त्रीपुरुष पात्रांकडून प्रत्यक्ष घडल्याप्रमाणे करून दाखवणे; नाट्यरूपक; दशरूपकातील पहिला प्रकार. २. वाङ्मयातील एक प्रकार. ३. ढोंग; सोंग; बतावणी. ४. फजिती; तमाशा; बेअब्रूची गोष्ट. ५. पराक्रमाचे कृत्य : 'लघूशी परी मूर्ति हे हाटकाची । करावी तया मारुती नाटकाची ।'- रामदास, छत्रपतीस उपदेश.

वि. नाटकी; खेळ करणारा. [सं.]

**नाटक** वि. नाठाळ; अटकाव करायला कठीण. (व.)

**नाटकगृह, नाट्यगृह-मंडप-मंदिर-शाला** न. स्त्री. १. नाटक व इतर कार्यक्रम पाहण्यासाठी व सादर करण्यासाठी बांधलेली सोयीची इमारत.

**नाटकर** पु. नगररक्षक: 'प्रधानकन्या नाटकरासी पकडली होती.'- पं ७२.१८.

**नाटकशाळा** स्त्री. १. रंगमहाल; खास महाल; जनानखाना; अंत:पुर. २. विकत घेऊन नाचगाणे शिकवून उपभोगासाठी ठेवतात ती स्त्री. (समुच्चयार्थी) उपस्त्रिया; रखेल्या.

**नाटकी** वि. १. नटाचे काम करणारा; नाचणारा; नट. २. (ल.) ज्याच्या कृतीचा थांग लागत नाही असा. ३. आतल्या गाठीचा; वर एक आत एक असा. ४. ढोंगी; दिखाऊ; खोटा; बहुरूपी. ५. नकल्या. (गो.) ६. नाटकासंबंधी- विषयी.

**नाटकी-क्या** पु. छचोर माणूस.

स्त्री. धुंदी.

**नाटकूट** क्रिवि. सामान्य: 'नाटकूट औषधी बहुसाळा असति.'-विद १७.

**नाटन** न. वेष; सोंग; रंगभूमीवर नाटक करणे. [सं.]

**नाटबाट** पु. कमनशिबाची गोष्ट; अपराध; दोष; कालिमा, डाग, उणीव इ.बद्दल व्यापक शब्द.

**नाटलाबाटला** वि. बाट लागलेला; बहिष्कृत; कलंकित.

**नाटा-ठा** वि. वाईट; खराब; दुष्ट; गचाळ.

**नाटानाट करणे** सक्रि. थोडक्यात चांगले करणे. (कर.)

**नाटारंभ** पु. नृत्यभूमी: 'बाउलिया ठेविलिया सविकारी : नाटारंभी'-रुस्व ४२१. [सं.नाट्य + आरंभ]

**नाटि-टी, नाटिक(का)र,नाटेवार** पु. १. मुलकी (वसुली) खात्यातील शिपाई. (माण.) २. चाकर; दास; संरक्षक : 'या लागीं दयाळुवाचे घरीं। मी सदां नाटि काम करी।'- एभा १६.१२९; 'त्यांचा स्वयें जगदीश होऊनि नाटीकार।'- स्वादि ८.२.७४. [द्र. नाट-ड;त.नाट्टकार]

**नाटिका** स्त्री. १. लहान नाटक; अठरा उपरूपकांपैकी एक. २. नर्तकी. [सं.]

**नाटिणे** सक्रि. सिद्ध न करणे.

**नाटी** स्त्री. १. संरक्षणाचे कार्य: 'तरि तीयेचेया प्राणाची नाटी। कवणा दीधली।'- भाए ११९. २. चाकरी. ३. नाट्यकाराची वृत्ती.- भाए. ४. जबाबदारी.

**नाटी** स्त्री. १. हलक्या जातीचे सुती लुगडे; बांड: 'नेसली अंगीं अंगिं, आंवळून, नाटिचें लुगडें तें छान।'- काव्यकेतकी ६४. २. पांढरे पातळ.(व.)

**नाटीघाटी** क्रिवि. मर्मस्थानी.

**नाट्य** न. १. नाचणे; हावभाव (अभिनय) करणे, गीत गाणे, सोंग घेणे इ. नाटकाचे प्रकार करणे. २. वाद्यांच्या साथीसह सोंगांची बतावणी करणे, गाणे, नाचणे इ. नृत्य - वाद्य- कला. ३. (सामा.) नाटक; नाटकाचा प्रयोग; एखाद्या सरस व सुसंगत कथाभागाचे अनुकरण करून तो साभिनय करून दाखवणे. [सं.]

**नाट्यकाव्य** न. अनेक पात्रांच्या तोंडी घातलेले काव्य; संवादात्मक काव्य; संगीत नाटक. (इं.) ऑपेरा. [सं.]

**नाट्यछटा** स्त्री. एक साहित्यप्रकार. एखाद्या विवक्षित प्रसंगी होणाऱ्या मनुष्याच्या मन:स्थितीचे चित्र त्याच्याच शब्दात दाखविणे. मनुष्याच्या स्वभावातील विसंगती दाखविणारी एकाकी संभाषणपद्धती.

**नाट्यतंत्र** न. नाटकाचा प्रयोग उठावदार होण्यासाठी नेपथ्य, प्रकाश, ध्वनी, अभिनय यांचा उपयोग कसा करावा याचे शास्त्र.

**नाट्यवाचन** न. १. लेखकाने लिहिलेले नाटक बसवायला घ्यावे किंवा नाही हे ठरवण्यासाठी निमंत्रित जाणकारांसमोर केलेले संहितेचे वाचन. २. गाजलेल्या नाटकांच्या संहितेचे आकाशवाणी किंवा जनसमुदायासमोर केलेले वाचन.

**नाट्यशास्त्र** न. नाटकाचे शास्त्र. मनुष्याच्या क्रियांचे, भावांचे व आयुष्याचे ध्येयात्मक प्रदर्शन करणारे शास्त्र.

**नाठवण** न. नाणेविक्रीची जागा.

**नाठ(ठा)ळणे** अक्रि. दुर्गुणी असणे, होणे (मनुष्य, पशू).

**नाठ(ठा-ठ्या) ळी, नाटा(ठा-ठ)ळकी** स्त्री. वाईटपणा; दुष्टपणा; द्वाडपणा, खोडकरपणा (मनुष्य, पशू यांचा).

**नाठा(ठ्या)ळ** वि. १. वाईट; दुष्ट; लबाड (मनुष्य). २. खोडसाळ; अडेल. द्वाड; त्रासदायक (पशू इ.). [सं.अनास्था+आल.- भाअ १८३२.- राजवाडे, नाथ]

**नाठी** वि. वाईट; निरुपयोगी; योग्य निर्णय न घेणारी.

**नाड** पु. १. (ल.) संकट; अडचण; प्रतिबंध; बाध; अहित; घात; नाश; गोता; विघ्न: 'करावा कैवाड। नाहीं तरी आला नाड।' - तुगा ३५५. २. (ल.) फसवणूक; फसगत.

वि. फसवणारा; लुबाडणारा.

**नाड** न. १. नळा; कळकाचे नळकांडे. यात डिंक, भस्म ठेवतात. (कु.) २. जनावरांना औषध पाजण्याचा नळा; धोटे.(न.)

**नाड** स्त्री. १. (फलज्यो.) नाडी; घटका; नक्षत्रांचा एक भाग. २. (ल.) लांब पोट. ३. घोड्याच्या पाठीचा कणा. (व.) ४. नागलीचे, कणीस नसलेले काड. (गो.) ५. गुदद्वाराजवळची शीर; आतडे. (गो.) ६. पहा : **नाडी** [सं.नाडी]

**नाडकर्णी-करणी-गीर** पु. १. कर्नाटकातील जिल्ह्याचा वतनी पिढीजात हिशेबनीस, कुलकर्णी. २. एक आडनाव. [क.नाडू+सं.कर्णिक]

**नाडगे** न. अपूर्ण खोदलेली, कमी खोल विहीर.

**नाडगो** वि. फसवणारा; लुबाडणारा. (को.)

**नाडगौड-डा** पु. १. महाराष्ट्रातील देशमुखासारखा कर्नाटकातील एक अधिकारी. २. नाडगौडांचा एक हक्क; सर्व चौथाईवर शेकडा तीन टक्क्यांप्रमाणे होणारी रक्कम. [क.नाडू+गौड]

**नाडणूक** स्त्री. १. बुचाडणे; लुटणे; लुबाडणे; फसवणूक. २. अतिशय फसवणे; नागविणे; नाश करणे. ३. (संकटात, अडचणीत) सापडल्यामुळे दुर्दशा होणे; जुलमाखाली दडपले जाणे; छळ; गांजणूक.

**नाडणे** उक्रि. १. लुबाडणे; नागवणे. २. अतिशय फसवणे, ठकवणे. ३. छळणे; गांजणे; त्रास देणे; अडवणूक करणे. ४. गोत्यात, कचाट्यात आणणे; संकटात घालणे, पाडणे. ५. वैभव, सुख, ऊर्जितावस्था नाहीशी करणे; बुडवणे.

अक्रि. १. छळ, नाश होणे; बुडणे (तोटा, लूट, नागवण इ.मुळे). २. फसणे. ३. मुकणे: 'निजलाभासी नाडणें।'- एभा ५.५३०.[सं.नाथ]

**नाडणे** सक्रि. दोर बांधणे; जुंपणे: 'मृगात पेरणीचं औत नाडणं.'- गाआ २२.

**नाडपेन-पॅन्न** न. डोंबाऱ्यांचा खेळ. (गो.)

**नाडबंद** पु. ब्रह्मचारी; केव्हाही स्त्रीसंग, संभोग न केलेला माणूस: 'नाडबंदा आजवर तूं व्रतस्थ राहिलास। नाहीं दुसरीचा उर उघडा करून पाहिलास।'- प्रला १९९.

**नाडर** पु. १. थिल्लर. २. डबके: 'कां नाडरचि भरे शोषे।'- ज्ञा १५.३८७. ३. दक्षिण भारतातील एक जात. [क.नाडु]

**नाडलक्ष्मी** स्त्री. कडकलक्ष्मी; मरीआई.

**नाडवळ** न. (तेली) जांगी व ढोक यांना जोडणारी खांबणी: ही जांगीत

मुठ्याबरोबर उभी घट्ट बसवलेली असते.

**नाडहब्ब** पु. नवरात्रोत्सव; भूमीचा उत्सव. [क.नाड+हब्ब]

**नाडा** पु. १. मोठा व जाड दोर; चऱ्हाट; मोटेचा वरचा दोर; समदुर; गाडा, रथ इ. ओढण्याचा दोर; गाडीवरील सामान बांधण्याचा दोर; नावेची ओढण, पाग; गलबताचे दोरखंड. २. मोहरमच्या वेळी मनगटात बांधण्याचा रंगीत दोरा; पायजम्याची नाडी; नवार; कोल्हाट्याची, नाडेभोरप्याची खेळ करण्याची दोरी. ३. चामड्याचा पट्टा. ४. कोल्हाटी, बहुरूपी यांचा खेळ करण्याचा खांब, बांबू, कळक. ५. धोटे; गुरांना औषध पाजण्याचे नळकांडे. ६. डोक्यावर उभे राहण्याची क्रिया. ७. मंतरलेला दोरा; प्रसादाचा गंडा. ८. वेणीचा अगवळ: 'नाडा सरस्वतिजळ त्रय एक वीची।'- अकक २, मंराधा १६५.[सं.नाडी] (वा.) ० **पसरणे**- अव्यवस्थित व्यवहार असणे; गोंधळ घालणे; पसारा मांडणे.

**नाडा** न. खेकडे पकडण्याचे एक साधन.(कु.)

**नाडा(डी)पुडी** स्त्री. अबीर, गुलाल इ.ची पुडी व तिच्यावर बांधलेली रंगीत दोरी. हे देवाला वाहतात.

**नाडाफनी** स्त्री. विवाहातील सौभाग्यालंकार.

**नाडिमंडळ** न. खस्थ विषुववृत्त; नाडीवृत्त. [सं.]

**नाडिय** पु. मगर : 'धरितां नाडिय सावज । उद्धरिला पशुगज।' - मध्व ४८०.

**नाडी** स्त्री. १. शरीरातील रक्त ज्या शिरांतून वाहते ती धमनी; आतड्याची नळी. २. पायजमा, सलवार इ. बांधण्यासाठी त्यात घालतात ती फीत, दोरी. ३. झाडाचा खुंट; ताट; काड. ४. (चोवीस मिनिटे) एक घटका. ५. नक्षत्रांचे तीन वर्ग. प्रत्येकात नऊ नक्षत्रे आहेत. यांना आदि, मध्य व अन्त्य असे म्हणतात. ६. (वैद्यक.) शरीरातील कफ, पित्त व वात हे त्रिदोष दाखवणाऱ्या रक्ताभिसरणनलिका. ७. शेताची लांबट पट्टी; निमुळते वावर.( व.) ८. मासे मारताना बुरदुलात घालण्याची नळकांडी.९. स्वभाव. (क्रि. सापडणे, ओळखणे.).[सं.](वा.) ० **आकर्षण करणे, होणे, आटपणे, गोळा करणे**- १. (मरताना नाडी आखडते यावरून) मरणोन्मुख होणे; रक्ताभिसरणक्रिया थांबणे. २. नाश करणे, केला जाणे. ० **आटपणे**- एखादे कार्य शेवटाला नेण्यास असमर्थ होणे.

**नाडीचक्र** न. १. नाडीसमूह नाभीपाशी मिळणाऱ्या नाड्यांचे वर्तुळ. २. एक फलज्योतिष-चक्र, आकृती; तीन नाड्यांत मांडलेली २७ नक्षत्रे यात असतात.

**नाडीचा फटकळ** वि. व्यभिचारी, बाहेरख्याली (पुरुष).

**नाडीपरीक्षा** स्त्री. नाडी पाहून रोग ओळखणे.

**नाडीमंडळ-वलय, नाडीवृत्त** न. आकाशाचे विषुववृत्त. ज्या महावृत्ताची पातळी भूगोलाच्या अक्षाशी लंबरूप असते त्याला विषुव किंवा नाडीवृत्त म्हणतात.- सूर्यमा ११.

**नाडीव्रण** पु. भगेंद्र; भगंदर रोग; त्वचेवर आलेल्या व्रणाच्या तळापासून आत कमी-अधिक खोलवर जाणाऱ्या अरुंद नलिकाकार मार्गाला किंवा दोन पोकळ अवयवांना जोडणारा विकृत मार्ग.

**नाडीस्वेद** पु. नळीद्वारा वाफारा देणे. (उदा. तोंडावाटे किंवा नाकावाटे नळीने वाफ आत घेऊन फुफ्फुसांना, घशाला वाफेचा शेक देणे.)

**नाडीज्ञान** न. नाडीपरीक्षेची कला; त्यातील नैपुण्य.

**नाडु-डू** पु. नाश; घात; हानी.-शर.

**नाडे, नुडार** पु. मांगजातीतील दोर वळणारी एक पोटजात; वस्ती ठाणे, बेळगाव व दक्षिण महाराष्ट्र.- अस्पृ ४७.

**नाडे** न. शीड.

**नाडेकरी बहु(हो)रूपी, भोरपी** दोरखंडावर, बांबूवर नाचकाम करणारी जात; डोंबारी; कोल्हाटी.

**नाडेपेन्न** पु. नाडेकरी; बहुरूपी.(गो.)

**नाडे भोरी(रू)प, बहुरूपी** नाडेकरीचा खेळ; दोरावर नाचणे इ.

**नाडेसावज** न. सुसर; मगर. पहा: **नाडिय**: 'तेच नाडे सावजें पैं।'- ह २६.१५७.

**नाड्या, नाडक** वि. नाडणारा; फसव्या.

**नाणक, नाणे** न. १.चलन; पैसा; देवघेवीचे साधन; नाण्याची किंमत प्रत्येक नाण्यात असलेल्या धातूच्या किमतीवर अवलंबून असते, नाण्याची स्वत: किंमत करता येत नाही, तर त्यावरून फक्त इतर पदार्थांची किंमत केली जाते.- टि १.७६. २. मुद्रा; मोहोर; पुतळी इ.रूप द्रव्य. [सं.नाणक]

**नाणकशास्त्र** न. जुनी नाणी मिळवून त्यावरून इतिहास शोधणे; मुद्राशास्त्र.

**नाण(न)वट** न. १. टाकसाळीतून निघणाऱ्या अनेक जातीच्या नाण्यांचा जमाखर्च. यात नाणेउतार, कस, सौदागिरी, जिन्नस इ. सर्व बाबी येतात.- अह १८३४. २. नाणे: 'खरें नानवट निक्षेपीचें जुनें। काढिलें ठेवणें समर्थांचें।।'- तुगा २०१२.

**नाण(णा-णे)वटी-ट्टी** पु. १. सराफ, नाणे वटविणारा. २. यावरून पडलेले एक गुजराथी आडनाव.

स्त्री. सराफीचा धंदा.

**नाणवठा** पु. नाणेविक्रीची जागा.

**नाणा-णे** पु.न. एक जंगली झाड. याची पाने सीताफळीच्या पानाएवढी मोठी व लांबट. लाकूड इमारती कामाला उपयुक्त. ही झाडे कोकणात फार होतात.

**नाणावणे** अक्रि. १. नावाजणे. २. नाव काढणे; विख्यात होणे.

**नाणावलेला** वि. नावाजलेला; विख्यात.

**नाणु-णू** न. अफूच्या बोंडाचा चिरा पाडून रस काढण्याचे नराणीसारखे हत्यार.

**नाणे** पहा: **नाणक**. (वा.) ० **सांगणे**- चीतपट करणे; ओली सुकी मागणे.

**नाणेझाडा-मेळ** पु. (सराफी) रोजच्या तसेच ठरावीक मुदतीच्या निरनिराळ्या सदरांखालील नाण्यांच्या रकमांच्या देवघेवीसंबंधी हिशेब; तसा हिशेब काढणे.

**नाणेदार** पु. नाण्यांचा व्यापारी. (तंजा.)

**नाणेपरीक्षक** पु. नाण्यांची पारख करणारा; पोतदार.

**नाणेफेक** स्त्री. दोन पक्षांतील विवाद्य प्रश्नांवर निर्णय घेण्यासाठी नाणे वर फेकणे व काटा आणि छापा पडेल त्यावरून निर्णय घेणे. सामान्यत:

खेळाला सुरुवात कोणी करायची यासाठी करतात.

**नाणेबाजार** पु. नाण्यांचा व्यवहार चालण्याचे स्थान: 'व्यापार खालावत आहे. तरी नाणें बाजार महाग करणें इष्ट नाहीं.'– के २.१२.३०.

**नाणेवार** क्रिवि. निरनिराळ्या प्रकारच्या नाण्यांत किंवा नाण्यांच्या रूपाने.

**नाणेवारी** वि. निरनिराळ्या चलनांत असलेल्या नाण्यांसंबंधी; चलनांनी युक्त, बनलेले.

**नात, नातीण** स्त्री. मुलाची, मुलीची मुलगी. [सं.नप्त्री]

**नात** स्त्री. १. कल्पना; अंदाज. २. आठवण. ३. माहिती.(गो.)

**नातक** पु. नाडी मार्ग.– ज्ञा ६.२४८.

**नातजावई** पु. नातीचा नवरा.

**नातरी** अ. अथवा; किंवा; नाहीतर; पेक्षा; न होऊन. [सं.न तर्हि]

**नातरी** स्त्री. कोर; काठ (दगड इ.चा): 'दगडांच्या नातरी चिरणीनें घडून बसवाव्या.'– तप ४२.

**नातलग** वि. १. नातेवाईक; ज्यांचा एकमेकांशी विवाहादी कारणांनी नातेसंबंध आहे ते परस्पर आप्त; सोयरा; नात्याचा माणूस. २. लांबच्या नात्याचा; दूरचा आप्त. [सं.ज्ञाति+लग्]

**नातवंड** न. मुलाचे किंवा मुलीचे मूल. [सं.नप्तृ]

**नातवान** वि. दुबळा; दरिद्री; अशक्त; असमर्थ: 'रयत नातवान असलिया दाणेपैके द्यावे.'– चित्रगुप्त ३९. [फा.ना+तवान्, सं.न+तवीयान्]

**नातवानी, नातवानकी–गी** स्त्री. दुबळेपणा; गरिबी; असमर्थता.

**नातवानी(तवानी)तलफ** (गंजिफा) तलफ देण्याचा प्रकार. आपल्याजवळ एक पान आहे व त्यावरील दोन पाने पडल्यावर तो हुकूम होणार असून ही दोन पाने एकाकडे नसून दोघांकडे एक एक आहे. अशा वेळी आपल्याकडे खेळण्याची पाळी आल्यावर प्रथम एक पान पाडवण्यासाठी एकाकडे जाणे व त्यानंतर पुन्हा आपल्याकडे खेळण्याची पाळी येईल त्या वेळी दुसऱ्या पानासाठी दुसऱ्याकडे जाणे.

**नातसून** स्त्री . नातवाची बायको.

**नाता(था)ळ–ळे** पु. येशू ख्रिस्ताचा जन्मदिवस. तारीख २५ डिसेंबर. ख्रिश्चनधर्मियांचा एक सण. [पोर्तु.नाताल]

**नातुपणा** पु. कर्तृत्व.

**नातुरवाळा** वि. नातू, नाती असलेला.

**नातू** पु. मुलाचा,मुलीचा मुलगा. [सं. नप्तृ]

**नातूक** न. १. घुबड. (गो.) २. पिंगळा.

**नाते** न. १. रक्तसंबंध; शरीरसंबंध; यौनसंबंध; सोयरीक; आप्तपणा. २. (कार्यपरत्वे) परस्परसंबंध. उदा. मालक व नोकर; राजा व प्रजा इ. ३. (व्यापक) विशिष्ट पेशा, दर्जा, संबंध. उदा. सरकारी, सावकारी इ. नाते. [सं.ज्ञाति] (वा.) ० **करून घेणे**– हक्क, अधिकार मिळवणे.

**ना ते** अ. नाहीतर; किंवा; पहा: **ना तरी**: 'ना तें सांवळें आकाश पाल्हलें।'– शिव १०२०.

**नातेगोते–पोते** न. (व्यापक) सोयरीक; संबंध.

**नातेवाईक** पहा: **नातलग**

**नात्रे** न. मोहतुर; पाट.

**नाथ** पु. १. मालक; धनी; प्रभू; स्वामी. २. पती; नवरा. ३. श्रेष्ठ; वरिष्ठ. ४. नवनाथांतील एक व्यक्ती; नाथपंथ. [सं.]

**नाथ** स्त्री. बैलाच्या नाकातील दोरी; वेसण: 'अपेट असती वृषभ सात। त्यासी घालील जो नाथ। एकेचि वेळीं।'– कथा ४.११.११२. (खा.) [सं.नासा]

**नाथ** दरवाजाचा अडसर. [सं.नस्तक]

**नाथणे** सक्रि. वेसण घालणे.

**नाथणे** उक्रि. १. नाश करणे; ठार मारणे: 'कालिंदीडोह काळा निघुन अवलिला नाथिला नाग काळा।'– किंसुव ७८. २. त्रास देणे; छळणे. ३. व्यापणे; त्रासणे : 'कथा पुराण ऐकतां। झोपें नाथिलें तत्त्वता।'– तुगा ३०६४. [सं.नाथ्]

**नाथपंथ** पु. आदिनाथांनी काढलेला गोसाव्यांतील एक पंथ. यामध्ये प्रसिद्ध नवनाथ होऊन गेले.

**नाथाचा बैल** (ल.) ताब्यातला, हाताखालचा माणूस.

**नाथी, नाथीपट्टी** स्त्री. जेथे शिव्वळ फसवली जाते त्या छिद्राच्या जागी जू कमकुवत होऊ नये म्हणून ठोकतात ती पत्र्याची पट्टी.

**नाद** पु. १. आवाज; ध्वनी; शब्द (मुख्यत्वे पुष्कळ वेळ टिकणारा). २. (ल.) शोक; छंद; वेड; ध्यास. (क्रि. लागणे.)३. मध्यमा नावाची वाचा.– अमृ ५.६३. ४. श्रवणसुख. ५.आघाताने होणाऱ्या ध्वनींपैकी संगीताला उपयोगी पडणारे समकंपनसंख्या असलेले ध्वनी. ६. भोवऱ्याचे स्वत:भोवती फिरणे.[सं.] (वा.) ० **जाणे**– १. (भांडे वगैरेला तड पडली असता) आवाज बद्द होणे. २. पत, नाव जाणे; प्रसिद्ध झाल्यामुळे गुप्त गोष्टीचे महत्त्व कमी होणे. **नादाने नाद**– भांडणापासून भांडण.

**नादकाटा** पु. ठरावीक वारंवारतेचा– कंप्रतेचा जवळजवळ चोख ज्या (साइन) ध्वनितरंग निर्माण करण्यासाठी अत्यंत उपयोगी ठरणारे उपकरण.

**नादखोर** वि. १. भजनी लागलेला; एखाद्या गोष्टीचा हव्यास धरलेला; एकदा ज्याच्या नादाला लागला त्याच नादाने चालणारा. २. दुसऱ्याला आशा दाखवून आपल्या भजनी लावणारा; कह्यात ठेवणारा.

**नादबिंदुस्थान, नादस्थान, नादबिंद** न. १. ताळू: 'प्रथम नादबिंद मिळवणी होता एकांतर।'– भज ५६. २. शरीरातील नाद उत्पन्न होणारी. हृदय, कंठ व शीर्ष ही तीन स्थाने.

**नादब्रह्म** न. १. नादरूपाने अवतरलेले ब्रह्म; सुस्वर गायन. २. भजनातील वाद्यांचा मोठा आवाज; दुमदुमाट. ३. वरील वाद्यांच्या घोषामुळे वाटणारा आनंद व त्याचे दिग्दर्शन.

**नादर** वि. १. दुर्मीळ; उत्कृष्ट; मौल्यवान; आश्चर्यकारक: 'डौल ज्वानीचा फूल गुलाबी रूप नादर गुलपरी।'– पला ४.६०. २. नादान. [अर.नादिर्]

**नादर** स्त्री. गंजिफातील हलके पान.

**नादरशाई(ही) रुपया** विशिष्ट शिक्क्याचा रुपया.

**नादवाद** पु. १. भांडणाचा, फाजील, व्यर्थ असा मांडलेला वाद; गलका; भाषण इ. (क्रि. करणे, लावणे, लागणे, तुटणे.) २. पहा : **नाद** २. (वा.) **नादावादात पडणे**– क्षुल्लक लोभात गुंतणे; नादी लागणे.

**नादान** वि. १. नाकर्ता; दुबळा. २. कुचकामाचा; नालायक; निर्जीव; अज्ञानी. पहा: **नाकारा** [फा.नादान्]

**नादानी** स्त्री. १. दुबळेपणा; फुसकेपणा; भिकारपणा; अयोग्यता; अपुरेपणा. २. मूर्खपणा. [फा.]

**नादार** वि. १. देणे, कर्ज फेडायला असमर्थ ठरलेला; दिवाळखोर. २. ज्याची वार्षिक मिळकत कमी आहे असा (मनुष्य). ३. (सामा.) दरिद्री. ४. मासिक फी माफ असलेला विद्यार्थी. [फा.]

**नादार** वि. सडा; जरिदा: 'गनीम केवळ खडे नादार.'- भाब ७७.

**नादारी** स्त्री. १. दिवाळखोरी; दारफळणी. २. कंगालपणा; दारिद्र्य. ३. शाळेतील फीची माफी.

**नादावणे** अक्रि . १. (फुटक्या भांड्याचा) बद्द आवाज होणे. २. (ल.) (भांड्यात) दोष असणे; फुटके, व्यंगयुक्त असणे. ३. बाहेर फुटणे; स्फोट होणे. ४. आसक्त होणे; नादी, मागे लागणे. ५. नावाचा बोभाटा, दुष्कीर्ती होणे (व्यभिचार, व्यसन इ.मुळे); लोकांच्या चर्चेचा विषय होणे. ६. एखाद्याच्या वर्तनामुळे काही नुकसान, तोटा झाला असा समज करून घेऊन त्या माणसासंबंधी उपरोधाने, रागाने बोलणे. सक्रि. वाजवणे; नाद करणे (भांडे इ.चा).

**ना दावा अधिलाभांश** (मोटार विमा क्षेत्र) विमा उतरवणाऱ्या व्यक्तीने दीर्घकाळ नुकसानभरपाई न मागितल्यास पुढील हप्त्यात विमाकंपनीकडून मिळणारी सूट.

**नादाळ-ळ्या, नादिष्ट, नादी-द्या** वि. पहा: **नादखोर**

**नादाळ** वि. मोठा आवाज असलेले (वाद्य इ.): 'वाजती नादाळ भेरी।'- वसा ४८.

**नादाळी** स्त्री. १. अपकीर्ती; बभ्रा; दुष्कीर्ती. २. आळ; आरोप; कुभांड; बालंट. (क्रि. करणे, घेणे.). ३. प्रचंड नाद; गर्जना.

**नादिष्ट,नादी** वि. नाद लागलेला, असलेला; छंदी.

**नादी** स्त्री. गायनातले सप्तस्वर.

**नादी(दि)म** जीवश्चकंठश्च मैत्री.

**नादुकर्णी** स्त्री.एक वनस्पती; तुणी; कुणी; काल; कालांतक.- मसाप ४५.४.

**नान** न. दारू गाळण्यात चाटूवर ठेवतात ते टोपाच्या आकाराचे भांडे.- बदलापूर ३१०.

**नान** स्त्री. अन्न; एक प्रकारची मैद्याची भाकरी. [फा.]

**नानक** पु. शीख धर्माचा संस्थापक; शिखांचा आद्यगुरू.

**नानक(ख)टाई** स्त्री. एक मिठाई; मैद्याचे बिस्कीट. [फा.नान+खस्त]

**नानकार** पु. जमीनदार, कानगो इ.ना निर्वाहासाठी दिलेला भत्ता, पैसा, जमीन: 'गव्हा व तालुकेदेखील नानकार करून दिल्हे जातील.'- वाडथोमा १.२७०.

**नानमुख** पु. लग्नाच्या अगोदरचा दिवस; लग्नाच्या आदल्या दिवशी गावातील देवाला हळद इ. नेण्याचा कुणबी लोकांतील विधी. (व.,ना.) [सं.नांदीमुख]

**नानमुख्या** पु. नानमुख हा विधी करण्याचा मुख्य मान ज्याच्याकडे असतो तो; पुढारी; मुखंड.

**नानवट-टा** पु. नाण्यांचा गठ्ठा: 'मग दंभाचे नानवटा... विकरा मांडी।'- एभा ५.१०१.

**ना ना** पु. नाही नाही; नकारार्थक शब्द; निषेध, नाकबुली, नाकारणे, परवानगी न देणे इ. साठीचा शब्दप्रयोग. (क्रि. करणे). [सं.नन]

**ना ना** अ. ना. तरी; नाहीतर; किंवा; अथवा : 'ना ना ते सप्तद्रि आणि नवनाथ। कीं हे अष्ट दिक्पाळ दिग्गजेसीं समर्थ।'- स्वादि १.१.६१. [सं.ना]

**नाना** पु. १. टोपण नाव; एखाद्याच्या नावापुढे किंवा स्वतंत्रपणेही योजतात. २. आजोबा. (खा.) [हिं.]

**नाना** वि. १. पुष्कळ; अनेक. २. निरनिराळे; बहुविध; विविध; भिन्न भिन्न. [सं.]

**नानागर्दी** स्त्री. १८५७ सालचे युद्ध. (या युद्धात नानासाहेब पेशवा (दुसरा) प्रमुख होता यावरून): 'मीरत शहरीं नानागर्दीचा स्फोट झाला.'- नाब.

**नानावटी** पु. सराफ; श्रीमंत: 'नका म्हणू रे भिकारी जरी तुम्ही नानावटी।'- ब ११८.

**नानावल** वि. सुप्रसिद्ध; तरबेज.

**नानु(नो)टणे** अक्रि. १.अहंपणा, मीपणा वाटणे; मानास चढणे. २.प्रसिद्धी पावणे. (व.)

**नानू** स्त्री.न. कां कू; टाळाटाळी; हां हू; संदिग्ध भाषण. [सं.नन]

**नानेटा-ठा-ठी** पु.स्त्री. रंग काळा, अंगावर पट्टे, विषारी नसणारा साप.- बदलापूर ३४७.

**नानोरा** पु. लग्नातील वधू-वरांची आंघोळ.

**नाप** न. माप; तोल; वजन; जोख. [सं.माप;हिं.]

**नापणे** उक्रि. १. मोजणे; मोजून पूर्ण भरणे. २. (पैसे टाकण्याच्या) विशिष्ट खेळांतील एक संज्ञा.

**नापत** स्त्री. बाजारात (देण्या-घेण्याच्या व्यवहारात) पत, अब्रू नसणे. वि. पतीच्या व्यवहारात योग्यता, वजन नसणारा (माणूस).

**नापसंत-द** वि.पसंत, मान्य, प्रिय नसलेला; अस्वीकृत. [फा.नापसंद]

**नापाक** वि. १. अस्वच्छ; अपवित्र; ओंगळ; घाणेरडा. २. पहा: **नाकारा**

**नापातेरा** पु.१. पहा : **नापत**. २. (व्यापक) बेअब्रू झालेली, निंद्य स्थिती.

**नापास** वि. १. परीक्षेला न उतरलेला; न निवडलेला; अनुत्तीर्ण. २. नापसंत; नाकबूल; अमान्य; रद्द. [ सं. ना+इं.पास]

**नापिकले** न. पाऊस इ.च्या अभावामुळे धान्य न पिकणे; धान्याचा दुष्काळ; पिकाचा अभाव. (को.)

**नापित** पु. हजाम; न्हावी. [सं.]

**नापीक** न. पहा: **नापिकले**
वि. न पिकणारी, बिनउत्पन्नाची, पडीत, वरकस (शेतजमीन).

**नापूस** स्त्री. १. अनादर; नापत. २.कोणी विचारत नाही अशी स्थिती.

**नाफरमानी** वि. १. जांभळ्या रंगाचा; जांभळा. २. लालसर गुलाबी: 'गुलाब तक्ता आणि गुलाला बागामधीं नाफरमानी।'- होला १०३. [फा.नाफर्मान]

**नाफा-भ-भा** पु. कस्तुरीमृगाचा अंडकोश; मृगांड; बेंबी कांदा: 'कस्तुरीचे नाफे व विलाईतचे तोफे पाठविले.'- पदमव ९७. [फा.नेखा;सं.नाभी]

**नाफेरवाला** वि. १. न बदलणारा; फेरफार न करणारा. २. (ल.) कट्टर पक्षीय असहकारितावादी; गांधीपक्षाचा. सत्याग्रहाच्या राजकारणात हा शब्द गांधीपक्षाच्या लोकांना निंदार्थी लावत.

**नाबद–दा** स्त्री. पु. उसाची गंडेरी, पेरे; कर्वा; उसाचे कांडे. [फा.,अर.नबात]

**नाबद–दी, नाबदी साखर** स्त्री. खडी साखर.

**नाबद–र** वि. असमर्थ; अक्षम; अयोग्य; अपुरा. [हिं.नाबर]

**नाबदार** पु. खडीसाखरेचा ढीग.– शर.

**नाबनाव** वि. सर्व; संपूर्ण; एकूण एक.(व.)

**नाबवती** स्त्री. वैमनस्य; वैर.(व.)

**नाबालीक** वि. वयात न आलेले,सज्ञान न झालेले (मूल).[फा.नाबालिघ्]

**नाबूद** क्रिवि. १. नष्ट, बेचिराख, नाहीसा, बेपत्ता झालेला; बुडालेला : 'नजीबखानास नाबूद करावें हे मसलत त्यांनी केली.'– मदबा १.६९. २. पूर्णपणे; साफ: 'गांवीं टोळ येऊन शेतें नाबूद खाऊन नासाडी जाहली.'– सासंइ, जुलै ९४. ३. (क्व.) अपूर्व; न भूतो न भविष्यति. [फा.न+बूद, नाबरद्]

**नाबेजणे** अक्रि. हवेतल्या ओलाव्यामुळे, दमटपणामुळे पदार्थ कुजू लागणे. (मुंबई)

**नाभ** स्त्री. १. लाकडात कूड, फळी इ. भरण्यासाठी केलेली खाचण. २. दुकानाचे दार, चौकट. (गो.) ३. मांदळा; पिंडी (चाकाची); गाडीच्या चाकाचा तुंबा. [सं.नाभि]

**नाभ** पु. अव. तलवारीच्या पात्यावर असणारे पन्हळ.

**नाभा** पहा: **नाभ ३**

**नाभिक** पु. न्हावी.

**नाभिकमळ** न. १. कमळासारखी सुंदर नाभी. २. रांगोळीचा एक प्रकार.

**नाभिपाक** न. नाळ कापल्यावर नाभी सुजून पिकते व पू होतो, कधी कधी क्षत पडते तो रोग; नाभीचा विकार.– बाळरोगचिकित्सा ५१.

**नाभी** स्त्री. १. बेंबी; नाळ ज्या ठिकाणी असते ते छिद्र. २. पहा: **नाभ ३.** ३. मध्यबिंदू; केंद्रबिंदू. [सं.]

**नाभी(भि)कार** पु. भिऊ नकोस असे आश्वासन; याबद्दल उच्चारण्याचा शब्द; अभयवचन; खात्री; विश्वास : 'ब्रह्मेया नाभीकारू दीन्हला।'– दाव ४७७.

**नाम** न. १.नाव; वस्तुमात्राचे नाव. २. (व्या.) पदार्थाचे नाव. याचे सामान्य, विशेष व भाववाचक असे तीन प्रकार आहेत.

पु. १. उभे गंध; ते लावण्याचा ठसा; रेघ. (सामा.) गंध; कपाळावर लावण्याचे चिन्ह. २. (ल.) घोडा, कुत्रा वगैरेंच्या कपाळावर असतो तो उभा पांढरा पट्टा.[सं.;फा.](वा.) ० **आंकणा घालणे–** जिंकलेल्याच्या नावाने पायात तोडा घालणे. **नामारूपा शून्य घालणे–** नाव-रूप नाहीसे करणे.

**नामकरण** न. मुलाचे नाव ठेवण्याचा संस्कार; १६ संस्कारांपैकी एक; बारसे.

**नामखंडी** पु. एक प्रकारचा लगाम.– अश्वप १.१८५.

**नामगावडा** वि. अशिक्षितांचा पुढारी.

**नामघोष** पु. १. (पूजेच्या वेळी वगैरे) देवाच्या नावाचा केलेला मोठा गजर; नावाचा घोष. २. देवाचे नाव घेणे; भजन.

**नामजा** स्त्री. मान; महत्त्व; कीर्ती: 'वडीलवडीलापासून स्वामीकार्य प्रसंगें धन्यास संतोषी करून आपली नाम–जा संपादीत आलेस.'– मइसा ८.१३९. [फा.नाम+जाह]

**नामजात–द** स्त्री. १. नियुक्त, नियोजित अधिकारी. २. नेमणूक; जहागीर: 'कांहीं नामजादा चार पांच लक्ष रुपये मिळतील ऐसे आहे.'– पया ९४. ३. स्वारी: 'त्यांनी शिर्क्यांवरी नामजात रवाना केली.'– मइसा १५.६. ४. एक पदवी: 'रामाजी माहादेव नामजाद प्रांत साष्टी यास.'– वाडबाबा ३.१९.

वि. १. लौकिकवान; प्रख्यात: 'हुजूर हशम तालुके मजकुरीं नामजाद आहेत.'– वाडसमा ४.१४३. २. नेमलेला; नियुक्त केलेला: 'ते लोक किल्ल्यावर ठेवावयाचे उपयोगी नसल्यास त्यांस दुसरे जागां नामजाद पाठविणें.'– वाडसमा १.२७८. [फा. नामझाद्]

**नामजादी** स्त्री. १. शौर्याचे कृत्य; नावलौकिक. २. स्वारी; आक्रमण : 'मग त्यावरी नामजादी करून रताजी रूपाजी जीवें मारिलें.'– इमं ३४.

**नामजोग** वि. हुंडीत ज्या माणसाचे नाव व वर्णन लिहिले असेल त्याच्यापासून ओळखपाळख न घेता हुंडीची रक्कम त्याला देता येईल अशी हुंडी; (इं.) ऑर्डर चेक. याउलट शहाजोग.

**नामदार** वि. १. कीर्तिमान; सुप्रसिद्ध. २. कायदेकौन्सिलचा सभासद. एक बहुमानार्थी पदवी; (इं.) ऑनरेबल.

**नामदारी** स्त्री. १. कीर्ती; लौकिक. २. कायदेकौन्सिलचे सभासदत्व; सन्मानाचा हुद्दा.

**नामधातू** पु. नामापासून बनलेला धातू. उदा. शेवटणे, समरसणे इ.

**नामधारक** वि. नेहमी देवाचे नाव घेऊन मुक्ती इच्छिणारा साधक; भक्तिमार्गी; भजनी: 'एथिचेआ नामधारक।'– ऋ १०३.

**नामधारी** वि.१. नावाजलेला; प्रसिद्ध; स्वतःचे नाव गाजवणारा. २. नुसत्या नावाचा; स्वतः काही काम करत नसताना ज्याच्या नावावर काम चालते असा. ३. एकच नाव असलेला; एकाच नावाचे दोन परस्परांना नामधारक समजतात. ४. विद्या, गुण इ. नसताना निव्वळ मोठे नाव धारण करणारा.

**नामधेय** न. नाव; नाम.

वि. नावाचा. [सं.]

**नामना–नी,नाम्ना** स्त्री. कीर्ती; प्रसिद्धी; ख्याती: 'राज्याभिवृद्धि करून आपली नाम्ना करून घेतली.'– बावडा दप्तर ८५.(कर.)

**नामनाईक** पु. आरमारावरचा अधिकारी.(हेट.)

**नामनिर्देशन** न. आपल्या मृत्यूनंतर आपली मालमत्ता, आपले पैसे इ. साठी एखाद्या व्यक्तीची वारस म्हणून नोंद करणे; (इं.) नॉमिनेशन.

**नामनिर्देशनपत्र** न. निवडणुकीला उभे राहण्यासाठी भरण्याचा अर्ज.

**नामनिशाण** वि. प्रसिद्ध; विख्यात: 'राजे बहादर नामनिशाण।'– ऐपो २७७.

**नामपत्र** न. नाव व इतर आवश्यक मजकूर छापलेले व भेटीसाठी किंवा भेट न झाल्यास ठेवण्यासाठीचे छोटे कार्ड; (इं.) व्हिजिटिंग कार्ड.

**नामपद्धती** स्त्री. विविध शास्त्रांमध्ये वापरल्या जाणाऱ्या पारिभाषिक,

संज्ञांची सूची; (इं.) नॉमेनक्लेचर.

**नाममुद्रित पत्र** पत्रांसाठी नाव, पत्ता, दूरध्वनी क्रमांक इ. मजकूर छापला आहे असा कागद; (इं.) लेटर हेड.

**नामर्द** वि. १. भ्याड; बायल्या. २. अशक्त; कमकुवत. [फा.]

**नामर्दी, नामर्दुमी** स्त्री. भ्याडपणा; दुबळेपणा; भित्रेपणा. [फा.]

**नामवर** वि. प्रसिद्ध; नावाजलेले.

**नामवाक्य** न. वाक्यात कर्माच्या ठिकाणी वाक्याचा प्रयोग केलेला असतो असे गौण वाक्य.

**नामवाचणी** स्त्री. नावनिशी: 'कथितो नामवाचणी सारी।'– अमृत ४४.

**नामवाच्य** पु. (व्या.) तृतीयपुरुष.

**नामशेष** वि. १. ज्याचे नुसते नाव उरले आहे असा (मृत किंवा अज्ञात मनुष्य, गाव). २. अतिशय निकृष्ट स्थितीला गेलेले (गाव, घर इ.).

**नामसरी** क्रिवि. नामसदृश; नावासारखे: 'तेही नामा नामसरी। म्हणत असतील जरत्कारी।'– मुआदि ४.१६.

**नामस्मरण** न. मनामध्ये देवाचे नाव घेणे; नवविधा भक्तीतील तिसरा प्रकार.

**नामा** पु. १. पत्र; खलिता. उदा. जाहीरनामा, करारनामा इ. २.दैनंदिनी; रोजनिशी. ३. इतिहास: 'पेशव्यांनी मोंगल बादशहाप्रमाणें नामे लिहिले नाहीत.'– के १३.१२.४०. [फा.]

**नामा** वि. वीस (फळांच्या मोजणीत).

पु. ढीग (फळांचा).

**नामाथ(थि)णे** अक्रि. १. प्रसिद्धीला येणे; नाव होणे; नावाजला जाणे: 'आनंदाचेनि नांवें। नामाथें पैं।'– सिसं ५.११. २. नाव देणे.

**नामाथिला** वि. नावाजलेला; नामांकित: 'ऐसे नामाथिले वीर।'– उषा १५९.

**नामानिराळा** वि. काही संबंध नसलेला; अलिप्त.

**नामाभिधान** न. १. नाव. २. नामांकित माणूस: 'हुजुरातींतले नामाभिधानें।'– ऐपो २६७. [सं.]

**नामांकित** वि. प्रसिद्ध; विख्यात.

**नामिका** स्त्री. एखादी समस्या सोडवण्यासाठी, स्पर्धेत निकाल ठरवण्यासाठी, मुद्द्यांवर चर्चा करण्यासाठी निवडलेल्या लोकांचा समूह, त्यांच्या नावांची सूची.

**नामित** नावापुरता; खऱ्या वस्तूच्या तुलनेने अगदी क्षुल्लक; (इं.) नॉमिनल.

**नामी** वि. उत्कृष्ट; प्रसिद्ध; उमदा; सरस. पहा : **नामांकित**[फा. नामी]

**नामुष्की, नामोश–शी–स–सी** स्त्री. १. बेअब्रू; अपकीर्ती; नाचक्की; बदनामी.(क्रि.येणे). २. (अनिश्चित) कीर्ती, सन्मान: 'नामोशाचे सरदार.'– सभासद ४९. [अर.नामूस]

**नामेवहि–ही** स्त्री. सूची.

**नामो** वि. (उप.) नाम लावणारा (सारस्वत वैष्णव). (गो.)

**नामोनिशाण** पहा: **नावनिशाण**

**नामोहरम, नामोहोर** वि. नष्ट; पराभूत; निराश; तोंड लपवलेला; अपयशी; अयशस्वी. [फा.ना+महरूम]

**नाम्या** वि. कपाळावर पांढरा पट्टा असणारा (कुत्रा इ.).

**नायक** पु. १. मुख्य; म्होरक्या; पुढारी; सेनापती; स्वामी; सूत्रधार. २. मुख्य पात्र; काव्य इ.मध्ये ज्याचे चरित्र-वर्णन असते तो पुरुष. ३. (पोवाडा, लावणी इ.) शृंगारिक काव्यामध्ये ज्याच्या आश्रयाने शृंगाराचे वर्णन करतात तो प्रधान वर्णनीय पुरुष. ४. गळ्यातील हाराच्यामधले रत्न. ५. पहा : **नाईक**. ६. पती; स्वामी. ७. (साहित्य.) चार प्रकारच्या नायकांपैकी प्रत्येक. ८. संगीतशास्त्र व कला यांत प्रवीण असणारा. [सं.]

**नायकडा** पु. महारजातीचा म्होरक्या, पुढारी.

**नाय(ई)कव(वा)डा–डी** पु. १. पूर्वीचा जमीनमहसूल वसूल करणारा शिपाई. २. रामोशी, बेरड यांचा म्होरक्या, नाईक. ३. जासूद. ४. पायदळातील किंवा किल्ल्यावरच्या दहा, वीस मनुष्यांवरचा अधिकारी: 'वसंतांची नायकवडी। खोचीति कोकिळांची धाडी।'– भाए ४३४. ५. सेनापती; नायक. ६. मुसलमानातील एक जात. [क. नायकवाडि]

**नायकी** स्त्री. १. नायकाचे काम व हुद्दा. २. मालकी; स्वामित्व.

वि. १. मालकीचे. २. पुढारी; मुख्य असलेले (राज्य, जात). ३. (संगीत) गायनात निरनिराळ्या रागांतील चीजा म्हणण्याचे गुरूंपासून मिळवलेले (ज्ञान).

**नायकी** पु. यवनी सालामध्ये दहा, शंभर, हजार इ. संख्येने फिरणारा शब्द.– शास्त्रीको.

**नायकी कानडा** (संगीत) एक राग. गानसमय मध्यरात्र.

**नायकीण** स्त्री. १. नायकाची बायको; नायिका. २. कारखान्यात दहा-पाच स्त्रियांवर अधिकार, हुकमत गाजविणारी स्त्री; मुकादमीण. ३. मालकीण; धनीण; सत्ताधीश स्त्री. ४. नाचणारीण; कलावंतीण; गाणारी अविवाहित स्त्री. ५. वेश्या; रखेली; व्यभिचारी स्त्री. (गो.)

**नायकुट–कूत** पु. नाळकूट; जलोदर.(गो.) पहा: **नाळगूत**

**नायको** पु. दशावतारातील सूत्रधार. (हा फक्त पदे म्हणतो.). (गो.)

**नायटा** पु. दद्रु; गजकर्ण; त्वचेचा एक रोग.

**नायटी** स्त्री. एक लहानसर झाड. याची फुले अंगावर येणाऱ्या नायट्यासारखी तांबूस रंगाची व चापट असतात.

**नायत्तॉ** पु. मुसलमानाला हिंदू शूद्र स्त्रीपासून झालेला मुलगा. (गो.)

**नायनाट** पु. सत्यानाश; सर्वनाश. [त. नयनट्ट]

**नायब** वि. १. दुय्यम; सहकारी; मदतनीस; हाताखालचा. २. प्रतिनिधी; गुमास्ता (अधिकारी). [अर. नाहिल]

**नायबत** स्त्री. नायबाचे काम; मुतालिकी: 'त्यांची नायबत आम्ही तुम्हांस देतों.'– दिमरा १.१०९. [अर. नियाबत]

**नायभडा** पु. नाश; खेळखंडोबा.(व.)

**नायरी** स्त्री. कोणी काही सांगितले असता नाहीच म्हणण्याची खोड.

**नायिका** स्त्री. १. मालकीण; धनीण; नायकाची बायको. २. पुढारपण घेणारी स्त्री; मुकादमीण. ३. नाटकातील मुख्य स्त्रीपात्र; नायकाची स्त्री किंवा इतर. ४. (साहित्य.) काव्य इ.तील प्रमुख वर्णनीय स्त्री. स्वीया, परकीया व सामान्या असे हिचे तीन प्रकार आहेत. [सं.]

**नार** पु. १. जुनाट झाडाच्या, लाकडाच्या आतला गाभा, कठीण भाग;

साड. २. शिंगाचा गाभा. ३. हृदय; अंत:करण; आतील बाजू.

**नार** स्त्री. पाभरीची नळी, फण; पन्हळ: 'पाभरींत एकपासून तों दोन, तीन नारी असे प्रकार आढळतात.'- ज्ञाको (क) ६४१.

**नार** पु. १. केळीच्या सोपटातील धागा; सोपट. २. कमळाचा देठ. ३. सिंदीचा फोक.(व.) ४. दांडी व जू एकत्र बांधण्याचा दोर. [सं.नाल;क.;त.]

**नार** स्त्री. बायको; स्त्री. [सं.नारी]

**नारक-की, नारकीय** वि. १. नरकासंबंधी. २.नरकवासी; नरकात राहायला योग्य: 'कृतघ्न तल्पकी नारकी।'- दास २.३.२६. [सं.]

**नारकत** स्त्री. (पानमळा)एक आकडी; सुरी; वेल इ. तोडण्याचा विळा.

**नारकस** न. एक प्रकारची कातर. हे छपरबंद वापरतात.

**नारण** न. आदिवासींचे एक नृत्य.

**नारद, नारदमुनी** पु. १. ब्रह्मदेवाच्या १० मानसपुत्रांपैकी एक. याला लावालावी करून भांडणे लावण्याची खोड होती. (त्यावरून) २. (ल.) भांडणे लावून मजा पाहणारा माणूस; कळलाव्या. [सं.]

**नारवले** न. लहान बुटकली.(व.)

**नारवा** पु. घाण; दुर्गंधी.

**नारवाटी** स्त्री. नरोटी. (व.,ना.)

**नारसिंगी, नारसिंगाळे** स्त्री.न. हिरव्या केळ्याची लांबट व रुचकर जात.

**नारसिंह** पु. फेंदरट, पसरट नाकाचा मनुष्य (सिंह फेंदरट नाकाचा दिसतो त्यावरून.).

**नारळ** पु. १. कठीण कवचाचे व आत पाणी असणारे फळ व त्याचे झाड; माड. समुद्रकिनाऱ्यावरील प्रदेशात मुख्यत्वे याचे उत्पादन चांगले होते. २.(ल.) डोचके; टकले; बोडके.[सं. नारिकेल; सिं. नारेलु] (वा.) ० **देणे**– १. वधूपित्याने वरपित्याला नारळ देऊन त्याचा स्वीकार झाला म्हणजे विवाहनिश्चय झाला असे मानण्याचा विधी. २. घालवून देणे; कामावरून काढणे. ० **पंचा हाती देणे**– काम न करता विन्मुख परत पाठवून देणे ० **फोडणे**– शुभारंभ करणे. ० **हाती देणे, मिळणे** – १. घालवून देणे; काढून टाकणे. २. जाण्यासाठी निरोप देणे. **नारळाची आई हाती येणे** – दारिद्र्यावस्था येणे. **नारळी पदरी पोशाख** – जेथे सन्मानार्थ वस्त्र द्यायचे तेथे नारळ देणे.

**नारळकाकडे** न. नारळ व त्याच्यासारखे इतर पदार्थ.

**नारळगळ्या** वि. मोठे भोक, भगदाड असलेले; ज्यातून नारळसुद्धा गळू शकेल असे (मोठे छिद्र). (अतिशयोक्तीने फाटक्या वस्तूला म्हणतात.).

**नारळ(ळी)पाक** पु. साखरेच्या पाकात खोबऱ्याचा कीस घालून बर्फीसारख्या केलेल्या वड्या.

**नारळमाड** पु. नारळ येण्यासाठी राखलेले नारळाचे झाड.

**नारळी** स्त्री. १. नारळाची अर्धी करवंटी (भांड्यासारखी उपयोगी); नरोटी. २. नारळाचे झाड. हे ४० ते ५० हात उंच वाढते.

**नारळी काठ, पदर** वि. काठामध्ये, पदरामध्ये जरीची नारळाच्या झाडाची नक्षी काढलेले (लुगडे, पागोटे इ.).

**नारळी झाप** प्रत्येक नारळीच्या झावळ्यावरील कर.

**नारळी पुनव-पौर्णिमा** श्रावणी पौर्णिमा. या दिवशी पावसाळा संपला असे मानून समुद्राची पूजा करून त्याला नारळ अर्पण करतात.

**नारळी भात** नारळाचा कीस, चव घालून केलेला गोड भात.

**नारळेल** न. १. नारळाचे काढलेले औषधी तेल. २. खोबरेल तेल.

**नारळ्या** पु. समुद्रकिनाऱ्यावर आढळणारा, मासे खाऊन राहणारा, पाय व चोच पिवळे असणारा, पांढऱ्या रंगाचा पक्षी. (को.)

**नारंग, नारंजी** पहा: **नारिंग-गी**

**नारंद** पु. लाकूड इ. कातण्याची सांगड, यंत्र; पेच पाडण्याचे यंत्र; (इं.) लेथ.

**नारा** पु. १. स्त्रीवेषधारी नाच्या पोऱ्या. २. पती. (वा.) ० **नाचणे**– बेअब्रू, दुष्कीर्ती होणे. ० **नाचवणे**– १. दंगा, उपद्रव करणे; गोंधळ घालणे. २. स्वच्छंदी वर्तन, थेर करणे.

**नारा** पु. घोषणा. [हिं.]

**नारा** पु. नकार. (क्रि. करणे, लावणे, चालवणे.) पहा: **नन्ना, नायरी**

**नाराच** पु. बाण; तीर. [सं.]

**नाराज** वि. नाखूष; असंतुष्ट; अप्रसन्न. [फा.नाराझ]

**नाराजी** स्त्री. नाखुषी; अप्रसन्नता. [फा.नाराझी]

**नाराणूक** स्त्री. असमाधान.- ज्ञा १६.९२.

**नारायणतेल** न. अनेक वनस्पतींपासून काढलेले वातहारक तेल.

**नारायणपात्र** न. नरोटी; भिक्षापात्र: 'रामचंद्र गणेश (कानडे) यानें नारायणपात्र घेऊन भिक्षा मागितली.'-ऐलेसं.

**नारायणबल-ली-ळ-ळी** पु.१.पहा : **नागबळ-ळी**.२. संन्याशाच्या मृत्यूनंतर विष्णुप्रीत्यर्थ करण्याचा विधी.

**नारायणी** पु. (संगीत) एक राग. गानसमय दिवसाचा दुसरा प्रहर.

**नारावारा** पु. १. निष्काळजीपणाने वागविणे; तुच्छ मानणे, करून टाकणे; तुच्छ मानलेली स्थिती. २. उघड, प्रसिद्ध करणे; कुप्रसिद्धी.

**नारिकेलपाक** पु. १. पहा: **नारळीपाक**. २.(ल.) (साहित्य.) नारळाची करवंटी कठीण असते त्यामुळे आतील रस, पाणी मिळवण्यासाठी श्रम करावे लागतात. यावरून ज्यातला गूढार्थ कळायला बरेच कष्ट पडतात असे साहित्य. ३. एक औषधी पाक. [सं.]

**नारिकेलपाकन्याय** पु. बाहेरून कठीण, खडबडीत दिसणारा नारळ फोडल्यावर आत गोड खोबरे व पाणी असते. त्याप्रमाणे वरून कठीण, ओबडधोबड वाटणाऱ्या वस्तूच्या पोटात शिरल्यावर माधुर्य आढळते असा अर्थ. [सं.]

**नारिंग-गी** स्त्री. नारिंगाचे झाड. फुलांचा वास मधुर असतो.
न. नारिंगाचे फळ; मोसंबी.
वि. नारिंग्याच्या रंगासारखा रंग असलेले.

**नारी** स्त्री. स्त्री; बायको. [सं.]

**नारी(रीं)व** वि. नार असलेले; ज्यात साड तयार झाले आहे असे(म्हणजे तयार व दृढ) (लाकूड).

**नारींग** न. नळा (दारूसामान). (गो.)

**नारू** पु. एक तंतुमय कृमी व तो उत्पन्न होण्याचा रोग. हा रोग पाण्यातून होतो. [सं.नाल; म.; क.]

**नारू** पु. गावगाड्यातील अलुतेदार, अलुते . [क.नाडु]

**नारूकारू** पु.अव. गावातील कारागीरवर्ग; सामान्य माणसे. [क. नाडु+काडु]
**नाऱ्या** पु. वाद; टुमणे. (व.)
**नाऱ्या** वि. कोणीतरी; कोणीही मनुष्य.
**नार्यन** घोडा.
**नाल** पु. १. घोडा, बैल यांच्या खुराला मारण्याची लोखंडी अर्धवर्तुळाकार पट्टी. २. घोड्याच्या पायाला बांधण्याची लोखंडी बेडी. [अर.नअल्]
**नाल** स्त्री. एक वाद्य. सामान्य पखवाजाच्या आकारापेक्षा लांबीचे प्रमाण सव्वापट असते व गट्ठे नसतात.
**नाल** पु.न. कमळाचा देठ.
न. शरीरातील शीर; नळी.
स्त्री. पु. १. पहा: **नाला** १, २. २. वार; नाळ. ३. बंदुकीची नळी: 'नाला तुदु बाका सोडुनी देती'– ऐपो ८२. [सं.]
**नाल** पु. (विटीदांडूचा खेळ) विशिष्ट प्रकारचा टोला मारण्याची एक रीत; चार ही संज्ञा. [क.नालकु]
**नाल** स्त्री. घोड्यावर सतत बसल्याने ढुंगणाला पडणारा घट्टा.
**नाल** पु. नारळ.(कु.)
**नाल** पु. मोठा दगड: 'पटांगणात दगडाच्या एक दोन लहान मोठ्या गोट्या आणि नाल होते.'– बनगरवाडी.
**नाल** वि. लुच्चा; छट (माणूस); त्रासदायक (जनावर): 'बारा बलोत्यांचीं मुलें नाल जाणा।'– रामदासी २.३८.
**नालकट** वि. निर्लज्ज; बेशरम.
**नालकरी–बंद–बंध** पु. जनावराच्या पायाला नाल मारणारा.
**नालकी–खी** स्त्री. १. एक प्रकारची पालखी; ही उचलण्यासाठी बारा भोई लागतात. एखाद्याचा अत्यंत गौरव करताना नालकीचा मान दिला जात असे. २. राजाची पालखी: 'राव जेव्हां नालकींत बसले।'– ऐपो २१३. [हिं.]
**नालकोल** पहा: **नारूकारू**: 'वायांचि नालकोलांकरवी काइसेया खावविसी.'– लीचउ ३६३.
**नालडबा** पु. १. घोड्याच्या चार नालाचा जोड. २. गावच्या लोहाराकडून नालाच्या रूपात घेत ती सरकारी पट्टी.
**नालदस्ती** स्त्री. तक्रार. पहा: **नालिश**
**नालपीर** पहा : **नालसाहेब**
**नालपोचा** पु. (कुस्ती) एक डाव. प्रतिपक्षाच्या घोट्याखालील पायाचा भाग खुपसून तोच पाय वर खेचून आणणे.
**नालबंद** पु. घोड्याच्या पायांना नाल मारणारा माणूस. [अर.; फा.]
**नालबंदी** स्त्री. १. नाल लावण्याची मजुरी. २. नालबंदाचा धंदा. ३. (ल.) लढाईवर जाण्याची, घोडदळाची तयारी (तंग, तोबरा, नाल इ.नवा करणे). ४. शागीर्दपेशा माणसाच्या रोजमुऱ्यातून दर महिन्याला राखून वर्षअखेर देतात ती बाकी. ५. घोडेस्वारांना मोहिमेवर पाठवितांना किंवा चाकरीवर ठेवताना त्यांच्या पगारातील अगाऊ दिलेली रक्कम.– भाब ३१. ६. मुसलमानी अमदानीत सरदार, जहागीरदार, रयत यांच्याकडून घोडदळासाठी सरकार घेत असे ती रक्कम. मराठेशाहीत त्याची कायमची पण लहानशी खंडणी केली गेली. [फा.]
**नालबाळी** स्त्री. कानातील बाळीचा एक प्रकार.
**नालमेख** स्त्री. १. नाल ठोकण्याचा खिळा. २. नालबंदीचे सर्व सामान. ३. नालबंदी वगैरेचा खर्च: 'रोख दोन हजार रुपये नालमेखेचे पाठविले.'– ऐस्फुले ६५.
**नाळवा** पु. नदीच्या पुराच्या पाण्याने किनाऱ्याला पडलेली वाकडी तिकडी चर.
**नालसाहेब** पु. १.पंजा; मोहरमात एका उंच काठीला पंजा बांधून त्याला पुष्पमाळा इ. घालून गावातून मिरवत नेतात. २. ही काठी हातात धरणारा माणूस. याच्या अंगात संचार होतो असे समजतात. [अर.नआल]
**नालस्ती–स्त** स्त्री. तक्रार; फिर्याद. [फा.नारास्त+ई]
**नाला** पु. १. ओढा; ओहोळ. २. ओढ्याचे कोरडे पात्र. ३. गटार; मोरी; नळ. [सं.नाल]
**नालाचढ** स्त्री. नाल्याला धरण बांधल्यामुळे त्याचे पाणी चढून त्या पाण्याने भिजणारी जमीन.(मालवणी)
**नालायक** वि. कर्तृत्वहीन; अपात्र; असमर्थ; निरुपयोगी. [फा.ना+लायख]
**नालिका, नाली** स्त्री. १. नाला; मोरी. २. शीर; नाडी. ३. घटिका; २४ मिनिटांचा काळ. [सं.]
**नाली** स्त्री. लहान पूल.
**नालीक** स्त्री. आग्नेयास्त्र; बंदूक. [सं.]
**नालीस** स्त्री. फिर्याद; तक्रार. [फा.;हिं.]
**नालुंगा** वि. शूर; बहाद्दर.–शर : 'शिंद्यांचा ज्यानबत्तीस फ्रेंच नालुंगा।'– राला १००.
**नालोबा** वि. एकुलता एक.
**नाव** स्त्री. बसण्याचा झोऱ्या; बोऱ्या; सुताडा; सुतडा; बैठक.
**नाव** स्त्री. होडी; नौका; तर. [सं.नौ] (वा.) **एका नावेत असणे, बसणे–** एकाच परिस्थितीत, अडचणीत असणे.
**नाव** न. १. पहा: **नाम** १, २. २. (ल.) ख्याती; कीर्ती; लौकिक; पत; अब्रू; चांगले नाव. ३. दुर्लौकिक; डाग; कलंक; नापत; बदनामी; दुष्कीर्ती. ४. भांड्यावर नाव घालण्याचे कासारी हत्यार.– बदलापूर ९६. ५. नवरा–बायकोने उखाणा घालून घेण्याचे परस्परांचे नाव. (क्रि. घेणे). [सं.नाम] (वा.) ० **करणे, काढणे–** सबब सांगणे. ० **काढणे–** कुरापत काढणे; कळ लावणे. ० **खारणे–** नाव घेऊन निर्देश करणे; नाव घेणे; नावाचा उल्लेख करणे. (को.) ० **जळो, भाजो; नावाला हळद लागो–** तळतळाट किंवा शाप देण्याचा वाक्यप्रचार. ० **ठेवणे–** दोष देणे; व्यंग काढणे. ० **ठेवणे व फोडणे–** (बायकी) खेळात जेव्हा दोन मुली एकदम शिवतात तेव्हा डाव कोणी घ्यावा याबद्दल वाद होतो. त्या वेळी त्या एकमेकींच्या संमतीने नावे बदलून ठेवतात. मग इतर एखाद्या मुलीला आपली नावे सांगून ती त्यातील मागेल ते नाव देऊन उरलेल्या नावाच्या मुलीने डाव घ्यायचा असतो. ० **डहाळ, डाहार होणे,करणे–** बदनामी होणे, करणे. (व.) ० **डालणे–** (परदेशी तेली) प्रेताच्या सारवलेल्या जागेवर केळीचे पान ठेवून त्यावर प्रत्येक मनुष्याने मयताचें नाव घेऊन कालवलेल्या भाताचा घास ठेवणे.– बदलापूर २६७. ० **धुळीत, मातीत, पाण्यात इ. जाणे, मिळणे, पडणे–** बदनाम होणे. ०

**नको**– तिटकारा, किळस, द्वेष दाखवणारा शब्द. ० **न घेणे**– अलिप्त राहणे; अंगाला संसर्ग न लागू देणे; दूर राहणे. ० **नसणे, नाही**– (विद्या, पैसा इ.चा) पूर्ण अभाव असणे; नाव, निशाण, खूण काही नसणे. ० **बदलणे**– नामोशी पत्करणे (प्रतिज्ञेच्या वेळी योजतात.). ० **लावणे, सांगणे, घालणे, देणे**– किंमत, अटी ठरवणे. ० **सार्थ करणे**– नावाला शोभेल अशी कामगिरी करणे. ० **सोडणे, टाकणे**– त्याग करणे; संबंध तोडणे; इच्छा न करणे.**नावग्रहण ठाऊक नसणे**– नावगावाची काहीही माहिती नसणे. **नावाचा**– १. खरा. २. केवळ नावापुरता; नामधारी. ३. चांगला लौकिक असलेला. **नावाची बोंब पडणे**– वाईट गोष्टीला कारणीभूत होणे; एखाद्या तक्रारीचा विषय होऊन बसणे. **(एखाद्याच्या) नावाने घागर फोडणे**– संबंध तोडणे; मेला असे समजणे. **नावाने झेंडा लावणे**– भव्यदिव्य, प्रतिष्ठा उंचावण्यासारखे कृत्य करणे. **(एखाद्याच्या) नावाने धोंडे फोडणे**– एखाद्याच्या नावाने धोंडे आपटून परमेश्वराला गाऱ्हाणे घालणे. **(एखाद्याच्या) नावाने पाणी तावणे, तापवणे**– एखाद्याचा द्वेष करणे, मरण चिंतणे. **(एखाद्याच्या) नावाने पूज्य असणे**– पूर्ण अभाव असणे. **(एखाद्याच्या) नावाने बोंब मारणे, शंख करणे, खडे फोडणे**– एखाद्याविरुद्ध बोभाटा, ओरड करणे. **(एखाद्याच्या) नावाने भंडारा उधळणे**– स्तुती करणे. **(एखाद्याच्या) नावाने हाका मारत बसणे**– दुसऱ्याने नुकसान केले अशी अकारण ओरड करत सुटणे. **नावालादेखील नसणे, नाही**– शपथेला, नाव घेण्यापुरतेही नाही. **(एखाद्याच्या) नावावर गोवऱ्या फोडणे, घालणे, रचणे**– एखाद्याचे वाईट चिंतणे, करणे; शाप देणे. **नावावर पाणी घालणे**– कीर्तीवर पाणी सोडणे; चांगले नाव, लौकिक बुडवणे. **नावास चढणे**– कीर्तिमान होणे; लौकिक वाढणे. **ज्याचे नाव ते**– जे हवे ते कधीही न देणाऱ्या, न करणाऱ्या मनुष्य, वस्तू इ.संबंधी योजतात.

**नाव** पु. निमिष; क्षण.

**नावकर–री** वि. १. कीर्तिमान; प्रसिद्ध; नावलौकिकाचा. २. नामधारी; दुसऱ्याच्या नावाचा आश्रय करणारा.

**नावकुळ–नाव** वि. सगळा; एकूण एक.(ना.)

**नावड** स्त्री. अप्रीती; अरुची; नापसंती; तिटकारा.

**नावडता, नावडा** वि. पसंत, आवडीचा, प्रिय नसणारा.

**नावणिग** वि. सुप्रसिद्ध : 'आणिक ही आथि जे जे । नावणिगे ।' – राज्ञा ११. ४६८.

**नावनट** वि. क्रिवि. पूर्णपणे नष्ट, बेचिराख झालेला; थांग, पत्ता, माग, खूण, अवशेष नसलेला.

**नावनंग** पु. लौकिक; कीर्ती.

**नावनांगर** पु. पेरणीच्या वेळी प्रथम नांगर धरण्याचा व निवाडपत्रात निशाण्या करताना प्रथम नांगराची निशाणी करण्याचा पाटील किंवा देशमुख यांचा मान.

**नावनिशाण** न. सर्व वृत्तान्त (कूळ, नाव, गाव इ.).

**नावनिशी** स्त्री. १. नावांची यादी. २. तीत दाखल केलेले नाव.

**नावनेम** पु.(फलज्यो.) नावावरून राशी, गण, नक्षत्र इ.ची माहिती काढणे; अशी काढलेली माहिती.

**नावबुडव्या** वि. लौकिक, पत, किंमत घालवणारा.

**नावर(रा)स** स्त्री. (फलज्यो.) १. जन्मनक्षत्रावरून नाव ठेवणे; व्यावहारिक नावावरून नक्षत्रनाम काढणे. २. अशा रीतीने काढलेले नाव, कुंडली इ. ३. जन्मनक्षत्रावरून पहाण्याचे वधूवरांचे राशीघटित; नावावरून लग्न जमवणे. (क्रि. काढणे, पाहणे, ठरवणे). (बा.) ० **राशीला उतरणे, जमणे, मिळणे, येणे**– नावावरून वधूवरांचा घटित विचार केला असता अनुकूलता येणे; कुंडलीवरून लग्न जमणे.

**नावरूप** न. १. कीर्ती; अब्रू; पत. २. सार्थक; योग्य स्थानी विनियोग. ३. नाव आणि आकार; व्यक्तित्व; स्वतंत्र, वेगळे अस्तित्व.

**नावली** सदा नकार. [सं.]

**नावलौकिक,नावसकी** स्त्री. पु.प्रसिद्धी; मोठेपणा; कीर्ती; ख्याती.

**नावसता** वि. चांगल्या व वाईट अशा दोन्ही प्रकारे प्रसिद्ध.(कु.)

**नावसांगणी** स्त्री.पु. वाङ्निश्चय; कुणब्यांतील वधूवरांची व त्यांच्या मातापित्यांची नावे जातीच्या सभेमध्ये जाहीर करून लग्न ठरवण्याचा कार्यक्रम.(कुण.)

**नावळ** स्त्री. (मुंबई, प्रभू समाजात) लग्नाची वरात.

**नावाजणी, नावजणूक, नावाजणे, नावाजी, नावाजीस** पहा: **नवाजी** इ.

**नावाजीक** वि. १. मर्जीतला. २. थोर.

**नावाडगा** वि. १. नासधूस करण्याच्या स्वभावामुळे जेथे जाईल तेथे नाव मिळवणारा.(गो.) २. दांडगा.

**नावाडी** पु. होडी चालवणारा; अंबेकरी; खेवट; नाविक.

**नावाणणे** पहा: **नवाजणे**

**नावाणिगा–णीक–थिला** वि. पहा : **नामाथिला**

**नावाणे** न. कीर्ती.

**नावाथणे** सक्रि. नावाजला जाणे: 'जे जे वीर नावाथिले । ते ते येणें सर्व जिंकिले ।'– जै ६२.१३.

**नावावर** क्रिवि.१. नावासाठी–मुळे–करता–खातर; नावाचा लाभ घेऊन. २.नावे.

**नाविक** पहा: **नावाडी**

**नाविकदल** न. नौदल. पहा: **नौसेना**

**नावे** क्रिवि.नावाने खर्ची; खर्चाची बाजू; खर्चाकडे.

**नाश** पु. १. विध्वंस; सत्यानाश; उच्छेद; धुळधाण; दुर्दशा; हानी. २. नुकसान; तोटा. ३. (अंक.) उडवणे; काट मारणे; छेकणे; छेदणे. [सं.]

**नाशक** वि. १. नाश करणारा; बिघडवणारा. २. इजा पोहोचवणारा. ३. नाहीसे करणारा; नाश करण्याचा गुण असणारा. [सं.]

**नाशकत** वि. अशक्त; दुर्बळ; निर्बळ.

**नाशणे** उक्रि. १. नासणे; बिघडणे; बिघडवणे; खराब करणे. २.नष्ट होणे; हानी, विघात करणे.

**नाशवाद** पु. १. धार्मिक व नैतिक तत्त्वे नाकारणे. २. नास्तिक्य; संशयी वृत्ती. ३. (राज्य.शा.) प्राप्त परिस्थिती इतकी वाईट आहे की ती – दुसरा पर्याय काय याचा विचार न करता – नष्ट केली पाहिजे अशी विचारसरणी.
**नाशवेळ** स्त्री. (फलज्यो.) १. अशुभकाळ. २. मृत्यू, नुकसान, तोटा इ.ची वेळ.
**नाशह** पु. (बुद्धिबळ) राजावरचा शह उठवणे.
**नाशा** वि. नासाडी, नाश करण्याचा स्वभाव असणारा; द्वाड.
**नाशाब** वि. अजाण; नेणता; वयात न आलेला; अज्ञान.(ना.)
**नाशाबिती** स्त्री. पुराव्याचा अभाव.
**नाशिक** न. १. जनस्थान; नाशिक क्षेत्र. २. नाक. [सं.] (वा.) ० **त्रिंबकास जाणे, ० परगणा ओसाड असणे**– नाक बसके किंवा अपरे असणे.
**नाशि(श)वंत** वि. नाश होण्यासारखा; अशाश्वत; बिघडणारा; कायम न टिकणारा.
**नाष्टा, नाश्ता** पु. न्याहरी; सकाळचे खाणे. [फा. नाश्ता]
**नास** पु. १. पहा: **नाश**. २. नाश करणारे एक पिशाच्च.(वा.) **नासु आदरिणे**– नाश करावा असे मनात आणणे.(एभा.) [सं.नाश]
**नास** स्त्री. पहा: **नस**
**नासकवणी** न. दूषित, नासके, बिघडलेले पाणी किंवा रस.
**नासका** वि. १. नासलेला. २. पहा: **नाशिवंत**
**नासके केणे** १. लवकर खराब होणारा, नासणारा (फळे इ.) माल. २. नासकी वस्तू. ३. (ल.) वाईट, दुबळी वस्तू, प्राणी इ. उदा. लग्नासाठी दाखवलेली रोगट मुलगी, विकायला आणलेला दुबळा तट्टू इ.
**नासणे** उक्रि. १. पहा: **नाशणे**. २. वाया जाणे: 'तरी सांगावें सुहृदीं कथिला जो मंत्र तो न नासेल।'– मोकृवि ८८.६१. ३. गुण, सत्त्व नाहीसे होणे.
अक्रि. मरणे: 'लग्न केलें परी भ्रतार नासला।'– ब ९५. [सं.नाश]
**नासधूस–ळ** स्त्री. १. अत्यंत नासाडी; सत्यानाश; धुळधाण; दुर्दशा. २. व्यापारात बूड; तोटा. (क्रि. येणे.)
**नासपात–ती** न. मूळचे परदेशी फळ. गोलाकार, देठाजवळ निळे, लुसलुशीत व रसाळ मगज. पानझडी वृक्ष; उंची सुमारे १०मी.; डेरेदार.
**नासमज** वि. १. असमंजस; अपुऱ्या, अर्धवट बुद्धीचा; अननुभवी. २. मतिमंद; मूर्ख.
**नासरी** स्त्री. अर्धी दमडी.
**नासरू** पु. नाकात येणारे मोड.
**नासवणी** न. १. पिकाची नासाडी करणारा पाऊस. २. पहा: **नासकवणी**
**नासवणे** सक्रि. स्त्रीवर बलात्कार करून तिचे शील भ्रष्ट करणे.
**नासवीट** पु. (व्यापक) नाश; नुकसान; खराबी.(क्रि. करणे, होणे.).
**नासा** स्त्री. १. नाक. २. दाराच्या चौकटीचा वरचा भाग; कपाळपट्टी.
**नासाड–डा–डी** स्त्री.पु. पूर्ण विध्वंस, नाश: 'नासाड केले हो आमुचें काम।'– दावि ७८४.
**नासाड्या** वि. नासाडी करणारा.
**नासार्श** पु. नाकात फोड, पुटकुळ्या येणे; नाकाचा रोग.
**नासावणे** अक्रि. कमी दिवसाचे बाळंत होणे; धुपावणे.
**नासावर्त** पु. घोड्याच्या नाकावरील डावीकडचा भोवरा.– अश्वप १७.
**नासावंश** पु. १. नाकाचा दांडा. २. सरळ नाक. [सं.]
**नासिक–का** न. स्त्री. नाक. [सं.]
**नासिकाचूर्ण** न. तपकीर.
**नासिकी** स्त्री. सांडपाण्याची मोरी: 'पटिसाळे नासिकीये अवस्थान जाले :'– लीचउ ५५२.
**नासिक्यरंजन** न. कोणत्याही स्वनाचा उच्चार नाकातून करण्याची पद्धत. उदा. आं!, कंस, संलग्न इ.
**नासीपूड** स्त्री. तपकीर. (बे.)
**नासुकला** वि. यःकश्चित; क्षुल्लक.(व.,ना.)
**नास्त** स्त्री. दारिद्र्य.[सं.नास्ति] (वा.) ० **भाकणे**– १. दारिद्र्याचे ढोंग करणे. २. तोट्याचे, नुकसानीचे, अनर्थाचे भविष्य करणे; भावी अनर्थाबद्दल बोलणे.
**नास्तभाक्या** वि. १. नास्त भाकणारा. २. अवसानघातकी; रड्या.
**नास्तालिक** स्त्री. एक अरबी लिपी.
**नास्ति** नाही; मुळीच नाही; नव्हे. [सं.] (वा.) ० **नव्हे विचार** – सर्व गोष्टी होऊन गेल्यावर, नाश झाल्यानंतर सुचणारा विचार.
**नास्तिक** पु. धर्म, देव, वेद, पुराण, परंपरा, कर्मकांड न मानणारा; पाखंडी, निरीश्वरवादी. [सं.]
**नास्तिकमत–वाद** न.पु. नास्तिकपणाचे मत व त्याचे प्रतिपादन. उदा. सौत्रान्तिक. [सं.]
**नास्तिकवाद** पु. प्राप्तीचा अभाव.– ज्ञा १६.४५१.
**नास्तिवादी** पु. मुद्दा, विधान खोडून काढणारा (व विरुद्ध बाजू मांडणारा).
**नाह–हो** पु. १. पती; स्वामी: 'ऐसें सकळ सिद्धांचा रावो। देवी लक्ष्मीयेचा नाहो।'– ज्ञा ३.२७३. २. पालक; आश्रयदाता; नाथ: 'परब्रह्मगिरी दुर्गाचा राओ। शरणागतांसीं नाहो।'– शिव ५१४. [सं. नाथ]
**नाहक** क्रिवि. १. अन्यायाने; जुलमाने; त्रासदायक रीतीने. २. अकारण; उगीचच; व्यर्थ; फुकट. ३. हक्कावाचून; बेकायदेशीर.
**नाहडणे** अक्रि. नागवण, लूट, तोटा, नुकसान होणे.
**नाहडा** पु. लूट; नागवण; तोटा; नाश.
**नाहणणे** उक्रि. १. स्नान घालणे. २. (ल.) बुडवणे; फसवणे; लुबाडणे. ३. (रक्त, घाम इ.ने अंग) चिंब भिजणे.
**नाहणमाखण** न. (मुख्यत्वे स्त्रियांचे व मुलांचे) अभ्यंगस्नान; नहाण.
**नाहणवणी** स्त्री. देवाच्या अभ्यंगस्नानाचे पाणी; तीर्थ.
**नाहणवली, नाह(हा)णुली, नाहणे(णो)ली** स्त्री. प्रथमच रजोदर्शन झालेली स्त्री.
**नाहणवेणी** स्त्री. स्त्रिया न्हाल्यानंतर घालतात ती पोकळ वेणी.
**नाहणी, न्हाणी** स्त्री. १. देवळातील तीर्थकुंड; देवळातील देवस्नानाचे पाणी बाहेर जेथे पडते ती जागा. २. विटाळशीची मोरी; तिच्या स्नानाची जागा. ३. (सामा.) मोरी; गटार; सांडपाण्याची खाच. ४. स्नानगृह. ५. मोटेचे पाणी ज्यात पडते तो हौद. [सं. स्ना]

**नाहतीधुती** स्त्री. १. नहाण येऊन प्रौढावस्थेत, वयात आलेली स्त्री. २. नेहमी वेळच्या वेळी विटाळशी होणारी स्त्री. ३. विटाळ न गेलेली, म्हातारी न झालेली स्त्री.

**नाह(हा)बी, नाहाब** स्त्री. पु. १. तूट; नुकसान. २. जाळपोळ; लूट; नाश. [अर.नाहिब]

**नाहरकत प्रमाणपत्र** कृती करायला आपली हरकत नाही असे लिहून देणे.

**नाहाट** क्रिवि. किनाऱ्यापासून दूर, समुद्रात दूरवर आत; पुष्कळ बाहेर: 'फिरंगियाचें आरमार समाईन घेऊन बाहीर निघालें होतें. त्यास सहा दिवसपर्यंत नाहाट समुद्रांत होतें.'– पेद १६.१५१.

**नाही** क्रि. नसणे; नास्तित्व; अभाव. [सं.नास्ति]

**नाही** अभावबोधक अव्यय; न, ना; नव्हे.– मसाप २.१.[सं.नास्ति] (वा.) ० **करणे**– १.नष्ट करणे: 'नाहीं करील दुर्जन शत्रू ।'– मुआदि २७.२०३. २. नाही असे दाखवणे. ० **होणे, नाहीसा होणे**– १.नसल्याप्रमाणे, नष्ट होणे; फडशा होणे. २. गायब होणे.

**नाहीतरी** क्रिवि. नाही म्हटले तरीसुद्धा; कमीत कमी.

**नाहीतेच** क्रिवि. अशक्य; सर्वथा अयोग्य तेच; भलतेच.

**नाहीपक्षी–पेक्षा** क्रिवि. मुख्य गोष्ट न झाल्यास; गौणपक्ष म्हणून; निदान; कसेही करून; नाही तर.

**नाहू** पु. (क्व.) न्हावी. [सं.नापित; हिं.]

**नाहूर** न. मुंबई इलाख्यात होणारे 'मस्कोडाईन' जातीचे द्राक्ष.– कृषि ५१३.

**नाळ** न. स्त्री. १. कमळाचा देठ. २. वार; गर्भाशयातील अर्भक व आईची पोषणयंत्रणा यांना जोडणारी नलिका. ३. पितळी फुंकणी. (खा.) [सं.नाल, नाभिवलय]

**नाळ** स्त्री. गलबताचा पुढचा भाग, तोंड; जहाजावरील तोफ ठेवण्याच्या ठिकाणाचे एक पारिभाषिक नाव.

**नाळ** न. १. जनावराच्या पाठीला पडलेले क्षत. २. बेंबीचे क्षत.

**नाळ–ल** स्त्री. १. तोफ. उदा. गरनाळ, सुतरनाळ. २. सुकाणू. [सं.,फा.नाल]

**नाळ** पु. स्त्री. १. पखवाजाचे खोड. २. लहान तोंडाचे पखवाजासारखे वाद्य.

**नाळ** स्त्री. दळताना जात्याला चिकटून राहिलेले पीठ.

**नाळ** स्त्री. दोन टेकड्यांतील अरुंद वाट; भुयारातील, जमिनीतील रस्ता; पावसाच्या पाण्याने डोंगर वगैरेमध्ये पडलेली घळ, खळ.

**नाळ** स्त्री. जुनी, धातूंची भांडी. [सं.नाली]

**नाळक** न. नळी: 'तेणें नाळकें रस भरे ।'– ज्ञा ६.२४८. [सं.नालक]

**नाळकूट–गूत–गूद** पु.न. जलोदर. (को.,गो.)

**नाळके–चे** न. १. नरसाळे. (को.) २. एक माप. (गो.)[सं.नालिक]

**नाळके** न. १. धातूच्या भांड्याला झिजून पडलेले भोक. २. फुटके भांडे.(व.)

**नाळके** न. १. (गुडघ्याची) नळी–ळा; नडगी; नळगुटी. २. पुढे येणारे (गुडघ्याचे, कोपराचे) हाड. [सं. नाला]

**नाळणे** सक्रि. जखडणे: 'तार्किकांचिया वज्रसांखळा: कीर्तिखांबी नाळीचि अवलीळा'– शिव २५.

**नाळपड्या, नाळिक, नाळी–ळ्या** वि. १. नाळ पडलेला; कण्याला जखम झालेला, खरचटलेला, व्रण–क्षत पडलेला (पशू इ.): 'काग धांवती जैसे । नाळिक पशू देखोनी ।'– पांप्र ४.१०१. २. (ल.) एखाद्या वाईट गोष्टीची चटक लागलेला, त्याविषयी आसक्त बनलेला.

**नाळभिल्ल** पु. भिल्लांची एक जात.

**नाळवा** पु. ४०० हात लांबीचे माप. (गो.)

**नाळीक** न. जुने–पुराणे, मोडके–तोडके, मोडीचे धातूचे भांडे. वि. जुने; फुटकेतुटके; झिजलेले.

**नाक्षत्र** वि. १. नक्षत्रविषयक; नक्षत्रासंबंधी. २. ताऱ्यासंबंधी. [सं.]

**नाक्षत्रदिन, नाक्षत्रदिवस** पु. एक नक्षत्र मध्यान्ही आल्यापासून दुसऱ्या दिवशी मध्यान्ही येईपर्यंत जो काळ जातो तो. सौर दिनापेक्षा हा ४ मिनिटांनी लहान असतो.

**नाक्षत्रप्रदक्षिणा** स्त्री. २७ दिवस ७ तास ४३ मिनिटे इतक्या काळात चंद्राने पृथ्वीभोवती घातलेली प्रदक्षिणा; निघाल्या वेळेच्या नक्षत्राच्या सरळ रेषेत पुन्हा येणे; विशिष्ट नक्षत्राला उद्देशून प्रदक्षिणा.

**नाक्षत्रमास** पु. चंद्र एका नक्षत्रावरून जाऊन पुन: त्याच नक्षत्रावर येईपर्यंत म्हणजे २७ दिवस ७ तास १३ मिनिटांचा काळ.

**नाक्षत्रवर्ष** न. पृथ्वीचा सूर्यप्रदक्षिणेचा काळ; ३६५ दिवस ६ तास ९ मिनिटे १० ।। सेकंद इतका काळ; निरयन सौरवर्ष.

**नांगट** न. जमीन खणण्याची कुदळ. जेथे बैलांची औते चालत नाहीत तेथे नांगटीने जमीन खणून बी पेरतात.

**नांगडा–डी** पु. स्त्री. १. विंचवाची नांगी; खेकड्याचा आकडा; विशिष्ट माशाची नखी. २. रंग; ताठा.(क्रि. जिरवणे). [सं.लांगूल]

**नांगरकेना** स्त्री. एक पालेभाजी. (झाडी)

**नांगरपट्टी** स्त्री. मालवाहू किंवा प्रवासी जहाजांना नांगर टाकण्यासाठी तयार केलेली, ठरवलेली जागा.

**नांगळी** स्त्री. वेल. [सं.लङ्गलिका]

**नांगा, नांगा(गो)डा** पु. पहा: **नांगडा** १. (वा.) ० **मारणे**– १. टोमणा मारणे. २. कार्यनाश होईल असे बोलणे.

**नांगाड–डे** पु.न. १. कोंबड्याच्या, जनावराच्या पायाची अणकुचीदार नखी; खुराच्या नखाप्रमाणे वाढणारा निरुपयोगी भाग. २. पहा: **नांगा** १

**नांगी** स्त्री. १. विंचवाची नखी; नांगडा. (क्रि. मारणे). २. पहा: **नांगाड** १. ३. शेर किंवा थुवर, थोर याची डिरी, कोवळा कोंब, अंकुर : 'पिण्याच्या पाण्यांत शेराच्या नांग्या टाकून तें पिण्यास निरोगी करून टाकलें.'– के १९.४.३०. (वा.) ० **टाकणे** – हात, पाय गाळणे; हतबल होणे. ० **न राहणे**– समूळ नष्ट होणे; शिल्लक न राहणे; न उरणे. ० **मारणे**– टोमणा मारणे. ० **लागणे, रुतणे**– (एखाद्या कामात, जागेवर) जम बसणे; पाऊल रोवणे. **नांग्या भरणे** – शेतात पेरणीनंतर प्रति एकर रोपांची निर्धारित संख्या कायम राखण्यासाठी बियाण्यांची जिथे उगवण झाली नाही त्याठिकाणी त्याच वाणाचे नवीन बियाणे किंवा रोपे टोकली जातात, ती प्रक्रिया. पेरणी/रोपणीनंतर ५–६ दिवसांच्या नंतर ती करतात.

**नांगू देणे** गजर, नाद, ध्वनी होऊ देणे.

**नांगे** न. मेढीचे डेळके, दुबेळके, बेचके.

**नांडरी** स्त्री. अव.चिंध्या. – बदलापूर १२८.

**नांद** पु. प्रतिध्वनी.

**नांद–दी** स्त्री. १. नंदाळे; मातीची शेगडी. २. मातीचा मोठा रांजण. ३. उसाच्या घाण्याजवळ रस साठवण्यासाठी जमिनीत पुरलेला लोखंडी हौद; मांदाळ. ४. फुलझाडासाठी मातीची मोठी कुंडी. ५. स्नानासाठी बनवलेले मातीचे भांडे. [सं.नंदा; हिं. नांद]

**नांदणूक** स्त्री. १. पुष्कळ काळ सुखाने केलेली वसती; स्थायिक, रहिवासी होणे . २. वागणूक: 'ऐसी लोकांची जिये नांदणूक।'– ज्ञा ९. ५०७. ३. (एखाद्या राज्यात, एखाद्याच्या हाताखाली) विशिष्ट काळापर्यंत टिकणे.

**नांदणे** अक्रि. १. राहणे; वास करणे; स्थायिक होणे; सुखाने राहणे. २. सुखाने, भरभराटीने असणे; दीर्घकाळ चांगल्या स्थितीत असणे. ३. गजबजलेले, भरभराटलेले असणे (घर, खेडे इ.). ४. उपयोगी असणे, पडणे; टिकणे; चालणे; शेवटपर्यंत सुखाने जाणे. ५. जमणे; समेटाने चालणे; पटणे; जुळणे; सलोख्याने असणे. ६. कबूल असणे; मान्य होणे. ७. साठवणे; वागवणे; सांभाळ करणे.[सं.नंद्] (वा.)**नांदायला जाणे** – नवरी मुलगी प्रथमच सासरी जाणे; पहिलटकरीण सासरी जाणे.

**नांदणे** न. १. वास; वसती: 'जगद्गुरु महेश्वर प्रभुशिरीं जिचें नांदणें।'– केका १०९. २. वसतिस्थान; राहण्याचे ठिकाण: 'कीं वृष्णेंचे साजणें। लोभाचें नांदणें।'– भाए ३०९.

**नांदता** वि. १. लोकवस्तीचा (भाग, घर, जागा). २. लागवडीखाली असणारी, वहित (जमीन). ३. भरभराट, चलती असणारा (व्यापारी, सावकार, कूळ). ४. (सामा.) पुष्कळ दिवस व चांगल्या रीतीने राहणारा, टिकणारा. ५. समृद्ध व सुखी (कुटुंब). (वा.) **नांदत्या घराची केरसुणी** – स्वत:चा फायदा करून घेणाऱ्या माणसांची पुढेपुढे करून सेवा करणारा नोकर, गडी.

**नांद(दु)रुकी–खी, नांदरूक–ख** स्त्री. एक मोठे वाढणारे, दाट छायेचे झाड. पाने पिंपरीच्या पानांसारखी असतात. [सं.नंदिवृक्ष]

**नांदवट** (कु.) पहा: **नांदणूक**

**नांदव(वि)णे** उक्रि. १. वागवणे; सलोख्याने सांभाळणे. २. समाविष्ट करणे; अन्तर्भाव करणे, ठेवणे; साचविणे. ३. रूढ होणे; प्रचारात आणणे: 'नाहीं तें नांदविलें जेजें। मी तूं जगीं।'– ज्ञा १५.२८०.

**नांदा** पु. पिरपिर; चाळा. (व.)

**नांदाड** पु. मातीचे विशिष्ट भांडे. (व.) पहा: **नांद**

**नांदाविणे** उक्रि. पहा: **नादावणे** ६; एखादे चांगले कार्य बिघडेल असे आपले अज्ञान प्रकट करणे.

**नांदाळी** स्त्री. मंतरलेला ताईत, मणी (व्यापारात तोटा येऊ नये म्हणून); कुराणातील अक्षरे कोरलेला (गळ्यात बांधण्याचा) दगड.[हिं.नांदली]

**नांदी** स्त्री. १. नाटकाच्या सुरुवातीला ईश्वरस्मरणपूर्वक म्हणण्याचे, प्रेक्षकांना मंगल आशीर्वाद देण्याचे पद्य; देव, ब्राह्मण, राजा यांच्या आशीर्वादांनी युक्त असे नाटकाचे मंगलाचरण. २. समृद्धी. [सं.]

**नांदीमुख–श्राद्ध** न. उपनयन–विवाहादी मंगलकार्यांत प्रारंभी पितरांना उद्देशून करण्याचे श्राद्ध. (हे वैदिक नसून सत्याषाढ सूत्रकाळापासून सुरू झाले असावे.).

**नांदेट** स्त्री. तगरीचे फुलझाड. (को.)
न. तगरीचे फूल.

**नांदेटा** पु. १. पहा: **नांदेट.** २. सर्पातील एक प्रकार.

**नांदेडा** पु. विवाहातील देवांच्या समोरील मोठी पणती. [सं.नांदी]

**नांद्या, नांद्या बैल** १. पहा : **नंदीबैल.** २. (ल.) मूर्ख. ३. फाजील लाडावलेला मुलगा; मिजासखोर. (ना.) [सं.नंदी + म.बैल]

**नि** अ. उप. १. खात्री; निखालसपणा. २. नकार; अभाव. उदा. निकोप, निकामी. ३. अतिशयता. उदा. निमग्न. [सं.निर्]

**नि** अ. अन्; आणि.

**निआव्हणे** क्रि. निर्वाह करणे.

**निउटके** न. एक माप; अर्धे चौटके; शेराचा बत्तिसावा हिस्सा; चिळवे.

**निउता** वि. क्रिवि. अलीकडे; नुकतेच.

**निउन** वि. १. हलक्या प्रतीचे: 'तियाहीउनि आणीक निउन म्हणीये दीधलें:'– लीचपू २०२. २. दुर्बळ: 'तेयांचे स्थळ निउन होए:'– लीचपू ७१.

**निक** क्रिवि. निश्चितपणे: 'फळप्राप्ति होय निक।'– गुच १९.१९.

**निकट** वि. जवळचा; शेजारचा.
क्रिवि. जवळ; नजीक; लागून; जवळपास; शेजारी. [सं.]

**निकट** पहा : **निकड**

**निक(का)टणे** अक्रि. दूर जाणे, राखणे; बाजूला होणे; (घर, अधिकार, पद इ.पासून) निघून जाणे. (ज्याचे जाणे इष्ट असते अशाबद्दल योजतात.)

**निकटणे** अक्रि. जवळ, नजीक येणे.

**निकटदृष्टिता** स्त्री. एक दृष्टिदोष. यात प्रकाशकिरण नेत्रपटलापासून थोडे पुढे केंद्रित होतात.

**निकड** स्त्री. १. तड; लकडा; तगादा; हव्यास. (क्रि. लावणे). २. तातडी; जरुरी; अडचण. ३. लोट; नेट. ४. हल्ला. [सं.निकट]

**निकण** न. १. दुसऱ्यांदा मळलेली, तुडवलेली, पोकळ (जोंधळा, बाजरी इ.ची) कणसे. २. दाणा होण्यापूर्वीचा कणसाचा भाग.
वि. १. कणहीन; मळणी झाल्यानंतरचे, धान्य निघून गेलेले, रिकामे (कणीस). २. किड्यांनी खाल्ल्यामुळे सत्त्वरहित, फोल (धान्य). ३. कण्या काढून साफ केलेले; कणी काढलेले; बिनकणीचे (तांदूळ इ.). ४. कांडताना कूट न होणारे (तांदूळ इ.). ५. कणी नसलेले, हलके, भिकार (तूप). [सं.निस्+कण]

**निकणे** अक्रि. लपणे; लिकणे. (बे.) [कं.]

**निकता** क्रिवि. नुकता; अलीकडे; थोड्या दिवसांपूर्वी.

**निकती** स्त्री. (सोनारी) सराफाचा वजन करण्याचा सूक्ष्म काटा. [हिं.]

**निकर** पु. १.कामाचा सोयीचा मार्ग सोडून राग इ. आवेशपूर्ण प्रवृत्ती; हट्ट. २. कहर; गहजब; आकांडतांडव: 'तुवां निकरची लावण्यखाणीं। केला बहुत आम्हांवरी।'– ह २७.१०६. ३. जोर; आवेश. ४. प्रलय; कडेलोट; आत्यंतिक मर्यादेपर्यंतची स्थिती: 'वदले सुरमुनि करितो नररूपें रुद्र काय हा निकर।'– मोभीष्म ३.५८. ५. वाईट परिणाम, शेवट :

'थट्टेचा निकर होईल.'- बाळ २.३०. [सं.नि+कृष्]
**निकर-रा** पु. १. समुदाय; समूह; संग्रह; ढीग. २. प्राचुर्य; समृद्धी; लयलूट. [सं.]
**निकर** स्त्री. १. अर्धी विजार; पाटलोण. २. स्त्रियांचे अंतर्वस्त्र. [इं.]
**निकरट, निकृट** वि. पहा : **निगरगट्ट** : 'निकरट परक्यावाणी मला कां दूर अगदींच टाकीलें।'- होला ११५. [सं.निकृष्ट]
**निकरणे** सक्रि. पहा: **निखरणे, निपटणे**
**निकरा** पु. अर्क; सार: 'कस्तुरीचेया निकरा: नोळखवे पासरा'- उगी ६७२. [सं.निष्कर्ष]
**निकरा** वि. निरर्थक; व्यर्थ.
**निकरा** वि. १. हट्टी; निकर करणारा. २. निश्चयी; करारी; एखाद्या गोष्टीचा पिच्छा पुरवणारा. ३. संतापी; त्रागा करणारा.
**निकर्श-र्ष** पु. १. अतिरेक; पराकाष्ठा; अतिशयपणा (कार्य, विचार इ. संबंधी). २. हट्ट; मनस्वीपणा. ३. कहर; अनर्थ; त्रास; जुलूम: 'संस्थान उच्छेद करावा हे वासना धरून निकर्श मांडिला आहे.'- वाडशाछ ९८. ४. ऱ्हास; उतरती कळा.
**निकल** न. एक हलका धातू. याची भांडी, नाणी इ. करीत.
**निकलणे** सक्रि.पहा: **निपटणे**
**निकला-ल्हा-ल्ही** वि. कल्हई नसलेले (भांडे इ.).
**निकवडा** वि. कवडीही शिल्लक नसलेला; दरिद्री; भिकारी; कंगाल. 'जे अनंगु तो पेंधा । निकवडा नुसधा।' - ज्ञा १३.९८०.
**निकवाड** न. (सोनारी) ऐरणीची बैठक. (कऱ्हाड)
**निकशी-सी** स्त्री. पहा: **निकड** : 'हा ठाववरी शिष्याची निकसी। सहाते गुरु आहाती कवणे देशीं।' - ज्ञा ११.६४६.
**निकशी** वि. कडक; स्पष्ट; हट्टी. (को.) पहा: **निक्षी**
**निकशी-स-सी** वि. १. कस, सत्त्व नसलेले (धान्य). २. किरकोळ; भिकार; नापीक; रुक्ष (जमीन). ३. मऊ; गरीब; गयाळ: 'विचारे श्रीकृष्णा दिससि मज तू थोर निकसी।' - सारुह ६.१५४.
**निकष** पु. कसोटी; परीक्षा. [सं.]
**निकसणे, निकसून टाकणे** सक्रि. हिणवणे; तुच्छ लेखणे. (व.)
**निकसर** पहा : **निकर**
**निकळा** वि. स्वाद, चव, रुची इ. विरहित (भात,भाकरी इ.).(को.)
**निकळा** (राजा.) पहा : **निकला**
**निकंठ** वि. कडक; कठीण; कठोर; जालीम (शासन, पथ्य).
**निकंड** वि. मध्ये फांद्या न फुटता उंच वाढलेले (झाड). [हिं.निकंद]
**निका** पु. मुसलमानांतील दुय्यम प्रतीचे लग्न; पाट; मोहतूर. [अर.निकाह]
**निका** वि.१.पवित्र; शुद्धः 'तुझा गोंधळ निका अंबे कोणी वर्णूं न शके हो।'- भज १७. २. चांगला; लायक; योग्य: 'राज्यायोग्यचि केवळ तप मात्र करावया बहु निका मी।' - मोभीष्म ११.३. ३. उत्तम; उत्कृष्ट; सुंदर. ४. बरोबर; नक्की; नेमका: 'हे श्रोतयांची आशंका । पाहती प्रश्न केला निका ।'- दास १०.७.१४६. ५. खरा; सत्य: 'म्हणे जयजयजी रघुनायका । सत्यप्रतिज्ञा शब्द निका ।' - वेसीस्व ४.८२. ६. शुद्ध; भेसळ नसलेले.
क्रिवि. स्पष्टपणे; स्पष्ट; उघड; धडधडीत. [सं.निष्कृत; हिं. नीका]
**निकाढा** पु. १. काढ्यातल्या चोथ्याचा पुन: केलेला काढा. २.(ल.) निरुपयोगी गोष्ट.
**निकाम** वि. पुष्कळ; फार; भरपूर: 'प्रभु आपण होईल कीं दीनत्राणीं निकाम हव्यास ।' - मोमंभा २.८९. [सं.]
**निकामी** वि. १. निरुपयोगी. २. बेकार; उद्योग नसलेला; बेरोजगार. ३. आळशी : 'निकामी तो दु:खप्रवाही । वाहतचि गेला ।' - दास १९.३.२८. ४.खडकाळ. - शर. [सं.निष्कर्म; हिं. निकामा]
**निकाय** स्त्री. पहा : **निगम**
**निकार** पु. मानहानी; अपकार : 'कुरुबलनलिनवनातें भीमगज निकार आठवी रगडी ।' - मोभीष्म ६.४७. [सं.]
**निकार** वि. खडकाळ.
**निकाल** पु.(कुस्ती) एक डाव. जोडीदाराच्या बगलेतून त्याच्या मानेवर हात घालून आपल्या छातीने उचलून मारणे.
**निकाल** पु.१. मोरी इ. चे सांडपाणी बाहेर जाण्याची उतरती जागा; सांडपाणी बाहेर काढून लावण्याचा मार्ग; नळाचे, मोरीचे तोंड, वाट. २. (ल.) वासलात; खुलासा; उलगडा; (कामाची) स्थिरस्थावर. ३. शेवट; परिणाम; निर्णय (खटल्याचा इ.). ४. तडजोड (करणे). [सं.निस् + कासय; फ्रें.जि. निकल, नीक] (वा.) ० **लावणे** - १. स्वच्छ करणे. २. शेवट करणे; संपवणे. ३. ठार मारणे.
**निकालअर्जी** स्त्री.ज्यावर निकाल झाला आहे असा अर्ज; अधिकाऱ्यांकडून निकाल लागलेला अर्ज.
**निकालपत्र** न. १. हुकूम कसे बजावले, खटल्यांचे निकाल कसे लावले इ. दाखवणारे, मामलेदाराने जिल्हाधिकाऱ्याकडे पाठवलेला ठरावीक कालावधीचा अहवाल; झाडापत्रक. २. चौकशीला दिलेल्या खटल्यांची यादी. ३. (क्र.) शिल्लक खटल्यांची यादी. ४. निर्णयाचा कागद; मसुदा.
**निकालस** वि. निर्लेप. (व.)
**निकालहुकूम** पु.(कोर्टाने केलेला) अखेरचा निकाल किंवा दिलेली शिक्षा.
**निकाशी** स्त्री. निकाल : 'कोणी चांगला मनुष्य अथवा स्त्री पाहून त्याचे कानी गोष्ट सांगून कामाची निकाशी करावी.' - नागपूरकर भोसल्यासंबंधी कागदपत्र १२.
**निकास** पु. बाहेर जाणे, पाठवणे. पहा: **निकाल १** [सं.निष्कास]
**निकासू** स्त्री.निर्गत मालावरची जकात. [सं.निष्कास]
**निकाळू** पु. निर्गत, बाहेर पाठवलेला माल.
वि. १. जेथून मालाची निर्यात होते असे (बंदर). २. बाहेर काढलेला; निर्यात (बंदर, मिठागर इ.संबंधी योजतात). याउलट पैसाळू.
**निकाळ्या** पु. जनावरांचा एक रोग. (व.,घाटी).
**निकी** स्त्री.चांगुलपण.
**निकीब, निकीबदार** पु.हुजऱ्या; भाट. पहा: **नकीब** [अर.नकीब]
**निकुटणे** अक्रि. वाळून शुष्क व कठीण होणे (कापणी न करता शेतात बराच काळ उभे राहू दिलेले भाताचे पीक); धान्य इ. कडंगणे. (को.)
**निकुमिकुले** न. लपंडाव. (बे.) [क.निकणे]
**निकुर** पु. निश्चय; राग; संताप. [सं. निकर]

**निकुरण, निकूर** न.पु. खरवड; निपटा (खरकट्या भांड्यांचा). [सं. निष्कृ]
**निकरणे** उक्रि. भांड्याला वगैरे चिकटलेला पदार्थ खरवडून काढणे, टाकणे (मुख्यत्वे नखांनी, हाताने).
**निकुवे** न. दुर्बळ मनुष्य: 'भलतेणे निकुवे मारिजे: तिहीलोकीं'-शिव ४७२.
**निकुंचित (भुवई)** वि.(नृत्य.) एक किंवा दोन्ही भुवया थोड्या वक्र करणे. [सं.]
**निकुंज** पु.दाट झाडी; कुंज. [सं.]
**निकुंभ** पु. हत्तीचे गंडस्थळ : 'द्वैताद्वैत निकुंभ । सरिसे एकवटति ।' – ज्ञा १.१७.
**निकृट** क्रिवि. किमानपक्षी; कमीत कमी; निदान. [सं. निकृष्ट]
**निकृति** स्त्री. निरसन; नाहीसे करणे. [सं. निकृष्ट]
**निकृष्ट** वि. हलका; खालच्या दर्जाचा; अधम; वाईट; क्षुद्र; नीच. [सं.]
**निकृष्ट मुद्रा** सोन्या-चांदीची नाणी प्रचारात होती तेव्हा नाण्याची दर्शनी किंमत त्यासाठी वापरलेल्या धातूच्या मूल्याहून जास्त आहे अशी नाणी.
**निकृंत** न. 'स्टेन्सिल'ने लिहिलेला कागद.
**निकृंतणे** उक्रि. छेदणे; कापणे. [सं.नि + कृंत्]
**निके** वि. १. नेटके; बरवे; बरे; नीट; चांगले. २. पहा : **निका** ५. ३. पूर्ण; सर्व: 'आली कष्टदशा, घडो मरणही, कीं तेज गेलें निकें ।' – वामन स्फुट श्लोक नवनीत १३४.
न. हित.
उद्गा. बरे; फार उत्तम; ठीक: 'निकें म्हणोनि पंडुनृपती । कुंती नेऊनि एकांतीं ।'- मुआदि २७.२२१.
**निकेतन** न. निवासस्थान; घर; महाल; प्रासाद; भुवन; मंदिर.
**निकोचा** पु. एक प्रकारचा लोखंडी खिळा.
**निकोप-पी** वि. १.निर्दोष; ऐब, तडा-भेग इ. उणीव नसलेला; न बिघडलेला; न नासलेला. २. पूर्ण अव्यंग; दृढ; मजबूत; भक्कम . ३. निरोगी; व्याधिरहित शरीर. ४. आधिक्य, न्यूनत्व, वाईटपणा नसलेला. ५. वाळवी, कीड इ. न लागलेले (लाकूड इ.). [सं.]
**निखट्टू** वि. १. निरुपयोगी; कुचकामी; आळशी. २. (मुख्यत्वे) नामर्द; दुबळा. ३. दाढी नसलेला. [सं.नि + अर. खट्टू ]
**निखडणे** अक्रि.१. (पाने) गळणे, झडणे. २. पाने गळल्यामुळे झाड उघडे-बोडके होणे.
**निखडणे** १. पहा : **निखळणे**. २. वस्तूचे एकत्र बांधून ठेवलेले चार-पाच भाग मोकळे करणे, खोलणे.
**निखड्ड** वि. कठीण; प्रखर. (गो.) [ सं.नि + खर]
**निखड्ड(ड्डा)ई** स्त्री. प्रखरता; कठोरपणा. (गो.)
**निख(खा)ती** वि. खत न घातलेली; बिनखताची (जमीन, शेत).
**निखर** वि. प्रखर; जाज्वल्य. [ सं.नि + खर]
**निखर** पु. वाईट परिणाम. (व.)
**निखरड** वि.नापीक, रुक्ष, हलकी, बिनलागवडीची (जमीन). (राजा).
**निखरणीचे दिवस** स्वच्छ, निरभ्र दिवस; उन्हाळा.
**निखरणे** अक्रि. अगदी नष्ट होणे; (पाऊस, ढग) पूर्णपणे जाणे; निरभ्र होणे ; नाहीसा होणे; स्वच्छ,स्थिर, शांत होणे; थांबणे; (वारा) पडणे.
सक्रि. निपटणे; निरपणे; खरवडणे; खरडणे (हाताने). [सं.नि+क्षर्]
**निखरंट** वि. निर्दय. (व.) पहा: **निकरट**
**निखराड** वि. कोरडे; ठणठणीत (पाणी, विहीर, तळे, नदी इ.). (को.)
**निखर्ची** वि. बिनखर्चाचे; बूड, तूट, न्यूनता नसलेले.
**निखर्व** न. दहा सहस्रकोटी; शंभर अब्ज संख्या. [सं.]
**निखलावा** पु. गवस; पकड.
**निखह** न. खड्ग; तरवारीचा एक प्रकार.
**निखळ** क्रिवि. १. केवळ; निव्वळ; निखालस; पूर्णपणे. २. खात्रीने; निश्चयाने.
वि. १. निव्वळ; निर्भेळ. २. शुद्ध; पवित्र. ३. संपूर्ण; पुरेपूर: 'तरी तेणें ज्ञानशस्त्रें निखटें। निखळू हा निवटे।'- ज्ञा ४.२०८. [सं.निखिल]
**निखळणे** उक्रि. १. खिळा निघणे, काढणे; मोकळा करणे, होणे; उखळणे; मोडणे; तुकडे होणे, करणे. २. सैल, खिळखिळीत करणे. ३. (ल.) हाकलणे; काढून देणे (जागेवरून इ.); उपटणे: 'होइल हानि कळा या बाळांपासूनि केंवि हा निखळाया।'- मोकृष्ण ३९.६३.
अक्रि. १. बाजूला निघणे. (गो.) २. मरणे. [सं.नि+स्खल्]
**निखळे खुरपे** (चर्मकार.) एक जातीचे खुरपे.
**निखंदणे** उक्रि. १. तिरस्काराने घालवून देणे; हुसकावणे; धुत् करणे. २. निषेध, तिरस्कार, निंदा करणे: 'केल्यावीण निखंदूं नये। पुढिलांसि कदा।'- दास २.२.१२. [सं.नि+स्कंद्]
**निखाडा** वि. रिकामा दिवस न मिळता; खंड न पडलेला; खाडा नसलेला (काळ).
**निखाडा-ड्या-डू** (गो.) पहा : **निखट्टू** [अर.नि+खड्ड]
**निखाडा-रा** पु. ढग नाहीसे होऊन आकाश स्वच्छ होणे.
**निखा(खो)ड्या** वि. न शिजणारा (दाणा). (गो.)
**निखातनिधी** पु. पुरलेले धन.
**निखाद** पहा: **निषाद**
**निखानेमाचा** वि. क्रिवि. नियमित; नेहमीचा; ठरावीक; खात्रीचा; पुन:पुन: येणारा (उकाडा, उचापत, पाहुणा, अतीत, भिकारी, पाऊस, वारा इ.).
**निखार, निखारओहट** पु. स्त्री. १. अतिशय मोठी ओहोटी; वसंत ऋतूतील ओहोटी. २. ओहोटीचे पाणी पुरे उतरणें; हें पाणी सुमारें सहा तासपर्यंत ओसरत असते. चंद्रास्त झाला म्हणजे ओहोटी पूर्ण होते व बारा मिनिटें पाणी तसेंच स्थिर राहतें.- मपु ६.१८७५ पृ. २८७.
**निखार** वि. १. पराकाष्ठेची; अतिशय (ओहोटी). (को.) २. निरभ्र.
**निखारणे** सक्रि. घालवून देणे; साफ नाहीसे करणे. [सं.निस्+क्षाल्]
**निखारणे** अक्रि. प्रज्वलित होणे; धगधगणे; जळजळीत असणे (निखारा).
**निखाररंगी** वि. निखाऱ्यासारख्या लाल रंगाचा; ज्वाळेच्या रंगाचा; लालभडक.
**निखारा** पु. जिवंत, जळणारा, पेटलेला कोळसा; विस्तव; इंगळ; अंगार. (वा.) ० **घरावर ठेवणे** - १. एखाद्याची दुष्कर्मे बाहेर काढून निर्भर्त्सना करणे. २. एखाद्याचे भयंकर नुकसान करणे. ० **देणे** - उपाशी राहणे; भूक मारणे; भूक न शमणे. **निखाऱ्याचे करणे**- जेवणे; खाणे; पोटातील आगीकडे लक्ष देणे.

**निखारा** पु. निरभ्रता; आकाश अगदी निरभ्र होणे.

**निखालस** वि. १. स्पष्ट; साफ; निर्भीड; उघड; निश्चित; रोखठोक; सरळ, शुद्ध; निर्भेळ (मनुष्य, वर्तन इ.). २. वेगळा; भिन्न; निराळा; दुसरा; पृथक्. ३. संबंधरहित.

क्रिवि. १. निक्षून; रागलोभ, भीडभाड न धरता. २. पहा : **निखळ** [अर.नि+खालिस]

**निखालसपत्र** न. यजीदपत्र; सोडचिठ्ठी.– मइसा २०.४१९.

**निखिल** वि. सर्व; सगळा; पूर्ण (संख्या, परिमाण). [सं.]

**निखेड** वि. बिनभेसळीचे; मिश्रणाव्यतिरिक्त (धान्य इ.).

**निखोट–ड–डी** वि. १. दोष, न्यून, व्यंग इ.रहित; निर्दोष. २. चोख.

**निखोड** पु. ऐरण ज्या लाकडाच्या ओंड्यामध्ये बसवितात तो ओंडा.– बदलापूर २३१.

**निखोरडा** वि. अनाश्रित; अनाथ; मित्रहीन; द्रव्यहीन.

**निगई, निगड–डी** पहा: **निर्गुंडी**

**निगट(ड)णे** अक्रि. निगडित होणे, असणे; बांधले जाणे: 'करतटीं निकटीं लघु किंकिणी। निगटल्या नटल्या नटदामिणी।'– दावि ९१.

सक्रि. बांधणे; निगडित करणे. [सं.नि+गड्]

**निगड** पु. बेडी; पायातील लोखंडी शृंखला, साखळी: 'निगड करणें दु:खरूप।'– रंयोवा १.८९८. [सं.]

**निगडित** वि. बांधलेले; बद्ध; जखडलेले; संघटित.

**निगता** पहा: **निगुता**: 'शोकाब्धि दूर आहे निगता आलासि बा परिसरा या।'– मोभीष्म ५.२३.

**निगद** पु. १. भाषण; बोल. २. निर्धाराची शपथ. ३. मोठ्याने उच्चारले जाणारे यजुर्मंत्र. [सं.]

**निगद** वि. निरोगी. [सं.नि+गद]

**निगदणे** क्रि. बोलणे; सांगणे; कळवणे: 'जेव्हांपासुनि नारदें निगदिलें मी सर्व सौख्या विटें।'– निगा सुभद्राचंपू ५.४८. [सं.नि+गद्]

**निगदुला** वि. नखरे करीत थोडेसेच खाणारा; चोखंदळ; शिष्टपणे हात आखडून जेवणारा.

**निगम** पु. १. (गूढ व अगम्य मानलेले चारही) वेद. २. परमेश्वर; देव. [सं.नितराम्+गम्, निस्+गम]

**निगम** पु. १. शेवट; निकाल; परिणाम. २. सुटका. [सं. निर्+गम्]

**निगम** न. महानगरपालिका. २. विशिष्ट कारभार करण्यासाठी संघटित संस्था, महामंडळ.

**निगम, निकाय** स्त्री. काही हेतूंनी स्थापन केलेली सामुदायिक संस्था.

**निगमन** न. १. अनुमान; सुरुवातीला केलेल्या विधानाचा तर्कशास्त्रीय पायऱ्या वापरून काढलेला निष्कर्ष. २. न्यायशास्त्राचा एक भाग. [सं.]

**निगमनपद्धती** स्त्री. एखाद्या वर्गाच्या, गटाच्या संबंधी प्रस्थापित झालेल्या नियमावरून घटक वस्तूबद्दल अनुमान काढण्याची पद्धत.

**निगमित करणे** सक्रि. १. (तर्क.) सर्वसाधारण सिद्धांतावरून विशेष सिद्धान्ताचे अनुमान काढणे; विशेषीकरण; (इं.) डिडक्टिव्ह लॉजिक. २. उत्क्रांत होणे.

**निगरगट–टा–ट्ट** वि. १. निर्ढावलेला; कितीही बोलले तरी ज्याच्या मनावर काही परिणाम होत नाही असा; निलाजरा; कोडगा; निर्लज्ज; बेशरम. २. कठोर मनाचा; निर्दय. [सं.निगृ;क. निगरिसु]

**निगरण** पु. १. गिळणे; गट्ट करणे. २. (साहित्य.) एक अलंकार. खरा अर्थ लपवून त्याबद्दल काल्पनिक, लाक्षणिक अर्थ घालणे. [सं.नि+गृ]

**निगराणी** स्त्री. देखरेख; नजर; पाळत; दाब.(ना.) [फा. निग्रान्]

**निगर्वी** वि. ज्याला गर्व, अहंकार नाही तो; निरहंकारी.

**निगळ** न. १. (पाऊस, पाणी) गळू नये म्हणून घरावर नवीन छप्पर घालताना जिची पूजा करावी लागते ती देवता. २. न गळणे. ३. झापड: 'कां डोळेयावरिले निगळे। आळसी तोखे।'– ज्ञा १३.७५७.

**निगळ, निगळता** वि. न गळणारे; ज्यात पाणी, पाऊस गळत नाही असे (घर इ.); जलप्रतिबंधक.

**निगळे** न. घराच्या छपरावरील गवत: 'केतकीदळें निगळें:' – उगी ४८(५)४२७.

**निगा** पु. निघणे; जाणे.

**निगा, निगादास्त–बानी** स्त्री. देखरेख; जपणूक; जतणूक; काळजी. [फा.निगाह्]

**निगामी मार्ग** संकीर्ण कार्याच्या कारणांचे संशोधन करण्याची पद्धती; (इं.) डिडक्टिव मेथड.

**निगाल** न. घोड्याचा अवयव, गंडखोल. घंटाबंधनापासून कंठाचे खाली नऊ अंगुळांवर आणि हृदयापासून वर जें स्थान असतें ते.– अश्वप ८६.

**निगाली** स्त्री. हुक्का पिण्याची नळी. [फा.]

**निगावा** पहा: **निघावा**

**निगाळ** पु. (तंबाखू इ.ची) दुसऱ्यांदा कुटून आणि गाळून काढलेली, तयार केलेली पूड; चूर्ण.

**निगी** स्त्री. निकी; नेटकी: 'अतर्क्य तेथिची रचना निगी पुत्रप्रयोगी करविलें।'– भाराकिष्किंधा २.७५.

**निगुत–ता–ती** क्रिवि. १. नुकतेच; अलीकडे; लवकर; आताच: 'तुज सांगीतली निगुती।'– विउ ७.१०५. २. यथार्थ; व्यवस्थित; निभ्रांत; स्पष्ट: 'शिंपी म्हणती नामयातें। प्रत्यक्ष बोलती निगुतें।'– भवि १४.२५. ३. लक्षपूर्वक; दक्षतेने; ध्यान देऊन: 'ईश्वर म्हणे पार्वती। ऐकावी निगुती।'– भबो ३७. ४. नेटाने, निश्चयाने; पुन:पुन:; वरचेवर: 'तोंवरी अभ्यास निगुती।– परमा ९.३४. ५. (क्व.) निश्चयाने; नीटपणे; खचित; नि:संदेह; खात्रीने : 'ऐसें बोलोनि निगुती।'– गुच १५.३२.

**निगुती** स्त्री. काळजीने ठेवणे, वागवणे; उपयोग करणे; लक्ष देणे; काळजी; दक्षता; यथार्थपणा; सावधानता; संरक्षणाची योग्य तजवीज; रीती; युक्ती: 'ऐसी निगुती करोनि। आली एकादशी दिनीं।– गुच ३५.५३. (क्व.) निगूत.

**निगुरा–ऱ्या** वि. १. गुरुहीन; ज्याने गुरू केला नाही तो. २. पोरका; अनाश्रित; अनाथ.

**निगूढ** वि. गुप्त; अतिशय गूढ. [सं.नि+गुह्]

**निगूत** क्रिवि. पहा : **निगुत १**

वि. १. नीट; दुरुस्त; सरळ. (गो.) २. समूळ; बरोबर. (को.)

**निगूत** स्त्री. १. शहाणपणा; कुशलता; हातोटी; खुबी; हिकमत; योजना.

२. काळजी; लक्ष; देखरेख; काळजीने ठेवणे, सांभाळणे. [सं.नि+युज्]

**निगोड** वि. कमी गोड; फिके; आवश्यकतेहून कमी गोड.

**निगोरच्या** पु. लगोऱ्या; एक प्रकारचा खेळ.

**निगोळी** स्त्री. १. पागोळी; वळचण. २. पागोळ्यांतून पाऊस गळणे; वळचण गळणे. [सं.नि+गल्]

**निग्रम** पु. निरवानिरव करणे; व्यवस्थित ठेवणे. (कु.)

**निग्रह** पु. १. संयमन; प्रतिरोध; दमन; अटकाव; दडपण; दाब. २. निश्चय; दृढता; आग्रह; पक्केपणा. ३. ताब्यात घेणे; पकडणे; धरणे; बंदीत टाकणे. ४. नियम. [सं.]

**निग्रह** पु. जातीबाहेर, वाळीत टाकणे; निष्कासन. [सं.]

**निग्रहस्थान** न. (न्याय.) चर्चेत, वादात उत्पन्न होत जाणाऱ्या दोषांपैकी एक दोष. [सं.]

**निग्रही** वि. निश्चयी; दृढ; आग्रही; करारी; हट्टी.

**निघड** वि. क्रिवि. लागोपाठ; अनुक्रमाने; एका पाठीमागे एक; मध्ये जागा सुटल्याशिवाय (बैल अथवा पायरहाटाच्या माळेला बांधलेले लोटे). (को.) [सं.नि+म.घट]

**निघणे** उक्रि. १. बाहेर पडणे; आतून बाहेर जाणे. २. वेगळे, निराळे होणे. ३. उत्पन्न होणे; उद्भवणे; निपजणे; उगवणे. ४. वृद्धिंगत होणे; वर येणे; शेवटी दिसणे; आढळणे. ५. उमगणे; घडून येणे; घडणे. ६. जोराने धावणे; बाहेर येणे (घोडा इ.). ७. उत्पन्न होणे; दिसू लागणे; उमटणे. ८. नाहीसे, कमी, बडतर्फ होणे; ओसरणे. ९. (अकर्तृक क्रि.) ओकले जाणे. १०. (दुसऱ्या क्रि.शी जोडले असता) लागणे; झडणे; सुरुवात, आरंभ करणे. [सं.निर्गम] (वा.) **निघते घेणे**– अंग, पाय काढणे; माघार घेणे.

**निघता** वि. सरस; उजवा.

**निघळ** स्त्री. पु. जात्याच्या आतल्या खुंट्याभोवती चिकटून राहणारा घास.

**निघळणे** उक्रि. जात्याच्या तोंडातून धान्याचा घास बाहेर येणे, काढणे. सक्रि. जात्यावर दळताना सर्व दळण झाल्यावर आत राहिलेले सर्व धान्य स्वच्छ झाडणे.

**निघंट–टु** पु. १. वैदिक शब्दकोश. २. (सामा.) शब्दकोश. ३. वैद्यकीय कोश. [सं.निर्+ग्रंथ्]

**निघाते** क्रिवि. १. संघाताने; एकाच वेळी बरेचसे. २. अचूक; लक्षपूर्वक: 'अदृश्य होऊनी असंख्यात बाण । मारी निघातें ।'– मुवन १२.१४८. [सं. निघात]

**निघावा** पु. १. बाहेर, प्रवासाला निघणे. २. निघण्याची तयारी.

**निघोट** वि. १. संपूर्ण; परिपूर्ण. २.दाट; धोपट; सरळ; एकवट. ३. अतिशय स्पष्ट.

**निघोर–री** वि. निर्भय; निर्धास्त; निश्चित; कुतर्क, संशय इ.नसलेला. [सं.नि+घोर]

**निच** क्रिवि. नित्य; नेहमी; सदोदित: 'निच तुवां येकलेंचि यावें ।'– पंचतंत्र. [सं.नित्य]

**निचकणे** सक्रि. हिसक्याने स्थानापासून वेगळे करणे; हलवणे; बाजूला सारणे; कचकावणे; लाथेने मनुष्याचा अवयव तत्काळ वाकवणे. (को.) अक्रि. १. झरणे; पाझरणे; द्रवणे. २. लचकणे.

**निचकोडा** पु. (अंगाला हाताने घेतलेला) चिमटा. (व.)

**निच(श्च)क्र** न. कडकडीत उपास.

**निचय** वि. बेचव; पाण्याचे प्रमाण जास्त झाल्याने बेचव झालेले.

**निचरणी** स्त्री. गळणे; झरणे; रस, चीक बाहेर टाकणे; घाम येणे.

**निचरणे** अक्रि. पाझरणे; गळणे; गळू इ.तील घाण, पोटातील मलांश, पदार्थातील जलांश पातळ होऊन बाहेर पडणे. [सं.निस्+चर्]

**निचरा** पु. १. पहा: **निचरणी**. २. पाझरून जाणारा पदार्थ.

**निचल–ल** वि. १. अचल; निश्चल. २. ब्रह्मचारी. (गो.) ३. स्वच्छ. क्रिवि. स्तब्धतेने; शांत रीतीने. [सं.नि+चल्]

**निचव** वि. बेचव; रुचिहीन; फिक्का; शुष्क.

**निचं(चिं)ती** स्त्री. सवड; अवधी. (व.)

**निचंत्या** वि. आळशी; निष्काळजीचा.

**निचाड–डा** वि. १. दांडगा; उद्धट; बेमुर्वत; अविनय. २. निरिच्छ; निष्काम. ३. निर्लज्ज; निगरगट्ट. ४. आवड, रुची, चव नसलेला. 'गुळासारखा गूळ दगड। परी तो कठिण निचाड।'– दास ८.५.४७.

**निचाडणे** बेपर्वाईने वागणे.

**निचावणे** अक्रि. खचणे; दबणे; खाली जाणे; बसणे; मोडकळीला येणे (इमारत, खांब इ.). [सं.नीच]

**निचिति** स्त्री. अखेर; शेवट.

**निचूळ** पु. फणसाचे झाड, फळ. (कु.) [सं.निचुल]

**निचेष्ट** वि. चेतना, वेदनाविरहित; निद्रा, मूर्च्छा इ.मुळे देहभानावर नसलेला; बेशुद्ध. [सं.निश्चेष्ट]

**निज** वि. १.स्वतःचे; स्वकीय; आत्मीय. २. आत्म्यासंबंधीचे. [सं.]

**निजगळ** वि. झोपाळू. (ना.)

**निजग्रही** स्त्री. नर्तकीप्रकार: 'कलावंत, धाडी, गवई, निजग्रही यांचें नित्य नृत्य गायन... करू नयें.'– बावडादप्तर १.९७.

**निजणे** अक्रि. १. झोप घेणे; झोपणे. २. आडवे होणे; कलणे; लोळणे. ३. आजारी पडणे; अंथरुणाला खिळणे. ४. (ल.) मरणे. ५. नाश पावणे; बुडणे; नाहीसा होणे (धंद्यातील भांडवल, धंदा, व्यापार इ.). ६. भरभराटीला न येणे (दैव); मंद चालणे (कामधंदा); नाहीसा होणे (हुकमत, अधिकार); बेचिराख, उजाड होणे (घर, गाव). ७. संभोग करणे. [सं.निद्रा] (वा.) **निजल्या जागी विकणे**– कारवाईने आपले काम साधणे.

**निजण्याबसण्याजोगी** वि. (बायकी) वयात आलेली, घरकाम करायला योग्य झालेली (स्त्री).

**निजतीक्रिया** स्त्री. प्रेत निजल्या स्थितीत पुरणे.– बदलापूर १७२.

**निजधाम** न. १. स्वतःचे घर, निवास स्थान. २.आत्मस्वरूप. [सं.] (वा.) **निजधामाला जाणे**– मरणे; दिवंगत होणे.

**निजध्यास** पु. एकाग्रता; सतत चिंतन. [सं. निदिध्यास]

**निजनाड** पु. घात.

**निजपव्हे** स्त्री. पाणपोई.

**निजबोध** पु. आत्मज्ञान. [सं.]

**निजरूप** न. १. स्वत:चे रूप. २. स्वरूप; चिन्मयकला; शिवात्मा.
**निजलोट** पु. प्रत्यक्ष लाट; जलकल्लोळ.
**निजवस्तु** स्त्री. ब्रह्म.
**निज(जा)वा** पु. (धार काढताना गाय लाथ मारते म्हणून) गाईच्या मागील दोन्ही पायांना दोर बांधणे. (व.)
**निजसाधन** न. १. आत्म्याचे ज्ञान मिळवणे. २. स्वत:चे हित पाहणे.
**निजसार** पु. मुख्य उद्देश; तात्पर्य: 'एऱ्हवीं या लक्षणांचिया निजसारा। मी अपाडे कीर अपुरा।'- ज्ञा ६.१४०.
**निजसुरा** वि. अर्धवट झोपलेला: 'जेणें देहात्मवादी निजसुरा।'- यथादी १.३८२.
**निजा** पु. दोषासंबंधीचा निर्णय.
**निजानीज** स्त्री. सर्व लोकांनी निजणे; शांतता; सामसूम.
**निजाम** पु. १. अंदाज. २. व्यवस्थापक. [अर.]
**निजामत** स्त्री. प्रांत; जिल्हा. [अर.]
**निजेला** वि. झोपलेला: 'त्यांतील एक कलहंस तटीं निजेला।'- र ९.
**निजोखमी** वि. जोखीम, धोका नसलेला.
**निजोर-री** वि. १. दुर्बळ; अशक्त. २. आश्रय, पाठिंबा नसलेला. ३. (बुद्धिबळ) जोर, आधार नसलेले (मोहरे). ४. जोर असला तरी तो न मानता मोहरी वगैरे मारून खेळण्याचा (डाव); मारामारीचा (डाव).
**निझरणे** अक्रि. १. पाझरणे; झुळझुळ वाहणे. २. ओलावा सुटणे; घाम येणे; झिरपून जाणे. [सं.नि+क्षर्]
**निझरवणी** न. झऱ्यातील, पाझरणारे पाणी.
**निझाड** वि. ओसाड; वैराण; उजाड; झाडे नसलेली (जमीन): 'वन झालिया निझाडी मग उचलिल्या प्रचंड धाण्डी।'- मुवन १०.१८.
**निझाडा** पु. १. तुटवडा; पूर्ण अभाव. २. स्पष्ट, साफ नकार. (क्रि. देणे).
**निझूर** वि. नापीक (जमीन): 'तशी निझूर शेताले काय सांगे बरसात.'- बगा. [सं.निजर्जरित]
**निटली** स्त्री. पायातील एक दागिना: 'अनवट निटल्याही जोड त्या जोडव्यांचा।'- सारुह ६.३१.
**निटवल** वि. निवडक; उत्तम प्रतीचे.
**निटवंगी** स्त्री. १. अतिशय थकणे; फार दमणे. (चि.) २. मर्गळ; रोगादिकांनी जर्जर होणे. ३. डोळ्यांत फार झोप येऊन पेंगणे; सुस्ती.
**नि(नी)टस** वि. नीटनेटका; बांधेसूद; आकारबद्ध; सरळ, रेखीव (मनुष्य, वस्तू).
**निटाई-ओ** स्त्री. पहा : **निटावा** १ : 'निटाओ स्थूळ शरीराचा।'- गीता २.१८५६. [क.नेट]
**निटारिणे** सक्रि. निवटणे; नीट बांधणे; निडारणे: 'रेइलिया हाडांची मोळी।... निटारिजे।'- ज्ञाप्र ७५२. [सं.निट्]
**निटावणी** स्त्री. बरोबर, सरळ, दुरुस्त करणे.
**निटावणे** अक्रि. १. वेडेवाकडे असलेले ठीक, नीट, चांगले, योग्य करणे. २. झटून पडणे; दुसऱ्याची अपेक्षा न धरता नेटाने पुढे जाणे. ३. सरळ, पुढे जाणे. ४. वर जाणे; पुढे चालणे: 'निटावले वीर यूथपति। मुखें गर्जती रामनाम।'- जैअ ७४.९७. ५. सुधारणा करणे; पुढे पाऊल पडणे; कुशल, तरबेज होणे.
**निटावा, निटोपा** पु. १. सरळपणा. २. (ल.) बिनचूकपणा; योग्यपणा. ३. नेटावा; टेकू; आधार; नेट; पाठिंबा. (क्रि. देणे).
**निटाळा** पु. अतिशय कडक उन्हाळा. (कु.)
वि. कडक उन्हाळ्यातील.
**निटिल** न. कपाळ. [सं.]
**निटूला** पु. गुरांचा रतीब. (झाडी)
**निटोप्याची वाट** जवळची वाट.
**निठवे** न. अच्छेराचे माप. (को.)
**निठूळ** वि. धिमा; मंद, शांत; टणक; घट्ट.
**निठे** न. पावशेराचे माप. (अहि.)
**निडकणे** सक्रि. पिकून पुष्कळ दिवस होणे. (कु.)
**निडर** वि. निर्भय.
**निड(ढ-ढा)ळ-ल** न. कपाळ; ललाट: 'कांठमोरा त्याचे निडळीं रुतला।'- पंच ४.१.
वि. दुर्दैवी; निराधार: 'मी पांगुळ परदेसी। निढळ पडलों एकला।'- भावि १६.५१. [सं.निटिल]
**निडाकी-गी** वि. डाक-ग न दिलेले (भांडे, दागिना इ.).
**निडार** वि. निवडक.
न. १. कपाळ. २. (ल.) दृष्टी: 'तेणें तसें नगर तें धरितां निडारीं।'- र २०. ३. पक्वदशा. ४. बहर: 'चांदिणेयाचा निडारू।'- रुस्व ५१२.
**निडा(ढा)रणे** सक्रि. १. परिपक्व होणे; भरपूर पीक येणे; कोंब निघणे: 'तिफणी वेगळा दाणा निडारला निघेल।'- स्वानुदिन १०.१.६०. २. थक्क होणे. ३. पाण्याने डबडबणे: 'इतुकें बोलेना तव प्रेमाश्रु उत्तंबलोनि नयन। निढारली दृष्टि।'- स्वादि ६.२.१८.[सं.निस्+धृ]
**निडी-डे** क्रिवि. समीप; जवळ: 'जेवि निडी गिवीसु आलें। जननिएंते।'- ऋ ६२. [सं.निकट]
**निढवा** पु. निळवा नावाचा उसाचा प्रकार.
**निढळ** न. कपाळ; डोके. [सं.निटिल]
**निढळणे** सक्रि. पडणे; मोडणे; अडखळणे; सरकणे; कोसळणे.
**निढळवाणी** वि. निराश्रित.- कथासारा १.१५७.
**निढळीचे अक्षर, निढळीचा लेख** ललाटरेषा; ब्रह्मलिखित; ब्रह्मदेव प्रत्येक माणसाच्या कपाळावर त्याच्या आयुष्यात घडणाऱ्या गोष्टी लिहितो अशी समजूत आहे.
**निढाळ-ळी** स्त्री. ढाळ नसण्याची स्थिती.
**निढाळ** वि. ढाळ, उतार नसलेले; अगदी कमी ढाळ असलेले.
क्रिवि. केवळ: 'तेथ चांचल्य निखळ। एकलें ठेलें निढाळ।'- ज्ञा १३.१०८.
**निणगा** पु. भाताची एक जात.
**निणीणे** सक्रि. नेणे. [सं.नि+नी]
**नित** वि. क्रिवि. नित्य; नेहमी; दररोज: 'सवाई माधवराव पेशवे नित मुजरा घेती।'- विज्ञावि. [सं.नित्य]
**नितकारी** पु. एक पिशाच्चदेवता. (कु.)

**नितकोर** पु. भाकरी, पोळी वगैरेचा आठवा भाग; चतकोरचा अर्धा.
**नितण** न. भूमापनाचे एक प्रमाण, परिमाण.
**नितणा** वि. बाईलवेडा.
**नित(थ)रणे** सक्रि. पहा : **निचरणे** [सं.नि+तल]
**नितळ** वि. १. स्वच्छ; शुद्ध; गाळ इ. नसलेले (तेल, पाणी). २. गुळगुळीत, चकचकीत; तेजस्वी; सफाईदार. [सं.नि+तल]
**नितळ** न. सप्तपाताळांपैकी एक; वितल. [सं.नितल]
**नितळणा** पु. सोनाराचे जिल्हई देण्याचे हत्यार.
**नितळणे** अक्रि. स्वच्छ आणि चकचकीत, तेजस्वी होणे (चेहरा, डोळे); (पीक, झाड- झुडूप) टवटवीत दिसणे; नाहीसे होणे (ढग, धुके); निवळणे; बरोबर, योग्य, चांगले होणे; झिरपणे.
सक्रि. घासून साफ, चकचकीत करणे.
**नितळा** पु. साका; एखादा पदार्थ वाहून गेल्यानंतर त्याचा खाली राहिलेला अंश. [सं.नि+तल]
**नितळाई** स्त्री. १. चकाकी; जिल्हई; चकचकीतपणा. २. स्वच्छता (द्रवपदार्थांची); पारदर्शकपणा.
**नितळ्येल** न. वडे तळल्यावर कढईत राहिलेले तेल. (राजा.)
**नितंक** वि. निश्चिंत: 'तुं वैरी वनवारण काळडंकुः... निन्हां नितंकु।'- मूप्र २६०४.
**नितंब** पु. अव. १.कुल्ले; ढुंगण; (विशेषत: स्त्रियांचा) कटिभाग, कमरेच्या खालचा मागचा भाग. २.खालचा भाग. ३. (ल.) पाताळ लोक. [सं.]
**नितात** स्त्री. वानवा; पंचाईत; उणीव. (अहि.)
**नितात** पु. हौस; इच्छा; आवड.
**नितातने** क्रि. कंटाळणे. (व.)
**नितातेल** वि. हौशी; उत्सुक: 'अशी कशी नितातेल तिले गन गाती रोज.'- ब १८४.
**नितान** स्त्री. मातीचे तबक; एक प्रकारचे भांडे.
**नितांत** वि. अत्यंत; फार; पुष्कळ.
क्रिवि. अधिकपणे; अतिशयपणे. [सं.]
**नितांत** पु. उत्कंठा; अधीरता; उतावळी. (क्रि. पडणे, होणे.). (वा.)० **पडणे** - बेशुद्ध होणे.
**नितांत(द)णे** सक्रि. उतावीळ, अधीर, उत्सुक होणे; उत्कट, प्रबळ इच्छा करणे; हपापणे; वेड घेणे; हव्यास घेणे; व्याकूळ, ग्रस्त होणे (तहान, भूक, झोप इ.नी).
**नितेजणे** सक्रि. धाक दाखवणे; रागे भरणे: 'मग लुसिफरातें नितेजुनु। बोलता जाहाला।'- ख्रिपु १.२.९७. [सं.नि+तर्ज्]
**नितोड** वि. बिनतोड.
**नित्य** वि. १. कायम टिकणारा; शाश्वत; नेहमीचा. २. नियमित, सतत घडणारा. [सं.] (वा.) **नित्याखाली पडणे, येणे**- नेहमीच्या सवयीत, अभ्यासात, परिपाठात राहणे.
क्रिवि. सतत; नेहमी; सदा; प्रतिदिवशी.
**नित्यकर्म-विधी** न. संध्यावंदनादी ब्राह्मणाची रोजची कर्तव्ये; रोजचा ठरावीक कामधंदा.
**नित्यता-त्व** स्त्री. न. निरंतरपणा; कायमपणा.
**नित्य नवा, नूतन** वि. १. रोजचा नवा; कोरा करकरीत; रोजच्या रोज काही सांगितले असता विसरणारा. २. ताजा; सदैव नवा.
**नित्य नियम, नेम** १. नियमाने नित्य करण्याचा परिपाठ. २. शास्त्रात अमुक कर्म नित्य करावे असे सांगितले नाही परंतु नित्य केले तर विशेष पुण्यकारक म्हणून सांगितले आहे अशी कर्मे.
**नित्य नैमित्तिक** वि. नेहमी आवश्यक म्हणून करण्याचे किंवा प्रसंगविशेषाने उपस्थित झालेले (धार्मिक कृत्य, एखादे काम इ.).
**नित्यप्रलय** पु. १. प्रत्येक वस्तूचा दर क्षणी होणारा नाश. २. चार युगे हजार वेळा गेल्यावर ब्रह्मांडातले सगळे व्यापार बंद होण्याची स्थिती.
**नित्यभ्रम** पु. 'अमका मनुष्य माझा घात करू पाहात आहे.' इ. प्रमाणे अनेक भ्रमांनी मनुष्याचे मन घेरले जाण्याची विकृती; (इं.) पॅरानॉइया.
**नित्यमुक्त** वि. सर्व व्यापांपासून मुक्त (ईश्वर); जीवन्मुक्त (माणूस).
**नित्यश:** क्रिवि. नेहमी; सदैव; सदोदित; सतत. [सं.]
**नित्यसमीकरण** न. (गणित) चलाच्या कोणत्याही किमतीने सोडवता येणारे समीकरण.
**नित्यानित्यवस्तुविवेक** पु. कोणती वस्तू शाश्वत व कोणती अशाश्वत याविषयीचा विचार; मोक्षाच्या साधनचतुष्टयापैकी पहिले साधन.
**नित्यावळ** स्त्री. १. रोज जेवणाऱ्या ब्राह्मणांची पंगत. २. दररोज जेवायला येण्यासाठी एकदाच दिलेले आमंत्रण. (क्रि. करणे, घालणे.) : 'सेवक बोलती कर जोडून। नित्यावळीचा ब्राह्मण।'- रावि २७.२९.
**नित्रस** क्रिवि. त्रासाशिवाय; उपद्रव, कटकट न होता. [सं.नि+त्रास]
**निथणणे** अक्रि. रागामुळे, श्रमामुळे दात खात, शिरा ताणून बोलणे. (राजा.)
**निथणे** न. पाझरणे: 'तैसे सुख आंतौनि निथणे.'- अमृ २५४.
**निथम** स्त्री. पोटात आमांश झाला असताना शौचाच्या वेळी इंद्रिय ताणले जाईल अशी होणारी अवस्था. (राजा.)
**निथळ-ळा** पु. १. निचरा; निथळलेल्या, निथळत ठेवलेल्या पदार्थातील द्रवांश निथळून साठलेला जलांश. २. भुरभुर पडणारा पाऊस.
**निथळ(र)णे** उक्रि. थेंब-थेंब गळणे, पडणे; ठिबकणे; गाळणे.
**निथू** पु. थुंकी; लाळ. (गो.)
**निद** स्त्री. झोप. (गो.) [सं.निद्रा]
**निदणे** अक्रि. झोप घेणे; निजणे. [सं.निद्रा]
**निदर्दी** वि. १. निष्ठुर; निर्दय. २. बेफिकीर; निष्काळजी. [सं.नि+फा.दर्द]
**निदर्शन** न. १. पाहणे; दाखवणे; नजर. २. (ल.) अनुभव; दाखला; दृष्टान्त; उदाहरण. ३. प्रसिद्धपणे दर्शन; मिरवणूक; पताका, घोषणा इ.प्रकारे मतप्रदर्शन. विशेषत: विरुद्ध प्रसिद्धीकरण; निषेधप्रदर्शन. [सं.]
**निदर्शना** पु. एक अलंकार. यात सारख्या अर्थाच्या दोनही वाक्यांचा अभेद सांगितलेला असतो.
**निदर्शनी** क्रिवि. अनुभवाने; परिणामी; परीक्षेनंतर; शेवटी. (क्रि. कळणे, समजणे).
**निदसुरा, निदसुरिया** वि. १. अर्धवट झोपेतला: 'जो परमात्माचि परि दुसरा। जे अहंकार निद्रा निदसुरा।'- ज्ञा ८.३५. २. खोटे; मायिक: 'सर्व सिद्धांताचिया उजारिया। सांडूनियां निदसुरिया।'- अमृ ५.३९.

**निदसुरे** न. अज्ञान: 'म्हणौनि अज्ञान अक्षरें। नुमसूं आतां निदसुरें।'– अमृ ७.८५.

**निदळ** वि. बिनगिलाव्याची; उघडी: 'निर्मळजळें भिंती धुतां।... भिंतीही तत्त्वतां निदळ केली।'– एभा ३.२४३. [सं.नि+दल]

**निदाकणी** स्त्री. घोड्याचा एक रोग. यात घोड्याला तहान, झोप नसते; रोडपणा येतो.– अश्वप २.१७२.

**निदाघ** पु. १. उष्ण काळ. २. उष्णता; दाह: 'जेणें स्वप्रकाशा कांती चढे। ब्रह्मानंदाचा निदाघु मोडे।'– ज्ञा ११.२२४. ३. (ल.) चिंता; काळजी. वि. निरर्थक. [सं.]

**निदाती** वि. दाते नसलेली (फणी, चाक इ.).

**निदान** न. १. मूळ, बीजभूत, प्रारंभीचे, आधीचे कारण. २. परिणाम; अखेर; शेवटची स्थिती; अवस्था; निरुपाय; नाइलाज; निर्वाण. ३. अगदी वरचे किंवा खालचे टोक, स्थिती; जास्तीत जास्त, कमीत कमी (रक्कम इ.). ४. रोगपरीक्षा; रोग अचूक ओळखण्याचे ज्ञान. ५. शेवट; समाप्ती; मरण: 'पै नित्य सेविला मी निदानीं। सेवकु होय।'– ज्ञा ८.१२३. [सं.](वा.) ० **करणे** – जिवावर उदार होणे; निर्वाण करणे.

क्रिवि. सरतेशेवटी; अधिकात अधिक, कमीत कमी (किंमत, अटी इ.); किमान पक्षी.

**निदानचा** वि. अडचणीच्या वेळेसाठी राखून ठेवलेला; ऐनवेळी उपयोगी पडणारा: 'नातरी असाध्य देखोनि व्याधी।... वैद्य सूचि निरवधि। निदानींची।'– ज्ञा २.८६.

**निदानमत** न. शेवटचे मत, इच्छा, मागणी (खरेदीविक्रीच्या व्यवहारात); कमीत कमी सांगितलेली किंमत, सवाल.

**निदानरेषा** स्त्री. हुतुतूच्या खेळातील मुख्य पाणरेषेच्या दोन्ही बाजूंना ५० फुटांवर काढलेल्या रेषा. [सं.]

**निदान वृद्धी** अतिशय जबर व्याज.

**निदारपण** न. दरिद्रीपण; कृपणपणा: 'मायबापांदावी। निदारपण।'– ज्ञा १३.७९५. [सं.नि+ऋ]

**निदारुण** वि. अतिभयंकर; घनघोर; जंगली; रानटी. पहा: **दारुण**

क्रिवि. निक्षून; धडधडीत; रोखठोक; स्पष्टपणे; उघडउघड .

**निदावा** पु. एखाद्याचा ताबा, हक्क, स्वामित्वसंबंध तोडणे; नाहीसे करणे; हक्काची फारकत.

**निदावा–ळू** पु. झोपाळूपणा; एकसारखे झोपण्याचा स्वभाव.(गो.)

**निदाळुपण** न. उपेक्षा; दुर्लक्ष: 'ऐसे काइसे निदाळुपण:'– शिव १७९.

**निदिध्यास** पु. १. एकाग्र चिंतन; निजध्यास; पुन:पुन: केलेला खोल विचार. २. एखाद्या गोष्टीचा सारखा छंद, नाद. (क्रि. धरणे). [सं.]

**निदुधी** वि. दूध न देणारी किंवा कमी देणारी (गाय इ.).

**निदेजणे** क्रि. निंदा करणे.– चांगदेव पासष्टी ६५.

**निदेश** पु. १. निर्देश; आज्ञा; शासन; हुकूम. २. दाखवणे; समजून देणे. ३. धडा; शिकवण: '(मुनी) हरीपदींच लोळती। निदेश चित्त घोळती।'– अकक २ मंधारा १९. [सं.]

**निदेशक** पु. दिशा दाखवणारा; समजून देणारा; (इं.) इन्स्ट्रक्टर.

**निदेशणे** उक्रि. १. आज्ञा, हुकूम करणे. २. दिशा दाखवणे.[सं.नि+दिश्]

**निदैव** न. दुर्दैव; कमनशीब; दुर्भाग्यता: 'कां निदैवाच्या घरीं। न राहे लक्ष्मी।'– ज्ञा ३.१०९. [सं.]

**निद्रा** स्त्री. झोप; नीज. [सं.]

**निद्राड** वि. झोपाळू.

**निद्रानाश** पु. काही काळासाठी झोपच न लागण्याचा विकार.

**निद्रित–स्त** वि. झोपलेला; झोपी गेलेला. [सं.]

**निध** पु. भांडार; पहा : **निधान, निधी**: 'हातीं लागला वो युगादिचा निध।'– निगा ८१. [सं.निधि]

**निधड–डा** वि. १. आत्मविश्वासी; निर्भय; धाडसी; धीट. २. शूर; पराक्रमी. ३. समर्थ; निपुण; लायक; योग्य. ४. नि:शंक: 'जयाचेनि वाक्य उजिवडे। जाहलें चित्त निधडें।'– ज्ञा ४.१६९. [सं.निधृष्ट]

**निधडक** क्रिवि. निर्भयपणे; बेधडक; बेलाशक.

**निधडा** पु. १. मनाची खात्री; निश्चय; भरवसा; नि:संदिग्धता: 'त्यानें जिवाचा निधडा करून शिपायगिरी म्हणावी तैशी केली.'– भाब ११७. २. निश्चितपणा; खात्री; ठामपणा; अगदी नक्की असणे. ३. सक्त नकार; नाकबुली. (क्रि. सांगणे, देणे.).

**निधड्या छातीचा** वि.न डगमगणारा; धाडसी; मोठा पराक्रमी.

**निधणी** स्त्री. बेणणी. पहा: **निंदणी**

**निधणे** पहा: **निंदणे**

**निधणे** उक्रि. उन्हात किंवा विस्तवाने तापवणे, तापणे. [सं.नि+दह्]

**निधन** न. १. मरण; मृत्यू. २. कत्तल; नाश; नाहीसे होणे. [सं.]

**निधनी** वि. १. दरिद्री; निर्धन. २. मालक, धनी नसलेला.

**निधय** पहा: **निधाई**

**निधा** पु. १. धग; आहळी (विस्तवाची, तापवलेल्या वस्तूची): 'धायें केली रांगोळी। निधा पाताळीं उमटला।'– एरुस्व १०.७०. २. धगीची, उष्णतेची जाणीव; आच; शेक. ३. पुष्कळ ओझे वाहून नेल्यामुळे किंवा एकाच अवस्थेत पुष्कळ काळ राहिल्यामुळे येणारा सुन्नपणा. (क्रि. येणे, उमटणे, भिनणे.). ४. शेतजमिनीचा वाफसा, वाफा. ५. त्रास.– शर. [सं.नि+दाह]

**निधा** पु. १. भोवऱ्याचे एकाच जागी गरगर फिरणे. (क्रि. धरणे). २.प्रतिध्वनी. – शर. [सं.नि+धाव्]

**निधाई–य** स्त्री. १. आरडाओरड; गडबड; गोंगाट; गोंधळ; मोठा खटाटोप; बडेजाव; देखावा; भपका; अवडंबर. २. (ल.) (निंदार्थी) मोठी कीर्ती, धन इ. मिळवणे; दिग्विजय करणे.( क्रि. लागणे, पडणे.) वि. धन्य; कृतकृत्य: 'जालों निधाईं निधानें। लागलें अनंतगुणरत्न।'– तुगा ४१०६. [सं.नि+धा]

**निधानी** स्त्री. वस्तू (पुस्तके, भांडी इ.) ठेवण्यासाठी लाकूड वा धातूची चौकोनी रचना; (इं.) स्टँड.

**निधारती** पहा: **निधाई** २ [सं.नि+धृ]

**निधावणे** अक्रि. १. गुंगणे; झोपी गेल्यासारखा असणे (भोवरा). २. (ल.) गंभीर विचारात मग्न, तल्लीन, गर्क असणे.

**निधी, निधान** पु. न. १. कुबेराचा खजिना. हे नऊ आहेत. २. (सामा.)

ठेवा; साठा; संग्रह; भांडार. ३. खाण; खनि. ४. पुरलेले, गुप्त धन; ठेवा. ५. पात्र; आधार; आश्रयस्थान; ठिकाण. [सं.]

**निधी** स्त्री. १. स्वत:भोवती अतिशय वेगाने भ्रमण, फिरणे: 'पैं भिंगोरी निधिये पडली। ते गमे भूमीसी जैसी जडली।'– ज्ञा १५.१३६. २. स्तब्धता. [सं.नि+धाव्]

**निधोट** वि. १. अतिशय शुद्ध, पवित्र, स्वच्छ; धुतला तांदूळ. २.(ल.) अतिशय दरिद्री; अनाथ; निष्कांचन. [सं.निर्धूत]

**निधोनपद्धती** स्त्री. एक रासायनिक संशोधन-पद्धती. ही पुणे येथील रानडे आर्थिक संशोधन संस्थेतील रा. लिमये यांनी शोधून काढली.

**निन(नि)णे** सक्रि. आणणे; निर्मिणे; काढणे: 'तुर्क कोणी निनीले.'– वि ४. [सं.नी]

**निनंगत** क्रिवि. दूर; बाजूला; वेगळा; निराळा; एकीकडे.

**निनाद** पु. १. मोठा नाद, आवाज. २. पडसाद; प्रतिध्वनी. [सं.]

**निनाल** स्त्री. वक्रनलिका; (इं.) सायफन.

**निनाव** पु. नारळाचे दूध, डाळीचे रवाळ पीठ, साजूक तूप आणि गूळ यांपासून हरितालिकेच्या आदल्या दिवशी केला जाणारा गोड पदार्थ.

**निनावा** पु. निर्दोषत्वाची खात्री, निर्वाळा. (को.)

**निनावा–वी–व्या** वि. बिन नावाचा, नावाचे.

**निन्हव** पु. १. लपवणे; गुप्त ठेवणे: 'तेराव्या वर्षीं तर ज्यास क्लीब वेष धारण करून स्ववीर्याचा निन्हव करणें भाग पाडलें...'– नि ८७४. २. यज्ञातील विधी; नमस्काराचा एक प्रकार. [सं.नि+न्हु]

**निपचि(चे)त–प** क्रिवि. दमल्यामुळे चेतनारहित होऊन पडलेला; निचेष्ट. [सं.निश्चेतन]

**निपज** पु. १. उपज; उत्पादन; फळ; प्राप्ती; पैदास; निघालेला माल. २. नफा; मिळकत.

**निपजणे** अक्रि. १. उत्पन्न, पैदा होणे; उपजणे; जन्मणे; निघणे; उद्भवणे. २. निघणे; होणे; बनणे; दृष्टोत्पत्तीला येणे: 'आतां शिष्यांचे परीक्षण। निपजेल।'– विपू १.५१. [सं.निर्+पद्]

**निपट** वि. क्रिवि. १. अतिशय; पराकाष्ठेचा; पूर्णपणे; सर्वथा; निखालस; सर्वस्वी: 'जरि निपट दरिद्री जो न लाहेचि कांजी।'– वामन रुक्मिणीविलास ७९. २. अगदी; बरोबर; थेट; बिलकूल; खरोखर: 'परी निपट निघेना त्या पुढें बोल कांहीं।'– सारुह ५.३९. [सं.नि:स्पष्ट-निप्पट-निपट-भाअ १८३४. निपत्; हिं.]

**निपटणा–णे** वि. क्रिवि. १. निव्वळ; बरोबर; नेमका; योग्य; केवळ. २. नि:शेष; पूर्णपणे; सर्वथा: 'जें मौनाचेही निपटणें। पिऊनि गेले।'– अमृ ५.५३.

**निपटणी** स्त्री. १. खरडणे; घासून, पुसून काढणे, धुणे. २. आटपणे; संपवणे.

**निपटणे** सक्रि. १. खरडून काढणे; (हाताने, बोटांनी द्रवपदार्थ) पुसणे; धुणे; घासणे; जमिनीवरून ओलसर किंवा पातळ पदार्थ पूर्णपणे निघेल असा हाताने काढणे. २. उपहास करून गप्प बसवणे; निरुत्तर करणे. ३. शिल्लक राहिलेले काम उरकणे, आटोपणे; समाप्त करणे, संपवणे. ४. (ल.) कमी होणे; उतार पडणे; निघून जाणे (ताप, आजार). ५. पुसणे; स्वच्छ करणे. ६. नाहीसे करणे; झाडणे: 'आतां निपटुनि राज्यस्त्रीजीवित पुत्रकामना सोडा।'– मोभीष्म ९.१३.[हिं.निपटना]

**निपटणे** न. शेवटचे मूल: 'मातेसि आवडे निपटणें। तेवीं उद्धव वृद्धपणीचें तान्हें।'– एभा २८.६९९.

**निपटार–रा** वि. १. अप्रयोजक; निरुपयोगी. २. निर्लज्ज. ३. हीन; निकृष्ट; नीच. ४. दुर्गुणी; खराब; कवडीमोल; कस्पटाप्रमाणे मानलेला; निव्वळ खरवड. ५. निस्तेज; तेजोहीन: 'आतां हें त्याहूनि निपटारे जाहलें।'– ज्ञा ११.४६०.

**निपटारा** पु. कृती; पराक्रम.

**निपटारा प्रमाणपत्र** एकमेकांच्या देण्याघेण्यासंबंधी, कोणी कोणाला किती द्यावयाचे ते दाखवणारे प्रमाणपत्र. [हिं.]

**निपटाशि(चि)पटा–टी** पु. स्त्री. १. खरवड, खरपुड्या; उरलेसुरले अन्न; ताट निपटून घेतलेला घास (लहान मुलांना भरवताना म्हणतात.). (क्रि. करणे). २. (क्व.) पहा: **निरानिपटा**

**निपटून** क्रिवि. झाडून; साफ; समूळ; लख्ख.

**निपटे** न. अर्धे चिपटे; कोळवे; अदपावाचे माप; एक अष्टमांश शेर; एक कैली माप.

**निपठन** न. समग्र, आस्थेने वाचणे; चांगले पठण करणे. [सं.]

**निपणजा** पु. पणजाचा बाप; आजाचा आजा.

**निपणजो(जू–ज्व)ळ** न. निपणजाचे घर.

**निपणतू** पु. नातवाचा, नातीचा नातू.

**निपत(ता)ळा** पु. निथळा; पातळ पदार्थांच्या तळाला किंवा बुडी जमलेला भाग; निपटून काढलेला पातळ द्रव्याचा अंश. [सं.नीप+तल]

**निपत(ता)ळा** वि. १. अपमानित, फजीत झालेला. २. दुसऱ्याकडून पैसा घेतल्यामुळे ओशाळलेला. ३. लिप्ताळाबद्दल चुकीने उपयोग; गुन्ह्यात सापडलेला.

**निपता** पु. उंची दोरा. [तु.नाफा-भा]

**निपदरी** वि. निर्धन; निराधार; उघडा; विवस्त्र: 'तूं उघडा बोडका निपदरी आणि लंघनि कोठून आलास?'– साब १०.

**निपनवसा** पु. शहाणपणा: 'मग बोलती निपनवसां। आणआणूं।'– शिव ८१.

**निपर** न. लहान काकडी किंवा दोडके. (गो.)

**निपरवस** वि. निष्ठुर: 'कान्हर देवो आस्तिक: रामदेवो निपरवस:'– अली २८.(VI).

**निपराद–ध–धी** वि. १. दुष्ट; नीच: 'बाळ बापा म्हणे काका। तरी कां निपराध पारिख।'– तुगा ३२४८. २. निरुपयोगी; व्यर्थ: 'रानीं वसती औषधी। तरि कां म्हणाव्या निपराधी।'– तुगा ३५३२.

**निपराळ** वि. शुष्क; रुक्ष; कोरडी; पाणी न धरणारी (जमीन). [(निपळ+आर प्र.) वर्णव्यत्यास]

**निपरूस** वि. मसालेदार; चवदार; रुचकर; स्वादिष्ट; खमंग.

**निपरेठा** वि. तीन वर्षांचा बैल. (ठाकरी)

**निपल** न. स्टोव्हचे पेटता वायू वर येत असलेले टोक. [इं.]

**निपसणे** सक्रि. १. उपसणे; बाहेर काढणे (म्यानातून तलवार इ.). २. (केस, पंख इ.) उपटणे: 'एक निपसितो दाढीमिशा।'– अफला

२८. ३. (सामा.) खेचून, ओढून बाहेर काढणे.

**निपळ** स्त्री. १. कोरडी, सुकी, रुक्ष जमीन; नेहमी कोरडी राहणारी, पाणी ठरू न देणारी, बिनदलदलीची जमीन. २. कोरडे ठिकाण, जागा. [सं.निप्लव, निष्फळ]

**निपळंजी** वि. पोकळ; दाणा नसलेली (शेंग).

**निपाडसा** वि. १. मागचे; तिसऱ्या वेताचे, विणीचे वासरू. तान्हा, पाडसा व निपाडसा अशी तीन वेते. २. तिवेती; तीन वेळा व्यालेली (गाय, म्हैस, मेंढी).

**निपाणी** वि. १. सर्वसाधारण ओढण्याला मध्यम अशा तंबाखूचा एक प्रकार(निपाणी या गावावरून). २. चपलांची एक जात.

**निपाणी** स्त्री. शेराप्रमाणे असणारें एक झाड. हीं झाडें खानदेशांत विशेष आहेत. याला गेंदासारखी फुलें येतात व बीं कांद्यासारखें असतें.- वगु ४.४९.

**निपाणी** स्त्री. १. निर्जल; अपुऱ्या पाण्याच्या पुरवठ्याचा (देश, गाव,स्थान). २. विहीर, पाटबंधारा इ.च्या पाण्याची जरूर नसलेला; एकदाच पावसाने भिजलेल्या जमिनीच्या ओलाव्याने वर वाढणारा (ऊस इ.). ३. पाणी न घातलेले, न मिसळलेले; निर्भेळ (दूध, दारू इ.).

**निपात** पु. १. पडणे; पतन. (समासात रक्त-दुग्ध-शस्त्र-निपात). २. मृत्यू; मरण: 'कीं तूं मरूं इच्छिसि तो निपात।'- वामन नृसिंहदर्पण ९३. ३. (व्या.) नियमबाह्य; अपवाद; नियमाने सिद्ध न झालेला शब्द. ४. अव्यय. [सं.]

**निपातणे** अक्रि. मरून पडणे; मारले जाणे. [सं.निपातन]

**निपातन** न.१.(व्या.) नियमबाह्य रचना; अपवाद; निपात. २. खाली टाकणे; फेकणे; पाडणे. ३. ठार मारणे; चोप देणे; बडवणे. [सं.]

**निपायउटी** वि. जिचे पाय धुवत नाहीत अशी. (व.)

**निपाल** पहा: **निपळ**: 'निपाल जागा स्वच्छ सभोवती सपाट पटांगणें।'- प्रला १५४.

**निपालवाचा** वि. मागच्या पालवीचा; अखेरच्या वाढीचा; शेवटच्या बाराचा (भोपळा, वांगे इ. भाजीपाला).

**निपुटी-ठी** वि. पूट न दिलेले; पुटावाचून तयार केलेले (औषध इ.).

**निपुण** वि.१.निष्णात; कुशल; वाकबगार; तरबेज.२.पूर्ण; मोठी; अतिशय: 'सारांश बावाची कृपा निपूण स्वामीचे ठाई आहे.'- पेद ८.४२.[सं.]

**निपुत्र-त्री, निपुत्रि(त्री)क** वि. पुत्रहीन; ज्याला मुलगा नाही असा.

**निपुरवठा** पु. अपुरेपणा; कमतरता; उणीव; पुरवठा नसणे.

**निपोटी** वि. स्वत:च्या पगारातून, मजुरीतून उदरनिर्वाह करावा लागतो अशी, जेऊनखाऊन नसणारी, नक्त पगारी (नोकरी).

**निपोटी रुपये** ज्या पगारात रोजचा पोटगी खर्च निराळा मिळू शकतो अशी मजुरी, पगार.

**निपोता(त)शांत-ती, निपुताशांती-त** स्त्री. १. कुळाचे, वंशाचे, जातीचे निर्मूलन. २. (व्यापक) (राज्य, जंगल, लागवड इ.चा) उच्छेद, लय; नाश, फन्ना.

**निपोळी** वि. नितळ; स्वच्छ: 'पक्व दाडिबाचीया बीया: तिया सुरंगा दीसती निपोळीया'- रुस्व ११५१.

**निप्रवसु** वि. परवश; पराधीन: 'हे निप्रवसु दुसंबळ राज्य करू नेणे.'- अज्ञातच २४.

**निफज** वि. क्रिवि. स्पष्ट: 'याचें मूळ स्वरूप निफज। सांगो आता।'- ज्ञाप्र ५७५. [सं.निस् + पद]

**निफाशी** वि. फासा किंवा मुदण नसलेली; बिनफाशाची (पुतळी इ.).

**निफाळा** पु. नाश; चुरा: '...करितां जैसा निफाळा। अंगाचा होय।'- अमृ ५.५९. [सं.निष्फालन]

**निफाळी** वि. फाळ नसलेला; फाळरहित (नांगर).

**निबडणे** अक्रि. मोकळा नसणे; दाटणे (स्वर): 'तन्हि त्या गोपींचे स्वर निबडले।'- रास ५.२०६. [सं.निबिड]

**निबता** पु. आमंत्रण. (व.) [हिं.न्योता]

**निबद्ध** वि. घट्ट बांधलेले; जखडलेले; प्रतिबंधित; निग्रहीत. [सं.]

**निबद्धगान** न. (संगीत) ज्या गायनात चिजा रागात सताल म्हटल्या जातात ते गायन.

**नि(निं)बर** न. १. ऊन; सूर्याची उष्णता; ताप. २. फुपाटा; कढत राख. (को.) ३. स्वच्छ आभाळ; निरभ्र, ढग नसलेली स्थिती. [सं.निरभ्र]

**निबर** वि. १. जुना आणि चिवट; कोरडा आणि ताठ; जून (झाड, फळ इ.); उतार (वय). २. कठीण; मजबूत; घट्ट; टणक (दगड, गळू किंवा सर्वसामान्य कोणताही पदार्थ): '...नातरी पाठी करोनि निबर। रूप धरी कमठाचें।'- एरुस्व २.१३. ३. शिळे (अंडे). ४. जुना व खराब झालेला (पदार्थ,गळू); वृद्ध; म्हातारा: 'बांधा नंदा निबरा, गोपानीं मानिला सुमंदानिं बरा।'- मोकृष्ण ४४.१९. ५. प्रखर; तीव्र: 'जयाचा रश्मिपुंजु निबरु। होता स्वरूप उखरीं स्थिरु।'- ज्ञा १६.९.[सं. निर्भर, क. निब्बर]

**निबरट-ड** वि. १. पहा: **निबर**. २. जरा निबर, टणक.

**निबराष्ट-ष्ट्र** न. मोकळी, उघडी, ज्यावर ऊन पडते अशी जागा, प्रदेश.

**निबरू** वि. निरर्थक.

**निबळ-ळी** वि. १. दुबळा; अशक्त; बलहीन; कमकुवत: 'सर्वांगें होति निबळें। विकळपणें।'- भाए २०५. २. सौम्य; मऊ: 'आकारें न होती उगळें स्पर्शीं अति निबळें।'- माज्ञा १७.१२७.

**निबंध** वि. न फुटणारा; निघोर; अखंड (कातळ). [सं.निर्बल]

**निबंध** पु. १.एखाद्या विषयाची नियमबद्ध सुसंगत, सुसंबद्ध व आकर्षक मांडणी.२. धर्मग्रंथ; शास्त्राधार; निर्णय. (क्रि. पाहणे, काढणे.) :'तेही स्मार्त बोलविले: निबंध काढविले:'- लीच १.१२. ३. महाजनकी. ४. कर; जकात.

वि. पक्का बांधलेला, जडलेला. [सं.]

**निबंधक** पु. १. अधिकृत कागदपत्रे सांभाळणारा. २. विद्यापीठाचा कुलसचिव. ३. पंजीयक; (इं.) रजिस्ट्रार.

**निबंधपत्र** न. निवाडापत्र: 'ऐसे निबंधपत्र म्हाइंभटासि दीधले'- अस्मृ २०. [सं.]

**निबाकी** स्त्री. देण्याघेण्याची बाकी न उरणे, पूज्य होणे; हिशेब पुरा होणे; बाकी नसलेली स्थिती.

वि. बाकी नसलेला; देण्याघेण्याच्या शिलकी रकमेपासून मुक्त; बेबाक.

**निबाप्पा-प्या** वि. ज्याचा बाप माहीत नाही असा; सापडलेला; पोरका.
**नि(निं)बार** न. (कु.,बे.,को.) पहा: **निबर**
**निबिड** न. अरण्य; जंगल: 'जैसा वाकडी घाली घन। तैसा निबिड माजलें।'- मुविराट ६.१०९.
वि. १. दाट; गडद (अंधकार). २. गर्द; दाट (झाडी, वन). ३. मोठा, जोराचा (पाऊस). ४. घनदाट (मेघ): ' जैसा प्रळयांबूचा उभडु।...होय आपणपें निबिडु। आपणचि।'- ज्ञा १६.१३८. ५. गाढ (झोप): 'विकळ निबिड निद्रे कैकया मोहखाणी।'- मुराबाल ५४. ६. लीन : 'निर्गुणस्वरूपीं जाला निबिड।'- दावि २७४. [सं.]
**निबी** न.बीजही न राहील असा अभाव; पूर्ण निर्मूलन, उच्छेद; पूर्णपणे नाहीसे होणे; क्षय होणे; बिमोड. [सं.निर्बीज]
**निबोधन** न. स्पष्ट; खात्रीने, निश्चितपणे, खरेखुरे सांगणे. [सं.]
**निबोली** वि. करार किंवा बोली करून निश्चित किंवा कायम न ठरवलेली (किंमत, दर, अटी).
**निभगणे** अक्रि. तडकणे; भंग पावणे; तडा जाणे (मातीच्या भांड्याला). [सं.नि + भज्]
**निभ(व)ण** न. पहा: **निवणे-णी.** (वा.) ० **घालणे**- स्वस्थ, आळशासारखे, जेठा मारून बसणे: 'ओटीवरती एक स्वारी निभण घालून बसतेना रोज.'- खेस्व ५१. (निवण्याप्रमाणे मनुष्याने आपल्या पायांचे आसन करून बसणे.).
**निभणे** अक्रि. १. ज्या संकटापासून नाश होण्याची भीती आहे त्यातून पार पडणे; निभावणे; शेवटपर्यंत चांगल्याप्रकारे टिकणे; तगणे; (धोका, अडचण, चाकरी यांत) निभाव लागणे. २. चांगला वाकबगार, माहीतगार होणे (टिकाव धरल्यामुळे). ३. सिद्धीस जाणे; यशस्वी होणे; पार पडणे; शेवटपर्यंत उत्कर्ष होत जाणे. ४. बचावणे; जगणे; वाचणे. [सं.निर्वहन; हिं. निभना]
**निभयी** वि. क्रिवि. पूर्ण; निखालस; सर्वस्वी; एकंदरीत; पूर्णपणे.
**निभरण** न.उत्तम प्रकारे, आतला पदार्थ नासणार नाही अशाप्रकारे वेष्टनात बांधणे.
**निभरटाण** न. वाळवण्यासाठी उन्हात घातलेल्या वस्तूंना येणारा वास.
**निभर्षिणे** क्रि. टाकून बोलणे. [सं.निर्भर्त्सना]
**निभाती** वि. ज्यात भाताचे गोटे नाहीत असे (तांदूळ, करड इ.).
**निभाव** पु. यश; सुखकर प्रगती व शेवट; निभावणी; टिकाव; शेवटपर्यंत चांगल्या तऱ्हेने टिकून राहणे (इसम, वस्तू); निभलेपणा. [सं.निर्वाह]
**निभावणी, निभावणूक** स्त्री. टिकाव धरणे; तगणे; पार पडणे; निभाव; संकटांतून पार पडणे; बचाव; निर्वाह.
**निभावणीचे खत** हमीपत्र; मैत्री राखण्यासाठी केलेला करार.
**निभावणी जामीन** इनाम दिलेल्या जमिनीची लागवड योग्य प्रकारे केली जाईल म्हणून दिलेली हमी, जामीन.
**निभावणी सूट** १. खेडे किंवा जिल्हा उत्कर्षाला यावा म्हणून जमाबंदीतून दिलेली पैशाची सूट. २. अडचणीच्या प्रसंगी (प्रजेला) दिलेली सूट; प्रसंगातून निभावले जावे म्हणून दिलेली सूट.
**निभावणे** उक्रि.पहा: **निभणे** [क.निबायिसु]
**निभावहुंडी** स्त्री. श्रीमंत आहोत असे भासवण्यासाठी घेतलेली 'सोय हुंडी.' ही देणाऱ्याने सही केली की वेळेवर पैसे न दिल्यास त्याची जबाबदारी हुंडी देणाऱ्यावर असते.
**निभांजणे** सक्रि. निर्दालन करणे; मोडून काढणे: 'अरिराय खदळी निभांजकु'- मूप्र २४८४. [सं.नि+भञ्ज]
**निभीत** वि. भीतिरहित; निर्भय. [सं.]
**निभेड** वि. अतिभ्याड: 'तू निभेडा देवा भयानकु'- मूप्र २५८७. [सं.निभीत]
**निम** वि. अर्धा; निम्मा. [फा.नीम]
**निमक** पु. १. मीठ; लवण. २. (ल.) अन्न; भाकरी. ३. उपकार: 'उभयतां बापलेकांनीं चाकरी करून निमक अदा केलें.'- मदरु १.१६५. [फा.]
**निमकहराम** वि. कृतघ्न; उपकार विसरणारा; बेइमान. [फा.]
**निमकहलाल** वि. कृतज्ञ; खाल्ल्या अन्नाला जागणारा; उपकारांची जाणीव ठेवणारा; विश्वासू; स्वामिनिष्ठ. [फा.]
**निमकी** स्त्री. १. उजळणीचा एक प्रकार. एकपासून शंभरपर्यंत संख्यांच्या निमपटी पाठ करणे. २. पहा: **निमके** २
**निमके** न. १. घोड्याच्या किंवा बैलाच्या ओझ्याचा अर्धा भाग. (मुख्यत्वे आयात-निर्यात मालावरील जकातीसंबंधी व्यवहारात योजतात). २. अर्ध किंवा त्याचा कोणताही गुणाकार. उदा. १।।, २।।.
**निमखाई** स्त्री. १. शेतकी, व्यापार, उद्योग इ. व्यवहारात अर्धा वाटा, हिस्सा. २. शेताच्या उत्पन्नातील अर्धा वाटा (जमीन कौलाने देणाऱ्याचा किंवा घेणाऱ्याचा). ३. अर्धेल; अर्धुक; अर्धा.
**निमगडी** वि. अर्धे.
**निमगणे** उक्रि. विचारणे; प्रश्न करणे. (गो.)
**निमगुंडीचा** वि. न लागणाऱ्या गुंड्या, मुदनी असणारा (अंगरख्याचा गळा).
**निमगोणी, निमकगोणी** स्त्री. (जकात.) अर्धी गोणी, धान्याचे पोते.
**निमगोरा** वि. १. काहीशा गोऱ्या रंगाचा; अर्धवट गोरा. २. ख्रिश्चन; युरेशियन: 'ब्राह्मणेतरास पहिल्यानें जागा द्याव्या. त्यांतहि पहिल्यानें निमगोऱ्यास किंवा आठ आणे युरेजिनास... .'-टि ३.२२.
**निमगोल** पु. अर्धगोलाकृती; गोळ्याचा, पंचपात्राचा अर्धा भाग.
वि. अर्धगोलाकार; अर्धवर्तुळस्तंभाकार.
**निमग्न** वि. १. बुडालेला; आत गेलेला (पाणी इ.त). २. (ल.) गुंग; मग्न; तल्लीन झालेला. [सं.]
**निमचा** पु. लहान, आखूड तरवार (ही वाकडी व टोकाला चपटी असते); कृपाण: 'घ्या कट्यार गदका निमच्या।'- संग्राम २१. [फा.]
**निमचिकणी** वि. सुपारीचा प्रकार; ही जाड व चापट असते; भरडा.
**निमजगा** पु. दर्गा; निमाज पढण्याची जागा.
**निमजरी** वि. अर्धे कलाबतूचे आणि अर्धे रेशीम, कापूस इ.चे बनवलेले.
**निमज्जन** न. १. (पाणी इ. त) बुडणे; अवगाहन. २.तल्लीन होणे. [सं.]
**निमटणे** अक्रि. नाहीसे होणे; निमणे; लय पावणे: 'दीपाची दिठी निमटली।'- ज्ञा ६२८५.
उक्रि. १. मिटून घेणे; लवणे: 'कानाची नुघडी निमटली मिठी।'- एभा १५.१४. २. करणे; निवटणे. [सं.निर्+मृज्/मघ]
**निमणे** अक्रि. १. संपणे; शेवट होणे; विराम पावणे. २. शमणे; कमी,

थंड, शांत, हलके होणे; उपशम होणे; निवणे. ३. (ल.) मरणे: 'माता निमाली परी आंगें। पुत्र जिवें वांचला।'– मुआदि ४९.१०५. ४. निमग्न, गुंग होणे. [सं.नि+मी]

**निमता** वि. मरणारा: 'निमतया मृत्यूनें दिधली आयुष्यवृद्धी।'– ज्ञा १८.१६२.

**निमताजीम** स्त्री. (अर्धा मान, सत्कार) उठून उभे न राहता केवळ उठल्यासारखे करून (भेटीला आलेल्याचे) स्वागत अथवा रवानगी करणे. (क्रि. घेणे, देणे).

**निमता(था)ना** पु. १. पिकाच्या अंदाजाचा प्रकार. शेतातील सगळ्या उत्पन्नाची मोजणी करण्यासाठी त्यातील निरनिराळ्या भागांतून थोडे थोडे पीक कापून त्यातील धान्य मोजणे. सामान्यत: थोड्या अंशाचा बरोबर निश्चय करून, अनुभव पाहून त्यावरून सगळ्याचे अनुमान करणे. (क्रि. करणे, घेणे, पाहणे). २. पूर्वी अनुमानाने निश्चित केलेला आकडा पुन्हा तपासणे, पाहणे, वजन करणे; पुन्हा मोजणी इ. ३. दुसऱ्याने केलेल्या एखाद्या गोष्टीची परीक्षा करण्यासाठी ती पुन्हा करणे; चाचणी करणे. (क्रि.घेणे, करणे, काढणे, पाहणे.) [फा.]

**निमताळा** वि. खजील; ओशाळा: 'आपल्या कामांत नाना कोणाचेहि फद्याचे निमताळे नसत.'– सह्या सप्टें १९३५.

**निमती** स्त्री. अधेली; आठ आणे. (कर.)

**निमथल** स्त्री. १. शेताचे अर्धे उत्पन्न; विशेषत: अर्धा वाटा, हिस्सा (जमीन कौलाने घेणाऱ्याचा अथवा देणाऱ्याचा). २. जमिनीचे उत्पन्न वाटून घेण्यासाठी जमिनी कौलाने देणारा व घेणारा यांची भागीदारी; सारखी वाटणी; अर्धेलीची पद्धत.

**निमथा** पु. शिखर; कळस: 'तो महासुखाचा निमथा। वहिला पावे।'– ज्ञा ५.३५.

**निमदस्ती** वि. १. नेहमीच्या रकमेच्या निम्म्याने कर, खंड बसवलेली (जमीन, माल). २. निम्मे धान्य देण्याच्या ठरावाने, अर्धेलीने केलेले (शेत इ.).

**निमप** सक्रि. ढुंगण धुणे. (गो.)

**निमपट** स्त्री. अर्धा, निम्मा भाग.

**निमरझ** स्त्री. मध्यान्ह.

**निमशाई** स्त्री. १. अर्धे करणे. २. अर्धेली; अर्धा भाग.

**निमसरकारी** वि. काही प्रमाणात सरकारचा ताबा असलेली (संस्था).

**निमस्तनी, निमा** पु. आतून घालण्याचा अर्ध्या बाह्यांचा अंगरखा; जाकीट; कोपरी. [फा.]

**निमाज, निमाजमत** पहा: **नमाज** [फा. नमाझ]

**निमाण** न. शेवट. (गो.) [सं.निर्याण]

**निमाणा–ना** पु. एकंदर रकमेवर रुपयाला अर्ध्या आण्याचा जादा कर.

**निमानणे** सक्रि. सहन करणे: 'महात्मेनि सकळे भोगे निमानावे की:'– लीचपू २४३. [सं.मान]

**निमानतोंड्या** वि. दुर्मुखलेला: 'अरे निमानतोंड्याच्या वढ पाठीवऱ्हे धांडा.'– ब १२३.

**निमालेपण** न. १. मरण; लय पावणे:'... बोलु निमालेपणें विवरी। अचर्चातें।'– ज्ञा १५.४६८. २. स्तब्धपणा; मौन; मुकेपणा.

**निमासुर** वि. १. सुंदर; सुरेख; लावण्ययुक्त: 'मुख निमासुर बरवंट।'– वेसीस्व १३.१४. २. तरुण: 'जरी असतासी निमासुर। थोर होईल आतां मी।'– ह ८.६४. [सं.नि+मृज्]

**निमाळ** न. १. माळरान; बरड जमीन: ...'जन्ममृत्यूचीं निमाळें। निस्तरे रानें।– ज्ञा १६.४४१. २. रुक्षपणा; नीरसपणा : 'योगशास्त्रा आले निमाळ।'– भाए ८६.
वि. खडतर; रुक्ष; अडचणीचे.

**निमित्त** न. १. हेतू; उद्देश; मतलब; आशय; अनुसंधान. २. कारण; सबब; प्रयोजन; आधार. ३. कारणीभूत, साधनीभूत गोष्ट. ४. खोटी सबब; बहाणा; सोंग. ५. खोटा आरोप; आळ. ६. चिन्ह: 'देखितों मी निमित्तेंही विपरीतेंचि केशव।'– गीता (वामन शांडिल्य) ४६.
शअ. साठी; करिता; कारणे. [सं.]

**निमित्तकारण** न. पहा: **निमित्त** ३; प्रत्यक्ष कर्ता, साधक; विशेषत: सृष्टी निर्माण करणारी देवता, ब्रह्मा. पहा: **कारण**

**निमित्तखोर** वि. १. खोट्या सबबी, बहाणे सांगणारा. २. दोष देण्याची संधी शोधणारा; लहानसहान अपराध शोधून काढण्यासाठी डोळ्यांत तेल घालून बसणारा.

**निमित्तधर्म** पु. एखादा विशेष अथवा प्रासंगिक विधी, कर्म.

**निमित्तवाचक धातुसाधित** मूळ धातूला ऊ प्रत्यय लावून होणारे धातुसाधित. उदा. घेऊ, बोलू इ.

**निमित्ताचा** वि.१. आरोपाला, दोषाला कारण होणारा; ज्यामुळे आळ येईल असा. (धंदा, वस्तू इ.जे दिसताना उत्तम दिसते, पण त्यातील व्यंगामुळे वापरणाऱ्यावर निष्कारण दोष येतो.). २. प्रसंगाला उपयोगी पडणारा; बहाण्याला, नावाला पुरे असा.

**निमित्ताला–स** क्रिवि. देखाव्यासाठी; नावाला. (वा.) **निमित्ताला, निमित्तावर टेकणे**– १. निमित्त मिळेपर्यंत थांबणे, टपून बसणे. २. एखादे काम बिघडावे म्हणून कारण शोधणे. ३.नाइलाजाने, दिखाऊपणाने थांबणे.

**निमित्ती** वि. केलेला; उत्पादित; कारणीभूत.

**निमिष** पु. पापणी लवण्यासाठी लागणारा काळ; क्षण; (ल.) अत्यल्प काळ. [सं.]

**निमीकलमी** स्त्री. मोहतरफ्यासारखा, केवळ शहरांना लागू असणारा कर.

**निमीलकत्व** न. (संगीत) गाताना डोळे मिटणे.

**निमीलन** न. मिटण्याची क्रिया. [सं.]

**निमुट(ठ)णे** उक्रि. पहा : **निमटणे**

**निमुळता** वि. १. क्रमाने उतरता; सुईच्या टोकासारखा. २. अरुंद; चिंचोळा. [सं.निम्न+उत्+नम्]

**निमूटपणे** क्रिवि. १.गुपचूपपणे; एकही शब्द न उच्चारता; शांतपणे. २. स्थिरपणे; न हलता; एका जागी बसून.

**निमूर** वि. १. अदृश्य छिद्र, भोक, मुरण्याची जागा नसलेले; शोषून घेण्याची शक्ती, छिद्र, भोक नसलेला (बांध, तळे, डबरा वगैरे). २. तडा, भेग किंवा फट, नरमपणा किंवा इतर कोणतेही दोष नसलेला. ३. पूर्णपणे फन्ना उडालेला; खलास, खर्च झालेला; संपलेला. ४. भानावर, शुद्धी

नसलेला; निपचित; चैतन्यरहित. [सं.निर्+मूढ]

**निमूळ** वि. निर्मूळ; मुळासकट नाहीसा. [सं.निर्मूल]

**निमेचा डेरा** कनात नसलेला, फक्त वर कापडी छत असणारा डेरा.

**निमेष** न. डोळ्याची पापणी लवणे. [सं.]

**निमेषपुट** न. (नृत्य.) खालच्या व वरच्या पापण्या एकमेकींना लावणे. राग आल्याचे दाखवताना हा अभिनय करतात. [सं.]

**निमोणा–ना** पु. पहा: **नमुना**: 'ये जाय ते कसि अहा दिसते निमोणा।'– आनंदतनय, नौकाचरित्र २३.

**निमोला** वि. १. बिनमोल; कवडीमोल; निरुपयोगी: 'निमोली संपदा भयविरहित। सर्वकाळ चित्त समाधान।'– तुगा १९८३. २. किंमत दिल्यावाचून मिळणारे; फुकट; मोफत: 'तें भलेतथ निमोलें। न जोडिता आहे जोडलें।'– ज्ञा ९.३८८.

**निमोळी** स्त्री. विलायती गवतावरील एक परोपजीवी वनस्पती.

**निम्न** वि. १. खोल; खोलवट. २. लवलेले; नम्र.
न. खड्डा: 'निम्न भरलियाविणें।पाणी ढळोंचि नेणे।'– ज्ञा १६.१५८. [सं.]

**निम्नांश** पु. (ज्यो.) अपम; क्रांती. [सं.]

**निम्मा** वि. अर्ध; अर्धा भाग. [फा.नीम]

**निम्मे(मे)निम** वि. अर्धाअर्धा.
क्रिवि. अर्धेअर्धे करून; अर्ध्या केलेल्या स्थितीत.

**निम्मे(मे)शिमे–म्मे** क्रिवि. अर्धेमुर्धे; जवळपास, सुमारे अर्धे.

**निम्हाल** न. माळरान.

**निम्हो(म्भो)ळ** वि. निमुळते; घसरगुंडीचे: ' कीं निम्होळ संसारवाटेची। विश्रामुशाळा।'– शिव ३३.

**नियत** स्त्री. १. दानत; नीती; शील. २. बुद्धी; हेतू.
स्त्री. पु. वृत्ती; नेमणूक; नियम: 'समाधिस्थळीं पूजा... आपलाले वेळेस नियत करून दिल्ही.'– वाडसनदा १६८. [अर.नीयत]

**नियत** वि. १. नियमित; ठरावीक; कायम केलेले; प्रस्थापित. २. निश्चित; कायम; खचित. ३. चांगल्या तऱ्हेने आटोक्यात, दाबात ठेवलेले. ४. (तत्त्व.) निश्चितपणे फळ देणारे असे (कर्म). ५. ज्याच्या संख्या किंवा व्यापार इ. विषयक नियमांचा कधीही भंग होत नाही असे; नित्याचे; नेहमीचे; ठरावीक: 'ऐशास नियता प्रमाणें राऊ मशारनिल्हें यास घेऊन येणें.'– वाड्शा ५.
क्रिवि. खरोखर; नेहमी; निरंतर. [सं.]

**नियतकालिक** वि. (ज्यो.) ज्यांची चकाकी निरनिराळ्या काळी निरनिराळी दिसते, ते (ग्रह, तारे). – ब्रूस– ज्योतिःशास्त्राची मूलतत्त्वे.
न. ठरावीक वेळी प्रसिद्ध होणारे मासिक, त्रैमासिक इ.

**नियतपूर्व** वि. (न्याय.) एखादे कार्य होण्यासाठी ज्या गोष्टी तत्पूर्वी असाव्याच लागतात (उदा. भातासाठी तांदूळ) म्हणजे जे असल्याशिवाय कार्य होऊच शकत नाही असे (साधन, कारण).

**नियतक्षेत्ररक्षक** पु.ठरावीक भागाचे रक्षण करणारा; (इं.) बीट गार्ड.

**नियतात्मा** वि. चित्त, मन आटोक्यात ठेवणारा; निग्रही. [सं.]

**नियती** स्त्री. १. नियम; निग्रह. २. अदृष्ट; दैव. ३. मृत्यू. [सं.]

**नियम** पु. १. कायदा; आज्ञा; आदेश; निर्बंध; ठराव; कलम. २. ठरावीक चालरीत; वहिवाट. ३. रूढी; आचारपरंपरा; पद्धत. ४. उपवास, जागर, यात्रा इ. स्वेच्छेने करण्याच्या धार्मिक गोष्टी; आवश्यक धार्मिक कार्य, विधी. ५. ठरलेली गोष्ट, संकेत; ठराव. ६. (योगशास्त्र) अष्टांगांपैकी दुसरे अंग; इंद्रियनिग्रहासाठी करण्याचे आचरण. ७. इंद्रियांवरील ताबा; निग्रह; निरोध: 'एवं मनपवन नियमें। होती दाही इंद्रिये अक्षमें।'– ज्ञा १६.१८५. [सं.]

**नियमणे** सक्रि. नियम, निग्रह करणे: 'स्त्रीविषयीं नियमिजे। नांवें नांवें।'– ज्ञा १७.२१०. [सं.नि+यम्]

**नियमन** न.१. निग्रह; दाब; शासन; आळा. २. अंमल; अधिकार. [सं.]

**नियमपुस्तिका** स्त्री. विशिष्ट गोष्टीविषयी सूचना व माहिती देणारे छोटे पुस्तक.

**नियमविधी** पु. नियमासंबंधी स्थलकाल इ. निदर्शक गोष्टी; नियमांचे दिग्दर्शन; प्राप्त कर्म अमुक वेळी करावे असा अदृष्टार्थ नियम: 'आपत्काळीं पुत्रदान करावें असा नियमविधि जो केला त्याचें दृष्टफल तर संभवत नाहीं.'– मिताक्षरा.

**नियमाचा** वि. १. नियमित; व्यवस्थित; पद्धतवार. २. विचारी; स्थिर. ३. सदाचारी.
क्रिवि. नेमाने; न चुकता; हटकून; नियमितपणे.

**नियमित** वि. १. पहा : **नियत** १–३. २. पहा : **नियमाचा**

**नियंता** वि. नियमन करणारा; शास्ता; अंमल, अधिकार, हुकमत चालवणारा; समाजाला नियम, शिस्त लावणारा (ईश्वर, यमधर्म). [सं.]

**नियंत्रक** वि. नियंत्रण करणारा (भाग, यंत्र इ.); (इं.) रेग्युलेटर.

**नियंत्रण** न. १.पहा : **नियमन** १. २. नियमन, शासन करण्याची शक्ती, पात्रता. [सं.]

**नियंत्रणमंडळ** न. १. शासकीय कारभारावर नियंत्रण ठेवणारे मंडळ. २. नाट्य, चित्रपटातील कथावस्तूसंबंधीची, दृश्यांसंबंधीची श्लाघ्य – अश्लाघ्यता ठरवणारे मंडळ. (इं.) सेन्सॉरबोर्ड .

**नियंत्रण विभाग** (संगणक.) संगणकाला दिलेल्या सूचना व माहिती यांच्यावर नियंत्रण ठेवणारा विभाग.

**नियंत्रित** वि. १.ठरवून दिलेला (दर, क्षेत्र इ.). २. नियंत्रण केलेला, करण्याजोगा. [सं.]

**नियामक** वि. १. ताब्यात ठेवणारा; शासन, निग्रह करणारा. २. नियमित, ठाम, निश्चित करणारा; नियंता; नेमणूक करणारा. ३. गती नियंत्रित करणारे यंत्र. (इं.) गव्हर्नर. ४. (मा.शा.) लक्ष वेधून घेण्यास कारणीभूत ठरणारा (वस्तूतील गुणधर्म).

**नियामक मंडळ** (अर्थशा.) १. संचालक मंडळ. २. शासकसंस्था.

**नियामिका** स्त्री. (शि.क्षे.) सत्रे भरण्याच्या तारखा, आठवड्याचे तास इ.ची माहिती देणारी पुस्तिका.

**नियुक्त** वि. १. नेमलेला; ठरवलेला; योजलेला; अधिकृत. २. ज्यास पुत्रोत्पादनाविषयीं गुरूचा नियोग (आज्ञा) झाला आहे तो.– मिताक्षरा. [सं.]

**नियुत** न. एक कोटी संख्या; शंभर लक्ष. [सं.]

**नियुद्ध** न. कुस्ती. [सं.]
**नियो** स्त्री. रेती. (गो.)
**नियोग** पु. १. नेमणूक; योजना; अधिकार; व्यवस्था. २. आज्ञा; हुकूम; आदेश; शासन. ३. प्राचीन काळी वंश खुंटू नये म्हणून पती जिवंत नसल्यास अगर तो पुत्रोत्पत्तीला समर्थ नसल्यास स्त्रीला दीर किंवा त्याच गोत्रातील इतर पुरुषाकडून पुत्रप्राप्ती करून घेण्याची शास्त्राने दिलेली सवलत, आज्ञा. [सं.]
**नियोगणे** सक्रि. काम सांगणे; आज्ञा करणे: 'मज म्या नियोगावें स्वामिसेवकत्वें ।'- एभा ३.७५. [सं.नि+युज्]
**नियोगी** वि. १. पहा: **नियामक**. २. युक्त; योग्य; पात्र; अधिकारी: 'दोघे केले नियोगी । ब्राह्मण क्षत्रिय ।'- ज्ञा १८.८२८. [सं.]
**नियोजन** न. १. नेमणूक; स्थापना. २. कारण; प्रयोजन: 'हे गुणचि क्रियाजातां नियोजना ।'- ज्ञा १४.२९३. [सं.]
**नियोजि(ज)णे** उक्रि. नेमणे; योजणे; ठरवणे; आज्ञा करणे; सत्ता, अधिकार देणे. [सं. नियोजन]
**निरकामी** वि. रिकामी; निरुपयोगी.(गो.)
**निरख** पु. १. बाजारभाव; चालू किंमत. २. ठराव; मर्यादा. [फा.निर्ख]
**निरख** स्त्री. पारख; प्रमाण. (को.)
**निरखड** वि. रखरखीत; रुक्ष.
**निरखणे** सक्रि. १. एकाग्रतेने पाहणे; मनन करणे. २. सूक्ष्मपणे परीक्षा करणे; पारख करणे (सोने, रत्ने इ.ची). ३. (सामा.) पाहणे; अवलोकन करणे. [सं.निरीक्षण; हिं. निरखना]
**निरखबंद-दी** पु. स्त्री. बाजारभावाची यादी; भावाचा तक्ता.
**निरखी-ख्या** पु. १. बाजारभाव ठरवणारा अधिकारी. २. (ल.) धूर्त, दूरदर्शी माणूस.
**निरगाठ** स्त्री. लवकर, सहज न सुटणारी, घट्ट बांधलेली गाठ. [सं.निर् + ग्रंथी ]
**निरगुजी** स्त्री. दह्यापासून केलेला पदार्थ.
**निरग्निक** वि. ज्याने श्रौताग्नी किंवा स्मार्ताग्नी धारण केले नाहीत, ठेवले नाहीत असा.- मिताक्षरा. [सं.]
**निरडणे** उक्रि. पहा : **निपटणे** १
**निरड(ढ)णे, निरढलणे** उक्रि. १. पक्के करणे; पकवणे; राबवणे (नवीन, कोरे मडके इ.). २. (ल.) निरढावण्यास लावणे; निगरगट्ट करणे. [सं.नि+रध्]
**निरण** न. १. बेंबी आणि गुह्यभाग यांच्यामधील पोट; ओटीपोट. २. गाई-म्हशींचा गुह्यभाग; जनावरातील मादीचे जननेंद्रिय; योनी. (वा.) ० **करणे**- लवकर प्रसूत होण्यासाठी (गाय इ. नी) प्रसूतीच्या वेळी जननेंद्रिय शिथिल, विस्तृत करणे.
**निरत** वि. पराकाष्ठेचा, अत्यंत रत; तत्पर; आसक्त; अनुरक्त: 'जरी स्वधर्मैकनिरत । वर्ताल बापा ।'- ज्ञा ३.१०२. [सं.]
**निरतावणे** क्रि. गोडी घेणे; रत होणे.- मनको.
**निरतिशय** वि. अत्यधिक; अमर्याद; पराकाष्ठेचा; अतोनात. [सं.]
**निरपज** न. एक जातीचे भात. (को.)
**निरपण** न. खरवड; धूण (जेवलेल्या ताटाची); निरपून काढलेला अंश.
**निरपणास** पु. भाजीच्याच उपयोगी पडणारा फणस. (गो.)
**निरपणी** स्त्री. निरपण करणे; खरवड काढणे; निपटणी. [सं.निर्+पृ]
**निरपणे** उक्रि. १. पहा: **निपटणे** : 'धर्मापासौनि ऐसा निरपौनि काढी'- लीचउ १. २. (ल.) भोगणे; फेडणे; केलेले कर्म निस्तरणे; निपटणे. ३. हिसकून काढणे; खेचणे; जोराने उपसणे (म्यानातून तलवार इ.). ४. खडसावणे; खरडपट्टी काढणे; अतिशय रागावणे. [सं.निर्वह(प)न]
**निरपराध-धी** वि. निर्दोष; गुन्हा नसलेला; साव.
क्रिवि. निर्दोषपणे; विनाकारण. (क्रि. मारणे, हाणणे इ.). [सं.]
**निरपावणे** सक्रि. देणे देऊन टाकणे; बाकी न ठेवता देणे.
**निरपेक्ष** वि. १. निरिच्छ; निःस्वार्थी; निष्काम; अपेक्षा नसणारा. २. असहाय; अनाथ; अशरण. ३. सोडून; वगळून; शिवाय. [सं.]
**निरपेक्षता** स्त्री. १. निरिच्छपणा; निःस्वार्थता. २. पक्षपात नसणे.
**निरबुजणे** अक्रि. चमकणे; दचकणे; भिणे; बुजणे.
**निरबुजणे** उक्रि. भरणे; भरून निघणे; मिटणे; बुजणे; बंद करणे, होणे (भोक, भेग इ.).
**निरभिमान-नी** वि. अभिमान, गर्व, ताठा, गुर्मी, चढेलपणा नसलेला; नम्र. [सं.]
**निरभ्र** वि. ढग नसलेले, मोकळे, स्वच्छ (आकाश). [सं.]
**निरय** पु. एक नरक. [सं.]
**निरयन** न. ग्रहांचे स्थान मोजताना अयनगती हिशेबात न घेणे.
वि. अयनगती हिशेबात न धरता केलेले (पंचांग, कुंडली). [सं.]
**निरयन वर्ष** सूर्य रेवतीच्या योगतारेपासून निघून पुनः त्याच तारेत आलेला दिसण्याला जो काल लागतो ते वर्ष.- सूर्यमाला ९३.
**निरर्गल** वि. बेछूट; स्वैर; बेताल. पहा: **निरंकुश** [सं.]
**निरर्थक** वि. १. अर्थशून्य (शब्द, प्रयोग इ.). २. ज्यात नफा, फायदा नाही असा (धंदा, श्रम). ३. फुकट; निष्फळ; पोकळ. ४. अनावश्यक; निरुपयोगी.
क्रिवि. उपयोगावाचून; विनाकारण. (क्रि. मारणे, बोलणे). [सं.]
**निरलस** वि.आळस, जडपणा, सुस्ती इ. नसलेला; उद्योगी; चलाख; चपळ; तलख. [सं.]
**निरवकाश** वि. १. वेळ, फुरसत नसलेले. २. मुदत, वेळ संपलेला. ३. जागा, स्थळ नसलेला. ४. निबिड; दाट; घट्ट. [सं.]
**निरवटॉ** वि. साधा; नुस्ता. (गो.) [सं.निरा=बिनमिश्रणाचा]
**निरवडी** स्त्री. १. निग्रह; निश्चय: 'निज आत्मा निर्गुण निरवडी ।'- ब २९८. २. चातुर्य; कौशल्य; युक्ती: 'नेणती युद्धाची निरवडी ।- एरुस्व ९.२. ३. सावधानता: 'अत्यंत साधूनि निरवडी । मनोजयो आणितां गोडी ।' - एभा २९.५९. [सं.निर्+वर्ती]
**निरवणी, निरवणूक** स्त्री. सोपवणे; स्वाधीन करणे.
**निरव(वि)णे** उक्रि. १. ताब्यात देणे; स्वाधीन करणे; सोपवणे; विशिष्ट सूचनांसह हवाली करणे; व्यवस्था सांगणे: 'निरवणें धरणें सुखदायका ।'- दावि १३२. २. कार्य सोपवणे; समर्पिणे: 'तुका म्हणे

तुम्ही निरविल्यावरी। मग मज हरि उपेक्षिना।'– तुगा २२०७. ३. पाठवणे; निरोप देणे. ४. देणे; नेमणे: 'हे कन्या त्याचि धन्या कृतिसि निरवली साच त्याचीच भाजा।'– आसी ३१. ५. सांगणे; बजावणे: 'अश्वपति बापें सात वेळां निरविलें।'– वसा ६२. [सं.निर्+वह्]

**निरवधी** वि. १. अनंत; अमर्याद. २. निरंतर; सतत; एकसारखा. [सं.]

**निरवयव** वि. अवयवरहित; पूर्ण; भेद, भाग नसलेला. [सं.]

**निरवलंब** वि. १. आश्रय, आधार नसलेला. २. अवलंबून नसलेला; स्वतंत्र; स्वाधीन; स्वावलंबी. [सं.]

**निरवंकिणे** सक्रि. निश्चय करणे.– मनको.

**निरवानिरव** स्त्री. आवरासावर; प्रवासाला निघताना किंवा मरण जवळ आल्यावर घर, मुले, जनावरे इ. सर्व गोष्टींची व्यवस्था लावणे.

**निरवेगळणे** उक्रि. निराळे ठेवणे; वेगळे, बाजूला करणे: 'ती कार्यार्थ निरवेगळीत स्वतंत्र। तरी देवक्षोभ जाणावा।'– नव १४.१२२.

**निरशन** न. उपवास; कडकडीत, निर्जळी उपवास.

वि. कडकडीत, निर्जळी (उपवास). [सं.]

**निरशी–सी** स्त्री. १. बेचवपणा; अरुची. २. तिटकारा; वीट; किळस; नावड; कंटाळा.

वि. खरकटी नसलेली; स्पर्श न केलेली; उष्टी न केलेली; निर्लेप.

**निरसणे** सक्रि. १. फेकून देणे; दूर, बाजूला सारणे; काढून टाकणे; घालवणे; नाश करणे; टाकून देणे: 'निज बोधें संसारदु:ख। निरसूनि दिधलें निजमुख।'– एभा १०.३४७. २. मिथ्या ठरवणे, समजणे: 'तैसें विचारितां निरसलें।'– ज्ञा २.१३१.

अक्रि. संपणे; जाणे; दूर होणे; गळणे; कायमचे नष्ट होणे: 'जैसी रात्र निरसतां उठती जन।'– रावि ७.८४. [सं.निर्+अस्]

**निरसन** न. १. दूर करणे; खंडन, नाश करणे. २. नाकारणे; अस्वीकार; टाकणे; फेकणे. [सं.]

**निरसनी** पहा: **निरशी**: 'नेदीच तो निरसनी धरिली मुकुंदे।'– अकक २ कृष्णकौतुक ५०.

**निरसा–से** वि. न तापवलेले, पाणी न मिसळलेले (दूध).

**निरस्त** वि. दूर फेकलेला; खंडित; जित; नष्ट केलेला (गैरसमज, अज्ञान). [सं.]

**निरहर** न. बुद्धिबळातील मोहरे: '...कृत्यजातांची निरहरें। सारिजती।'– माज्ञा १८.१७०.

**निरहंकारी** वि. गर्व, ताठा नसलेला; नम्र; विनयशील. [सं.]

**निरक्षर** वि. अक्षरओळख नसणारा; अशिक्षित; अडाणी. [सं.]

**निरंकार** वि. क्रिवि. (चुकीने अर्थ) १. निराकार; शुद्ध; केवळ; एकटा; निव्वळ; एकमेवाद्वितीय. २. पूर्णपणे; केवळ; सर्वस्वी. [सं.निराकार]

**निरंकुश** वि. स्वच्छंदी; ताबा,बंधन, मर्यादा न मानणारा; कोणाचे न ऐकता वागणारा; स्वैर; बेताल; मोकाट; अप्रतिबंध. [सं.]

**निरंकुशा तृप्ती** जीवाच्या ज्या सात अवस्था आहेत त्यातली फलरूप सातवी अवस्था. – हंको.

**निरंगळी** स्त्री. जास्त श्रम किंवा उपवास यांमुळे गात्रे शिथिल, जड होणे; सुस्ती; मर्गळी; थकव्यानंतरची झोप. (क्रि. येणे, भरणे.).

**निरंजन** न. १. (तत्त्व.)विद्या; ज्ञान. २. उजाड प्रदेश; एकांत स्थळ: 'निरंजनीं आम्ही बांधियेलें घर।'– तुगा ४०४३. ३. अरण्य: 'मृत्यूनि आधाधिले। तिहीं निरंजन सेविलें।'– ज्ञा १३.२३.

वि. १. निर्विकल्प; सोज्वळ; निष्कलंक; मायाविरहित; चूक, व्यंग इ.रहित; जन्ममरणादिकाला कारण असणारे प्रारब्ध ज्याला नाही असा (परब्रह्म): 'लागे तुझे ध्यान निरंजनाचें।'– सारुह १.३४. २. अस्पष्ट; गुप्त. [सं.]

**निरंजनी** पु. गोसाव्यातील एक पंथ; हे गोसावी लंगोटी लावतात.

**निरंतर** वि. १. संबंध असलेला; मध्ये अंतर नसलेला. २. सततचा; नेहमीचा; कायमचा. ३. सलग; अखंड. [सं.]

**निरा** पु. ताडाच्या किंवा खजुरीच्या झाडांपासून निघणारा, न आंबलेला रस; एक प्रकारचे मद्य.

**निरा** पु. एक प्रकारचे पांढरे गवत.

**निरा** वि. शुद्ध; निर्भेळ; निरसे; स्वच्छ: 'दिवसानदिवस रंग चढता निरा गहिरा।'– सला ३८.

क्रिवि. अगदी; नुसता; केवळ. [हिं.; सं.]

**निराकरण, निराकृती** न. स्त्री. पहा: **निरसन** [सं.]

**निराकार** वि. आकाररहित; निरवयव (परमेश्वर, परब्रह्म). [सं.]

**निराका(क)रणे** सक्रि. नाकारणे; निषेध, नाकबूल करणे: 'जें कर्मजात आघवें। एथ निराकारिलें देवें।'– ज्ञा २.३७२.

**निराकृत** वि. १. हाकून,फेकून दिलेला. २. नाकबूल; निषिद्ध. [सं.]

**निराकृती** वि. (शाप.) ज्याला विशिष्ट आकार नाही असा; (इं.) कोलाइड.

**निराकृतीकरण तत्त्व** वातावरणापासून वेगळे ओळखता येऊ नये म्हणून स्वत:चा पोशाख, त्वचेचा रंग इ. बदलण्याचे तत्त्व.(इं.) कॅमोफ्लेज.

**निराचार** वि. वेदविहित आचार न पाळणारा; राक्षसवृत्ती; रानटी; अडाणी; जंगली. [सं.]

**निराजन** वि. पहा : **निरंजन** : 'तो निराजन स्वरूप परमेश्वर:'– वच्छटी.

**निराट** वि. १. झाडांची सावली वगैरे नसलेली, मोकळी, उघडी, उन्हाची (जागा). (कु.) २. वेगळा; एकटा. (झाडी)

**निराणी** वि. सुंदर; पवित्र: 'केली लीळा निराणी.'– गस्तो ८१.

**निरात** वि. राते नसलेले; तांबडे नसलेले (भात). [सं.निरक्त]

**निरा दम** दमलेला; थकलेला; श्रमित: 'युसफ याचाही कित्येक पहिलवानाशीं कुस्ती करून निरा दम झाला आहे त्याच्याशीं कुस्ती कर.'– विबाइ, भारतवर्ष.

**निरादानी** स्त्री. पांढरे, चौकटी लुगडे. [सं.निरिगिनी]

**निराधार** वि. १. निराश्रित; पाया, आधार नसलेले (मनुष्य, वस्तू, इमारत); ज्याला आधाराची, आश्रयाची गरज नाही असा (ईश्वर). २. अप्रमाण; अविश्वनीय (बातमी). [सं.]

**निरानिपटा, निरानिपटारा** पु. १. शिल्लक राहिलेले काम, भानगडी इ. संपवणे, आरंभलेला धंदा इ. शेवटाला नेणे; खटला, फिर्याद इ. निकालात काढणे. २. स्वच्छ, साफ करणे; चाटूनपुसून लख्ख करणे; निपटून काढणे; वाहून नेणे; लुबाडणे; नाहीसे करणे. (क्रि. करणे).

**निराभास** वि. १. भास किंवा दृश्य यांच्या विरहित; असत्य, माया यांनी

रहित (ब्रह्म, ईश्वर). २. कोणत्याही सादृश्याने, कल्पनेने किंवा मानसिक भावनेने प्रकट करून दाखवण्यास अशक्य (ईश्वर). [सं.]
**निराम** वि. (वैद्यक.) अपचनातून न उद्भवलेला (ताप, आजार). [सं.]
**निरामय** वि. १. आजारी नसलेला; निरोगी; आनंदी. २. रोग, साथ वगैरे नसलेला (देश, जागा). ३. निश्चिंत; निर्भय; शांत (मनुष्य, निद्रा). ४. त्रास, कटकट नसलेली(जागा, धंदा, नोकरी इ.). [सं.]
**निरामिष** वि. १. मांसविरहित. २. लाचलुचपत नसलेली. [सं.]
**निरायास** वि. आयास, त्रास, श्रम वगैरेंशिवाय. [सं.]
**निरालय** वि. अविनाशी; अक्षय; कधीच नाश न पावणारे. [सं.निरलय]
**निरालंब** वि. पहा: **निरवलंब**: 'जिही सकळभूतांचिया हिर्ती। निरालंबीं अव्यक्तीं।'– ज्ञा १२.६०.
न. १. आकाश.– शर. २. निराकार (परब्रह्म): 'निरालंबींची वाडी। होती त्रिभुवनायेवढी।'– ज्ञा १३.४४. [सं.]
**निराविणे** सक्रि. निराळे करणे आणि बाहेर पसरणे; मोकळे करून अलग अलग पसरणे, वाळत टाकणे (कपडे, धान्य इ.).
**निराश** वि. १. आशाभंग झालेला; आशा नसलेला; हताश; खिन्न. २. निरिच्छ; उदास; निरपेक्ष. [सं.]
**निराश(स)णे** अक्रि. आशा सोडणे; हताश होणे.
**निराशा** स्त्री. १. आशाभंग; आशा नसणे; हताशा. २. निरिच्छपणा; निष्कामता. [सं.]
**निराशावाद** पु. मनुष्याच्या आयुष्यात सुखापेक्षा दु:खच जास्त आहे असे मत;(इं.) पेसिमिझम.
**निराश्रित** वि. आश्रय, संरक्षण नसलेला. पहा: **निराधार** [सं.]
**निरास** पहा: **निरसन**
**निरास** स्त्री. निराशा: 'करितां दान हेंचि मागावयास। नका भार घेऊं करूं निरास।'– तुगा ३४५. (कु.) [सं.निर्+आशा]
**निरासचे** सक्रि. निर्दाळणे. (गो.) [सं.निर्+अस्]
**निराहार** पु. १. मुळीच न खाणे; कडकडीत उपवास; निर्जळी. २. निरशन, धान्यरहित फराळ; नेहमीसारखे अन्न न खाता थोडी फळे किंवा काही विशिष्ट पदार्थ वगैरे खाणे. [सं.]
**निराळ** न. १. आकाश; अंतराळ; अवकाश: 'प्रभेनें निराळ कोंदलें।'– रावि १०.२३. २. निराकार, निराश्रयरूप ब्रह्म. ३. निराश्रित ठिकाण: 'तरी अभ्यासाचेनि बळें। प्रत्याहारीं निराळें।'– ज्ञा ६.५७. [सं.निरालय]
**निराळा** वि. १. वेगळा; स्वतंत्र; अलग; न जोडलेला. २. दुसरा; वेगळा; अन्य. ३. असंयुक्त; भिन्न; विभक्त; न जुळणारा; असदृश; परका. [सं.अन्यतर–अन्यअर–न्यार (+ ल प्रत्यय) – न्यारल – निराळ.– भाअ १८३३.]
**निराळेपोटी** क्रिवि. रिकाम्या पोटी.
**निरांकार** पु. एक पिशाच्च.– मसाप ४.४.२८०.
वि. विचित्र; वेडसर वृत्तीचा.(कु.)
**निरांजन** न. देवासमोर लावण्याचा विशेषत: तुपाचा, फुलवातीचा दिवा.
**निरिच्छ** वि. इच्छा नसलेला; नि:स्पृह. [सं.]
**निरिंद्रिय** वि. १. नपुंसक; प्रजोत्पादनाला असमर्थ; षंढ. २. हात, पाय इ. अवयव नसलेला; व्यंग असलेला. ३. (रसा.) जडपदार्थविषयक; (इं.) इनऑर्ग्यानिक. [सं.]
**निरी** स्त्री. १. धोतराची, लुगड्याची चुणी; मिरी; घडी; वस्त्र नेसताना हाताच्या बोटावर पाडलेली एकावर एक घडी. २. मळसूत्राच्या खोबणीतील उंचवटा, कडा. ३. चरकाच्या कडेच्या लाटांचे पुढे मागे होणारे भाग. [सं.नीवि; क. निरिसु]
**निरीपिरी** स्त्री. निरवानिरव; आवराआवर. (व.)
**निरीम** पु.न. गलबत रिकामे असल्यास त्याचा समतोल राखण्यासाठी त्यात घातलेले दगड, लोखंड वगैरे वजन; (इं.) बॅलस्ट.
**निरीश्वरवाद** पु. ईश्वराचे अस्तित्व न मानणारे मत. [सं.]
**निरीक्षक** पु.तपासनीस; (इं.) इन्स्पेक्टर. [सं.]
**निरीक्षण** न. लक्षपूर्वक बारीक पाहणे; परीक्षा. पहा: **निरखणे** [सं.]
**निरीक्षणे** उक्रि. बारकाईने पाहणे; निरखणे.
**निरुक्त** न. १. एक वेदांग. वेदातील कठीण शब्दांचे अर्थ स्पष्ट करणारे शास्त्र. वेदार्थ स्पष्ट करणाऱ्या निघंटु या वैदिक शब्दकोशावर यास्काचार्यांनी लिहिलेले भाष्य. २. अर्थस्पष्टीकरण; व्याख्या; शब्दांची व्युत्पत्ती सांगणे.
वि. ज्यात गुणधर्मांचे, परिस्थितीचे विवेचन, स्पष्टीकरण केले आहे ते; व्याख्यात. [सं.]
**निरुक्ती** स्त्री. १. पदार्थाचे स्वरूप समजण्यासाठी बांधलेले लक्षण. २. लक्षणादिकांवरून केलेले स्वरूपकथन; व्याख्या; वर्णन. ३. शब्दाची व्युत्पत्ती सांगणे. [सं.]
**निरुज** वि. निरोगी: 'कांसवघृतेसि आरोगी। निरुजा रोगी व्हावया।'– एरुस्व ११.३४. [सं.]
**निरुता–ती–ते** वि. खरे; शुद्ध: 'ज्ञान उपदेशावें निरुतें।'– विपू १.६३. क्रिवि. खात्रीने; स्पष्टपणे; निश्चयाने; खरोखर; खचित: 'ऐसी असतां उदासवृत्ती। द्वादशवर्षें क्रमिलीं निरुती।'– भवि २२.३१. [सं.निरुक्त]
**निरुता** वि. बाजूला, शेवटी, एकीकडे असलेला: 'निरुतिया ठेलिया:'– उच २१७. [सं.]
**निरुती** स्त्री. १. प्राप्ती. २. निर्णय; निश्चय: 'या निरुतीकरितां बोला। युगें गेलीं।'– ज्ञा १०.६७. ३. युक्ती; रीत: 'ऐशिया समयोगाची निरुती। लाहोनि जे देह ठेविती।'– ज्ञा ८.२२१.
**निरुत्तर** न. उत्तराचा अभाव.
क्रिवि. काय उत्तर द्यावे हे न कळणारा; कुंठित; स्तब्ध. [सं.]
**निरुत्साह** वि. १. उत्साह नसणारा; हताश; खिन्न. २. निर्जीव; हिंमत नाहीशी झालेला. [सं.]
**निरुद्ध** वि. बद्ध; अडवलेला; बांधलेला; कैद. [सं.]
**निरुद्योगी** वि. १. उद्योग, कामकाज नसलेला; बेकार; व्यवसायहीन. २. निकामी; आळशी; रिकामा बसणारा. [सं.]
**निरुपचार** वि. १. कारणाशिवाय; निर्निमित्त: 'आणि निरुपचारा प्रेमा। विषय होय जें प्रियोत्तमा।'– ज्ञा १८.१३४६. २. उपाधिरहित: 'जो निर्गुण.निर्विकार। जो निष्कर्म निरुपचार।'– एरुस्व १.२०. [सं.]
**निरुपद्रवी** वि. १. त्रास, कटकट न करणारा. २. गरीब; निरपराध. [सं.]

**निरुपम** वि. ज्याला कशाचीही उपमा देता येत नाही असा; अप्रतिम; अतुल; अद्वितीय. [सं.]

**निरुपयोगी** वि. उपयोगी न पडणारा; कारणी, कामी न लागणारा; कुचकामाचा; व्यर्थ. [सं.]

**निरुपहित** वि. उपाधिरहित; ज्याच्या मागे कोणतेही बंधन, व्याप, अडचण इ. नाही असा: 'ठी केली निरुपहितीं। आपुल्या रूपीं।'– ज्ञा १५.४४२.

**निरुपाधी, निरुपाधिक** वि. उपाधी, त्रास यांपासून मुक्त; उघडा; सरळ (ज्ञान, रूप, हेतू, आत्मा इ.). [सं.निरुपाधिक]

**निरुपाय** पु. इलाज नसणे; अपरिहार्यता; अनन्यगतिकता. [सं.]

**निरुंधणे** उक्रि. निरोध, प्रतिबंध करणे; अडवणे. [सं.नि+रुध्]

**निरू** पु. चुन्याच्या बांधकामावर घासून त्याला सफाई देण्यासाठी मसाला घालून तयार केलेला बारीक चुना; सनला. (क्रि. लावणे): 'दगड चांगल्या निरूंत बसवावे.'– मॅरट ३७.

**निरू–रे** वि. १. पहा: **निरा**. २. पहा: **निरसे**: 'तुझी धरितें हानुवटी मी, निरे दुध पेई पेई।'– होला ३३.

**निरूढी** स्त्री. १. लोकाचार; रीत. २. लोकप्रसिद्धी: 'निरूढी जळघट घेईजे शिरीं। तेवीं वंदावे बळिष्ठ वैरी।'– मुआदि ३४.८१. [सं.]

**निरूपण** न. १. कथावर्णन; लक्षण-स्वरूप-प्रामाण्य इ. विचारात घेऊन केलेले स्पष्टीकरणात्मक कथन. २. निवेदन; विवेचन; व्याख्यान. [सं.]

**निरूपिणे** उक्रि. १. वर्णन करणे; लक्षण, स्वरूप इ.सहित एखादी गोष्ट सांगणे. २. सांगणे; निवेदन, जाहीर करणे. [सं.निरूपण]

**निरूपिता** वि. निरोप्या: 'तैसा मी अनुग्रहीतु। साधूंचा निरूपितु।'– ज्ञा १.८२.

**निरूहबस्ती** स्त्री. मल व अन्य दोष बाहेर काढून टाकण्यासाठी पिचकारीच्या साहाय्याने दिलेले औषध; एनिमा.

**निर्ऋति–ती** स्त्री. १. नैर्ऋत्य दिशा; दक्षिण आणि पश्चिम यांमधील उपदिशा. २. (ल.) नाश; मृत्यू; विपत्ती.
पु. नैर्ऋत्य दिशेची देवता. [सं.]

**निरोखी** स्त्री. आल्यासारखी एक औषधी वनस्पती. ही दम्यावर उपयोगी आहे. मधांत खावयास देतात.– बदलापूर १६३.

**निरोग–गी** वि. रोग नसणारा; निकोप प्रकृतीचा; धडधाकट. [सं.]

**निरोध** पु. १. प्रतिबंध; अटकाव; कैद; अडथळा. २. नियमन; संयमन; बंधन; प्रतिकार. ३. संततिनियमन व लैंगिक संबंधातील सुरक्षितता या कारणांसाठी पुरुषांनी शारीरिक संबंधाच्या वेळी वापरण्याचे साधन.

**निरोधक** वि. १.दाब, आटोका, ताबा, बंध इ.ठेवणारा; दमन करणारा. २. अटकाव, प्रतिकार करणारा; अडथळा आणणारा.

**निरोधणे** सक्रि. १. निग्रह; दमन, संयमन करणे. २. बंधनात, ताब्यात ठेवणे; अटकाव करणे. ३. अडवणे; रोखणे. [सं.नि+रुद्ध]

**निरोधन** न. १. निग्रह; दमन; दाब; बंधन. २. अटकाव; प्रतिकार; (इं.) पिकेटिंग: 'विदेशी कापड विकण्याबद्दल अहमदाबाद स्वयंसेवकांनी निरोधन करून अन्नत्याग केला.'– के २.१२.३०. ३. (मा.शा.) मनातील इच्छा मनाच्या अबोध भागात खोल दडपणे; (इं.) डिप्रेशन. ४. उष्णता, वीजप्रवाह यांचे वहन सुलभपणे व सुरक्षितपणे होण्यासाठी वापरले जाणारे प्रतिबंधात्मक आवरण. उदा. प्लॅस्टिक, लाकूड इ.

**निरोधलेख** पु.१. स्वत:ची जंगम मालमत्ता परत मिळवण्यासाठी मिळवलेला आदेश; हुकूम. २. न्यायाधीशाने खटला पुढे चालवू नये अशा अर्थाचा लेखी हुकूम.

**निरोप** पु. १. आज्ञा: 'वेदांचिया निरोपा। आन न कीजे।'– ज्ञा १६.४५५. २. संदेश; मजकूर. ३. जाण्याची परवानगी; रुखसत. (क्रि. घेणे, देणे.). ४. सन्मानाने केलेली पाठवणी; बोळवण. ५. शेतकापणीचा परवाना मालकाकडून मिळण्याच्या वेळी शेतकऱ्याकडून मालकाला मिळणारी भेट. [सं.नि+रूप्] (वा.) **(दिव्याला) ० देणे**– दिवा मालवणे.

**निरोप पोचवणे** मुलांचा एक खेळ.

**निरोपवणे** सक्रि. निरवणे; स्वाधीन करणे; सोपवणे: 'हीराइसेतें भटोबासीं मज निरोपवीले आन तयातें मीं सांडूनि आलां:'– वृद्धाचार ४.

**निरोपानिरोपी** क्रिवि. नुस्त्या तोंडी निरोपावरून; निरोप आल्या-पाठवल्यावरून.

**निरोप्या** वि. १. संदेशवाहक; निरोप सांगणारा, पोचवणारा. २. ज्याला परिस्थितीप्रमाणे कामात फेरफार करण्याचा अधिकार नसून आज्ञेप्रमाणे चालावे लागते असा. ३. फक्त निरोप सांगण्याच्या उपयोगाचा; स्वत:ची बुद्धी नसलेला.

**निरोल(ळ)णे** सक्रि. मळ काढून स्वच्छ करणे; मशागत करणे. [सं.निर्मल]

**निरोवणे** सक्रि. १. सोपवणे; सोडणे. २. आज्ञा देणे; सांगणे: 'तेथ निरोविलें व्यासें। तें नेदीच हों।'– ज्ञा १८.५५२.

**निरौता–ते** क्रिवि. पहा: **निरुता** : 'तें निरौता खुणू जाणेती।'– दाव ३३२.

**निर्** अ.उप. १. खात्री; हमी; आश्वासन. २.नकार; अभाव. [सं.]

**निर्गणाचा** वि. (निर्गुण परमेश्वराची मूर्ती बनवणारा यावरून ल.) असमर्थ; अक्षम; नालायक; निरुपयोगी; अकुशल (कारकून, कारभारी, कारागीर इ.). [सं.निर्गुण]

**निर्गत** स्त्री. १. सिद्धी; यश; सुपरिणाम; आनंददायक निकाल; उलगडा. २. निर्गम; सद्गती.
स्त्री. न. १. निर्यात होणारा माल. २. त्यावरील जकात.
वि. गेलेला; पासून, कडून आलेला, निघालेला, परतलेला. [सं.]

**निर्गम** पु. १. सद्गती. २. शेवट; परिणाम; निकाल. ३. निर्गमन; पुढे किंवा बाहेर जाणे. ४. सुटका; मोकळीक.

**निर्गमफलिका** स्त्री.(वाणिज्य.) बँकेत पैशांची देवघेव करण्याची खिडकी.

**निर्गामी** वि. बाहेर जाणारा (दूरध्वनीवरील कॉल); (इं.) आउट गोइंग (कॉल).

**निर्गुण–णी** वि. १. गुणातीत; सत्त्वादी त्रिगुणांच्या पलीकडचा (परमात्मा). २. चांगले गुण नसलेला; गुणरहित. [सं.]

**निर्गुंडी, निर्गूड–डी** स्त्री. एक झाड; उंची १०–१२ फूट; साधी व कात्री या दोन जाती; फुले निळी व पांढरी; पाने कातरल्यासारखी. [सं.]

**निर्ग्रंथ** पु. नास्तिक; आत्मवादी; एक पंथ.– मिताक्षरा. [सं.]

**निर्घृण** वि. निर्दय; निष्ठुर; कठोर; क्रूर. [सं.]

**निर्घोर** वि. १. निष्काळजी; बेफिकीर; भयविरहित. २. नि:शंक; काहीच विकल्प नसणारा. [सं.]

**निर्जन** वि. १. ओसाड; वस्ती नसलेले. २. एकांत; आड बाजूला, एकीकडे असलेली (जागा). [सं.]

**निर्जनीभवन** न. घरे उठवून जागा मोकळी करणे.

**निर्जर** पु. देव: 'देवीं पुष्पवृष्टी केली। आनंदले निर्जर।'- भवि १.९९.
वि. १. अमर; अविनाशी. २. जराहीन; म्हातारपण नसलेला. [सं.]

**निर्जल-ळ** वि. १. पाणी नसलेला किंवा फार थोडे पाणी असलेला (देश, प्रांत). २. ज्यात पाणीही प्यायचे नसते असा (उपवास). ३. कोरडा; शुष्क. ४. (शाप.) जलरहित; अनार्द्र; (इं.) अनहायड्रस.

**निर्जली-ळी एकादशी** ज्येष्ठ शुद्ध एकादशी. या उपवासात संध्येतील आचमनाच्या पाण्याशिवाय इतर पाणीदेखील प्यायचे नसते.

**निर्जलीकरण** न. अतिसार, उलट्या होण्याने शरीरातील पाणी व क्षार कमी होणे. याने मृत्यू येण्याची शक्यता असते.

**निर्जंतुक** वि. ज्यातील रोगकारक जंतू नष्ट केले आहेत असा.

**निर्जंतुकीकरण** न. कोणत्याही पदार्थावरील रोगकारक जंतू नष्ट करण्याची प्रक्रिया.

**निर्जीव** वि. १. प्राण नसलेला; अचेतन; जड (पाषाण इ.). २. अशक्त; दुर्बळ; निःसत्त्व. ३. (ल.) नाजूक; कमजोर. ४. मूर्च्छित: 'निर्जीव होऊन क्षणेक।'- गुच ११.८६. [सं.]

**निर्झर** पु. १. झरा. २. जलप्रपात; झोत; धबधबा. [सं.]

**निर्ढावणे** उक्रि. १. सहन करण्याची सवय होणे. २. (मडके) पाझरण्याचे थांबणे; पाझरणार नाही असे करणे; वापरामुळे अधिक उपयुक्त होणे. ३. व्यसन इ.विषयी निर्लज्ज होणे; गुन्हे करण्यात सराईत होणे.

**निर्ण** न. मर्म. (गो.)

**निर्णय** पु. १. निश्चय; निग्रह. २. सिद्धान्त; ठराव. ३. (कायदा) निकाल; निवाडा. [सं.]

**निर्णयचौकट** स्त्री. (संगणक) प्रवाहआकृतीत अट किंवा प्रश्न लिहिण्यासाठी ठेवलेली चौकट.

**निर्णयपत्र** न. निकालाचा कागद; ठराव, शिक्षा यांचे पत्रक;(इं.) जजमेंट.

**निर्णयी, निर्णायक** न. (बीजगणित) काही विशिष्ट फले. ही ठरावीक नियमांनी काढता येऊन विशिष्ट प्रकारांनी मांडताही येतात; (इं.) डिटरमिनंटस्.
वि. १. निकाल, ठराव, निर्णय करणारा. २. निर्णय करण्यासाठी प्रवृत्त करणारा; निश्चायक; निर्णयाला उपयोगी. ३. निश्चित; ठाम.

**निर्णायक मत** मते घेताना दोन्ही बाजूंना सारखी मते पडली असता सभापतीने सूचना निकालात काढण्यासाठी देण्याचे जादा मत.

**निर्णीत** वि. १. निर्णय केलेला; ठरवलेला. २. निवाडा, फैसला केलेला; शिक्षा सुनावलेला. [सं.]

**निर्णुंचे** अक्रि. घेरी येणे; भांबावणे. (गो.)

**निर्तुटक** न. १. तुटणे, तोडणे, मोडणे (संबंध, संघ, सहवास). २. मिटवणे; समेट करणे (भांडणाचा).
वि.१. तोडलेले; मोडलेले. २. विस्कळीत. ३.निश्चित. [सं.निर्+त्रुट्]

**निर्दम** वि. १. पहा: **निर्भेळ**: 'सात लक्ष निर्दम चांदीचीं उंचउंच तीं चौतली।'- पला २४.५१. २. सबंध; एकजात; एकजिनसी.

**निर्दय-यी** वि. कठोर; निष्ठुर. [सं.]

**निर्दया** स्त्री. निष्ठुरपणा: 'मातोश्रींनी निर्दया केली आहे.'- पेद २६.५२. [सं.]

**निर्द(र्दा)ळणे** उक्रि. १. नाश, धुळधाण करणे. २. रगडणे; दांडगाई करणे.

**निर्दालन** न. १. संपूर्ण नाश; धुळधाण; नायनाट; पूर्ण घात, उद्ध्वस्त करणे. २. टंगळमंगळ; चालढकल; चुकवाचुकव. [सं.]

**निर्दिष्ट** वि. १. वर्णन केलेले; सूचित; दर्शित; निरूपित. २. बजावलेले; आज्ञापित; सांगितलेले; दाखवलेले; शासित. [सं.]

**निर्देश** पु. १. वर्णन; निरूपण; उल्लेख; सांगणे; दाखवणे. २. आज्ञा; हुकूम; आदेश; अधिकाराने दाखवलेली दिशा, मार्ग. [सं.]

**निर्देशक** पु. (बीज.) आलेखात संख्यारेषा अक्षावरील बिंदूशी संगत असणारी संख्या.

**निर्देशपुस्तिका** स्त्री. महाविद्यालय, संस्था, कंपनी इ.ची ओळख करून देणारी पुस्तिका;(इं.) प्रॉस्पेक्टस.

**निर्देशसूची** स्त्री. अनुक्रमणिका; वर्णक्रमसूची.

**निर्देशस्तंभ** पु. दिशाफलकाचा खांब.

**निर्देशांक** पु. दैनंदिन वापरातील वस्तूंच्या भाववाढीचा तुलनात्मक आकडा.

**निर्देशिका** स्त्री. दूरध्वनिक्रमांकांची यादी; (इं.) डिरेक्टरी.

**निर्दोष** वि. अपराध, दोष, व्यंग इ. विरहित; शुद्ध. [सं.]

**निर्द्वंद्व** न. १. भांडणाचा, मतभेदाचा अभाव. २. जग आणि ईश्वर एकच असा भाव.
वि. १. भांडणातून मुक्त. २. भेदरहित; परमात्म्याशी अभेद मानणारा. ३. दुजेपणा, परकेपणा नसणारा: '-... तरी पिता साहे निर्द्वंद्व। तैसें साहिजो जी।'- ज्ञा ११.५७३. ४. सुखदुःख, सत्यासत्य, मानापमान इ.च्या पलीकडे गेलेला. [सं.]

**निर्धन** वि. दरिद्री; कंगाल; गरीब. [सं.]

**निर्धात-तु, निर्धातुक** वि. १. अंगात धातू, वीर्य नसलेला; नपुंसक. २. चीजवस्तू, पैसा नसणारा; दरिद्री; निर्धन. [सं.निर्+धातु]

**निर्धार** पु. १. निश्चय; खात्री; विश्वास. २. संकल्प; ठाम उद्देश. ३. निकाल; निर्णय; निःसंदिग्धता. ४. नियम; नेम. ५. आधार; आश्रय. [सं.]

**निर्धारण** न. १. निश्चय,खात्री करणे; ठरवणे. २. संदेहाभाव. [सं.]

**निर्धारणे** उक्रि. १.निश्चित करणे; ठरवणे. २. निःसंदिग्धपणे जाणणे.

**निर्धारित** वि. निश्चित, कायम केलेले, ठरवलेले; खात्रीलायक.

**निर्धास्त** वि. १. बिनधोक; निर्भय. २. स्वस्थ; निष्काळजी; बेफिकीर; निर्घोर. [सं.निर्+अर.दहशत]

**निर्धोक** वि. १. भयरहित. २. बेफिकीर.

**निर्नायक** वि. शास्ता, पुढारी नसलेला (देश, संघ इ.). [सं.]

**निर्नायकी** स्त्री. अंदाधुंदी; बेबंदशाही; अराजकता.

**निर्निमित्त** वि. निमित्तावाचून, कारणाशिवाय (बोलणे, जाणे इ.).

**निर्पुट, निर्पुटवाणा-णी-नी** वि. अगदी स्वच्छ. (व.,घाटी)

**निर्पुस** वि. खरपूस.- शर.

**निर्बल** वि. दुर्बळ; अशक्त; कमजोर; शक्तिहीन. [सं.]

**निर्बळनस** वि. ज्याचे मज्जातंतू क्षीण आहेत असा.

**निर्बळी खेळ,डाव,प्रकार** (बुद्धिबळ) खेळात निजोरी मोहरी मारून घेण्याची रीत.

**निर्बंध** पु. १. निश्चय; पहा: **निर्धार**. २. मर्यादा; बंदी; नियम; कायदा; हुकूम; शासन; आज्ञा; कानू. ३. ताबा; दाब; आळा. ४. आग्रह. [सं.]

**निर्बंधक** वि. प्रतिबंधक.

**निर्बाण** पु. पहा: **निर्वाण**
वि. घर, कुटुंब, संसार इ. नसलेला; फटिंग. [सं.निर्वाण]

**निर्बाणी** पु. गोसाव्यांतील एक पंथ; हे गोसावी पूर्ण नागवे फिरतात.
वि. धाडसी; कोणाचीही पर्वा न करता एकटा, धडाडीने पुढे जाणारा, काम करणारा; संकटाला, अडचणींना न जुमानणारा. [सं.निर्वाण]

**निर्बाध** वि. १. पहा: **निर्दोष**. २. आक्षेप न घेता येण्यासारखा. ३. निर्धोक; निश्चिंत; बाध नसलेला. ४. शांत; एकांताची; निरुपद्रवी (जागा).

**निर्बी, निर्बीज** न. बीजही उरले नाही असा पूर्ण नाश; निर्मूलन.

**निर्बीज** वि. १. बी नसलेली, बीजरहित (फळे). २. संपूर्ण नाश, उद्ध्वस्त, नायनाट केलेला. ३. निराधार, अविश्वसनीय (बातमी इ.).

**निर्बीजीकरण** न. शस्त्रक्रिया करून प्राण्यांचा अंडकोश किंवा वृषण या बीजोत्पादक ग्रंथी काढून टाकण्याची प्रक्रिया.

**निर्बुजणे** अक्रि. कंटाळणे; अगतिक होणे. [सं.निर्+बुज्]

**निर्बुद्ध-द्धी, निर्बु(र्बू)ज** वि. १. मूर्ख; मंद; मठ्ठ: 'कां निर्बुज केलें चित्त। सांगें त्वरित मजलागीं।'- भवि १६.१९१. २. ध्यानभ्रष्ट; अज्ञानी; समज न आलेला. [सं.]

**निर्बूज** वि. १. (गंजिफांचा खेळ) ज्याच्या डावाला पानांचा भरपूर पुरवठा लागत नाही असा. २. बुद्धिबळातील संज्ञा.

**निर्बोध** वि. १. अशिक्षित; न शिकवलेला. २. उपदेश, शिक्षण मिळाले नसतानाही जाणणारा. ३. शिक्षण, ज्ञान, बोध घेण्याला अयोग्य. [सं.]

**निर्भय** वि. १. सुरक्षित; पहा: **निर्धास्त**. २. धीट; न भिणारा.
न. धोका, भीती यांच्यापासून मुक्ती. [सं.]

**निर्भर** वि.१. भरपूर; पूर्ण भरलेला; गाढ; अतिशय: 'हरुषें निर्भर उद्दित। सुप्रसन्नवदनु।'- दास १.२.९. २. विश्वसून , अवलंबून असलेला; आश्रयी.
पु. १. एखाद्या गोष्टीचा ध्यास, हव्यास, पिच्छा, पाठलाग; मनाची अतिशय ओढ, कल, निष्ठा. (क्रि. धरणे, ठेवणे, राखणे). २. एखाद्या गोष्टीत आनंदाची, आवडीची परिपूर्णता. ३. अतिशय नैपुण्य. ४. विश्वास; भरवसा; आधार. [सं.]

**निर्भर्त्सणे** उक्रि. १. निंदा करणे; दोष लावणे. २. तिरस्कार, उपहास, अवहेलना करणे. [सं.निर्भर्त्सना]

**निर्भर्त्सना** स्त्री. निंदा; उपहास; पाणउतारा. [सं.]

**निर्भागी** वि. अभागी; फुटक्या नशिबाचा.

**निर्भीक** वि. स्पष्ट; असंदिग्ध; धीटपणाचे; भयरहित.

**निर्भीड** वि. १. भीडभाड न ठेवणारा; स्पष्ट बोलणारा; बेमुर्वत; निःस्पृह. २. (निंदार्थी) उद्धट; मान, आदर न ठेवणारा.

**निर्भेळ** वि. १.शुद्ध; अस्सल; भेसळ नसलेला; साफ, स्वच्छ. २. एकजात; एकजिनसी.

**निर्भ्रांत-ती** स्त्री. खात्री; विश्वास; निश्चय; मनाचा निःशंकपणा.
क्रिवि. १. खात्रीने; निश्चयाने. २. कां कूं न करता; न कचरता; निःशंकपणे. [सं.]

**निर्मणी** स्त्री. उत्पत्ती; रचना. (गो.) [सं.निर्माण]

**निर्मनुष्य** वि. पहा : **निर्जन** [सं.]

**निर्मम** वि. माया, ममता, आसक्ती नसणारा (माणूस). [सं.]

**निर्ममत्व-ता** न स्त्री. ममत्वाचा, आसक्तीचा अभाव. [सं.]

**निर्मळ-ल** वि. १. मळ नसलेला; शुद्ध; स्वच्छ; पवित्र. (ल. व शब्दशः) माती नसलेले (वस्त्र); ढग नसलेले (आकाश); कपट नसलेली (बुद्धी) इ. २. निर्भेळ. [सं.निर्मल]

**निर्मळी** स्त्री. १. एक वनस्पती; निवळी. हिचे बी चपटे व गोल असते. त्याचे चूर्ण गढूळ पाण्यात टाकले तर पाणी स्वच्छ होते. २. पाण्यासारखा जुलाब होणे; अतिसार.(गो.) [सं.निर्मल]

**निर्माण** वि. १. उत्पन्न केलेले. २. बनवलेले; तयार केलेले; परिणाम पावलेले. [सं.]

**निर्माणागार** न. वस्तू-उत्पादनाचा कारखाना; (इं.) फॅक्टरी.

**निर्माणी** स्त्री. प्रयोगशाळा: 'हरमान आइन्स्टाइन ह्यांची एक छोटेखानी 'विद्युत रसायन' निर्माणी होती.'- आईनस्टाइन ९.

**निर्माणे** न. नांगराची मूठ. (गो.)

**निर्माता** पु. १.उत्पादक(वस्तू इ.चा). २. प्रायोजक (चित्रपट, कार्यक्रम इ.चा). [सं.]

**निर्माल्य** न. १. देवाला वाहून नंतर काढलेली फळे, फुले; शिळी फुले. २. वास घेतल्याने, पाय लागल्याने देवाला वाहण्याला अयोग्य झालेली फुले इ. ३. (ल.) मर्जीतून उतरलेला, जुना झालेला, अधिकार-सत्ता नसलेला माणूस, वस्तू; निर्बल, तेजोहीन व्यक्ती;उपभोग घेऊन टाकून दिलेली स्त्री. [सं.]

**निर्मिक** पु. म.फुले यांनी विश्व निर्माण करणारी शक्ती या अर्थी ईश्वराच्या ऐवजी योजलेली संज्ञा.

**निर्मिती** स्त्री. १. निर्माण करणे. २.निर्माण केलेले सजीव, निर्जीव असे सर्व. [सं.]

**निर्मु(र्मो)ळी** स्त्री. १. अजीर्ण; अपचन. २. पहा: **निर्मळी**

**निर्मूल-ळ** वि. १. मूळ, पाळ नसलेला. २. मुळासकट नाश पावलेला; उपटून काढलेला. ३. निराधार; बिनबुडाची; अविश्वसनीय (बातमी इ.).

**निर्मूलन** न. समूळ नाश, उच्छेद; अत्यंत अभाव. [सं.]

**निर्याण** न. १. प्रस्थान; प्रवासाला निघणे; बाहेर पडणे. २. पुढे अथवा बाहेर जाणे. ३. मोक्ष; निर्वाण. [सं.]

**निर्यात** स्त्री. देशाबाहेर जाणारा माल,सेवा.

**निर्यातवाटा** पु. १. एकूण उत्पादनापैकी निर्यातीसाठी ठरवलेला भाग. २. एखाद्या वस्तूचा निर्यातदारांमध्ये ठरवलेला हिस्सा.

**निर्यापन** न. १. काढून टाकणे. २. हद्दपारी. [सं.निर्यापण]

**निर्यास** पु. १. झाडांपासून मिळणारा गोंद, राळ इ. नैसर्गिक स्राव. २. सार; काढा; अर्क: 'निर्यास गेलें। रसरायाचें।'– भाए ९९.[सं.]

**निर्लज्ज** वि. बेशरम; लज्जाहीन; निलाजरा; उद्धट; दांडगा. [सं.]

**निर्लेखित** वि. बुडीत म्हणून शेरा मारलेला; (इं.) राईट ऑफ.

**निर्लेप** वि. १. अलिप्त; न लागलेला, शिवलेला; न विटाळलेला. २. शिजवल्यावर, भाजल्यावर खरकटा न होणारा; धान्यफराळाचे अन्न. ३. खरकट्याचा स्पर्श नसलेला (खाद्यपदार्थ). ४. ज्याच्यावर दुसरा पदार्थ चिकटत नाही असा. ५. पवित्र; शुद्ध; शुचिर्भूत. ६. (निंदार्थी) डामडौल, हौस, जेवणखाण यांनी विरहित (लग्नादी समारंभ). ५. ज्यात उठावाचे चित्रकाम केलेले नाही असे (देऊळ): 'निर्लेपे देउळीं पहुडती'– मूप्र २४०८. ६. स्वरूप: 'तो आत्मारामु सानंदी रमतु: निर्गुणा निर्लेपा जीवातें उधरीतु:'– मूप्र ३४७. [सं.]

**निर्वच** पु. निर्णय; निश्चय; सिद्धांत: 'प्राप्ता मतांतरां। निर्वचु कीजे।' –ज्ञा १३.२४०. [सं.निर्वचन]

**निर्वचणे** उक्रि. १. विवेचणे; वर्णन करणे; उघड करणे. २. सांगणे; बोलणे. ३. निश्चय करणे: 'जो निर्वचूं जातां वाढे।'– ज्ञा १०.२६८.

**निर्वचन** न. १. व्याख्या; वर्णन; निरूपण. २. वचन; भाषण. ३. एका भाषेतून दुसऱ्या भाषेत तत्काळ अनुवाद करणे. [सं.]

**निर्वचनीय, निर्वाच्य** वि. व्याख्या, वर्णन करण्यायोग्य; सांगता-बोलता येण्यासारखे. [सं.]

**निर्वडी** क्रिवि. लगेच; ताबडतोब: 'मारितां न लगे अर्धघडी। तो मंत्र निर्वडी सांगेन।'– भाराबाल १२.४७. [सं.निरवधि]

**निर्वनीकरण** न. १. (कायदा) जंगल-कायद्याखाली एखादी जमीन जंगलासाठी राखून ठेवली असेल तर ती सोडवून घेण्यासाठी कायदेशीर कारवाई करणे. २. जंगल तोडून नाहीसे करणे.

**निर्वंच** वि. न. फसवणारा: 'तैसा प्रलयीं संहारे प्रपंच। तो मिथ्या हा निर्वंच।'– विउ ६.५७. [सं.]

**निर्वंश** पु. वंशाचा, कुळाचा संपूर्ण नाश; बिमोड; नि:संतान; वंशच्छेद. वि. संतानहीन; मूल नसलेला. [सं.]

**निर्वंशी कलम** वंशक्षय झालेल्या पिढीतील पिशाच्च. त्या वंशाचे घर इ. जो उपभोगतो त्याला ते झपाटते.

**निर्वाचक** वि. निवडणुकीसंबंधी.
पु. मतदार; निवड करणारा.

**निर्वाचन** न. निवडणूक.

**निर्वाण** न. १. निदान; अंतिम मर्यादेपर्यंत पोचण्याची स्थिती. २. मोठे संकट; अनर्थ; शेवट; अखेर; अतिशय निकृष्टावस्था; निरुपायाची स्थिती. ३. (ल.) मृत्यू; मरण. ४. मोक्ष; सायुज्यप्राप्ती. ५. कठीण मार्ग.
वि. १. पूर्णपणे गेलेला. २. मृत; नष्ट. ३. मायाजालापासून मुक्त. ४. मावळलेला; अस्ताला गेलेला (खगोल, तारा इ.). ५. परावृत्त; थांबलेला; निवृत्त. ६. पहा: **निर्वाणीचा**. ७. कठीण; पराकाष्ठेचा; तीक्ष्ण; दारुण; भयंकर. ८. अत्युच्च दर्जाचा; पराकाष्ठेचा. [सं.]

**निर्वाण(णी)चा** वि. संकटाच्या किंवा शेवटच्या प्रसंगासाठी राखून ठेवलेला.

**निर्वात** वि. १. शांत; निवांत; हालचाल नसलेले. २. वायुरहित.
न. १. हवा नसणे. २. वायुविरहित जागा. (शाप.) पोकळी.[सं.]

**निर्वातन** न. नाशिवंत पदार्थ टिकवण्यासाठी ते ज्या भांड्यात ठेवायचे असतील त्यात ठेवून त्यातील हवा काढून टाकून भांडे पूर्ण बंद करणे.

**निर्वाप** पु. १. पितरांना दान. २. एखाद्या यागासाठी भात इ. शिजवताना त्या यागातील मुख्य देवतेच्या उद्देशाने शिजवायला घेतलेले मूठभर तांदूळ इ. [सं.]

**निर्वापण** न. मालमत्तेसंबंधीचे, जमिनीसंबंधीचे अधिकार ती एकत्रित केल्यामुळे, नैसर्गिक आपत्तीमुळे संपूर्णपणे नाहीसे होणे.

**निर्वापन** न. १. मालवणे; विझवणे. २. नाहीसे करणे. (क्रि. करणे.)

**निर्वासन** न. १. हद्दपारी; देशातून घालवून देणे. २. नैसर्गिक आपत्ती, दंगल इ. अतिरेकी कारवाया अशा कारणांमुळे मूळ स्थान सोडावे लागणे.

**निर्वासित** वि. हद्दपारी, नैसर्गिक आपत्ती, अतिरेकी कारवाया इ. कारणांमुळे बेघर होऊन आश्रयाला आलेले.

**निर्वाह** पु. १. चालवणे; कारभार; संपादन; निवाडा; निकाल; व्यवस्था; तडीस, सिद्धीस नेणे. २. वर्तणूक; रीत; खरी स्थिती: 'मग सांगितला निर्वाह। चिंता न करा म्हणतसे।'– ब ४६६. ३. तात्पर्य: 'हा उपदेशी मुख्य निर्वाहो।'– एभा ३.३३८. ४. आश्रय देणे; पालन करणे; संरक्षण. ५. भरवसा: 'परि इस भगवंतीं थोर निर्वाह आहे।'– सारुह २.७६. ६. पार नेणे; खरे करून दाखवणे; प्रमाणांनी सिद्ध करणे. ७. दूर करणे; (भूक, थंडी, पाऊस इ.अन्न, वस्त्र इ.नी) उपद्रव होणार नाही असे करणे. ८. निश्चय: 'तदुपरि मग दोहीं हाच निर्वाह केला।'– सारुह २.११३. ९. कार्यक्षमता: 'नसें हें निर्वाहिं जननि मज सामर्थ्य भजनीं।'– सारुह २.२२. १०. धोरण: 'प्रस्तुत तेणें निर्वाहिं। निरूपण आइका।'– ज्ञा १८.५९. ११. उदरनिर्वाह; गुजारा; योगक्षेम. [सं.]

**निर्वाहणे** उक्रि. १. चालवणे; व्यवस्था लावणे; जोपासना करणे. २. पार नेणे; दूर करणे. ३. राहणे; एका स्थितीत असणे.

**निर्वाहते** वि. टिकणारे: 'परी आचरणींही नोहे। निर्वाहतें गा।'– ज्ञा १७.२५२.

**निर्वाळणे** उक्रि. १. धुणे; निर्मळ, शुद्ध करणे; चकचकीत करणे: 'प्रेमाचेनि भांगारें। निर्वाळूनि नूपुरें।'– ज्ञा १५.४. २. निर्मळपणे पूर्ण करणे: 'ग्रंथ नेटका निर्वाळिला।' – एभा २८.२३.
अक्रि. १. आकाश निरभ्र होणे; निवळणे. २. उत्पन्न होणे: 'तयापासोनि निर्वाळतें। सुखदु:ख।'– ज्ञा १३.९७५.

**निर्वाळा** पु. १. खात्री; विश्वास; समाधान; निर्धास्तपणा. (क्रि. असणे, होणे, देणे.). २. निवाडा; निश्चय. ३. शुद्धता. ४. परिपक्व दशा: 'कीं विरूढलिया जोंधळा। कणिसाचा निर्वाळा।' – ज्ञा १४.१२६.

**निर्विकल्प** वि. १. हेतू, कल्पना, विकल्प नसलेले; भेदरहित (ब्रह्म, देव,ज्ञान); वस्तूच्या गुण,रूप इ. धर्मांची अपेक्षा नसलेले (ज्ञान). २. एकाग्र. [सं.]

**निर्विकल्प समाधी** ज्ञाता, ज्ञेय व ज्ञान अशा त्रिपुटीची, भेदाची जाणीव

जिच्यात होत नाही अशी समाधी.

**निर्विकार** वि. १. ज्यात कोणत्याही प्रकारचा बदल, परिणाम कधीही होत नाही असा. २. (ल.) संथ; उदासीन; विकारशून्य (मन). [सं.]

**निर्विघ्न** वि. क्रिवि. संकट, अडथळा, अडचणी इ.नी विरहित. [सं.]

**निर्विवाद** वि. बिनतक्रार; अबाधित; शंकारहित; भांडण नसलेले. [सं.]

**निर्विष** वि. १. बिनविषारी (साप). २. (ल.) राग, अहंकार, मत्सर इ. सोडून दिलेला. [सं.]

**निर्वीर्य** वि. १. पौरुषहीन; नपुंसक. २. गुणहीन; परिणामकारक नसलेले (औषध). ३. (ल.) निर्जीव; भ्याड; तेज, पराक्रम नसलेला. [सं.]

**निर्वृति** स्त्री. १. सुख; संतोष. २. शांती; स्वास्थ्य. ३. मोक्ष. ४. समाप्ती. ५. नाश. ६. मृत्यू. [सं.]

**निर्वृति** स्त्री. सिद्धी; पूर्णता. [सं.]

**निर्वेच** वि. १. न संपण्याजोगा; अखंड; अविनाशी; अक्षय: 'म्हणूनि प्रपंच नव्हे हा निर्वेच।'– विउ ४.७. २. न खर्चणारा; पुढे शिल्लक राहणारा (भांडी, जवाहीर इ. माल). – भाअ १८३३.१३६.

**निर्वेद** पु. १. किळस; वीट; शिसारी; कंटाळा. २. विरक्ती; वैराग्य: 'तेहवळिं पैं एदु। तिये उपनला निर्वेदु।'– भाए ३८७. [सं.]

**निर्वेध** वि. १. निश्चिंत; निर्धास्त; बेफिकीर; निष्काळजी. २. त्रास; अडथळा नसलेला; निर्बाध. [सं.]

**निर्व्यसनी** वि. १. वाईट सवयी, व्यसने नसणारा. २. (ल.) संकटांपासून मुक्त (ईश्वर). [सं.]

**निर्व्याज** वि. निष्कपट; सरळ; निर्दोष: 'तैं कीड झडकरी तुटे। निर्व्याजु होय।'– ज्ञा १८.१५७. [सं.]

**निऱ्हा** क्रिवि. १. केवळ; निरा; अगदी: 'तरी त्यागु निऱ्हां दुआडु। वरिं इंद्रियांचा कैवाडु।'– भाए २२८. २. आत्यंतिक; निश्चयाचा: 'निऱ्हा विस्मितु जाली भीमकेचा सुधा मती माना।'– धवळे उत्तरार्ध २६. [हिं.निरा]

**निऱ्ही** घाम.

**निलक्या–खा** वि. निराळे. (कु.)

**निलख** क्रिवि. पूर्णपणे; निःशेष: 'करी घटुकामुखु। तरि मनोदंडु तोडी निलखु।'– भाए ४५६.

**निलगार** वि. सुताला निळीचा रंग देणारा. (बे.)

**निलट** वि. निर्लज्ज.

**निलय** न. जागा; स्थान; आलय. [सं.]

**निलंबन** न. काही दोषारोपामुळे कामावरून तात्पुरते दूर करणे. [सं.]

**निलंबन** न. १. ज्या स्थायूचे कण द्रवात विरघळत नाहीत असे स्थायू व द्रव यांचे विषमांग मिश्रण. २. घनपदार्थ व द्रवपदार्थ यांच्या मिश्रणातून घटक वेगळे करणे.

**निलंबनलेखा** पु. जमाखर्चात एखादी बाब काही कारणास्तव कोणत्या खात्यात टाकावी हे स्पष्ट होत नसेल तर तात्पुरती नोंद करण्याचे खाते.

**निलंबलेख** पु. करारातील अट पूर्ण होईपर्यंत तिऱ्हाइताच्या ताब्यात ठेवलेला दस्तऐवज.

**निला** स्त्री. (शाप.) कर्बनत्रिल. अत्यंत विषारी, रंगहीन, ज्वलनशील, बदामासारखा वास येणारा वायू. रासायनिक युद्धात याचा वापर केला जातो. (इं.) सायनोजेन. [सं.नील]

**निलाग–गी** वि. १. संबंधरहित; निराश्रयी; निराधार: 'अथवा निलागें निसरडा।'– ज्ञा ६.४७६. २. कीड न लागलेले (धान्य, लाकूड इ.). क्रिवि. पूर्ण निरुपयोगी: 'श्रेष्ठ मानूं चतुरानन। तोही निलागचि हीन।'– एभा ५.१८१. [सं.नि+लाग]

**निलाजरा** वि. न. तांदळात सापडणारे एक प्रकारचे गवताचे बी. वि. निर्लज्ज; बेशरम. [सं.निर्लज्ज]

**निलाड** न. कपाळ : 'मुह फाफट। निलाड चांपटु।'– राजमती III. [सं.]

**निला(ली)म** स्त्री. न.पु. पहा: **निरीम**

**निलीन** न. (शाप.) (इं.) ॲनिलीन. हे सेंद्रिय अनाम्ल असून निळीच्या विध्वंसक उर्ध्वपातनाने मिळते. यापासून बरेच रंग व ज्वरघ्न औषधे इ.त लागणारी द्रव्ये तयार करता येतात. [सं.नील]

**निवगरी, निवग्री** स्त्री. तांदळाच्या पिठाच्या उकडीचे वाटीसारखा आकार करून शिजवतात ते पक्वान्न. (को.)

**निवचड** पु. सोनार किंवा लोहार यांचा लोखंडी ऐरण बसविण्याचा लाकडी ठोकळा. (को.)

**निवटणे** अक्रि. १. फुटण्याच्या बेतात असणे; पूर्ण तयार, पक्व होणे (फळ, गळू इ.). २. प्रसिद्ध होणे; नावलौकिकाला चढणे; पुढे येणे (चांगल्या किंवा वाईट रीतीने). ३. तज्ज्ञ, निपुण होणे: 'गदायुद्धीं भीमसेन। अर्जुन निवटला शस्त्रास्त्री।'– पांप्र १०.५५. ४. स्पष्टपणे निश्चित होणे; उघडकीला येणे. [सं.नि+वट्]

**निवटणे** सक्रि. स्वच्छ करणे; शोधणे; (कापसातील सरकी) निवडणे. [सं.निवर्तन]

**निवड** स्त्री. इष्ट पदार्थ निराळा काढणे; वेचणे; छानणे; पसंती; निवडणूक. [प्रा. णिव्वड]

**निवड** स्त्री. नावड; अप्रीती; कंटाळा. (सामान्यतः आवड शब्दासोबत प्रयोग.)

**निवडक** वि. १. निवडलेले; वेचक; पसंत केलेले; शेलके. २. वेचल्यावर, चांगला भाग काढून राहिलेला गाळ.

**निवडणी, निवडणूक** स्त्री. १. वेचणी; पसंती; पसंत करण्याची क्रिया. २. मतदारांनी उमेदवार निवडून देणे.

**निवडणूक आयोग** मध्यवर्ती आणि राज्यांतील निवडणुका वेळेवर घेणे, गुप्त मतदानासाठी योग्य व्यवस्था करणे, मतमोजणीची व्यवस्था करणे, निर्वाचित उमेदवार घोषित करणे इ. निवडणूकविषयक सर्व जबाबदारी असलेला आयोग.

**निवडणे** उक्रि. १. वेचणे. २. (ल.) निर्णय, निश्चय, निकाल, निवाडा करणे, लावणे: 'चावडिये न्यावो अन्यावो। निवडी वेदु।'– ज्ञा १६.२९५. ३. निष्णात, निपुण होणे: 'ते विद्याजात पढती। यज्ञक्रिये निवडती।'– ज्ञा १७.७७. ४. पसंतीला येणे; हुडकून काढणे. ५. घालवून, हाकलून देणे: '... म्हणोनि निवडा त्या दोघांस। तरींच कल्याण तुम्हांसी।'– जै ७६.४३. [प्रा.णिव्वड]

**निवडुंग** पु. एक काटेरी झुडूप. प्रकार– तिधारी, फड्या इ. [सं.स्नुहिदंड]

**निवडुंगा** पु. घोड्याच्या लगामाचा एक प्रकार.

**निवण** न. १.पदार्थ निवत ठेवण्याची (चुलीजवळची) जागा. २. डोळ्यांची आग कमी होण्यासाठी त्यावर ठेवण्याची दुधात भिजवलेली कापसाची घडी.

**निवणी-णे** स्त्री. न. मडक्याच्या खालची काथ्याची, गवताची चुंबळ, बूड; गरम पातेले इ. ठेवताना कलंडू नये म्हणून त्याखाली ठेवण्याचे धातू, लाकूड, कापड इ. चे बूड.

**निवणे** अक्रि. १. थंड होणे; उष्णता नाहीशी होणे; कढतपणा जाणे. २. (ल.) हलका, कमी, शांत होणे; शमणे; मिटणे (राग, दंगल, लोभ, काम इ.). ३. खपणे, संपणे (तोफेचे गोळे). ४. (ल.) आनंदित होणे; विश्रांतीला राहणे: 'पाहे रम्याश्रमपद सीतासी त्यांत ती निवे कांहीं।'- मोवन ४.१३३.[सं.निर्वाण] (वा.) **डोळे, कान निवणे-** मनासारखी गोष्ट झाल्यामुळे समाधान होणे.

**निवरी** स्त्री. खाऱ्या पाण्यात होणारे एक झाड.- शे २.९.

**निवर्तणे** अक्रि. १. माघार घेणे; परतणे; पलट खाणे. २. बंद होणे; थांबणे; आटोपते घेणे. ३. (ल.) मरणे. ४. नाहीसे होणे: 'पहिला ऋद्धिसिद्धीचा संभ्रमु। तो निवर्तेनि गेला धुमू।'- ज्ञा ४.१३४. [सं.निवर्तन]

**निवर्तक** वि. मागे फिरवणारा; पिछेहाट करणारा. [सं.]

**निवर्तन** न. १. गुजराथेतील चार बिघे जमिनीचे परिमाण. २. दहा हात लांबीच्या वीस काठ्यांचे माप; औरस चौरस ४००० हात. ३. औरस चौरस तीनशे हात जमीन. [सं.]

**निवल-ली** स्त्री. शेर; चिकाडा; एक वनस्पती. (कु.)

**निवलकांडे** स्त्री. न. निवडुंग.(कु.)

**निववितें** वि. शांत करणारे : 'परि आतां चंद्रापासोनि निववितें। जे अमृताहूनि जीववितें।-' ज्ञा ९.२४.

**निवसणे** अक्रि. जवळ राहणे, वस्ती करणे: 'म्हणें आम्हांपाशीं तव गुरू विलासी निवसतो।'- र ३५. [सं.नि+वस्]

**निवसणे** सक्रि. कवळाची पाने तोडणे. (को.) [सं.निर्+वस्]

**निवळ** स्त्री. १. पातळ पदार्थातील जड अंश खाली बसून वर राहिलेला द्रवपदार्थ; गाळ तळाशी बसल्यावर राहिलेला शुद्ध, स्वच्छ द्रव. २. भाताची पेज; पेजेचे पाणी.(गो.,कु.) ३. ठोक रक्कम.

वि. १. स्वच्छ; शुद्ध; निर्मळ (पाणी, डोळे, आकाश इ.). २. (ल.) अकृत्रिम; शुद्ध; प्रांजळ. ३. नुसते; फक्त; केवळ.

क्रिवि. स्पष्टपणे; स्वच्छपणे; केवळ; नि:संशय; निर्विवाद; प्रांजळपणे; अकृत्रिमपणे; ढोंग, अवडंबर इ.न करता. [सं.निर्मल]

**निवळगाठ** स्त्री. १. स्वच्छतेची, शांतपणाची गाठ, भेट. २. दिलसफाईची, मोकळेपणाची मुलाखत.

**निवळण** न. १. पहा: **निवण**. २. पहा: **निवळ** १.३. पाणी निवळण्यासाठी त्यात टाकलेला तुरटीसारखा पदार्थ.

**निवळणी** स्त्री. सोनाराचे एक हत्यार. (गो.)

**निवळणे** अक्रि. १. स्वच्छ, तेजस्वी, चकचकीत होणे (डोळे, चेहरा, आकाश इ.). २.(ल.) थंड, शांत, स्वस्थ, सौम्य, गरीब होणे; विचारी, विनीत, नम्र होणे; सुधारणे (दुर्वर्तनी तरुण). ३. पूर्ण तयार झाल्यावर चांगले बनणे (कोवळ्या झाडाचा पहिला बहर वाईट निघतो, पण नंतर चांगला निघू लागतो त्यावरून); मुरणे (कोवळे फळ बेचव असते त्यावरून). ४. भिजल्यामुळे मादकता, उत्तेजकता कमी होणे (तंबाखू इ. ची ). ५. निपुण, हुशार होणे; चांगला जम बसणे (एखाद्या कामात, कलेत, शास्त्रात). ६. (चर्मकार.) केस, कान्ही इ. काढून टाकल्यावर (कातडे) पाण्यात ठेवल्याने स्वच्छ होणे. ७.(गोष्ट) स्पष्ट होणे. [सं.निर्मलन]

**निवळी** स्त्री. १. पहा: **निवळ** १. २. पहा: **निर्मळी** १. ३. बैलाच्या शिंगाला बांधलेला दोर, कासरा. (को.) ४. चुन्याचे पाणी. ५. मुलांचे घरगुती औषध. (कुडा, महाळुंग इ. ७-८ औषधी साली घालून तयार केलेला काढा.). (गो.)

**निवळो-ळॉ** पु. शेतातील पाणी ढकलून बाहेर लावण्यासाठी बांबूच्या काठीला बसवलेले लाकूड व फळी.(गो.)

**निवंतण** न. जेवायला बोलावणे; आमंत्रण. (व.) [सं.निमंत्रण]

**निवंता** स्त्री. उणीव; कमतरता; न्यूनता (नकारार्थी प्रयोग): 'भरलीं भांडारें द्रव्यास निवंता नाहीं।'- प्रला ९२. [सं.न्यूनता]

**निवंता** स्त्री. उसंत; शांतता. [सं.निवात]

**निवा** पु. निखारा; जळता कोळसा. (व.,ना.)

**निवाड-डा** पु. १. तडजोड; निर्णय; न्याय; निकाल; फैसला; ठराव.(इं.) जजमेंट. २. निष्पत्ती : 'पिकासी निवाडू देखिजे। अधिकाधिक।'- ज्ञा १०.५५. ३. भेद; भिन्नता: 'नाना घनीभूत सुवर्ण।...निवाडु दावी।'- ज्ञा १.४४. (वा.) **दोन जिवांचा निवाडा होणे-** गरोदर स्त्री सुरळीतपणे प्रसूत होऊन अपत्य व ती वेगळी होणे.

**निवाडपत्र** न. (कायदा) निकालपत्र; (इं.) डिक्री.

**निवाडापोवाडा** पु. मुक्तता, सुटका (अडचण, संकट, त्रास इ.तून, विशेषत: बाळंतपणातून).

**निवाडे** क्रिवि. १. निश्चयाने; हटातटानेः 'नांगर उचलूनिया निवाडें। नेहटूनि पाय ठेविला पुढें।'- एरुस्व १०.३३. २. खरोखरी: 'गळां मोतीं असोन निवाडें। लोकांचिया गळा पडे।'- ह २१.२२९.

**निवाणे** न. नाश; नुकसान; इजा; खराबी; तोटा. (क्रि.करणे).

**निवात** स्त्री. वाऱ्याचा अभाव; वारा वाहात नाही अशी वेळ.[सं.निर्वात]

**निवारण** न. १. परावृत्त करणे; परतवणे; मागे फिरवणे; दूर करणे. २. (ल.) बंदी; अटकाव; अडवणूक; टाळणे. [सं.]

**निवारणपत्र** न. कर्ज मागण्यासाठी, तगादा लावण्यासाठी धाडलेल्या नोकराला ते न मागण्याबद्दल त्याच्या मालकाने पाठवलेला बंदीचा हुकूम.

**निवारणे** सक्रि. १. मागे सारणे; दूर करणे; हटवणे. २. अडवणे; टाळणे; थोपवणे; येऊ न देणे; निवृत्त करणे. ३. बंद करणे; निषेध, मनाई करणे; वारणे. ४. समजूत घालणे: 'आर्ताची स्थिति ऐसी। जिज्ञासू निवारी त्यासी।'- एभा १९.२७४. [सं.निवारण]

**निवारशी--सी, निवारशीक, निवारीश** वि. वारस, मालक, चालक, कायदेशीर हक्कदार नसलेले; बेवारशी. [अर.निवारीश]

**निवारसा** पु. वारसाचा किंवा इतर न्याय्य हक्काचा अभाव; वारसा, स्वामित्व, हक्क, अधिकार इ. नसणे. [सं.नि+अर.वारिस]

**निवारा** पु. १. आश्रय; आसरा; स्थान; निर्वात जागा. (ऊन, वारा, पाऊस यापासून येणारे) संकट, अडचण यांपासून प्रतिबंध.

**निवार्य** वि. निवारण करण्यायोग्य; टाळता येण्याजोगे. [सं.]

**निवाऱ्याचा** वि. १. आश्रयाखाली असलेला. २. सुखात, शांततेत वाढलेला; आयुष्यातील धकाधकीचा ज्याला अनुभव नाही असा.

**निवाला** पु. घास.(व.) [अर.]

**निवास** पु. १. राहण्याचे ठिकाण; वसतिस्थान; घर. २. वसती; राहणे. [सं.]

**निवासादेश** पु. (सै.क्षे.) सैनिकांनी कुठे रहायचे ते दाखवणारा कागद.

**निवासी** वि. निवास, वस्ती करणारा; राहणारा. [सं.]

**निवाळले लोखंड** (ल.) निरोगी, धट्टाकट्टा म्हातारा माणूस.

**निविका** स्त्री. भविष्यनिर्वाहनिधी,भविष्यातील उपजीविकेसाठी तरतूद म्हणून साठवलेली रक्कम; (इं.) प्राव्हिडंड फंड.

**निविदा** स्त्री. १. अनुमती. २. कंत्राटाने काम करायचे असताना उत्सुक कंत्राटदारांनी आवश्यक माहिती भरून देण्याचा अर्ज; (इं.) टेंडर.

**निविदापद्धती** स्त्री. मोठे काम करायचे असताना ते चांगले व योग्य दरात व्हावे म्हणून निविदा मागवून त्यातून निवड करण्याची पद्धत.

**निविशिंदा** पु. कारकून (विशेषत: शस्त्रागारातील). [फा.]

**निविष्ट** वि. १. प्रविष्ट; अंतर्भूत; समावेश केलेले. २. स्थिर; बसवलेला; कायम केलेला (बैठक, जागा, अधिकार इ.वर); अधिकृत. ३. निपुण; प्रवीण. [सं.नि+विश्]

**निविष्टी** स्त्री. स्थूलमानाने उत्पादनासाठी लागणारा कच्चा माल व इतर गोष्टी; आदाने, निवेश.

**निवीत** न. माळेसारखे सोडलेले, सव्य किंवा अपसव्य नव्हे असे जानवे. [सं.]

**निवीसिंदगी** स्त्री. कारकुनी.

**निवृत्त** वि. १. मागे परतलेला, फिरलेला, परतवलेला. २. परावृत्त; थांबवलेला. ३. (एखादे काम) अर्धवट टाकून दिलेला; कामातून अंग काढून घेतलेला. ४. जीवयोनीतून मुक्त करणारा. ५. वयामुळे, नोकरीचा कालावधी संपल्याने सेवामुक्त झालेला. [सं.]

**निवृत्तरजस्क** वि. (वय झाल्यामुळे) जिचा विटाळ गेला आहे अशी (स्त्री). [सं.]

**निवृत्तरमण** वि. ज्याची संभोगशक्ती, प्रजननशक्ती गेली आहे असा (पुरुष). [सं.]

**निवृत्ति–त्ती–त्त** स्त्री. १. पहा: **निवारण**; विराम, लय पावणे; अडवणे; थांबवणे. (समासात) आचार–दु:ख–खेद– निवृत्ती. २. संसारातील विषयांकडून ईश्वराकडे वळणे; अंत:करण परत फिरणे. ३. मृत्यू. ४. सांसारिक उपाधींपासून मुक्तता; उपरती; विरक्ती; संन्यास; त्याग. ५. मुक्ती; मोक्ष; भगवत्प्राप्ती. ६. नोकरी, सेवा इ.तून कालावधी संपल्याने, वयामुळे दूर होणे, मुक्त होणे. [सं.]

**निवृत्तिमार्ग** पु. एकांतवासाची, ध्यानमग्न अवस्था; विहित आचारांपासून परावृत्ती; विहित कर्मांचा त्याग. [सं.]

**निवृत्तिवेतन** न. नियमानुसार सेवामुक्त झाल्यावर मिळणारे वेतन; पेन्शन.

**निवेदक** वि. १. सांगणारा; निवेदन करणारा. २. रेडिओ, टी.व्ही. वरून एखाद्या विषयाचे समालोचन करणारा, कथा, बातम्या इ. वाचून दाखवणारा. ३. संगीत किंवा कवितावाचन इ. कार्यक्रमात विषयपरिचय करून देणारा व मधून–मधून टिप्पणी करणारा.

**निवेदणे** सक्रि. १. सांगणे; बोलणे; कळवणे; भाषण, कथन करणे. २. अर्पण करणे; ओपणे; देणे. [सं.निवेदन]

**निवेदन** न. १. सांगण्याची, कळवण्याची क्रिया. २. अर्पण करण्याची, देण्याची, वाहण्याची क्रिया: 'करी बळी स्वात्म निवेदनातें ।'– वामन वामनचरित्र १.४०. [सं.]

**निवेदित** वि. १. सांगितलेले; कळवलेले. २. अर्पिलेले; दिलेले. [सं.]

**निवेश** पु. १. आत जाणे; प्रवेश; अंतर्भाव. २. आत घालणे; प्रवेश करणे; ठेवलेली, स्थापन झालेली स्थिती. ३. (ल.) अंतर्दृष्टी; निपुणता; प्रावीण्य. [सं.]

**निशा** स्त्री. १. खात्री; विश्वास; आश्वासन; मनाचे समाधान. (क्रि. करणे, होणे, पुरवणे). २. पतीची खात्री; हमी; जामीनकी. (क्रि. देणे, घेणे, पटवणे, पुरवणे): '... बाकी एवजाची निशा नबाबाकडून घेणें.–' समारो १३. ३. धालेपणा; मनशामोड; परिपूर्ती; अत्यंत, भरपूर तृप्ती; पुरेपूर होणे. [फा.निसआ–नसिआ]

**निशा** पु. बेहोषता; आनंद: 'पत्रें पाठविलीं प्रविष्ट होऊन आमचे चित्ताचा निशा जाहला.'– ब्रप ३०१. [अर.नशात्]

**निशा** स्त्री. रात्र. [सं.]

**निशाचर** वि. पु.१. रात्रीच्या वेळी फिरणारा. २.राक्षस; पिशाच्च. ३. चोर. ४. घुबड, वटवाघूळ इ. रात्री फिरणारे पक्षी, प्राणी इ. ५. रात्रीचे पहारेकरी, राखणदार; रामोशी: 'पन्नास पाऊणशे निशाचर बरोबर घेऊन कागोरीस जाऊन चंदनवंदनास यावे.'– पुद २.२०२.[सं.]

**निशाण** न. १. ध्वज; पताका; झेंडा. २. बंदूक, बाण इ.नी नेम धरण्याचे लक्ष्य; चांद. ३. नेम; चिन्ह; खूण; निशाणी. ४. नाण्यावरील पोतदाराची तपासल्याची खूण. [फा.निशान] (वा.) ० **उतरणे**– गोळी बरोबर लागणे; लक्ष्य भेदणे.

**निशा(सा)ण** पु. रणभेरी; डंका; नगारा: 'स्त्रियांसि म्हणे चित्ररथ स्वर्गी निशाण असे वाजत ।'– कथा २.१२.६१.[प्रा नि:साण] (वा.) **निशाणी घाव घालणे, देणे**– कूच करण्याचा, हल्ल्याचा नगारा वाजवणे: 'हरी भक्तिचा घाव घाली निशाणी ।'– राम २८.

**निशाण** स्त्री. शिडी. (कु.) [सं.नि:श्रेणी]

**निशाणचा हत्ती** १. ज्याच्यावर निशाण असते तो हत्ती. २. पुढारी; नेता.

**निशाणपकड** स्त्री. (मल्लखांब) दोरीच्या मल्लखांबावरील एक अढी.

**निशाण पोचवणे** मुलांचा एक खेळ.

**निशाणा** पु. शस्त्राला धार लावण्याचा दगड किंवा चाक; पलसणी.(व.) [सं.शाण]

**निशाणी** स्त्री. १. खूण; चिन्ह. २. लक्षण; सूचना. ३. होनाचा एक प्रकार; नाण्यावर खूण करण्याचे हत्यार; पंच. ४. (ल.) परिणाम; लक्षण; फळ.[फा.निशानी] (वा.) ० **होणे**– (वाईट रीतीने) अमर्याद, पराकाष्ठेचे, बेसुमार होणे.

**निशाणी-नी,निशीण** स्त्री. शिडी; जिना: 'जे अज्ञानतमाची तरणी। कैवल्यपदाची निशानी।'- दाव ४४. [सं.निःश्रेणी]

**निशान** न. हस्ताक्षर; सही. (तंजा.)

**निशा मृदा** मानवी मलमूत्र.

**निशांत** पु. रात्रीचा अखेरचा प्रहर.

**निशिगंध** पु.गुलछबू; एक फूल व फुलझाड. याला रात्री सुवास येतो.

**निशित** वि. तीक्ष्ण केलेले; (निसण्यावर) घासलेले, पाजळलेले.[सं.]

**निशिदिनी** क्रिवि. अहोरात्र.

**निशिभार्गव** पु. लक्ष्मीकृपेसाठी दर शुक्रवारी दिवसा उपास व रात्री जेवण करणे.

**निशी** शअ. सह; बरोबर; सहित.

**निशे** न. कांजी; पेजेचे पाणी.

**निशेदार** वि. हवाला, हमी देणारा; पतदार; साखदार; जामीन.

**निशेदार** वि. नशा, अंमल आणणारा; नशेबाज.

**निशेंडी-ड्या** वि. शेंडी नसलेला (मुसलमान).

**निशोत्तर** न. एक औषधी मूळ, तेड.

**निशौचे** क्रि. उतरणे. (गो.)

**निश्चक्र** वि. कडकडीत; निर्जळी; निरशन (उपवास): 'तेरा दिवस झाले निश्चक्र करितां।'- तुगा ५१२.

**निश्चक्र** वि. शत्रुरहित; परचक्ररहित. [सं.]

**निश्चय** पु. १. निर्धार; करार. २. निर्णय; ठराव; निकाल; अखेरचा फैसला; ठाम मत. ३. विश्वास; पूर्ण खात्री; भरवसा; श्रद्धा. ४. खात्रीने होणारी गोष्ट; सिद्धान्त.

क्रिवि. खात्रीने; न चुकता; निःसंशय. [सं.]

**निश्चयाचा** वि. १. न बदलणारा; निर्णीत; अचंचल. २. ज्याबद्दल शंका, प्रश्न उत्पन्न होणार नाही असा.

**निश्चल-ळ** वि. न हलणारा; अचल; स्तब्ध; स्थिर; एका जागी खिळलेला. [सं.]

**निश्चंद्र** वि. ज्याची चकाकी नष्ट झाली आहे असे (अभ्रक, भस्म, पारा इ.).

**निश्चित** वि. ठरावीक; खचित; कायम. [सं.]

**निश्चिती** स्त्री. निश्चय.

क्रिवि. निश्चयाने; खात्रीने; खचित.

**निश्चिंत** वि. चिंता, घोर, काळजी यांपासून मुक्त; निचिंत; स्वस्थ; बिनघोर. [सं.]

**निश्चिंती** स्त्री. १. अन्नवस्त्रादिकांच्या काळजीतून मुक्ती. २. स्वास्थ्य आणि सौख्याची हमी (धान्याची बेगमी केल्यामुळे).३. बेफिकिरी.

**निश्चेतन** वि. निश्चेष्ट; बेशुद्ध; भानावर नसलेला.

**निश्रेणी** स्त्री. १. शिडी. २. घोड्याच्या कपाळावर एकावर एक अशा क्रमाने असलेले तीन भोवरे. हे घोड्याचे शुभलक्षण समजतात.- अश्वप १.८६. [सं.निःश्रेणी]

**निषंड** वि. अखंड; सलग: 'जो निषंड हात सोळा'- उह ११८. [सं.नि+खंड]

**निषाद** पु. १. (संगीत) सात स्वरांपैकी सातवा स्वर; नी. २. कोळी, पारधी ही जात व त्यातील व्यक्ती. ३. कडू, हलकी जात. शूद्र स्त्रीला ब्राह्मणापासून झालेली संतती. [सं.]

**निषिद्ध, निषेधित** वि. १. शास्त्र आणि समाज यांनी मनाई केलेले; त्याज्य. २.वर्ज्य.

**निषेध** पु. १. प्रतिषेध; मनाई; बंदी. २. नकार; परवानगी नसणे; शास्त्राची असंमती. ३. धिक्कार; निंदा. [सं.]

**निषेधणे** उक्रि. नाकारणे; नाही म्हणणे; न स्वीकारणे; नाकबूल, मनाई, बंदी करणे.

**निष्क** पु. १. सोन्याचे नाणे; मोहर; दीनार; (ज्यो.) चार रुपये किमतीचे एक परिमाण. २. एकशेआठ मासे भार सोने. ३. (सामा.) सोने.[सं.]

**निष्क** वि. अर्धा. [अर. निस्फ]

**निष्कपट-टी** वि. खोटेपणा, कपट यांनी रहित; सरळ; प्रांजळ; मनाचा मोकळा. [सं.]

**निष्कर्म** वि. १. धर्मकर्म, विधी यांपासून मोकळा, अलिप्त. २. काही धर्म, क्रिया न करता ईश्वरचिंतनात मग्न असलेला. ३. आळशी.[सं.]

**निष्कर्ष** पु. १. सार; तात्पर्य; सारांश (भाषण इ.चा). २. तत्त्व; मुख्य हेतू; निश्चय; सिद्धान्त. ३. शेवट; परिणाम. ४. कसोटीचा दगड; कसोटी; निकष. [सं.]

**निष्कर्षण** न. खनिजात मिळणारे अशुद्ध धातू प्रक्रिया करून शुद्ध रूपात मिळवणे.

**निष्कलंक** वि. डाग नसलेला; निर्मळ; शुद्ध; पवित्र; निर्दोष. [सं.]

**निष्कलंक पोलाद** क्रोमिअम व लोखंड यांपासून मिळणारा, गंज न चढणारा मिश्र धातू;( इं.) स्टेनलेस स्टील.

**निष्कंटक** न. भय, उपद्रव इ.पासून मुक्तता; शांततेची, स्वास्थ्याची स्थिती.

वि. १. काटे नसलेला. २. (ल.) धोका, भय, उपद्रव, अडचण इ. नसलेले (राज्य, रस्ता इ.); निर्धास्त. [सं.]

**निष्काम** वि. १. निरिच्छ. २.फळाची इच्छा न धरता केलेले (काम). ३. विरक्त; उदासीन. [सं.]

**निष्कारण** वि. १. कारणाशिवाय; अकारण. २. उपयोग, फळ, फायदा इ. नसलेला; व्यर्थ.

क्रिवि. कारण, जरुरी नसताना; आधार, प्रमाण नसताना. (क्रि. बोलणे, मारणे इ.). [सं.]

**निष्कासन** न. १. बाहेर काढणे. २. बडतर्फी; हकालपट्टी. ३. स्पष्ट, खुले करणे, सांगणे. [सं.निस्+कास]

**निष्कासवायू** पु. यंत्रे चालू असताना इंधनाच्या वापरातून बाहेर टाकला जाणारा वायू.

**निष्काळजी** वि. काळजी नसलेला; बेफिकीर; निर्घोर; निश्चिंत.

**निष्कांचन** वि. दरिद्री. पहा: **निर्धन**

**निष्कृती** स्त्री. १. नैष्कर्म्य स्थिती: 'जेणें फलत्यागें निष्कृती। नेलें कर्म।'- ज्ञा १८.२३२. २. मुक्तता; नाहीसे करणे; नाश. ३. निरसन; फेड; परिहार; प्रायश्चित्त (अपराध, नुकसान, इजा केली असता प्रायश्चित्त घेऊन दूर करणे.) : 'निष्कृति तुझिये पापासी। श्रीगुरु करील परियेसी।'- गुच २०.४१. [सं.]

**निष्क्रमण** न. १. निर्गमन; बाहेर जाणे. २. नवजात मुलाला घराबाहेर प्रथम नेण्याच्या सोळा संस्कारांपैकी एक संस्कार. [सं.]

**निष्क्रय** पु. १. ब्राह्मणाला गाय इ. दान देण्याऐवजी तिच्या किमतीइतके दिलेले द्रव्य अथवा इतर वस्तू. २. अशी बदली वस्तू किंवा त्याऐवजी द्यायचे धन ठरवणे, देणे. ३. विक्रय. [सं.]

**निष्टंक** पु. निश्चय; सिद्धान्तः 'जीवामाजी निष्टंकु। करिसी जो आत्यंतिकु।'– ज्ञा १८.१२८१.

वि. १. पक्का; दृढ; निपुण; कुशलः 'हें सैन्य असले निष्टंक। तरी लोटूनि कोटी दुःख। स्वस्थ जाईल माहेरा।'– मुवन ७.११६. २. पूर्ण; अखंडः 'अगा मानस हें एक। माझ्या स्वरूपीं वृत्तिक। करूनि घाली निष्टंक। बुद्धि निश्चयेंसि।'– ज्ञा १२.९७. ३. निःसंशय; निश्चितः 'गुरु ब्रह्म ऐक्य भावो। निजनिर्वाहो निष्टंक।'– एभा ३.३४३.

क्रिवि. १. पूर्णपणे; सर्वतः; बाकी, शेष न राहता. २. सर्वथा; सर्वांशी; पुरतेपणी; न्यूनाशिवाय; सर्व बाबतीत. ३. केवळ; निव्वळ; फक्त; मात्र. [सं.निस्+टंक]

**निष्टंकणे** क्रि. १. निश्चय करणे. २. निश्चयाने लावणे, आरोपणे. [सं.निस्+तर्क]

**निष्ठ** वि. खिळलेला; आत बसलेला; जुळलेला; निष्ठेने राहिलेला; अधिष्ठित. उदा. देहनिष्ठ इ. [सं.]

**निष्ठा** स्त्री. १. दृढ प्रेम; भक्ती; श्रद्धा; दृढासक्ती (मनाची, हृदयाची) . २. विश्वास; भरवसा; सत्य; खरी बुद्धी; निश्चय. ३. एकसारखी चाल, आचरण, धंदा. ४. कायम ठाण; जम; अधिष्ठान; स्थापना. ५. शेवट; अखेर; परिणाम; निर्णय; मोक्षदायक स्थिती, मार्ग; शेवटची अवस्थाः 'ज्ञान ही निष्ठा म्हणजे सिद्धावस्थेतील अखेरची स्थिती होऊ शकत्ये.'– गीर ४१२. ६. अवस्था; स्थिती. ७. मार्गः 'अवधारीं वीरश्रेष्ठा। ये लोकीं या दोन्ही निष्ठा।'– ज्ञा ३.३५. [सं.]

**निष्ठावान–वंत** वि. १. आदर, प्रेम असलेला; आसक्त; दृढभाव असलेला. २. विश्वास ठेवणारा; श्रद्धाळू, स्थिर वर्तनाचा; शाश्वत मार्गाचा; अचंचल वृत्तीचा.

**निष्ठुर** वि. १. निर्दय; क्रूर; कठोर मनाचा. ३. कठोर; कडक; कर्णकटू; कर्कश (भाषण इ.). [सं.]

**निष्णा** पहाः **निशाणा**

**निष्णात** पु. निपुण; प्रवीण; कुशल; वाकबगार. [सं.]

**निष्पत्ती** स्त्री. १. पूर्णता; समाप्ती; सिद्धीः 'जया का आथि पूर्ण निष्पती। जेथ रसु धरी व्यक्ती।'– ज्ञा १७.१५७. २. परिपाक; परिणाम; सार; शेवट. ३. उत्पत्ती. ४. (भूमिति.) मापन. ५. (सामा.) फळ; लाभ; उपयोग; पहाः **निष्पन्न**. ६. (द्रव्याची) ठेवः 'बंभी निष्पत्ती सोनेया साहसु'– एकु (पळस शिलालेख १,२). [सं.]

**निष्पन्न** न. १. उत्पन्न केलेले. २. पूर्ण झालेला; पक्व. ३. निपुण; ज्ञाता. ४. कृतार्थ; धन्य; सर्व पुरुषार्थ पूर्ण केलेलाः 'ऐसिये असाधारणें। निष्पन्नाचीं लक्षणें।– ज्ञा ६.१०७. [सं.]

**निष्पक्षपात** पु. समतोलवृत्ती; समानपक्षता; एकतर्फी नसणे; कोणतीही एक बाजू न धरणे. [सं.]

**निष्पक्षपाती** वि. १. समदर्शी–दृष्टी; पक्षपात न करणारा; तटस्थ. २. (ल.) न्यायी. [सं.]

**निष्पादक** पु. (मृत्युपत्र, करार इ.ची) अंमलबजावणी करणारा.

**निष्पादणे** उक्रि. उत्पन्न, निर्माण करणे, होणे. [सं.निष्पादन]

**निष्पाप** वि. पापरहित; पापहीन; निर्दोष. [सं.]

**निष्प्रभ** वि. प्रभा, तेज, प्रकाश, कळा नसलेला; फिक्का. [सं.]

**निष्प्रयोजन** वि. निष्कारण; विनाकारण; आधाररहित; अकारण. [सं.]

**निष्प्राण** वि.१. अगदी थकलेला; खूप अशक्त; जवळ जवळ निर्जीव झालेला. २. मेलेला. [सं.]

**निष्फळ** वि. १. (ल. व शब्दशः) व्यर्थ; फलहीन; विफल; निरर्थक. २. निरुपाधिकः 'जय जय देव निष्फळ। स्फुरदमंदानंद बहळ।'– ज्ञा १८.४. [सं.निष्फळ]

**निसका** (कु.) पहाः **निर्लज्ज**

**निसखंडारा** पु. संपूर्ण नष्ट.

**निसटणे** अक्रि. १. जागेपासून दूर होणे; जागा सोडणे. २. (ल.) बाहेर निघणे, पडणे (त्रासदायक कामांतून इ.); अडचणींतून हळूच बाहेर पडणे; सुटणे. ३. फुटणे; उसळणे; फुटून, सुटून जोराने बाहेर येणे. ४. निसरणे; घसरणे; सरकणे. ५. पळून जाणे.(व.) [सं.निःसृष्ट]

**निसडा धोंडा** पहाः **निशाणा**: 'एक गारुडी निसडा धोंडा मांडुनिया जवळी।'– विवि ८.८.१५८.

**निसण** न. १. (धान्य) निवडणे; स्वच्छ करणे. २. निवडलेला, स्वच्छ केलेला भाग. ३. वेचून, निवडून बाहेर टाकून देण्याचा भाग, गाळसाळ. [सं.निसन्न]

**निसण–न–णी** स्त्री. शिडीः 'ही नरकद्वाराची निसणी। जीव हिंसा।'– कथा २.१७.७६. [सं.निःश्रेणी]

**निसणा** पहाः **निशाणा**

**निसणी** स्त्री. सहाण. (व.) [सं.नि+शाण]

**निसणे,निसणे टि(टु)पणे** सक्रि. १. निवडणे; वेचणे. २. सोलणे; छिलणे; साफ करणे; साल, सालपट काढणे. [सं.निसन्न]

**निसत** वि. निर्लज्ज; कोडगा; बेशरम; भ्रष्ट; व्यसनी. [सं.निस्+सृ]

**निसपटणे** पहाः **निसटणे**

**निसपूस** स्त्री. निवडून साफ करणेः 'तुरीची डाळ निसपूस करून ठेविली...'– बाईविना बुवा.

**निसबत–द** स्त्री. १. दिम्मत; हवाला; सत्ता; हुकमत; देखरेख (मनुष्य, वस्तू, काम इ.वर). २. संबंध; नाते.

क्रिवि. संबंधाने; संबंधी; बद्दलः 'भिल्लांचें पारिपत्य करावयाची आज्ञा सरसुभा प्रांत खानदेश निसबत नारो कृष्ण यास केली आहे.'– वाडसमा २.१५३. [अर.निसबत]

**निसबतदार** वि. दिमतवार; ताबा, कबजा, हुकमत, व्यवस्था ज्याच्या हाती आहे असा; अधिकारी; कारभारी (मनुष्य).

**निसबतवार** वि. १. मालकीचा; संबंधी. २. ताब्यात, कबजात असलेला.

क्रिवि. ज्यांच्या ताब्यात माणसे, वस्तू इ. दिलेल्या आहेत अशांच्या नावांच्या अनुक्रमाने, यादीप्रमाणे (यादी इ.).

**निसर** स्त्री. घसर; उतरंड. (गो.) [सं.निःसृ]

**निसरगाठ** स्त्री. एक टोक ओढल्याबरोबर सहज सुटणारी गाठ; आखूडगाठ; सुटगाठ; सुरगाठ. (वा.) ० **देऊन ठेवणे** – निसटण्याचे, सुटण्याचे साधन, उपाय राखून ठेवणे; पळवाट ठेवणे; सुटण्याचा, सोडवणुकीचा रस्ता काढून ठेवणे.

**निसरड-डे-ट-ण-णी, निसरंड** स्त्री. न. १. घसरडी, गुळगुळीत, घसरण्यासारखी झालेली जागा; घसरगुंडी. २. घसरण; घसरडेपणा; शेवाळ्याने वगैरे आलेला बुळबुळीतपणा. [सं.निः+सृ]

**निसरड-डा-ट,निसरंड** वि. बुळबुळीत; घसरडा; निसरड झाली आहे असा (वृक्ष, भूमी इ.).

**निसरणे** अक्रि. १. घसरणे; सरकणे; निसटणे. २. कमी होणे; ओसरणे: 'पुष्टि लागे विघरों। कांति पाहे निसरों।'– ज्ञा १३.७५६.[सं.निःसरण]

**निसरती** स्त्री. उतरंड. (गो.) [सं.निःसृ]

**निसरभोवडी, निसरबोडी** पु. मुलांचा एक खेळ.

**निसरफुगडी** स्त्री. (विशेषतः मंगळागौरीच्या रात्री खेळला जाणारा) फुगडीचा एक प्रकार.

**निसरवा** पु. १. पीक गोळा केल्यानंतर राहिलेला भाग; सरवा. २. ग्रामजोशाने पंचांग सांगून दारोदारी मिळवलेले धान्य. ३. खळ्यावरचे धान्य काढून नेल्यानंतर महारांनी वेचून घेण्याचे धान्य.[सं.निःसारण]

**निसरसांड** स्त्री. विस्मरण; स्मरणातून जाऊ देणे; विसरणे; काळजी, विचार, भान सोडणे; उपेक्षाबुद्धी ठेवणे.(क्रि.करणे).

**निसर्ग** पु. १. सृष्टी. २. स्वभाव; प्रकृती. ३. स्वाभाविक, नैसर्गिक अवस्था; सहज स्थिती. [सं.]

**निसर्गचित्र** न. जमीन, डोंगर, पाणी, पाने, फुले, कळ्या, झाड, वेल, कीटक, पक्षी इ. निसर्गातील घटकांचे, देखाव्यांचे चित्र; (इं.) लँडस्केप.

**निसर्गवाद** पु. १. (तत्त्वज्ञान) बुद्धिप्रामाण्यापेक्षा मानवी नैसर्गिक बुद्धीनेच ईश्वरज्ञान व नीतिज्ञान होईल असे प्रतिपादन करणारे मत. २. विश्व हा नैसर्गिक पदार्थांचा एक समुदाय व व्यवस्था आहे, निसर्गातीत असे काही नाही असे मानणारी विचारप्रणाली. ३. विज्ञानाचा तात्त्विक दृष्टिकोन, वर्ण्य विषयाचे सूक्ष्म निरीक्षण, अनुवंशिकता व आसमंताचे परिश्रमपूर्वक संदर्भ व काटेकोर तपशिलाचा अंतर्भाव ही वैशिष्ट्ये असलेली म्हणजेच नैसर्गिक कलाकृती असे मानणारा साहित्यिक दृष्टिकोन.

**निसर्गशेती** स्त्री. जपानी संशोधक फुकुओका यांनी शोधलेली व पुढील पाच तत्त्वांवर आधारित शेतीची पद्धत. १. जमिनीची मशागत, नांगरणी करायची नाही. २. रासायनिक खतांचा वापर करावयाचा नाही. ३. अवजारे किंवा औषधे वापरून तण काढायचे नाही. ४. कोणत्याही रसायनावर अवलंबून राहायचे नाही. ५. आच्छादन तंत्रे व द्विदल पिकांचे नियोजन यांवर भर द्यायचा.

**निसर्गोपचार** पु. आजारी माणसाला औषधे न देता बरे करण्याच्या नैसर्गिक प्रवृत्तीला साथ देणारे उपचार करून रोगमुक्त करण्याची पद्धत.

**निसल** वि. बरड (जमीन): 'निसले भूमी संस्कारु करावा:'– लीचउ १४६. [सं.निः+शल्य]

**निसवणी, निसवील** स्त्री. कणीस बाहेर पडण्याची, निघण्याची क्रिया; धान्य निसवण्याची क्रिया/ घटना. [सं.नि+सृ]

**निसवणे** अक्रि. १. लोंगर, कणीस बाहेर येणे. २. (ल.) चोरी, छिनाली इ. वाईट गोष्टींत निर्ढावणे; दुष्कर्मांविषयीं निर्लज्ज होणे; निःसंग बनणे. ३. तरबेज बनणे; पुढे येणे; (लिहिण्यात, बोलण्यात इ.) प्रसिद्ध होणे. ४. धैर्याने, धीटपणे पुढे येणे. [सं.नि+सृ]

**निसवणे** अक्रि. हत्याराला धार चढणे. (माण.) [सं.निसणा]

**निसवाड** स्त्री. केळीच्या झाडांना फुले येण्याचा काळ.

**निसवादी** वि. आळशी; मंद. (तंजा.)

**निसळ** वि. निर्दोष: 'जे सदा रिते मोकळे। जैशीं चंदनांगें निसळें।'– माज्ञा १३.२९१.

क्रिवि. पूर्णपणे; निर्भेळपणे; केवळ; निखळ. [सं.निस्+शल्य]

**निसळ** स्त्री.व्यवस्था; शिस्त; मिसल.

**निसळण-णी** स्त्री. (सोनारी) गोठ गोल करण्याचे हत्यार.

**निस(सा)ळणे** उक्रि. उजवणे; जिल्हई देणे; तजेला, चकाकी आणणे.

**निसंतान** न. १. निर्वंश; कुलक्षय. २. मूलबाळ नसणे किंवा झालेले न जगणे. ३. (ल.) नाश; विध्वंस.(क्रि. करणे, मानणे.) (शिव्याशाप देताना योजतात.) ४. (ल.) फन्ना; चट्टामट्टा; खाऊन फस्त करणे.[सं.]

**निसाठा** पु. (क्व.) खर्च होणे; फन्ना उडणे; झाडा, सफा होणे; (खजिना, साठा) कोरडा पडणे.

**निसाणी** स्त्री. शिडी: 'तो हा कैवल्यपदाची निसाणी।'– ऋ ६. [सं.निःश्रेणी]

**निसार** स्त्री. हलकी जमीन. (व.) [सं.निःसार]

**निसार** वि. स्वाधीन; ताब्यात: 'तो खजाना व माल आहे तो हजरतच्या निसार आहे.'– पेद २.४.

**निसास-सा** पु. उच्छ्वास; उसासा. (क्रि. टाकणे, देणे, सोडणे.). [सं.निःश्वास]

**निसासणे** अक्रि. १. धापा टाकणे. २. (ल.) जोराचा श्वासोच्छ्वास करणे; (थकल्यामुळे) सुस्कारा टाकणे. ३. दमणे; कंटाळणे; त्रासणे: 'तूं गुंतसी गोंविसी कां निसांसी।'– सारुह ८.१०९. [सं.निःश्वस]

**निसिणे** सक्रि. (शस्त्राला) धार देणे; पाजळणे: 'निसिलें विवेक साहणें।'– ज्ञा १५.२५९.

**निसिंदगी** पहा: **निवीसिंदगी**: 'पेसजी निसिंदगी सरकारांतून मुशाहिरा देऊन चालवीत असत.'– मइसा २०.३०४.

**निसिंदा** पु. लेखक. पहा: **निविशिंदा**: 'बालाजी निसिंदा पूर्वी सरकारतर्फेने होता.'– मइसा २०.३०५.

**निसी** स्त्री. आग्रह: 'हा ठावोवे ही शिष्या ची निसी।'– ज्ञा ११.६३६.

**निसुक** वि. शुष्क.– शर.

**निसुगाई** स्त्री. १. आळस; निरुद्योगीपणा. २. निर्लज्जपणा : 'निसुगाईचा संतोष । मानी तो येक मूर्ख ।'– दास २.१.१७.

**निसुट(र)ता** वि. ओझरता; निसटता; घसरता; चाटून, लागून जाणारा.

**निसुरणे** अक्रि. स्वैर वागणे; स्वच्छंद होणे; धाक, नियम इ. न जुमानणे.

**निसुंता** वि. सुंता न केलेला (मुसलमान).

**निसू** वि. निःसत्त्व. (गो.)

**निसूक–ग** क्रिवि. सरळ; तडक; न अडखळता; थेट (चेंडू, बाण इ. जाणे, लागणे, मारणे).

वि. १. निर्लज्ज; कोडगा; बेशरम: 'परि माझा निसुग गर्व अवधारी।'– ज्ञा ११.५५१. २. उनाड; स्वैर; व्यसनी. ३. आळशी: 'जैसें निसूग पडलें श्वान।'– रंयोवा १०.५२५.

**निसूर, निसूरवाणा–णी** वि. १. निष्काळजी; निर्वेध; निश्चिंत; शांत; बेफिकीर; निर्घोर: 'नाहीं हानि परि न राहावे निसूर। न पडे विसर काय करूं।'– तुगा ५९८. २. समाज, शास्त्र यांची मर्यादा सोडून निर्लज्ज झालेला. ३. निर्दय. [सं.निः+स्वर]

**निस्कारणे** उक्रि. तिरस्कार करणे; तुच्छ लेखणे; तिरस्काराने नाकारणे; धुडकावून लावणे; हडसावणे; छीःथूः करणे.

**निस्टे** न. फडके.– भाषाप्रकाश.

**निस्तर** पु. उपाय.(गो.)

**निस्त(स्ता)रण, निस्तार** न. पु. १. बाहेर किंवा पुढे जाणे. २.तरणे; पैल जाणे. ३. सुटणे; निसटणे; सुटका: 'मग जिवा देखिला निस्तारू। भवार्णवांतु।'– भाए ५१. ४. मोक्ष; मुक्ती; सिद्धी. ५. उपाय.– शर. ६. फेड; निस्तरणे.

**निस्त(स्ता)रणे** सक्रि. १. पुरे करणे; पार पाडणे; तडीला नेणे (एखादे केलेले काम, चुका दुरुस्त करून, अपुरेपणा काढून टाकून, परत पूर्ववत करून); चूक सुधारणे. ३. निष्कृती करणे; (केलेले दुष्कृत्य सुधारण्यासाठी प्रायश्चित्त, शिक्षा, दुःख इ. भोगून त्याचा बरेवाईटपणा सोसून एखादे काम, कारभार) सावरणे; दुष्कर्मांची फळे भोगणे.

अक्रि. सुखरूपपणे पार पडणे: 'तरी प्रजा हे कैसेनि। निस्तरेल।'– ज्ञा ३.१६६. [सं.निस्तरण]

**निस्तरा** पु. झाडा.

**निस्ता–स्ते** वि. नुसता; केवळ; फक्त; निव्वळ; कोणत्याही जरुरीच्या वस्तूची मदत नसलेला.

**निस्ताई** स्त्री. सावकाशपणा; सवड. (खा.,व.) [हिं.]

**निस्तार** पु. वहिवाटीचा हक्क.

**निस्तु(स्तो)ष, निस्तु(स्तू)क** वि.क्रिवि. १. तूस, कोंडा नसलेला. २. काही शेष, अंश नसलेला; पुरा गेलेला (रोग इ.); सर्वस्वी; अगदी; निःशेष; बिलकुल; अजिबात. ३. पूर्णपणे; पुरतेपणी; सर्वथा; व्यंग, न्यून इ.शिवाय; सर्व प्रकारांनी, तऱ्हांनी, अंगांनी. ४. केवळ; निव्वळ; फक्त. [सं.निस्तुष]

**निस्तेज** न. अपकीर्ती; अपमान: 'निंदा निस्तेज दंडी। कामलोभा वरपडी।'– ज्ञा १३.४९४.

वि. १. फिका; तेजोहीन; चकाकी नसलेला. २. (ल.) मंद; निर्बळ; मद्दड; निरुत्साही. [सं.]

**निस्तेजणे** उक्रि. १. तेजोहीन होणे; फिके पडणे. २. पाणउतारा, मानहानी, अपमान करणे.

**निस्त्याक** न. १. कालवण; आमटी; सांभारे (विशेषतः मासळीचे).(कु.) २. मासळी; मासे.

**निस्त्याला–स** क्रिवि. कोरड्यास–ला; भाकरी, भात इ.बरोबर खायला, तोंडी लावण्यासाठी.

**निस्त्रिंश** न. खड्ग; तरवारीचा एक प्रकार.

**निस्रोत्र** वि. करमुक्त: 'सेत निस्रोत्र करूनि दिधले.'– विजा शिला १.६.

**निस्सन** स्त्री. बैलगाडीची धुरा, दांडा; साटली.

**निस्सयेल** वि. आळशी: 'कसे पडले घोरत असे निस्सयेलावानी.'– ब १४९.

**निस्सवली** वि. ताळतंत्र सोडलेली: 'निस्सवली नार काय करती भाऊबंद?'– ब १९९.

**निस्सीम** वि. अमर्याद; पराकाष्ठेचा; श्रेष्ठ दर्जाचा; परमावधीचा. [सं.]

**निहट** वि. जवळ; समीप: 'सरोवरां निहटीं। घातली सोनकेतकीची ताटी।'– शिव ६५२. [सं.निकट]

**निहमत** स्त्री. धैर्य. [अर.]

**निहंग** वि. द्वंद्वयुद्ध खेळणारा.

**निहा** पु. गर्जना; निनाद: 'जेथ भद्रजाती सारसीः निहे विसंवती आकासीं:'– रुस्व २२२. [सं.निहव]

**निहाय** क्रिवि. १. पासून–पर्यंत; भर; सर्व; प्रत्येकी. (समासात) महाल–जिल्हा–खोत निहाय. २. मध्ये. उदा. पाटील–महार–निहाय=पाटला–महारा–मध्ये. [अर. निहायत्]

**नि(न्य)हायत** स्त्री. सीमा; पराकाष्ठा: 'महाराजांनीं अंगेजीची व जातीनिशी मर्दुमीची निहायत केली.'– चित्रगुप्त ३२१. [अर.निहायत्]

**निहार** वि. सुंदर.

**निहारु** पु. न्याहाळण्याची क्रिया; टक: 'याचा भितरु। न साहे निहारुं।'– भाए ३९९.

**निहाली** स्त्री. निजण्याची चटई.

**निहाळणे** सक्रि. पाहणे. पहा: **निरखणे**: 'जें केव्हां तुझें वदन। निहाळुं आम्ही आतां।'– रास ३.३८. [हिं.निहालना]

**निहित** वि. १. दिलेले; स्वाधीन केलेले. २. न्यस्त; ठेवलेले. [सं.]

**निहीन** वि. बारीक पीठ.

**निहेटणे** सक्रि. भिडणे; धडक मारणे: 'निहेटले पर्वत।'– ज्ञा ११.३०८.

**निहूळ** वि. धिमा; मंद; हळू. (व.)

**निळ(ळं)ग(घ)णे** अक्रि. गळून जाणे; ग्लानी येणे.

**निळता** स्त्री. हेळसांड; हेटाळणी; अश्रद्धा: 'देवीं धर्मीं निळता न व्हावी.'– वलो ७४.

**निळवा** पु. जोंधळ्याची एक जात. याचे ताट बळकट व जाड असते.

**निळवे** न. एक छटाक (माप).

वि.अर्धे कोवळे.

**निळंगळी, निळंगी–घी** स्त्री. ग्लानी; मर्गळी; सुस्ती; जडता (उपवास, अतिश्रम, एकाच जागी पुष्कळ वेळ बसणे इ. मुळे आलेली).

**निळंबी** स्त्री. निळीचे झाड.

**निळा** पु.स्त्री. टवटवी; तजेला (चेहरा, स्वरूप यांवरील).

वि. १. मेघासारख्या रंगाचा; सावळा; श्याम; नील. २. नुसता, एकजात पांढरा (घोडा). ३. हिरवा; ताजा; कोवळा (पीक, गवत, बाटूक इ.).

४. टवटवीत: 'पेरिलीं धान्यें सदा निळीं ।'- एभा २१.८१.
**निळा तुतिया** मोरचूद.
**निळाबूज** वि. सर्व शरीर पांढरे, दूम व आयाळ पांढरी, त्यात काळेही केस थोडे असा (घोडा).- अश्वप १.३१.
**निळारी** पहा: **निलगार**
**निळावंती** स्त्री. १. पक्ष्यांची भाषा; ती जाणण्याचे शास्त्र. २. मंत्रविद्या.
**निळा हिरवा** वि. १. काळा निळा (विष, ताप इ.मुळे पडलेला). २. बिघडलेले; नासलेले (तूप, अन्न इ.).
**निळांबा** पु. मार लागल्यामुळे अंगावर पडणारा हिरवा-निळा घट्टा.(व.)
**निळे** न. १. हिरवे गवत, धान्य, पीक. २. हिरवेपणा; हिरवळ.
**निळें** पु. कुणबी स्त्रियांच्या हातातील निकलची बांगडी. (गो.)
**निक्षिप्त** वि. १. ठेवलेला. २. गहाण ठेवलेला. ३. फेकून दिलेला.[सं.]
**निक्षी** स्त्री. कडकपणा; सक्ती; बिनचूकपणा; बारीक दृष्टी; शिस्त.
**निक्षी, निक्षीचा** वि. कडक; करडा; सक्त; न वाकणारा; लवकर शांत न होणारा.(रागात, निंदेत उपयोग).
**निक्षून** क्रिवि. स्पष्टपणे; उघडपणे; हडसून; खडसून. (क्रि. सांगणे, बोलणे, करणे, नाकारणे.). [सं.निक्षुण्ण]
**निक्षेप** पु. १. ठेवणे; जवळ राखणे: 'तया कल्पांतीं जेथ निक्षेपु । होय तें स्थान मी ।'- ज्ञा ९.२९३. २. गहाण; निधी; ठेव; हवाला. ३. पुरलेले धन; कुणगा: 'निक्षेप काढिजे पायाळें ।'- मुआदि १८.३५. ४. (काही कारणासाठी) त्याग: 'आहवनीयादि वन्ही । निक्षेपरूपीं हवनीं ।'- ज्ञा १७.३६१. ५. (कायदा) ठरल्याप्रमाणे काम झाल्यावर परत करण्याच्या बोलीने स्वाधीन केलेला माल;(इं.) बेलमेंट.[सं.] (वा.) ० **करणे**- १. मूठमाती, गती देणे. २. पूर्णपणे व्यापणे.
**निक्षेप** पु. कोणत्याही तेजोगोलापासून, ग्रहापासून क्रांतिवृत्तावर लंबरेषा काढली तर ती रेषा क्रांतिवृत्ताला ज्या बिंदूत मिळते तो बिंदू; शर.
**निक्षेप** पु. एकजीव; मिश्रण.
**निक्षेपक** पु. ठेवीदार.
**निक्षेपणे** उक्रि. १. टाकणे; फेकणे: 'सागरीं निक्षेपिता अचळ । भेदूनि चालला पांताळ ।'- मुआदि ४.८१. २. (द्रव्य) पुरून ठेवणे. ३. ठेवणे; राखणे. [सं.नि+क्षिप्]
**निक्षेपी** वि. ऐकले न ऐकलेसे करणारा; करनकऱ्या.(गो.)
**निंच** वि. १. ठेंगणा; बुटका. २. कमी, हलका (स्थिती, किंमत इ.ने). ३. नीच; हलकट; क्षुद्र. [सं.नीच]
**निंचा** वि. निकृष्ट.
**निंदक** वि. निंदा, दोषारोप, चहाड्या करणारा; दुसऱ्याचे अवगुण सांगणारा. [सं.]
**निंदण-न** न. १. पहा : **निंदणी**. २. पिकातील तण. [सं.निर्दलन]
**निंदणी** स्त्री. भांगलणी; बेणणी; कोळपणी; तण काढणे.
**निंदणे** सक्रि. बेणणी करणे; कोळपणे.
**निंदणे, निंदेजणे** सक्रि. निंदा, चहाडी,दोषवर्णन करणे.
**निंदनीय, निंद्य** वि. निंदा करण्यास योग्य, पात्र.
**निंदा** स्त्री. दोषवर्णन; कुटाळी; निर्भर्त्सना; अवगुण सांगणे; शिव्या देणे; दोषारोप करणे; चहाडी. [सं.]
**निंदी** स्त्री. १. एकतानता; नाद. २. भोवरा वगैरेची पूर्ण गती; गिरकी. ३. टकळी; कटकट; एखादी वस्तू देण्याविषयी पिच्छा पुरवणे. (क्रि. लावणे). (ना.,व.) [सं.निनाद]
**निंब** पु. १. लिंबाचे झाड. तीन जाती - कढीलिंब, कडुनिंब किंवा बाळंतनिंब, बकाणनिंब. २. कडुनिंब: 'रोग जाय दुधेसाखरे । तरी निंब कां पियावा ।'- ज्ञा ४.२२३. [सं.] (वा.) ० **नेसणे**- (बायकी) नवसाचा एक प्रकार. निंबाचे ढाळे कमरेभोवती बांधून अंग झाकणे. नवस फेडण्यासाठी बायका आपली नग्नता निंबाच्या टहाळ्यांनी झाकून नवस केलेल्या देवाला जातात. तेथे त्यांना घरातील स्त्रिया नेसण्यासाठी वस्त्रे देतात. ० **लावणे, ठेवणे, देणे**- कलंक, कालिमा, डाग आणणे, लावणे; दोष देणे; तुच्छ करणे.
वि. कडू: 'तूं आत्मज्ञ म्हणसि सम एक मधुर एक निंब विषयज्ञ ।' - मोअनु ४.१२.
**निंबट** वि. कच्चा.
**निंबपाणी** न. १. देवी येऊन गेल्यावर निंबाचे टहाळे घातलेल्या पाण्याने घालतात ते स्नान. २. घरात बाळंतीण आल्यावर दारात ठेवतात ते निंबाचे टहाळे घातलेले पाणी. बाहेरून येणाराने ते पायांवर घेऊन मग आत यायचे असते.
**निंबरणे** उक्रि. शिजून तयार झालेल्या भाताची वाफ आतल्या आत निवावी म्हणून तो निखाऱ्यावर ठेवणे.
**निंबराष्ट-ष्ट्र** न. मोकळी, उघडी, जिच्यावर ऊन पडते अशी जमीन.
**निंबलोण** न. दृष्ट काढण्यासाठी घेण्याचे कडुनिंबाची पाने, मीठ, मोहरी इ. पदार्थ.
**निंबवड्या** स्त्री. अव. एक प्रकारची भाकरी किंवा घावन : 'खळांत (अंगणांत) मुहुर्त मेढीजवळ निंबवड्या फिरवितात.'- मसाप ४.२५६.(को.)
**निंबसाडा** पु. एक कुळधर्म. साताऱ्याकडे बऱ्याचशा देशस्थ घराण्यांत माघ शुद्ध पौर्णिमेस हा कुलाचार असतो. त्या वेळी पुरुषांनी देवीची पूजा केल्यावर तांब्याचा कलश गव्हावर मांडतात. त्यात पाणी घालून विड्याची पाने ठेवून त्यात देवीची प्रतिमा ठेवतात, जी घरात सर्वांत वडील सुवासिनी स्त्री असते ती पहिले नेसलेलें वस्त्र सोडून ठेवून निंबाच्या पानांची साडी नेसते व हातात दिवटी घेऊन त्या कलशास तीन प्रदक्षिणा करिते. नंतर तिला घरांतील बायका नवें लुगडें आणि चोळी देतात.- मसाप १.३.२५.
**निंबा** वि. १. (वय झालेले असूनही) अविवाहित; लग्न न झालेला. २. देवकार्याला जेवण्यासाठी बोलावलेला लग्न न झालेला (मुलगा). (कु.) [हिं.अनब्याहा]
**निंबाडी** स्त्री. निंबाच्या झाडांची राई.(व.)
**निंबारा** पु. एक झाड. याच्या लाकडाचा इमारतीला उपयोग होतो. हे लाकूड सरळ व लांब असल्यामुळे त्याचे वासे चांगले होतात.
**निंबावळी** स्त्री. पिवळ्या रंगाची साडी, वस्त्र.
**निंबी, निंबुणी, निंबूण** स्त्री. निंबाचे झाड; निंबीण. (गो.)[सं.निंब]

**निंबु(बू)णी** स्त्री. चिंबुणी; चिंबवणी; उसाच्या लागणीनंतर सात दिवसांनी उसास पाणी देतात तें.– कृषि ४५५.

**निंबुरडा** वि. काळसर, हिरव्या रंगाचा.

**निंबू** न. लिंबू; लिंबाच्या झाडाचे फळ. [सं.निंबूक] (वा.) ० **तोंडावर ठरत नसणे**– चेहरा गोंडस असणे, घोडा गुटगुटीत व सतेज असणे इ.

**निंबूर** पु. १. तयार होत आलेली बाजरीची कणसे; त्यांची तशी अवस्था, स्थिती. २. बाजरीचे भाजलेले कोवळे दाणे, हुरडा : 'निंबूर हुरडा घेउनि आला। तो हा माणकोजी बोधला।'– भूपाळी.

**निंबे** न. अव. लिंबे; लिंबाचे लोणचे: 'मग सोवळें विटाळोनी। आलें निंबें घार्ली जननी।'– ह ९.२५६.

**निंबेपण** न. ब्रह्मचर्य.

**निंबोटी** स्त्री. १. अर्धे लिंबू कापून त्यावर साखर, सैंधव इ. घालून विस्तवावर खदखदून तयार केलेले औषध; हे ओकारी थांबवण्यासाठी देतात. २. अर्धे लिंबू.

**निंबोणी** स्त्री. १. कडुनिंबाचे झाड; निंबूण. २. कढीनिंब किंवा कडुनिंबाच्या झाडाचे बी; निंबोळी. [सं.निंबूक]

**निंबोळण** न. ओवाळणी.– ख्रिपु.

**निंबोळी** स्त्री. १. निंबाच्या झाडाचे बी; निंबोणी. २. पिवळा रंग (निंबाच्या बियांप्रमाणे, पागोट्याचा वगैरे).– मपु ३.१८७३, पृ. ६३. ३. स्त्रियांचा सोन्याचा एक दागिना. ४. (पिंपळीच्या शेंगेप्रमाणे) जानव्याला दिलेला पीळ किंवा फास.
वि. निंबोळीच्या रंगाचा; पिवळा. [सं.निंबगुलि]

**नि:पात** पु. संपूर्ण नाश; नायनाट; पूर्ण मोड–क्षय–चुराडा; मारणे, खाणे इ.मुळे होणारा नाश (सामान्य वस्तूंचा). [सं.निपात]

**नि:पातणे** उक्रि. नाश, कत्तल, निर्दालन करणे.

**नि:शब्द** न. ब्रह्म.

**नि:शंक** वि. बेधडक; बेशक; शंकारहित; निश्चयाचा; कांकू न करणारा.
क्रिवि. धीटपणे; न भिता; निश्चिंतपणे; विश्वासाने. [सं.]

**नि:शेष** वि. पूर्ण; सबंध; सगळा; बाकीरहित.
क्रिवि. पूर्णपणे; बाकी न राहता; सर्वथा; अगदी. [सं.]

**नि:श्वास** पु. उच्छ्वास; श्वास बाहेर सोडणे. [सं.]

**नि:सत्त्व** वि. १. निश्चितपणे, स्वाभाविकपणे असणारे गुण, तेज, जोम, जीव, उपयुक्तता, उत्कृष्टपण, रस, चव इ. नसलेला. २. खोटा; असत्य; असार; अवास्तव. ३. नामोहरम. [सं.]

**नि:संकोच** वि. निर्भीड; नि:शंक; मनमोकळा.

**नि:संग** वि. १. एकटा; सोबती, नसलेला; सर्वसंगपरित्याग केलेला (योगी, परब्रह्म). २. (ल.) सर्व बंधनांपासून, पाश, नियम इ.पासून मुक्त; लोकरीत सोडलेला; (विशेषत:) निर्लज्ज; बदफैली; स्वैर. [सं.]

**नि:संदिग्ध, नि:संदेह, नि:संशय** वि. संशयरहित; खात्रीचा. [सं.]

**नि:सारक** पु. अर्क काढणारा. [सं.]

**नि:सारण** न. (स्वच्छतेसाठी) पाणी बाहेर काढून टाकणे. [सं.]

**नि:सारित्र** न. अर्क काढण्याचे उपकरण. [सं.]

**नि:सृत** वि. बाहेर पडलेले. [सं.]

**नि:क्षारीकरण** न.समुद्राच्या किंवा त्रिभुज प्रदेशातील नदीच्या मुखाजवळील पाण्यातील मिठासारखे क्षार वेगळे करून पाणी पिण्यायोग्य करण्याची प्रक्रिया.

**नी** उअ. आणि; व : 'चाकवत आळुशाख नी मेथी।'– मुविराट ८.७३. [आणि संक्षेप]

**नीक** न. स्त्री. गटार; नाला: 'तंबूचे बाहेरचे बाजूस पाण्याची नीक काढली असावी.'– (बडोदें) स्वारीनियम ६३. [गु.]

**नीकुरा** पु. सेवक.

**नीच** न. १. (ज्यो.) ज्या राशीत एखाद्या ग्रहाचे बळ अगदी कमी असते अशी रास. उच्च स्थानापासून सातवे स्थान. २. अशा राशीतील ग्रह. उदा. कर्केचा मंगळ. ३. ग्रहाच्या कक्षेतील सूर्याच्या अगदी जवळचा बिंदू.
वि.१. सखल; उंच नसलेला; निंच; खोल. २. कमी; हलका (किंमत, दर, गुण, आकृती, जाती, स्थिती इ.मध्ये). ३. हलकट; अधम. ४. (संगीत) खर्ज; खालच्या सुराचा.
क्रिवि. खाली: 'तोफ नीच धरली तर गोळा रेतींत जातो.'– भाव ३. [सं.]

**नीज–द** स्त्री. झोप; निद्रा. [सं.निद्रा; हिं.नींद]

**नीजाई** स्त्री. अंथरुण.

**नीट** वि. १. सरळ; वाकडा नसलेला. २. तडक; थेट. ३. (ल.) बरोबर; योग्य; सदृश (वस्तू, काम). [क.नेट्टगे]

**नीट** वि. दयाळू. [सं.स्निह्]

**नीटनेटका** वि. १. यथायोग्य; शोभेसा; चांगला; सुंदर; बांधेसूद; देखणा. २. व्यवस्थित; टापटिपीचा; ठीकठाक.

**नीटवाकडा** वि. चांगला व वाईट; सरळ व वाकडा; खरा–खोटा; शुद्धाशुद्ध; बरोबर–चूक. (वा.) **नीटवाकडे करणे**– कमीजास्त, देवाण–घेवाण, तडजोड करून बरोबर करणे; (हिशेब)मिटविणे.

**नीटवीट** वि. १. थेट; सरळ; तडक. २. (ल.) बरोबर; न्याय्य.

**नीटस** वि. चांगले; ठसठशीत. [सं.निस्+तक्ष]

**नीड** न.पु. पक्ष्याचे घरटे; कोटर. [सं.]

**नीडल** न. काँक्रीट ओतण्यापूर्वी ते सतत ढवळण्यासाठी लांबट आकाराचे, एका टोकाला गोल बसवलेले साधन. [इं.]

**नी(नि)डे** शअ. जवळ: 'होआवें आं श्रीकृष्णां नीडें। एरूं रींगे एरां पुढें।'– दाव २०३. [सं.निकट]

**नीत** स्त्री. १. लोकाचार; चांगली रीत. २. पहा: **नीती**
वि. नीतीचा; बरोबर; योग्य; सरळ; सद्वर्तनी. [सं.नीति]

**नीत** स्त्री. गणित; गणती; संख्या; हिशोबगणना: 'दोन चारसे उंट लस्करांत आले. घोड्यास नीत नाही.'– पेद १९.८४.[सं.गण्–गणती–गणित–गनती–नीत]

**नीत** वि. नेलेला; दूर केलेला. [सं.]

**नीत** वि. सततचा; नेहमीचा: 'थाट नवे नीत होट लाल करी पानें खाउनी सदां।'– पला ४.३५. [सं.नित्य]

**नीति–ती** स्त्री. १. व्यवहारशास्त्र; नय; आचारनियम; शिष्टाचार.

२. योग्यता; न्याय. ३. सदाचाराचे नियम; सृष्टिनियमव्यवस्था. ४. राजनीतिधर्मशास्त्र. ५. नियम; कायदा; मर्यादा; निश्चितपणा; ठरावीक परिमाण. (समासात) धर्म-प्रपंच-लोक-व्यवहार-शास्त्र-नीती; तसेच अंगद-नारद-बृहस्पति-विदुर-शुक्र-नीती. (= अंगद इ. व्यक्तींनी सांगितलेले शास्त्रीय व व्यावहारिक नियम.) [सं.]

**नीतिभेद** पु. १. (सांप्रदायिक अर्थ) प्रमाण-परिमेयादी शास्त्र; तत्त्वभेद. २. अर्थशास्त्र. ३. वैशेषिक दर्शन.

**नीतिमा(वा)न** वि. न्यायनीतीने वागणारा; सदाचारी; सत्प्रवृत्त. [सं.]

**नीतिशास्त्र** न. नीतीचे प्रतिपादन करणारे शास्त्र; (इं.) एथिक्स. [सं.]

**नीतिशिक्षण** न. नीतीचे, सदाचाराचे शिक्षण (शाळांतून दिले जाणारें).- अध्यापन १०६.

**नीध** स्त्री. १. पहा: **निधी.** २. भरपूर उत्पन्न देणारी, किमती वस्तू; गोष्ट. [सं.निधि]

**नीधानता** स्त्री. ऐश्वर्य; उत्कर्ष: 'तुझेनि हाते मज नीधानता होये- तरि बरवे.'- पंचो ९४.१६.

**नीम** पु. भूत, पिशाच्च, प्रेत इ.ना देण्याचा नियमित बली. (क्रि. देणे, सांडणे.) [सं.नियम]

**नीम** वि. निमा; अर्धा. [फा.]

**नीर** न. पाणी. [सं.]

**नीर** पु. मासे धरण्याचे मोठे जाळे : 'माशावाणी नीर काढिला आणले धरुन।'- ऐपो २६४.

**नीर** पु. १. माग; अजमास; सुगावा; अंदाज: 'राजश्री कृष्णाजीपंतास सामील होऊन माहितिगिरीनें केल्याचा नीर काढून अजम मुजफरखानही जवारीवर उतरतील'.- पेद ४०.११२. २.निकर; नेट; शह: 'येक महाड व बिरवाडी, पोलादपूर, नाते हे चार महालावर श्यामलाचा नीर आला.'- पेद ३३.५१. ३. परिणाम; निकाल; निर्णय; निश्चय; ठराव. (पंचायतीचा, चौकशीचा). (क्रि. काढणे, घेणे, निघणे.): 'काय बोल ग्रंथाला वाचिक अर्थ काढिना नीर।'-राला १३. (वा.) ० **काढणे**- साफ खरडून, झाडून काढणे; निकाल करणे: 'गनिमीचा नीर काढावा.'- पेद २१.८. ० **फुटणे** - झाडून सारे लोक पळून जाणे. ० **येणे**- कोळ्याचे मासे पकडण्याचे जाळे पसरत येते तसे संकट येणे. **निरावर येणे**- १. निकरावर, शेवटच्या उपायावर, अटीवर येणे; शेवटच्या अवस्थेला पोचणे (आजार, विकार). २. संपुष्टात येणे; संपू लागणे; संपत येणे.

**नीरब्राह्मी** स्त्री. पाणथळीत वाढणारे एक झुडूप.

**नीरमोर** न. फोडणीचे ताकपाणी. ताकांत बेरेंच पाणी घालून त्यांत लिंबाचा रस पिळतात व सुंठ, हिंग, मीठ इ. मिसळतात.- गृशि १.४७६.

**नीरस** वि. रसहीन; बेचव; पाणचट; मिळमिळीत. [सं.]

**नीरक्षीरविवेक** पु. चांगले-वाईट, योग्य-अयोग्य यांचा विचार करून चांगले निवडण्याची क्षमता. [सं.]

**नीरू** पु. दरजा भरण्यासाठी आणि गिलावा चांगला करण्यासाठी घोटून, गाळून तयार केलेला चुना.

**नील** पु. १. एक रंग. २. पहा : **नीळ** वि. या रंगाचा; निळा.

**नील** पु. एक जातीचे गवत.- चित्रकृषि २.६.

**नीलकंठ** पु. १. शंकर. २. चाष पक्षी; तास. ३. मोर.

**नीलकंठ खाते** (उप.) पाणक्याचे खाते.

**नीलकांत-मणी** पु. निळ्या रंगाचे एक रत्न. हा बहुधा अस्मानी रंगाचा असून कठीणपणासाठी हिरा व लाल यांच्या खालोखाल असतो.

**नीलगाय** स्त्री. पांढऱ्या रंगाचा काळवीट; रोही; हरिण; कळप करून राहणारा, गवताळ भागात आढळणारा, मध्यम आकाराचा, खुरावरच्या भागात पांढरे वलय, गालावर दोन्ही बाजूंना एकेक ठिपका, वेगवान गती असलेला चतुष्पाद प्राणी.

**नीलपिंड** न. पोलादाचा एक प्रकार. [सं.]

**नीलपुस्तक** न. नियमावली किंवा आर्थिक स्वरूपाची अधिकृत माहिती देणारे पुस्तक.

**नीलप्रत-चित्र** स्त्री. न. इमारतीच्या, बांधकामाच्या आरेखनाची निळ्या कागदावर कॅमेऱ्याच्या साहाय्याने काढलेली प्रत; (इं.) ब्ल्यू प्रिंट.

**नीलबंद** वि. नील रत्नाची केलेली; निळी: 'तों नीलबंद भूमीवरी जगज्जीवन। सहज जाऊन बैसला।'- ह ५.१७७.

**नीलमेह** पु.निळ्या रंगाची लघवी; अशी लघवी होणे.

**नीललोहित** न. तांबडानिळा धातु; मॅंगनीज धातू.

**नीलं(लां)ड** पु. एक जंगली प्राणी.- अश्वप २.७. वि. धर्मलंड; निर्लज्ज; व्यभिचारी: 'लोक नीलंड नीलंड काढुनी नेती पोरी।'- रामदासी १५.२६५.

**नीला** स्त्री. केशवाहिनीतून हृदयाकडे रक्त नेण्याची वाहिनी; शरीरातील अशुद्ध रक्तवाहिनी; शीर. ही स्पर्शाला रक्तवाहिनी (लाल शिरे)पेक्षां जास्त उष्ण असते.- सुश्रुत- शारीर ७. [सं.]

**नीला** पांढऱ्या रंगाचा घोडा. [हिं.]

**नीलातीत किरण** वर्णपटातील अदृश्य निळ्या रंगाच्या पलीकडे असलेले किरण.

**नीलांग** न. एक उपरत्न. [सं.]

**नीलांजन** न. मोरचूद. [सं.]

**नीलांबरी** पु. एक राग. गानसमय दिवसाचा तिसरा प्रहर.

**नीलि(ळि)का** स्त्री. (वैद्यक.) अंगावरचा तीळ; चामखीळ. [सं.]

**नीलिमा** पु. निळेपणा; निळा रंग; निळीचा, मेघाचा, पाटीचा रंग.[सं.]

**नीली** स्त्री. नीळ; निळीचे झाड; (इं.)ॲनिल. [सं.]

**नीव** पु. दक्षिण कोकणात आढळणारा एक वृक्ष व त्याचे फळ. फळे वाटोळ्या आकाराची असून त्यावर फणसाप्रमाणे काटे असतात.

**नीव** न. पु. छपराची आतील खालची बाजू. (को.,राजा.)

**नींवडा** वि. पहा: **नावडता, नावडा**: 'नुस्ता पोरवडा, घरीं न कवडा चित्ती बरा नीवडा।'- आसु ५.

**नीवी** स्त्री. निरी; लुगड्याचा पदर, ओचा, केळे; कमरेभोवतालचा लुगड्याचा भाग, वेष्टण; वस्त्राची गाठ. [सं.]

**नीशार** पु. १. अंथरण्याचा, पसरण्याचा कपडा: 'नीशारादि पलंगपोस पडदे गाद्या उशा पाहिल्या।'- सारुह ३.४४. २. फर्गोल.- राव्य २.३६. [अर.नशूर]

**नीस** पु. १. निवडून काढलेला चांगला भाग; सारांश; तात्पर्य; तत्त्वार्थ; निष्कर्ष; सार. (क्रि. काढणे, निघणे): 'आदि वर्तमान जाणसी भविष्य। मागें पुढें नीस संचिताचा।'– तुगा १२९३. २. बारीक चौकशी, तपास; छाननी. (क्रि. करणे, काढणे, पाहणे, पुरवणे.). क्रिवि. पूर्णपणे; निखालस; सर्वांशी. [सं.नि:शेष]

**नीस** पु. (श्रमाने, मार बसल्यामुळे पाठ, छाती इ.) ताठरणे; उसण भरणे. (क्रि. भरणे, उतरणे.). [सं.निश्वस]

**नीस** न. वैर; सूड. (को.)

**नीस** पहा: **नवीस**. हा फार्शी प्रत्यय 'लिहिणारा' या अर्थी शब्दापुढे येतो. उदा. पोतनीस, चिटणीस इ.

**नीस** स्त्री. आत भाताचे शीत नसलेली, निवळ पेज. (गो.)

**नीस** पु. सीमेवरचा दगड. (गो.,कु.) [म.निसाणा; गु.नीसा]

**नीसुगा** वि. आळशी.– शर.

**नीहारिका** स्त्री. १. जळणाऱ्या वायूचा व धूलिकणांचा चमकणारा मेघ; ज्योति:पुंज; तेजोमेघ; नक्षत्रमेघ. २. एक दूरस्थ आकाशगंगा.

**नीहारी** स्त्री. सामसूम: 'लोकु दूरि पावला: माणुसां नीहारी जाहली:'– लीचपू २७.

**नीळ** स्त्री. १. निळीचे झाड; साधारण दीड मीटर उंच, बहुवर्षायू, कोनीय फांद्या व पांढरी लव असणारी एक औषधी वनस्पती. हिच्यापासून निळा रंग काढतात. धुतलेल्या पांढऱ्या कपड्यांना स्वच्छ करण्यासाठी वापर; गुळी. (गु.) २. नीलमणी. ३. शेवाळ; न वाहणाऱ्या पाण्यामुळे झालेली बुळबुळीत वनस्पती. [सं.नील] (वा.) ० **नासणे, रापणे, निळीचा रंग नासणे**– (निळीचा रंग नासला अशी खोटी बातमी उठवली असता रंग चांगला होतो अशी रंगारी लोकांत समजूत आहे त्यावरून) एखादी बातमी, निराधार, खोटी म्हणून सांगायची असल्यास प्रयोग करतात.

**नीळ** पु.न. घरटे. पहा: **नीड** : 'निघोनी गेला हंस नीळ। वृथा पिटिशी कपाळ।'– मुवन हरिश्चंद्राख्यान २६५. (नवनीत पृ. १९८).

**नीळ** पु. एक वानरजात. हे वानर विषमिश्रित अन्नाला स्पर्श करत नाहीत, म्हणून पूर्वी दौलतवंत लोक अन्नपरीक्षेसाठी यांना पाळत.

**नीळकंठ, नीळकंठराई–यी** पु.स्त्री. रुपयाचा एक प्रकार.

**नुक** स्त्री. पक्ष्याची चोच.

**नुकणे** अक्रि. धडक मारणे: 'आंगभारे सुटला ढोंढा। आपा नुकौनिया खांडा।'– ज्ञा १७.२५९. [क.नुनकु]

**नुकता** क्रिवि. इतक्यात; आताच; निगुता.

**नुकरा, नुकरापलंग** वि. (घोड्याचा रंग) पांढरे शरीर, त्यांत जर्दे व काळे ठिपके असा.– अश्वप १.३२. [अर.नुक्रा]

**नुकसान–नी** न. स्त्री. १. तोटा; खोट; बूड; नाश. २. इजा; दुखापत; दु:ख; अपकार; खराबी. ३. (कायदा) नुकसानीचा पैसा; नुकसानभरपाई. वि. कुचकामी; हलका; भिकारी; कवडीमोल. [अर.नुकसान]

**नुकसानभरपाई** स्त्री. (कायदा)एखाद्याचे नुकसान केले असता त्याबद्दल दिलेला मोबदला;(इं.) कॉंपेनसेशन.

**नुक्ता,नुकता** पु. १. सुंदर, मजेदार कल्पना, विचार; लहान, रसभरीत चुटका, गाणे. २. सूक्त; सुभाषित; वाक्य: 'पत्रें लिहिलीं त्यांतील नुक्ते व चुटके उत्तरें यावयाजोगे बहुत लिहिण्यांत आलीं.'– मइसा ७, खलप २.२६. ३. तोडगा; इलाज; औषध.(व.) [अर.नुक्ता]

**नुक्ता** पु. महाराष्ट्रात आढळणारा एक हंसविशेष. याचा रंग पाठीवर काळा व इतरत्र पांढरा असतो.

**नुक्ता** पु. १. उंटाच्या नाकातील वेसण, लगाम. २. बिंदली; कडी.

**नुक्ता** पु. १. दोषारोप; आळ; ठपका; लादलेला दोष; काळिमा. (क्रि.ठेवणे). २. फार्शी लिपीतील अक्षराच्या वर किंवा खाली द्यायचे टिंब.

**नुक्ती** स्त्री. बुंदी; एक मिष्टान्न. (अहि.) [हिं.नुकती]

**नुक्र–क्रा** रुपे; चांदी.

**नुगडणे** क्रि. न सुटणे; न उद्धरणे.– एभा ११.१०७१.

**नुथड** न. नथ.

**नुदर** स्त्री. न्यूनता; उणीव; कमतरता: 'मागा आरमारच्या वेढ्यास सिलसिल्यांची नुदर असल तरी वसई साष्टी प्रांतें माहेगिरया आहेत.'– पेद २४.२०४.

**नुनि–नी** स्त्री.१.टोक. २.लहानपणा. [त.;म.]

**नुनी–न्नी, नुंगी** स्त्री. लहान मुलाचे इंद्रिय; बुल्ली. [क.तुंणि]

**नुनू** स्त्री. (बालभाषा) झोप; गाई.

**नुन्या** वि. घरचा. (व.)

**नुपकर** वि. असमर्थ.

**नुप(पू)र** स्त्री. तूट; टंचाई; नपूर. (व.,ना.)

**नुपरते** वि. विषयासक्त: 'कविष्ठ आणि गर्विष्ठ। नुपरतें आणि नष्ट।'– दास २.३.१७.

**नुपरवण** स्त्री. तूट. (गो.)

**नुपऱ्या** वि. टंचाई असणारा; गरजू.

**नुमंडे** वि. नसते; खोटे: 'मृगजल जेथे नुमंडे। तेथें असे पां कोरडे।'– अमृ ६.६४.

**नुरमैली** वि. पुलाव्याचा एक प्रकार: 'नुरमैली पुलावा करणें झाल्यास चापट रवे ऊर्फ पार्चे वापरावे.'– गृशि २.९.

**नुरा** स्त्री. १. तेज. २. चेहरा; नूर. (गो.) [अर.नूर]

**नुरा** वि. १. चढेल; उन्मत्त: 'धरातळावर सुरापतिसम नुरा, होवुनि अपपरा न जाणसि।'– अमृत ५३. २. खोटा; लुटुपुटीचा: 'पंजाबी लोक पैशासाठीं नेहमी नुरा कुस्त्या लढतात.'– के १८.१.१९३८.

**नुरी, नुरिया** स्त्री. पोपटाची एक जात. [हिं.]

**नुरोधी** वि. बाधक; विरोधी.

**नुसते, नुस्ते** न. मासळी; मासे. (गो.)

**नुस्का** पु. १. उपाय; युक्ती. २. दोष. [सं.नुस्खा]

**नूतन** वि. १. नवा; ताजा. २. तरुण. ३. अलीकडचा. क्रिवि. अलीकडे; नुकते. [सं.]

**नून** स्त्री. रोटी. [अर.]

**नूपुर** पु.न. पायातील दागिना; पैंजण; घागऱ्यांचा वाळा; तोरड्या. [सं.]

**नूपुरकरण** वि. (नृत्य.) हात रेचित करून लताख्य करावेत व त्रिक फिरवून उजवा पाय पाठीमागच्या बाजूला नेऊन कुंचित करावा. नंतर जमिनीला

न लावता पायाचा अग्रभाग जमिनीवर लवकर आपटावा. [सं.]

**नूपुरपादिक (आकाशीचारी)** वि. (नृत्य.) उजवा पाय पाठीमागे नेऊन अंचित करणे व मग टाच जमिनीला न लावता पायाचा अग्रभाग जमिनीवर लवकर टेकवणे. [सं.]

**नूर** (हेट.) पहा: **नोर**

**नूर** पु. १. वैभव; ऐश्वर्य; थाट. २. तजेला; चकाकी; पाणी; तेज; कांती; रूप (दृष्टी, चेहरा इ.चा.).[अर.] (वा.) ० **पालटणे** - चेहऱ्याचा रंग बदलणे; परिस्थिती, कल, रागरंग बदलणे. ० **मिळविणे** - मिळते घेणे. (व.)

**नूर** पु. एक जातीचा लांबट मोती.

**नृत्य** न. नाचणे; अभिनय करणे; नाच; गायनातील रस व भाव; मुखराग व अंगप्रत्यंग यांच्याद्वारा अभिनय करून अनेक तालांमध्ये नियमबद्ध नाचणे. [सं.]

**नृत्यकोण** पु. नैर्ऋत्य दिशेचा कोपरा: 'गोसावियांसि नृत्यकोणी आसन जाले:'- लीचपू ४४२.

**नृत्यदिग्दर्शक** पु. चित्रपट वगैरेंमध्ये नृत्याचे मार्गदर्शन करणारा-री; (इं.) कोरिओग्राफर.

**नृत्यनाट्य-नाटिका** न.स्त्री. केवळ नाच व अभिनय यांच्याद्वारे उभी केलेली कथा.(इं.) बॅले.

**नृत्यशाळा** स्त्री. नाचणे, गाणे, हावभाव करणे इ. शिकवण्याची, दाखवण्याची जागा; खेळाची जागा; नाट्यगृह.

**नृत्यांगना** स्त्री. नर्तकी; कलावंतीण. [सं.]

**नृप, नृपती, नृपाळ** पु. राजा; भूपती. [सं.नृपाल]

**नृशंस** वि. द्वाड; निंद्य; घातुक; क्रूर; दुखापत, इजा, नाश करणारा.[सं.]

**नृसिंह** इ. पहा: **नरसिंहा-ह**

**ने** अ. पासून या अर्थी प्रत्यय. एकारान्त स्थलवाचक क्रियाविशेषणाला शेवटच्या मात्रेचा लोप करून जोडतात. उदा. एथने, तेथने इ. दुसऱ्या शब्दाशी जशाच्या तसा जोडतात. उदा. आतने, बाहेरने इ. स्थलनामांना ऊन, हून याअर्थी पूर्वागम दाखवणारा प्रत्यय लागल्यानंतर लावतात. उदा. पुण्यासने इ.

**ने** न. न (= नाही): 'तें दुर्योधन ने घे ।'- मोकर्ण ६.३५६. [सं.]

**ने** उअ. आणि; व: 'राजाला ठार मारूं ने राज्य लेवूं.'- मसाप २.३१.(कातवडी, भिल्ली) [गु.]

**ने** अ. १. तृतीया विभक्तीचा प्रत्यय. (अव.नी.) उदा. त्याने, त्यांनी इ. २. भूतकाळी सकर्मक क्रियापदाचे आणि विध्यर्थाचे आवान्त रूप (करावा, द्यावा इ.) होणाऱ्या क्रियापदाच्या तृतीयपुरुषाच्या रूपाबरोबर हा प्रत्यय योजतात. उदा. केल्याने, दिल्याने इ.

**नेआण** स्त्री. (नेणे आणि आणणे) १. फिरून केलेले, निष्फळ व त्रासाचे नेणे, आणणे. २. आसपास, इकडे-तिकडे नेणे; हलवाहलव. (क्रि. करणे).

**नेआहा** पु. प्रतिध्वनी: 'वारा वाजे गरगर ।... ने आहे उठिति आकाशीं ।'- खिपु १.७.६४.

**नेई** न. लोणी. - ज्ञाको (उ) ४. (उचले.) [सं.नवनीत]

**नेऊर** न. पु. घोड्याचा घोटा. पहा: **नेवर**

**नेऊर** पु. खारी पाडलेल्या जमिनीच्या बांधाला खेकड्याने पाडलेले भोक. - शेतकी शे २.९.

**नेक-की** स्त्री. १. अंत:करणाचा खरेपणा, शुद्धपणा; सत्यता; सरळपणा. २. सद्वर्तन; सरळ मार्ग, व्यवहार, आचरण.
वि. १. सद्गुणी; प्रामाणिक; विश्वासू; सरळ; खरा; चांगला; नीतिमान. २. योग्य; अनुकूल; युक्त. [फा.]

**नेकजात-द** वि. १. पहा: **नेक.** २. प्रतिज्ञा पाळणारा. ३. सुशील; अभिजात; साधू: 'तो केवळ नेकजाद प्राप्तपुरुष होता.'- भाब ५२. [फा.नेक्झात्]

**नेकी** स्त्री. कांजी (उकडीची). (हेट.)

**नेकीब(बा)दी** स्त्री. नकीबदी (चांगल्या-वाईट गोष्टी); दैवी, नैसर्गिक किंवा मानवी या प्रकारच्या घडणाऱ्या चांगल्या-वाईट गोष्टी, प्रसंग; बरावाईट प्रकार; अस्मानी सुलतानी: 'नेकीबदीचा अंदेशा दोन्हीकडून सेवकाकडे नसावा.'- पया २५६.

**नेखवाड** न. ऐरण बसवण्याचा लाकडी ठोकळा.

**नेखे** न. मिरचीचे देठ. (कु.)

**नेगपट्टी, नेगाचे** स्त्री.न. (निंदार्थी) खाणेपिणे; जेवणे. (क्रि. करणे, काढणे.). (कु.)

**नेगू** पु. प्रलय. (गो.)

**नेचा** पु. १. गुडगुडीची, हुक्क्याची नळी: 'त्यांच्याकरितां ताजा गुडाखू भरून त्यानें नेचा त्यांच्यापुढें केला.'- वज्राघात ११२. २. नेटाची बैठक (हुक्का ओढण्यासाठी पुष्कळ वेळ बसावे लागते यावरून); एखादे काम पूर्ण करण्यासाठी एकसारखे बसणे. (क्रि. देऊन-लावून-मारून-गाडून बसणे; गाडणे.). [फा.नैचा]

**नेचा, नेचरी** पु. स्त्री. दांड्याच्या दोन्ही बाजूंना सुंदर पाने असणारी, फुले व फळे न येणारी, भरपूर सावली व पाणी असणाऱ्या ठिकाणी वाढणारी वनस्पती.

**नेजदार** पु. बाणदार; बाणेकरी; भालेकरी.

**नेजा-झ-झा** पु. भाला. [फा.नेझा]

**नेञ** क्रि.नाही: 'ते हातीं ओ सब्द नेञ पाठ केयो.' - भिल्ली ३१. (भिल्ली)

**नेट** पु.न. १. प्रयत्न; श्रम; बळ. २. जोर; ताण; दाब; भार. ३.(ल.) निकड; तगादा. ४. (ल.) खंबीरपणाचा निश्चय; दम; हिंमत; कार्याचा मोठा उत्साह; चिकाटी. (क्रि. देणे). ५. मोटविहिरीच्या उभ्या खांबाखालचे कुसवाचे दगड. ६. सुताराचा, लोहाराचा कारखाना. ७. ज्यावर तासकाम, कापणे इ. करावयाचे असते तो ठोकळा; खाटकाचा ठोकळा. ८. (सामा.) आधार; मदत. ९. जोर; वेग. १०. ताठा; अभिमान. (कु.) ११. ताठपणा. (कु.) १२. धडक; भिडणे: 'नावेक घे पां नेटु। येणें आचारविरेंसीं ।'- भाए २१९. [क.नेट्टगे]

**नेटक** वि. १. उत्सुक; तत्पर: 'मुमुक्षूमाजीं अति नेटक। '- एभा १३.७३८. २. नेटाचा; नेटदार.

**नेटक** पहा: **नैष्ठिक:** 'एक ते पंडित वैदिक ते एक । गायत्रीनेटक ब्राह्मण ते ।'- ब ४३४. [सं.नैष्ठिक]

**नेटक–का** वि. १. सुरेख; बांधेसूद; प्रमाणबद्ध. २. बरोबर; योग्य; अनुकूल. ३. सरळ: 'ठकारें पर्वता ऐसा नेटका सडपातळु।'– मारुतीस्तोत्र. ४. अव्यंग; धड; तरबेज: 'कृष्ण नेटका झुंझार।'– एरुस्व १२.१२३. ५. नीट; चांगला; व्यवस्थित. [क.नेट्टी]

**नेटका** क्रिवि. नुक्ता; आता; इतक्यात; थोड्या वेळापूर्वी : 'आमचा बाजीबोबा नेटका जेवाया बैसला।'– ऐपो ६८.

**नेटके** क्रिवि. १.नीट, व्यवस्थित: 'परी सासुरवाडीस नेटकें जावें।'– दास ३.२.३७. २.सरळ; समोर; थेट:

**नेटणे** अक्रि. १. प्रयत्न, जोर, श्रम करणे; झटणे. २. भिडणे; खेटणे; हाताशी असणे; अगदी पाठीशी येऊन ठेपणे. ३. खनपटीला बसणे; निकड लावणे. ४. रेटणे; पलीकडे लोटणे. [सं.नि+वृत्]

**नेटदार** वि. १. धट्टाकट्टा; मजबूत; कार्यक्षम; सहनशील. २. वजन, दाब इ. सहन करण्याला योग्य (तुळई, खांब इ.).

**नेटपाट** पु. १. जोराचा प्रयत्न; दृढनिश्चय. (क्रि. देणे, लावणे, करणे.): 'दृढ मांडिला नेटपाटू। जाला गहिवराचा वोहटू।'– कृमुरा ६६.४१. २. तगादा; निकड; जुलूम. (क्रि. लावणे, लागणे, बसणे.).

**नेटबाजीचा** वि. १. आग्रहाचा; तगाद्याचा; निकडीचा; नेटापाटाचा. २. लवकरचा; जवळचा; येऊन ठेपणारा, ठेपलेला.

**नेटावणे** अक्रि. जोराने, तडफेने कामाला लागणे.

**नेटावा** पु. १. नेट; ठेका; धिरा. २. जोराचा प्रयत्न.

**नेटाळू** पु. पाटील. (व.)

**नेटिव–व्ह** वि. १. देशी; एतद्देशीय; युरोपियनेतर मनुष्य. २. (निंदार्थी) असंस्कृत; गावठी. [इं.]

**नेटी** वि. नेट करणारा; पिच्छा पुरवणारा. (व.)

**नेटी–टे, नेटका** शअ. जवळ; समीप; निकट: 'पठाण अगदीं आपल्या नेटका आला.'– सूर्योदय ९२.

**नेटुगी–गा** वि. पहा: **नेटका** १: 'सहजेंचि नेटुगा दाटुगा। फेडिवेढी नाहीं श्रीरंगा।'– एरुस्व १५.७८.

**नेटून** क्रिवि. निष्ठापूर्वक: 'माथां ठेवतां नेटून। जाते गुरूच्या कृपेनें सारं दारिद्र्य फिटून।'– वलो १८. (व.)

**नेटूना** क्रि. पहा : **नेटणे** २,३

**नेटे** न. जात्याच्या तळीला खुंटा बसविण्याचे भोक: 'जीवशिव दोन्ही खुंटे गे। प्रपंचाचे नेटें गे।'– जना २२७.

**नेटे** शअ. जवळ; नजीक: 'चुनीलाल बापू नांदे राम मंदिराच्या नेटे.'– ब १५८.

**नेटेघोडे** न. (तुळईला दिलेला) आधार; टेकण.

**नेडा** पु. रत्नें जडण्यास व रत्नांचें तेज खुलवून दाखवण्यास रत्नाखालीं जडण्याचे कामीं उपयोगी पडणारी विशिष्ट प्रकारे शुद्ध केलेली चांदी.– जनि ७ (पारिभाषिक संज्ञा). (बडोदा)

**नेडे–ढे** न. १. सुई, दाभण यांचे नाक; त्यात दोरा ओवण्याचे भोक. २. कुदळ, कुऱ्हाड इ.ना दांडा बसवण्याचे भोक. ३. (ल.) आधार; टेका; आश्रय: 'विशुद्ध चक्रीं मेरू हा नेडे।'– ज्ञागा ४०७.[क.नेडिगे]

**नेण** न. पहा: **नेणीव**

वि. अज्ञानी; अजाण: 'जाणोनि कासया होसी नेण।'– मुसभा १३.१७. [सं.न+ज्ञान]

**नेणणे** न. (ल.) अज्ञान; न जाणणे: 'जे नेणणें माझें प्रकाशूनि।... बुझावीतसे जे।'– ज्ञा १८.१११४.

अक्रि. न जाणणे; न समजणे; न कळणे. [सं.न+ज्ञा]

**नेणतपण, नेणपण** न. १. अज्ञान. २. लहानपणीची अज्ञानावस्था.

**नेणता, नेण** वि. १. अजाण; समज नसणारा; अननुभवी; मूर्ख. २. जाणता. [सं.न+ज्ञान]

**नेणसपाड** पु. फजिती; अवहेलना; उपेक्षा. (व.)

**नेणीव** स्त्री. अज्ञान; अननुभव; अजाणतेपण.

**नेणे** सक्रि. १. घेऊन जाणे; उठवणे; हलवणे. २. वाट दाखवणे; पुढे होणे. [सं.नी]

**नेत** स्त्री. १. नियत; बुद्धी: 'ज्याची जशी नेत तसी त्यास बरकत.'– इमं १०७. २. निष्ठा: 'दौलतराव बाबा यांची नेत धन्याजवळ तसीच असेल.'–ऐलेसं १२.६८१७. ३. नियम; नेम. (व.) [अर.नीयत्]

**नेतन** न. एकर, बिघा इ.सारखे जमीन मोजण्याचे एक परिमाण. (व.)

**नेतवट** न. रेशमी वस्त्र, पट्टी: 'भवैं नेतवट बांधिजतातिः – लीचउ १५०. वि. मऊ . [सं.निस्+पट]

**नेता** वि. १. नेणारा; वाट दाखवणारा. २. व्यवस्था करणारा; पुढारी; कारभारी. ३. प्रमुख; सेनापती. [सं.]

**नेतार्नी** स्त्री. नवविवाहितेची सासरी पहिली पाठवणी. (झाडी)

**नेताळा** वि. निमित्ताला टेकलेला; क्षुल्लक कारणावरून नकार देणारा, नापसंती दर्शवणारा. (कर.)

**नेति नेति** उद्गा. नाही नाही; न जाणल्यासंबंधी योजतातः 'जेथें नेति नेति श्रुति।– दास ७.१०.५०.

**नेत्र** पु.न. डोळा; नयन.

पु. तरवारीवरील चिन्ह. ही २९ प्रकारची आहेत. [सं.]

**नेत्रकाच** स्त्री. दुर्बीण; सूक्ष्मदर्शक यंत्र इ.तून पाहण्यासाठी ज्या ठिकाणी आपण डोळा लावतो ती काच.

**नेत्रगोलक** पु. खोबणीत बसवलेला डोळा.

**नेत्रचिकित्साशास्त्र** न. डोळ्यांची रचना, विकार व त्यांवरील उपाय यांचा अभ्यास करणारे शास्त्र.

**नेत्रदर्पण** पु. दृङ्मज्जामंडळ. बुबुळाच्या मागच्या बाजूला असलेले, प्रकाशसंवेदक आवरण. (इं.) रेटिना.– मपु ६.१८७५ पृ. १०३.

**नेत्रपटल** न. पाहिलेल्या दृश्याची प्रतिमा ज्याच्यावर उमटते तो डोळ्याच्या बुबुळामागील पडदा; पुरःपटल.

**नेत्रपल्लवी** स्त्री. एक खुणेची भाषा; डोळ्यांच्या हालचालींवर, खुणांवर बसवलेली भाषा; नेत्रसंकेत; डोळे मिचकावणे.

**नेत्रपेढी** स्त्री. डोळे दान करणाऱ्यांचे काढून घेतलेले डोळे जतन करून ठेवणारी संस्था.

**नेत्रभिंग** न. प्रथिनांच्या जेलीसदृश द्रव्याचे बनलेले, डोळ्यातील बाहुलीच्या मागे असलेले पारदर्शक भिंग.

**नेत्ररस** पु. नेत्रगोलपटलाच्या आतील पारदर्शक पदार्थ.

**नेत्रवटी** स्त्री. बुबुळ; त्यातील बाहुली.
**नेत्रव्रण** पु. डोळ्यातील किंवा त्याच्या आजूबाजूचा फोड इ. [सं.]
**नेत्रसंकेत** पु. डोळ्याने खुणावणे; नेत्रपल्लवी. [सं.]
**नेत्रस्पर्श** पु. आचमन, प्राणायाम इ. करायचे नसताना हाताच्या बोटांनी डोळ्यांना पाणी लावणे; कोणत्याही धार्मिक कृत्याच्या आरंभीचा विधी.
**नेत्रस्फुरण** न. डोळ्याची पापणी फुरफुरणे; डोळा लवणे. यावरून शुभाशुभ पाहतात. [सं.]
**नेत्रार्श** पु. डोळ्याचा एक रोग; नेत्रव्रण; डोळ्यात पुरुळ उठणे. [सं.]
**नेत्रांजन** न. १. डोळ्यात घालण्याचे काजळ; सुरमा. २. शुद्धीवर आणण्यासाठी डोळ्यात घालण्याचे चूर्ण; सौंदयाचे अंजन. [सं.]
**नेत्रांतरदाब** पु. नेत्रगोलक कडक होऊन दृष्टिदोष निर्माण होण्याचा एक रोग; काचबिंदू.
**नेत्रिका** स्त्री. संयुक्त सूक्ष्मदर्शकाचा पाहणाऱ्याच्या डोळ्याजवळील बहिर्वक्र भिंग असलेला भाग.
**नेनणे** क्रि. न नेणे.
**नेपटी** स्त्री. भारतातील रुक्ष प्रदेशात आढळणारे एक लहान झाड; पाने लहान व बिनदेठाची, लाकूड पिवळट तपकिरी, वाळवीपासून सुरक्षित.
**नेपति –ती** समाप्ती: 'कथानेपति झाली.'– उह २२९८. [सं.निष्पत्ती]
**नेपथ्य** न. (नाट्य.) रंगमंचावरील पडदे, वेशभूषा, प्रकाशयोजना इ. सजावट. [सं.]
**नेपळ** स्त्री. कोरडी जमीन, जागा.
**नेपा** पु. बाणी; पण.(व.)
**नेपाल–ळ** पु. एक सारक वनस्पती. [सं.नेपाल]
**नेपाळ** न. बंदुकीच्या नळीवरील तोटी बसविण्याची जागा. (कु.)
**नेपाळ** न. पिकदाणी; तस्त. – भाषाप्रकाश.
**नेपाळ** वि. १. सपाट; गुळगुळीत; एकसारखी (जमीन, जागा, भिंत). २. सरळ; सारखी; उतरती (जागा).
**नेपाळणे** उक्रि. १. सपाट, एकसारखी, समतल, मऊ, गुळगुळीत करणे (जमीन, गच्ची इ.). २. चोळणे; मळणे; साफ करणे (मनुष्य, पशू यांचे अंग, मिशा, पोशाख इ.). ३. सुरळीतपणे वाहायला लावणे. ४. (पातळ पदार्थ) हाताने वाहील असे करणे. [सं.निस्+पालिः]
**नेपाळा** पु. चूळ; थुंका: 'सांडिती तो नेपाळा। पडिघा मीचि।'– ज्ञा १३.४१८.
**नेपाळी** वि. लाल: 'एकें शुद्धें तांबीं नेपाळी।'– दाव २८२.[सं.नेपाल]
**नेपाळे** वि. १. सुंदर; लावण्ययुक्त: 'ऐसें रूप नेपाळें। देखौनि चैतन्य भुललें।'– शिव ४२७. २. शांत: 'पुन तें घननीळ सांवळें। परब्रह्म नेपाळें।'– भाए ८. ३. नितळ; सतेज.
**नेपाळ्या** वि. नेहमी साफ करणारा, झाडणारा (आपले शरीर, पोशाख इ.).
**नेफा** पु. पायजम्याची नाडी घालण्याची जागा, शिवण; नाडपट्टी.[फा.]
**नेफारा** पु. दिमाख; कुर्रा. (व.)
**नेबगैवत** पु. वरिष्ठाच्या गैरहजेरीत काम करणारा दुय्यम अधिकारी.– इऐ ५.१०१.
**नेब(भ)ळ–ळा, नेब(भ)ळट, नेब(भ)ळभट, नेभरा, नेभा** वि. १. लठ्ठ; ढील; गबाळ्या; बोजड. २. भोंगळ; अव्यवस्थित (काम, पोशाख इ.); बेबंद; बेशिस्त (भाषण). ३. दुबळा; नामर्द; कमकुवत. [सं.निर्बल]
**नेबाद** स्त्री. पगारापैकी दर महिन्याला सरकारकडे जमा केली जाणारी थोडी रक्कम.
**नेम** पु. १. पहा: **नियम** २–४. २. उद्दिष्ट; हेतू; लक्ष्य; साधन. (क्रि. बांधणे, धरणे, लावणे). ३. माप. (क्रि. घेणे, देणे.).[सं.नियम] (वा.) ० **लावणे**– नियम करणे; मार्ग, रीत लावणे. ० **सारणे**– नेमधर्म, नित्याचार उरकणे: 'पार्थे स्नान करून सकळ। नेम आपुला सारिला।'– ह ३२.१७४.
**नेम** पु.न. जमिनीत खणलेला खड्डा (खांब, झाड इ. पुरण्यासाठी).
**नेमक** वि. १. नेमाने वागणारा: 'नेमक निग्रह तापस।'– दास १.८.९. २. मोजके, परिमित (भाषण, बोलणे).
**नेमका** क्रिवि. १. पाहिजे असलेला; नेम धरल्याप्रमाणे बरोबर. (ल.) संकल्प, बेत केल्याप्रमाणे; अपेक्षित तोच. २. वेळेवर; प्रसंगोपात्त.
**नेमणूक** स्त्री. १. वेतन; पगार; वेतनाची व्यवस्था. २. सेवेबद्दल किंवा काही कामगिरीबद्दल दरवर्षी मिळणारी रोख रक्कम, देणगी. उदा. वर्षासन, ग्रास, पगडी इ. ३. योजना; नियोजन; नेमणे (जागेवर, हुद्द्यावर).
**नेमटी** वि. जास्त बोभाटा न करता कृती करणारा; अबोल. (अहि.)
**नेमणे, नेमवणे** उक्रि. (खांब, झाड इ.) जमिनीत गाडणे.
**नेमणे** सक्रि. १. लावणे; ठेवणे; निश्चित करणे; (नियम, रूढी) स्थापणे. २. नियोजित करणे; नेमणूक,नियुक्ती करणे. ३. नेम धरणे; (बाण इ.नी) लक्ष्य वेधणे. ४. नियम करणे; ताब्यात ठेवणे: 'इंद्रियांचें सुख नेमुनि। देवचारातें जितला।'– ख्रिपु १.१.६४. ५. नियमन, नियंत्रण, शासन करणे: 'पुढती न करी उत्थान। ऐसा विंध्याद्री नेमून।'– भारा आरण्य ५.८३. [सं.नियम;क. नेमिसु]
**नेमधर्म** पु. अव. शास्त्राने सांगितलेले धार्मिक आचार–विचार.
**नेमपण** न. नियम; व्रत: 'नेमपण टाळतां अवतारकृत्य संपलें ऐसें जाणिजे।'– दावि ३५.
**नेमस्त** वि. १. साधारण; सामान्य; मध्यम प्रतीचा. २. नियमित; नेमाने वागणारा. ३. मवाळ; (इं.) लिबरल. ४. बेताचा; बरोबर. ५. निश्चित; स्पष्ट: ' पूर्वी गोड अंतीं शोक । नेमस्त आहे।'– दास ३.१०.६५. ६. नेमका: 'नेमस्त कळेना वचन। नेमस्त न ये राजकारण।'– दास १५.३.१४. [क. नेमिस्तनु; सं.नियम] (वा.) ० **करणे**– नियुक्त करणे; योजणे. (लग्नपत्रिकेत वापरतात.)
**नेमळ्याणे** क्रि. नासणे. (कु.)
**नेमाड्या** वि. दगड इ.चा अचूक नेम मारणारा.
**नेमानेम** पु. १. योजना आणि निश्चय (ईश्वरी, दैवी); अदृष्ट; योगायोग. २. वहिवाट; चाल; सामान्य नियम; परिपाठ.
**नेमावणी** स्त्री. १. नोंदणी: 'तुळाजी आंग्रे यांचे कारकीर्दीस नेमावणी करावयाची ताकीद जाहली.'– थोमारो २.१४२. २. शेत लावणे.– भाद्रिसंवृ ६८.

**नेमी-मि** स्त्री. चाकाची धाव; पहा : **धाव** [सं.नेमि]

**नेमी** वि. नेमलेला; ठरावीक; निश्चित. [सं.नियम]

**नेमोडा** पु. नेम (खड्डा) खणण्याचे एक हत्यार.(को.)

**नेमोत्तर** न. निश्चित बातमी, हकिकत, सूत्र: 'ईश्वरी नेमोत्तर उर्फ त्याचें कर्तव्य त्यास कळत नाहीं.'- मातीर्थ ४.३०४.

**नेमोत्तर पत्र** निरोप पोचल्याबद्दलचे पत्र.- भाअ १८३२.

**नेर** पु. १. शेतात आपोआप उगवणारे गवत. २. एक हलक्या जातीचे भात. [सं.नीवर]

**नेर** न. गावाच्या नावांच्या शेवटी लागणारा प्रत्यय. उदा. पिंपळनेर, पारनेर. नदीचे खोरे या अर्थी येणारा प्रत्यय. उदा. भीमनेर, कुकडनेर.विशेषत: नदीकाठचा गाव. उदा. शिवनेर, घोडनेर इ. [सं.नीवर]

**नेरभार** पु. माया, अधिकार वापरून, दाखवून एखाद्यावर काम लादणे.

**नेरवा, नेरा** पु. १. सोनाराच्या दुकानातील राख, केर. २. सोनाराच्या दुकानातील राखेतील, कचऱ्यातील सोन्याचे कण. झारेकरी लोक हे शोधून काढतात.

**नेरवा** क्रिवि. तेरवाच्या पुढच्या दिवशी; आजच्या मागील किंवा पुढील चौथ्या दिवशी. [क.नार]

**नेरावणी** स्त्री. (माती, खडे इ.काढण्यासाठी) धान्य पाण्यात घालून ते एका भांड्यातून एक-दोन वेळा ओतणे. याने धान्यातील रेती, खडे खाली राहतात. (गो.)

**नेरेवणे** उक्रि. घोळवणे. (कु.) पहा: **नेरावणी**

**नेरोळी** न. नारिंगाच्या मोहोरापासून काढलेलें तेल. औषधे व सुवासिक तेलांमध्ये उपयोग.

**नेर्माल-र** स्त्री. एक प्रकारचे भाताचे बी. (गो.)

**नेवता** पु. आमंत्रण; निवतण. (क्रि. करणे, देणे.).[सं.निमंत्रण; हिं. न्यौता]

**नेवता** पु. विधवाविवाह. पहा : **पाट लावणे**

**नेवर** न. पु. घोड्याच्या घोट्याची खीळ, घोटा. (क्रि. लागणे): 'आवरितां नावरे। खूर आठवी नेवरे।' - तुगा ३०९९. २. हे एकमेकांशी घासू नयेत म्हणून त्यांवर बांधलेला चामड्याचा पट्टा, गादी. (क्रि. बांधणे).

**नेवरा** पु. १. बाळाच्या पायांतील वाळे. २. बैलाचा साज.

**नेवरा** वि. पांढरा (घोडा, गाय इ.चा पाय, खूर); अशा पायांचे जनावर.

**नेवरी** स्त्री. करंजी; एक पक्वान्न. (बे.,गो.)

**नेवा** न. पागोळीची आतील बाजू.- मौज ६.३०. [गु.]

**नेवाणे** न. १. पराभव; नाश: 'अहो रानींचिया पालेखाइरा। नेवाणें करविजे लंकेश्वरा।'- ज्ञा ११.२३. २. तिरस्कार.

**नेवार** न. तळ्याच्या काठी किंवा डोंगरात आपोआप होणारें भात.- कृषि १८८. [सं.नीवार]

**नेवार** पु. पलंगाचे नवार. (झाडी)

**नेवाळ** न. नूपुर: 'अंदु वाकी नेवाळे'- ज्ञागा २२४.

**नेवाल-ळी** स्त्री. जाईच्या जातीची फुलवेल; रानमोगरी.

**नेवाळे** न. नेवाळीचे फूल.

**नेवाळा-ळ्या** वि. विनाकारण विव्हळणारा. (माण.)

**नेव्हारा** पु. १. गाऱ्हाणे; तक्रार (अनेकवचनी प्रयोग). (क्रि. गाणे). २. दिमाख; कुर्रा. (व.)

**नेशी(सी)व** वि. १. नेसण्याचा. २. नेहमी नेसण्यात असणारे (वस्त्र).

**नेष्ट** वि. (ज्यो.) अनिष्ट; अभद्र (ग्रह). [सं.]

**नेष्टा** पु. अग्निष्टोमादी सोमयागातील १६ ऋत्विजांपैकी एक. [सं.]

**नेस** पु. वेश; पेहराव. (झाडी)

**नेसण-णे** न. १. (कमरेभोवती) नेसण्याचे, कमरेला बांधण्याचे वस्त्र. २. अंगाला गुंडाळण्याची, अंगावर चढवण्याची, नेसण्याची क्रिया. (क्रि. करणे). [सं.निवस-निअस्-न्येस-नेस- भाए १८३३]

**नेसणे** उक्रि. (पंचा, धोतर, लुगडे इ. कटिवस्त्र) परिधान करणे; कंबरेभोवती गुंडाळणे.[सं.नि+वस्](वा.) **मुसळ नेसणे**- निर्लज्ज होऊन दुर्भाषण, दुष्कर्म करू लागणे.

**नेसवणी** स्त्री. साडा; चिरडी: 'ऐसें आंहीं यांची नेसवणी ।- शिव २०७.

**नेसवणे** उक्रि. १. दुसऱ्याला वस्त्र परिधान करवणे. २. (ल.) (जमाखर्च) खात्यावर चढवणे, लिहिणे, खाती मांडणे. ३. तपशीलवार खर्च लिहिणे (मुख्य व उपमुद्द्यांसह). ४. आग लावून देणे (किल्ला, डोंगर, रान, जमीन इ.ला). ५. शाकारणे (घर).

**नेसू** न. नेसण्याचे वस्त्र: 'नेसूं धड चिंध्या नाहीं घरीं।'- दावि ३७८.

**नेस्त** न. १. नदी, खाडी यांच्या तोंडाशी समुद्रात असणारा उंचवटा; वाळूचा दांडा, बंधारा. २. समुद्र व खाडी यांच्या सांध्यावरचा प्रदेश.

**नेस्तनाबूत-द** स्त्री. नायनाट; नाश; निर्मूलन.
वि. नष्ट; नामशेष; निर्मूल. [फा. नीस्त्+नबूद्]

**नेस्ती** स्त्री. (कुस्ती) प्रतिपक्षाचा एखादा अवयव पकडून त्याला चीत करणे; कुस्तीतील पेच, खुबी, डाव: 'कुस्तींतील नेस्त्या शिकवल्या पाहिजे.'- के २०.१२.१९३४.

**नेहटणी, नेहटबाजी** स्त्री. जोराचा पाठलाग.

**नेह(हे)टणे** अक्रि. पहा : **नेटणे**

**नेहटणे** क्रि. लक्ष लावून पाहणे; निरखणे; न्याहळणे : 'नेहटून विचारें पाहातां ।' - दास ८.८.५५.

**नेहटा** वि. बरोबर; योग्य: 'अंगी चंदनाची उटी। तेंच वज्रकवच नेहटी।'- मुरंशु २६.

**नेहटी** क्रिवि. १. नेटाने: 'धारणा नेहटीं दृढ राखे।'- एभा २०.१९७. २. निश्चयाने; खचित: 'कपटें भोगितां ती नेहटीं। झालीं भगें सर्वांगीं।'- जै ७८.४७. ३. जोराच्या अभ्यासाने: 'महामुद्रा नेहटी साधिती।'- एभा १३.७१३. ४. खेटून; जवळ : 'उमा असतांहि नेहटी। बैसला देवो।'- कथा २.५.६४.

**नेहमी** क्रिवि. १. सतत; नित्यश:; अविरत; नियमितपणे; नेमाने; सदोदित. २. सदासर्वदा; सर्वथा; कायम; पूर्णपणे; अगदी.

**नेहमी खर्च** वार्षिक नेमणूक; जमाबंदीतून काढलेला ठरावीक खर्च किंवा नियमित वजावट.

**नेह(रे)र** स्त्री. रुतण; रेवण; रुतणीची पुळण. (को.)

**नेहार** स्त्री. टक; नीट लक्ष; निरीक्षण: 'नेहार देतां आकाशीं। चक्रें दिसती डोळ्यांशीं।'- दास ७.४.११.

**नेहार(ळ)णे** उक्रि. पहा: **न्याहाळणे**: 'नेहारूनि पाहतां बाळातें।'- दावि १९. [हिं.निहारना]

**नेहारा** वि. धीमा; थंडा; भरभर कामे न करणारा. (व.)
**नैचा** पु. हुक्का: 'नैचाची नळी मधून मधून तोंडाला लावीत अर्धवट बसला किंवा पडला होता.'- केवळ स्वराज्यासाठी पृ. ५७.
**नैतिक** वि. नीतिविषयक; नीतीचा.
**नैतिक धैर्य** मनाचा धीटपणा; मनाला पटणारी गोष्ट प्रतिकूल परिस्थितीतही करण्याचे धाडस.
**नैन** न. नयन; डोळा: 'नैनी नैन एक करी भाईनाच काणा।'- बयाबाई रामदासी.
**नैपुण्य** न. प्रवीणता; कौशल्य; हुशारी. [सं.]
**नैमित्तिक** वि. १. प्रासंगिक; निमित्ताने उत्पन्न झालेला; नियमित नव्हे असा. २. शास्त्राने प्रसंगविशेषी करायला सांगितलेले (कर्म). [सं.]
**नैयायिक** वि. न्याय(तर्क)शास्त्राचा अनुयायी, तज्ज्ञ. [सं.]
**नैराश्य** न. निराशा; खिन्नता; आशाभंग; हिरमोड. [सं.]
**नैराश्यवाद** पु. १. त्यातून वाईटच निघणार अशा दृष्टिकोनातून प्रत्येक गोष्टीकडे पाहणे. २. मर्त्यलोकाहून अधिक वाईट असे काही नाही असे मानण्याची विचारपद्धती.
**नैर्ऋत्य** स्त्री. नैर्ऋती दिशा.
**नैल** न. (शाप.) एक रासायनिक मूलद्रव्य; (इं.) आयोडीन.
**नैलपुत्तिक** न. नैलाचे एक संयुक्त द्रव्य. हे पूर्वी जखमेत पू होऊ नये म्हणून लावीत; (इं.) आयडोफॉर्म.
**नैवेद्य** पु. १. देवाला अर्पण करण्याचा खाद्यपदार्थ. २. समर्पण; अर्पण. ३. (ल.) जेवण; भोजन. (क्रि. करणे). [सं.]
**नैवेद्य वैश्वदेव** १. देवाचा नैवेद्य व अग्नीत करण्याचा नित्याचा चरुहोम. २. (ल.) लाच.
**नैशकर** पु. ऊस.- भाद्विसंवृ १७२. [फा.नै-शकर]
**नैष्कर्म्य** न. १. निष्कामपणा; कर्मापासून अलिप्तता. २. ध्यानधारणादी सर्व कृत्यांपासून दूर राहण्यासंबंधी मोकळीक; धार्मिक विधी न करणे. ३. निष्क्रियता. [सं.]
**नैष्ठिक** वि. १. निष्ठेचे; निष्ठापूर्वक (धार्मिक आचरण). २. निष्ठावंत; अढळ श्रद्धेचा, सेवेचा. [सं.]
**नैसर्गिक** वि. निसर्गापासून, प्रकृतीपासून उत्पन्न झालेले; मूळचे; स्वाभाविक; सहज. [सं.]
**नैसर्गिक अधिकार** नैसर्गिक न्यायाने समता, सच्चेपणा व सत्य यांवर आधारित असे कायद्याने प्राप्त होणारे हक्क; जन्मसिद्ध हक्क.
**नैसर्गिक प्रदेश** पर्यावरणाच्या हवामान या घटकाचा परिणाम सजीव सृष्टीवर तसेच मृदांवर होतो. म्हणून जगातील प्रमुख हवामान-प्रकारांप्रमाणे जगाचे विभाजन केले जाते. अशा विभागांना देण्यात येणारी संज्ञा. उदा. विषुववृत्तीय, वाळवंटी, टुंड्रा, प्रेअरी इ.प्रदेश.
**नो** अ. संबोधनाच्या अनेकवचनाचा प्रत्यय. उदा. मुलांनो!
**नोक** स्त्री. १. (सुई, काठी इ.चे) टोक; अणी; फळ (भाल्याचे). २. मुद्दा; खुबी; (गोष्ट, भाषण यांतील) तात्पर्य, ध्यानात धरण्यासारखी गोष्ट; लक्षण; वैशिष्ट्य; विशिष्ट ढब, पद्धत. ३. नोकझोक; नखरा; ऐट: 'करितात कवन गातात मधुर नोकिंत.'- प्रला १३२. ४. किंचित सूचना; खोच; चुणूक; टोला; उपरोध; व्यंगोक्ती. (क्रि. दाखवणे, मारणे, लावणे); झोंबणारे भाषण: 'ऐकोनि स्त्रियेचा नोक थोरू। ... तें नृपवरू स्मरेना।' - एभा २६.७१. ५. टोचणी; नेट; तगादा. [फा.नौक्]
**नोकझोक** स्त्री. १. पहा: **नोक** ४. २. ढब; नखरा; थाटमाट (पोशाख, भाषण, चालणे वगैरेमध्ये). (क्रि. सांभाळणे). ३. तंटा; भांडण; धकाधकी; झोकाझोकी. ४. चुणूक; दाखवलेली झुळूक. ५. इशारा; अंधुक सूचना.
**नोकणे** सक्रि. १. टोचणे; टोकणे: 'नोकणें सिक्षणें ना काम सांगणें।'- दावि ४५४. २. पराभव, अपमान करणे: 'देखोनि नास्तिकी नोकिली। भक्तवृंदें।'- ज्ञा ६.३२४. ३. दुःख देणे; छळणे; टाकून बोलणे: 'वीर मातले अतिदृप्त। नोकूनि बोलत परस्परें।'- एभा ३०.११०. ४. जिंकणे: 'कळिकाळ नोकूनियां। घेतला पटा।'- माज्ञा १२.८४.
**नोकणे** सक्रि. लपवणे; निंदणे. [सं.ह्नु]
**नोकणे** सक्रि. कृपादृष्टीने पाहणे: 'तिया वेळां केवि गमलें। जाणों कूर्मी अपत्या नोकिलें।'- स्वादि ७.५.९१.
**नोकणे** सक्रि. हुडकणे; शोधणे. [सं.अनु+ईक्ष्]
**नोकदार** वि. १. टोकदार; अणकुचीदार: 'द्रोण केळीचे चांगले दोहों काड्यांचे नोकदार लावावे.' - पया २९१. २. तिखट, झोंबणारे, तीव्र (भाषण इ.). ३. ऐटदार; नखरेबाज; झोकदार (वस्तू इ.). ४. खुबीदार.
**नोकर** पु. सेवक; चाकर; दास. [फा.नौकर]
**नोकर इनाम** १. सरकारी नोकरासाठी दिलेला सरंजाम, इनाम, जहागीर. २. देवालय, समाधी यांची पूजा-अर्चा, दिवाबत्ती, झाडलोट इ. साठी दिलेले धर्मादाय, देवस्थान इनाम.
**नोकरचाकर** पु. अव. गडीमाणसे.
**नोकरशहा** पु. सरकारी खात्यातील फर्मान सोडणारा वरिष्ठ अधिकारी.
**नोकरशाही** स्त्री. १. नोकरांनी चालवलेली राज्यव्यवस्था; नोकर, अधिकाऱ्यांचा अंमल, प्राबल्य. २. प्रबळ, अरेराव नोकरवर्ग. ३. जुलमी नोकरसत्ता; जुलूम-जबरदस्तीचा कारभार; (इं.) ब्युराक्रसी. (हा शब्द लो.टिळकांनी १९३७ साली रूढ केला.)
**नोकरीयात** वि. (सरकारी) नोकरी करणारा: 'ज्या नोकरीयात पहिलवानास आखाड्यांत राहण्याची इच्छा असेल...'- (बडोदें) पहिलवान व कुस्ती नियम ८.
**नोकल-ळ** स्त्री. चुकवाचुकव.
**नोकानोकी** स्त्री. १. व्यंगोक्तींनी, खोचदार सूचना इ.नी झालेली बोलाचाली. २. पहा: **नोकझोक** ३
**नोकिलेपण** न. छळ; पराभव; अपमान.
**नोकी** स्त्री. पराभव: 'कवि हसेन कलगीवाल्यावर लावी नोकी।'- ऐपो २३७.
**नोट** स्त्री. कागदी चलन. [इं.]
**नोटीस** स्त्री. १. सूचना; विनंतीपत्र. २. जाहिरात; वृत्तपत्रात सूचना. [इं.]
**नोटीसवाहक** पु. नोटीस बजावणारा; (इं.) बेलीफ.
**नोटेशन** न. (संगीत) स्वरलेखन.
**नोडग्या-गो, नोडा** पु. १. (निंदार्थी) मुसलमान; अविंध: 'नोडग्यांच्या

हातांत सांपडणारच नाहीं असें नाहीं.'- सूर्योदय २१५. २. (ल.) आडदांड माणूस.

**नोडती** स्त्री. उत्तर दिशा.- वरामो.

**नोडवणे** उक्रि. १.पुढे न येणे; प्राप्त न होणे: 'कीं माझिए क्षेत्रवृत्ती। नोडवेचि निकीं।'- ऋ ५२. २. पुढे करणे: 'परि म्हणे राजकुमर। दीधल्या मी नोडवी कर।'- कथा ५.६.९५.

**नोडा** पु. गुंडीच्या आकाराचा पांढरा शेंडा असलेली लव्हाळाच्या जातीची एक वनस्पती.

**नोन** पु. मीठ. (झाडी) [सं. लोणक]

**नोनि** स्त्री. स्त्रीचे जननेंद्रिय. [त.;म.]

**नोप** स्त्री. शोभा; तेज: 'शृंगारिल्या उत्कट राजवीथी। समस्त शृंगाटक नोप देती।'- सारुह ६.३.

**नोबत** स्त्री. संकट; वाईट प्रसंग. [अर.नौबत]

**नोबती** पु. गजपालक; हत्तींची देखभाल करणारा; हत्तीवरून लढाई करणारा. [फा.]

**नोमथोम** पु. (संगीत.) चीज गाण्यापूर्वी त्या रागाचा गायला जाणारा स्वरालाप.

**नोर** न. जहाजावरच्या प्रवासाचे, माल नेण्या-आणण्याचे भाडे; गलबताचे भाडे.- शके १०१६ चा शिलाहार ताम्रपट. [हिं.]

**नोर** पु. चेहरा. (उचले.) [अर.नूर]

**नोरज** न. डास; चिलट. (बे.) [क.नोरजु]

**नोरी** वि. भाड्याचे (गलबत इ.); भाडे देऊन ताब्यात घेतलेला; जहाजावर चढवलेला (नेण्या-आणण्यासाठी घेतलेला माल).

**नोरी** स्त्री. समुद्रवेल: 'हिंवाळ्यांत बहुतेक लोक छोट्या होड्या घेऊन नोरी काढण्यांत गुंतलेले असतात.'- के १५.११.१९३८.

**नोल्लल** न. नारळाचे तेल. (गो.)

**नोहारवाणी** स्त्री. (संगीत) एक ध्रुवपदगायन पद्धती. (प्रसिद्ध ध्रुवपदगायक श्रीचंद हा नोहारगावी राहात असे त्यावरून).

**नोहे-वे** क्रि. नव्हे; नाही: 'नळें केली हे कोण म्हणे नोहे?'- र ९.

**नोंद, नोंदवही** स्त्री. (सरकारी किंवा व्यापारी) नक्कलवही; जिच्यात टाचण, टिपण, लेख करतात ती वही; (इं.) रजिस्टर.

**नोंद, नोंदणी** स्त्री. (हुंडी किंवा सरकारी कागद यांची) नक्कल करून ठेवणे; टाचण; लेख.

**नोंदणे** सक्रि. (हुंडी स्वीकारल्यावर तिची, सरकारी कागद इ.ची) नक्कल करून ठेवणे; टाचण करणे; लिहून ठेवणे. [हिं.नोंदना; गु. नोंदू]

**नोंदणीविवाह** पु. संबंधित अधिकाऱ्याला एक महिन्याची पूर्वसूचना देऊन, कोणाची हरकत नसल्यास साक्षीदारांसमोर त्या अधिकाऱ्याच्या पुढे नोंदणी केलेला विवाह.

**नौ** वि. नऊ; ९ ही संख्या. [सं.नव]

**नौ, नौका** स्त्री. होडी; नाव. [सं.]

**नौक** पु. संधी; सांधा; मिळण्याची जागा.

**नौकादंड** पु. वल्हे.

**नौकानयन** न. समुद्र, नदी यांत जहाज, नाव इ. साधनाने प्रवास. [सं.]

**नौकानयनशास्त्र** न. जहाज, बोटी चालवण्याचे शास्त्र. [सं.]

**नौकाबंधन** न. जहाजे बांधण्याचा धंदा; जहाजे तयार करणे. [सं.]

**नौकायोग** पु. लग्न व त्यापुढील सहा स्थाने यांमध्ये सर्व ग्रह असतील तर नौकायोग होतो.- जातक १७२.

**नौकासन** न. पोटावर झोपून हात व पाय उंच करून शरीराला नौकेसारखा आकार देणारे योगासन.

**नौकित्र** पु. लौकिक. (गो.)

**नौखंडा** पु. नऊ खणांचा दिवाणखाना: 'नवाब नौखंडे यांत दरबार करून बैसले होते.'- पेद २५.८४.

**नौखा, नौगजी इ. 'नौ' या संख्यादर्शक शब्दाने सुरू होणारे शब्द 'नव' मध्ये पहावेत.**

**नौपटी** वि. खूप लांब, नऊ पट लांबीच्या साडीचा एक प्रकार: 'साड्याशी नौपटीच्या कतिपय लुगडीं जे नवे पांजणीची।'- सारुह ३.४१.

**नौप्रतिभूती** स्त्री. प्रवासाला लागणारा खर्च भागवण्यासाठी जहाज गहाण ठेवून कर्ज काढण्याची पद्धत.

**नौबत** स्त्री. १. मोठा नगारा; डंका. (क्रि.झडणे, वाजणे.)२. घटका; काळ; प्रसंग; स्थिती. ३. अडचण; संकट.[अर.] (वा.) ० **झडणे**- बोलणी बसणे. (व.)

**नौबतखाना** पु. दरवाज्यावरील चौघड्याची जागा.

**नौबतघाई** स्त्री. १. नगारा, (ल.) रणवाद्ये जोराने वाजणे. २. (ल.) विलक्षण गडबड, गोंधळ, घाई.

**नौभरक** पु. जहाजावर माल चढवणे व उतरवणे या कामांवरील अधिकारी.

**नौरीकी** वि. नोर घेऊन माल नेणारे (जहाज); भाडेकरू: 'दरीयामध्यें जहाजे नौरीकी उतारे मार्गे मोऱ्हेमागा जातात म्हणोन न म्हणावे...'- पेद २४.१८३.

**नौरुपी** वि. प्रथमच, नवीनच व्यालेली (गाय इ.).

**नौल** न.वादळ; तुफान.

**नौला** पु. झरा: 'अल्मोड्याच्या पाऊलवाटेवरून उतरून एका नौलापाशीं आम्ही गेलों.'- माहिम ८३.

**नौली** स्त्री. एक योगक्रिया.

**नौली** स्त्री. शेर; थोर नावाचे झाड.

**न्यसणे** सक्रि. १. टाकणे; फेकणे; झुगारणे. २. ठेवणे; स्थापणे: 'तैसेनि मार्दवें पाय। भूमीवरी न्यसीतु जाय।'- ज्ञा १३.२५४.[सं.नि+अस]

**न्यस्त** वि. १. ठेवलेला; स्वाधीन केलेला. २. त्यक्त; फेकलेला: 'पार्थ म्हणे गोविंदा न्यस्तायुध तूंचि पाहिजेस मज।'- मोउद्योग १.४१.[सं.]

**न्यहा** पु. १. सुताराचा, लोहाराचा कारखाना. २. (ज्याच्यावर गवत इ. तोडतात तो) लाकडाचा ओंडका. ३. ऐरण: 'न्यहा संतप्त आधार देत। वरुनी घणघाय घेत।'- एभा ३.४३२. [हिं.निहाई]

**न्यहार** वि. गुळगुळीत; साफ; सपाट; खडबडीत नसलेला.

**न्यहारणे** उक्रि. सारखे, सपाट, साफ करणे.

**न्यहाल** वि. १. श्रीमंतीला, मोठ्या पदवीला, मानाला चढलेला, चढवलेला: 'कार्याअंती न्यहाल व्हाल नाहिंतर ठेवाल दूषणें।'- प्रला १०७. २. कृपेतील; मेहेरबानीतील. [फा.निहाल]

**न्यहाली** स्त्री. चटई; लहान गादी: 'परांच्या न्यहालीवर खेळल्यें ।'– प्रला २२९.

**न्यहाली–ल** स्त्री. कृपा; मेहेरबानी; अनुग्रह. [फा.निहाली]

**न्याय** पु. १. योग्यपणा; रास्तपणा; युक्तता; खरेपणा; तथ्य; यथार्थता. २. खरा निर्णय, निकाल; इन्साफ. ३. नीती. ४. (तर्क.) वादविवाद किंवा मत, बाजू मांडण्याची रीती, प्रकार. पाच प्रकार– प्रतिज्ञा, हेतू, उदाहरण, उपनय, निगमन. ५. (तर्क.) संस्कृत वाङ्मयातील षड्दर्शनांपैकी सहावे. यात अनुमानासंबंधी विवेचन आहे. कर्ता गौतम. ६. वचन; शासन; नियम; पद्धत; सामान्य तत्त्व; मूलभूत सूत्र; दाखला; म्हण; उखाणा; दृष्टान्ताला उपयोगी पडणारी सर्वलोकप्रसिद्ध गोष्ट. उदा. देहलीदीपन्याय, अंधपंगुन्याय इ. [सं.] ० **सांगणे**– फिर्याद, तक्रार करून इन्साफ मागणे.

**न्यायनिष्ठुर** वि. न्यायाच्या बाबतीत भीडभाड न बाळगणारा.

**न्यायप्रतिनिधी** पु. मुखत्यार; वकील; (इं.) ॲटर्नी.

**न्यायप्रविष्ट** वि. ज्या गोष्टीचा न्यायालयात खटला चाललेला आहे अशी गोष्ट.

**न्यायमन्सुबी–मन्सोबा** स्त्री. पु. १. न्यायाधिशापुढे चालू असलेला खटला. २. खटल्याची चौकशी. [सं.न्याय+अर.मन्सूबा]

**न्यायमित्र** पु. पक्षकाराच्या सांगण्यावरून नव्हे तर न्यायाधिशांच्या विनंतीवरून किंवा स्वत:हून न्यायदानात साहाय्य करणारा.

**न्यायवैद्यकशास्त्र** न. वैद्यकशास्त्रातील ज्ञानाच्या आधारे गुन्ह्याचा तपास व उकल करण्यासाठी विकसित झालेले शास्त्र.

**न्यायसभा, न्यायमंदिर, न्यायालय** स्त्री.न. न्याय करण्याची जागा, कचेरी; (इं.) कोर्ट.

**न्यायाधिकरण** न. १. काही विशिष्ट प्रकरणे ऐकून निवाडा देण्यासाठी नेमलेला लवाद/लवादमंडळ. २. विद्यापीठ आणि नोकरवर्ग यांच्यामधल्या तंट्यांच्या बाबतीत निर्णय घेण्यासाठी महाराष्ट्र सरकारने नियुक्त केलेला लवाद.

**न्यायाधिशी** स्त्री. १. न्यायाधिशाचे काम. २. न्यायाधिशाची कचेरी; कोर्ट. (बडोदे)

**न्यायाधीश** पु. १. न्याय करणारा, देणारा. २. (कायदा) दिवाणी किंवा फौजदारी इन्साफात, निकालात कायदेशीर रीतीने काम चालवून निकाल देण्याचा अधिकार असलेली व्यक्ती.

**न्यायिके** न.अव. समान वागणुकीच्या तत्त्वपालनासाठी पाळण्याचे नियम व रीती; समतेची तत्त्वे.

**न्याय्य** वि. न्यायाला अनुसरून; योग्य; रास्त; बरोबर; उचित. [सं.]

**न्यारगीर** वि. मिश्र पदार्थातून शुद्ध धातू काढणारा.

**न्यारा** वि. १. वेगळा; निराळा; न जोडलेला; भिन्न. २. दुसरा; स्वतंत्र; असदृश. ३. अलौकिक; विशेष. [हिं.]

**न्यास** पु. १. ठेवणे; स्थापणे; निक्षेप; मुख्यत्वे सोडवण्याच्या गणिताचे आकडे मांडणे; शस्त्रास्त्रांवर दैवी मंत्रांचे अधिष्ठान करणे; मनात, आठवणीत ठेवणे; सोपवणे (ठेव, वस्तू इ.). २. घरधन्याला न दाखवता त्याच्या पश्चात घरातील माणसांच्या हवाली करून हे मालकाला द्या असे सांगून दिलेले द्रव्य. ३. जप इ. कर्मांच्या प्रारंभी ज्या मंत्राचा जप करायचा असेल त्यातील बीजाचे आपल्या शरीरावयवांच्या ठिकाणी अधिष्ठान कल्पून त्या–त्या शरीरावयवाला स्पर्श करणे. ४. मंत्रांनी देवाच्या मूर्तीच्या अवयवांवर देवत्वाची स्थापना करणे. ५. छाप; ठसा; खूण. ६. सोडणे; त्यागणे; न स्वीकारणे; त्याग. ७. विश्वस्तनिधी. [सं.]

**न्यासविलेख** पु. विश्वस्तनिधीचे हेतू, कार्यवाही व निधी निर्माण करणारे यासंबंधीचा करार.

**न्याहरणे** सक्रि. न्याहाळणे; निरखून पाहणे: 'वारंवार मुख न्याहरी । हरिखें लिंबलोण उतरी ।'– भारा बाल २४.६८.

**न्याहरी** स्त्री. सकाळचा थोडा फराळ. [फा.नहारी]

**न्याहा–हो** पु. ध्वनी; शब्द; कल्लोळ: 'धनुष्यनादाचिया कोटी । न्याहा उठला वैकुंठी ।'– भारा बाल १२.११०.

**न्याहार** पु. दृष्टी; कटाक्ष.

**न्याहार** वि. गुळगुळीत; सपाट.

**न्याहाळ** पु. पाहणी: 'उठोनि करी न्याहाळ । मंदिराचा ।'– कथा १.६.२००.

**न्याहाळणे** सक्रि. बारकाईने, एकाग्रतेने, चित्त देऊन पाहणे; परीक्षा करणे.

**न्युन** पु. (शाप.) हवेमध्ये अतिसूक्ष्म प्रमाणात असलेला वायू. हा चेतनारहित वायुवर्गापैकी एक आहे.– ज्ञाको (न) ४०८. [इं.निऑन]

**न्युमोनिया** पु. फुप्फुसांचा एक जीवाणुजन्य रोग. प्रमुख लक्षणे: ताप चढणे, श्वासोच्छ्वास करणे कठीण होणे. [इं.]

**न्यूक्लिऑन** पु. (भौतिक.) केंद्रकात असणारे प्रोटॉन व न्यूट्रॉन.

**न्यूक्लिक आम्ले** (जीव.) जिवंत पेशीचे अत्यावश्यक घटक. डी.एन्.ए. व आर्.एन्.ए. हे त्याचे दोन मुख्य प्रकार.

**न्यूक्लीय एकन** (भौतिक.) सूर्यातील हायड्रोजनच्या केंद्रकाचे उच्च तापमानामुळे हेलिअमच्या केंद्रकांमध्ये सतत रूपांतर होणे.

**न्यूक्लीय बल** (भौतिक.) द्रव्याच्या अणुकेंद्रातील अतिसूक्ष्म कणांना एकत्र ठेवणारे बल.

**न्यूटन** पु. १ कि.ग्रॅ. वजनाच्या वस्तूचे १ सेकंदात १ मीटर विस्थापन करण्यास लागणारे बळ.

**न्यूट्रॉन** पु. अणूमधील विद्युतदृष्ट्या उदासीन असलेले, म्हणजे धन किंवा ऋणप्रभारित नसलेले कण.

**न्यून** वि. १. कमी. २. अपुरा; आखूड; उणा. ३. खालच्या, कमी दर्जाचा; हलका (किंमत, उपयोग, पदवी इ.त). [सं.]

**न्यूनगंड** पु. स्वत:विषयी कमीपणाची तीव्र भावना.

**न्यूनता** स्त्री. उणीव; कमतरता.

**न्हवणे** न. ऐरीबरोबर आणलेली इतर चार मडकी.– बदलापूर २३७.

**न्हाण** पहा: **नहाण**

**न्हाणणे** सक्रि. न्हाऊ घालणे: 'न्हाणी क्षतजें कोपें । आणी तैं पार्थलोचनीं पाणी ।'– मोभीष्म ३.२७. [सं.स्ना]

**न्हाणी** स्त्री. स्नानगृह. [सं.स्नान] (वा.) ० **पाहाला विटाळ येणे**– (बायकी) बाळंतीण झाल्यापासून पहिल्या तीन महिन्यांच्या आत बाहेरची होणे. ० **पाहाला साप येणे**– (गर्भवती स्त्रीने साप पाहिल्यास त्याचे डोळे जातात अशा समजुतीवरून) बाळंतिणीच्या न्हाणीत साप

निघणे. (असा साप आला म्हणजे त्याची गेलेली दृष्टी परत येते असे म्हणतात.)

**न्हाणीचा चौक** (बायकी) लग्नमुंजीत न्हाण्यासाठी चार पाट मांडून त्यांच्या चारही बाजूंना चार भांडी रंग घालून ठेवून प्रारंभी एका भांड्याला सूत गुंडाळून चारी पाटांभोवती त्या भांड्यांच्या भोवती तीन वेळा सूत गुंडाळून केलेला चौक.

**न्हाणीपूजन** न. (बायकी) प्रसूत झाल्यापासून तिसऱ्या दिवशी बाळंतिणीकडून न्हाणीची पूजा करवून भिजलेल्या हरभऱ्यांनी ओटी भरून मग न्हाणीवर पांढऱ्या चाफ्याची पाने व हरळी वाहतात तो विधी.

**न्हाणे** अक्रि. स्नान करणे.

**न्हानोरे** न. नवरा-नवरीला आंघोळ घालण्याचा लग्नातील एक विधी.

**न्हाळ्ळ दिसांची** वि. गरोदर. (गो.)

**न्हावगंड** पु. (निंदार्थी) न्हावी. [म.न्हावी+क.गंड प्रत्यय]

**न्हावण** न. १. गौरीचे नमन.(कर.) २. गौरी भरून येण्याचा समारंभ (कुणब्यांचा).

**न्हावाण** न. देवावर स्नानासाठी घातलेले व तीर्थ म्हणून घेण्याचे पाणी; देवाचे तीर्थ. (कु.)

**न्हावी** पु. हजाम; नापित (पूर्वी याचे काम गिऱ्हाईकाचे अंग रगडून, उटी लावून स्नान घालण्याचे असे त्यावरून). [सं.स्नापित; प्रा. ना(न्हा)विअ - न्हाविओ-उ; नहापित; बं. नापि; हिं.सिं. नाई]

**न्हावी** पु. १. एक किडा. हा बाभूळ इ.च्या काट्यांचे घर करतो. २. एक लहान पक्षी.

**न्हावेर** पु. पाट; विधवेचा पुनर्विवाह. (को., कुण.) [सं.नव+वर]

**न्हिद** स्त्री. झोप. (गो.) [सं.निद्रा]

**न्हेनो** पु. नेणता; अज्ञानी. (गो.) [सं.न+ज्ञान]

**न्होकणे** अक्रि. लपणे; दडणे. (कुण.) [सं.न्हु]



४ कोशात उपयोगात आणलेल्या संक्षेपांच्या स्पष्टीकरणाची सूची (ग्रंथ-ग्रंथकार)

संदर्भ

| संक्षेप | ग्रंथनाम | लेखक/संपादक |
|---|---|---|
| अअं | अणूच्या अंतरंगात | संझगिरी प्रभाकर |
| अआगो, असा आहे | असा आहे माझा गोमंतक | भोबे गो. कृष्ण |
| अआबांदे | असा आहे बांगला देश | वाणी य.शं. |
| अउआ | अजून उजाडायचे आहे | कोंडाविलकर माधव |
| अक अनंत, अनंत सीता-स्वयंवर | सीतास्वयंवर | अनंत |
| अकक | अनेक कविकृत कवितासंग्रह | साने का. ना. |
| अककगरं, अककगंगधार | (अनेक कविकृत कवितासंग्रह) रसकल्लोळ | गंगाधर |
| अक कृष्ण कौतुक | कृष्णकौतुक | अनेक कवि |
| अक्रूराचा पाळणा, | पाळणे संग्रह | अक्रूर |
| अखभा | पुणे अखबार | हैद्राबाद सरकार |
| अगतिका | अगतिका | उद्धव शेळके |
| अगं | अजगर आणि गंधर्व | तेंडुलकर विजय |
| अगा | अगा जे कल्पिलें नाही | सूर्यवंशी सत्यवान नामदेव |
| अगो, अगोचर | अगोचर | खानोलकर चि. त्र्यं. |
| अगाअवि, अगावि | – | – |
| अदिल्ली, अशीदि | अशी ही दिल्ली | टिळक ज. श्री. |
| अदेशी | अदेशी | – |
| अधांतर | अधांतर | राजाध्यक्ष विजया |
| अध्यापन | साहित्य:अध्यापन आणि प्रकार | भागवत श्री. पु. व इतर |
| अनंतफंदी, अफला | अनंतफंदी लावण्या, पोवाडे | अनंतफंदी |
| अनंतसीस्व | सीतास्वयंवर | अनंत |
| अपुरा | अपुरा डाव | कवठेकर द. र. |
| अबिवा, अशीही, अहीबिवा | अशी ही बिकट वाट | माडीवाले वि.स. |
| अभं | अभंगांजलि | टिळक ना. वा. संपा. |
| अभा, अस्तंभा | अस्तंगत भानू | परांजपे द. वि. |
| अभासे | महाराष्ट्र शब्दकोश | दाते य. रा. |
| अभ्युदय | महाराष्ट्र शब्दकोश | दाते य. रा. |
| अम | अर्वाचीन मराठी | धोंगडे रमेश |
| अमर | अमरकोश | – |
| अमराअ | – | – |

| संक्षेप | ग्रंथनाम | लेखक/संपादक |
|---|---|---|
| अमागो | असा आहे माझा गोमंतक | भोबे गो.कृ. |
| अमृ, अमृता | श्री अमृतानुभव | ज्ञानदेव, गोखले व्ही. डी. संपा. |
| अमृत, अमृतक, अमृतराय | कवितासंग्रह | अमृतराय, ओक वा.दा. - संपा. |
| अमृतध्रुव | ध्रुवचरित्र | अमृतराय, ओक वा. दा. - संपा. |
| अमृतबाल | बालक्रिडा | अमृतराय, ओक वा.दा. - संपा. |
| अमृत सुदा, अमृतसुदाम | सुदामचरित्र | अमृतराय. |
| अयां | अभियांत्रिकी यांत्रिकी | - |
| अयु | अणुयुग | - |
| अरु, अरुणोदय | अरुणोदय | बाबा पद्मजी |
| अर्थ, अर्थपा | अर्थ (पाक्षिक) | काळे श्री. वा. |
| अर्वाचीन | अर्वाचीन महाराष्ट्रेतिहासकालातील राज्यकारभाराचा अभ्यास | जोशी शं. ना. |
| अली | अज्ञातलीळा | म्हाइंभट, संपा. कोलते वि.भि. |
| अश्वप | अश्वपरीक्षा | गुप्ते रा.स. - संपा. |
| अष्टप्रधानांचा इतिहास | अष्टप्रधानांचा इतिहास | - |
| असा | असा हा गोमंतक | गडकरी माधव |
| असा मी | असा मी असामी | देशपांडे पु. ल. |
| असे | महाराष्ट्र शब्दकोश - पुर | दाते य. रा. - संपा. |
| असे हे | असे हे असे हे | शेळके उद्धव |
| अस्ताई | अस्ताई | भोळे केशवराव |
| अस्पृ | अस्पृष्टांचा प्रश्न | माटे श्री.म. |
| अस्मृ | अज्ञातस्मृति | देशपांडे वा.ना. - संपा. |
| अहमु | मृद्‌गलाचार्यांचे भाषांतर रामार्या | हरिराज |
| अहिल्या | अहिल्या आणि इतर कथा | जोगळेकर |
| अक्षर | अक्षर | मंत्री रमेश |
| अज्ञाअ | अफजलखान वध | अज्ञानदास |
| अज्ञातच | अज्ञात चरित्र (महानुभावी) | - |
| अंअ | अंधाराचे अश्रू | हिदायखान |
| अंझे | अनंताकडे झेप | भागवत अ. ल. |
| अंद, अंतरिक्ष दर्शन | अंतरिक्षदर्शन | गोखले व्यंकटेश गणेश |
| अंबाबाई रामदासी | रामदासी | अंबाबाई |
| अंबेशिला, आंबेशिला | आंबेगाव शिलालेख (प्राचीन मराठी कोश) | तुळपुळे / फेल्डाउस |

| संक्षेप | ग्रंथनाम | लेखक/संपादक |
| --- | --- | --- |
| अंया, अंधार | अंधारयात्रा | – |
| अंवा | – | – |
| आ, आ प्रस्तावना | – | – |
| आअ | आऊबाईचे अभंग-ससंगाथा | साखरे नाना महाराज – संपा. |
| आआआ | आपण आणि आपले आरोग्य | – |
| आआ, आव्हान | आव्हान आणि आवाहन | गोरे ना. ग. |
| आआशे | आई आहे शेतात | दिघे र.वा. |
| आआं | आखर आंगण | केचे मधुकर |
| आईची माया | – | – |
| आईनस्टाईन | आईनस्टाईन | भालेराव सुधाकर |
| आकं | कंदुकाख्यान | आनंदतनय |
| आकृ | कृष्णचरित्र | आनंदतनय, मोडक ज.बा., ओक वा. दा.- संपा. |
| आकृस | आमचे कृतार्थ सहजीवन | हिवाळे रूथबाई |
| आगर | आगरकर निबंधसंग्रह | आळतेकर मा.दा. – संपा. |
| आगं | – | – |
| आगो | गोरसक्रीडा | आनंदतनय, मोडक ज.बा, ओक वा.दा. – संपा. |
| आचामा, आचार माहाभाष्य, आचारभाष्य | आचार माहाभाष्य | – |
| आठइ, आठइति, आठल्ये | आठल्ये घराण्याचा इतिहास | आठल्ये वि.वा. – संपा. |
| आडगाव, आपा | आडगावचे पाणी | खरात शंकरराव |
| आडिमहा | आडिवऱ्याची महाकाली | दीक्षित चिं.कृ. |
| आता | ताटकावध | आनंदतनय |
| आत्मवृत्त | आत्मवृत्त | कर्वे धों.के. |
| आत्मा | – | – |
| आन | नवरसचरित्र | आनंदतनय |
| आप | आठवणींचे पक्षी | सोनकांबळे प्र. ई. |
| आप, आपद | पदे | आनंदतनय, मोडक ज.बा., ओक वा.दा. संपा. |
| आपघइ, आपटेघराइ | आपटे घराण्याचा इतिहास. | आपटे गो. वि. |
| आपू, आपूव | पूतनावध | आनंदतनय |
| आप्र | आदिवासी प्रश्न | गारे गोविंद |
| आप्रदि | आषाढस्य प्रथम दिवसे | अत्रे प्र. के. |
| आफ, आफर्माने | आदिलशाही फर्माने | – |

| संक्षेप | ग्रंथनाम | लेखक/संपादक |
|---|---|---|
| आभ | – | – |
| आभा | आधुनिक भारत | जावडेकर शं. द. |
| आभासा, आभाळाची सावली | आभाळाची सावली | कवठेकर द. र. |
| आभाळ | आभाळ | इनामदार मालती |
| आमहा | महाबळचरित्र | आनंदतनय |
| आमा | मार्कंडेयाख्यान | आनंदतनय |
| आमाणसे | आवडलेली माणसे | पुंडलिक विद्याधर |
| आमृच | मृगीचरित्र | आनंदतनय |
| आय | यज्ञरक्षण | आनंदतनय |
| आयर्लंडचा इतिहास | – | – |
| आयर्विन | द आर्मी ऑफ इंडियन मोघल्स | आयर्विन डब्ल्यू |
| आयाह | महाराष्ट्र शब्दकोश | दाते य. रा. – संपा. |
| आयुसिद्ध | आयुर्वेदिक सिद्ध औषधी | केळकर द. शं. |
| आराम | रामचरित्र | आनंदतनय. |
| आरोशा | आरोग्यशास्त्र | मोडक बा.प्र. – संपा. |
| आर्फि, आर्फियस | आर्फियस | चित्रे दि. पु. |
| आर्याभारत | आर्याभारत | मोरोपंत |
| आले, आलेसं, आलेख | आगरकर लेखसंग्रह | – |
| आलो | आलोचना | |
| आविप्र | आर्थिक विकासाचा प्रश्न | दाभोळकर दे. अ. |
| आविश्वा | विश्वामित्र | आनंदतनय |
| आश, आशबरी | शबरी आख्यान | आनंदतनय |
| आशिआस | आजचे शिक्षण: आजच्या समस्या | पाटील; सौ. कुलकर्णी |
| आशिबी | शिबीचक्रवत्याख्यान | आनंदतनय |
| आसी, आसीस्व | सीतास्वयंवर | आनंदतनय |
| आसु, आसुच, आसुदा | सुदामचरित्र | आनंदतनय |
| आसे, आसेतु | सेतुबंध | आनंदतनय. |
| आज्ञा, आज्ञाउपोद्, आज्ञापत्र | आज्ञापत्र अर्थात शिवाजीची राजनिति | अमात्य रामचंद्रपंत. |
| आंग्रे, आंप, आंपव्य | आंग्रेकालीन पत्रव्यवहार | आळवसकर शां. वि. संपा. |
| आंघइ | आंग्रे घराण्याचा इतिहास | ढब्बू, दामोदर गोपाळ |
| आंटा | आंब्याचा टाळा | आठवले सुशीला |
| आंबे शिला | प्राचीन मराठीकोश | तुळपुळे शं. गो. –संपा. |

| संक्षेप | ग्रंथनाम | लेखक/संपादक |
|---|---|---|
| आंयांह | आंग्रे यांची हकीकत | पारसनीस द.ब. - संपा. |
| आंवि | डॉ. आंबेडकर विचारमंथन | कुबेर वा.ना. |
| इएमपी | एक्स्पांशन ऑफ मराठा पॉवर | – |
| इऐ | इतिहास ऐतिहासिक | – |
| इचसंइ | इचलकरंजी संस्थानचा इतिहास व इचलकरंजी दप्तरातील निवडक पत्रे, यादी | खरे वा.वा. |
| इनाम, इना | मुंबई इलाख्यातील इनाम कमिशन खाते यातील गैरइनसाफ | मालशे स.गं. |
| इन्साफ | इन्साफ | कदमबाबा |
| इपुस्त्रिपो | इतिहास प्रसिद्ध पुरूष व स्त्रियांचे पोवाडे | आक्वर्थ, शाळीग्राम शं. तु. |
| इप्र | महानुभाव : इतिहास प्रकरण. | प्रियोळकर अ.का. -संपा. |
| इमं | इतिहास मंजिरी | आपटे द. वि. - संपा. |
| इलासुंदरी | – | – |
| इशा | इहवादी शासन | सहस्त्रबुद्धे पु. ग./ संग्रह |
| इसदिमरा | ऐतिहासिक शब्दकोश | केळकर य. न. |
| इसं, होकै | इतिहास संशोधन, होळकर कैफियत | – |
| इसा | शिंदेशाही इतिहासाची साधने - भाग १ | फाळके, आ. संपा. |
| इंग्लंडची बखर | इंग्लंडची बखर | – |
| इंधन | इंधन | दलवाई हमीद |
| इंप | इंग्रजांचा पराभव | कोल्हटकर अ.ब. - संपा. |
| इंमू, इंरामू | इंग्लंडच्या राज्यकारभार व्यवस्थेच्या इतिहासाची मूलतत्त्वे | फाळके शि.गो. - संपा. |
| ईवि | ईश्वरी विद्या | रिविंग्टन सी.एस. -संपा. |
| उ, उगी, एउगी | उद्धवगीता (एकादशस्कंध) | बोरीकर भास्करभट्ट, कोलते वि.भि. - संपा. |
| उअ, उभ, | उभायन्वयी अव्यय | खोत चंद्रकांत |
| उअं, उपेअं, उपेअंत. | उपेक्षितांचे अंतरंग | माटे श्री.म. |
| उकथा | उपहासकथा | दळवी जयंत |
| उच | महाराष्ट्र शब्दकोश - पुर. | दाते य. रा. |
| उचिशु | शुकरंभा संवाद | उद्धवचिद्घन. |
| उत्प | उत्पत्ति | – |
| उद्यम | उद्यम (मासिक) | – |
| उद्र | उपेक्षित द्रष्टा | बापट दिवाकर |

| संक्षेप | ग्रंथनाम | लेखक/संपादक |
|---|---|---|
| उपरा | उपरा | माने लक्ष्मण |
| उपा | – | – |
| उपोद | उपोद्घात | आपटे ह.ना. |
| उभिं, उत्तभिंती | उत्तरेकडील भिंती | कालेलकर काका |
| उमं | उपोषण मंडळ | टिळक ना.वा. – संपा. |
| उमा | उपयोजित मानसशास्त्र | भागवतवार प्र. आ. |
| उमाविलास | उमाविलास | – |
| उरा | उत्तररात्र | देशपांडे ना.व्यं. |
| उष:, उष:काल | उष:काल | आपटे ह.ना. |
| उषा | उषाहरण | चोभा |
| उसं | उपासना संगित | ट्रॅक्ट अँड बुक सोसायटी सन १९२३. |
| उह | उखाहरण | कवि कुंभ, पठाण यु. म. – संपा. |
| ऊन | ऊन | पाटील शंकर |
| ऋग | ऋग्वेदसंहिता | – |
| ऋम | ऋद्धिपूर महात्म्य | महेश्वरपंडित. |
| ऋव,ऋ | ऋद्धिपूर वर्णन | वहाळिये ना.व्यां., तुळपुळे शं. गो. – संपा. |
| एकनाथ, एकनाथपदे (नवनीत) | नवनीत | गोडबोले परशुरामपंततात्या – संपा. |
| एप्या, एकच प्याला, एक | एकच प्याला | गडकरी रा.ग. |
| एको, एकाको | एका कोळियाने | देशपांडे पु.ल. |
| एगाएपा | एक गाव एक पाणवठा | आढाव बाबा |
| एनआ | नरनारायण आख्यान | एकनाथ |
| एपिआ | एका पिढीचे आत्मकथन | रेगे पु.शि. व इतर – संपा. |
| एभा | एकनाथी भागवत | देशमुख मा.कृ. – संपा. |
| एभारूड | एकनाथी भारूड | एकनाथ |
| एरुस्व | रूक्मिणी स्वयंवर | एकनाथ |
| एलच, एशिआ | एका लष्करी शिपायाचे आत्मचरित्र | शिंदे (जनरल) नानासाहेब |
| एवाका | एकनाथ वाङमय आणि कार्य | फाटक न. र. |
| एस्पृडा | एका स्पृश्याची डायरी | कऱ्हाडे सदा |
| एहोरा, एहोराभा | एक होता राजा भाग १– २ | बाबर सरोजिनी – संपा |
| एहोरा जडाव | एक होता राजा | बाबर सरोजिनी – संपा. |
| एहोरा धनगर | एक होता राजा | बाबर सरोजिनी – संपा. |
| एहोरा भलरी | एक होता राजा | बाबर सरोजिनी – संपा. |

| संक्षेप | ग्रंथनाम | लेखक/संपादक |
|---|---|---|
| एहोरा वासुदेव | एक होता राजा | बाबर सरोजिनी - संपा. |
| एंजिनिअरिंगची तोंडी परीक्षा | – | – |
| ॲका | ॲरिस्टॉटलचे काव्यशास्त्र | करंदीकर गो. वि. |
| ऐका | ऐतिहासिक काव्ये | पारसनीस द. ब. - संपा. |
| ऐकिप्र | ऐतिहासिक किरकोळ प्रकरणे | पारसनीस द.ब. - संपा. |
| ऐको पुर | ऐतिहासिक शब्दकोश-पुरवणी | केळकर य. न. |
| ऐगो | ऐतिहासिक गोष्टी, भाग २ | लोकहितवादी |
| ऐच | ऐतिहासिक चर्चा | पारसनीस द. ब. - संपा. |
| ऐच | ऐतिहासिक चरित्रे | पारसनीस द. ब. - संपा. |
| ऐजुले | ऐतिहासिक जुने लेख | पारसनीस द. ब. - संपा. |
| ऐजुले, ऐजुलेचिघंसमा | ऐतिहासिक जुने लेख<br>चिटणीस घराण्याची संक्षिप्त माहिती | कुलकर्णी बाळकृष्ण सखाराम |
| ऐटि | ऐतिहासिक टिपणे | पारसनीस द. ब. - संपा. |
| ऐतिपो, ऐपो, ऐपोके, ऐपोकेखं, | ऐतिहासिक पोवाडे | केळकर य. न. - संपा. |
| ऐनिसं | – | – |
| ऐप | ऐतिहासिक पत्रव्यवहार | सरदेसाई गो. स. - संपा. |
| ऐपयाव | ऐतिहासिक पत्रे, यादी वगैरे | साने का. ना. - संपा. |
| ऐपो, ऐपोके, ऐपोकेखं | ऐतिहासिक पोवाडे | केळकर य. न. - संपा. |
| ऐरापु, ऐरा, ऐरापुप्र | ऐनेराजमेहेल पुरवणी | – |
| ऐरापुविवि | ऐनेराजमेहेल पुरवणी, विवाहविधी | – |
| ऐले, ऐलेपा, ऐलेपाम्यु, ऐलेपाम्युप्र | ऐतिहासिक लेख | पारसनीस द.ब. - संपा. |
| ऐलेख, ऐलेसं, ऐलेरखं, खरे, ख | ऐतिहासिक लेखसंग्रह १५ खंड | खरे वा.वा. - संपा. |
| ऐलेप्र | ऐतिहासिक लेखसंग्रह प्रकरण | – |
| ऐसं, ऐसव | ऐतिहासिक संस्मरणीय वस्तू | पारसनीस द.ब. - संपा. |
| ऐसंसा, ऐसंसाखं | ऐतिहासिक संकीर्ण साहित्य, खंड | – |
| ऐस्थ | ऐतिहासिक स्थळे | पारसनीस द.ब. - संपा. |
| ऐस्फु, ऐस्फुले | ऐतिहासिक स्फुट लेख | पारसनीस द.ब. - संपा. |
| ओदे | – | – |
| ऑक्टो | ऑक्टोपस | पेंडसे श्री.ना. |
| ककां | कथाकांता | जोशी य.गो. |
| कग, कथाही | कथा ही गणिताची | – |
| कचेसुच, कचेसुदा | सुदामचरित्र | कचेश्वर. |

| संक्षेप | ग्रंथनाम | लेखक/संपादक |
|---|---|---|
| कजा | – | – |
| कती | – | – |
| कथा, कक | कथाकल्पतरू | कृष्णयाज्ञवल्कि |
| कथासारा, मक | कथासारामृत | महिपति. |
| कदिगे | कसे दिवस गेले | आपटे ह.ना. |
| कनाईशिला | कनाई शिलालेख (प्राचीन मराठी कोश) | तुळपुळे शं. गो. /फिल्डहाऊस |
| कनिसा | – | – |
| कफा, करंजाचा फार्स | करंजाचा मनोरंजक फार्स | थत्ते का.म. – संपा. |
| कमं | कर्पूरमंजरी | पंडित स.प. – संपा. |
| कराअ | करपद्धति आणि राष्ट्रीय अर्थव्यवस्था | राईरकर हेमलता |
| करिं, करिंथ | करिंथकरास पत्र | प. शा. न. क. बा. सो. |
| कर्म | कर्ममेलाचे अभंग, ससंगाथा | साखरे नानामहाराज – संपा. |
| कर्म,कर्मयोग | कर्मयोग | आपटे ह. ना. |
| ९६ कलमी | – | – |
| कला | कलानिधि | प्रियोळकर अ.सा. – संपा. |
| कला (बडोदे) | कलावंत खाते (बडोदे) | – |
| कविमि | कविमित्र | – |
| कशीमी, कमीअमी | कशी मी अशी मी | वाटवे सुषमा |
| कसा | कडुलिंबाची सावली | शेळके उद्धव ज. |
| – | कस्टडी रिमांड | सिनकर श्रीकांत |
| कंदील | कंदील | राणे श. रा. |
| काआ | काळी आई | माडगूळकर व्यंकटेश |
| काके, काव्यकेतकी | काव्यकेतकी | चौधरी सोपानदेव |
| काढ | – | – |
| काढा, कावढा | कावळा आणि ढापी | केळकर न.चिं. – संपा. |
| काच, काचक | काचकमळ | केचे मधुकर |
| काजवा | काजवा | गाडगीळ गंगाधर |
| कान्हेगाव शिला | कान्हेगाव शिलालेख (प्राचीन मराठी कोश) | तुळपुळे शं. गो. / फिल्डहाउस |
| कान्हो | कान्होपात्राचे अभंग, ससंगाथा | साखरे नानामहाराज – संपा |
| काप्रइसा | कायस्थ प्रभूंच्या इतिहासाची साधने | व्यवस्थापक कायस्थप्रभु ऐतिहासिक मंडळ |
| काभिं | कारागृहाच्या भिंती | गोरे ना. ग. |
| कारी शिला | कारी शिलालेख (प्राचीन मराठी कोश) | तुळपुळे शं. गो. / फिल्डहाऊस |

| संक्षेप | ग्रंथनाम | लेखक/संपादक |
|---|---|---|
| कालकूट | कालकूट | आपटे ह. ना. |
| कालवर्षी, कालवर्षी, शिला | कालवर्षी शिलालेख (प्राचीन मराठी कोश) | तुळपुळे शं. गो. / फिल्डहाऊस |
| कालवार शीला | कालवार शिला (प्राचीन मराठी कोश) | तुळपुळे शं. गो./फिल्डहाऊस |
| कालिका,कालिका पुराण, कापु | कालिकापुराण | देवेंद्रकीर्ती |
| काव्यालय | – | – |
| कासं | काव्येतिहास संग्रह | साने का. ना. – संपा. |
| कांगमो, कांचनगड | कांचनगडची मोहना | खाडिलकर कृ.प्र. – संपा. |
| कांम्हाम्हा, काम्हाएम्हा | कांही म्हातारे एक म्हातारी | घाटे वि.द. |
| किरकोळ लेखसंग्रह (चिपळूणकर) | किरकोळ लेखसंग्रह | चिपळूणकर वि.कृ. |
| किरी, किरीस्ताव | किरीस्ताव | नेऊरकर प्र.श्री. |
| किर्लो | किर्लोस्कर मासिक | – |
| किंगवि | गरूडगर्वविमोचन | किंकर |
| किंशुक | शुकरंभासंवाद | किंकर |
| किंसुदा, किंसुदाम, किंसुच | सुदामचरित्र | किंकर |
| कीच | कीचकवध | खाडिलकर कृ. प्र. |
| कीर्त, कीर्तन | कीर्तन तरंगिणी | जोशी दा. ग. – संपा. |
| कुअक | कुरूंदवाडकरकृत कविता | गोऱ्हे चं. शि. – संपा. |
| कुआंढ | कुलाबकर आंग्रे घराण्याचा इतिहास | ढब्बू दा. गो. – संपा. |
| कुबडीचेंडू | कुबडी चेंडू (बडोदे) | – |
| कुमा | कुवलयामाला | उद्योतनसूरी, उपाध्ये आ. ने. – संपा. |
| कुशलव्याख्यान | कुशलव्याख्यान | – |
| कुंजवि | कुंजविहारी | वरेरकर भा. वि. (मामा) |
| कुंडली | कुंडली रहस्य | पटवर्धन र. मो. |
| कृकादे | – | – |
| कृकौ, कृष्णकौतुक | कृष्णकौतुक | रघुनाथ, कानोले वि. अ. – संपा. |
| कृ. प्र. खाडिलकर | कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर यांची नाट्यसृष्टि | घारपुरे का. ह. |
| कृमुरा | मुद्गल रामायण | कृष्णदास |
| कृयु | कृष्णार्जुनयुद्ध नाटक | केळकर न.चिं. |
| कृषि,कृषिवि, कृषी, कृवि | कृषीकर्म विद्या | राजे रा. आ. – संपा. |
| कृष्णजन्म | – | – |
| कृष्णाकाठी कुंडल | गोविंदाग्रजांची कविता | गोविंदाग्रज |

| संक्षेप | ग्रंथनाम | लेखक/संपादक |
|---|---|---|
| कृष्णाचा पाळणा | – | – |
| के, केसरी | केसरी वर्तमानपत्र | – |
| केक, केशवसुत | केशवसुत यांची समग्र कविता | आपटे ह. ना. संपा. |
| केका | मोरोपंतकृत केकावली | गोडबोले परशुरामशास्त्री – संपा. |
| केतका | केतकरी कादंबरी | – |
| केदाखं | केदारखंड | करंदीकर |
| केले, केळ | केळकरांचे लेख | – |
| केपा | केवड्याची पात | अच्युत बर्वे |
| केया | – | – |
| केसं | केळकर संग्रह, कुबल दप्तर | – |
| केसासं | – | – |
| केस्व | केवळ स्वराज्यासाठी | आपटे ह.ना. |
| केळ आत्म | आत्मचरित्र | केळकर न.चिं. |
| कॅपिटल | – | – |
| कैया | कैफियत यादी | वाड ग. चिं. |
| कोआत्म | कोल्हटकर (आत्मवृत्त) | कोल्हटकर श्रीपाद कृष्ण |
| कोउ | कोवळी उन्हे | तेंडुलकर विजय |
| कोकप्राइ | कोल्हापूर व कर्नाटक प्रांतातील राज्ये, संस्थाने यांचा इतिहास | मोडक बा. प्र. |
| कोरकि, कोकि | कोरलईचा किल्लेदार | भिडे वि. वा. – संपा. |
| कोराइ | कोल्हापूर राज्याचा इतिहास | मोडक बा. प्र. |
| कोशिला | कोप्राड शिला (प्राचीन मराठी कोश) | तुळपुळे शं. गो./फिल्डहाऊस |
| कोसला | कोसला | नेमाडे भालचंद्र |
| कॉग्ज | कॉग्ज | चिरमुले शरच्चंद्र वासुदेव |
| क्रघइ | क्रमवंत घराण्याचा इतिहास | टिल्लू ग. दा. |
| क्रि, क्रिपुभा, क्रिपु | क्रिस्तपुराण | स्टिव्हन्स थॉमस |
| क्रेबु | क्रेमलिनच्या बुरुजावरून | सिंदकर नरेंद्र |
| खदे, खरादे | खरा देशभक्त | भावे वा.कृ. – संपा. |
| खपा | खडक आणि पाणी | गाडगीळ गंगाधर |
| खरा रजपूत वीर | – | – |
| खर्डाब | खर्ड्याच्या स्वारीची बखर | साने का. ना. |
| खर्डे, खर्डेघाशी | खर्डेघाशी | राजाध्यक्ष म. वि. |

| संक्षेप | ग्रंथनाम | लेखक/संपादक |
|---|---|---|
| खलप | महाराष्ट्र शब्दकोश | दाते य. रा. – संपा. |
| खळाळ | खळाळ | – |
| खाअ, खाअं बडोदे | खाजगी खाते अंमलदाराचे अधिकार (बडोदे) | – – |
| खाग्रा | खाटेग्राम शिला (प्राचीन मराठी कोश) | तुळपुळे शं. गो./ फिल्डहाऊस |
| खानो | खाजगीतील नोकरांचे अधिकार. | – – |
| खाला, खानेनियम | खाजगी खाते लागतीचे नियम | – – |
| खावा | खानदेशी वाग्वैभव | बोरसे दा. गो. |
| खून की आत्महत्या | नारायणराव पेशवे खून की आत्महत्या | रानडे पां. गो. |
| खांपा | खांदे पालट | सबनीस वसंत |
| खेकडा | खेकडा | मतकरी रत्नाकर |
| खेया | खेड्यातील यात्रा | परचुरे द. बा. – संपा. |
| खेस्व | खेड्यातील स्वराज्य | सोमण मो. गो. |
| ख्रिथसा | – | – |
| ख्रिपु, ख्रि | ख्रिस्तिपुराण | स्टीफन्स – संपा. सालढाणा जे. |
| गगवि | गरुडगर्वविमोचन | किंकर, अनेक कवि. |
| गजगौरी, बस्वलिंग | गजगौरी आख्यान | बस्वलिंग |
| गजरा | गजरा | – |
| गजेंद्रमोक्ष | गजेंद्रमोक्ष | रघुनाथ पंडित |
| गडकरी, वेड्यांचा बाजार | वेड्यांचा बाजार | गडकरी राम गणेश |
| गण | गणगोत | देशपांडे पु. ल. |
| गणप, गणवतराव | गणपतराव | आपटे ह. ना. |
| गणपतराव जोशी | गणपतराव जोशी | जोशी ल. ना. |
| गणूराया, गणू, गआचा | गणूराया आणि चानी | खानोलकर चि.त्र्यं. |
| गणेश पुराण, संजीवनी टीका | गणेश पुराण, संजीवनी टीका | – |
| गदिमा | माडगूळकर ग. दि. | – |
| गद्य, गरा | गद्यराज | हयग्रीवाचार्य |
| गलिव्ह | गलिव्हरचा वृत्तांत | – |
| गस्तो | गजानन स्तोत्र | – |
| गंगा, गंगाजल | गंगाजल | डॉ. कर्वे इरावती |
| गंगो | गंमतगोष्टी | मिरासदार द. मा. |
| गंर | रसकल्लोळ | गंगाधर |

| संक्षेप | ग्रंथनाम | लेखक/संपादक |
|---|---|---|
| गंरन | गंगारत्नमाला | नरहरी |
| गाक्रिप | गाजलेले क्रिकेटपटू | पंडित बाळ |
| गागो | गावाकडच्या गोष्टी | माडगूळकर व्यंकटेश |
| गाणे | गाणे | तेंडुलकर विजय |
| गादै | गाजती दैवते | जोशी महादेवशास्त्री |
| गापो, गाघपो | गायकवाड घराण्याचे व इतर पोवाडे | सरदेसाई गो. स. |
| गाबा | गारंबीचा बापू | पेंडसे श्री. ना. |
| गार | गावरहाटी | दांडेकर वि. म., जगताप म. भा. |
| गालेसं, धरागा, धरागालेखं | धनंजयराव गाडगीळ लेखसंग्रह | – |
| गाविदि | – | – |
| गांगा, गांव | गांवगाडा | अत्रे त्रिं. ना. – संपा. |
| गांधारी | गांधारी | महानोर ना. धो. |
| गि | लोकसाहित्याचा शब्दकोश | बाबर सरोजिनी |
| गी, गीर | गीतारहस्य | टिळक बा.गं. |
| गीता (वामन शांडिल्य) | गीता | वामन शांडिल्य |
| गीता, गीतार्णव | गीतार्णव | दासोपंत |
| गीताचंद्रिका | गीताचंद्रिका | – |
| गुइ | गुजराथ देशाचा इतिहास | लोकहितवादी |
| गुच | गुरुचरित्र | सरस्वती गंगाधर |
| गुजगो | गुजगोष्टी | फडके ना.सी. |
| गुजा | गुन्हेगार जाती | अत्रे त्रिं. ना. |
| गुमं, गुप्तमंजूष | संगीत गुप्तमंजूष | कोल्हटकर श्री. कृ. |
| गुमा | गुन्हेगाराच्या मागावर | शिरधनकर भानु |
| गुलबकावली | गुलबकावली | नवलकर वि. दा. |
| गुशि | गुलाबी शिकार | – |
| गुंजा | गुंजा | कर्णिक मधु मंगेश |
| गृशि | गृहिणी शिक्षक | सौ. जोशी सावित्रीबाई व जोशी ल. ना. – संपा. |
| गृहवैद्य | गृहवैद्य | – |
| गेलेत ते, गेलेदि | गेले ते दिवस | – |
| गोखंचिशाहूब | श्री शाहू महाराजांची बखर | चिटणीस गो.खं. |
| गोच,गोप्रच | गोविंद प्रभु चरित्र | कोलते वि.भि. – संपा. |
| गोता | गोतावळा | यादव आनंद |

| संक्षेप | ग्रंथनाम | लेखक/संपादक |
|---|---|---|
| गोप्र | गोपुरांच्या प्रदेशात | गाडगीळ गंगाधर |
| गोरा | गोरा कुंभाराचे अभंग, ससंगाथा | साखरे नानामहाराज. – संपा. |
| गोराघ | गोखले रास्ते घराण्याचा इतिहास | आपटे गो. वि. – संपा. |
| गोरी, गोमांतक | गोमांतक रीतीभाती, | भोबे श्रीकृष्ण |
| गोस्त्री | गोड स्त्रीगीते | जोशी महादेवशास्त्री |
| गोळा, गोबे | गोळा बेरीज | देशपांडे पु. ल. |
| गोंदा | गोंदाचे अभंग, ससंगाथा | साखरे नानामहाराज – संपा. |
| गौरांग | गौरांग प्रभुचे चरित्र | ठोंबरे कृ. ना. – अनु. |
| ग्यरिबॉल्डीचे चरित्र | ग्यरिबॉल्डीचे चरित्र | – |
| ग्रंथराज | महाराष्ट्र सारस्वत | भावे वि. ल. |
| ग्रामा | ग्रामायन | – |
| घका | घरचा कायदा | दामले सी. के. |
| घड्याळ कविता | – | – |
| घरदार | घरदार | माडगूळकर व्यंकटेश |
| घाको | घाशीराम कोतवाल | मोरोबा कान्होबा |
| घाश्रलो | घाटावरील श्रमिकांची लोकगीते | लिमये अनुसूया |
| घुले गुराखी | – | – |
| घूम | – | – |
| चक्र | चक्रपाणी (आद्य मराठी वाङ्मयाची सांस्कृतिक पार्श्वभूमी ) | ढेरे रा. चिं. |
| चक्रसू, चक्रसूत्र | श्रीचक्रधर सूत्रपाठ | देशपांडे वा. ना. – संपा. |
| चढा | महाराष्ट्र शब्दकोश–पुर. | दाते य. रा. |
| चसि, श्रीचक्रसि, चक्रधर सिद्धांत सूत्रे | चक्रधर सिद्धांतसूत्रे | नेने ह. पा. – संपा. |
| चसू | चक्रधरोक्त सूत्रपाठ | चक्रधर |
| चंचूद | चंद्रचूड दफ्तर, कला १ | आपटे द.वि. –संपा. |
| चंद, चंदभू | चंबळची दस्युभूमी | साने गीता |
| चंद्र, चंद्रगुप्त | चंद्रगुप्त | आपटे ह. ना. |
| चंद्रग्र, चंद्रग्रहण, चंद्र | चंद्रग्रहण नाटक | टिपणीस य. ना. |
| चाक | चाणाक्षपणाचा कळस | ह. ना. आपटे |
| चारु | चारुदत्त व संत सखू | – |
| चांकाप्रग्रापांपं | चांद्रसेनीय कायस्थ प्रभु ग्रामण्य प्रकरणातील पांच अस्सल आज्ञापत्रे. | – |

| संक्षेप | ग्रंथनाम | लेखक/संपादक |
|---|---|---|
| चांग | चांगदेवाचे अभंग, ससंगाथा | साखरे नाना महाराज - संपा. |
| चांगा | चांगदेव गाथा | – |
| चांपा | चांगदेव पासष्टी | ज्ञानदेव, देशपांडे एल व्ही - संपा. |
| चिज | चित्रमय जगत- नियतकालिक | – |
| चिताक | चिताक | मोरे महादेव |
| चित्रकृषि | चित्रमय कृषीवल मासिक | – |
| चित्रगुप्त, चित्रगुप्तशिब, चिशिमब | शिवाजीमहाराजांची बखर | चित्रगुप्त, साने. का. ना. - संपा. |
| चित्रना | चित्रसेन गंधर्व नाटक | जोगळेकर द. वा. |
| चित्रवंचना | चित्रवंचना नाटक | खरे वा. वा. |
| चित्रादिवाळी १९३४ | चित्रा (नियतकालिक) | – |
| चिपळूण शिला | चिपळूण शिलालेख (प्राचीन मराठी कोश) | तुळपुळे शं. गो./ फिल्डहाउस |
| चिमा, चित्त्याची माहिती | चित्त्यासंबंधी सामान्य माहिती | – |
| चिरा, चिनापट्टण राजकारणे | चिनापट्टणकडील राजकारणे | पारसनीस द.ब. - संपा. |
| चिलेसं, चिले | चिपळूणकर लेखसंग्रह | बुद्धीसागर मा. ग. - संपा. |
| चिशिमब | – | – |
| चिंवि | चिंतामणी विजय | – |
| चोखा | चोखा मेळाचे अभंग, ससंगाथा | साखरे नानामहाराज - संपा. |
| चौ | चौपद्या | दामोदर पंडित |
| चौऱ्याशीचा लेख | चौऱ्याशीचा लेख (पंढरपूर शके ११:५) प्राचीन मराठी कोश | तुळपुळे शं. गो./ फिल्डहाऊस- संपा. |
| छअं | छत्रेकृत अंकगणित | छत्रे के. ल. - संपा. |
| छच | विष्णुपंत छत्रे चरित्र | गद्रे ना. कृ. |
| छत्रे इसपनीति | इसप-नीतिकथा | छत्रे स. का. |
| छंर | छंदोरचना | पटवर्धन मा. त्रिं. - संपा. |
| छशिब | छत्रपती शिवाजीराजे यांची बखर | – |
| छांदसी | छांदसी | रेगे पु. शि. |
| जका | – | – |
| जज | जगावेगळे जग | – |
| जजदि | जपान जसा दिसला | केळकर रघुनाथ |
| जटापा | जपून टाक पाऊल | काळे व. पु. |

